# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाची प्रकाशने

**बुद्धी, प्रेरणा व क्रांती**– भाग १ ( एम्. एन्. रॉय लिखित " Reason, Romanticism & Revolution " चा अनुवाद ). श्री. बा. रं. सुंठणकर, पृष्ठे १४+२९८+१८, किंमत रु. ५.

**धर्मशास्त्राचा इतिहास**–पूर्वार्ध ( भारतरत्न कै. डॉ. पां. वा. काणे लिखित " History of Dharmashastra " चा सारांश अनुवाद ) श्री. य. आ. भट, पृष्ठे १६+६०० किंमत रु. २०.

**अभिनय साधना**–( स्तानिस्लाव्स्की लिखित "An Actor Prepares " चा अनुवाद ) श्री. के. नारायण काळे, पृष्ठे ७+३६८, किंमत रु. ११.

**बुद्धी, प्रेरणा व क्रांती**- भाग २ ( एम्. एन्. रॉय लिखित " Reason, Romanticism & Revolution " चा अनुवाद ) श्री. बा. रं. सुंठणकर, पृष्ठे ५+२८६+८.

**धर्मशास्त्राचा इतिहास**–उत्तरार्ध ( भारतरत्न कै. डॉ. पां. वा. काणे लिखित " History of Dharmashastra " चा सारांश अनुवाद ) श्री. य. आ. भट, पृष्ठे ४+५७६+३२, किंमत रु. १६.

**माताजी**– ( स्वामी निखिलानंद लिखित " Holy Mother " चा अनुवाद ) श्री. वि. य. कुळकर्णी, पृष्ठे ८+२९९, किंमत रु. ५–२५.

**संगीत व कल्पकता**–( कोपलँड लिखित " Music & Imagination " चा अनुवाद ) श्री. श्री. ह. देशपांडे, पृष्ठे १२+१७०, किंमत रु. ७.

**स्वातंत्र्याविषयी**–( जे. एस्. मिल् लिखित " On Liberty " चा अनुवाद ) श्री. व. म. कर्णिक, पृष्ठे २६०, किंमत रु. ६–५०.

**सामाजिक करार**– ( रुसोच्या " Social Contract " चा अनुवाद ) श्री. व. म. कर्णिक, पृष्ठे १४+१३६, किंमत रु. ४.



भाषांतरमाला क्र. ४३ (१)

# डॉन क्विक्झोट

## भाग १

सरव्हँटिस लिखित

" DON QUIXOTE " Part I

या कादंबरीचा मराठी अनुवाद

अनुवादक

दा. न. शिखरे




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

मुंबई

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङ्मयनिर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती–विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा येण्याकरिता मराठी भाषेत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्ययावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागेल. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात, तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व राहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही. एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटिन इत्यादि पश्चिमी भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतर किंवा सारांश अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून, ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्य व भारतीय भाषांतील सुमारे ३०० पुस्तके निवडली आहेत. होमर, व्हर्जिल, इस्किलस्, ॲरिस्टोफेनीस्, युरिपिडिस्, प्लेटो, ॲरिस्टॉटल, थॉमस ॲक्वाइनस्, न्यूटन, डार्विन, रूसो, कांट, हेगेल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीयर, टॉलस्टॉय्, दोस्तएव्स्की, स्तानिस्लाव्स्की, बर्ट्रॅन्ड रसेल, रूथ बेनेडिक्ट, रायशेनबाख, व्हाइटहेड, क्रोचे, मालिनवस्की, कॅसिरेर, गॉर्डन व्ही चाइल्ड इत्यादिकांचा या

भाषांतरमालेत समावेश केला आहे, संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण, भरताचे नाट्यशास्त्र, संगीत-रत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथासप्तशती, त्रिपीटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही या भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. मंडळाच्या भाषांतर योजनेखाली मंडळाने आतापर्यंत अनेक अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिलचे " On Liberty ", रूसोचे " Social Contract ", एम्. एन्. रॉयचे " Reason, Romanticism & Revolution " व " Letters from Jail ", स्तानिस्लावूस्कीचे " An Actor Prespares" तुर्गेनिवचे "Fathers & Sons" रायशेनबाखचे "Rise of Scientific Philosophy ", गन्नर मिर्‌दालचे " Economic Theory and Underdeveloped Regions ", कै. पां. वा. काणे यांचे " History of Dharmashastra ", कोपलँडचे " Music & Imagination ", बर्ट्रांड रसेलचे " Religion & Science ", तेरझागीचे " Theoretical Soil Mechanics ", विशाखादत्तचे " मुद्राराक्षसम् ", भरतमुनीचे " भरत नाट्यशास्त्र " ( अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९ ), निकोलाय मनुचीचे " Storia Do Mogor ", ए. से. पिगू लिखित " Socialism Vs. Capitalism " इत्यादी पुस्तकांची भाषांतरे व सारानुवाद प्रकाशित झाले आहेत.

६. सरव्हँटिस् लिखित " Don Quixote " या ग्रंथाच्या दोन भागांचा मराठी अनुवाद श्री. दा. न. शिखरे, पुणे यांनी केला असून " डॉन क्विक्झोट " भाग १ मंडळाच्या भाषांतरमालेखाली प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

वाई
२० श्रावण १८९६
( गोकुळाष्टमी )
११ ऑगस्ट, १९७४

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

# परिचय

जगप्रसिद्ध अशा एका प्रदीर्घ विनोदी कादंबरीचे हे भाषांतर मराठी वाचकांना सादर करताना मला आनंद वाटतो. एका स्पॅनिश लेखकाने १६ व्या शतकात लिहिलेली ' डॉन क्विक्झोट ' ही कादंबरी सुमारे १००० पृष्ठांची आहे. ' गलिव्हर्स ट्रॅव्हल्स ' इतकीच ती हास्यरसपूर्ण व उपहासगर्भ आहे. काही इंग्लिश टीकाकार या कादंबरीच्या जनकाला–सर्वेंटिसला– शेक्सपीयरच्या पंक्तीस बसवितात.

शाळा-कॉलेजात ' डॉन क्विक्झोट ' चा एखादा छोटासा उतारा शिकविला जातो, त्यामुळे बहुतेक आंग्लशिक्षितांना हे नाव परिचित असते, पण अगदी वरवर. काचेची भांडी लाथेने पाडणारा शेख महंमद आणि डॉन क्विक्झोट एकाच माळेचे मणी, असे ते सरधोपटपणे समजतात. पाणचक्कीला राक्षस समजून तिच्यावर हल्ला करणारा एक वेडपट म्हणजे डॉन क्विक्झोट, अशी त्यांची उथळ समजूत. पण मूळ समग्र कादंबरी वाचली म्हणजे ही समजूत किती चुकीची आहे हे कळून येते. तेव्हाच्याच काय पण आताच्याही समाजावर–त्यातील रूढींवर, चालीरीतींवर, राज्यकर्त्यांवर, कवींवर, लेखकांवर– उपहासाचे तीक्ष्ण शस्त्र चालविणारा मर्मज्ञ व तत्त्वज्ञ भाष्यकार म्हणजे सर्वेंटिस अशी खात्री पटते.

## कादंबरीकाराची चरित्र–रेखा

सर्वेंटिस् ( १५४७–१६१६ ) हा एक साधा सैनिक होता. त्याचे व शेक्सपीयरचे मृत्युवर्ष एकच. दोघेही सामान्य नागरिक, जवळजवळ अशिक्षितच, सारखेच कर्जबाजारी, किरकोळ गुन्ह्यासाठी दोघांनीही तुरुंगाची हवा चाखलेली. पण उभयतांची उपजत प्रतिभा असामान्य !– सर्व जगात; त्या त्या क्षेत्रात, अद्वितीय ! सर्वेंटिसने ३० नाटके व १२ कादंबऱ्या लिहिल्या, पण तो अजरामर झाला डॉन क्विक्झोटमुळेच. त्याचा प्रथम खंड त्याने लिहिला तुरुंगवासात.

कोणत्याही लेखकाच्या जीवनाचे प्रतिबिंब त्याच्या साहित्यामध्ये थोडेफार–स्पष्ट–अस्पष्ट उमटते हे खरे, पण सर्वेंटिसच्या बाबतीत ते फारच खरे आहे. त्याच्या या कादंबरीत जे जे प्रसंग रंगविलेले आहेत, जे जे विचार मांडलेले आहेत, त्या बहुतेक सर्वांचे बीज त्याच्या जीवन–क्रमांत सापडते. तुर्कांशी ऑस्ट्रियाचे जे युद्ध १५७१ साली झाले, त्यात सैनिक म्हणून हा कादंबरीकार प्रत्यक्ष लढला आणि त्याला बंदुकीच्या गोळ्यांनी तीन जखमाही झाल्या. त्याच्या पुढील वर्षी त्याने सागरी युद्धात भाग घेऊन सिसिलीच्या व्हाइसरॉयकडून गौरवाचे प्रमाणपत्र मिळविले. तुर्कांनी या विनोदाचार्याला पकडून अल्जेरियात गुलाम म्हणून पाठविले. तेथून पळून जाण्याचा प्रयत्न त्याने दोनदा केला, पण तो फसला आणि शत्रूने त्याला ठार मारण्याची धमकी दिली. तसेच, त्याला

२००० फटक्यांची शिक्षाही झाली होती. ती पुढे माफ झाली असली, तरी ती त्याच्या मनात घर करून राहिली आणि सँकोला फटके लगावण्याच्या रूपाने बाहेर पडली–आणि शाश्वत स्वरूप पावली. सोन्याची ५०० नाणी खंडणी म्हणून देऊन त्याने आपली सुटका करून घेतली. या सर्व घटनांचे पडसाद 'डॉन क्विक्झोट' मध्ये ऐकू येतात.

सर्वेंटिसच्या काळी युरोपात शिलेदारीचे अवशेष भ्रष्ट स्वरूपात वावरत होते. त्या नकली शिलेदारांच्या उसन्या प्रणयचेष्टा व नाटकी पराक्रम यांवर या कादंबरीकाराने चुरचुरीत टीका केलेली आहे. विडंबनाचे शस्त्र त्याने मोठ्या कौशल्याने चालवून त्या शिलेदारांचे वेडेचार उजेडात आणले आहेत. केवळ शिलेदारीवरच नव्हे तर, तत्कालीन बाजारबुणग्या साहित्यावरही त्याने खरपूस टीका केली आहे. या कादंबरीच्या पहिल्या खंडाच्या अखेरीस त्याने नाटकांची जी चर्चा, चिकित्सा व चिरफाड केली आहे, ती आजच्या मराठी नाट्यसृष्टीला तंतोतंत लागू पडते, यात या कादंबरीकाराची दूरदृष्टी किंवा सर्वव्यापी प्रतिभाच दृष्टीस पडत नाही काय? दुसऱ्या खंडातील काव्य-मीमांसाही अशीच सर्वगामी आहे; –आणि तशीच त्याची राजनीतीही.

## भाषांतराचा बहुमान

वयाच्या ५८ व्या वर्षी सर्वेंटिसची डॉन क्विक्झोट (भाग १) ही विनोदी कादंबरी प्रकाशित झाली. दुसरा भाग १० वर्षांनंतर उजेडात आला. त्याचे प्रतिबिंब मराठी वाचकाला दिसावयास लागली सुमारे ३०० वर्षे. 'केरळ–कोकिळ' चे संपादक श्री. कृ. ना. आठल्ये यांनी १९२५ साली 'फाकडे तलवार–बहाद्दर' या नावाने मराठी अनुवाद लिहिला–अगदी संक्षेपाने, अवघ्या १५० पृष्ठांत. तीन वर्षांपूर्वी श्री. शं. रा. देवळे यांनीही असाच अनुवाद रचला. हिंदुस्थानीत मात्र १८९४ सालीच पंडित रतननाथ यानी या कादंबरीचे रूपांतर केले. १८९६ मध्ये जपानी भाषेत डॉन अवतीर्ण झाला. एकूण १४ युरोपियन भाषांनी त्याला अंगाखांद्यावर खेळविले. मराठीत मात्र संपूर्ण डॉन क्विक्झोट, या द्विखंडात्मक ग्रंथाच्या रूपाने, आताच अवतरत आहे. डॉन क्विक्झोट ही विनोदी कादंबरी म्हणजे Master–piece of Comic Romance आहे असे विद्वान ग्रीक साहित्यिकांचे मत आहे, काही टीकाकारांनी तर या कादंबरीच्या जनकाचा गौरव 'Brightest genius of his age and country' अशा शब्दांनी केला आहे. इंग्लंडने जगाला शेक्सपीयरच्या नाटकांचा अमोल नजराणा अर्पण केला, रशियाने टॉलस्टॉयच्या 'वॉर अँड पीस' या कादंबरीचा बहुमोल अलंकार बहाल केला, त्याप्रमाणेच स्पेनने जगाला दिलेली चिरंतनची रुचिर देणगी म्हणजे सर्वेंटिसची 'डॉन क्विक्झोट' ही कादंबरी! तिच्या दुसऱ्या खंडाच्या आठ आवृत्त्या दोन वर्षांत निघाल्या– आणि एकूण कादंबरीलाही अभूतपूर्व यश लाभले.

सैनिक म्हणून लढाई करताना सर्वेंटिसला कैद व्हावे लागले. कर्जासाठीही त्याला कैद भोगावी लागली. या एकांतातील सूक्ष्म चिंतनाने कदाचित् असेल, पण त्याने

समाजाची नाडी बरोबर ओळखली आणि समाजातील दोषांवर नेमके बोट ठेवले. ते दोष काय एकट्या स्पेन देशाचे होते ? का केवळ १६ व्या शतकाचे होते ? ते सार्वकालिक व सार्वदेशीयच आहेत. २० वे शतकातील भारतातही तसेच आहेत. म्हणून आपला आरसाच हा विनोदी लेखक आपल्याला दाखवीत आहे, असे आजच्या भारतीयाला वाटल्यावाचून राहणार नाही.

## कादंबरीचे अंतरंग

डॉन क्विक्झोटचे आंतरिक गुण–वैभव कळण्यासाठी ती सर्व कादंबरीच वाचली पाहिजे. खदखदा हसवून सोडणाऱ्या प्रसंगांची खूपच गर्दी या कादंबरीत आहे आणि तशीच ती रंगविलेली आहे मार्मिकतेने. मनुष्य-स्वभावाची विविधता आणि पात्रांची व प्रसंगाची गर्दी हास्यरसाला उठाव देणारीच आहे. प्रणय-प्रसंगही पुष्कळ आहेत–आणि त्यामुळे प्रणय-गीतेही. एक लघुकादंबरीही त्यात लेखकाने समाविष्ट केलेली आहे. त्याने डॉनच्या तोंडी घातलेली उसनी प्रौढ भाषा, कृतक गंभीर भाषा आपल्या हरिदास-पुराणिकांची आठवण करून देणारी आहे, पोरासोरांना आवडणारे मारामारीचे प्रसंग तर जागोजाग आहेत. शिलेदारीची पोकळ ऐट आणणाऱ्या सत्प्रवृत्त माणसाचा मूर्खपणा लेखकाने चांगलाच रंगविलेला आहे. त्यामुळे संस्कृतातील शकार किंवा मराठीतील लक्ष्मीधर यांची आठवण कोणालाही सहज होण्यासारखी आहे. शकार–लक्ष्मीधरापेक्षा डॉन क्विक्झोट अधिक उदार, अधिक समाजहितेच्छू आणि अधिक ज्ञानी दाखविलेला आहे. समाजातील दोषांवर व व्यंगावर तो जसे अचूक बोट ठेवतो, तसेच युद्ध व शांतता या अजून न सुटलेल्या जागतिक समस्येचाही शहाणपणाने विचार करतो.

## कथानकाची रूपरेषा

डॉन क्विक्झोट हा स्पेनमधील एका खेड्यातील सज्जन माणूस–शांत वृत्तीचा, उदात्त भावनांचा व परोपकारी विचारांचा . त्याचे वय सुमारे ५० वर्षे. त्याची शरीर-यष्टी बळकट पण कृश आणि मुद्राही क्षीण पण विचारी. मानवजातीवर त्याचे अपार प्रेम. कोणाही मानवावरचे संकट दूर करण्यास व त्याच्यावरील अन्याय–जुलूम नष्ट करण्यास तो सदैव तत्पर. किंग आर्थरच्या ' राऊंड टेबल 'च्या लॅन्सलॉटसारखे जे पराक्रमी व परोपकारी शिलेदार इतिहासात होऊन गेले, त्यांच्या परंपरेत शोभण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारा डॉन क्विक्झोट जितका आदरणीय वाटतो, तितकाच त्याचा मूर्खपणा व आचरटपणा हास्यास्पद व करुणास्पद वाटतो. शिलेदारीवरील ग्रंथ वाचण्याचे त्याला जबरदस्त वेड. त्यापायी त्याने आपला जमीनजुमला विकून टाकला आणि शिलेदारीचे ग्रंथ विकत घेतले व त्यांचे अष्टौप्रहर वाचन व चिंतन चालविले. सदा चिंतनात मग्न असणारा हा सज्जन शिलेदारीच्या वेडापायी भलभलत्या कल्पना व कृत्ये करू लागला. या विनोद-प्रधान कादंबरीतील प्रधान पात्रे म्हणजे शिलेदारी गाजवू पाहणारा डॉन क्विक्झोट, त्याचा रेम्याडोक्या सेवक सँको पँझा, त्याची तरुण पुतणी, त्याची प्रेमळ घरवाली,

त्याच्यावर प्रेम करणारा न्हावी व पाद्री आणि मुख्य म्हणजे त्याच्या प्रणय–कल्पनांच्या सृष्टीत विहार करणारी टोबोसीची डल्सिनिया. ती असते एक साधीभोळी, गरीब, अडाणी कृषक–कन्या. धान्य पाखडणे किंवा मेंढ्या चारणे, याशिवाय ती शेतकऱ्याची मुलगी दुसरे काय करणार ? पण तिला डॉन आपली हृदय–देवता मानतो, सेवकाबरोबर तिला प्रेम-पत्र पाठवितो, तोही तिचे उत्तर आणतो–तिची भेटही न घेता– पण आमचे शिलेदार साहेब सदैव तिच्याच चिंतनात गुंग. तिच्यावर कोणी जादूटोणा केला आहे आणि म्हणून तिच्या हातातील हिरे–मोती गहू–जोंधळ्यासारखे दिसतात, अशा भ्रमात ते असतात !

## मृगजळामागे धावाधाव

अशा छांदिष्ट पण परोपकारी शिलेदारजींनी अन्याय–निवारणार्थ अनेक मोहिमा काढल्या. नव्यानव्या साहसपूर्ण प्रसंगांच्या शोधार्थ ते कोठेही जाण्यास व कोणतेही संकट अंगावर घेण्यास सज्ज असत. त्यावेळी खऱ्याखोट्याचा विवेक करण्याचे तारतम्य त्याना मुळीच राहत नसे. एकादी खानावळ दिसली की ती त्यांना पुराणकालीन किल्ला वाटे आणि खानावळवाला हा किल्लेदार भासे. जोरजोराने आवाज करणारी पवनचक्की ही त्यांना शत्रूचे ओरडणारे सैन्य आल्यासारखी भासे व शव–पेटिकेतून नेल्या जाणाऱ्या प्रेताच्या जागी कोणी पळवून आणलेली राजकन्या असेल आणि ती बिचारी आपल्या सुटकेसाठी आपला धावा करीत असेल, असा भास किंवा भ्रम त्यांना होई. प्रत्येक मोहिमेत त्यांना काही ना काही साहसी घटना भेटत आणि त्या आपल्या वीरवृत्तीला व दयावृत्तीला आव्हान देत आहेत, असे त्यांना भासे. एका शेतकऱ्याने आपल्या मजुराला झाडाला बांधून मारहाण केली, तर त्याच्या रक्षणार्थ हे शिलेदार धावले पण त्यांच्या पराक्रमामुळे त्या मुलाचे नुकसानच झाले. कधी व्यापारी तर कधी धनगर, कधी गुलाम तर कधी जहाजावरील गुलाम, कधी नाटकमंडळी तर कधी कठपुतळ्यांचा खेळ, कधी भविष्य सांगणारे माकड तर कधी नुसते पितळी डोके, कधी गाढव शोधून काढण्यासाठी गाढवासारखे रानावनात ओरडणारे नगरपिते, तर कधी प्रेमिकांच्या हत्या–आत्महत्या किंवा त्यांचे सोंगढोंग ! ! सारी हसरी गॅलरी बनली आहे, अंतर्गोल-बहिर्गोल आरशांनी.

अल्लाउद्दीनासारख्या मॉंटेसिनोच्या गुहेतील अद्भुत वस्तू ! डॉन खरोखर एकच तास त्या गुहेत होता, पण तीन दिवस आपण त्या इंद्र–भवनात काढल्याचा त्याचा आभास जितका विस्मयकारक; तितकाच लाकडी खुंटी पिळताच आकाशातून अग्निलोकातून उड्डाण करणारा कळीचा घोडाही आश्चर्यजनक. मुलाने मुलीचा वेष घेणे, स्त्रीच्या वेषात पाद्री येणे व ' दर्पणांकित शिलेदारा ' चे सोंग–हे सारे नाट्य–प्रकार प्रत्यक्ष पाहताना कोणाची हसून हसून मुरकुंडी वळणार नाही ? डलसीनियाला जादूतून मुक्त करण्याचा उपाय कोणता ? तर सँकोने तीन हजारावर फटके स्वतःला स्वतः मारून घेणे ! मालकाच्या अजीजीमुळे, आग्रहामुळे तो त्या तपस्येचा प्रारंभ करतो, पण कसा ? तर रात्री रानांतील

झाडांना फटके लगावून ! आपल्या सुशील पत्नीची शील-परीक्षा करावयास आपल्या मित्राला सांगणाऱ्या सज्जन तरुणाची प्रेम-कहाणी तर स्वतंत्र रमणीय कादंबरीचा किंवा नाटकाचा विषय होण्याजोगी खासच आहे.

## वैचारिक बैठक

केवळ खो खो करून हसविणे, एवढेच या विनोदी कादंबरीचे ध्येय दिसत नाही. एका ड्यूकने सँको या सेवकाला एका बेटाचे राज्यपाल-पद बहाल केले असता त्याने राज्यकारभार कसा केला, न्यायनिवाडा कसा केला, हे सारे वर्णन कोणत्याही राज्यकर्त्याला विचार करावयास लावणारे आहे. त्याचप्रमाणे डॉनने त्याला राज्यकारभारविषयक ज्या काही सूचना दिल्या आहेत, त्या 'सभासदाच्या बखरी' इतक्या महत्त्वाच्या आहेत. शेवटी, डॉनला त्याचे सगेसोयरे फसवून एका पिंजऱ्यातून घरी नेतात, तेथे तो ग्रामीण जीवनाची स्वप्ने पाहतो, आजारी पडल्यावर पाद्र्यापुढे पापाचा पाढा वाचतो, मृत्युपत्र लिहून घेतो आणि मृत्युलेखही तयार करून मृत्यू पावतो. तो आपली सारी मालमत्ता आपल्या पुतणीस देतो; पण एका अटीवर की, शिलेदारीवरील एकही पुस्तक ज्याने उभ्या आयुष्यात वाचले नसेल, अशाच माणसाशी तिने लग्न केले पाहिजे ! शिलेदारीच्या ग्रंथाचे आजन्म वेड जगणाऱ्याची ही अट किती अर्थपूर्ण आहे ! !

अशा विरोधाभासांनी नटलेल्या, विसंगतीने भरलेल्या पण त्याबरोबरच सूक्ष्म टीकेने व गंभीर विचाराने वाचकाला अंतर्मुख करणाऱ्या या कादंबरीला शाश्वत प्रतिष्ठा व लौकिक लाभला यात आश्चर्य काय ?

अशा या महान् ललित कृतीचे मराठी भाषांतर करण्याचे काम मला मिळाले व ते तडीस गेले, याचे मला समाधान वाटते. 'गांधी-वाङ्मयाच्या' ८।१० खंडांचे मराठी अनुवाद मी पूर्वी केले होते, पण हास्यरसप्रधान कादंबरीचे हे माझे भाषांतर मला निराळाच आनंद देऊन गेले. हे सक्त भाषांतर आहे—मोकळा अनुवाद नव्हे. पाश्चात्य स्थले, पाश्चात्य नावे, पाश्चात्य संदर्भ, पाश्चात्य चालीरीती-जशाच्या तशाच येथे ठेवलेल्या आहेत. त्या कामी-विशेषतः मुक्तछंद कविता रचण्याचे कामी- श्री. शा. नी. ओक यांनी मला जे साहाय्य केले त्याबद्दल मी त्यांचा कृतज्ञ आहे.

महाराष्ट्र राज्याच्या " साहित्य आणि संस्कृति मंडळा "ने अशा वेचक अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रसिद्ध केली आहेत व मराठी भाषेला संपन्न बनविले आहे. त्यात ही भर टाकण्याची संधी मला दिल्याबद्दल त्या 'मंडळाचे' व त्याच्या भाषांतर-विभागाचे संपादक श्री. बा. रं. सुंठणकर यांचे आभार मी मानतो. एवढे प्रचंड पुस्तक, सर्वतोपरी बिकट अशा सद्यःस्थितीत, शुद्ध, प्रसन्न व सुडौल स्वरूपात मुद्रित करून देणाऱ्या 'आनंद प्रेस'ला व त्याचे मालक श्री. दादासाहेब जोशी यांना मी धन्यवाद देतो.

**—दा. न. शिखरे**

# अनुक्रमणिका

खंड ४

● ● ●

ला मांचाचे सुप्रसिध्द

# डॉन क्विक्झोट यांचे जीवन व पराक्रम

---

## प्रकरण १

## डॉन क्विक्झोट यांच्या राहणीचा दर्जा आणि रीत

स्पेनमधील ला मांचा हा एक प्रदेश. त्यातील एका खेड्यात घडलेली ही गोष्ट. त्या खेड्याचे नाव नाही मी सांगणार. फार दिवस काही झाले नाहीत या गोष्टीला. त्या खेड्यात एका जुन्या परंपरेचे खानदानी गृहस्थ राहात असत. खुंटाळ्यावर आडवा ठेवलेला एक भाला, त्याच्या शेजारी एक जुनी ढाल, बाहेर बांधलेला एक हडकुळा घोडा आणि एक शिकारी कुत्रा. हा त्याचा ठराविक सरंजाम. त्या गृहस्थांच्या आहारात मेंढीच्या मांसापेक्षा स्वस्त बैलाचे मांस जास्त. बहुतेक रात्रीच्या जेवणात खिमा किंवा मांसाच्या बारीक तुकड्यांचा रस्सा, शुक्रवारी मसुरीच्या डाळीचे वरण आणि शनिवारी शिळ्या हाडा-खुरांची कढी असे. रविवारचा खास बेत म्हणजे कबुतराचे मांस. स्वारीच्या प्राप्तीचा पाऊण हिस्सा असा आहारात खर्च होई. बाकीची मिळकत, एक मखमलीचा कोट, जांभळ्या रंगाची विजार आणि त्याच रंगाचे चढाव-रविवाराच्या व सणावाराच्या पोशाखावर आणि एरवीच्या रोजच्या घरगुती हातसुती वस्त्रांवर, खर्च होई.

या गृहस्थाचे अवघे कुटुंब म्हणजे, चाळिशी उलटलेली घरधनीण, विशीच्या आतली पुतणी आणि घरात व शेतात काम करणारा एक नोकर-जो घोड्यावर खोगीर घाली आणि झाडे छाटण्याची आकडीही चालवी. खुद्द या गृहस्थांचे वय असेल अदमासे पन्नाशीचे. ते शरीराने किरकोळ असले आणि त्यांचा चेहरा सुकट असला, तरी त्याच्यावर धट्टेकट्टेपणाचा तजेला होता. ते रोज सकाळी लवकर उठणारे आणि शिकारीचे मोठे प्रेमी. त्यांचे आडनाव, काहीच्या मते, 'क्विझाडा', तर काहींच्या मते

'क्वेसाडा' होते. (या बाबतीत लेखकांचे मतभेद आहेत.) तथापि असा सयुक्तिक तर्क करायला हरकत नाही की, त्याचे आडनाव 'क्विझाना' (उंच जबड्यामुळे चेहरा बारीक दिसणारा) असावे. अर्थात् या आडनावाचे आपल्याला काही विशेष महत्त्व नाही. त्या गृहस्थांच्या इतिहासातील बाकी सारी माहिती आपण खडान्‌खडा बरोबर दिली म्हणजे झाले.

तेव्हा आपल्याला हे सांगितले पाहिजे की, ज्या ज्या वेळी या सद्‌गृहस्थांना काही काम नसे (आणि असाच काळ बहुतेक वर्षभर असे) तेव्हां ते प्राचीन काळच्या शिलेदारांच्या कहाण्या वाचण्यात वेळ घालवीत असत. अशी वीरश्रीची पुस्तके वाचण्यात ते इतके तल्लीन व आनंदित होत की, त्यामुळे त्यांनी खेड्यातील मोकळ्या हवेतील क्रीडा-विहारांना जवळजवळ रामरामच ठोकला होता. आपल्या शेतीवाडीकडे ते लक्षही देत नसत, फार काय त्या साहसी कथांनी त्यांचे चित्त इतके वेधले जाई की, तशी पुस्तके खरेदी करण्यासाठी, त्यांनी लागवडीखाली असलेली आपली पुष्कळशी जमीन विकून टाकून, आलेल्या पैशाने मिळतील तितकी पुस्तके विकत घेतली. त्या सर्व पुस्तकांमध्ये सुविख्यात ग्रंथकार फेलिसियानो डी सिल्वा याच्या ग्रंथांइतका आनंद त्यांना दुसऱ्या कशानेही मिळत नसे. त्या ग्रंथाची भाषा गद्य असली तरी ती सुस्पष्ट असे आणि मधून मधून शैलीदार वाक्यांची जरतार त्यात विणलेली असे. काही काही उतारे तर त्यांना वक्तृत्वाचे मौक्तिकहारच वाटत. त्यातही, सरदारांनी एकमेकांना दिलेली आव्हाने आणि विलक्षण भाषा शैलीने नटलेली प्रणय-प्रधान भाषणे वाचताना त्यांचे अगदी भान हरपे. उदा० "माझ्या युक्तिवादाचा तू जो अयुक्तिक उपयोग केलास, त्या कारणाने माझी बुद्धी मंद झाली आहे आणि म्हणून तुझ्या सौंदर्यावर मी टीका करणे सयुक्तिक ठरेल." तसेच "स्वर्गस्थ देवतांनो! तुम्ही आपल्या स्वर्गीय शक्तीने हे तारामंडळ निर्माण करून सुरक्षित झाला आहात आणि स्वर्गीय वैभवाने स्वर्गीच्या राज्याचे स्वामी झाला आहात." या व अशा वाक्यांचा अर्थ लावताना त्यांचे डोके फुटून जाई आणि बुद्धी गोंधळात पडे. केवळ त्या वाक्यांचा अर्थ लावण्यासाठी ॲरिस्टॉटलला मृतावस्थेततून जिवंत केले असते, तरी त्याला तो अर्थ कदापि लावता आला नसता.

डॉन बेलियानिस या शिलेदाराने ज्या भयंकर जखमा केल्या व सोसल्या, त्या क्विक्झाडांना फारशा आवडत नसत. कारण, त्या जखमांमुळे त्या शिलेदाराचा चेहरा व शरीर इतके काही विलक्षण विद्रूप झाले होते की, जगातील सारी शल्यविद्या ती विद्रूपता पुसून टाकू शकली नसती. तरीही त्या लेखकाची तारीफ क्विक्झाडा करीत असत, कारण त्या लेखकाने आपली पराक्रमाची ही अपूर्ण गाथा पूर्ण करण्याचे अभिवचन पुस्तकाचे शेवटी दिलेले आहे. पुष्कळ वेळा क्विक्झाडांना वाटे, आपण हातात लेखणी घ्यावी आणि स्वतःच ते पुस्तक शब्दशः प्रामाणिकपणे पूर्णत्वास न्यावे. तसे त्यानी केलेही असते-अन् त्यात त्यांनी चांगले यशही कमावले असते, पण त्याहून अधिक महत्त्वाच्या योजनांमध्ये त्यांचे विचार पूर्णपणे व्यग्र असत.

त्या विभागातील पाद्री विद्वान होता. त्याने स्पेनमधील सिगेंझा येथील पदवी संपादन केलेली होती. त्या पाद्र्याशी क्विक्झाडा कैक वेळा असा वाद–विवाद करीत की, ‘ इंग्लंडचा पामेरिन व गॉलचा अमॅडिस यांमध्ये चांगला शिलेदार कोण ? ’ पण त्याच शहरात राहणारा मास्टर निकोलस हा नापित म्हणे, “ सूर्याच्या शिलेदाराची बरोबरी त्या दोघांपैकी कोणीही करू शकणार नाही. तशी थोडीफार बरोबरी कोणी करू शकेल तर तो म्हणजे गॉलच्या अमॅडिसचा भाऊ डॉन गॅलोर. कारण, त्याचा स्वभाव अत्यंत उदार होता आणि आपल्या भावाप्रमाणे, तो तिरसट व किरकिऱ्या स्वभावाचा नव्हता. शौर्याचे बाबतीत तर तो आपल्या भावापेक्षा रतिभरही कमी नव्हता. ”

थोडक्यात म्हणजे, अशा रोमांचकारक वीर–कथा वाचण्यामध्ये ते संपूर्णपणे गढून जात. दिवस उजाडेपर्यंत रात्रच्या रात्र त्यांचे वाचन चालू असे–आणि रात्र पडेपर्यंत दिवसच्या दिवस ते वाचीत बसत. झोप थोडी आणि वाचन फार–यामुळे त्यांच्या मेंदूतील आर्द्र द्रव्ये इतकी आटून गेली की, त्यांची बुद्धी काही कामच करीनाशी झाली. आपण वाचलेल्या पुस्तकातील नानाविध घटनांचे विस्कळित विश्व त्यांच्या कल्पनाशक्तीमध्ये साकार होई. जादू, कलह, लढाया, आव्हाने, जखमा, तक्रारी, प्रणयलीला, यातना आणि किती तरी अशाच अशक्यप्राय गोष्टी–यांच्याशिवाय दुसरे काहीही त्यांच्या डोक्यात खेळत नसे. या कल्पनाचित्रांची गर्दी त्यांच्या डोक्यात इतकी झालेली होती की, त्यांनी ज्या दंतकथा व अद्‌भुतकथा वाचल्या होत्या, त्या त्यांना अगदी अधिकृत इतिहासाइतक्या खऱ्या वाटू लागल्या होत्या. ते म्हणत, “ सिड् रुडियाझ हा अत्यंत शूर सरदार होता. पण, ‘ तळपत्या तलवारीच्या ’ सरदाराची सर त्याला कधीही येणार नाही. त्या सरदाराने एका फटक्याने दोन भयंकर व बलाढ्य राक्षसांचे तुकडे तुकडे केले होते. त्यापेक्षाही स्पेनमधील मध्ययुगीन सरदार बर्नार्डो डेल कार्पियो हा मला अधिक आवडतो. त्याने रॅंसेस व्हॅले येथे जादूगार ओर्लेंडो याल जमिनीवरून उचलून व आकाशात त्याचा गळा दाबून त्याचे प्राण घेतले होते. भूमिपुत्र अँटियस याचा हर्क्युलसने जसा निकाल लावला, तसेच त्याने केले होते. ”

मॉर्गंटे या भीमपुरुषाबद्दल ते नेहमी अत्यंत अदबीने बोलत. कारण अत्यंत गर्विष्ठ व पाशवी वृत्तीच्या राक्षसी परंपरेतील तो असला तरी सभ्य व कुलीन माणसासारखा तो वागत असे.

परंतु जगातील सर्व माणसांपेक्षा, फ्रान्समधील “ द्वादश–वीरां ” पैकी मॉंटलव्हॅन येथील रिनाल्डो याचे कौतुक त्यांना अधिक. त्यातही तो शिलेदार आपल्या किल्ल्यातून बाहेर पडून भेटेल त्याला लुबाडीत असे, याचे कौतुक क्विक्झाडांना विशेषच. परदेशात असताना रिनाल्डो याने महंमदाची सोन्याची भरीव मूर्ती पळवली असे जे इतिहास सांगतो, त्याचे क्विक्झाडांना मोठे कौतुक वाटे. मात्र गॅलालॉन या फ्रेंच देशद्रोह्याचा क्विक्झाडांना इतका तिटकारा वाटे की, त्याला एक सणसणीत लाथ देण्याच्या मोबदल्यात त्यांनी आपली घरधनीण, किंबहुना आपली पुतणीदेखील, खुषीने सोडून दिली असती.

अशा प्रकारे त्यांची सारी सारासारबुद्धी नष्ट झाली होती. कोणाही वेडया माणसाच्या डोक्यात कधी आली नसेल, अशा एका विचित्र कल्पनेच्या भोवऱ्यात ते दुर्दैवाने सापडले. आपला स्वतःचा मान वाढविण्यासाठी व जनतेची सेवा करण्यासाठी आपण स्वतः शूर शिलेदार बनावे, आणि नखशिखांत सशस्त्र बनून, घोडयावर बसून, धाडसी कृत्यांच्या शोधार्थ सर्व जगभर हिंडावे, हे सोयीचे तसेच आवश्यकही आहे. आपण पुस्तकात वाचलेल्या शिलेदारांचे अनुकरण करून त्यांच्यासारखाच जीवनक्रम चालवावा, सर्व प्रकारची दुःखे दूर करावीत आणि त्यासाठी सर्व प्रसंगी संकटाला तोंड देण्यास सिद्ध असावे; म्हणजे शेवटी आपल्या सर्व पराक्रमाची सुखद सांगता होईल आणि आपल्याला शाश्वतची कीर्ती व सन्मान लाभेल, अशा सुखकारक भ्रमजालात सापडल्यामुळे, त्या बिचाऱ्या सद्गृहस्थांनी ट्रॅपिझोंडाचा बादशाही राजदंडच आपल्या हाती आला आहे अशी कल्पना केली. अशा उत्तुंग आकांक्षांमागे त्यांचे मन वाहवत गेल्यामुळे त्यांनी आपल्या मोहिमेची जय्यत तयारी केली.

पहिली गोष्ट त्यांनी केली, ती ही की आपल्या पणजोबांचे चिलखत स्वच्छ केले. ते सांदी–कोपऱ्यात धूळ खात कैक वर्षे पडले होते आणि त्याकडे कोणाचे लक्ष नव्हते. पण जेव्हा त्यांनी ते चिलखत घासून–पुसून शक्य तितके साफ व दुरुस्त केले, तेव्हा त्यांना दिसून आले की त्याचा एक महत्त्वाचा भाग सापडत नाही. शिरस्त्राण पूर्ण नसून त्याचा एकच भाग मिळाला होता. पण त्यांनी ती उणीव आपल्या प्रयत्नाने भरून काढली. त्यांनी पुठ्ठ्याची एक झापड बनविली; ती चिकटविल्यानंतर ते शिरस्त्राण पूर्ण झाल्यासारखे दिसत होते. नंतर ते शिरस्त्राण कट्यारीला दाद न देणारे झाले आहे की नाही हे पाहाण्यासाठी, त्यांनी आपली तलवार उपसली आणि त्या पुठ्ठ्याच्या झापडीवर तिचे टोक खुपसले. परंतु दुर्दैवाने, पहिल्या आघातानेच, त्यांनी सर्व आठवडाभर केलेले काम क्षणार्धात नष्ट झाले. आपले शिरस्त्राण इतक्या सहजासहजी मोडले जावे, हे त्यांना आवडले नाही. पुन्हा असा प्रसंग येऊ नये म्हणून त्यांनी ते नव्याने बनविले आणि त्याच्यावर लोखंडाच्या पातळ पट्ट्या बसविल्या. त्या इतक्या खुबीने की, सारे शिरस्त्राण भक्कम झाल्याची त्यांना खात्री पटली. म्हणून, आणखी काही प्रयोग न करता, आपले शिरस्त्राण व्यवहारतः संपूर्ण व समर्थ आहे असे त्यांनी ठरविले.

हे काम झाल्यावर लगेच ते आपला घोडा पहाण्यास गेले. त्या घोडयाची हाडे, स्पेनमधील रिआल या नाण्याच्या कोपऱ्यांसारखी, बाहेर आलेली दिसत होती. पंधराव्या शतकातील विदूषक गोनेला याच्या तट्टापेक्षाही हे घोडे मरतुकडे होते. पण त्याच्या मालकाला वाटत होते की, आपल्या घोडयाची सर सिकंदराच्या बुसेफॅलसला किंवा सिडच्या बॅबीएकालाही येणार नाही. आपल्या घोडयाला नाव काय द्यावे, याचा विचार ते चार दिवस करीत होते व आपल्या मनाशी युक्तिवाद करीत होते. एवढा सुविख्यात सरदार ज्याच्यावर बसणार आणि जो स्वतःही इतका उत्तम आहे, त्या घोडयाला भपकेबाज नाव का देऊ नये, याला काही कारण नाही. नाव तर असे पाहिजे की, घोडयाचा

मालक 'सरदार' होण्यापूर्वी घोडा कसा होता आणि आता तो कसा आहे, हे त्यावरून प्रतीत व्हावे. मालकाने आपला व्यवसाय बदलला, तर त्याच्या घोडयाचीही पदवी बदलली पाहिजे-त्यामुळे त्याची प्रतिष्ठा वाढली पाहिजे-तोंड भरून उच्चारता येईल, अशा मधुर शब्दांचे नाव त्याला मिळाले पाहिजे आणि आपल्या धन्याची लायकी व उद्योग यांच्याशी ते सुसंवादी असले पाहिजे, हे त्यांना अगदी न्याय्य वाटले. म्हणून त्यांनी पुष्कळ नावे निवडली, नाकारली, बदलली, आवडली, नावडली, ती पुनः नव्याने शोधली· असे करता-करता सरदारसाहेबानी त्या घोडयाला 'रोझीनांट' म्हणून संबोधण्याचे ठरविले. (रोझिन्=साधे घोडे, अँटी=पूर्वी. हे घोडे पूर्वी साधे होते, पण आता इतरांहून निराळे आहे, असा या नावाचा भावार्थ.) हे नाव उच्चाराने रुबाबदार आहे, आणि ते घोडे पूर्वी कसे होते आणि आता कसे आहे, याचे द्योतक आहे, असे त्यांचे मत होते. दुनियेतील साऱ्या गावढळ जातीच्या घोड्यांपेक्षा आपले घोडे श्रेष्ठ आहे, असे त्यांनी या नावाने सूचित केले होते.

घोड्याच्या या नावावर ते खूष होते. घोडयाच्या नामकरणानंतर स्वतःच्या नामकरणाचा विचार त्यांच्या मनात आला. त्याचे चिंतन सतत आठ दिवस गंभीरपणे केल्यानंतर, शेवटी त्यांनी स्वतःला "डॉन क्विक्झोट" म्हणवून घेण्याचा निश्चय केला. काही लोक हट्टाने त्यांना क्वेसाडा म्हणत, पण ते चूक असून त्यांचे नाव क्विक्झाडा होते, असे अनुमान या अत्यंत अधिकृत इतिहासाचा लेखक काढू शकतो. शूर अमॅडिसला केवळ 'अमॅडिस' या उपाधीने संतोष वाटत नव्हता, म्हणून त्याने आपल्या नावाशी आपल्या राष्ट्राचे नाव जोडले. आपल्या पराक्रमाने आपल्या राष्ट्राची कीर्ती अधिक वाढावी, हा त्याचा हेतु. म्हणून त्याने गॉलचा अमॅडिस असे नाव स्वतःला घेतले. हे ध्यानी आणून, आपल्या मातृभूमीचा खरा भक्त म्हणून, त्यांनी स्वतःला "ला मांचाचे डॉन क्विक्झोट" असे नाव दिले. यामुळे, आपल्या घराण्याचा व राष्ट्राचा निर्देश स्पष्टपणे होईल, आणि जगाच्या या विभागाला शाश्वत कीर्ती लाभेल, असे त्यांना वाटले.

आता त्यांचे चिलखत साफसूफ झाले होते, त्यांचे शिरस्त्राण दुरुस्त झाले होते, आणि त्यांच्या घोड्याला व खुद्द स्वारीला नवे नाव प्राप्त झाले होते, तेव्हा आता त्यांना कशाचीही गरज नव्हती-फक्त आपले हृदय-साम्राज्य जिच्या चरणी वहावे, अशी प्रेयसी तेवढी हवी होती. कारण त्यांना हे माहीत होते की, प्रेयसीविना सरदार म्हणजे पानाविना किंवा फळाविना वृक्ष अथवा आत्म्याविना देह! सरदारसाहेब आपल्या मनाशी म्हणत होते, "शिलेदारीमध्ये नेहमी घडते त्याप्रमाणे एखादा राक्षस आपल्याला सुदैवाने वा दुर्दैवाने भेटला आणि त्याला आपण जर जमिनीवर लोळविले-आणि आपल्या भाल्याने खिळविले किंवा त्याचे दोन तुकडे केले, थोडक्यात म्हणजे त्याला जर आपण जिंकले, आणि आपल्या पायाशी शरण आणले, तर आपल्या पराक्रमाचे विजयचिन्ह म्हणून त्या पराभूत शत्रूला जिच्या चरणाशी आश्रयासाठी पाठवावे अशी प्रिया आपल्याजवळ असणे योग्य नाही काय? तो शत्रू जेव्हा तिच्याजवळ जाईल आणि तिच्या चरणांवर लोळण घेईल,

तेव्हा तो गयावया करून प्रार्थना करील की, " देवते, मी मॅलिन्ड्रॅनिया बेटाचा राजा महावीर कॅराकुलिआंब्रो. ला मांचाच्या डॉन क्विक्झोटने एकाच चकमकीत मला जिंकले. आपल्या चरणांवर मी अत्यंत नम्रपणे सादर व्हावे, म्हणजे आपण आपल्या इच्छेनुसार माझे भवितव्य ठरवाल, असा आदेश त्यांनी मला दिला. खरोखर, क्विक्झोट हे असे वीर-पुरुष आहेत की, ज्यांची यथायोग्य स्तुती कधीच करता येणार नाही. "

वाः ! आपल्या शत्रूने शरणागती स्वीकारल्याच्या कल्पनेने आमचे सरदारसाहेब गर्वाने किती फुगून गेले ! मुख्य म्हणजे प्रेयसीचे पद कोणाला द्यावे, याचा निर्णय केल्या-बद्दल ते स्वतःवरच खूष होते. ते जेथे राहात असत, त्याच्या शेजारीच एक देखणी, खेडवळ मुलगी राहात असे. तिच्याविषयी त्यांना एक प्रकारचे प्रेम पूर्वीपासून वाटत असे. पण तिला त्याचा पत्ता नव्हता आणि त्या प्रेमाचा विचार तिने तिळमात्र केला नव्हता. तिचे नाव अल्डोंझा लोरेन्झो असे होते. आपल्या हृदय-सिंहासनावर तिला अभिषिक्त करावे, असे सरदारसाहेबांना वाटले. तिला नवे नाव कोणते द्यावे ? असे विचारचक्र त्यांच्या डोक्यात फिरू लागले. जुन्या नावाशी तर त्याचे काही नाते असावे अन् त्या बरोबरच एखाद्या राजकन्येला किंवा गुणवती युवतीला शोभावे असेही ते असावे. शेवटी त्यांनी तिला ' डल्सीनिया ' म्हणून संबोधिण्याचे ठरविले–तिच्या जन्मभूमीचे नाव जोडून ' डल्सीनिया डेल टोबोसो ' असे नाव तिला देण्याचे त्यांनी ठरविले. इतर जी जी नावे त्यांनी कल्पिली होती, त्या सर्वांपेक्षा हे नाव अधिक अर्थपूर्ण, अलौकिक, सुसंवादी व सुमधुर आहे, असे त्यांचे मत होते.



## प्रकरण २

# डॉन क्विक्झोट यांची पहिली मोहीम

अशी पूर्वतयारी तर झाली! आपल्या योजना परिपूर्ण झाल्या, आता कृती करावयास हवी, असे क्विक्झोट यांना वाटले. या दुःखी जगाला आपल्या रूपाने त्राता मिळाला पाहिजे—तो मिळू न देणे हा आता गुन्हा ठरेल, असे त्यांना वाटले. आपल्याला किती गाऱ्हाणी दूर करावयाची आहेत, किती अन्याय व अपाय नष्ट करावयाचे आहेत, किती दोष घालवावयाचे आहेत, आणि किती कर्तव्ये पार पाडावयाची आहेत, याचा विचार केला तर आपण जगाच्या कल्याणासाठी घराबाहेर न पडणे हा मोठाच गुन्हा ठरेल, असे त्यांच्या मनाने घेतले. म्हणून जुलैच्या कडक उन्हाळ्यात, एके दिवशी भल्या पहाटे, आपल्या योजनेचा पत्ता कोणालाही लागू न देता, शक्य तेवढी सारी गुप्तता राखून, ते नखशिखांत शस्त्रसज्ज झाले. आपले वेडे—वाकुडे शिरस्त्राण रेशमी फितीने त्यांनी सजविले, आपली ढाल धारण केली, आपला भाला आपल्या हाती घट्ट धरला, आणि रोझिनांटावर आरूढ होऊन, घराच्या मागील खाजगी दाराने ते बाहेर पडले व जवळच्या शेतात जाऊन दाखल झाले. आपल्या साहसाचा प्रारंभ किती सहजतेने आपण करू शकलो, हे पाहून स्वारीचे चित्त विलक्षण आनंदाने भरून आले.

सरदारसाहेब थोडे पुढे जातात न जातात; तोच त्यांच्या मनात एक भयंकर विचार आला. त्यामुळे ते घाबरून गेले. आपण हाती घेतलेले महत्कार्य सोडून द्यावे, असे त्या भयंकर विचारामुळे त्यांना वाटू लागले. तो विचार म्हणजे सरदारकीची पदवी आपल्याला कोणी बहाल केलेली नाही. त्यामुळे शिलेदारीच्या नियमानुसार, आपल्याला कोणा प्रतिष्ठित सरदाराशी सामना करण्यासाठी उभे राहता येणार नाही, आपण उभे राहणे योग्य ठरणार नाही. एवढेच नव्हे तर त्यांच्या मनात असाही विचार आला की, आपण सरदारकीचा मान मिळविला तरी आपण साधे पांढरे चिलखतच वापरले पाहिजे—आपली ढाल कोणत्याही पद्धतीने नटलेली नसावी. आपल्या शौर्याचे काही अलौकिक प्रदर्शन केल्यावरच आपल्याला तो सारा थाटमाट करता येईल.

या विचारांनी त्यांचा निश्चय डळमळू लागला. पण त्यांचे अंगी विचारापेक्षा अविचारच जास्त प्रभावी असल्यामुळे त्यांनी असे ठरविले की, आपल्याला जो माणूस प्रथम भेटेल, त्याच्याकडूनच आपण सरदारकीची पदवी घ्यावयाची. असे कैक लोकांनी पूर्वी केल्याचे दाखले त्यांनी रोमांचकारक शौर्य-कथांमध्ये वाचलेले होते. पांढरे चिलखत

धारण करण्याची अडचण होतीच. ती दूर करण्यासाठी त्यांनी असे योजले की, सशाच्या अंगाइतके चकचकीत पांढरे दिसेपर्यंत आपण आपले चिलखत फुरसदीच्या वेळी घासत जाऊ. अशा साऱ्या शंका-कुशंका मनातून झाडून झटकून टाकून, सरदारजी आपल्या घोड्यावर अत्यंत शांत चित्ताने स्वार झाले. कोणत्या दिशेने जावयाचे, हे त्यांनी घोड्याच्या इच्छेवर सोपविले. असे करणे हा साहसाचा आत्माच आहे, असा त्यांचा दृढ विश्वास होता. अशा प्रकारे वाट चालू लागले असता ते आपल्या मनाशी म्हणाले, "आमच्या या कीर्तिशाली मोहिमेचा इतिहास जेव्हा एखादा विद्वान लेखक जगाला निवेदन करील, तेव्हा आमच्या या प्रारंभीच्या प्रयाणाचे वर्णन तो पुढील शब्दांनीच करील, यात मला तिळमात्र शंका नाही. 'या विशाल भूतलावर जेव्हा रक्तवर्ण रविराजाने आपले सुंदर सोनेरी किरण पसरण्यास सुरवात केली, आणि वनराईतील उडत्या कवींनी-रंगीबेरंगी चिमण्या पाखरांनी—रम्य उषा-देवतेचे सौम्यमधुर स्वरात स्वागत करण्यासाठी आपल्या कंठातील बारीक सूर लावले, आणि आपल्या मत्सरी पतिराजाची शय्या सोडून त्या उषादेवतेने जेव्हा क्षितिजाच्या गवाक्षातून व द्वारातून आपले गुलाबी सौंदर्य मर्त्य मानवाच्या दृष्टीस पाडले, तेव्हा ला मांचाचे सुविख्यात शिलेदार डॉन क्विक्झोट यांनी सौख्यमय विश्रांतीचा अव्हेर करून व वैषयिक जीवनाचा त्याग करून, मॉंटिलच्या पुराण-प्रसिद्ध रणांगणावर पदार्पण केले."

खरोखर, याच मार्गाने सरदारजी चालले होते. जाता जाता ते आनंदाने ओरडले, "किती भाग्यशाली काळ हा! माझ्या प्रख्यात पराक्रमांनी या धरती-तलावर सुवर्ण-युग अवतरणार! माझे पराक्रम ताम्रपटावर कोरण्याजोगे, संगमरवरावर साकार करण्या-जोगे, चित्रकलेच्या उत्कृष्ट कृतीमध्ये मूर्त होण्याजोगे ठरतील. माझ्या या वैभवाचे ते स्मारक-स्तंभ भावी पिढ्यांना आदर्श वाटतील! आणि हे पूज्य पुराण-पुरुषा, हे बुद्धिमान वागीश्वरा, कोणत्याही नावाने संबोधिले तरी एकच-या आमच्या अलौकिक इतिहासाचे लेखन करण्याचे भाग्य ज्याला लाभेल, त्या साहित्य-पुंगवाला मी हात जोडून विनंती करतो की, तू आपल्या इतिहासात माझ्या विश्वासू रोझिनांटाचा-माझ्या मोहिमे-तील चिरमित्राचा—उल्लेख करण्यास विसरू नकोस."

आपण खरोखरच प्रेमविद्ध झालो आहो, असे समजून सरदारजी मोठ्याने म्हणाले, "हे राजकन्ये डल्सीनिया, तू माझ्या हृदयाला बंदीवान केले आहेस. तू आपल्या कठोर आदेशांनी मला हद्दपार करून दुःखाच्या व वेदनांच्या खाईत लोटले आहेस. त्यामुळे तुझ्या मुखचंद्राचे सन्मुख मला उभे राहता येत नाही! पण हे प्राणप्रिये, तुझ्या प्रेमासाठी कितीही दुःखे हा दास एकनिष्ठ अंतःकरणाने सहन करील, हे लक्षात ठेव." आपल्या अशा या भरमसाट बढायांमध्ये ते आणखी कितीतरी बढायांची भर घालीत होते. त्यांनी ज्या वीरकथा वाचलेल्या होत्या, त्यांचे अनुकरण करून व थेट तशीच भाषाशैली वापरून त्यांनी आपले कल्पना-विश्व फुलविले होते. अशा कल्पनांच्या सरीवर सरी डोक्यात कोसळत असताना सरदारजींचे घोडे हळूहळू चालले होते. पण

सूर्याचे ऊन मात्र झपाझप वाढत होते. ते आता इतके तापले होते की, सरदारजींच्या डोक्यात आता काही मेंदू शिल्लक राहिलाच असता, तर तो त्यामुळे वितळून गेला असता.

कोणतेही साहस करावे न लागता, त्यांनी बहुतेक सारा दिवस प्रवासात घालविला. मुद्दाम सांगण्याची तसदी घ्यावी, अशी एकही साहसी घटना घडून आली नाही. त्यामुळे त्यांचे मन एक प्रकारच्या निराशेने ग्रासले. कोणा तरी माणसाची लगेच गाठ पडावी आणि त्याला आपण आपल्या तलवारीचे पाणी चाखवावे, याहून त्यांना दुसरी कसलीच लालसा नव्हती.

काही लेखक म्हणतात, सरदारजींची पहिली मोहीम प्युर्टोच्या खिंडीतून झाली, तर काही म्हणतात, ती एका पवन–चक्कीवर झाली. पण ला मांचा गावाच्या इतिहासात मला जे आढळून आले आणि या प्रकरणी मला जो नक्की शोध लागला, तो असा की–सर्व दिवसभर सरदारजी फिर फिर फिरले. संध्याकाळचे वेळी त्यांचा व त्यांच्या घोड्याचा जीव अगदी थकून गेला आणि भुकेने व्याकुळ झाला. तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी आसरा घेण्यासाठी व ताजेतवाने होण्यासाठी, जवळपास कोठे एखादा किल्ला दिसतो काय–निदान गुराख्याची एखादी झोपडी तरी दिसते काय–म्हणून इकडेतिकडे पाहिले. अखेरीस रस्त्याच्या जवळच त्यांना एक खानावळ दिसली. त्यांच्या भुकेल्या नजरेला ती फार संतोषप्रद वाटली. मोक्षमंदिराचे द्वार दर्शविणारा एखादा तारा आकाशात दिसावा तसा आनंद त्यांना झाला. मग काय? शक्य तितक्या त्वरेने सरदारजी त्या खानावळीकडे दौडत गेले व अगदी संध्याकाळ संपायच्या सुमारास ते तेथे जाऊन थडकले.

योगायोग असा की, त्याच वेळी त्या खानावळीच्या दाराशी दोन तरुण साहसी महिला उभ्या दिसल्या. वास्तविक त्या ग्रामीण पोरी होत्या. त्याच संध्याकाळी त्या खानावळीत आलेल्या काही माल–वाहतूक करणारांबरोबर सेव्हिल येथे त्या चालल्या होत्या. ते दृश्य पाहून आमच्या सरदारसाहेबांच्या चित्तात जे विचार आले व ज्या कल्पना उसळल्या, त्या एखाद्या रोमांचकारक कादंबरीला शोभेशा होत्या. अशा पुस्तकांच्या वाचनानेच त्यांची बुद्धी विकृत झाली होती. त्यामुळे ती खानावळ नजरेस पडताच त्यांच्या मनाने अशी कल्पना केली की, हा एक किल्ला आहे, त्याला चार दिशांना चार बुरुज आहेत आणि उंच उंच मनोरे आहेत व ते चांदीच्या पत्र्याने चकाकत आहेत. या किल्ल्याभोवती खोल खंदक आहे, त्याच्यावर सरकता पूल आहे. आणि अशा स्थळी ज्या ज्या गोष्टी असतात, त्या साऱ्या येथे आहेत.

नंतर सरदारजी त्या खानावळीजवळ गेले व तिच्या दारापासून काही अंतरावर उभे राहिले. त्यांची अपेक्षा अशी होती की, एखादा बुटका शिपाई तटबंदीवर येऊन उभा राहील, आणि सरदारजींच्या आगमनाची वर्दी देण्यासाठी आपली तुतारी वाजवील. पण कोणीच आले नाही. इकडे रोझिनांट तर तबेल्याकडे जाण्याची घाई करीत होता. म्हणून सरदारजींनी खानावळीच्या दाराकडे आपला मोर्चा वळविला. तेथे

दिसणाऱ्या दोन ग्रामकन्या त्यांना दोन लावण्यवती युवती किंवा सुस्वरूप देवता वाटल्या किल्ल्याच्या दाराशी त्या मोकळी हवा सेवन करीत असाव्यात, असा तर्क त्यांनी केला. याच वेळी असे घडले की, एक डुकर-हाक्या कापणी झालेल्या शेतातून आपली डुकरे ( होय, त्यांना डुकरे म्हणणे प्राप्तच आहे ) नेत होता. त्याने आपले अलगुज वाजविले. त्याचे स्वर कानी पडताच डॉन क्विक्झोट यांनी तत्काळ कल्पना केली की, आपल्या आगमनाची वर्दी देण्यासाठी एखाद्या वामनमूर्तीने तुतारी वाजवावी ही आपली इच्छा सफल झाली. तेव्हा त्यांचा आनंद गगनात मावेना. तशा आनंदाच्या भरातच ते त्या खानावळीकडे दौडत गेले. अंगावर शिरस्त्राण व चिलखत घातलेला अन् हातात भाला-निशाण घेतलेला असा माणूस येत असलेला पाहून त्या मुली भयभीत झाल्या आणि आपल्या घराकडे धूम ठोकण्याच्या तयारीस लागल्या. त्यांच्या पळापळीवरून त्यांचे भय ओळखून डॉन क्विक्झोट यांनी आपल्या शिरस्त्राणाचा वरचा पुठ्ठ्याचा भाग उचलला. धुळीने माखलेला व कष्टाने थकलेला आपला चेहरा शोभिवंत व गंभीर दिसत आहे, अशी कल्पना करून सरदारजी त्या मुलींना म्हणाले,

" महिलांनो, पळू नका. थोड्याही संकटाचे भय बाळगू नका, अशी माझी तुम्हाला प्रार्थना आहे. मी शिलेदारी परंपरेतला आहे. त्या परंपरेप्रमाणे विश्वातील कोणाही व्यक्तीला मी कोणताही अपाय करू शकत नाही. त्यातही, तुमच्या स्वरूपावरून तुम्ही ज्या उच्च वर्गातील आहात असे दिसते, त्यातील कुमारिकांच्या केसालाही धक्का मी लावणार नाही. "

त्या मुली त्यांच्याकडे उत्सुकतेने पाहू लागल्या व त्यांच्या चेहऱ्याचे ओझरते तरी दर्शन व्हावे, म्हणून त्या प्रयत्न करू लागल्या. पण त्या ओबड-धोबड शिरस्त्राणामुळे सरदारांचा चेहरा काहीसा झाकला गेला होता. आपल्याला ' कुमारिका ' म्हणून या गृहस्थाने संबोधिल्याचे त्या पोरींनी ऐकले. ते त्यांना विचित्रच वाटले. त्यांना खो खो करून हसल्याशिवाय राहावेना. हा आपला मोठा उपमर्द आहे, असे वाटून डॉन क्विक्झोट यांना संताप आला. ते ओरडून म्हणाले, " महिलांनो, आपल्या अनुज्ञेने मी आपल्याला असे सांगू इच्छितो की, नम्रता व सभ्यता हे गुण स्त्रीजातीला फार शोभा देतात. उलट अकारण हास्य हे अत्यंत अविवेकाचे लक्षण ठरते. परंतु मुलींनो, तुमचे मन दुखविण्यासाठी किंवा तुमची नाराजी ओढवून घेण्यासाठी मी बोलत नाही. छे, महिलांनो, तुमची सेवा करण्याशिवाय दुसरा कोणताही विचार माझ्या मनात नाही, हे मी तुम्हाला खात्रीने सांगतो. "

सरदारजींचे ते विचित्र ध्यान पाहून आणि त्यांची ही विचित्र भाषा ऐकून त्यांना खूपच मौज वाटली. त्या खदखदा हसू लागल्या. त्यामुळे सरदारजींच्या रागाचा पारा इतका चढला की, सारे प्रकरण विकोपाला जाते की काय, असे वाटू लागले. पण त्याच वेळी सुदैवाने खानावळवाला तेथे टपकला. त्याच्या अंगावर मेदाचा भार इतका होता की, त्यामुळे शांतपणा व थंडपणा याकडे त्याचा आपसुकच कल असे. पण जेव्हा जुन्या-

पुराण्या सशस्त्र वेशात ही विलक्षण मानवी आकृती त्याच्या नजरेस पडली, तेव्हा त्या पोरींच्या हशात सामील झाल्यावाचून त्यालाही राहावले नाही. तथापि वीर पुरुषाची आकृती आपल्या डोळ्यापुढे उभी आहे, असे पाहून तो दबून गेला. सरदारजींशी चार भले शब्द बोलण्याचा निश्चय करून तो त्यांना नम्रतेने म्हणाला, " महाराज, येथे मुक्काम करण्याची आपली मनीषा असेल तर बिछान्याशिवाय साऱ्या सुख-सोयी आपल्याला आपल्या मनाप्रमाणे मिळतील. "

किल्लेदाराची ( सरदारजींना तो किल्लेदारच वाटला ) ती नम्रता पाहून डॉन क्विक्झोट त्याला उद्देशून म्हणाले, " कॅस्टीलच्या श्रेष्ठ पुरुषा, जगातील अत्यंत थोड्या सुखसोयी मला पुरेशा होतात. मी महत्त्व देतो फक्त शस्त्रांना आणि संग्राम ही माझी सुखद शय्या असते. " खानावळवाला अंडालुसिया येथील नागरिक होता–नव्हे, कॅकस-इतकेच चोरीबद्दल प्रसिद्ध असलेल्या सेंट लुकारजवळ राहणारा तो होता. पण कॅस्टीलचा रहिवासी असे समजून सरदारजींनी आपल्याला 'कॅस्टेलेनो' म्हणून संबोधले असावे, असे त्याला वाटले. एखाद्या उनाड विद्यार्थ्यापेक्षा किंवा न्यायमंदिरातील हुजऱ्यापेक्षा तो खानावळवाला कमी खोडसाळ नव्हता. म्हणून त्याने सरदारजींना उत्तर दिले, " सरदारजी, तसे असेल तर जमिनीवरील फरशी ही आपली खाशी शय्या होईल–आणि तिच्यावर पडून सतत जागे राहाणे ही आपली विश्रांती होईल म्हणून, महाराज, आपण घोड्यावरून खुशाल खाली उतरावे. मग या वाड्यात एक रात्रच काय, एक वर्षभरसुद्धा आपण जागे राहिला तरी आपल्याला काही चुकल्यासारखे वाटणार नाही. "

असे म्हणून तो खानावळवाला पुढे झाला अन् त्याने डॉन क्विक्झोट यांच्या रिकीबीला हात लावला. सरदारजींनी त्या दिवशी घडलेला उपवास मोडला नव्हता. ते घोड्यावरून खाली उतरले ते मोठ्या कष्टाने व त्रासाने. ते त्या किल्लेदाराला ( म्हणजे खानावळवाल्याला ) घाईघाईने म्हणाले, " आमच्या या अश्वराजाची विशेष काळजी घ्या. याहून अधिक चांगला अश्व साऱ्या विश्वात सापडणार नाही." हे ऐकून खानावळवाल्याने त्या घोड्याकडे बारकाईने पाहिले, पण डॉन क्विक्झोट यांच्या निम्म्या प्रशंसेसही ते पात्र आहे असे त्याला वाटले नाही. तरी पण त्याने त्याला तबेल्यात नेऊन बांधले आणि सरदारजींना काय हवे नको–हे पाहण्यासाठी तो त्यांच्याकडे परत आला. तेव्हा त्याला दिसले की, त्या सुस्वभावी मुलींनी सरदारजींशी जमवून घेतले होते आणि चिलखत काढण्याचे कामी त्या त्यांना मदत करीत होत्या. त्यांनी सरदारजींना अंगावरील काही शस्त्र-संभार उतरण्याचे कामी मदत केली, पण ते वेडेवाकडे शिरस्त्राण काही त्यांच्या डोक्यावरून निघेना. हिरव्या फितींनी ते त्यानी इतके घट्ट बांधले होते की, त्या फिती कापल्याशिवाय शिरस्त्राण काढणे अशक्य होते. पण तसे करण्यास सरदारजी मुळीच परवानगी देईनात, म्हणून त्यांना रात्रभर ते शिरस्त्राण आपल्या शिरकमलावर धारण करणे भाग पडले. जगात इतके आनंददायक दृश्य दुसरे कोणतेही नसेल. त्या दोन प्रेमळ मुलींनी आपले चिलखत अंगावरून काढले, तेव्हा सरदारजींना वाटले या मुली या

किल्ल्यातील खानदानी घराण्याच्या असाव्यात. म्हणून (एका प्राचीन प्रेम-काव्याचे अनुकरण करून) त्यांनी त्या मुलींना उद्देशून, पुढील काव्यपंक्तींनी कृतज्ञतेने धन्यवाद दिले :—

**वीर असा जगिं कधी न झाला । रमणींनी जो सदैव पुजिला ॥**
**त्यजुनी निज प्रिय जन्म-ग्रामा । वीरोत्तम जो रणीं निघाला ॥**
**ललना करिती तत्सेवेला । शृंगारूनी अश्वराजया ॥**

"महिलांनो, या माझ्या अश्वराजाचे अभिधान रोझिनांट आहे आणि माझे स्वतःचे शुभनाम ला मांचाचा डॉन क्विक्झोट असे आहे. आपली काही सेवा करून आपल्या-सारख्या महिला-वर्गाला मी अधिक ज्ञात झाल्यावर आणि समशेरीचे काही चमत्कार करून दाखविल्यावर मगच मी हे अभिधान धारण करावयास हवे होते. परंतु परिस्थितीची निकड लागल्यामुळे, मी मघा म्हटलेला, सर लॅन्सेलॉट यांच्या प्राचीन पोवाड्यातील उतारा येथे मी म्हणून दाखविला. त्यामुळे योग्य वेळेपूर्वीच माझे रहस्य प्रगट झाले. परंतु असा एक दिवस उगवेल की, जेव्हा तुम्ही आज्ञा कराल आणि मी तिचे पालन करीन. तेव्हाच नारी-वर्गाची सेवा करण्याचा माझा उत्साह किती खरा आहे हे माझ्या शौर्यामुळे सिद्ध होईल."

अशी काव्यात्मक भाषा ऐकण्याची सवय नसलेल्या त्या दोन स्त्रिया उत्तर काय देणार ? "आपण काही जेवणखाण करणार काय ?" एवढेच त्यांनी विचारले. "वाः ! अगदी मनापासून मी अन्नसेवन करीन — मग ते काहीही असो. ज्या मोसमात जे मिळेल ते मी आनंदाने खातो." दुर्दैवाने तो शुक्रवार होता. म्हणून त्या खानावळीत माश्यांच्या काही तुकड्याशिवाय दुसरे काहीच खाद्यपदार्थ नव्हते. त्या माशांना कॅस्टील-मध्ये अबॅडेक्सो म्हणतात, अण्डालुसियामध्ये बॅकालोआ म्हणतात, काही ठिकाणी क्युराडिल्लो, तर काही ठिकाणी ट्रूचेला, किंवा लिटल् ट्राउट म्हणतात. पण काही म्हटले तरी तो एक सामान्य मासा असतो. म्हणून त्या स्त्रियांनी सरदारजींना विचारले, "आपल्याला देण्यासारखा दुसरा मासा आमच्याजवळ नाही. हा ट्रूचेला आपण खाऊ शकाल काय ?" छोट्या ट्राउटसंबंधी त्या विचारीत आहेत, असे डॉन क्विक्झोट यांना वाटले व ते म्हणाले, "येथे अनेक मासे आहेत ना ? मग मला त्यातला मोठा द्या. 'पीस ऑफ एट' चे एक नाणे मिळणे काय किंवा रिआलची आठ लहान नाणी तेवढ्याच किंमतीची मिळणे काय, दोन्ही मला सारखेच. शिवाय, कदाचित् हे छोटे ट्राउट मासे वासराच्या मांसासारखे असतील. ते मांस बैलांच्या मांसापेक्षा चांगले असते किंवा कोकराच्या मांसासारखे—जे बोकडाच्या मांसापेक्षा बरे. थोडक्यात म्हणजे, जे काही असेल ते झटदिशी आणा. कारण, या शस्त्रसंभाराचे ओझे आणि प्रवासाचा शीण, आता अन्न-सेवनाविना आम्हाला सहन करता येणार नाही."

त्यानंतर त्या स्त्रियांनी खानावळीच्या दारापाशीच चादर अंथरली. ताजी हवा मिळावी, हा हेतू. मग त्या वरमालकाने खारावलेल्या माशाचा एक तुकडा आणला पण

तो नीट शिजला नव्हता; त्याने पाव दिला तो सरदारजींच्या चिलखताइतकाच जुना व काळा होता. सरदारजी ते खात असताना त्यांना कोणी पाहिले असते, तर त्याला हसू लोटले असते. कारण, त्यांच्या डोक्यावर शिरस्त्राण होते आणि त्याचा पुढील भाग वर उचललेला होता. म्हणून ते स्वतः खाऊ शकत नव्हते. भरवण्याचे काम तेथील एका स्त्रीने आपल्याकडे घेतले होते. पण दारू कशी प्यायची ? खानावळवाल्याने वेताच्या काठीला एक भोक पाडले आणि त्याचे एक टोक सरदारजींच्या तोंडात घातले आणि दुसऱ्या टोकातून दारू ओतली. अशी युक्ती त्याने केली नसती तर सरदारजींना पेय घेता आले नसते. खाण्यापिण्याचे हे सारे हाल त्यांनी शांतपणे सहन केले. कारण, शिरस्त्राण घट्ट बसविण्यासाठी ज्या फिती बांधल्या होत्या, त्या कापण्यास ते तयार नव्हते.

सरदारजींचे असे सायंभोजन चालू असता, दुरून एका डुक्करहाक्याने बोरूची शिटी वाजविली व त्या खानावळीजवळ येईपर्यंत त्याने चार-पाचदा आवाज काढले त्यामुळे डॉन क्विक्झोट यांची पक्की खात्री झाली की, "आपण एका नामवंत किल्ल्यामध्ये आहोत आणि आपल्या भोजनाचे वेळी संगीताचे सुस्वर निनादत आहेत, हा गावठी मासा म्हणजे कोवळा ट्राऊट आहे आणि हा पाव उत्तम मैद्याचा बनविलेला आहे. या मुली तर महादेवी आहेत, आणि हा खानावळवाला किल्लेदार आहे. या मोहिमेवर निघण्याचा आपण केलेला निश्चय अभिनंदनीय होता." यात खटकणारी गोष्ट एकच होती-त्यांना अजून कोणी सरदारकी बहाल केली नव्हती. सरदारकीचा किताब मिळाल्या-शिवाय कोणतेही साहसी कृत्य हाती घेणे, कायदेशीर ठरणार नाही, अशी त्यांची कल्पना होती.



## प्रकरण ३

# सरदारकी मिळविण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी योजलेल्या मजेशीर उपायांचा वृत्तान्त

त्या विचाराने डॉन क्विक्झोट यांचे मन अस्वस्थ झाल्यामुळे त्यांनी आपले छोटेसे जेवण घाईघाईने उरकले. ते संपताच त्यांनी आपल्या यजमानाला पाचारले आणि त्याला व स्वतःला तवेल्यात कोंडून घेतले. आपल्या यजमानाच्या पायावर मस्तक ठेवून डॉन क्विक्झोट तारस्वराने म्हणाले, " हे परमवीर शिलेदारा, आपल्यापाशी मी एका वराची याचना करीत आहे. ती आपण उदार अंतःकरणाने पूर्ण करण्याचे वचन देईपर्यंत मी या पायांपासून कधीही उठणार नाही. आपल्या वरदानामुळे आपल्या लौकिकात आणि मानव-जातीच्या कल्याणात भरच पडेल. " आपले पाहुणे आपल्या पायाशी लोळण घेत आहेत, हे पाहून आणि त्यांची ती भाषा ऐकून, खानावळवाल्याची मती गुंग झाली. त्याने त्यांना वर उठविण्याचा प्रयत्न केला; पण व्यर्थ. शेवटी क्विक्झोटची मागणी पूर्ण करण्याचे वचन त्याने दिले. तेव्हा उठून उभे राहून डॉन क्विक्झोट म्हणाले, " उदारचरित महाराज, मी जो वर मागत आहे आणि जो पूर्ण करण्याचे आश्वासन आपण मोठ्या औदार्याने दिले आहे, त्याहून आपल्यासारख्या महापुरुषाकडून कमी दानाची अपेक्षा मी केलेली नाही. मी जे वरदान वांछितो, ते म्हणजे उद्या आपण कृपा करून सरदारकीचा बहुमान मला अर्पण करावा. आज रात्री आपल्या किल्ल्याच्या प्रार्थना-मंदिरात मी माझ्या चिलखतानिशी विधिवत् जागरण करीन आणि मग उद्या सकाळी आपण मला आपल्या वरदानाने संतुष्ट करा. कारण मला अशी तीव्र इच्छा आहे की, या विश्वाच्या कोनाकोपऱ्यात जेथे जेथे म्हणून साहस करण्याची गरज आहे तेथे जावे आणि शिले-दारीच्या नियमानुसार व प्रेरणेनुसार संत्रस्त जनांना दुःखमुक्त करावे. "

खानावळवाला चुणचुणीत बुद्धीचा होता. आपल्या पाहुण्याच्या बुद्धीमध्ये काही विकृती झाली असावी असा संशय त्याने धूर्तपणाने पूर्वीच घेतला होता. आता अशा प्रकारचे पाहुण्याचे भाषण ऐकल्यावर त्याची पुरी खात्रीच झाली. त्याने ठरविले, आजची रात्र गंमत करायची आणि या पाहुण्याच्या कलाने घ्यायचे. तो म्हणाला, " आपण अशा उदात्त व्यवसायाची निवड केली. याबद्दल आपली तारीफ करावी तेवढी थोडीच. प्रथम श्रेणीच्या सरदाराला शोभेल अशीच आपली वृत्ती आहे. आपल्या शौर्यशाली वर्तनावरून

ती स्पष्ट होत आहे. अहो, मीही माझ्या तारुण्यात हाच सन्माननीय व्यवसाय करीत होतो. साहस करण्याच्या इच्छेने मी जगाच्या कैक प्रदेशात हिंडत होतो. ( दरोडेखोरी-करता प्रसिद्ध असलेले ) मॅलागा येथील पर्चेलेस्, रियारन्चे बेट, सेव्हिलाची खिंड, सेगोव्हियाचे पारा-घर, व्हॅलेन्सियातील ऑलीव्ह-बागा, ग्रॅनडाचे खोरे, सेंट लुकारचा किनारा, कोर्डोव्हामधील चौक, टोलेडो येथील उपाहारगृहे—अशा कैक स्थानांना मी माझ्या चपळ पायांनी भेटी दिल्या व कुशल हातांनी कामगिरी केली. कामगिरी केली, भरपूर अपकृत्ये केली, पुष्कळ विधवांपुढे प्रेमयाचना केली, काही युवतींना बिघडवले, तर काही तरुण वारसांना बनवले. एका शब्दात सांगावयाचे म्हणजे स्पेनमधील बहुतेक साऱ्या न्यायमंदिरात आमच्या कामगिरीचा डंका वाजला. शेवटी मी या किल्ल्यात परत आलो. माझ्या व इतरांच्या जमीनजुमल्यावर मी निर्वाह करतो आणि कोणत्याही स्थितीतील, कोणत्याही लायकीच्या सरदारांची सरबराई करतो. त्यांच्याविषयी मला फार प्रेम वाटते आणि म्हणूनच मी हे सारे करतो. या माझ्या सद्भावाचा मोबदला म्हणजे ते सरदार आपल्या कमाईत मला सहभागी करतात. सध्या या किल्ल्यात प्रार्थनेसाठी जागा नाही. तसे देवघर नव्याने बांधण्यासाठी पहिले मी पाडले आहे. त्या जागेवर कोणत्याही सरदाराला आपला शस्त्र-जागर करता येईल. पण जरूर तर या किल्ल्यातील कोणत्याही भागात ती शस्त्रे ठेवून तुम्हाला हक्काने पहारा करता येईल. म्हणून आज रात्री आपण या किल्ल्याच्या अंगणात आपला शस्त्र-संभार ठेवावा. ( देवाच्या दयेने ) उद्या सकाळी आपण सारे आवश्यक विधी पार पाडू आणि मी आपल्याला सरदारकीचा किताब बहाल करीन, ही खात्री बाळगा. मग जगातील कोणत्याही सरदारासारखे तुम्ही शोभाल. पण महाराज, आपल्याजवळ काही पैसे आहेत काय ? ”

“ दमडीसुद्धा नाही. ” सरदारजींनी उत्तर दिले, “ कारण, कोणताही सरदार आपल्याबरोबर कधी पैसे बाळगतो, असे शिलेदारीच्या साऱ्या इतिहासात मी कधी वाचले नाही. ”

तेव्हा खानावळवाला ओरडून म्हणाला, “ आपण चूक करीत आहा. या बाबतीत इतिहासानी मौन पाळले आहे, हे मी कबूल करतो. पैसे व स्वच्छ सदरे प्रवासात अवश्य असतात हे इतके उघड आहे की, त्यांचा उल्लेख करण्याची लेखकांना गरज वाटली नसावी. पण त्याचा अर्थ असा नव्हे की, पैशांशिवाय व सदऱ्यांशिवाय सरदार लोक बाहेर पडत होते. ज्या मोठमोठ्या सरदारांच्या कथांनी इतिहासग्रंथ भरून गेले आहेत, ते आपल्या गरजा भागविण्याइतके द्रव्य आपल्या थैल्यांमध्ये बाळगीत, त्या-बरोबरच काही कपडेही घेत व जखमांवरील मलमाची छोटी पेटीही बरोबर बाळगीत, हे मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतो. कारण ज्या ज्या वेळी ते सरदार रानात किंवा मैदानात युद्ध करीत, त्या वेळी त्यांच्या जखमा बऱ्या करणारे धन्वंतरी तेथे कसे मिळणार ? हां, ते जर भाग्यवान असतील तर त्यांना एखादा मुनी किंवा मांत्रिक भेटेल व मित्रा-प्रमाणे त्वरित मदत करील, फार काय, एखादी युवती किंवा वामनमूर्ती ढगातून पाठवून

पाण्याची छोटीशी बाटली तो त्या सरदाराकडे पोहोचवील आणि त्या पाण्याचा असा काही विलक्षण गुण असेल की, त्याचा एक थेंब सरदारांनी चाखताच त्यांच्या साऱ्या जखमा पूर्ण बऱ्या होतील–जणू काही पूर्वी कधी जखमा झाल्याच नव्हत्या असे त्यांना वाटेल. अशा एखाद्या मित्राची आवश्यकता आमच्या शिलेदारांना प्राचीन काळी वाटत असेल, पण आता त्यांना असे वाटते की, आपल्या शागिर्दाने पैसे वगैरे आवश्यक वस्तू जवळ बाळगाव्या आणि जखमा बऱ्या करण्यासाठी कापूस व मलम हेही आपल्या-बरोबर घ्यावे. बहुतेक शिलेदाराजवळ शागीर्द असत. पण जर कोणाजवळ नसतील, तर ते स्वतः त्या वस्तू फार मूल्यवान आहेत असे मानून स्वतःच लहानशा पिशवीतून नेत असत. ती पिशवी खोगीराच्या पाठीमागे अशी व्यवस्थितपणे बांधलेली असे की, ती बहुधा कोणास दिसत नसे. हे कारण नसते तर, अशी चामड्याची पिशवी नेण्याला शिलेदारांनी काकू केले असते. म्हणून, दोस्त, मी तुम्हाला सल्ला देतो की–नव्हे नव्हे, बजावतो–आदेश देतो की, ज्याअर्थी लौकरच तुम्ही शिलेदारीत माझे पुत्र होणार आहात, त्याअर्थी तुम्ही यापुढे केव्हाही पैशाशिवाय प्रवास करू नये, त्याबरोबरच मी ज्या गरजेच्या वस्तू सांगितल्या, त्या घेण्यासही विसरू नये. त्यांची गरज, कधी कल्पना नसेल तेव्हा, तीव्रतेने भासेल.''

डॉन क्विक्झोट यांनी खानावळवाल्याच्या साऱ्या सूचनांचे पालन प्रामाणिकपणे करण्याचे वचन दिले. खानावळीला लागून असलेल्या मोठ्या अंगणात त्या दोघांनी क्वक्झोटांची शस्त्रे नेऊन ठेवली. त्या अंगणात विहीर होती. तिच्याजवळ असलेल्या पाण्याच्या डोणीत सरदारजींनी आपली सारी हत्यारे ठेवली. अंधार पडू लागला; तेव्हा यांनी आपली ढाल घेतली आणि आपला भाला हातात घट्ट धरला. अशा थाटात मोठ्या रुबाबाने ते त्या हौदाभोवती फिरू लागले.

सरदारजींचा हा पहारा चालू असताना, खानावळवाल्याने आपल्या घरातील सर्व माणसांना सरदारजींच्या बेफाम गोष्टी सांगितल्या आणि त्यांचा शस्त्रांवरील पहारा व सरदारकी मिळविण्याची आशा यांचाही परिचय त्यांना करून दिला. मूर्खपणाचा हा हा विलक्षण नमुना ऐकून ते सारेजग सरदार्जींचे मोठे कौतुक करू लागले आणि दुरून पाहण्यासाठी तिकडे गेले. तेथे त्यांना काय दिसले ! कधी मोठ्या गांभीर्याने ते पावले टाकीत आहेत; तर कधी आपल्या भाल्यावर टेकून ते आपल्या हत्यारांवर नजर ठेवीत आहेत. आता रात्र चांगलीच पडली होती. पण चंद्रमा अशा प्रकाशाने तळपत होता की, तो प्रकाश आपल्याला देणाऱ्या सूर्याच्या तेजाशीच तो जणू स्पर्धा करीत आहे. त्या प्रकाशात आमचे सरदारजी त्या प्रेक्षकांना स्वच्छपणे दिसत होते.

सरदारजींची ही कामगिरी चालू असताना, त्या खानावळीत मुक्कामासाठी आलेल एक हमाल आपल्या खेचरांना पाणी पाजण्यासाठी बाहेर आला. डोणीतील हत्यारे बाहेर काढल्याशिवाय तो पाणी पाजू शकत नव्हता. तो हमाल आपल्याकडे येत आहे, असे पाहून, डॉन क्विक्झोट आरोळी ठोकून त्याला म्हणाले, ''अरे साहसी सरदारा, तू

कोणीही अस, पण लक्षात ठेव की, कोणत्याही समशेरबहाद्दरापेक्षा अधिक शूर असलेल्या सरदारजींच्या या हत्यारांना हात लावू नकोस. आपल्या हाताचा त्यांना विटाळ लावण्याचा उर्मट प्रयत्न करू नकोस. नाही तर तुझ्या त्या साहसाचे बक्षीस म्हणून तत्काळ मृत्यूच तुला मिळेल."

पण अशा भयंकर धमक्यांना तो हमाल कधीच दाद देणारा नव्हता. त्याने पट्टे धरून ते चिलखत वर काढले आणि काही गाजावाजा न करता दूर भिरकावले. त्याने ते चिलखत तेथेच ठेवले असते तर बरे झाले असते. कारण त्याचे हे कृत्य पाहताक्षणीच, डॉन क्विक्झोट यांनी आकाशाकडे डोळे लावले आणि जणू काही आपली प्रेम-देवता डल्सीनिया हिला उद्देशून ते ओरडले, " देवते, या तुझ्या निष्ठावंत दासाला जी प्रथम संधी लाभली आहे, ती साधण्यासाठी मला सहाय्य कर. या दासाच्या शौर्याच्या पहिल्या कसोटीच्या या प्रसंगी आपली कृपा आणि संरक्षण मला देण्यास अनमान करू नकोस :" असेच काही उद्गार पुनः पुनः काढून त्यांनी आपल्या हातातील निशाण खाली टाकले आणि दोन्ही हातांनी आपला भाला वर उचलून त्या हमालाच्या अविचारी डोक्यावर असा जबरदस्त तडाखा दिला की, तो त्यांच्या पायाशी विव्हळत पडला. सरदारजींनी पाठोपाठ दुसरा तडाखा दिला असता तर त्या हमालाला वैद्याची गरजच उरली नसती ! असा पराक्रम गाजवून डॉन क्विक्झोट यांनी आपले, चिलखत उचलून घेतले. पुन्हा त्या हौदात ठेवले आणि पूर्वीइतक्याच निर्विकारपणे, शांतपणे, ते त्या हौदाजवळ मागेपुढे फिरू लागले.

थोड्याच वेळात दुसरा हमालही आपल्या खेचरांना पाणी पाजण्यासाठी तेथे आला. तेथे काय घडले, हे त्याला माहीत नव्हते. पहिला हमाल अजून बेशुद्ध अवस्थेत होता. दुसऱ्या हमालाने त्या हौदातून चिलखत बाहेर काढण्यास सुरुवात केली मात्र, डॉन क्विक्झोट यांनी, एक शब्द न उच्चारता किंवा कोणाच्या मदतीची याचना न करता, पुनः एकदा आपल्या हातातील निशाण खाली टाकून आपला भाला उचलला, आणि त्या हमालाच्या डोक्यावर तो इतक्या जोराने आदळला की, त्यामुळे त्या हमालाचे डोके तीन-चार ठिकाणी फुटले. तो भाला मात्र शाबूत राहिला. हमालाच्या आरडाओरडीने खानावळीतील सारे लोक घाबरून गेले आणि तेथे गोळा झाले. त्यांच्यामध्ये खानावळ-वाला होताच. त्याकडे पाहून डॉन क्विक्झोट आपली ढाल घट्ट धरून व समशेर उपसून मोठ्याने म्हणाले, " हे सौंदर्य-सम्राज्ञी, माझ्या दुर्बल हृदयाचे बल व धैर्य तूच आहेस; आपल्या या साहसी दासाला, तो अशा भीषण संग्रामात गुंतलेला असताना, तूच आपल्या दिव्य तेजाच्या किरणांनी उत्साहित केले पाहिजेस. हा क्षण आहेच तसा महत्त्वाचा !"

या प्रार्थनेमुळे आपल्याला विपुल धैर्य प्राप्त झाले आहे आणि त्यामुळे जगातील सर्व हमाल आपल्यावर एका क्षणीच तुटून पडले तरी आपण त्या सर्वांना खचित तोंड देऊ शकू असे त्यांना वाटले. उलट आपल्या दोस्तांची ती गत झालेली पाहून सारे हमाल खवळले. ते क्विक्झोटच्या जवळ जाण्यास भीत असले, तरी त्यांचेवर त्यांनी

दगडांचा वर्षाव केला. त्यामुळे क्विक्झोट यांना आपल्या निशाणाच्या संरक्षणाखाली आपला बचाव शक्य तितका करावा लागला. मात्र ते त्या पाण्याच्या हौदापासून दूर जाण्यास धजले नाहीत, नाही तर लोकांना वाटले असते की, त्यांनी आपली हत्यारे टाकून दिली. क्विक्झोट यांच्या नादी न लागण्यास खानावळवाल्याने त्या हमालांना शक्य तितक्या मोठ्याने ओरडून सांगितले, "हा माणूस वेडा आहे, हे मी तुम्हाला पूर्वीच सांगितले आहे. त्याने तुम्हा सर्वांना ठार मारले तरी कायदा त्याला काही करू शकणार नाही — वेडा म्हणून निर्दोषी ठरवील."

डॉन क्विक्झोट यांनीही मोठा गोंगाट केला, "तुम्ही सारे लबाड व विश्वास-घातकी दुर्जन आहा, आणि संकटात सापडलेल्या शिलेदाराला शिवीगाळ करणारा हा किल्लेदारही नीच, असभ्य व सौजन्यहीन आहे. अरे, तुला बजावतो आहे की मला जर शिलेदारांचा किताब मिळाला असता, तर तू किती निमकहराम आहेस, दुष्ट आहेस, हे मी तुला दाखवून दिले असते. हलकट, दंगेखोर माणसा, होऊन जाऊ दे. तू मला खुशाल लाखोली वाहा; नाही तर माझे जास्तीत जास्त वाटोळे कर. ये, ये, तुझ्या अंगात धमक असेल तर जवळ ये अन् आपल्या मूर्खपणाचे नी उर्मटपणाचे बक्षीस घे." हे उद्‌गार त्यांनी इतक्या आवेशाने व बेडरपणाने काढले की, त्यामुळे त्यांच्यावर हल्ला करणाऱ्या सर्वांचे धाबे दणाणून गेले. काहीशा भीतीने आणि काहीशा खानावळवाल्याच्या समजावणीने त्या हमालांनी त्यांचेवर दगडांचा वर्षाव करण्याचे थांबविले. उलट, क्विक्झोट यानी त्या जखमी जवानांना तेथून नेण्यास आपल्या शत्रूला परवानगी दिली. नंतर ते आपल्या शस्त्रांवरच्या पहाऱ्याकडे पूर्वीप्रमाणेच शांतपणे व स्थिरपणे वळले.

आपल्या पाहुण्याच्या या मूर्ख लीला न रुचल्यामुळे, खानावळवाल्याने त्याला तेथून घालवून देण्याचा निश्चय केला. आणखी काही काळ आपल्या येथे राहून त्याने खोडया करू नयेत, म्हणून त्याला ती दुर्दैवी शिलेदारीही बहाल करण्याचे त्याने ठरविले. म्हणून तो क्विक्झोटजवळ गेला आणि म्हणाला, "या हरामखोर, पाजी लोकांच्या उद्धटपणाबद्दल, महाराज, आपण मला क्षमा करावी. त्यांनी जे जे केले ते माझ्या संमती-शिवाय, माहितीशिवाय केले. त्यांच्या उद्धटपणाचे चांगले प्रायश्चित त्यांना मिळाले आहे. महाराज, आता मी आपल्याला शिलेदारी बहाल करतो. माझ्या किल्ल्यात स्वतंत्र प्रार्थना-स्थान नाही, हे मी आपल्याला पूर्वीच सांगितले आहे. आणि शिलेदारीचा बाकीचा समारंभ पूर्ण करण्यासाठी त्याची खरोखर काही गरजही नाही. अशा समारंभांच्या पोथीत मी जे वाचले आहे, त्यावरून केवळ गळ्याला व खांद्याला तलवारीने स्पर्श करणे एवढाच विधी उरला आहे. तो इतर कोणत्याही स्थानाप्रमाणे शेतातही उरकता येईल. महाराज, शस्त्रावर पहारा करण्याचे कार्य तर आपण पार पाडलेच आहे. ते वास्तविक दोन तासाचे असते, पण आपण तर चार तास पहारा केला आहे."

खानावळवाल्याच्या या बोलण्यावर डॉन क्विक्झोट यांचा सहजच विश्वास बसला. ते म्हणाले, "आपण सांगाल तसे करण्यास मी तयार आहे. हे सारे प्रकरण शक्य

तितक्या लवकर संपविण्याची माझी इच्छा आहे. कारण, एकदा का मला शिलेदारीचा टिळा लागला, म्हणजे माझ्यावर कोणी हल्ला केल्यास या किल्ल्यातील एकाही माणसास मी जिवंत सोडणार नाही. हां, आपणच जर कोणाला वाचविण्याची इच्छा केली, तर आपल्यासाठी मी त्याला जिवंत ठेवीन." या थरापर्यंत शिलेदारसाहेबांनी आपले शौर्य नेऊ नये म्हणून खानावळवाल्याने एक वही आणली. गवत व सातू यांचा व हमालांचा हिशेब तो त्या वहीत लिहीत असे. पूर्वी वर्णिलेल्या त्या दोन प्रेमळ स्त्रियांना त्याने तेथे आणले, आणि हातात पेटती मेणबत्ती घेतलेला एक मुलगाही आणला. त्याने डॉन क्विक्झोट यांना आज्ञा केली, "गुडघे टेका." नंतर एखादे धार्मिक प्रवचन वाचावे त्याप्रमाणे त्याने त्या वहीतील मजकूर भक्तिभावाने वाचला. तो वाचत असतानाच त्याने आपला एक हात वर उचलला आणि क्विक्झोटच्या मानेवर एक जबरदस्त ठोसा दिला आणि त्यांच्या पाठीवर तलवारीच्या चपट्या बाजूने हलकासा प्रहार केला. हे सर्व करीत असताना प्रार्थना म्हटल्याप्रमाणे, तो ओठातल्या ओठात काही शब्द पुटपुटत होता. नंतर त्याने एका मुलीला सांगितले, "या शिलेदारजींच्या कमरेला समशेर लाव" त्याप्रमाणे तिने मोठ्या गांभीर्याने तसे केले. त्यावेळी तिने मोठाच विवेक दाखविला असे मी म्हणतो, कारण त्या समारंभातील प्रत्येक प्रसंगी आलेले हसू दाबणे किती कठीण होते हे मी जाणतो. शिलेदारजींनी नुकताच जो पराक्रम केला, त्यामुळेही त्या मुलीना आपल्या मनातील आनंदाची उकळी थांबविण्यास बरीच मदत झाली हे खरे. त्यांच्या कमरेला तलवार लटकविल्यानंतर ती प्रेमळ स्त्री म्हणाली, "देव करो आणि आपणाला भाग्यवान शिलेदार बनवो. आपण जेथे जाल तेथे आपला उत्कर्ष होवो."

आपल्यावर कोणा देवतेने कृपाप्रसाद करून आपल्याला उपकृत केले, तिचे नाव जाणण्याची डॉन क्विक्झोट यांना इच्छा झाली. आपण आपल्या शस्त्रांच्या शौर्याने जो मानसन्मान संपादन करू, त्यात तिला सहभागी करण्याचीही त्यांना इच्छा झाली. ती इच्छा कानी पडताच, त्या मुलीने अत्यंत विनम्र—भावाने आपले नामाभिधान निवेदिले, ते म्हणजे "टोलोसा." ती एका चांभाराची मुलगी होती. टोलेडो येथील सँकोबिनायाच्या लहान दुकानांमध्ये त्या चांभाराचा गाळा होता. ती मुलगी म्हणाली, "महाराज, आपण आज्ञा कराल तेव्हा मी आपली नम्र दासी म्हणून काम करीन." डॉन क्विक्झोट यांनी तिला विनंती केली, "यापुढे आपण आपल्या नावाला 'श्रीमती' ही पदवी जोडण्याची मेहरबानी करावी. आणि यापुढे 'लेडी टोलोसा' असे नाव मिरवावे, अशी माझी विनंती आहे:" तसे करण्याचे तिने वचन दिले. त्या मुलीच्या मैत्रिणीने सरदारजींच्या रिकीबीचा पट्टा आवळला आणि त्यांच्याशी बातचीत करण्यास सुरवात केली. क्विक्झोट यांनी तिचे नाव विचारले, तेव्हा ती म्हणाली, "मिलर या नावाने मी ओळखली जाते." अँटेक्वेरा येथील एका पिठाच्या गिरणीच्या मालकाची ती मुलगी होती. तिलाही आपल्या नव्या शिलेदारजींनी 'लेडी मिलर' म्हणून वावरण्याची विनंती केली व तिच्या सेवेला आपण सिद्ध असल्याचे सांगितले. (पूर्वी कधी कुणी

पाहिले नसतील असे ) हे सारे अलौकिक समारंभ घाईघाईने उरकण्यात आले. आपल्या साहसी मोहिमेत काही भूप्रदेश जिंकून घेतल्याशिवाय डॉन क्विक्झोट विश्रांती घेऊ शकत नव्हते. म्हणून त्यांनी रोझिनांटवर लगोलग खोगीर चढविले आणि ते घोड्यावर स्वार झाले. त्यांनी त्या खानावळवाल्याला प्रेमाने आलिंगन दिले. आपल्यावर शिलेदारीचा शिक्का मारण्याचा उपकार करणाऱ्या त्या खानावळवाल्यावर त्यांनी धन्यवादांचा इतका मुसळधार वर्षाव केला की, त्या सर्वांचे यथार्थ निवेदन करणे अशक्य आहे. त्यांच्या तावडीतून सुटण्यास खानावळवाला अधीर झाला होता. म्हणून त्याने काव्यात्मक पण छोटी उत्तरे दिली. हिशेब चुकता करून घेण्यासाठी क्विक्झोट यांचे घोडे थांबविले नाही. क्विक्झोट तेथून निघाले हे पाहूनच त्याला भरपूर समाधान झाले.



## प्रकरण ४

# खानावळीतून बाहेर पडल्यावर आमच्या शिलेदारांना कोणते अनुभव आले ?

प्रभातकाळी उषा उदय पावत होती. डॉन क्विक्झोट त्या पथिकाश्रमातून बाहेर पडत होते. सरदारकी मिळाल्याबद्दल ते इतके प्रसन्न होते, संतुष्ट होते आणि हर्षभरित होते की, त्यांनी आपला सारा आनंद आपल्या घोड्याच्या जीवात ओतला. त्यामुळे ते घोडेही हर्षभराने फुरफुरू लागले आणि खोगीराचे पट्टे तोडू लागले. परंतु, पैसाअडका व स्वच्छ सदरे वगैरे प्रवासातील आवश्यक वस्तूंची तरतूद करण्यासंबंधी पथिकाश्रमाच्या चालकाने केलेला उपदेश ध्यानी धरून क्विक्झोट यांनी घरी परतण्याचा निश्चय केला. त्या आवश्यक वस्तू सांगाती घ्याव्या अन् त्याप्रमाणेच एक शागीर्दही मिळवावा, असा त्यांचा बेत होता. त्यांच्या शेजारी एक मजूर राहात होता. तो गरीब होता. आणि त्याला बरीच मुले–बाळे होती. पण सरदाराचा शागीर्द म्हणून काम करण्यास तो अगदी लायक आहे, आणि म्हणून त्याला आपण नोकरीवर ठेवावे, असे क्विक्झोटांच्या मनाने घेतले. तसा निश्चय करून ते आपल्या खेड्याकडे जाणाऱ्या रस्त्याला लागले. त्याचा हा हेतू रोझिनांटने अंतःप्रेरणेने जाणला असावा आणि म्हणून तो इतक्या उत्साहाने धावत सुटला की, त्याचे खूर भूमीला स्पर्शच करीत नाहीत असे वाटू लागले !

सरदारजी फार दूर गेले नाहीत, तोच त्यांच्या उजव्या हाताच्या झाडीतून एका स्त्रीचा करुण स्वर कानी येत आहे, असे त्यांना वाटले. तेव्हा ते म्हणाले, "केवढी ही ईश्वराची कृपा ! माझ्या व्यवसायाचे कर्तव्य पार पाडण्याची आणि माझ्या इच्छांची परिपूर्ती करण्याची संधी इतक्या लवकर ईश्वराने मला दिली. हे करुण स्वर खरोखर कोणा तरी दुःखी जीवाचे गाऱ्हाणे सांगत आहेत आणि मी तत्काळ सहाय्यासाठी धावून जावे अशी हाक देत आहेत." नंतर रोझिनांटला शक्य होते तितक्या वेगाने सरदारजी त्या बाजूस वळले. त्या रानात ते शिरतात तोच त्यांना एक घोडी ओक वृक्षाला बांधलेली आढळली आणि कमरेपासून वरपर्यंत उघडा असलेला सुमारे पंधरा वर्षांचा मुलगा दुसऱ्या झाडाला बांधलेला दिसला. या मुलानेच ती करुण किंकाळी फोडली होती. त्याला तसे कारणही होते. एक धिप्पाड गावकरी आपल्या हातातील चामडी पट्ट्याने त्याला सपासप् मारीत होता. प्रत्येक फटकाऱ्याबरोबर त्या मुलाला, 'मूर्खा, तोंड बंद ठेव अन् डोळे उघडे ठेव.' या म्हणीची आठवण होत होती. तो मुलगा ओरडून

म्हणाला, "नाही, नाही, धनीसाहेब, मी पुनः असे करणार नाही; आपण मला जिवंत ठेवले तर मी पुनः असे करणार नाही. खरोखर, यापुढे मी आपल्या सामानाची जास्त काळजी घेईन."

हा प्रकार पाहून डॉन क्विक्झोट संतापाच्या स्वरात ओरडून म्हणाले, "उर्मट परदारा, स्वतःचा बचाव करू न शकणाऱ्या माणसाला मारणे अयोग्य आहे. ये, घोड्यावर बस आणि आपला भाला हातात घे. (कारण, त्याची घोडी ज्या झाडाला बांधलेली होती, त्यालाच भाल्यासारखी दिसणारी काठी टेकून ठेवलेली होती.) तू भेकडासारखा वागलास, हे मी नंतर तुला पटवून देईन." आपल्या तोंडापुढे भाला फिरविणाऱ्या आणि सशस्त्र वेश धारण केलेल्या माणसाला पाहताच त्या गांवढळ शेतकऱ्याला वाटले; आता आपली शंभरी भरली. तो सौम्य व शरणागतीच्या स्वरात म्हणाला, "महाराज, मी ज्याला शिक्षा करीत आहे, तो हा मुलगा माझा नोकर आहे. येथून जवळच माझा शेळ्यांचा कळप आहे. तो राखण्यासाठी मी या मुलाला ठेवले आहे. पण तो इतका गाफील असतो की, दररोज माझ्या काही शेळ्या गायब होतात. त्याचा गाफिलपणा किंवा लुच्चेपणा दूर करण्याचा प्रयत्न मी करीत आहे. पण त्याला वाटते, आपले वेतन चुकविण्यासाठी लोभाने मी असे करीत आहे. पण तो खोटे बोलत आहे, हे मी माझ्या प्राणांची शपथ घेऊन सांगतो."

हे ऐकताच डॉन क्विक्झोट त्याच्या अंगावर खेसकले, "अरे, चेष्टेखोर माणसा, विदूषका, माझ्यासमोर खोटे बोलतोस ? हा माझा भाला तुझ्या शरीरातून आरपार नेण्याचा माझा निश्चय झालेला आहे, हे मी भगवान् सूर्यनारायणाला साक्षी ठेवून सांगतो. या मुलाला त्याचे वेतन, चकार शब्द न काढता, देऊन टाक. त्या जगन्नियंत्याची शपथ घेऊन मी सांगतो की, मी तुला तत्काळ ठार मारीन आणि नामशेष करीन. तसे व्हावयास नको असेल तर पुढे ये आणि या मुलाला या क्षणीच बंधमुक्त कर." त्या शेतकऱ्याने मान खाली घातली आणि काही उत्तर न देता त्या मुलाला मोकळे केले. 'तुझ्या धन्याकडून तुला किती पैसे येणे आहेत ?' असे डॉन क्विक्झोट यांनी विचारल्यावर त्या मुलाने उत्तर दिले, "दरमहा सात नाणी, या हिशोबाने नऊ महिन्यांचा पगार मला मिळावयाचा आहे." सरदारजींनी गणित मांडले, तेव्हा एकूण त्रेसष्ट नाणी देणे निघाले. "हे सारे देणे तत्काळ देऊन टाक, नाही तर याच क्षणी तू ठार झालास असे समज." असा हुकूम सरदारजींनी दिला. भयाने थरथरत कापणारा तो गरीब गावकरी म्हणाला, "मी मृत्युपंथास लागलो आहे. मी या मुलाला इतके पैसे देणे लागत नाही, हे मी घेतलेल्या शपथेवरून (जाता जाता हे सांगितले पाहिजे की, त्याने कोणतीही शपथ घेतलेली नव्हती.) आपल्या लक्षात आले असेलच. मी त्याचेसाठी जोड्यांच्या तीन जोड्या खरेदी केल्या आहेत आणि तो आजारी असताना औषधासाठी खर्च केला आहे ती सारी रक्कम त्याच्या वेतनातून वजा केली पाहिजे."

हे ऐकून डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, "काही कारण नसताना तू त्याला जे

फटके मारलेस त्यांची किंमत आणि त्या जोड्यांची व औषधाची किंमत तोलून पाहा. कारण, तू ज्याची किंमत दिलीस, त्या जोड्याचे चामडे या मुलाने वापरले असले, तर तू त्याचे चामडे पुरे लोळविले आहेस आणि गैरप्रकारे वापरले आहेस. तो मुलगा आजारी असताना वैद्याने त्याच्या शरीरातून रक्त बाहेर काढले असले, तर त्याचे आरोग्य चांगले असताना तू त्याच्या शरीरातून रक्त काढले आहेस. म्हणून, तो तुला काही देणे लागत नाही." यावर तो शेतकरी म्हणाला, "सरदारसाहेब, सर्वांत दुःखाची गोष्ट ही आहे की, माझ्याजवळ मुळीच पैसा नाही. हा अँड्र्यू माझ्याबरोबर घरी येऊ दे, तेथे मी त्याला माझ्या हाताने सारे पैसे देऊन टाकीन."

"काय ? मी याच्याबरोबर घरी जाऊ ?" तो मुलगा किंचाळला, "हा नख-शिखान्त सैतान आहे ! मला काय घडणार हे सारे माहीत आहे. त्याने मला मोकळे केल्याबरोबर तो मला सेंट बार्थोलोम्युप्रमाणे जिवंत सोलून काढील."

डॉन क्विक्झोट त्या मुलाला म्हणाले, "असे करण्यास तो कधीच धजणार नाही. मी त्याला आज्ञा करीत आहे ती त्याला पुरेशी बंधनकारक आहे. मला प्राप्त झालेल्या सरदारकीची शपथ घेऊन या शेतकऱ्याने माझी आज्ञा पाळण्याचे वचन दिले, तर मी त्याला मोकळेपणी जाऊ देईन आणि मग तुला तुझे वेतन मिळेल, ही खात्री बाळग." यावर तो मुलगा म्हणाला, "महाराज, आपण काय म्हणता याचा विचार करा. कारण माझा धनी हा शिलेदार नाही. आपल्या साऱ्या आयुष्यात तो कोणत्याही मानाच्या स्थानी गेलेला नाही. तो केवळ क्विंटीनार येथील मातब्बर शेतकरी जॉन हाल्डुडो आहे."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "याला फारसे महत्त्व नाही. हाल्डुडो घराण्यात शिलेदार झाले असतील. कोणताही वीरपुरुष आपल्या भाग्याचा विधाता असतो–प्रत्येक माणूस आपल्या कृतीचे अपत्य असते."

तो मुलगा–अँड्र्यू– म्हणाला, "पण कोणत्या कृतीचे फळ हा माझा धनी असेल ? मी निढळाचा घाम गाळून मिळविलेले वेतन देण्याचे हा नाकारीत आहे."

तो धनी ओरडून म्हणाला, "अरे, प्रामाणिक अँड्र्यू, मी तुला तुझे वेतन देण्याचे नाकारीत नाही. फक्त माझ्याबरोबर कृपा करून घरी चल म्हणजे झाले. जगातील साऱ्या सरदारांची शपथ घेऊन मी तुला सांगतो की, मी तुझा पैसा न् पैसा देऊन टाकीन–तू मागशील तर जादा पैसाही देईन–सुगंधित करून देईन." डॉन क्विक्झोट म्हणाले, "राहू दे तुझे ते सुगंध ! नाण्यात वेतन दे म्हणजे झाले, त्याने माझे समाधान होईल. पण तू आपली शपथ पाळली पाहिजेस–न पाळशील तर मी परत येईन, तुला शोधून काढीन आणि पालीसारखा तू दडून बसलास, तरी तुला शोधून काढून मी तुला शासन करीन, हे मी शपथपूर्वक सांगतो. हे निर्बंध आपल्यावर कोण घालीत आहे, हे जर तुला कळले, तर त्याचे पालन करणे अवश्य असल्याचे तुला पटेल. अरे मी अनाथ-नाथ, पतित–पावन, अन्याय–निवारक व दुःख–हर्ता असा ला मांचाचा शौर्यशाली डॉन क्विक्झोट आहे. म्हणून आता राम राम ! तू कशाचे वचन दिले

आहेस आणि कोणती शपथ घेतली आहेस, हे ध्यानात धर. तसे न करशील, तर तुझा जीव धोक्यात येईल." असे म्हणून त्यांनी रोझिनांटला टाच मारली आणि त्या मुलाला व त्याच्या धन्याला लौकरच दूर मागे सोडले.

दौडत जाणाऱ्या क्विक्झोटकडे तो शेतकरी दोन्ही डोळे भरून पहात होता. सरदारजी जंगलातून बाहेर पडले आहेत आणि दृष्टीच्या टप्प्याबाहेर गेले आहेत, असे दिसताच तो शेतकरी आपल्या नोकराकडे— अँड्रूकडे— गेला आणि म्हणाला, "ये, बाळा ये, त्या दुःखहर्त्या व विघ्न-नाशकर्त्या माणसाने आदेश दिल्याप्रमाणे मी तुझे सारे देणे देऊन टाकतो." अँड्रयू उत्तरला, "वाः! त्या सज्जन सरदाराची आज्ञा आपण पूर्ण करावी हे चांगले असे मला वाटते. ईश्वर त्या सरदारजींना दीर्घायुष्य देवो. ते इतके शूर आहेत, न्यायी आहेत की, तुम्ही जर माझे देणे मला दिले नाही, तर ते परत येतील आणि आपले वचन खरे करतील." त्यावर त्या धन्याने उत्तर दिले, "मलाही अगदी तसेच वाटते. तुझ्यावर माझे प्रेम किती आहे, हे दाखविण्यासाठी मी तुझ्या देण्याची रक्कम वाढवितो आणि तुझे वेतन वाढवून देतो."

असे म्हणून त्याने त्या मुलाचा हात पकडला आणि त्याला झाडाला बांधून टाकले. नंतर त्याने त्याला इतक्या निर्दयपणे बडविले की, त्याच्या अंगी जिवंतपणाचे फारसे काही लक्षण राहिले नाही. "बोलाव आता त्या तुझ्या विघ्न-नाशकर्त्याला!" तो शेतकरी गरजला, "अरे अँड्रयू, मी आता जे काही केले आहे, ते तो कधीच नाहीसे करू शकणार नाही, हे तुला कळेल. अर्थात् मी जे काही करावयास हवे होते त्याचा हा केवळ एक अंश आहे. बदमाशा, तू म्हणालास त्याप्रमाणे तुला जिवंत जाळण्याचीच मला इच्छा आहे." शेवटी त्याने त्याला मोकळे केले आणि म्हटले, "जा, जा, तुझ्या त्या न्यायमूर्तीला खुशाल शोध जा म्हणजे तो आपला निवाडा अमलात आणील." बिचारा अँड्रयू! दुःखी मनाने तेथून निघाला— ला मांचा येथील पराक्रमी डॉन क्विक्झोटचा शोध घेण्याचा पूर्ण निश्चय करून निघाला. साऱ्या प्रकारची यथार्थ माहिती त्याला द्यावी म्हणजे शेतकऱ्याला तो सव्याज अद्दल घडवील अशी अँड्रयूला आशा वाटत होती. थोडक्यात म्हणजे, हुंदके देत देत व रडतरडत तो तेथून सरपटत गेला. त्यावेळी त्याचा धनी मागे उभा राहून खो खो हसत होता. अशा प्रकारे ला मांचाचे पराक्रमी डॉन क्विक्झोट यांनी एका अन्यायाचे निवारण केले!

इकडे सरदारजी स्वतःवर आणि स्वतः केलेल्या कृत्यावर विलक्षण खूष झाले होते. आपण आपल्या शस्त्रकौशल्याचा प्रारंभ अत्यंत उदात्त व मंगल रीतीने केला, अशा कल्पनेत ते गुंग होते. आपल्या खेड्याकडे जात असताना ते स्वतःशी हलक्या आवाजात म्हणाले, "हे सौंदर्य-सम्राज्ञी, टोबोसाची डल्सीनिया! ला मांचाच्या डॉन क्विक्झोट-सारख्या शौर्यवंत व नामवंत सरदाराला आपल्या इच्छेनुसार अंकित करून घेण्याचे व खुशीचा दास बनविण्याचे भाग्य आपल्याला लाभले, म्हणून तुला अपरंपार सुख लाभो! या तुझ्या दासाला कालच सरदारकीचा बहुमान लाभला, हे अलम दुनियेला माहीत

आहे. आतापर्यंत कोणीही केला नसेल असा महान अन्याय व क्रूरपणा दूर करण्याचे महत्कार्य आजच या दासानें पार पाडले आहे. त्या अत्याचारी माणसाचा चाबूक आजच मी हिसकावून घेतला. काहीही कारण नसताना त्या कोवळ्या बालकाला छळणारा तो मालक निष्ठुरपणे बदडीत होता. त्या बालकाची मुक्तता तुझ्या या दासाने केली.'' असे बोलत असतानाच ते एका चव्हाट्यावर आले. तेथे चार रस्ते मिळत होते. तेव्हा त्यांच्या मनात तत्काळ आले, अशाच चव्हाट्यावर सरदारलोक पुष्कळ वेळा उभे राहत. आणि कोणत्या रस्त्याने पुढे जावे, याचा खल आपापसात करीत. त्यांचा कित्ता गिरविण्यासाठी सरदारजी तेथे क्षणमात्र उभे राहिले आणि थोडा वेळ गंभीरपणे विचार करून त्यांनी रोझिनांटचे लगाम सैल सोडले. आपल्यापेक्षा आपल्या घोड्याच्या इच्छेला त्यांनी अधिक मान दिला. त्यांचा पहिला रोख ध्यानी घेऊन ते घोडे आपल्या तबेल्या-कडे जाणाऱ्या रस्त्याने निघाले.

डॉन क्विक्झोट दोन मैलांहून दूर गेले नसतील, तोच त्यांना आपल्याकडे घोड्या-वरून येणाऱ्या लोकांची एक टोळी दिसली. ते टोलेडोचे व्यापारी होते आणि मर्सिया येथे रेशीम खरेदी करण्यास चालले होते. ते सारे मिळून सहाजण होते. त्यांपैकी प्रत्येकाने डोक्यावर छत्री घेतली होती. त्याशिवाय घोड्यावर चार नोकर बसलेले होते आणि खेचरांचे तीन मोतद्दार पायी चालत होते. त्यांना पाहताक्षणीच आमच्या सरदारजींना वाटले, साहसाची नवी संधी आली. आपल्या ग्रंथामध्ये त्यांनी जी वर्णने वाचली होती, त्यांचे शक्य तितके अनुकरण करण्याचा चंग त्यांनी बांधला. आपल्याला जे विशिष्ट धाडस करण्याची विलक्षण लालसा होती, तेच आपल्यापुढे दत्त म्हणून उभे आहे, असे त्यांनी आनंदाने मानले. मोठ्या गांभीर्याने व आत्मविश्वासाने, रिकीबीत पाय घट्ट रोवून, आपला भाला उचलून आणि आपल्या छातीवर ढाल धरून सरदारजी, त्या मानलेल्या शिलेदारांची वाट पाहात, रस्त्याच्या मध्यभागी उभे राहिले. ऐकण्याच्या टप्प्यात ते येताच, सरदारजी प्रचंड व संतप्त स्वरात ओरडून म्हणाले, "थांबा, ला मांचाची सम्राज्ञी—टोबोसोची अद्वितीय डल्सीनिया—हिच्यापेक्षा अधिक सुंदर ललना या अखिल विश्वात कोणी नाही, असे समस्त मानवजातीने मान्य करीपर्यंत आणि कबूल करीपर्यंत कोणी पुढे जाता कामा नये—येथेच थांबले पाहिजे.''

हे शब्द कानी पडताच आपल्या प्रतिस्पर्ध्यांची अनाकलनीय आकृती पाहण्यासाठी ते व्यापारी थांबले. त्याचा आविर्भाव आणि सरंजाम पाहून त्यांनी सहजच तर्क केला की, या बिचाऱ्या सज्जन माणसाचे डोके फिरले असावे. सरदारजींना त्यांच्याकडून जी विलक्षण कबुली सक्तीने घ्यावयाची होती, तिचा खुलासा समजून घेण्याची त्यांना इच्छा झाली. म्हणून त्यांच्या बडबडीची गंमत जाणून, त्या टोळीतील एकाने सरदारजीशी बोलण्याचे काम अंगावर घेतले. अशा प्रसंगी कसे वागावे याचे तारतम्य तो जाणत होता. तो म्हणाला, "सरदारसाहेब, आपण ज्या थोर स्त्रीबद्दल बोलला ती आम्हाला परिचित

नाही. तिला पाहण्याची संधी मिळाली तर आम्हाला आनंद वाटेल. तिच्या ज्या अप्रतिम रूपलावण्याचे गुणगान आपण केले, ते तिच्या अंगी असल्याचे आम्हाला आढळले, तर मनाने, कोणतीही सक्ती न मानता, तुम्हाला हवे असलेले सत्य मान्य करू. "

यावर डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " अहो, मी एकदा तुम्हाला ते सौंदर्य प्रत्यक्ष दाखविले, तर मग ते सुविख्यात सत्य तुम्ही मान्य कराल यात नवल ते काय ? खरे महत्त्व आहे ते त्या सुंदरीला न पाहता, तुम्हाला त्या सौंदर्यावर विश्वास ठेवण्यास, मान्य करण्यास, कबूल करण्यास, शपथपूर्वक स्वीकारण्यास आणि सदैव संमत करण्यास भाग पाडण्यात. म्हणून याच क्षणी तुम्ही ती कबुली देऊन टाका. नाही तर, हे गर्विष्ठ व अविवेकी मर्त्य माणसांनो, तुम्हाला माझ्याशी सामना करावा लागेल हे समजून असा. शिलेदारीच्या धर्मानुसार तुम्ही एकजण या किंवा तुमच्यासारख्या माणसांच्या अभद्र सवयीप्रमाणे, सारे एकदम या. त्या सर्वांचा मुकाबला करण्यास मी एकटा समर्थ आहे. कारण माझे कार्य न्यायाचे आहे. "

तेव्हा त्या व्यापाऱ्याने उत्तर दिले, " सरदारजी, येथे उपस्थित असलेल्या सर्व राजपुत्रांच्या वतीने मी आपल्याला अशी प्रार्थना करतो की, आम्ही जी वस्तू कधी देखिली-पाहिली नाही, तिच्यासंबंधी मत-प्रदर्शन करणे, हे आमच्या सदसद्विवेक-बुद्धीशी विसंगत आहे, आणि शिवाय तसे करणे म्हणजे अल्केरिया व एस्ट्रेमाडुरा येथील राज्ञींचा व सम्राज्ञींचा अवमान करण्यासारखे होणारे आहे. म्हणून आमच्या सदसद्-विवेकबुद्धीला तृप्त करण्यासाठी, महाराजांनी त्या साध्वीची एखादी प्रतिमा आम्हास दाखवावी–मग ती गव्हाच्या एका कणाहून मोठी नसली तरी चालेल. ' शितावरून भाताची परीक्षा. ' आम्ही त्यामुळे सुरक्षित व संतुष्ट राहू आणि आपण तृप्त व प्रसन्न व्हाल. खरोखर मला असे नक्की वाटते की, आपली इच्छा पूर्ण करण्याकडे आम्हा सर्वांचा फार कल आहे; तो इतका की, त्या देवतेचा एक डोळा चित्रामध्ये आंधळा दाखविलेला असला आणि दुसरा वहात असला, तरी आपल्या इच्छेप्रमाणे आम्ही तिला अनुकूल असेच बोलू आणि आपल्याला उपकृत करू. "

हे ऐकून डॉन क्विक्झोट क्रोधाने संतप्त झाले व म्हणाले, " अरे बदनाम बदमाशांनो ! फूल पडण्याची भाषा करता ? तिच्या शरीरातून केशरकस्तुरीशिवाय काहीच बाहेर पडत नाही. तिच्या स्वरूपात किंवा आकृतीत रतिमात्र दोष नाही. ग्वाडारामा पर्वताच्या कड्याप्रमाणे तिचा देह सरळ आहे. त्या माझ्या अतुल्य देवतेच्या स्वर्गीय सौन्दर्याची तुम्ही जी भयंकर बदनामी केली, तिच्यासाठी तुम्हाला कडक प्रायश्चित भोगावे लागेल. " असे म्हणून व आपला भाला उचलून, आपल्याला प्रक्षुब्ध करणाऱ्या त्या व्यापाऱ्यांच्या अंगावर क्विक्झोट इतक्या त्वेषाने धावून गेले की, त्या उद्धट व्यापाऱ्याला त्याच्या बेताल बडबडीबद्दल चांगलीच शिक्षा मिळाली असती–पण सुदैव असे की, त्याच वेळी रोझिनांट अडखळून पडला–सरदारजींच्या यशाच्या वाटेवरच आडवा पडला. तो पडला म्हणून त्याचा धनीही खाली पडला–जमिनीवर बरेच अंतर

गडबडत–लोळत गेला. उठून उभे राहण्याचा प्रयत्न करण्यासाठी त्यांनी आपली सर्व शक्ती व कौशल्य खर्ची घातले. पण सरदारजी काही आपल्या पायावर उभे राहू शकले नाहीत–आपला भाला, आपली ढाल, रिकीबी, शिरस्त्राण आणि त्या गंजलेल्या चिलखताचे वजन–या सर्वांच्या भाराखाली ते दडपून गेले. तरीही अशा अपंग अवस्थेत एखाद्या वीराप्रमाणे क्विक्झोट ओरडून म्हणाले, " दुष्टांनो, भेकडांनो, थांबा, पळू नका ! मी येथे पडलो आहे, हा काही माझा दोष नव्हे; माझ्या घोड्याचा आहे. "

त्या व्यापाऱ्यांचा एक मोतद्दार पुढे आला. तो काही चांगल्या स्वभावाचा नव्हता. जमिनीवर फेकला गेलेला सरदार आपल्या धन्याशी इतक्या उर्मटपणे वागत आहे, हे त्याला सहन होईना. म्हणून क्विक्झोटच्या बरगडीवर एक ठोसा लगावल्याशिवाय त्याला स्वस्थ बसवेना. जमिनीवर लोळणाऱ्या क्विक्झोटजवळ तो गेला आणि त्याच्या हातातील भाला हिसकावून घेऊन त्याने त्याचे तुकडे केले. त्यापैकी एका तुकड्याने त्याने डॉन क्विक्झोट यांना, त्यांच्या शस्त्रांना न जुमानता, गव्हाच्या लोंब्यांसारखे झोडपून काढले. त्याच्या धन्याने त्याला परत बोलावून म्हटले, " अरे, इतक्या त्वेषाने त्याच्यावर तुटून पडू नकोस. जाऊ दे त्याला ! " पण त्या नोकराने सरदारजींची हाडे खिळखिळी करण्याचे थांबविले नाही. त्याचा राग जेव्हा ओसरला तेव्हाच तो थांबला. त्या भग्न भाल्याचे तुकडे हाती घेऊन त्याने न थांबता सरदारजींना बडविण्यास सुरवात केली. अखेर सरदारजींच्या पोलादी पोशाखावर त्या भाल्याच्या ठिकऱ्या-ठिकऱ्या झाल्या. सरदारजी एकसारखे विव्हळत होते आणि एकामागून एक तडाखे खात होते. तरीही ते जगाला व स्वर्गाला शिव्याशाप देत होते–अन् तसेच त्या दुष्ट गुंडांनाही–ते व्यापारी गुंड आहेत असे त्यांना वाटत होते.

शेवटी खेचरांचा मोतद्दार थकला आणि ते व्यापारी आपल्या प्रवासाच्या वाटेला लागले. वाटेने त्या बिचाऱ्या सरदारजीबद्दल गप्पासप्पा करण्यास त्यांना भरपूर साहित्य होते. इकडे सरदारजी एकटे पडले होते. आपल्या पायावर उभे राहण्याचा त्यांनी पुनः एकदा प्रयत्न केला. पण व्यर्थ ! त्यांचे सारे अवयव शाबूत होते, तेव्हाही ते उठू शकले नव्हते. आणि आता तर काय ? त्यांचे हात–पाय दुखावलेले व मोडलेले होते. इतके झाले तरी त्यांना वाटत होते की, आपण फार सुखी आहोत. शिलेदारीच्या जीवनात असे अपघात घडावयाचेच ! आणि आपल्या अपघाताचा सारा दोष घोड्याकडे आहे असे ते मानीत होते. त्यांचे सारे शरीर इतके हबकले होते व ठणकत होते की, त्यांना उठून उभे राहावेना.

□ □

## प्रकरण ५

# आपल्या सरदारजींच्या दुर्दैवाची पुढील कहाणी

आपण आता काही हालचाल करू शकत नाही, असे पाहिल्यावर डॉन क्विक्झोट यांनी आपला नेहमीचा उपाय करून पाहण्याचे ठरविले. तो म्हणजे आपल्या ग्रंथातील कोणत्या उताऱ्यामुळे आपल्याला थोडेफार समाधान लाभेल, याचा विचार करणे. आणि काय सांगावे ? त्यांच्या मूर्खपणामुळे त्यांना तत्काळ एक उतारा आठवला. बाल्डविन व मॉंटुआचा मार्क्विस यांची ती गोष्ट होती. त्या गोष्टीत मार्क्विसला चार्लोट जखमी करून डोंगरावर सोडून जातो. ही गोष्ट लहान मुलांनी अभ्यासिलेली असते, तरुण–तरुणींना ती अज्ञात नसते, फार काय वृद्ध लोकही ती एकमेकांना सांगतात व तिच्यावर विश्वास ठेवतात. पण तिच्यात सत्य किती असते ? महमदाच्या चमत्कारापेक्षा तिळमात्र अधिक नसते. आपल्या सध्याच्या परिस्थितीला उद्देशून ही गोष्ट मुद्दाम रचलेली असावी असे क्विक्झोट यांना वाटले. आणि म्हणून ते इकडून तिकडे गडबडा लोळू लागले व आपली तीव्र वेदना आणि संताप प्रगट करू लागले, धापा टाकू लागले. डोंगरावर पडलेल्या त्या जखमी सरदाराने जे गाऱ्हाणे गायले असे म्हणतात, तेच क्विक्झोट आपल्या क्षीण स्वराने गाऊ लागले—

**हाय प्रियतमे । कोठे अससी ? ।**
**मम दुःखास्तव शोक न करिसी ॥**
**कळली नच की व्यथा दारुणा ।**
**बेइमान की होसि या जना ॥**

अशा प्रकारे, त्या प्रणय–काव्यातील शोकगीते ते म्हणू लागले. म्हणता म्हणता पुढील पंक्ती त्यांच्या मुखातून मोठ्याने बाहेर पडल्या—

**काका माझे, राजे तुम्ही हो ।**
**माण्टुआधिपा मार्क्विस–नाथा ! ॥**

याचवेळी त्यांच्या सुदैवाने असे घडून आले की, त्यांच्या घराजवळच राहणारा एक शेतकरी तेथून चालला होता. दळून घेतलेल्या कणकीचे पोते पाठीवर घेऊन चक्कीकडून तो आला होता. जमिनीवर कोणी एक माणूस पडलेला त्याला दिसला. तेव्हा त्याने विचारले, 'आपण कोण आहात आणि असे गाऱ्हाणे का गाता ?' डॉन क्विक्झोट यांच्या अस्वस्थ मनाला चटकन् वाटले, आपले काल्पनिक काका—मॉंटुआचे मार्क्विस–

हेच या शेतकऱ्याच्या रूपाने आपल्यापुढे उभे आहेत. म्हणून शेतकऱ्याच्या प्रश्नाला काही उत्तर न देता, त्यांनी त्याला आपली साहसी कथा रंगवून सांगितली. आपल्याला आलेले दुर्दैवी अनुभव, आपल्या पत्नीचे प्रेमप्रसंग, बादशहाचा मुलगा – या सर्वांचे जे वर्णन त्या ग्रंथात केलेले होते तेच त्यांनी निवेदन केले. ते ऐकून शेतकरी चकित झाला. काही न कळणारा असा विचित्र मजकूर हा माणूस सांगत आहे, याचे त्याला मोठे नवल वाटले. त्याने क्विक्झोट यांच्या शिरस्त्राणाचा पुढील भाग वर उचलला. खेचराच्या मोतद्दाराने लगावलेल्या ठोशांमुळे त्या शिरस्त्राणाचे तुकडे झालेले होते आणि त्यांच्या तोंडावर धूळ पडलेली होती. ती बाजूस सारून त्याने पाहिले, तेव्हा त्याने त्यांना चटकन् ओळखले व आश्चर्याने उद्‌गार काढले,– "मास्टर क्विक्झाडा! (जेव्हा त्यांचे रूपांतर शहाण्या माणसातून भटकत्या सरदारात झाले नव्हते आणि त्यांची सारी इंद्रिये शाबूत होती, तेव्हा सारे लोक त्यांना याच नावाने संबोधित असत.) तुमची अशी कशी दशा झाली हो?" पण, त्या गावकऱ्याने विचारलेल्या एकाही प्रश्नास काही उत्तर न देता, क्विक्झोट यांनी आपल्या साहसी मोहिमेचे पुराण ग्रंथातील वर्णनाप्रमाणेच चालू ठेवले. त्याकडे लक्ष न देता त्या सज्जन शेतकऱ्याने या जखमी वीराचे चिलखत शक्य तितके बाजूस सारले, आणि त्याच्या अंगावरील जखमांचा शोध तो घेऊ लागला. पण त्याला कोठेही जखम झाल्याचे किंवा रक्त निघाल्याचे आढळले नाही. म्हणून त्यांना त्यांच्या पायावर उभे करण्याचा शेतकरी प्रयत्न करू लागला. शेवटी, खूप खटपट करून त्याने क्विक्झोट यांना आपल्या गाढवावर बसविले. तेच सुखाचे व सोयीचे वाहन होते. शेतकऱ्याने सरदारजींची सारी शस्त्रे गोळा केली, त्यांच्या भाल्याचे तुकडेही मागे ठेवले नाहीत. त्या सर्वांचा गठ्ठा बांधून तो त्याने रोझिनांटच्या पाठीवर ठेवला. एका हाताने घोड्याचा लगाम व दुसऱ्या हाताने गाढवाची दोरी पकडून शेतकऱ्याने त्या सर्वांना आपल्या खेड्याकडे चालविले. स्वतः तो अत्यंत उदासीन होऊन पायी चालत होता.

चालता चालता त्याच्या डोक्यात डॉन क्विक्झोट यांनी सांगितलेल्या अचाट गोष्टी येत होत्या. डॉन क्विक्झोट हेही कमी चिंताक्रांत नव्हते. ते स्वतः इतके पीडलेले व जखमी झालेले होते की, त्यांना गाढवावर नीट बसता येईना. मधूनमधून ते इतक्या दुःखाचे सुस्कारे सोडीत की ते जणू आकाशाला जाऊन भिडत. ते ऐकून त्यांच्या त्या दयाळू शेजाऱ्याचे हृदय कळवळले. आपल्या दुःखाचे कारण मला सांगा, अशी त्याने त्यांना पुनः विनंती केली. पण क्विक्झोटांच्या डोक्यात सैतानाने ज्या भलत्याच गोष्टी भरविल्या होत्या, त्यांचे साम्य आपल्या परिस्थितीशी बरेच आहे असे त्यांना वाटले. बाल्डविनची गोष्ट ते पार विसरले आणि स्वतःला मूर अबिनडॅरेझ मानू लागले. अँटेक्वेराच्या अल्केडिने नॉर्वेझच्या रोड्रिगोने त्या मूरला पकडून व कैद करून आपल्या किल्ल्याकडे नेले होते, तो कथाभाग क्विक्झोट यांना आठवला. म्हणून "आपण काय केले व आपल्याला कशाने दुःख झाले?" असे त्या शेतकऱ्याने विचारले असता क्विक्झोट यांनी बंदीवान अबिनडॅरेझ यानी नार्वेझच्या रोड्रिगोला दिलेले उत्तर शब्दशः म्हणून

दाखविले ! मॉंटेमेअरच्या जॉर्जने लिहिलेल्या ' डाएना ' कादंबरीत ती सारी साहसकथा चित्रित केलेली आहे. ती आपल्याला तंतोतंत लागू पडते, असे क्विक्झोट पुनः पुनः सांगू लागले. त्यांचे ते मूर्खपणाचे बरळणे ऐकण्यापेक्षा नरकात जाऊन पडलेले बरे असे त्या शेतकऱ्याला वाटले. क्विक्झोट यांच्या त्या तापदायक आचरट गोष्टीतून मुक्त होण्यासाठी शक्य तितक्या घाईने शेतकरी आपल्या गावाकडे चालू लागला. आपल्या शेजाऱ्याची कवटी उलटी लागली आहे, अशी त्याला आता पूर्ण खात्री पटली.

चालता चालता डॉन क्विक्झोट एकसारखे बोलतच होते. ते म्हणाले, " अहो, नार्वेझचे डॉन रोड्रिगो, तुम्ही हे लक्षात घेतले पाहिजे की, मी जिचे वर्णन तुमच्यापाशी केले ती सुंदरी झेरिफा सांप्रत टोबोसोची लावण्यलतिका डल्सीनिया ही आहे. तिच्यासाठी मी शिलेदारीची महत्कृत्ये आतापर्यंत केली आहेत, आताही करीत आहे आणि यापुढेही करीत राहीन. अवघ्या विश्वात कधी दिसली नसतील किंवा दिसत नसतील अथवा दिसणार नाहीत, अशी ती माझी महत्कृत्ये आहेत. " यावर तो शेतकरी नम्रतेने म्हणाला, " महाराज, मी पापी आहे. मी नार्वेझचा डॉन रोड्रिगो नाही की मांटुआचा मार्क्विस पण नाही ! मी आपला शेजारी आहे आणि माझे नाव पेड्रोअलोंझो, असे आहे. तसेच महाराज, आपण बालडविन नाही की अबिनडॅरेझ पण नाही. आपण फक्त श्रीयुत क्विक्झाडा नावाचे भले सद्गृहस्थ आहा. " हे ऐकूनदेखील डॉन क्विक्झोट ठासून म्हणाले, " मी कोण आहे हे मला पक्के माहीत आहे. पण त्याबरोबरच हेही माहीत आहे की, मी उल्लेखिलेले वीरपुरुष एवढेच काय पण फ्रान्समधील बारा उमराव–किंबहुना, नऊ श्रेष्ठ पुरुष–हे सर्वजण माझ्या ठायी असू शकतील ! त्यांच्यापैकी एकेकजण ज्या विख्यात वीरकृत्यांनी प्रसिद्धी पावला आहे, त्यांच्यावर मात करणारी पराक्रमाची कृत्ये मी करून दाखवीन. त्या सर्वांची शौर्यशाली कामगिरी एकत्र केली, तरी तिच्यावरही मी ताण करीन. "

अशा प्रकारे बोलत बोलत सायंकाळच्या सुमारास, अखेरीस ते दोघे आपल्या खेड्याजवळ जाऊन पोचले. पण काळोख पडेपर्यंत तो शेतकरी गावापासून दूर थांबला. हेतू हा की, आपला त्रस्त शेजारी गाढवावर वेडावाकडा बसलेला लोकांना दिसू नये. अंधार पडल्यावर त्याने त्याला आपल्या घरी नेले. तेथे मोठा गोंधळ माजलेला होता. त्या खेड्यातील पाद्री व न्हावी हे दोघेही डॉन क्विक्झोट यांचे निकटचे स्नेही होते. ते यावेळी तेथे आलेले होते. त्यांच्याशी घरधनीण वादविवाद करीत होती. " पेरेझ पंडितजी, (पाद्र्याचे नाव हे होते. ) माझ्या धन्याच्या दुर्दैवाबद्दल तुम्हाला काय वाटते ? गेले सहा दिवस ते किंवा त्यांचे घोडे, त्यांची ढाल किंवा त्यांचे चिलखत नि भाला दृष्टीस पडलेले नाहीत. मी अगदी गोंधळून गेले आहे. मी काय करू ? मी जिवंत आहे, हे जितके सत्य आहे, तितकेच हेही सत्य आहे की, शिलेदारीच्या ज्या पापी पुस्तकांत ते आपला जीव ओतीत होते, त्यांनीच त्याची सारी शुद्ध–बुद्ध हिरावून घेतली, हे मी माझ्या प्राणाची पैज लावून सांगते. कारण आता मला आठवते की, ते आपल्याशी वारंवार पुटपुटत असत,

" शिलेदार होण्याची व साहसे शोधण्यासाठी जगभर संचार करण्याची मला इच्छा आहे. " साऱ्या ला मांचातील अत्यंत बुद्धिमान माणसाचे डोके बिघडून टाकणारी अशी ती पुस्तके सैतान आणि बाराबारास आपल्या ताब्यात घेवोत ! "

क्विक्झोटची पुतणीही असेच काही बोलत होती- नापिताला उद्देशून ती म्हणाली, " निकोलस ( ते त्याचे नाव होते ) तुम्हाला माहीत असेल की, कैकवेळा माझे काका भलत्या पराक्रमाची ती अविचाराची पुस्तके एकावेळी ४८ तास वाचीत असत. नंतर ते पुस्तक फेकून देऊन व तलवार उपसून भिंतीवर तुटून पडत. भिंतीचे तुकडे व पोपडे पाडून ते दमले म्हणजे ओरडून सांगत, ' मनोऱ्याएवढे चार राक्षस मी ठार केले. ' त्यांच्या अंगावर जो घाम आलेला असे, तो म्हणजे युद्धात झालेल्या जखमातील रक्त होय असे ते म्हणत. नंतर ते मोठ्या भांड्यातील थंड पाणी घटाघटा पीत. नंतर ते पूर्वीइतकेच शांत व स्थिर होत. ' हे पाणी म्हणजे, महान् जादूगार आणि माझा खास दोस्त, विद्वान् एस्क्विफ याने माझ्यासाठी आणलेले अमोल पेय आहे. ' असे ते म्हणत. आता या साऱ्या गोंधळाला कारण मीच आहे. कारण माझ्या काकाच्या या बडबडीची सूचना मी तुम्हाला वेळीच दिली असती तर, योग्य वेळीच तुम्ही या साऱ्या प्रकाराला आळा घातला असता आणि या साऱ्या बहिष्कृत ग्रंथांची होळी केली असती. वेड्या नास्तिकांची पुस्तके जितकी जाळण्याजोगी असतात, तितकीच त्यांच्याकडची बहुतेक पुस्तके होळीत टाकण्याच्या योग्यतेची आहेत. "

यावर पाद्री म्हणाला, " माझेही मत तसेच आहे. खरोखर, उद्याचा दिवस मावळण्यापूर्वी मी त्या पुस्तकांची चांगली छाननी करीन आणि ती भस्मसात् करण्याची शिक्षा ठोठावीन. म्हणजे ती पुस्तके वाचून माझ्या भल्या मित्राप्रमाणे कोणाचे डोके बिघडण्याची वेळ येणार नाही. " हा सारा वादविवाद न ऐकता तो गावकरी डॉन क्विक्झोट यांच्यासह तेथे उभा राहिला. आपल्या शेजाऱ्यांच्या गोंधळाचे कारण काय आहे हे त्याच्या ध्यानी आता पक्के आले. म्हणून काही गाजावाजा न करता त्याने सर्वांना मोठ्याने ओरडून बोलावले, " अरे, घरातील साऱ्या माणसांनो, दारे उघडा. लॉर्ड बाल्डविन आणि मॅंटुआचा लॉर्ड मार्क्विसजखमी होऊन दुःखाने येथे येत आहेत. नार्वेझचा पराक्रमी डॉन रोड्रिगो, ॲंटेक्वेराचा अल्केडी यांनी अबिनडरेझ या मूर सरदाराला पकडून आणले आहे. त्याच्यासाठी दारे खडाखड उघडा. " हे शब्द कानी पडताच घरातील सारे लोक दाराबाहेर आले. तेव्हा एकीला आपला काका दिसला आणि दुसरीला आपला मालक भेटला. बाकीच्या सर्वांना मित्र गवसला. तो मित्र अद्याप गाढवावरून खाली उतरला नव्हता–खरे म्हणजे तो उतरू शकत नव्हता. म्हणून सारेजण त्याला मिठी मारण्यासाठी त्याच्याकडे धावले. तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " मित्रांनो, क्षमा करा. माझ्या घोड्याने मला जमिनीवर पाडले, त्यामुळे मला भयंकर दुखापत झाली आहे. मला बिछान्याकडे न्या आणि माझ्या जखमा बऱ्या करण्यासाठी उर्गांडा या जादुगारिणीला बोलवा. " ते ऐकून घरधनीण म्हणाली, " पहा, पहा, आपला मालक खाली पडेल.

हा माझा तर्क खरा ठरला की नाही, हे पहा. चला, महाराज, बिछान्यावर चला. मी आपल्याला विनंती करते, त्या उगोंडाला न बोलावता आम्ही तुम्हाला बरे करण्याची काळजी घेऊ; असे मी प्राणाची पैज मारून आपल्याला सांगते. आपल्याला या दुर्दशेस पोचविणाऱ्या त्या शिलेदारीच्या पुस्तकांना किडे पडोत–हे मी पुनः पुनः शंभर वेळा बोलेन."

नंतर त्यांनी त्यांना त्यांच्या शय्येवर निजविले आणि लोक त्यांच्या जखमा पाहू लागले. पण त्यांना एकही जखम दिसेना. तेव्हा क्विक्झोट म्हणाले, "रोझिनांट या माझ्या घोड्यावरून मी जोराने खाली आदळलो, त्यामुळे माझे अंग नुसते ठणकत आहे. या पृथ्वीच्या पाठीवर जे अत्यंत उद्धट व अत्याचारी राक्षस असतील, त्यांच्यापैकी दहाजणांशी मी एकटा लढत असताना मी घोड्यावरून खाली आलो." ते ऐकून पाद्री-बुवा मिस्किलपणे म्हणाले, "काय? राक्षसही नाचत सुटले? तसे असेल तर उद्या रात्रीपर्यंत मी त्या सर्वांना जाळून खाक करीन, असे क्रॉसची पवित्र शपथ घेऊन मी सांगतो." नंतर त्या सर्वांनी डॉनना हजार प्रश्न विचारले. पण त्यांनी त्या सर्वांना एकच उत्तर दिले आणि ते म्हणजे "मला काही खावयास द्या आणि नंतर विश्रांती घेऊ द्या. माझ्या दृष्टीने ती अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे." त्यांच्या विनंतीला त्यांनी मान दिला. नंतर पाद्रीबुवांनी त्यांच्या पराक्रमाचा सारा इतिहास माहीत करून घेतला–शेतकऱ्याला ते कोणत्या अवस्थेत सापडले, त्यावेळी ते कशी बेफाट बडबड करीत होते, सरदारजी सापडले तेव्हा आणि त्यांना घरी आणले जात असताना दोन्ही वेळा ते काय काय बरळत होते, हे सारे त्याने तपशीलवार सांगितले. दुसरे दिवशी सकाळी जे कृत्य करण्याचा त्यांनी निश्चय केला होता, ते तडीस नेण्याची पाद्रीबुवांची इच्छा अधिकच बळकट झाली. दुसरे दिवशी सकाळी पाद्रीबुवांनी आपला मित्र नापित, श्री. निकोलस, याला पाचारले आणि त्याच्यासह ते डॉन क्विक्झोट यांच्या घरी गेले.



## प्रकरण ६

# आपल्या कल्पक शिलेदाराच्या ग्रंथालयाची पाद्री व न्हावी यांनी केलेली विलक्षण व मजेशीर तपासणी

दुसरे दिवशी सकाळी सरदारजी निद्राधीन असतानाच पाद्री न्हाव्यासह तेथे गेले या सर्व अनर्थांचे मूळ असणारी पुस्तके क्विक्झोट यांनी ज्या खोलीत ठेवली होती, तिची किल्ली त्यांनी त्यांच्या पुतणीला मागितली. तिने चटकन् संमती दिली. सारेजण आत गेले–घरधनीणसुद्धा. तेथे त्यांना चांगल्या बांधणीचे शंभराहून मोठमोठे ग्रंथ आणि असंख्य लहान लहान पुस्तके आढळली. ती सारी पुस्तके दृष्टीस पडताच घर-धनीण त्या खोलीतून बाहेर पडली आणि पवित्र जल घेऊन तत्काळ परत आली व किंचाळली. " पाद्रीमहाराज, घ्या हे पाणी आणि या कोनाकोपऱ्यात ते शिंपडा, नाही तर या पुस्तकात भरून राहिलेल्या असंख्य जादूगारांपैकी एखादा या खोलीत लपून राहील आणि आपल्यावर जादू करील. कारण, त्याच्याविषयी आपल्या मनात वैरभाव असल्याने या जगातून आपण त्यांना हद्दपार करणार आहो. " त्या म्हातारीच्या भोळेपणाकडे पाहून पाद्रीबुवांना हसल्याविना राहावेना. एकेक पुस्तक काढून देण्यास त्यांनी न्हाव्याला सांगितले. तसे झाले म्हणजे ते प्रत्येक पुस्तकाचे नाव वाचणार होते. कोणी सांगावे, त्या पुस्तकांच्या राशीमध्ये काही पुस्तके अशीच सापडतील की जी अग्निनारायणाला सम-र्पण करण्याजोगी नसतील, असे त्यांना वाटले. पण पुतणी ओरडली, " छेः, छेः एकही पुस्तक शिल्लक ठेवू नका. त्या सर्वांनी माझ्या काकांचे डोके बिघडविण्यास या ना त्य प्रकारे हातभार लावला आहे. मला तर असे वाटते की, आपण ही सारी पुस्तके घेऊन खिडकीतून अंगणात फेकून द्यावीत आणि तेथे त्यांचा ढीग करून त्याला आग लावावी. किंवा ती सारी पुस्तके मागच्या परसात न्यावीत आणि त्यांची रास रचून ती ' अग्नये स्वाहा ' करावीत म्हणजे त्यांच्या धुराने कोणाला त्रास होणार नाही. " घरधनिणीला तिचे हे म्हणणे पटले. त्या बिचाऱ्या निष्पाप ग्रंथांचा संहार करण्यास त्या दोघीजणी अत्यंत आतुर झालेल्या होत्या. पण अशा अव्यवस्थित मार्गाने जाण्यास पाद्रीबुवा तयार नव्हते. प्रत्येक पुस्तकाचे निदान नावाचे पान वाचण्याचा आग्रह त्यांनी धरला.

श्री. निकोलस याने त्यांच्या हातात जे पहिले पुस्तक ठेवले, ते म्हणजे चार खंडांचे ' अमॅडिस डी गॉल.' ते पुस्तक पाहताक्षणीच पाद्री म्हणाला, " हे पुस्तक प्रथमच काढण्यात आले, यामध्ये काही रहस्य असावे, असे दिसते. कारण स्पेनमध्ये शिलेदारीवर प्रसिद्ध

होणारे हे पहिलेच पुस्तक होय आणि इतर पुस्तकांचा तो आदर्श आहे, असे मी ऐकले आहे. म्हणून माझे मत असे आहे की, इतक्या हानिकारक पंथाचा पहिला गुरु व निर्माता म्हणून हे पुस्तक काही गय न करता अग्निसात् केले पाहिजे." तेव्हा न्हावी म्हणाला, "या लेखकाची शिक्षा तहकूब करावी अशी मी विनंती करतो. कारण, अशा प्रकारे लिहिलेले हे सर्वोत्कृष्ट पुस्तक आहे असे मला सांगण्यात आले आहे. म्हणून, अशा प्रकारच्या पुस्तकांपैकी एकमेव उत्तम पुस्तक म्हणून त्याला माफी मिळावी असे मला वाटते." पाद्र्याने उत्तर दिले, "ठीक तर, या वेळेपुरती त्याला माफी देऊ. त्याच्या शेजारीच असलेले दुसरे पुस्तक आपण पाहू या." न्हावी म्हणाला, "अमॅडिस डी गॉल याच्या औरस पुत्राचे—एस्प्लॅन्डियनचे पराक्रम या पुस्तकात वर्णिलेले आहेत." तेव्हा पाद्रीबुवा म्हणाले, "खरोखर, बापाच्या चांगुलपणामुळे त्याच्या मुलातील वाईट-पणा क्षम्य ठरत नाही. अहो बाई, ती खिडकी उघडा आणि हे पुस्तक अंगणात फेकून द्या. आपण लवकरच जी रास पेटविणार आहोत तिचा पाया या पुस्तकाला घालू दे." घरधनीण ही आज्ञा पाळण्यात मागे नव्हती. 'डॉन एस्प्लँडीयन' हे पुस्तक सरळ अंगणात भिरकावण्यात आले व आपल्या अग्नि-परीक्षेची वाट पाहात शांतपणे पडून राहिले.

"दुसरे पुस्तक" पाद्री ओरडला. न्हावी म्हणाला, "हे 'अमॅडिस ऑफ ग्रीस' पुस्तक आहे. या बाजूला असलेली सारी पुस्तके याच जातीची आहेत, असे मला वाटते." पाद्री उत्तरले, "तर मग ती सारीच पुस्तके बांधून अंगणात टाकून द्यावीत. 'अमॅडिस ऑफ गॉल' या पुस्तकातील भयंकर झुंझार राणी पिंटिक्विनेस्ट्रा व पाद्री डॅरिनेल आणि त्याची ग्राम-गीते, तसेच त्या लेखकाने दिलेली दुर्बोध व गोंधळ उत्पन्न करणारी भाषणे, या सर्वांची होळी करण्याचे सुख गमावण्यापेक्षा माझा बाप शिलेदाराचा वेष करून आला तर त्यालादेखील मी त्या पुस्तकाबरोबर जाळून टाकीन." न्हावी म्हणाला, "माझे मत असेच आहे." पुतणी म्हणाली, "माझेही तेच." बाई म्हणाली, "ती पुस्तके माझ्याजवळ द्या. मी ती अंगणात नेऊन टाकीन." त्याप्रमाणे ती पुस्तके तिला काढून देण्यात आली. ती पुष्कळ होती. ती सर्व जिन्यावरून खाली नेण्याचे आपले श्रम वाचवावेत म्हणून तिने ती सारी खिडकीतून भिरकावून दिली.

पुढील गठ्ठा पाहून पाद्रीबुवा ओरडले, "केवढा प्रचंड हा ग्रंथकार!" न्हाव्याने उत्तर दिले, "ऑलीव्हँटे डी लॉरा. याच ग्रंथकाराने 'पुष्पोद्यान' हे पुस्तक लिहिले आहे. तुमची गंमत करावी म्हणून मी सांगतो की, या दोन पुस्तकांपैकी कोणत्या पुस्तकामध्ये अधिक सत्य आहे—खरे बोलावयाचे म्हणजे, कमी सत्य आहे,—हे मी सांगू शकत नाही. हा ग्रंथकार मठ्ठ डोक्याचा व उर्मट आहे. तो मागच्या बाजूस फेकून दिला पाहिजे, पुढील पुस्तक 'फ्लॉरिस्मार्टे ऑफ हिरकेनिया' हे आहे." पाद्री म्हणाला, "काय? फ्लॉरिस्मार्टे येथे आहे? त्याचा जन्म आश्चर्यकारक आहे आणि त्याचे पराक्रम विश्वास न ठेवण्यासारखे आहेत. तरीसुद्धा इतरांबरोबर याचीही रवानगी अंगणाकडे

झाली पाहिजे. त्याची भाषाशैली खडबडीत, कंटाळवाणी आणि मिळमिळीत आहे. त्यामुळे त्या पुस्तकाचा याहून चांगला उपयोग दुसरा नाही. म्हणून बाई, या, हे पुस्तक अंगणात फेकून द्या–अन् तसेच हे दुसरेही. " बाई म्हणाली. " अगदी मनापासून मी हे काम करीन. " आणि बोलल्याप्रमाणे तिने केले.

नापित म्हणाला, " ' डॉन प्लॅटिर ' हे थोर पुस्तक येथे आहे. " पाद्रीबुवा उत्तरले, " हे जुने पुस्तक आहे. त्यामध्ये आपल्या दयेला पात्र होण्यासारखी एक ओळही नाही. एक शब्द न काढता ते फेकून द्या. " अन् त्याप्रमाणे ते पुस्तक खाली गेले.

दुसरे पुस्तक उघडण्यात आले; ते होते ' नाईट ऑफ दी क्रॉस. ' त्याकडे पाहून पाद्री म्हणाला, " या पवित्र नावाने पुस्तकाचा वाईटपणा थोडाबहुत झाकला जाईल. पण म्हण आहे ना ? ' प्रभूच्या पाठीशी सैतान दडतो. ' जाऊ द्या हे पुस्तक अग्नीच्या ज्वालांमध्ये..."

नंतर नापिताने दुसरे पुस्तक खाली घेतले आणि तो ओरडला, " हा पहा ' शिलेदारीचा आदर्श. " पाद्री म्हणाला, " वाः ! त्याचा लेखक मला माहीत आहे. या पुस्तकात तुम्हाला मॉंटालबानचा लॉर्ड रिनाल्डो आणि त्याचे सगे–सोबती आढळतील. ते सारेजण कॅकसहून मोठे चोर होते. तसेच फ्रान्सचे बारा सरदार आणि प्रामाणिक इतिहासकार टर्पिन हेही तुम्हाला या पुस्तकात सापडतील. खरोखर, मी हे सांगितले पाहिजे की, या सर्वांना कायमचे हद्दपार करावे असेच माझे मत आहे. बोयार्डोचा सुप्रसिद्ध शोध त्यांच्या कथेत थोडाफार आला आहे. त्या शोधातून ख्रिस्ती कवी अरिओस्टो याने आपले कल्पनाजाल विणले आहे. तरीही, या दुष्ट लोकांच्या संगती-मध्ये तो जर मला भेटला आणि स्वभाषेशिवाय इतर भाषेतून बोलू लागला तर मी त्याला दयामाया मुळीच दाखविणार नाही. पण जर तो स्वतःच्या मातृभाषेतून बोलू लागला, तर मात्र मी त्याच्याशी अत्यंत आदराने वागेन. "

नापित म्हणाला, " इटालीयन भाषेत तो जवळचा वाटतो. पण मला तो कळत नाही. " पाद्री उत्तरला, " तुला तो कळतो की नाही हा महत्त्वाचा प्रश्न नाही. त्याला स्पॅनिश भाषेत बोलावयास लावण्यासाठी भाषांतराचे परिश्रम ज्या सुभेदाराने केले, त्याला मी राजीखुशीने क्षमा करीन. कारण त्याचे मूळचे पुष्कळसे सौंदर्य त्याने घालविले आहे. कवितांचे भाषांतर करण्याचा आव जे आणतात त्यांच्या कपाळी हे दुर्दैव लिहिलेले असते. कारण मूळ पुस्तकामध्ये जे सौंदर्य व जी प्रतिभा विलसत असते ती शाबूत ठेवणे, भाषांतरकाराने कितीही बुद्धी चालविली व परिश्रम केले तरी शक्य होत नाही. म्हणून केवळ हेच पुस्तक नव्हे तर फ्रान्समधील घडामोडींचे वर्णन करणारी सारी पुस्तके कोठल्या तरी कोरड्या जागेत नेऊन ठेवावीत. आणि मग आपण त्यांचे काय करावयाचे, याचा निर्णय पोक्तपणे करावा, असे माझे मत आहे. तरीसुद्धा ' बर्नार्डो डेल कार्पियो ' व ' रॉन्सेसव्हॅले ' या पुस्तकांचा अपवाद करण्याची परवानगी मला द्या. ही पुस्तके या

बाकीच्या पुस्तकांत असतील, इतर पुस्तकांबरोबर ही दोन पुस्तकेही मी बाईच्या हाती देईन, आणि ती त्यांना आगीत फेकून देईल. ”

यातील प्रत्येक तपशिलाला न्हाव्याने संमती दिली. कारण त्याला हे माहीत होते की, साऱ्या जगाचे राज्य मिळत असेल तरी, खोटे न बोलण्याइतका पाद्री सत्यनिष्ठ व सज्जन असा ख्रिश्चन आहे. नंतर त्याने दुसरा ग्रंथ उघडला. तेव्हा त्याला ‘ पामेरिन डी ऑलिव्हा ’ हे नाव दिसले आणि त्याच्या जवळच्या ग्रंथाचे नाव होते, ‘ पामेरिन ऑफ इंग्लंड. ’ ते पाहून पाद्रीबुवा ओरडले, “ अरे, सापडलास का तू ? घे हा ऑलिव्हा, त्याच्या चिंध्या चिंध्या कर आणि त्या जाळून खाक कर नि त्याची राख हवेत विखरून दे. पण ‘ पामेरिन ऑफ इंग्लंड ’ हे पुस्तक प्राचीन वाङ्मयाचा विशेष महत्त्वाचा अव-शेष म्हणून जतन करून ठेवले पाहिजे आणि त्यासाठी एक मौल्यवान पेटी बनविली पाहिजे. डेरिसवरील विजयाच्या लुटीत शिकंदराला जी पेटी सापडली, ती त्याने होमरचे ग्रंथ ठेवण्यासाठी वापरली. तसे आपण केले पाहिजे. कारण मित्रा, मी तुला सांगतो की, हे पुस्तक दोन कारणांसाठी विशेष आदरणीय आहे. पहिले कारण म्हणजे ते स्वतः अत्युत्तम आहे. आणि दुसरे म्हणजे, त्याचा लेखक हा पोर्तुगालचा विद्वान राजा होता, असे म्हणतात. मिरागार्डा येथील किल्ल्यामधील सारी वीरकृत्ये या पुस्तकात कलात्मक रीतीने व सुंदरपणे मांडलेली आहेत, त्यातील संवाद अत्यंत स्पष्ट व दरबारी थाटाचे आहेत आणि पात्रांचे स्वभाव सारख्याच चातुर्याने, औचित्याने नि न्यायबुद्धीने चितारलेले आहेत. म्हणून, निकोलसमहाशय, आपल्या उपदेशानुसार, हे पुस्तक आणि ‘ अमॅडिस डी गॉल ’ हे पुस्तक दोन्हींना अग्निसात केले जाणार नाही. बाकीची सारी पुस्तके, अधिक चौकशी किंवा छाननी न करता, ‘ अग्नये स्वाहा ’ करू या. ”

यावर न्हावीदादा म्हणाले, “ माझ्या हातात असलेले हे पुस्तक वाचवावे म्हणून मी आपली प्रार्थना करतो. हे पुस्तक म्हणजे सुप्रसिद्ध ‘ डॉन बेलियानिस.’ ” ते ऐकून पाद्रीबुवा गरजले, “ बरोबर, त्या पुस्तकाच्या दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या भागात इतका संताप साठवलेला आहे की, तो नाहीसा करण्यासाठी त्याला चित्रकमुळी उगाळून द्यावयास हवी. शिवाय, त्यांचे ‘ कॅसल ऑफ फेम ’ हे पुस्तक नामशेष केले पाहिजे. तसेच, दुसरी घाणेरडी पुस्तकेही टाकून दिली पाहिजेत म्हणजे बाकीच्या पुस्तकांना माफी मिळावी असे माझे मत आहे. जी पुस्तके सुधारली जाणे शक्य आहे, त्यांना दया दाखविली जावी किंवा न्याय दिला जावा. तसे होईपर्यंत मित्रा, ही पुस्तके तू आपल्या ताब्यात घे आणि आपल्या घरी सुरक्षित ठेव. पण त्यांच्याशी गुजगोष्टी करण्याची परवानगी कोणालाही देऊ नकोस.” तेव्हा न्हावी म्हणाला, “ खूष आहो आपण.” तशी आणखी पुस्तके पाहण्याची तसदी आपल्याला पडू नये म्हणून त्याने घरधनिणीला सुनावले, “ हे सारे मोठे ग्रंथ घे आणि अंगणात फेकून दे. ” हे त्याचे शब्द कोणा मठ्ठ किंवा बहिऱ्या माणसाच्या कानावर पडले नाहीत, तर तलम व मोठी जाळी विणण्यापेक्षा ग्रंथदहनाची जिला अधिक निकड होती, अशा त्या बाईने ते शब्द ऐकले. म्हणून एकदम आठ ग्रंथ

तिने उचलले आणि त्यांच्या वधस्थानाकडे तत्काल फेकून दिले. पण, ती आपले हे सत्कृत्य इतक्या उत्सुकतेने करू लागली की, सहज उचलता येतील त्यापेक्षा अधिक पुस्तके तिने आपल्या हाती घेतली आणि त्यांपैकी एक त्या न्हाव्याच्या पायाजवळ पडले. ते कसले आहे, या जिज्ञासेने त्याने ते उचलले. तेव्हा त्याला आढळले, ' सुविख्यात धवलकीर्ती शिलेदार टिरांट यांचा इतिहास ' ते पुस्तक पाहून पाद्रीबुवा चीत्कारले, " वाः काय भाग्याचा हा दिवस ! ' धवल-कीर्त टिरांट ' येथे आहे काय ? भल्या दोस्ता, कसेही करून हा ग्रंथ मला दे, अशी माझी प्रार्थना आहे; कारण, त्यामध्ये आनंदाचा ठेवा आणि मनोरंजनाची खाण सापडेल, असे मी माझ्या मनाला वचन देतो. त्या ग्रंथात आपल्याला मॉंटलबॅनचा पराक्रमी शिलेदार डॉन कीरीइलेसन् आणि त्याचा भाऊ मॉंटलबॅनचा थॉमस नि शिलेदार फोन्सेका हे सारे सापडतील. तसेच त्यात शूर–वीर डेट्रिंट व अलॅनो याचा संग्राम; प्लेझेरडेमीव्हिडा या युवतीचे सुंदर व चतुर आलाप, रेपोसाडा या विधवेची चोरटी प्रेम–प्रकरणे आणि आपला कुल–गुरु हिप्पोलिटो यांच्या प्रेमपाशात पडलेली महाराणी या सर्वांची भेट होईल. मित्रा, या पुस्तकाहून अधिक चांगले पुस्तक या विषयावर अलभ दुनियेत नाही, असे मी प्रतिज्ञापूर्वक सांगतो. अरे, ते शिलेदार काय खात असत, काय पीत असत, आपल्या शय्येवर कसे झोपत असत आणि नैसर्गिक रीत्या मृत्यू पावत असत, आपली मृत्युपत्रे करीत असत–अशा नानाविध बारीकसारीक गोष्टी या पुस्तकात दिलेल्या आहेत. अशा प्रकारच्या पुस्तकांमध्ये त्याविषयी एक अक्षर लिहिलेले नसते; तथापि मी हे तुला सांगतो की, अशा मूर्खपणाच्या गोष्टी लिहिण्याचे श्रम मुद्दाम करणाऱ्या या थोर ग्रंथकाराला सर्व आयुष्यभर एखाद्या जहाजावर अज्ञातवासात ठेवले पाहिजे. हे पुस्तक तू घरी घेऊन जा आणि वाच. आणि मग मी तुला सत्य तेच सांगितले की नाही, हे मला सांग. "

तेव्हा न्हावी उत्तरला, " माझा आपल्यावर विश्वास आहे, पण उरलेल्या या छोट्या छोट्या पुस्तकांचे आपण काय करावयाचे ? " पाद्रीबुवांनी उत्तर दिले, " खरेच ! ही पुस्तके फारच छोटी आहेत. ती शिलेदारीची असणार नाहीत– काव्याची आहेत असे तुला आढळून येईल. " नंतर एक पुस्तक त्याने उघडले. ते मॉंटेमेयरचे ' डायना ' होते. ( तशीच बाकीची पुस्तके असतील असे वाटून ) पाद्री म्हणाला, " इतर पुस्तकांप्रमाणे यांना शिक्षा करणे योग्य होणार नाही. शिलेदारीच्या कथांनी केले तसे नुकसान यांनी केलेले नाही आणि ती करू शकणार नाहीत. ही पुस्तके सर्वसाधारणपणे साधी-सुधी असतात. ती कोणाला अपाय करीत नाहीत. " पण पुतणी किंचाळली, " अहो पाद्रीबुवा, बाकीच्या पुस्तकांबरोबर तीही जाळून टाका, अशी माझी विनंती आहे. शिलेदारीच्या वेडातून माझे काका बरे झाले आणि ही पुस्तके वाचू लागले म्हणजे ते गुराखी बनतील आणि रानावनातून खूप भटकू लागतील, एवढेच नव्हे तर, त्याहून वाईट गोष्ट म्हणजे, ते कवी बनतील. कवित्व हा संसर्गजन्य व असाध्य रोग आहे, असे म्हणतात. "

यावर पाद्री म्हणाला, " या सभ्य स्त्रीचे म्हणणे बरोबर आहे. आपल्या मित्राच्या वाटेतून आपण ही धोंड बाजूस सारली तर चुकीचे होणार नाही. मॉन्टेमेयरचे 'डाएना' या पुस्तकापासून आपण सुरुवात केली आहे, म्हणून आपण त्याचे दहन न करता, केवळ जादूगार फेलिसिया आणि जादूने मंतरलेले पाणी, तशाच प्रदीर्घ कविता– यांच्यासंबंधीचा पुस्तकातील भाग तेवढाच काढून घ्यावा आणि जाळून टाकावा. नंतर, त्या पुस्तकातील सारा गद्य भाग सुरक्षित ठेवावा. तसे नशीब लाभण्याचा पहिला मान त्या पुस्तकाला मिळेल. "

" हे पाहा, दुसरे 'डाएना' नावाचे पुस्तक. ( सॅलामँका येथील ) सालमांटिनो याने ते लिहिलेले आहे आणि तसेच हे तिसरेही पुस्तक—गिल् पोलो याने लिहिलेले. " पाद्री म्हणाला, " सालमांटिनोचे पुस्तक अंगणातील अपराधी पुस्तकांच्या राशीत जाऊन पडो. पण जिल पोलो याने लिहिलेले पुस्तक, जणू खुद्द अपोलोनेच लिहिले आहे असे समजून काळजीपूर्वक जतन कर, अशी माझी विनंती आहे. मित्रा, शक्य तितकी जल्दी कर, कारण आता उशीर झाला आहे. " न्हावी म्हणाला, " हे पाहा, 'प्रणयाच्या दैवाबद्दल दश–ग्रंथ' या नावाचे पुस्तक– सार्डिनियाचा कवी अँथनी डी लोफ्रासो याने लिहिलेले. "

पाद्रीबुवा ते नाव ऐकून ओरडले, " माझ्या पवित्र पेशाशपथ, अपोलो म्हणजे अपोलो, प्रतिभा म्हणजे प्रतिभा, आणि कवी म्हणजे कवी हे तर खरेच, पण, हे पुस्तक म्हणजे 'या सम हे' असे मी शपथपूर्वक सांगतो. याहून अधिक विनोदी, अधिक स्वच्छंदी पुस्तक दुसरे असेल असे मला वाटत नाही. अशा प्रकारची जी पुस्तके मी पाहिली आहेत, त्या सर्वांमध्ये हे पुस्तक सर्वोत्तम आहे — अद्वितीय आहे. ते ज्याने वाचले नसेल, त्याने खुशाल समजावे की, आपण आपल्या आयुष्यात आनंदप्रद असे काहीच वाचले नाही. दोस्ता, दे ते मला. कारण, फ्लॉरेन्सच्या उत्तम लोकरीचा झगा कोणी मला दिला असता, तर मला जितका आनंद वाटला असता, त्यापेक्षा अधिक आनंद हे पुस्तक सापडल्यामुळे मला झालेला आहे. " असे म्हणून, त्याने परम संतोषाने ते पुस्तक बाजूस ठेवले. नापिताचे काम चालूच होते. तो म्हणाला, " ही पाहा पुस्तके— 'इबेरियाचा गुराखी', 'इनेरेसच्या अप्सरा', 'मत्सरावरील उपाय' ".

अधीर झालेल्या पाद्र्याने म्हटले, " बस्स करा पहारेकरी, फेकून द्या ती पुस्तके. त्याचे कारण मला विचारू नका. नाही तर आपले काम कधीच पुरे होणार नाही. " न्हावी म्हणाला, " पुढचे पुस्तक 'फिलिडाचा गुराखी' हे आहे " पाद्री उत्तरला, "तो गुराखी नाही—अत्यंत चतुर मुत्सद्दी आहे. मूल्यवान रत्नाप्रमाणे त्याला सांभाळा." न्हावी म्हणाला, " त्याहून लठ्ठ हे पुस्तक आहे. 'विविध–काव्य–भांडार' हे त्याचे नाव. " पाद्री म्हणाला, " त्यात कविता थोड्या असत्या तर त्यांचे कौतुक अधिक झाले असते, इतर कवितांची शोभा कमी करणाऱ्या पुष्कळ क्षुद्र कविता काढून पुस्तकात काटछाट केल्यास हे पुस्तक चांगले होईल. तरीही हे पुस्तक ठेवा. कारण त्याचा लेखक माझा

मित्र आहे आणि त्याने उच्च दर्जाची वीरश्रीप्रधान दुसरी पुस्तके लिहिली आहेत."

न्हावी म्हणाला, "लोपेझ माल्डोनाडो याच्या गीतांचे हे पाहा पुस्तक." पाद्री उद्गारला, "तो तर माझा खास दोस्त. त्यातील कविता तो जेव्हां स्वतः वाचतो, तेव्हा लोकांना त्या फार आवडतात. त्याचा आवाज अत्यंत मधुर आहे. त्यामुळे त्याच्या काव्य-गायनाने लोक मोहित होतात. त्याची ग्रामगीते फार लांबलचक आहेत. पण चांगल्याचा कधी अतिरेक होतो काय ? एक उत्तम पुस्तक म्हणून आपण ते जतन करू या. पुढचे पुस्तक कोणते ?" न्हाव्याने उत्तर दिले, "सर्व्हेंटिसचा मिगेल याचे 'गॅलाटी' हे पुस्तक." ते नाव ऐकताच पाद्रीबुवा उद्गारले, "हा सर्व्हेंटिस अलीकडे पुष्कळ वर्षे माझा जिवलग मित्र झाला आहे. काव्यापेक्षा दुर्दैवाची संगत त्याला अधिक लाभली आहे. खरोखर, त्याच्या पुस्तकाची योजना चांगली आहे. ती कोणाला कशी वाटेल हे मला सांगता येत नाही. त्याच्या मनात काही ध्येय आहे. पण त्याच्या लेखनाची परिणति शून्यात होते. म्हणून, त्याने आश्वासन दिलेल्या दुसऱ्या भागाची वाट आपण पाहिली पाहिजे. कदाचित त्या भागात तो पूर्वीच्या उणिवांची भरपाई करील आणि मग आपण आज करीत नाही ती पूर्ण क्षमा त्याला करू. तोपर्यंत तू आपल्या घरी त्याला पक्का बंदिवान करून ठेव." न्हावी म्हणाला, "तसे मी करीन. पण ही पाहा आणखी तीन पुस्तके—'एर्सिलाचा डॉन अलोन्सो' याचे 'अरॉकना', कॉर्डोव्हाचा न्यायाधीश जुआन रूफो याचे 'ऑस्ट्रियाडा' आणि व्हॅलेंटाचा कवी, व्हिवेंसचा ख्रिस्तोव्हल याचे 'मॉन्सेरॅटो' ही ती तीन पुस्तके." पाद्री म्हणाला, "स्पॅनिश भाषेतील हे उत्तम पोवाडे आहेत आणि इटालीतील गाजलेल्या पोवाड्यांची बरोबरी ते करतील. काव्याच्या बाबतीत स्पेनने ज्यांचा गौरव करावा, अशा या अत्यंत मोलाच्या कृती जपून ठेवा."

शेवटी, त्या साऱ्या पुस्तकांची छाननी करता करता, पाद्रीबुवा इतके दमून गेले की, बाकीची सारी पुस्तके जाळून टाकण्याचे धाडस करा, असा आदेश त्यांनी दिला. पण ही भयंकर शिक्षा अमलात येण्यापूर्वी न्हाव्याने एक पुस्तक सहज उघडले व ते त्याला दाखविले, ते 'अँजेलिकाचे अश्रू' या नावाचे होते. ते पाहून पाद्री म्हणाला, "इतर पुस्तकाबरोबर यालाही जाळण्याची शिक्षा देण्यास मी कारण झालो असतो तर मी रडत बसलो असतो. याचा कर्ता केवळ स्पेनमधील नव्हे, तर अखिल जगतातील एक उत्तम कवी होता. त्याने ओव्हिडच्या काही दंतकथांचे अत्यंत यशस्वी रीतीने भाषांतर केलेले आहे."

□ □

## प्रकरण ७

# साहसाच्या शोधार्थ डॉन क्विक्झोट यांची दुसरी मोहीम

त्या मित्रांचे हे कार्य चालू असताना डॉन क्विक्झोट उत्साहाच्या भरात स्वतःशीच मोठमोठ्याने बोलू लागले, "शूर वीरांनो, तुम्ही आपल्या प्रचंड शस्त्रांचे सामर्थ्य दाखविण्याची वेळ हीच आहे. कारण युद्धाचे श्रेष्ठत्व तुम्हीच रक्षिले पाहिजे." ही आश्चर्यकारक आरोळी ऐकून त्यांचे मित्र ग्रंथालयाची अधिक तपासणी न करता त्यांच्याकडे धावत गेले. घरधनीण व पुतणी या तेथेच विचार करीत बसल्या. अव्हिलाचा डॉन लुई याने वर्णिलेल्या सम्राटाच्या वीरकथांची दोन पुस्तके–' कॅरोलिया ' व ' लिअन ऑफ स्पेन ' त्या ग्रंथ-संग्रहात होती. विधिवत् तपासणी न होता ती पुस्तके होळीत टाकण्यात आली. हे कोणी पाहिले नाही की ऐकले नाही. त्यांच्या बाजूने जे सांगण्यासारखे होते ते पाद्रीबुवानी ऐकले असते तर त्या पुस्तकांचा विनाश कदाचित् टळला असता.

जेव्हा ते मित्र डॉन क्विक्झोट यांच्या खोलीत आले, तेव्हां त्याना ते अथरुणातून उठून बसलेले दिसले. क्विक्झोट पूर्वीसारखेच वेडे आहेत–आपला गळा ओरबडीत आहेत–जोराने धावाधाव करीत आहेत–आपल्या तलवारीचे हात पुढेमागे करीत सताड जागे आहेत–जणू काही ते कधी झोपलेच नाहीत असे त्यांना दिसले. ते मित्र त्यांच्यावर धावून गेले, त्यांनी आपल्या मिठीत त्यांना घेतले आणि बळजोरीने त्यांना बिछान्यावर निजविले. तेथे ते काहीसे स्थिर व शांत झाल्यावर, पाद्रीबुवाकडे वळून शिलेदार म्हणाले, "खरोखर, टर्पिनचे धर्मोपदेशकमहाराज, गेले तीन दिवस आम्ही बारा शिलेदारांनी जो संग्राम चालविला, त्याचा लौकिक, काही प्रतिकार न करता, दरबारी सरदारांनीं चालविला. हे कृत्य सहन करणे, आम्हा बारा उमरावांना लांच्छनास्पद आहे." पाद्रीबुवांनी उत्तर दिले, "भल्या दोस्ता, शांत हो. दैवाने तुमच्यासाठी यापुढे मोठ्या यशाचे ताट वाढून ठेवलेले असेल. आज ज्यांची हार होते, त्यांची उद्या जीत होण्याचा संभव असतो. सध्या तुम्ही आपल्या प्रकृतीचा विचार करा. तुम्ही फार जखमी झालेले नसला तरी आता अत्यंत थकलेले आहात यात संशय नाही." डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, "जखमी मुळीच नाही. पण सर्वांग ओरखडले आहे, हे मी नाकारीत नाही. केवळ द्वेष–बुद्धीने डॉन ओर्लॅंडो या हलकट शिलेदाराने ओक वृक्षाच्या फांदीने माझे सारे अवयव झोडपून काढले. कारण त्याला माहीत आहे की, त्याच्या शौर्याची बरोबरी मीच एकटा करू शकतो. मॉंटलबॅनचा

रिनाल्डो असे मला कोणी म्हणू नये. त्याने कितीही जादू केली तरी रुग्णशय्येवरून उठताच मी त्याचा सूड घेईन. म्हणून, माझे जेवण आणा. यावेळी मला फार भूक लागली आहे. नंतर त्याच्या अपराधाचा सूड घेण्यास मला मोकळे सोडा." त्याप्रमाणे मित्रांनी काही खाद्य पदार्थ आणून त्यांना दिले. ते खाल्ल्यावर क्विक्झोट पुन्हा झोपी गेले. त्यांचे विलक्षण वेडेचार पाहून मित्र अत्यंत चकित झाले आणि त्यांना तेथे सोडून ते निघून गेले.

त्या रात्री घरधनिणीने सारी पुस्तके जाळून टाकली. केवळ अंगणातील नव्हे; तर घरात होती तीही सारी. त्यांतील कित्येक पुस्तके शाश्वत संग्रहात जपून ठेवण्यासारखी होती. पण त्या सार्वजनिक होळीमध्ये ती भस्मसात् झाली. त्यांचे दैव आणि तपासनिसांचा निष्काळजीपणा यामुळे तो अनर्थ घडला. नाही तर ती पुस्तके वांचली असती. "वाईटामुळे पुष्कळ वेळा चांगल्याला वाईटपणा सोसावा लागतो" ही म्हण त्यांनी सिद्ध केली.

पाद्री व न्हावी यांनी आपल्या मित्राची प्रकृती सुधारावी म्हणून जे नाना उपाय योजले, त्यांपैकी एक म्हणजे त्या मित्राची पुस्तके जेथे पडली होती त्या खोलीचे दार बंद करणे. आपला मित्र जेव्हा दुखण्यातून उठेल, तेव्हा त्याला त्या खोलीत जाता येणार नाही आणि त्या पुस्तकांची आठवण होणार नाही, अशी त्यांची अटकळ. त्यांना आशा ही की, कारण दूर झाले की कार्य थांबेल. म्हणून, त्यांनी सर्वांना सांगितले, क्विक्झोट यानी चौकशी केली तर त्याला सांगा, कोणा एका जादूगाराने तुमची पुस्तके, अभ्यासिका आणि सारे काही पळवून नेले आहे.

दोन दिवसांनी, डॉन क्विक्झोट बरे होताच, त्यांनी पहिली गोष्ट ही केली की, आपल्या लाडक्या पुस्तकांची भेट घेण्यास ते गेले. त्यानी जेथे आपली अभ्यासिका थाटली होती, तेथे ती त्याना आढळली नाही. ते खाली-वर गेले, प्रत्येक खोलीत पाहू लागले. काही वेळा, जेथे दरवाजा होता, तेथे ते गेले आणि बराच वेळ चाचपडत शोधीत राहिले. प्रत्येक दिशेला त्यांनी नजर टाकली आणि टक लावून पाहिले. काही न बोलता ते शोध करीत होते. पुष्कळ वेळ विचार करून, शेवटी त्याना वाटले, आपल्या अभ्यासिकेचा रस्ता कोणता, हे घरधनिणीला विचारणे बरे. आपल्याला मिळालेल्या सूचनेप्रमाणे ती म्हातारी म्हणाली, "कोणती अभ्यासिका? तुम्ही कशाचा शोध करीत आहा? अरेरे! सैतानाने अभ्यासिका आणि या घरातील सारे ग्रंथ केव्हाच पळवून नेले; आता येथे काही नाही." पुतणी म्हणाली, "छेः! तो सैतान नव्हता—एक जादूगार होता, मांत्रिक होता. लोक त्याला तसे म्हणत. काका, तुम्ही येथून गेल्यानंतर तो जादूगार एके रात्री ढगावरील सापावर बसून येथे आला आणि खाली उतरून तुमच्या अभ्यासिकेत गेला. तेथे त्याने काय केले हे तो व सैतान—हेच सांगू शकतील. कारण थोड्या वेळाने तो या घरातून उडून गेला आणि त्याचेमागे धुराचे लोट उठले. नंतर, त्याने काय केले हे पाहण्यासाठी आम्ही तिकडे गेलो. तर आम्हाला ते ग्रंथ दिसेनात, फार काय, ती

अभ्यासिकाही दृष्टीस पडेना. फक्त मला व घरधनिणीला हे पक्के आठवते की, जेव्हा तो म्हातारा चोर पळून गेला, तेव्हा तो मोठ्याने ओरडला, " या ग्रंथांच्या मालकाबद्दल माझ्या मनात जो खाजगी द्वेष आहे, त्यामुळे मी या घराची नासधूस केली आहे. ती तुम्ही लवकरच पाहा. माझे नाव साधु मुनिएटन."

तो सारा वृत्तांत ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, " मुनिएटन नव्हे – तू फरेस्टन म्हणावयास हवे होते." तेव्हा पुतणी मान डोलावून म्हणाली, " बरोबर आहे. त्याचे नाव फरेस्टन की फ्रिस्टन हे नाही मला सांगता येणार, पण त्याच्या नावाच्या अंती, ' टन ' आहे, याची मला खात्री आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, " बरोबर आहे. मृताशी संवाद करणारा म्हणून तो प्रसिद्ध आहे. तो माझा कट्टा वैरी आहे. माझ्याविषयी त्याला तीव्र मत्सर वाटतो. कारण त्याला आपल्या विद्येच्या बळावर हे समजले आहे की, त्याने कितीही जादू केली तरी ज्याच्या कल्याणाचे कंकण त्याने बांधले आहे अशा सरदाराशी मी काही काळाने लढा देईन आणि एकाच चकमकीत त्याला जिंकेन. यामुळेच तो माझ्या नाना तऱ्हेच्या खोड्या काढतो. पण मी त्याला बजावून सांगतो, अरे, तू प्रवाहाच्या उलट पोहत आहेस. तुझ्या शक्तीने दैवाचे फासे उलटे होणार नाहीत."

पुतणीने विचारले, " त्याबद्दल शंका कोण घेईल ? पण प्रिय काका, या कलहामध्ये तुम्ही उडी का घेता ? एखाद्या उनाड मुलाप्रमाणे इकडे तिकडे का भटकता ? गव्हाच्या रोटीपेक्षा मोठे पक्वान्न का शोधता ? पुष्कळ माणसे लोकर मिळविण्यास जातात पण स्वतःजवळ असलेली लोकर गमावून परत येतात, हा विचार तुमच्या डोक्यात एकदाही कसा येत नाही ? घरी शांतपणे व निवांतपणे राहणे, चांगले नव्हे काय ?"

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " बाळे, या गोष्टी तुला कळत कशा नाहीत ? तू पक्के समज की, माझ्या अंगावरची लोकर कोणी पळवून नेण्याच्या आधी, या माझ्या मिशाच्या एका केसालाही धक्का लावू पाहणाऱ्या साऱ्या उर्मट माणसांच्या दाढ्या मी कचाकच उपटून टाकीन आणि टराटर फाडून टाकीन." यावरून शिलेदारजी संतापले आहेत, असे पुतणीने व घरधनिणीने ओळखले आणि त्यांना काही उत्तर न देण्याचे ठरविले. पुरा पंधरवडा आपले शिलेदारजी घरी शांतपणे राहिले. पुन्हा आपली भ्रमंती सुरू करण्याची इच्छा त्यांनी अणुमात्र व्यक्त केली नाही. या काळात त्यांचा आपल्या दोन मित्रांशी– पाद्री व न्हावी यांच्याशी– पुष्कळच सुख-संवाद झाला. त्यात ते म्हणाले, " आज जगाला सर्वात अधिक गरज कशाची असेल तर शिलेदारांची. म्हणून त्या संस्थेचे पुनरुज्जीवन करण्याचा माझा निश्चय आहे." त्या सुख-संवादामध्ये पाद्रीबुवा कधी त्यांना विरोध करीत, तर कधी त्यांना मानतुकावीत. क्विक्झोट यांच्या कल्पना-तरंगाना अधून-मधून त्याने वाव दिला नसता, तर त्यांच्याशी संवाद झालाच नसता.

मध्यंतरीच्या काळात, डॉन क्विक्झोट यांनी आपल्या एका शेजाऱ्याला आपल्या-बरोबर मोहिमेवर येण्याची विनंती मोठ्या कळकळीने केली. हा शेजारी म्हणजे, गावातील

एक मजूर होता. तो चांगलाच प्रामाणिक होता. गरीब माणसाला आपण प्रामाणिक म्हणू शकलो तर तो गरीब होता, हे खरेच– पैशाने व बुद्धीनेही तो गरीब होता. त्याच्याशी आपले शिलेदारजी खूप वेळ बोलत राहिले, चांगली अभिवचने देत राहिले आणि त्यामुळे शेवटी, त्या बिचाऱ्या मूर्ख माणसाने त्यांच्याबरोबर जाण्याचे आणि त्यांचा शागीर्द होण्याचे मान्य केले. ते काम त्याने राजीखुशीने करावे, म्हणून डॉन क्विक्झोट यांनी त्याला असेही एक प्रलोभन दाखविले की, " गवताच्या दोन–चार काड्या गोळा करण्यास तुला जितका वेळ लागेल, तेवढ्यात एखादा साहसपूर्ण प्रसंग उद्‌भवेल आणि त्यामुळे मी एखादे बेट सहज जिंकून घेईन आणि त्याचा अधिपती तुला करीन. " या व अशा इतर पुष्कळ उदार अभिवचनांना भुलून, सँको पँझा ( त्या गरीब मजुराचे नाव ) आपली बायका–मुले सोडून, आपल्या शेजाऱ्याचा चाकर बनला.

हे झाल्यावर डॉन क्विक्झोट यांनी पैसा गोळा करण्याचा उद्योग आरंभिला. त्यासाठी त्यांनी आपले एक घर विकले, दुसरे गहाण टाकले–आणि त्या सर्वात नुकसान सोसून त्यांनी बरीचशी रक्कम उभी केली. त्यांनी एका मित्राकडून ढालही उसनी आणली आणि आपल्या शिरस्त्राणाचे मागचे–पुढचे भाग नीटनेटके केले. आपण केव्हा प्रयाण करणार त्या दिवसाची व तासाची सूचना त्यांनी आपल्या नोकरास दिली. त्यामुळे त्याला जरूर वाटणाऱ्या वस्तू तो आपल्याबरोबर घेईल अशी त्यांची अपेक्षा. सर्वात महत्त्वाचे म्हणजे, चामड्याचे एक पाकीट आणण्यास त्यांनी त्याला सांगितले. तसे करण्याचे सँकोने कबूल केले आणि म्हटले, " मी माझे गाढवही बरोबर घेतो. ते फार चांगले आहे. त्यामुळे मला फार आराम वाटेल, कारण, पायी प्रवास करण्याची मला सवय नाही. " गाढवाचा उल्लेख ऐकताच, शिलेदारजी थोडा वेळ थांबले आणि विचार करू लागले, गाढवावर बसणारा नोकर बाळगणाऱ्या एखाद्या सरदाराचे वर्णन आपण कधी कोठे वाचले आहे काय ? तसा पूर्वीचा एकही दाखला त्यांना आठवेना. तरीही त्यांनी शेवटी सँकोला आपले गाढव आणण्यास मुभा दिली. त्यांना अशी आशा वाटत होती की, आपल्याला जो कोणी शिरजोर शिलेदार प्रथम भेटेल, त्याला आपण घोड्यावरून खाली उतरवू आणि आपल्या नोकराला त्या घोड्यावर सन्मानाने बसवू. खानावळवाल्याच्या सूचनांप्रमाणे त्यांनी आपल्याबरोबर सदरे घेतले आणि सहज नेता येतील अशा गरजेच्या इतर पुष्कळ वस्तूही घेतल्या.

ही सारी पूर्वतयारी झाल्यावर, सँको पँझा आणि डॉन क्विक्झोट, एके रात्री गावातून गुपचुप बाहेर पडले. सँकोने आपल्या बायकोचा किंवा मुलांचा निरोप घेतला नाही आणि क्विक्झोटनी आपल्या घरधनिणीची किंवा पुतणीची दखल घेतली नाही. त्यांच्या प्रयाणाचा संशय कोणालाही आला नाही. आपला कोणी पाठलाग केला तरी आपण त्यांच्या आटोक्याबाहेर गेलो आहो असे त्यांना दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी वाटले, इतक्या वेगाने ते गावाबाहेर पडले. सँको पँझा, एखाद्या सेनानायकासारखा ऐटीने बाहेर पडला. त्याच्या पाठीवर कॅनव्हासची पडशी किंवा पिशवी लटकावली होती. चामड्याची

बुधलीही त्याने बरोबर घेतली होती. आपण बेटाचे अधिपती व्हावे, अशी त्याला प्रचंड इच्छा होती. तसे वचन त्याच्या धन्याने त्याला दिलेलेही होते.

डॉन क्विक्झोट पूर्वी ज्या रस्त्याने गेले होते, तोच रस्ता त्यांनी आता धरला. मॉंटीलच्या मैदानावरून आता ते पूर्वीपेक्षा सुखाने प्रवास करीत होते. त्याचे एक कारण म्हणजे आता सकाळचा उत्साह त्यांच्या अंगी भरला होता. यावेळी सूर्याचे किरण पृथ्वीच्या सपाटीवर बहुतेक समांतर असतात. मध्यान्हीप्रमाणे ते सरळ आदळत नाहीत आणि तापदायक होत नाहीत. ते दोघे दौडत चालले असताना, सँको आपल्या धन्याला म्हणाला, " महाराज, आपण मला बेट बहाल करण्याचे जे वचन दिले आहे, ते कृपा करून विसरू नका. ते फार मोठे नसले तरी त्याच्यावर राज्य करण्यासाठी मी तिकडे जाईन, असे खात्रीने सांगतो. "

डॉन क्विक्झोट उतरले, " मित्रा सँको, लक्षात ठेव की, प्राचीन काळी शिलेदार जी बेटे किंवा राज्य जिंकीत असत, त्यांचे आधिपत्य आपल्या नोकराला बहाल करण्याची त्यांची नेहमीची पद्धत असे. ती प्रशंसनीय रूढी कायम ठेवण्याचाच नव्हे, तर ती सुधारण्याचा आणि औदार्यात माझ्या पूर्वजांना मागे सारण्याचा माझा निश्चय आहे. काही काही वेळा–म्हणजे पुष्कळ वेळासुद्धा–इतर शिलेदार आपल्या नोकरांना बक्षीस देण्याचे लांबणीवर टाकीत. सेवा–चाकरी केल्यावर, तापदायक दिवस नि त्याहून तापदायक रात्री घालविल्यावर आणि म्हातारे झाल्यावर त्या नोकरांना ते शिलेदार, कौंट वगैरे एखादी पदवी देत, किंवा छोट्या–मोठ्या प्रांताचे किंवा दरीचे सुभेदार तरी करीत. आता तू आणि मी जिवंत राहिलो, तर असे कदाचित घडेल की, आपण दोघांनी मिळून सहा दिवस प्रवास करण्यापूर्वीच मी एखादे राज्य जिंकून घेईन आणि त्याच्या छत्राखाली जी दुसरी पुष्कळ राज्ये असतील तीही मी आपल्या ताब्यात घेईन. तुझ्या सुदैवाने हे सारे लौकरच घडून येईल. मी जिंकलेल्या राज्यापैकी एकाचा राजमुकुट मी तत्काळ तुझ्या शिरावर ठेवीन. ही काही मोठी अवघड गोष्ट आहे, अशी कल्पना तू करू नकोस. या शिलेदारीच्या व्यवसायात असे काही अकल्पित आणि विचित्र योगायोगा येतात आणि परिवर्तने इतक्या झपाट्याने घडतात की, मी तुला वचन दिले त्यापेक्षा किती तरी मोठा लाभ मी सहजासहजी तुला देईन.

सँको पँझा म्हणाला, " वाः ! असे जर घडून आले आणि आपण म्हणता त्याप्रमाणे चमत्कार घडून मी जर राजा झालो, तर ' कुठे चालला ? ' असे मला वारंवार विचारणारी मेरी गुटीरेज ही निदान माझी राणी होईल आणि आपल्या इच्छेप्रमाणे माझी मुलेबाळे राजपुत्र बनतील आणि सर्वत्र आनंदीआनंद होईल. " डॉन क्विक्झोट यांनी ओरडून विचारले, " अरे, याविषयी शंका कोण घेईल? " तेव्हा सँकोने उत्तर दिले, " मी शंका घेतो. कारण, या भूतलावर आकाशातून राज्यांचा वर्षाव झाला तरी, त्यांपैकी एकाचाही मुकुट मेरी गुटीरेजच्या मस्तकावर नीट बसणार नाही. कारण, राणी होण्याची तिची योग्यताच नाही हे मी आपल्याला सांगणे अवश्य आहे. आपली संमती असेल

तर ती सरदारीण होणे चांगले. तो अधिकार ईश्वराच्या कृपेने ती कसाबसा संभाळील. ”
डॉन क्विक्झोट यानी सँकोला उपदेश केला, “ हे प्रकरण ईश्वरावर सोपव. तुझ्या हिताचे काय आहे तेच ईश्वर तुला देईल अशी खात्री बाळग. क्षुद्र विचार सोडून दे आणि व्हाइसरॉय ( राजप्रतिनिधी ) पेक्षा खालची जागा स्वीकारण्याचा मोह धरू नकोस. ” हे ऐकून सँको म्हणाला, “ महाराज, मी असेच वागेन. आपल्यासारखा धनी दुर्मिळ. मला काय योग्य आहे आणि मी कशाचा कारभार करू शकेन, याचा विचार करून योग्य तेच आपण मला द्याल असा मला विश्वास वाटतो. ”



## प्रकरण ८

# पवन–चक्कीवरील भीषण व कल्पनातीत हल्ला आणि भावी पिढ्यांना सांगावीत अशी इतर प्रकरणे—यामध्ये पराक्रमी डॉन क्विक्झोट यानी जे सुयश संपादिले, त्याचा वृत्तांत

अशा तऱ्हेने त्यांचा संवाद चालू असताना, त्यांना त्या भागातील ३०–४० पवन-चक्क्या दिसल्या. त्या दृष्टीस पडताक्षणीच आपले शिलेदारजी ओरडून म्हणाले, "आपल्या इच्छेपेक्षाही चांगल्या प्रकारें आपले दैव आपल्या कार्याची फत्ते करीत आहे. पाहा, पाहा पलीकडे मित्रा सँको, किमान तीस संतत राक्षस तिकडे दिसत आहेत. त्यांच्याशी दोन हात करण्याची मला इच्छा आहे. त्यांचे प्राणहरण केल्यानंतर आपण त्यांच्या संपत्तीची लुटालूट करून गबर बनू. कारण, तशी लूटालूट करण्याचा कायदेशीर हक्क आपल्याला आहे. त्या दुष्ट वंशाचा समूळ नाश केल्याने आपण ईश्वराची खरी सेवा केल्यासारखे होईल." सँको पँझा याने पृच्छा केली, "काय ? राक्षस ?" तेव्हां डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, "अरे, तुला पलीकडे दिसतात ते राक्षसच. त्यांचे हात पहा किती लांब आहेत ! त्या निंद्य योनींतील काही लोकांचे हात इतके लांबलचक असतात की ते सहा सहा मैल पोहोचतात." तेव्हा सँको म्हणाला, "महाराज, नीट पाहा. त्या पलिकडच्या वस्तू पवन-चक्क्या आहेत, राक्षस नव्हेत. आणि ज्यांना तुम्ही हात म्हणता, ते त्यांचे पंख आहेत. वाऱ्याने ते गरगरा फिरू लागले, म्हणजे गिरणी चालू होते."

पण डॉन क्विक्झोट यांनी त्याला बजावून सांगितले, "अरे, ते राक्षसच आहेत. त्यांची ती निशाणी दिसत आहे. साहसाचा तुला फार थोडा परिचय आहे आणि म्हणून तू जर भ्याला असशील, तर बाजूस जा आणि प्रार्थना म्हण. कारण त्या राक्षसांविरुद्ध मी एकाकीपणे भीषण युद्ध करण्याचा निर्धार केला आहे." असे बोलून, त्यांनी रोझिनांट या आपल्या घोड्याला टाच दिली. त्यांचा नोकर सँको त्यांना ओरडून सांगत होता, "अहो, या पवन-चक्क्या आहेत, राक्षस नव्हेत." पण त्यांनी त्याच्याकडे मुळीच लक्ष दिले नाही. नोकराच्या समजुतीच्या अगदी विरुद्ध त्यांची कल्पना होती आणि त्या विपरीत कल्पनेने ते इतके झपाटलेले होते की, नोकराचा आक्रोश त्यांच्या कानात शिरला नाही. ते अगदी जवळ गेले तरी त्या पवन–चक्क्या असल्याची जाणीव काही त्यांना झाली नाही– छे, छे, मुळीच नाही. शक्य तितक्या जोराने ओरडून ते म्हणाले, "भेकडांनो,

थांबा. नीच प्राण्यांनो, आपल्या जागी उभे राहा. तुम्हा सर्वांशी सामना देणाऱ्या या एकट्या सरदारापासून भिऊन पळून जाऊ नका." याच वेळी वारा जोराने सुटला आणि त्या पवन–चक्क्यांचे पंख वेगाने फिरू लागले. ते पाहून डॉन क्विक्झोट गरजले, "नीच बदमाषांनो, ब्रियारुस राक्षसापेक्षा तुमचे हात वेगाने फिरत असले तरी, तुमच्या या अपराधाचे प्रायश्चित्त तुम्हाला भोगावे लागेल." नंतर त्यानी आपली प्रणयदेवता डल्सिनिया हिची आराधना अत्यंत भक्तिभावाने केली आणि या संकटकाळी आपल्याला साह्य करण्याविषयी तिची प्रार्थना केली.

नंतर आपल्या ढालीचे संरक्षण घेऊन आणि हातात भाला घट्ट धरून, ते रोझिनांटच्या जास्तीत जास्त वेगाने, प्रथम दिसणाऱ्या पवन–चक्कीवर चालून गेले आणि त्यांनी आपला भाला एका पंखात खुपसला. त्यावेळी वारा इतक्या वेगाने वाहात होता की, त्यामुळे भाल्याचे तुकडे तुकडे झाले आणि सरदारजी व घोडा हे दोघेही जमिनीवर फेकले गेले. त्या रानात ते दोघेही गडबडा लोळत बरेच दूर गेले. आपल्या धन्याला हात देण्यासाठी, सँको पँझा, आपले गाढव नेईल तितक्या जल्दीने, तिकडे धावला. आपला मालक जमिनीवर लोळत आहे आणि तो हालचाल करू शकत नाही असा जबरदस्त तडाखा, त्याला व रोझिनांटला मिळालेला आहे, असे सँकोला दिसले. तो म्हणाला, "माझ्यावर कृपा करा महाराज. मी आपल्याला आधीच योग्य सूचना दिली नव्हती काय? ह्या पवनचक्क्या आहेत, हे मी आपल्याला सांगितले नव्हते काय? ज्याच्या डोक्यातच पवन–चक्क्या असतील, त्याच्याशिवाय दुसरा कोणीही अन्य कल्पना करू शकणार नाही." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "शांत रहा, मित्रा सँको, शांत राहा. दैवाच्या लहरीवर युद्ध जितके अवलंबून असते, तितके दुसरे काही नसते. माझी खात्री आहे की, माझे ग्रंथ व माझी अभ्यासिका पळवून नेणारा तो दुष्ट पिशाच्च फरेस्टन यानेच, मला विजयाचा मान मिळू नये म्हणून या राक्षसांचे रूपांतर पवन–चक्क्यांमध्ये केले आहे. माझ्याविषयी त्याच्या मनात इतका पुरा मत्सर खेळत आहे. परंतु अखेरीस माझ्या समशेरीच्या प्रभावी धारेपुढे त्याच्या साऱ्या लबाड्या आणि दुष्ट इच्छा निकामी ठरतील." सँको म्हणाला, "तथास्तु" आणि त्याने मालकाला धरून पायावर उभे केले.

मालक पुन्हा त्या बिचाऱ्या रोझिनांटवर स्वार झाले. ते घोडे खाली पडल्यामुळे त्याचा खांदा बराचसा दुखावला होता. आता ते दोघे लॅपिसच्या खिंडीकडे चालले. जाता जाता ते याच साहसी प्रसंगाविषयी बोलत होते. डॉन क्विक्झोट यांनी तो रस्ता धरला याचे कारण, ज्या मैदानावर आपण वारंवार जाऊन आलो आहोत, तेथे आपल्याला साहस दाखविण्यासारखे प्रसंग भेटल्याशिवाय राहणार नाहीत, असे त्यांना वाटले. पण आपला भाला मोडला, याचे दुःख त्यांना फार झाले. त्यासंबंधी आपल्या नोकराकडे गाऱ्हाणे गाताना ते त्याला म्हणाले, "मित्रा सँको, मी असे वाचले आहे की, डीगो पेरेझ डी वर्गस या स्पॅनिश सरदाराची समशेर युद्धाच्या चकमकीत एकदा

मोडली असताना, त्याने एका प्रचंड ओक वृक्षाच्या मुळ्या उपटल्या– निदान त्याची एक भक्कम फांदी तरी तोडून घेतली आणि त्या दिवशी त्याने असे काही आश्चर्यकारक शौर्य गाजविले – आणि इतक्या मूर लोकांचा चक्काचूर केला– की, त्याला व त्याच्या वंशजांना ‘ रगड्या ’ किंवा ‘ दुखव्या ’ असे आडनाव मिळाले. हे मी तुला यासाठी सांगत आहे की, आपल्याला प्रथम जो ओक वृक्ष आढळेल, तो उपटून काढण्याचा माझा इरादा आहे. त्याच्या बुंध्याने मी विस्मयकारक कृत्ये करीन, अशी मला आशा आहे. ती पाहण्याचे भाग्य लाभल्याबद्दल तू स्वतःला मोठा सुखी समज. भावी पिढ्यांचा विश्वास बसणार नाही, असा विजय मी संपादन करीन. त्याचा प्रत्यक्ष साक्षीदार तू असशील. ”

“ देव करो, आणि आपल्याला तसा विजय मिळो. आपण सांगता म्हणून या सर्व गोष्टींवर मी विश्वास ठेवतो. पण महाराज, आपल्याला मान्य असेल तर आपण आपल्या खोगिरावर जरा ताठ बसा. आपण एका बाजूस कललेले आहा, असे मला वाटते. आणि त्याचे कारण, आपण खाली पडल्यामुळे आपले सर्वांग ठणकत असेल. ” सँको म्हणाला. तेव्हा डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, “ होय, होय, तसेच होत आहे तरी मी तक्रार करीत नाही. कारण, शिलेदाराने आपल्या जखमांची कधीही तक्रार करत कामा नये–मग त्या जखमातून त्याचे आतडे लोंबू लागले तरी बेहेत्तर. ” तेव्हा सँको म्हणाला, “ मग मला काही म्हणावयाचे नाही. पण ईश्वरसाक्ष मी सांगतो, जेव्हा जेव्हा आपल्याला काही दुःख होत असेल तेव्हा आपण अधूनमधून थोडेसे कण्हावे, हे बरे, असे मला वाटते. तक्रार न करण्याचा नियम सरदाराप्रमाणेच त्यांच्या नोकरालाही लागू आहे, असे जोपर्यंत सिद्ध होत नाही, तोपर्यंत, मला रतिमात्र वेदना झाली तरी मी शोक केल्याशिवाय राहणार नाही. ”

आपल्या चाकराचा हा भोळेपणा पाहून डॉन क्विक्झोट याना हसू आवरेना. त्यांनी त्याला सांगितले, “ काही कारण असो–नसो, तुझ्या इच्छेस येईल तेव्हां, आणि तुझ्या इच्छेस येईल तितके गाऱ्हाणे गाण्याची परवानगी मी तुला देत आहे. याला विरोधी असे काही लिहिल्याचे शिलेदारीच्या कोणत्याही ग्रंथात मी कधीही वाचले नाही. ” पण सँको म्हणाला, “ महाराज, आपली जेवणाची वेळ झाली आहे, याचा विचार करा. ” त्याचा धनी उत्तरला, “ तुझ्या मर्जीस येईल तेव्हा तू जेव. मला अद्याप जेवणाची इच्छा झालेली नाही. ” अशी परवानगी मिळताच, सँकोने आपल्या गाढवावर, शक्य तितके व्यवस्थितपणे बसून, आपल्या चामड्याच्या पिशवीतून काही खाद्य पदार्थ काढले आणि आपल्या धन्याच्या मागोमाग गाढवावरून जाताना, ते खाद्य पदार्थ तो चवीने चघळत राहिला. त्याने आपली बाटली पुनः पुनः आपल्या तोंडाजवळ नेली आणि तिचे इतक्या जोराने शोषण केले की, त्याच्याकडे पाहून, मलागा येथील दारूच्या बड्या व्यापाऱ्याचेही दिवाळे निघाले असते. अशा प्रकारे त्याचे चिक्कार खाणेपिणे चालू असताना, आपल्या धन्याने दिलेल्या मोठमोठ्या आश्वासनांचा विचार

त्याच्या डोक्यात मुळीच आला नाही. साहसी प्रसंगांच्या शोधार्थ भटकणे त्याला आता मुळीच त्रासदायक वाटत नव्हते. ते प्रसंग फारसे भयानक नसले तरी त्यांचा शोध घेणे, हे जगातील अत्यंत आनंददायक कार्य आहे असे त्याला वाटत होते.

शेवटी त्यांनी ती रात्र काही झाडांखाली घालविली. त्यापैकी एका झाडाची सुक-लेली फांदी डॉन क्विक्झोट यानी तोडली. भाला म्हणून तिचा त्यांना थोडाफार उपयोग होण्यासारखा होता आणि म्हणून त्यानी आपल्या मोडक्या भाल्याचे टोक त्या फांदीला बसविले. पण सारी रात्र त्यांना झोप काही आली नाही. त्यांचे सारे विचार प्रिय डल्सिनियावर केंद्रित झाले होते. शिलेदारीच्या ग्रंथात त्यानी जे वाचले होते, त्याचे हे अनुकरण होते. त्या ग्रंथातील शिलेदार आपला रात्रीचा वेळ, रानावनामध्ये, झोप न घेता, केवळ आपल्या हृदय-सम्राज्ञीच्या विचारात कंठीत असत. सँकोने अशा आळशीपणात आपली रात्र घालविली नाही. कारण, पाण्यापेक्षा अधिक सकस अशा आहाराने आपले उदर-भरण केल्यावर, त्याने फक्त एक डुलकी घेतली. त्याच्या धन्याने त्याला उठविले नसते तर, त्याच्या तोंडावर पडणाऱ्या चैतन्यमय सूर्यकिरणांनी किंवा त्या सस्मित सूर्याचे आनंदाने स्वागत करणाऱ्या शाखाशाखांवरील पक्ष्यांच्या मधुर संगीतानेही तो उठला नसता. उठून त्याने आपले डोळे चोळले आणि सकाळची न्याहारी म्हणून आपल्या जिवलग बाटलीतील दोन तीन मोठे घोट घेतले. पण आदल्या रात्रीपेक्षा ती बाटली त्याला हलकी वाटली. या दुर्दैवाने त्याच्या हृदयाला घरे पडली. कारण ती बाटली त्याच्या इच्छेप्रमाणे पुनः लवकर भरली जाईल असा त्याला विश्वास वाटेना. याउलट डॉन क्विक्झोट मुळीच न्याहारी करीनात. कारण, आपल्या हृदय-सम्राज्ञीविषयीच्या कोमल व व मधुर विचारांची मेजवानी ते सर्व रात्रभर झोडीत होते. म्हणून ते दोघे थेट लॅपिसच्या खिंडीकडे दौडत निघाले. तेथे ते तीन वाजण्याच्या सुमारास पोचले. खिंडीजवळ येताच डॉन क्विक्झोट म्हणाले, "बंधो सँको, ही पाहा ती खिंड, 'साहस! साहस!' असे ज्याला आपण म्हणतो, ते येथे आहे. आता आपण कोपरापासून आपले हात सरसावून या साहसाचे स्वागत करू या. पण मी तुला एक जरूर तो इषारा देतो. तो हा की, अत्यंत भयंकर अशा संकटात मी सापडल्याचे तुला दिसले तरी माझ्या बचावासाठी तू आपली समशेर उपसता कामा नये. नीच लोकांनी आणि दुष्ट बदमाषांनी माझ्यावर हल्ला केला, तर गोष्ट निराळी. त्यावेळी तू आपल्या धन्याला मदत करावीस. पण मी जर शिले-दाराशी लढत असेन, तर तू मदत करता कामा नये. कारण तू स्वतः शिलेदार असल्या-शिवाय दुसऱ्या शिलेदाराशी सामना करू नयेस असा शिलेदारीचा नियम आहे."

सँको म्हणाला, "भिऊ नका, महाराज. या बाबतीत मी आपली आज्ञा तंतोतंत पाळीन, अशी ग्वाही मी देतो. कारण, शांतता व निवांतपणा यांचे मला सदैव प्रेम आहे. तंट्याबखेड्यात घुसण्याची मला सवय नाही. पण त्याबरोबरच दुसऱ्याचे ठोसे खाण्याचीही सवय नाही. म्हणून, एखाद्या शिलेदाराने माझ्यावर प्रथम हल्ला केला, तर मात्र मी आपल्या नियमांची पर्वा करणार नाही. कारण, ईश्वराचे काय किंवा मानवाचे

काय, सारे कायदे असेच सांगतात की, आपली कोणी कुरापत काढण्यास सुरुवात केली, तर आपण आपले रक्षण करण्यासाठी उभे ठाकले पाहिजे. " तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " हे मला मान्य आहे. पण कोणा शिलेदाराने माझ्यावर हल्ला केला असतां माझा बचाव करण्यासाठी तू आपल्या स्वाभाविक प्रेरणांना आळा घातला पाहिजेस. " सँकोने म्हटले, " मी तसेच करीन, अशी खात्री बाळगा. प्रभूचा प्रार्थनादिन मी ज्या निष्ठेने पाळतो, त्याच निष्ठेने मी आपली ही आज्ञा न पाळली, तर आपण माझ्यावर कधीच विश्वास ठेवू नका. "

त्यांचे असे बोलणे चालले असताना, सेंट बेनेडिक्ट यांच्या पंथाचे दोन भिक्षु आपल्याकडे येत असलेले त्यांना दिसले. ते दोन उंटावर बसल्यासारखे दिसत होते. कारण, ते ज्या खेचरावर बसलेले होते, ती इतकी उंच व ऐटदार होती की, ती उंटासारखीच दिसत. त्या दोघा भिक्षूंनी आपल्या तोंडावर, धुळीचा त्रास होऊ नये म्हणून, डोळ्यांना चष्मे असलेल्या झापडी चढवल्या होत्या. उन्हाचा ताप होऊ नये म्हणून त्यानी छत्र्या घेतल्या होत्या. त्यांच्या मागोमाग एक गाडी आली. तिच्याबरोबर चार-पाच घोडेस्वार होते आणि पायी चालणारे दोन खेचरांचे मोतद्दार होते. त्या गाडीत एक बिस्केयन महिला होती. ती आपल्या पतीला भेटण्यासाठी सेव्हिलला चालली होती. तिचा पति मोठी अधिकाराची जागा घेण्यासाठी इंडीजकडे जाण्यास तेथे आलेला होता.

ते दोन भिक्षू त्याच मार्गाने चालले असले तरी, ते त्या मंडळीपैकी नव्हते. ते दृष्टीस पडतात न पडतात तोंच, डॉन क्विक्झोट आपल्या नोकराला ओरडून म्हणाले, " माझी फसवणूक होत नसेल तर हा प्रसंग कोणाच्या कल्पनेत नसेल इतका विलक्षण आहे. कारण आपल्याकडे येणारे ते दोन कृष्णवर्णीय प्राणी मांत्रिक असले पाहिजेत, यात शंका नाही. त्या गाडीतील कोणा राजकन्येला ते बळजोरीने नेत असले पाहिजेत. हा अनर्थ टाळणे, हे माझे कर्तव्य आहे. "

तेव्हा सँको म्हणाला, " पवन–चक्कीपेक्षाही हे प्रकरण बिकट दिसते. हे दोघेजण बेनेडिक्ट पंथाचे भिक्षू आहेत, हे महाराज, आपल्या लक्षात येत नाही काय ? ही गाडी त्यातील प्रवाशांच्या मालकीची असणे शक्य आहे. म्हणून मी आपल्याला पुनः एकदा इशारा देतो की सैतानामागे जाऊ नका. " तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " सँको, मी तुला पूर्वीच सांगितले आहे की, या शौर्याच्या बाबतीत तू अगदी अडाणी आहेस. मी म्हणतो ते सत्य आहे आणि ते तुला लवकरच कळून येईल. " असे म्हणून त्यानी आपल्या घोड्याला टाच मारली आणि रस्त्याच्या मध्यभागी ते दाखल झाले. तेथून ते भिक्षू जावयाचे होते. ते ऐकण्याच्या टप्प्यात आलेले दिसताच क्विक्झोट मोठ्या व संतप्त आवाजात ओरडले, " धिक्कार असो तुम्हा नरक-वासियांना ! या गाडीतून तुम्ही ज्या उच्चकुलीन राजकन्यांना सक्तीने घेऊन जात आहात त्याना तत्काळ मुक्त करा. नाही तर आपल्या दुष्ट कृत्यांचे योग्य प्रायश्चित्त म्हणून तत्काळ मरण पत्करण्यास तयार व्हा. " भिक्षूंनी आपली खेचरे थांबविली. त्यांना त्या भाषेचे जितके नवल वाटले,

तितकेच ती भाषा बोलणाऱ्या क्विक्झोटचेही वाटले.

ते भिक्षू म्हणाले, "महाराज, आपण आम्हाला जी संज्ञा कृपा करून दिली आहे, तसे आम्ही नाही. सेंट बेनेडिक्टच्या पंथाचे आम्ही धार्मिक लोक आहो. आम्ही आमच्या कामासाठी हिंडत असतो. त्या गाडीत कोणा राजकन्यांना कोणी सक्तीने नेत आहे की नाही हे आम्हाला मुळीच माहीत नाही." ते ऐकून डॉन क्विक्क्झोट उत्तरले, "अशा संभावित शब्दांनी मी फसणार नाही. निमकहराम दुष्टांनो, मी तुम्हाला चांगले ओळखून आहे." त्यांच्या उत्तराची वाट न पाहता, क्विक्झोट यानी रोझिनांटला तत्काळ टाच मारली आणि आपला भाला सरसावून, ते इतक्या त्वेषाने एका भिक्षूवर धावून गेले की, त्याने जर जमिनीवर उडी मारण्याचा शहाणपणा दाखवला नसता तर या शिलेदाराने त्याला खचित ठार केले असते किंवा भयंकर जखमी केले असते. आपल्या मित्राची ही दुर्दशा पाहून, दुसऱ्या भिक्षूने आपल्या थोराड खेचराच्या पृष्ठभागावर टाच मारली आणि जणू काही वाऱ्याशी शर्यत खेळण्यासाठी, त्या मैदानावरून धाव घेतली. पहिला भिक्षू खाली पडलेला पाहताच, सँको पँझाने आपल्या गाढवावरून चपळाईने उडी मारली आणि त्या भिक्षूकडे जाऊन त्याचे कपडे काढण्यास सुरुवात केली. त्या भिक्षूंची सेवा करणारे दोन मोतद्दार त्याचेजवळ आले आणि म्हणाले, "तुम्ही त्यांचे कपडे का काढता ?" सँकोने उत्तर दिले, "माझे धनी आणि सरदार डॉन क्विक्झोट यांनी युद्धात मिळविलेली ही लूट आहे. तिच्यावर कायदेशीर दृष्ट्या माझी मालकी आहे." त्या मोतद्दारांना विनोद कळत नव्हता आणि 'युद्ध व लूट' हे त्याचे शब्दही कळत नव्हते. यावेळी डॉन क्विक्झोट त्या गाडीजवळ जाऊन गहन चर्चा करीत दूर उभे होते. हे पाहून ते दोघेही मोतद्दार बिचाऱ्या सँकोवर तुटून पडले .त्याला त्यांनी खाली पाडले व त्याच्या हनवटीपासून त्याची दाढी उपटून काढली त्याच्या पोटावर ते नाचले. त्याच्या अर्धमेल्या शरीराच्या प्रत्येक अवयवावर त्यांनी ठोसे लगावले ! श्वास न सोडता किंवा हालचाल न करता, सँको जमिनीवर अस्ताव्यस्त पडला होता. त्याला तसेच टाकून ते मोतद्दार निघून गेले. या अवधीत, तो भिक्षू उठला आणि आपल्या खेचरावर बसून व त्याला टाच मारून आपल्या मित्राकडे दौडत गेला. भीतीने त्याची बुद्धी बधिर झाली होती आणि त्याची मुद्रा भुतासारखी पांढरीफटक पडली होती. त्याचा मित्र त्याच्यासाठी थोडया अंतरावर थांबला होता– या विचित्र प्रसंगाचा परिणाम काय होतो हे तो पाहात होता. पण त्याचा अंतिम परिणाम पाहण्यासाठी तेथे थांबण्यास ते दोघेही राजी नव्हते म्हणून त्यांनी तत्काळ आपला मार्ग सुधारला. सैतान पाठीशी लागला असता, तरी केले नसते, इतके क्रूसाचे आविर्भाव त्यांनी केले.

पूर्वी मी सांगितल्याप्रमाणे डॉन क्विक्झोट त्या गाडीतील महिलेशी बोलण्यात गुंतले होते. ते म्हणाले, "बाईसाहेब, आपल्या सुंदर जीवनाचा विनियोग आपल्या इच्छेनुसार करण्याचे स्वातंत्र्य आपल्या बुद्धीला आता आहे. कारण आपल्या देहाला गुलाम करण्याचा उर्मट प्रयत्न ज्यांनी केला, ते आता धुळीत उताणे पडले आहेत –

माझ्या प्रचंड बाहुबलाने त्यांना लोळविले आहे. आपल्या मुक्तिदात्याचे नाव काय आहे, याविषयी आपला गोंधळ होऊ नये म्हणून, मी माझा परिचय करून देतो की, मला ला मांचाचा डॉन क्विक्झोट म्हणतात; आणि माझा व्यवसाय धाडसी शिलेदारीचा आहे. अद्वितीय लावण्याने नटलेली टोबोसा येथील डोना डल्सिनिया हिचा मी बंदिवान आहे. मी आपली जी सेवा केली, तिच्याबद्दल मला कोणत्याच मोबदल्याची इच्छा नाही. फक्त आपण टोबोसो येथे जाऊन त्या माझ्या हृदयसम्राज्ञीपुढे दाखल व्हावे आणि आपल्याला मुक्त करण्यासाठी मला किती किंमत द्यावी लागली, हे तिला कळवावे."

त्या महिलेचा एक नोकर, बिस्केनचा कोणी रहिवासी, एक सभ्य गृहस्थ – त्याला काही नाव तुम्ही द्या– त्या गाडीबरोबर दौडत होता. तो हे विचित्र भाषण कान देऊन ऐकत होता. डॉन क्विक्झोट यांनी आपली गाडी नुसती थांबविली, इतकेच नव्हे तर, ती टोबोसाला जावी, अशीही इच्छा प्रदर्शित केली, हे पाहून तो त्याच्याकडे वेगाने गेला आणि त्याचा भाला मुठीत घेऊन, चुकीच्या स्पॅनिश भाषेत आणि मोडक्यातोडक्या बिस्केनर भाषेत ओरडून म्हणाला, "जा, शिलेदारा चालता हो. तुझ्याबरोबर सैतानही निघून जावो. नाही तर ज्याने मला निर्माण केले त्याची शपथ घेऊन मी तुला सांगतो की, तू जर ही गाडी सोडून गेला नाहीस तर, मी बिस्केनर आहे हे जितके खरे, तितकेच मी तुला ठार मारीन हेही खरे आहे."

त्याचे भाषण नीट समजावून घेण्यासाठी, डॉन क्विक्झोट यानी आपली बुद्धी चालविली आणि नंतर अत्यंत शांतपणे त्याला उत्तर दिले, "मूर्ख माणसा, तू सभ्य माणूस नाहीस. असतास, तर या तुझ्या उद्धट नि धाडसी भाषणाबद्दल मी तुला अद्दल घडविली असती." तो बिस्केनर उत्तरला, "काय ? मी सभ्य माणूस नाही ? मी ख्रिश्चन आहे, हे जितके खरे, तितकेच तू लबाड आहेस हेही खरे, हे मी शपथेवर सांगतो. तू जर भाला फेकून देऊन तलवार उपसशील, तर मांजर उंदराचे जे करते, तेच मी तुझे करीन आणि मी बिस्केनर असल्याचे तुला पटवून देईन. पृथ्वीवर, समुद्रावर मी सभ्यतेने वागतो – समोर सैतान उभा असला तरी सभ्यतेने वागतो, हे मी दाखवून देईन. याच्या उलट तू बोललास तर, तू खोटे बोलतोस असे होईल." डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, "तू म्हणतोस तसेच होऊन जाऊ दे." असे म्हणून त्यानी आपला भाला फेकून दिला आणि आपली समशेर उपसली. आपली ढाल हातात घट्ट धरून, त्यांनी त्या बिस्केनरवर असा हल्ला चढविला की, त्यामुळे तो ठार व्हावा. ते इतक्या त्वेषाने धावून येत असलेले पाहून, तो बिस्केनर आपल्या त्या भाडोत्री खेचरावर विश्वास न ठेवता आनंदाने खाली उतरला असता. पण वेळ कोठे होता ? त्याने झटदिशी तलवार उपसली आणि ढालीसारखा उपयोग करण्याकरता त्या गाडीतील एक उशी उचलून घेतली. हाडवैऱ्याप्रमाणे ते दोघे एकमेकांवर अत्यंत आवेशाने हल्ले करू लागले. त्यांचे हे युद्ध थांबविण्यासाठी जवळपासचे लोक शक्य ते प्रयत्न करीत होते, पण व्यर्थ. कारण, तो बिस्केनर शिवीगाळ करीत बडबडत होता, "मला जर कोणी लढू दिले नाही तर, त्या साऱ्यांचा– प्रत्यक्ष या महिलेचाही – मी खून करीन."

या शस्त्रांच्या चकमकीमुळे गाडीतील ती महिला अत्यंत भयभीत झाली. तिने आपल्या गाडीवानाला गाडी दूर नेण्यास सांगितले. त्या सुरक्षित अशा दूरच्या ठिकाणावरून ती ते तुंबळ युद्ध पाहात होती. त्याच वेळी त्या बिस्केअन वीराने डॉन क्विक्झोटच्या खांद्यांवर आणि त्यांच्या ढालीवर असा काही जबरदस्त तडाखा दिला की, त्यांचे चिलखत शस्त्राला अभेद्य नसते तर, त्यांच्या कमरेपर्यंत ते उभेच चिरले गेले असते. त्या जबरदस्त तडाख्याचा भार जाणून आमचे सरदारजी मोठ्याने ओरडले, "प्राणप्रिये डल्सिनिये, हे लावण्यलतिके, तुझी योग्यता सिद्ध करण्यासाठी तुझा हा सेवक या भीषण संग्रामात गुंतला आहे. त्याच्या सहाय्यास धाव." या छोट्याशा प्रार्थनेनंतर, त्यांनी एकदा श्वास सोडला, आपली समशेर घट्ट धरली, आपल्या ढालीने स्वतःला संभाळले आणि आपल्या शत्रूवर हल्ला चढविला. या साऱ्या गोष्टी एका क्षणात घडल्या. कारण युद्धाचे सारे भवितव्य, त्या एका हल्ल्यावर डॉन क्विक्झोट यांनी अवलंबून ठेवले होते. त्यांच्या भयानक मुद्रेवरून त्यांच्या मनात काय हेतू आहे, हे त्या बिस्केअन वीराने ओळखले आणि तितक्याच शौर्याने, त्याला तोंड देण्याचे ठरविले. आपली तलवार वर उचलून आणि उशीची ढाल पुढे करून, त्यांचा भयानक आघात झेलण्यास तो सिद्ध झाला. ते मरतुकडे खेचर इकडे किंवा तिकडे मुळीच हलेना. त्या वीराने कितीही टाच मारल्या आणि त्याला पळविण्याचा प्रयत्न केला, तरी व्यर्थ. अशी कृत्ये करण्यासाठी ते खेचर जन्मास आलेले नव्हते. त्या थकलेल्या बिस्केअन वीराचे दोन तुकडे करण्याच्या पूर्ण निश्चयाने डॉन क्विक्झोट आपली तलवार उंच उचलून त्याचेवर धावून गेले. तेव्हा सारे प्रेक्षक भयाने व विस्मयाने थरथरा कापू लागले. निकराने लढणाऱ्या त्या दोन वीरांवर होणाऱ्या हल्ल्यांचा परिणाम काय होतो, हे ते श्वास रोखून पाहात होते. त्या गाडीतील ती महिला व तिच्याबरोबरच्या स्त्रिया स्पेनमधील साऱ्या देवताना व तीर्थक्षेत्राना हजारो नवस करीत होत्या आणि परमेश्वराने त्याना व त्यांच्या नोकराला या दारुण संकटातून मुक्त करावे, अशी प्रार्थना करीत होत्या.

पण या इतिहासाचा शेवट येथे अकस्मात झालेला आहे याचे आम्हास दुःख वाटते. युद्धाच्या भवितव्याचा निर्णय ज्या क्षणी लागावयाचा त्याच वेळी लेखकाने हा इतिहास सोडून दिला. याचे कारण बहुधा हे असावे की, आपण आतापर्यंत डॉन क्विक्झोट यांचे जे आश्चर्यजनक पराक्रम वर्णिले, त्याहून अधिक काही सापडणार नाहीत, असे लेखकास वाटले असावे. परंतु या पुस्तकाच्या दुसऱ्या लेखकाला असे वाटते की, एवढा जिज्ञासावर्धक इतिहास विस्मृतीमध्ये कायमचा गाडला जावा, हे बरे नाही. ला मांचा येथील विद्वान लोकांनी आपल्या राष्ट्राच्या गौरवाविषयी उदासीन राहून, या सुविख्यात सरदाराच्या काही आठवणी, त्याचे स्मारक म्हणून, आपल्या पुराणवस्तुसंग्रहालयात–निदान आपल्या घरातील कपाटात–जतन करून न ठेवाव्या, हेही बरे नाही. या आनंददायक इतिहासाच्या उर्वरित भागाचा शोध करण्याचे कार्य हा लेखक टाकून देण्यास तयार नव्हता. शेवटी, सुदैवाने त्याला तो भाग सापडला, हे पुढील प्रकरणावरून वाचकांस कळून येईल.

◘ ◘

# खंड–२

## प्रकरण १

## शूर बिस्केनर व पराक्रमी डॉन क्विक्झोट यांच्या अत्यंत प्रचंड संग्रामाचा प्रसंग

या इतिहासाच्या प्रथम खंडात शूर बिस्केनर व सुविख्यात डॉन क्विक्झोट ह्यांच्या चकमकीचा कथाभाग आलेला आहे. त्या दोघा वीरांनी आपआपल्या समशेरी उपसलेल्या होत्या आणि एकमेकावर ते असे त्वेषपूर्ण व अत्यंत भयंकर आघात करणार होते की, अडथळा न येता ते एकमेकांच्या अंगावर सरळ पडते तर त्या दोन प्रति-स्पर्ध्यांच्या आपादमस्तक चिरफळ्या झाल्या असत्या आणि एखाद्या डाळिंबाप्रमाणे त्यांची शकले उडाली असती. पण मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, ही गोष्ट अपुरी राहिली होती, या निवेदनाचा उर्वरित भाग आपल्याला कोठे सापडेल हेही लेखकाने सांगितलेले नव्हते.

यामुळे मी अत्यंत संत्रस्त झालो. या ग्रंथाच्या प्रारंभीचा भाग वाचून मला जो आनंद झाला होता त्याची परिणती वैतागात झाली. वैताग अशासाठी की या गोष्टीचा बाकीचा भाग कधीही दृष्टीस पडण्याची आशाच उरली नाही. तरीही मला असे वाटत राहिले की; एवढ्या पराक्रमी सरदाराची अद्वितीय वीरकृत्ये लिहून ठेवण्यासाठी त्याला कोणी विद्वान भेटला नसेल हे जितके अशक्य, तितकेच अन्यायाचे आहे. त्यांच्यापूर्वीच्या कोणाही शिलेदारावर असे दुर्दैव ओढवलेले नव्हते. प्रत्येक शिलेदाराजवळ नेहमी एक-दोन विद्वान असत आणि ते त्यांचे अद्‌भुत पराक्रम लिहून ठेवीत असत, एवढेच नव्हे तर त्यांचे विचार आणि त्यांच्या लहानसहान बालिश लीलाही लिहून ठेवीत असत. म्हणून एवढा थोर सरदार इतका दुर्दैवी असेल अशी कल्पनाही मला करवेना. लॅटिर-सारख्या दुय्यम दर्जाच्या—आणि त्याच्याच कोटीतील इतर शिलेदाराना भरपूर बखरकार मिळाले असताना डॉन क्विक्झोट यांना एकही इतिहास-लेखक लाभला नसेल यावर माझा विश्वास बसेना. तसेच त्यांचा अत्यंत अद्‌भुत इतिहास अपूर्ण राहिला असेल किंवा सर्वभक्षक काळाने आपल्या उदरात गडप केला असेल अथवा लपवून ठेवला असेल असे मानण्यास माझे मन तयार होईना. उलटपक्षी, " दि क्युअर्स ऑफ जेलसी, " व " दि निंफ्स् ॲण्ड शेपर्डस ऑफ् हेनॅरेस्, " अशी अर्वाचीन कैक पुस्तके क्विक्झोटच्या अभ्यासिकेत सापडतात, तर मग मला असे वाटू लागले की, आपल्या सरदारजींच,

इतिहास फार जुन्या काळचा नसेल. तो जरी पूर्णपणे लिहिलेला नसला, तरी त्यांच्या जीवनातील अत्यंत महत्त्वाच्या प्रसंगांचे विस्मरण त्यांच्या मित्रांना व शेजाऱ्यांना झालेले नसेल.

या कल्पनेने भारून गेल्यामुळे, आपल्या सुविख्यात स्पॅनिश वीराचे–डॉन क्विक्झोट यांचे– जीवन व त्यातील अद्‌भुत कृत्ये यांची नक्की चौकशी खास करून करण्याचे कार्य मी आपल्या अंगावर घेण्याचे ठरवले. आपले सरदारजी म्हणजे ला मांचाचा शौर्याचा आदर्श आणि देदीप्यमान वैभव होय. सध्याच्या भ्रष्ट व खडतर काळात उपेक्षित असलेल्या शिलेदारीच्या व्यवसायाला प्रथम वाहून घेणारे आपले सरदारजीच होत. अन्याय व अपाय दूर करणे, विधवांचे दुःख नाहीसे करणे आणि युवतींचे शील संरक्षिणे अशी धीरोदात्त कामे करण्यात ते अग्रेसर आहेत. प्राचीन काळी असे सरदार तट्टावर बसून हातात भाला घेऊन आपले पावित्र्य संभाळून कोणत्याही संकटाची तमा न बाळगता, निर्भयपणे दऱ्याखोऱ्यातून दौडत असत. एखाद्या आडदांड दुष्टाने किंवा धिप्पाड पुरुषाने त्यांचा नाश केला नाही, तर वयाच्या ८० व्या वर्षी ( या सर्व आयुष्यात एका घरी ते एक रात्र काही निजले नाहीत ) आपल्याला जन्म देणाऱ्या मातेइतकेच शुद्ध राहिलेले ते वीर शांतपणे थडग्यात झोप घेत.

यामुळे – आणि अशाच दुसऱ्या पुष्कळ कारणांमुळे – मला असे वाटते की, आपले शौर्यशाली डॉन क्विक्झोट हे सर्वांच्या व सर्वकाळच्या स्तुतीस पात्र आहेत. त्यांच्या या आनंददायक इतिहासाचा अवशेष शोधून काढण्याचे कामी मी जे अविश्रांत परिश्रम काळजीपूर्वक केले, त्याबद्दल माझी योग्य ती प्रशंसा झाल्यास ती मी नाकारणार नाही. ईश्वराने योगायोगाने किंवा सुदैवाने या संशोधनात मला जर हात दिला नसता, (तो कसा दिला हे मी पुढे सांगणारच आहे ) तर जग दोन घटकांच्या विश्रांतीला व सुखाला आचवले असते हे मी सांगितलेच पाहिजे. हा सारा इतिहास जे कोणी लक्षपूर्वक वाचतील त्यांच्या मनाला विरंगुळा व आनंद मिळाल्याशिवाय राहणार नाही.

एके दिवशी मी टोलेडो येथे अल्कालामध्ये होतो, तेव्हा एका दुकानदाराला जुनी रद्दी विकणारा एक तरुण मुलगा मला दिसला. भर रस्त्याच्या मध्यभागी लिहिलेल्या किंवा छापलेल्या कागदाचा केवढाही तुकडा मला दिसला, तरी तो उचलून घेण्याची मला संवय आहे. साहजिकच त्या रद्दीतील हस्तलिखिताचे एक पान हाती घेतल्याशिवाय मला राहवले नाही. त्यावर अरबी भाषेत काही लिहिलेले मला आढळले. ती लिपी मला वाचता येत नव्हती. तेव्हा स्पॅनिश भाषा जाणणारा कोणी मोरिस्को माणूस दिसतो का, हे मी न्याहाळून पाहू लागलो. तसा दुभाष्या तेथे मिळणे फार कठिण नव्हते. अत्यंत प्राचीन भाषेचा जाणकार असा दुभाष्या जरी मला पाहिजे असता तर तेथे तोही मला खात्रीने मिळाला असता. तसा दुभाष्या मला तत्काळ मिळाला हे माझे सुदैव, मी त्याल माझी इच्छा सांगण्याची खोटी, त्याने लगेच त्या कागदावरील काही ओळी वाचून दाखविण्यास सुरुवात केली– आणि एकदम तो खो खो करीत हसत सुटला.

"का हसता ?" असे मी त्याला विचारले. त्याने उत्तर दिले, "या पुस्तकाच्या समासात काय शेरा मारला आहे पाहा." "तो शेरा काय काय आहे ?" असा खुलासा मी त्याला विचारला. तेव्हा तो हसत हसतच म्हणतो कसा, "या इतिहासात डल्सिनिया डेल टोबोसो हिचा उल्लेख वारंवार आलेला आहे. ला मांचा येथील साऱ्या बायकांत डुकराचे मांस खारण्यात ती पटाईत आहे." डल्सिनिया डेल टोबोसो हिचे नाव त्याने घेतलेले ऐकताच मी चकित झालो, आणि मी तत्काळ अनुमान बांधले की त्या रद्दीतील कागदात डॉन क्विक्झोटचा इतिहास असला पाहिजे. त्यामुळे, त्या पुस्तकाचे नाव वाचण्याचा मी त्याला आग्रह केला. त्याने तत्काळ ते वाचले आणि अरबी शब्दांचे भाषांतर करून सांगितले– "ला मांचा डॉन क्विक्झोट यांचा सिड् हॅमेट बेनेंन जेली या अरबी इतिहासकाराने लिहिलेला इतिहास." हे नाव ऐकताच माझा हर्ष गगनात मावेनासा झाला. तो लपविण्यास मला फार कष्ट पडले. मी झट्दिशी त्या दुकानदाराच्या हातातून ती रद्दी घेतली आणि त्या तरुण माणसाबरोबर सौदा पटविला. एका अधेलीला तो सारा गठ्ठा मी विकत घेतला. माझी उत्सुकता त्याच्या ध्यानी आली असती तर त्याने वीसपट किंमत मागितली असती. मी तावडतोब तो खरेदी केलेला माल घेऊन जवळच्या मोठ्या प्रार्थनामंदिरात सटकलो. जाताना त्या अरबी माणसाला मी बरोबर नेले आणि त्याला विनविले, "डॉन क्विक्झोटची माहिती देणाऱ्या या कागदांचे भाषांतर मला सांग. त्यासाठी तू मागशील ती योग्य किंमत मी देईन, मात्र भाषांतर करताना एकही शब्द पदरचा घालू नकोस किंवा वगळू नकोस." त्याने मला मोबदला म्हणून फक्त ५० पौंड मनुका आणि २ बुशेल गहू मागितले व आश्वासन दिले, "हे काम मी शक्य तितक्या त्वरेने व प्रामाणिकपणाने करीन." थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, हे काम झटपट उरकावे आणि अत्यंत सुरक्षितपणे पार पडावे व ते घबाड माझ्या हातून दुसऱ्या कोणास मिळू नये म्हणून मी त्या मुसलमान तरुणाला माझ्या घरी नेले. तेथे त्याने सहा आठवड्यांचे आत भाषांतराचे काम पूर्ण केले.

कागदाच्या पहिल्या पानावर डॉन क्विक्झोट व बिस्केनर यांच्या द्वंद्वाचे जे वर्णन आले होते, ते आम्ही पूर्वी जेथे हा इतिहास सोडला, त्यातल्यासारखेच हुबेहूब होते. त्या दोघांचे तेच पवित्रे–एकमेकांच्या मस्तकावर दोघांनी आपल्या समशेरी उगारलेल्या–त्यांपैकी एकजण ढालीने स्वतःचा बचाव करीत असलेला तर दुसरा उशीने. बिस्केनरच्या खेचराचे चित्रण इतके सजीव होते की, तुम्ही अर्ध-मिटल्या डोळ्यानेही ओळखले असते की हे भाड्याचे खेचर आहे. बिस्केनरच्या चित्राखाली लिहिले होते— "अझपेटिया येथील डॉन सँको" आणि रोझिनांटच्याखाली लिहिले होते–"डॉन क्विक्झोट." रोझिनांट इलक्या कौशल्याने चितारलेला होता–इतका कृश, हडकुळा, किरकोळ, थकलेला, आणि हाडे वर आलेला व असाध्य अशा क्षयाने पूर्णपणे पोखरलेला दिसत होता की, त्याचेकडे पाहताच कोणीही कबूल केले असते, याच्याशिवाय दुसरे कोणतेही घोडे या नावाला कधीही लायक ठरणार नाही. जवळच आपल्या गाढवाच

लगाम धरून सँको पँझा उभा होता, त्याच्या पायाशी एक चुरगळलेला कागद होता. त्यांवर लिहिलेले होते " सँको कँझास. " त्या चित्रावरून अंदाज बांधावयाचा तर सँको हा जाड, ढेरपोट्या व बुटका होता. त्याचा पृष्ठभाग मोठा होता. बहुधा त्यामुळे त्याला इतिहासात केव्हा पँझा म्हटले आहे तर केव्हा कँझा म्हटले आहे. याशिवाय त्या कागदावर दुसरी काही लहान लहान चित्रे होती. पण ती लक्ष देण्याजोगी नव्हती—या सत्यपूर्ण इतिहासावर प्रकाश पाडणारी नव्हती, नाही तर त्यांचा उल्लेख झाल्याशिवाय राहिला नसता. यात कोणतीही चूकभूल नाही; सारा वृत्तांत अधिकृत आहे. त्याच्या सत्यतेवर एकच आक्षेप घेता येण्यासारखा आहे—आणि तो म्हणजे त्याचा लेखक अरबी माणूस आहे व त्या देशाचे लोक सत्याचे फारसे भोक्ते नाहीत, एवढेच मी वाचकाला सांगितले पाहिजे; आणि तरीही, त्यांना आपण आपले शत्रू मानीत असलो तरीही आपण अशीच कल्पना केली पाहिजे की, लेखकाने आपल्या सरदारजींच्या खऱ्या योग्यतेचे अवास्तव वर्णन केलेले नसेल—त्यातील काही सत्य दडपून टाकले असेल एवढेच. असे मानण्याकडे माझा विशेष कल होण्याचे कारण हे की, जेथे त्याने विस्ताराने स्तुति—स्तोत्रे गावयास हवी होती, तेथे द्वेषबुद्धीने त्याने मौन धारण केले आहे असे स्पष्ट दिसते. इतिहासकाराला हे शोभत नाही. इतिहासकार हा अचूक, प्रामाणिक, निःपक्षपाती, निर्विकार आणि स्वार्थ, भय किंवा रागलोभ यामुळे सत्यापासून विचलित न होणारा असा असला पाहिजे. सत्य ही इतिहासाची जननी होय, आणि इतिहासकार या महत्कार्यांचा संरक्षक असतो—त्यांना चिरंतन करणारा असतो व तो विस्मृतीचा उघड उघड वैरी असतो. गतगोष्टींचा तो जसा साक्षीदार असतो तसाच भावी कालाचा तो मार्गदर्शक असतो. प्रस्तुतच्या इतिहासात तुम्हाला लागतील तितके विविध प्रसंग अत्यंत चटकदार पद्धतीने वाचावयास मिळतील असे मी आश्वासन देतो. जर कोठे तुमच्या अपेक्षेपेक्षा हा इतिहास कमी पडला तर तो दोष त्या पाखंडी लेखकाचा आहे, वर्ण्यविषयाचा नाही असे माझे मत आहे. म्हणून आता आपण दुसऱ्या खंडाकडे वळू. आपल्या भाषांतराप्रमाणे त्याचा प्रारंभ पुढील-प्रमाणे आहे :

त्या दोन संतप्त वीरांच्या मुद्रा उग्र व भयंकर दिसत होत्या. त्यांनी आपले हात वर उचललेले होते आणि आपल्या हातांतील संहारक शस्त्रानी ते स्वर्ग, पृथ्वी आणि पाताळ यातील प्रासाद यांचा विध्वंस करणार आहेत की काय असे वाटत होते. तेथे जमलेले प्रेक्षक भय व विस्मय यामध्ये पार बुडून गेल्याचे दिसत होते. क्रोधायमान झालेला बिस्केनर याने पहिला आघात केला तो इतक्या त्वेषाने व भयंकर आवेशाने की, त्याच्या हातातील तलवार हातातच फिरली नसती तर, तिच्या एकाच घावाने त्या भीषण प्रतिस्पर्ध्याचा आणि त्याच्या पुढील सर्व साहसी कृत्यांचा सोक्षमोक्ष झाला असता. परंतु आमच्या सरदारजींना महत्कृत्यासाठी नशिबाने शाबूत ठेवले, आणि म्हणून असे घडवून आणले की, त्यांच्या वैऱ्याची समशेर फिरली— तीहि अशा खुबीने की, त्यांच्या डाव्या खांद्यावर तिचा वार बसला तरी डोक्याची ती बाजू निःशस्त्र करण्यापलिकडे सरदारजींची

दुसरी काहीही हानी झाली नाही. फक्त त्यांच्या शिरस्त्राणाचा मोठा टवका उडाला आणि त्यांच्या कानाचा अर्धा भाग कापला गेला व ते दोन्ही तुकडे जमिनीवर पडले– भयानक अवशेषासारखे–आणि त्यानंतर—

हे स्वर्गस्थ देवतांनो ! पुढील वर्णन करण्याचे कामी मला मदत करा. पण ते होणे नाही. ला मांचा येथील आपल्या वीर पुरुषाच्या अंतःकरणात जो संताप भरून राहिला तो वर्णन करण्यापलीकडचा होता. शब्दांनी त्याचे वर्णन करणे म्हणजे त्याची हानी करणे होय. त्यांचा क्रोध वर्णनातीत होता. त्याचे ओझरते चित्रण किंवा अस्पष्ट आकृती रेखाटण्यास कोणते भाषासौंदर्य समर्थ होईल ? आपले सर्व सामर्थ्य खर्ची घालून ते रिकिबीत उंच उभे राहिले आणि होते त्यापेक्षा मोठे दिसू लागले. त्याच क्षणी त्यांनी दोन्ही हातांनी तलवार घट्ट धरून ब्रिस्केनरच्या उशीवर व डोक्यावर असा काही प्रचंड आघात केला की, एखादा अवाढव्य पर्वतच आपल्या अंगावर कोसळत आहे असे वाटून बिस्केनर याने मोठ्या शर्थीने आपला बचाव केला. तरीसुद्धा त्याच्या तोंडातून, नाकातून व कानातून एकदम रक्त उसळून बाहेर वाहू लागले. आणि तो स्वतः आपल्या खोगिरावर इतका डळमळू लागला की, त्याने जर आपल्या खेचराची मान पकडली नसती, तर तो जमिनीवर तत्काळ कोसळला असता. पण त्या भीषण आघाताने ते सुस्त जनावरसुद्धा आपला नेहमीचा मठ्ठपणा टाकून देऊन त्या रानात सैरावैरा पळत सुटले. बिस्केनर यांचा रिकिबीवरचा पाय आणि खेचरावरील ताबा सुटला. त्या खेचराने दोन-तीन हिसके मारले आणि आपल्या मालकाला जमिनीवर फेकून दिले.

आपल्या शत्रूचा धुव्वा उडालेला डॉन क्विक्झोट यानी अत्यंत शांत चित्ताने व कल्पनातीत निर्विकारतेने पाहिला. तो खाली कोसळल्याचे पाहून क्विक्झोट आपल्या खोगिरावरून हलकेच उतरले आणि त्या शत्रूकडे धावत जाऊन त्यानी त्याच्या गळ्यावर आपल्या तलवारीचे टोक टेकले. "शरण ये, नाहीतर तुझे मुंडके उडवितो," असे ते गरजले. ब्रिस्केनरचे डोके सुन्न झाले होते. तो उत्तर देऊ शकत नव्हता. डॉन क्विक्झोट यांनी आपली धमकी नक्कीच खरी करून दाखवली असती. तितके प्रक्षुब्ध झालेच होते ते ! पण तो सारा शोचनीय प्रकार मोठ्या अस्वस्थ वृत्तीने व भयाने गाडीत बसून पाहणाऱ्या त्या महिला तेथे धावत गेल्या आणि बिस्केनरचे प्राण वाचवण्याची प्रार्थना डॉन क्विक्झोट याना अत्यंत तळमळीने करू लागल्या. तेव्हा मोठ्या गांभीर्याने व उदात्ततेने तो विजयी वीर म्हणाला, " सुंदर स्त्रियांनो, खरोखर मी तुमची विनंती मान्य करण्यास तयार आहे, पण एका अटीवर. ती अट ही की, या सरदाराने टोबोसो येथे जावे आणि माझे नाव सांगून त्या अतुल्य महिलेपुढे–लेडी डोन्ना डल्सिनियापुढे–हजर व्हावे. म्हणजे ती महिला आपल्याला सोयीची वाटेल त्या रीतीने याची विल्हेवाट लावील. असे करण्याचे वचन या पराभूत सरदाराने मला दिले पाहिजे." ती स्त्री इतकी भेदरलेली होती की, तिचा बहुतेक सारा सारासार–विचार नष्ट झाला होता. डॉन क्विक्झोट यांनी कोणती आज्ञा केली आहे, याचा विचार न करता व डल्सिनिया ही महिला कोण आहे याची

चौकशी न करता, त्या स्त्रीने आपल्या सोबत्याच्या वतीने असे अभिवचन क्विक्झोट यांना दिले की, " आपले आदेश तंतोतंत पाळले जातील. " तेव्हा डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, " तर मग हा जिवंत राहील. आपल्या शब्दासाठी मी त्याला दया दाखवतो. त्याच्या उद्धटपणामुळे मी त्याला ती नाकारली असती, पण आपल्या मध्यस्थीमुळे मी त्याला दया दाखवतो. "



## प्रकरण २

# यानंतर डॉन क्विक्झोट यांचा बिस्केनर यांच्याशी कोणता प्रसंग घडून आला आणि त्यांना कोणत्या धोक्याला तोंड द्यावे लागले याचा वृत्तांत.

यापूर्वीच सँको पँझा उठून उभा राहिला होता. महंताच्या सेवकानी त्याच्या मृतवत शरीरावर ज्या लाथा व ठोसे मारले होते त्यामुळे तो विव्हळत होता. आपला धनी युद्धात गुंतलेला आहे हे पाहून तो भक्तिभावाने प्रार्थना करू लागला, " प्रभो, माझ्या धन्याला यश दे, म्हणजे तो एखादे बेट जिंकून घेईल आणि मला त्या बेटाचा अधिपती करील-कारण तसे करण्याचे त्याने मला अभिवचन दिलेले आहे. " शेवटी त्याने जेव्हा पाहिले की, संकट दूर झाले आहे, संग्राम संपलेला आहे आणि आपला स्वामी अश्वारूढ होण्याच्या तयारीत आहे, तेव्हा तो त्याला मदत करण्यासाठी अत्यंत वेगाने धावत गेला. सरदारजींनी रिकिबीत पाय ठेवण्यापूर्वी, सँको त्यांच्यापुढे गुडघे टेकून व त्यांच्या हाताचे चुंबन घेऊन मोठ्याने म्हणाला, " स्वामी डॉन क्विक्झोटसाहेब, आपण या भीषण व तुमुळ रणकंदनामध्ये जे बेट जिंकले असेल त्याचा अधिपती महा-राजांनी मला करावे, अशी माझी विनंती आहे. जगातील कोणत्याही बेटाचे अधिराज्य कोणी जितक्या उत्तम प्रकारे केले असेल, तितके या बेटाचे शासन मी करू शकेन असे मला वाटते. "

यावर डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " बंधो सँको, या आपल्या मोहिमी बेटे जिंकण्यासाठी नाहीत. या केवळ रस्त्यावरील चकमकी होत. त्यांच्यापासून फुटकी कवडी किंवा कापलेला कान- यापेक्षा अधिक काही मिळणार नाही. म्हणून धीर धर. एखादा साहसाचा प्रसंग आपोआप उद्भवेल. मग मी तुला राज्यंच काय, पण त्याहून अधिक काही तरी देऊ शकेन. " सँकोने त्यांचे आभार मानले आणि त्यांच्या हाताचे व चिल-खताच्या काठाचे पुन्हा एकदा चुंबन घेतले. क्विक्झोट यांना रोझिनांटवर आरूढ होण्यास त्याने हातभार लावला आणि स्वतः आपल्या गाढवावर उडी मारून तो बसला व आपल्या वीर-पुरुषाच्या मागोमाग जाऊ लागला. गाडीतील माणसांचा निरोप न घेता क्विक्झोट यानी वेगाने घोडा पिटाळला आणि जवळच असलेल्या रानात दौड ठोकली. त्यांच्या पाठोपाठ सँकोने आपले गाढव जास्तीत जास्त जलदीने पिटाळले, पण रोझिनांटने त्याला मागे टाकले. तेव्हा त्याला आपल्या धन्यास थांबण्यास सांगावे लागले. त्याप्रमाणे डॉन क्विक्झोट यांनी आपल्या घोड्याचा लगाम खेचला, आणि सँकोला आपल्या जवळ

येण्याची संधी दिली. धन्याच्या जवळ जाऊन पोचताच तो भयभीत सेवक म्हणाला, "महाराज, धोक्याच्या पलीकडे जाण्यासाठी आपण एखाद्या प्रार्थनामंदिराचा आश्रय केला, तर ते चुकीचे होणार नाही असे मला वाटते. कारण आपण ज्या माणसाशी सामना दिला तो जर ठीक राहिला नाही तर, ( चोरांचा बंदोबस्त करणाऱ्या ) 'होली ब्रदर हुड' या संस्थेकडून ते लोक वॉरंट मिळवतील हे मी माझ्या प्राणाची शपथ घेऊन सांगतो, आणि एकदा का त्यांना ते वॉरंट मिळाले म्हणजे त्यांच्या पंज्यातून सुटणे आपल्याला कठीण जाईल, हे मी ठामपणे सांगतो."

हे ऐकून डॉन क्विक्झोट रागाने म्हणाले, "गप्प बैस, मूर्खा. एखाद्या शिलेदाराने कोणाचा वध केला तर त्याबद्दल त्याला न्यायासनासमोर उभे केल्याचे तू कधी वाचले आहेस का पाहिले आहेस?"

"महाराज, आपल्या या प्रवचनाचा अर्थ काय आहे हे मी सांगू शकत नाही. मी माझ्या आयुष्यात असे उदाहरण कधीच पाहिलेले नाही. पण मला हे पक्के माहीत आहे की, रानात एकमेकांचे खून करणाऱ्या लोकांवर कायदा नियंत्रण ठेवतो. आपण आपल्या कृत्यांना जे काही नाव द्याल, त्याबद्दल मला काहीच म्हणावयाचे नाही."

तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "भल्या सँको, मग घाबरू नकोस. मी तुला खाल्डियनांच्या हातून सोडवीन. त्यापेक्षाही सहज त्या 'होली ब्रदर हुडच्या' तावडीतून. पण मित्रा, मला खरे खरे सांग, शौर्याच्या बाबतीत माझ्याशी बरोबरी करण्याचे सोंग आणू शकेल, असा एखादा तरी सरदार अलम दुनियेत असेल असे तुला वाटते काय? कार्य करण्याचा निश्चय, हल्ला करण्याची ताकद, आघात सहन करण्याची शक्ती, वार करण्याचे कौशल्य व कृती आणि शत्रूला अस्मानात उडवून लावण्याची कला व हिंमत या साऱ्या बाबतींत माझ्याहून सरस कोणी असल्याचे तू इतिहासात कधी वाचले आहेस काय?" हा प्रश्न ऐकून सँकोने उत्तर दिले, "छे छे, मुळीच नाही. सत्याला स्मरून सांगतो, इतिहासात आपल्यासारखा कोणी वीर मला आढळला नाही. कारण, मला लिहिता येत नाही की वाचता येत नाही. पण मी पैज मारून सांगतो की, आपल्यापेक्षा अधिक शूर पुरुषाची सेवा माझ्या हातून उभ्या आयुष्यात घडलेली नाही. ज्या संकटाची काळजी घेण्याबद्दल मी आपल्याला सावध राहण्याचा इशारा दिला, ते आपल्यावर आपल्या त्याच शौर्यामुळे कोसळू नये, अशी मी प्रभूची प्रार्थना करतो. सध्या मी आपल्याला एवढेच सांगू इच्छितो की, आपण आपल्या कानाची काळजी घ्या. कारण त्यातून पुष्कळ रक्त वाहत चालले आहे. माझ्या पेटीत थोडा कापूस व थोडे मलम आहे."

तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी जर बॅलॅसम झाडाच्या चिकाची माझी छोटी बाटली आणली असती, तर हा सारा खटाटोप व्यर्थ ठरला असता. त्या चिकाच्या एका थेंबाने आपला किती तरी वेळ वाचला असता आणि उपचार करण्याचे टळले असते."

"कसला आहे तो चीक? कृपा करून मला सांगाल?" सँकोने विचारले,

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " त्या चिकाची माहिती माझ्या डोक्यात आहे. थोडाही चीक ज्याचेजवळ असेल, तो मृत्यूची पर्वा करणार नाही आणि कोणत्याही जखमेची शुश्रूषा करण्यात वेळ दवडणार नाही. म्हणून मी जेव्हा तो चीक आणीन आणि तुला देईन, तेव्हा शिलेदारांच्या सवयीप्रमाणे कोणी उलट घाव घातला आणि दुर्दैवाने माझ्या देहाचे दोन तुकडे झालेले तुला आढळले, तर तू दुसरे काही एक न करता, जमिनीवर पडलेला माझा एक तुकडा हलकेच वर उचल आणि रक्त सुकण्यापूर्वी, खोगिरावरील माझ्या दुसऱ्या तुकड्याला तो तुकडा जोड–अगदी योग्य ठिकाणी तो जोडण्याची नीट काळजी घे. नंतर मला त्या चिकाचे दोन थेंब दे म्हणजे मी पहिल्या-सारखा धडधाकट व पूर्ण झाल्याचे तुला तत्काळ आढळून येईल."

सँको म्हणाला, " हे जर खरे असेल, तर मला बेट बहाल करण्याच्या वचनातून मी आपल्याला याच क्षणी मुक्त करतो–किंबहुना, मी जी सेवा केली आणि यापुढे जी करीन, त्यासाठी त्या चिकाशिवाय मला दुसरे काहीही नको. तो चीक मिळाल्यावर मी कोठेही गेलो, तरी त्याच्या औंसभर वजनामागे मला तीन खणखणीत रिआल मिळतील आणि त्यातून माझा चरितार्थ उत्तम प्रकारे चालेल, याविषयी मला काडीमात्र शंका नाही. पण महाराज, त्यासाठी आपल्याला फार परिश्रम करावे लागणार आहेत काय ?"

" छे छे, तीन रिआल नाण्यात तीन शेर चीक तयार होईल."

" मग आताच आपण तो तयार का करत नाही ? आणि तो तयार करण्याची विद्या मला का शिकवीत नाही ?" सँको आनंदाच्या भरात म्हणाला. तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " मित्रा सँको, आणखी काही बोलू नकोस. मी तुला याहून किती तरी मोठमोठी रहस्ये सांगणार आहे आणि मोठमोठी बक्षिसे मिळवून देणार आहे. तोपर्यंत माझ्या कानाला मलमपट्टी बांध. कारण, माझ्या कल्पनेपेक्षा तो जास्त दुखत आहे." मग सँकोने आपल्या पेटीतून कापूस व मलम काढले. पण, आपल्या शिरस्त्राणाचा पुढील भाग भग्न झालेला जेव्हा डॉन क्विक्झोट यांना दिसला, तेव्हा त्यांना वेड्यासारखे धावत सुटावे असे वाटले. आपल्या समशेरीवर हात ठेवून व आकाशाकडे डोळे लावून ते ओरडले, " त्या विश्व–विधात्याची शपथ घेऊन, धर्मग्रंथातील प्रत्येक शब्दाची शपथ घेऊन मी जाहीर करतो की, मांटुआच्या महान मार्क्विसप्रमाणे मी व्रत घेतो; आपला पुतण्या बाल्डविन ह्याच्या मृत्यूचा सूड घेईपर्यंत टेबलावर अन्नग्रहण कधीही करणार नाही, आपल्या प्रिय शय्या–सोबतिणीसह झोपणार नाही, आणि सध्या माझ्या स्मरणातून गळलेली आणखीही अनेक बंधने स्वीकारण्याचे व्रत त्याने घेतले होते. त्यांच्यापेक्षा माझे व्रत कमी कठोर असणार नाही. ज्याने माझी ही हानी केली, त्याचा पुरेपूर सूड उगवेपर्यंत मी तसेच व्रत पाळीन."

( अशी भीषण प्रतिज्ञा ऐकून चकित झालेला ) सँको म्हणाला, " महाराज, आपण काय करीत आहा याचा विचार करा. आपल्या आज्ञेनुसार जर तो शिलेदार वागला असेल आणि टोबोसोच्या देवी डल्सिनियाकडे जाऊन तिच्यापुढे त्याने लोटांगण

घातले असेल तर आपण दोघेही दोषमुक्त आहा. त्या माणसाने आपली काही नवी खोडी काढली नाही तर नव्या शिक्षेला तो पात्र होणार नाही." तेव्हा डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, "हे तू मला चांगले सांगितलेस. म्हणून सूडाच्या बाबतीतील माझी शपथ परत घेतो. पण, माझ्याइतके चांगले शिरस्त्राण असलेल्या कोणा शिलेदाराला मी माझ्या शस्त्र–बळाने विरूप करीपर्यंत मी बाकीची माझी शपथ पुन्हा घेतो आणि नक्की करतो. त्या शपथेनुसार जीवन व्यतीत करण्याची घोषणा मी गंभीरपणे करतो. सँको, मी ही घोषणा पाला–पाचोळ्याप्रमाणे हलकी–फुलकी मानीत नाही. पूर्वीचा प्रशंसनीय दाखला माझ्यापुढे आहे. तो इतका अधिकृत आहे की, त्याचे अनुकरण मी करणे योग्यच ठरेल,. मॅम्ब्रिनोच्या शिरस्त्राणाला असाच अपाय घडला आणि त्याबद्दल सॅक्रिपॅंटेला भारी किंमत द्यावी लागली."

तेव्हा सँको म्हणाला, "महाराज, असले सारे शिव्याशाप आणि साऱ्या शपथा खड्ड्यात जाऊ देत. आपल्या आत्म्याच्या किंवा देहाच्या आरोग्याचे दृष्टीने हे अत्यंत घातक आहे. त्यापेक्षा वाईट ते काय असणार? शिवाय समजा, शिरस्त्राणधारी माणूस आपल्याला यावेळेत भेटला नाही, तर आपली अवस्था किती शोचनीय होईल? आपल्याला महिनोन्महिने जमिनीवर निर्जन स्थानी निजावे लागेल आणि असेच दुसरे किती तरी हाल भोगावे लागतील. मांटुआचा तो मूर्ख म्हातारा मार्क्विस आपल्या शपथेमुळे असे हजारो हाल भोगीत राहिला. तसे करून आपण आपली शपथ पाळणार काय? नुसती कल्पना करा, ज्याच्याशी भांडण उकरून काढावे असा एखादा सशस्त्र शिलेदार या रस्त्याने जाताना आपल्याला भेटण्यासाठी किती काळ रखडावे लागेल? कारण येथे हमाल व हातगाडीवाले यांचेशिवाय दुसरे कोणीच नाही आणि त्यांच्या डोक्यावर तर शिरस्त्राण असणे सुतराम् शक्य नाही. त्यांनी आपल्या साऱ्या आयुष्यात अशा वस्तूचे नावही ऐकले नसेल."

यावर डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, "चुकतो आहेस तू, मित्रा सँको. अल्ब्राकाला वेढा घालून सुंदर अँजेलिकाला पळविण्यासाठी जेवढे लोक जमले होते, त्यापेक्षा अधिक सशस्त्र लोक या रस्त्यावर आपल्याला दोन तासांच्या आत भेटतील." सँको उद्गारला, "ठीक आहे, तसेच होऊ द्या. आपली फत्ते होऊ दे, आणि आपल्याला तत्काळ बेट जिंकता येऊ दे. ते मला इतके प्रिय आहे की, त्यासाठी कोणत्याही संकटाची तमा मी करीत नाही." यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, "या बेटाच्या बाबतीत तू आपल्या डोक्याला शीण देऊ नकोस, असे मी तुला पूर्वीच सांगितले आहे. कारण, आपल्या हातून बेट हुकले, तर डेन्मार्कचे किंवा सोब्राडिसाचे राज्य आहेच. तुझ्या बोटाला आंगठी बरोबर बसावी, तसे ते राज्य तुला योग्य ठरेल, आणि ही दोन्ही राज्ये म्हणजे नंदनवनच होत. त्यामुळे तुला मोठे समाधान प्राप्त होईल. पण यासंबंधी आपण योग्य वेळी बोलू. यावेळी तू एवढेच पाहा की, तुझ्या पडशीत खाण्याजोगे काही पदार्थ आहेत का? नंतर आपण एखाद्या किल्ल्याचा तपास करू आणि आज रात्री तेथे मुक्काम

करू व मी तुला पूर्वी सांगितलेले मलम तेथे बनवू. कारण आता माझा कान अत्यंत ठणकत आहे. ''

यावर तो सेवक म्हणाला, " माझ्याजवळ एक कांदा, थोडे लोणी आणि शिळ्या पावाचे थोडे तुकडे आहेत. पण आपल्यासारख्या वीर पुरुषाला हे रुक्ष जेवण काय कामाचे ? "

" छे, छे, मित्रा सँको, तू चुकत आहेत. काहीहि न खाता महिनेच्या महिने काढणे हे वीराचे भूषण आहे आणि जेव्हा ते अन्न सेवन करतात तेव्हा, जे खाद्य पदार्थ प्रथम पुढे येतील त्यांच्यावर ते तुटून पडतात; मग ते घरच्यासारखे नसेनात का. मी वाचले तितके ग्रंथ तू वाचले असतेस तर हा मुद्दा तुला चटकन पटला असता. कोणाही माणसाने वाचले नसतील इतके वीरकथांचे ग्रंथ मी माझ्या आयुष्यात वाचले आहेत असे मला वाटते. पण मला असे आठवत नाही की, वीर-पुरुषांनी कधी योगायोगाशिवाय अन्नग्रहण केले आहे. मोठ्या मेजवान्यांचे किंवा राजेशाही खान्यांचे निमंत्रण असल्याशिवाय ते वीरपुरुष कधी काही खात नाहीत. एरवी ते आपल्या विचाराबरोबरच अल्प अन्नाचे सेवन करीत असतात. काही झाले तरी ते वीरही मर्त्य मानव होत. मानवी प्रकृतिनुसार असलेल्या भुका भागविल्याशिवाय ते जिवंत राहू शकतील अशी कल्पना करण्याचे कारण नाही. तथापि हे गृहीत धरले पाहिजे की, त्यांच्या जीवनातील पुष्कळसा काळ अरण्यात व ओसाड मैदानात जात असल्याने आणि त्यांच्याबरोबर स्वयंपाकी नसल्याने, त्यांचे नित्याचे भोजन म्हणजे तू आता मला दिलेस तसलेच खेडवळ कंगाल जेवण असते. म्हणून दोस्ता, मला काय आवडेल या विचाराने तू बेचैन होऊ नकोस किंवा नवी सृष्टी निर्माण करण्याचे सोंग आणू नकोस आणि शिलेदारीच्या प्राचीन परंपरा व मूलभूत घटना उद्-ध्वस्त करू नकोस. "

तेव्हा सँको म्हणाला, " महाराज, मी आपली क्षमा मागतो. कारण मी विद्वान नाही. त्यामुळे तुमच्या शिलेदारीच्या नियमातील काही प्रमुख गोष्टी मला माहीत नस-ण्याचा संभव आहे. पण अतःपर मी माझ्या भेटीत आपल्यासाठी सुक्या मेव्याचे सारे प्रकार भरून ठेवीन. कारण आपण एक थोर शिलेदार आहा आणि मी तसा नाही. यापुढे मी कोंबडी वगैरे सकस खाद्यपदार्थ जवळ बाळगीन. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " शिलेदाराने पूर्णपणे फलाहारावर राहावे असे मी म्हणत नाही. ते त्यांचे नित्याचे खाणे होते, एवढेच मी म्हणतो. रानात इतस्ततः हिंडताना त्याना जी कंदमुळे व वनस्पती सापडत, त्या सर्वांचे पूर्ण ज्ञान त्यांना असे. मलाही ते आहे. त्या सर्वांचा उपयोग ते खाण्यासाठी करीत. "

सँको म्हणाला, " त्या वनस्पतींचे ज्ञान असणे चांगले. माझा फार गोंधळ उडतो. तसे ज्ञान झाल्याने लौकरच आपली घडी नीट बसेल. तोपर्यंत ईश्वराने जे पाठविले आहे, ते आपण सेवन करावे." असे म्हणून त्याने आपल्याजवळील खाद्यपदार्थ बाहेर काढले. ते

त्या दोघांनी एकत्र बसून पोटभर खाल्ले. त्या रात्री आपण मुक्काम कोठे करावा हे शोधण्या-साठी ते दोघे उतावीळ झाले होते. म्हणून त्यांनी आपले साधे जेवण संपुष्टात आणले आणि दोघेही स्वार झाले व रात्र पडण्याचे आत निवास–स्थानाचा शोध करण्यासाठी दूर निघाले. परंतु सूर्याबरोबरच त्यांच्या आशाही अस्त पावल्या. ते ज्या ठिकाणी पोचले तेथे काही धनगरांनी आपल्या छोट्या झोपड्या उभारलेल्या होत्या. तेथेच त्या रात्री मुक्काम करण्याचे त्यांनी निश्चित केले. सँकोला सुंदर नगरीत मुक्काम करण्याची इच्छा होती. त्या झोपड्या पाहून त्याला मोठा अपमान वाटला, पण त्याच्या धन्याला तेथे आनंद वाटला. उघड्या शेतात निजावे असे क्विक्झोट यांना वाटे. जितक्या वेळा आपण तसे करू, तितक्या वेळा आपली सरदारकीची किताबत पक्की होईल, असा त्यांना विश्वास वाटे.



## प्रकरण ३

# डॉन क्विक्झोट व धनगर यांच्यामध्ये काय घडले ?

सरदारजींचे स्वागत धनगरांनीं अत्यंत अदबीने केले. सँकोने रोझिनांट व आपले गाढव यांची शक्य तितकी व्यवस्था लावून, कोकराच्या मासाचा वेधक वास जिकडून येत होता तिकडे आपली पावले तत्काळ वळविली. चुलीवरील भांड्यात त्या मांसाचे तुकडे शिजत होते. ते त्या भांड्यातून आपल्या पोटात ढकलण्यास योग्य आहेत की काय, याची परीक्षा ताबडतोब घेण्यास तो भुकेला शागीर्द तयार होता; पण त्याला ती तसदी घ्यावी लागली नाही. कारण धनगरांनी ते मांस-खंड चुलीवरून काढून घेतले आणि मेंढरांचे कातडे जमिनीवर पसरून त्यानी लौकरच आपल्या गावढळ मेजवानीचा बेत रचला. आपल्याजवळील खाद्यपदार्थांत भाग घेण्यासाठी त्यांनी सँको व त्याचा धनी यांना आनंदाने पाचारण केले. नंतर त्यानी खेडवळ पद्धतीने व रानवट शब्दांनी क्विक्झोटना अभिवादन करून त्यांना एका उपड्या पिपावर बसण्याची विनंती केली. त्या टोळीत जे सहा लोक होते, ते सारेजण त्या कातड्याभोवती जमिनीवर बसले. आपल्या धन्याची सेवा करण्यासाठी व धनगरांच्या वापरांतील शिंगाच्या पेल्यातून त्याला दारू देण्यासाठीं सँको उभा राहिला होता. पण आपला नोकर मागे उभा आहे हे पाहून क्विक्झोट त्याला म्हणाले, " सँको, शिलेदारीचे लाभ तुला कळावेत आणि शिलेदारांच्या कनिष्ठतम शागीर्दालाही जगाची मान्यता व मानसन्मान मिळण्याची किती संधी असते, हे तुला समजावे म्हणून, मी तुला खुषीने सांगतो की, या सज्जनांच्या सहवासात तू माझ्या सन्निध बसावेस. मी तुझा स्वभावतः स्वामी व प्रभू असलो तरी, तुझ्यामाझ्यामध्ये आता कोणताही भेदभाव पाळला जाऊ नये – एकाच ताटात आपण जेवू आणि एकाच पेल्यानें आपण मद्य प्राशन करू. जसे प्रेम सर्वांना समान लेखते, तशीच शिलेदारी असते, असें म्हटले गेले पाहिजे. "

सरदारजींचे आभार मानून सँको म्हणाला, " माझ्यापुढे विपुल मांस असले तर त्याचा फन्ना मी एकटा उभा राहून उडवीन. पण आपल्याला स्पष्ट नि सत्य सांगावयाचे तर, एखाद्या सम्राटाजवळ बसून दुसऱ्याच्या टेबलावर ठेवलेले कोंबड्याचे मांस मटकावणे– आणि तासभर ते मिटक्या मारीत खात असल्याचे दाखवणे, अगदी थोडे पाणी पिणे, एकसारखे आपले हात नि मांसाचे तुकडे धुणे, कधी खोकण्या–शिंकण्याचे धाडस न करणे, तात्पर्य, माणूस एकटा असताना मोकळेपणी ज्या ज्या गोष्टी करतो त्या न करणे,

हे मला आवडत नाही. त्यापेक्षा, काहीही गाजावाजा किंवा थाटमाट न करता, कोपऱ्यात बसून कांदा–भाकरी खाणे मी जास्त पसंत करीन. म्हणून, धनीमहाराज, आपला नोकर असल्यामुळे आपण माझ्यावरील आपल्या लोभाचे जे प्रदर्शन करीत आहा, ते न करता माझ्या कल्याणाच्या काही गोष्टी आपण कराव्यात. आपण माझा जो बहुमान करीत आहात, तो स्वीकारल्याइतकेच मी आपले आभार मानतो. पण त्यांचेवरील माझा हक्क मी या क्षणापासून जगाच्या अंतापर्यंत सोडून देत आहे. ”

सँकोचे हे भाषण ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, “ चूप, अधिक काही न बोलता माझ्याजवळ बैस. कारण, नम्र माणसेच थोर पदी पोहोचतात. ” असे म्हणून व त्याचा हात ओढून, त्यांनी त्याला आपल्याजवळ बसवून घेतले.

शिलेदारी, दाक्षिण्य आणि शागिर्दाचा मान–सन्मान, यांचा कोलाहल त्या धनगरांना काही कळला नाही. काही न बोलता ते पोटभर जेवले आणि आपल्या पाहुण्याकडे टक लावून पाहू लागले. त्या दोघा पाहुण्यांनी त्या साऱ्या पदार्थांचा चट्टामट्टा केला. त्यांना तशीच भयंकर भूक लागली होती आणि त्यांच्यापुढे मुठीत मावतील एवढेच पदार्थ होते. पहिले वाढप संपले. ओक वृक्षाच्या सुक्या बिया आणि विटेसारखा घट्ट खारा चक्का–यांचे दुसरे वाढप आले. हे सर्व होत असताना, शिंगाचा पेला स्वस्थ नव्हता. तो एकसारखा मजेत खालीवर जात–येत होता–केव्हा तो भरलेला असे तर केव्हा रिकामा असे–रहाटगाडग्यातील पोहऱ्यासारखा. तेव्हा तो पकडून मद्य प्राशन करण्यासाठी ते दोघे पाहुणे पुढे सरकले. आता, डॉन क्विक्झोट यांची क्षुधा शांत झाली होती. आपल्या हातात ओक वृक्षांच्या बिया घेऊन व त्याकडे एकाग्रतेने पाहून ते म्हणाले : “आपले पूर्वज ज्याला ‘ सुवर्ण–युग ’ म्हणत होते, ते आता अवतरले आहे. सध्याच्या ‘ लोह–युगात ’ सुवर्णाची पूजा बांधली जात आहे. पण प्राचीनकाळी ते सहजासहजी उपलब्ध होते म्हणून त्या कालाला ‘ सुवर्णयुग ’ म्हणत होते असे नव्हे, तर त्या भाग्यशाली काळात नांदणाऱ्या लोकांना, ‘ तुझे–माझे ’ या घातक शब्दांनी निर्माण होणारे भेदभाव अज्ञात होते. त्या त्रेतायुगात सर्वांना साऱ्या वस्तू सारख्या मिळत. माणसानी आपल्या चरितार्थासाठी आपले हात वर उचलले की झाले, त्यांना प्रचंड ओक वृक्ष आपल्या बिया खावयास देत. आपली पौष्टिक व मधुर फळे घेऊन जाण्यासाठी ते ओक मानवांना, आपल्या शाखांचे हात पसरून, उदारपणे पाचारण करीत. निर्मळ झरे आणि चांदीसारख्या चमकणाऱ्या छोट्या छोट्या नद्या, आपले स्वच्छ व उत्साहवर्धक असे विपुल जल मानवांना अर्पण करीत. झाडांच्या पोकळीत आणि खडकांच्या भेगांत, उद्योगी व परिश्रमशील मधमाशा, आपली छोटी छोटी प्रजासत्ताक राज्ये उभारीत. त्यांच्या परिश्रमातून निघणारे, मधुर व विपुल पीक मानवांना सहजा-सहजी आनंदाने घेता येत असे. टणक व कणखर असे कॉर्क वृक्ष केवळ आपल्या उदार स्वभावामुळे आपली रुंद व हलकी साल टाकून देत असत आणि मानवाच्या उपयोगी

पडत असत, आणि हवामानाच्या तीव्रतेपासून बचाव करण्यासाठी मानवाने चार ओबड-धोबड खांबांच्या आधाराने ज्या बुटक्या झोपड्या उभारलेल्या असत, त्यांच्यावर छप्पर म्हणून त्या कॉर्कच्या सालींचा उपयोग होत असे. अहाहा ! त्या काळी साऱ्या जगात सर्वत्र ऐक्य होते, प्रेम होते, शांतता होती, मैत्री होती, आपल्या काटकसरी बाळांना संतोष, आनंद व स्थैर्य देणाऱ्या साऱ्या वस्तू आपल्या विशाल व सुपीक अंतःकरणातून धरणीमाता मोठ्या प्रेमाने देत असे. त्यासाठी तिच्यावर सक्ती करावी लागत नसे, आणि म्हणून तिच्या पवित्र पोटात नांगर घुसविण्याचा अत्याचार कोणाही शेतकऱ्याला करावा लागत नसे.

"तो काळ असा होता की, जेव्हा धनगरांच्या निष्पाप व सुंदर अशा तरुण मुली डोंगरदऱ्यातून उड्या मारीत धावत जात असत. कधी त्या आपल्या कुरळ्या केसांच्या वेण्या घालीत, तर कधी आपले केस सैल व मोकळे ठेवीत. अब्रू-रक्षणासाठी शरीराचे जे अवयव झाकणे अवश्य ते नीटपणे झाकण्यापुरतेच कपडे त्या मुली घालीत. सांप्रत काळी, टिरियन रंग व रेशमाचा झळाळीचा गडद रंग यांच्या मिश्रणाने जे नाना रंग निर्माण होतात आणि भव्य व मनोहर मानले जातात, ते त्या काळातील निष्पाप व साध्याभोळ्या मुलींना माहीत नव्हते. पण त्याहून अधिक मोहक अशा पानाफुलांनी त्या आपले शरीर असे काही सजवीत की, आपल्या काळातील भपकेबाज पोशाख करणाऱ्या रूपाढ्य ललनांनाही त्यांनी मागे सारले असते. आताच्या ललना अत्यंत झकपक पोशाख करतात आणि आपला दर्प तृप्त करण्यासाठी नानाविध मूल्यवान भूषणे परिधान करतात. आलस्य व विलास यातून निर्माण होणारा हा भपकेबाजपणा तेव्हा अज्ञात होता. तेव्हाचे प्रियकर आपल्या अंतरीच्या भावना अंतःकरणाच्या अकृत्रिम भाषेत बोलून दाखवीत. त्या भावना मुळात जितक्या साधेपणाच्या व कळकळीच्या असतील तशाच व्यक्त केल्या जात. कृत्रिमतेची छटाही त्यावर नसे. कृत्रिमतेमुळे इष्ट परिणाम नष्ट होतो. दंभ, कपट व मत्सर यांचा तेव्हा उदय झाला नव्हता, आणि सत्य व साधेपणा यांचा बुरखा घेऊन ते दोष मानव-समाजामध्ये अनिर्बंध संचार करू लागले नव्हते. न्याय सर्वांना समानतेने व निःपक्षपाताने मिळत असे. लाभाने किंवा स्वार्थाने तो डागाळलेला नसे. सध्या न्याय लोभाने किंवा स्वार्थाने अत्यंत विकृत झालेला आहे, तसा तेव्हा तो नव्हता. न्यायाधीशाची लहर म्हणजेच कायदा, अशी स्थिती तेव्हा नव्हती. कारण, तेव्हा न्याया-धीश नव्हते आणि निवाडा करण्याचे कज्जेही नव्हते. कोणीही विनम्र युवती आपल्या इच्छेला येईल तिकडे, एकटी जाऊ शकत असे—असभ्य व कामुक अशा लोचट लोकांच्या हृदयापासून ती मुक्त असे. परंतु सध्याच्या भ्रष्ट युगात लबाडी आणि इतर असंख्य दोष यांनी जगाला सतावून सोडले आहे. त्यामुळे कोणताही सद्गुणी माणूस सुरक्षित राहिलेला नाही—कोणाचीही अब्रू शाबूत राहिलेली नाही. उलट स्वैर इच्छांनी माणसांच्या हृदयाचा ताबा घेतला आणि त्यामुळे अत्यंत कर्मठ माणसे व गूढ निवासस्थाने भ्रष्ट झाली आहेत. क्रेटच्या गुंफेसारखी गुंतागुंतीची व अज्ञात स्थानेही कोणाचे शील सुरक्षित

ठेवू शकत नाहीत. समाजाच्या प्रारंभीच्या काळातील निरागसता अशा प्रकारे नष्ट झाल्यामुळे आणि जुलुमाचा जोर दिवसेंदिवस वाढत गेल्यामुळे अत्याचाराचा लोंढा थोपविण्याची गरज उत्पन्न झाली. या कारणांमुळे कुमारिकांचे शील सांभाळण्यासाठी, विधवांचे रक्षण करण्यासाठी, अनाथ अर्भकांचे पालन करण्यासाठी आणि सर्वसामान्यपणे दुःखग्रस्त असलेल्या सर्व लोकांना सहाय्य करण्यासाठी शिलेदारीची संस्था स्थापन झाली. सच्चे दोस्तहो, मी या संस्थेचा एक घटक आहे. माझ्या संस्थेतील लोकांवर सर्वांनी प्रेम करावे असा निसर्गाचा नियम असला तरी, तो माहीत नसतानाही आपण माझे आदरातिथ्य इतक्या उदारपणाने केले, म्हणून मी आपल्याला हार्दिक धन्यवाद दिले पाहिजेत आणि त्याप्रमाणे मी ते देत आहे. ”

सरदारजींनी हे सारे प्रदीर्घ व्याख्यान नसते दिले तरी चालले असते. पण त्या ओक वृक्षाच्या बिया पाहून आमच्या सरदारजींना पूर्वीच्या सुवर्णयुगाची आठवण झाली, आणि आपल्या श्रोत्यांच्या पात्रतेचा विचार न करता त्यांनी त्या धनगरांपुढे ते प्रवचन ठोकले. ते त्यानी भक्तिभावाने ऐकले, पण ते त्यांना कळले मात्र थोडे. त्यांच्याप्रमाणेच सँकोही सारा वेळ गप्प होता. मधून मधून तो त्या बिया खात होता आणि जवळच्या कॉर्क वृक्षावर गार होण्यासाठी ठेवलेल्या मद्याचा आस्वाद घेत होता. डॉन क्विक्झोट यांचे लक्ष भोजनापेक्षा भाषणाकडेच अधिक होते आणि अधिक काळ होते. त्यांचे भाषण संपल्यानंतर एक धनगर त्यांना म्हणाला, “ सरदारजी, आम्ही आपले स्वागत अंतःकरणापासून करीत आहो, हे आपल्याला पटावे म्हणून आम्ही आमच्यापैकी एका माणसाला गाणे म्हणायला सांगतो. तो आताच गाणे शिकू लागला आहे. तो चांगला चणचणीत तरुण आहे आणि प्रेमात आकंठ बुडालेला आहे. तो मोठा विद्वान आहे. तो लिहू–वाचू शकतो. तो फिडल् क्वचितच वाजवतो, पण इतके चांगले की ते ऐकताना जादूने भारल्यासारखे वाटते. ”

धनगराच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच, त्याने वर्णिलेल्या वाद्याचे सूर सर्वांच्या कानी पडू लागले– आणि लगेच सुमारे बावीस वर्षांचा एक देखणा युवक पुढे आला. “ तुझे जेवण झाले आहे काय ? ” असे धनगरांनी त्याला विचारले. त्याने होकार देताच मघाचा धनगर म्हणाला, “ प्रिय अँटोनिओ, तर मग एक गाणे म्हणून दाखव, म्हणजे या सद्गृहस्थांना– आपल्या पाहुण्यांना कळून येईल की, थोडे-फार संगीत जाणणारी माणसे आमच्यामध्ये आहेत. कारण, आपण सारे रानावनात नि डोंगरदऱ्यात राहात असतो. तुझी माहिती आम्ही त्यांना पूर्वीच दिली आहे. आता विनवणी इतकीच की तू आमचा शब्द खरा कर आणि आपल्या शहरात लोकप्रिय ठरलेले ते प्रणयगीत गाऊन दाखव. ”

“ अगदी खुषीने ” असे म्हणून अँटोनिओने, आणखी आर्जवे करून न घेता, तोडलेल्या ओक वृक्षाच्या खुंटावर बसून आपले वाद्य नीट लावले आणि पुढील गीत अत्यंत सुरेखपणे गाइले—

## अँटोनियोचे प्रेमगीत

मम प्रेमाचीं नीरांजनें । ओवाळिन मी तव नयनें ।।
( नयनें तीं, प्रणय—स्वप्ने ) । तूंच सखी मम गे चतुरे ।। १ ।।

सत्य, सत्य तूं मम वांच्छित । सत्य करिते स्वर्गा कंपित ।।
शंकाकुल मी तमीं पाहतों । आशेचा मज तारा दिसतो ।। २ ।।

प्रीतीची दिव्य ज्योत ही । पवित्र तैशी प्रखर भासते ।।
अवमानानें कधीं न विझते । सतत तेवते, प्रकाश देते ।। ३ ।।

हुतात्म्यापरि जळत राहतों । वियोग तूझा मनीं साहतों ।।
प्रेम—पूर्तीचा स्वर्ग गांठतो । प्रेम—गीतिं मी जीव ओततों ।। ४ ।।

झपूर्झा करी मम मन हें । वैरी कोणी मुळीं न साहे ।।
जग सारें जड निद्रित होतें । प्रेम परी मम जागत असतें ।। ५ ।।

तव गुणगानीं गुंगत जातों । प्रेम—गायनीं कुणा न गणितों ।।
शत शत्रूंतें मी नच मानी । प्राण—सखीतें गाई स्तवनीं ।। ६ ।।

तव सौंदर्या हीन लेखिते । मत्सरी महिला जी कोणी ।।
ताडन तिजला केलें ना मी । शत्रूंशीं झुंज खेळलों ।। ७ ।।

प्रेमाचा कर देत शुभांगे । सरूं नको तूं कांते मागें ।।
होवो आतां मंगल अपुलें । ना तर मरणें गमे चांगलें ।। ८ ।।

अँटोनियोने आपले गीत येथे संपविले. दुसरे गीत म्हणण्यास डॉन क्विक्झोट यांनी त्याला विनविले. पण जगातील मधुरतम संगीत श्रवण करण्यापेक्षा निद्राधीन होण्याकडे सँको पँझा याचा कल अधिक होता. म्हणून तो आपल्या धन्याला म्हणाला, "पुरे आता. आता महाराजानी येथून जाऊन रात्रभर जेथे विश्रांती घ्यावयाची आहे, तेथे पहुडणे चांगले. शिवाय, ही सज्जन माणसे दिवसभराच्या श्रमाने थकलेली आहेत. त्यामुळे रात्रभर असे पवाडे ऐकत बसण्यापेक्षा झोप घेण्याची त्यांना अधिक गरज आहे."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, बरोबर आहे तुझे म्हणणे. ते मला समजले. तू दारूच्या बाटलीकडे वारंवार वळतोस, त्यावरून तुला संगीतापेक्षा मद्याचा मोह अधिक वाटत आहे हे मी ओळखले आहे." यावर सँको आनंदाने ओरडून म्हणाला, "धन्यवाद ! धन्यवाद ! आपणा सर्वांना हे मद्य खूपच आवडले आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "अरे ते मी नाकारीत नाही. तू जा आणि इच्छेस येईल तेथे पडून रहा. माझ्या व्यवसायातील माणसाला झोपण्यापेक्षा जागे राहणेच अधिक शोभून दिसते. पण थांब, जाण्यापूर्वी माझ्या कानाची शुश्रूषा कर. कारण त्याचा मला अत्यंत त्रास होत आहे." हे ऐकून व सँको धूत असलेली त्यांच्या कानाची जखम पाहून, त्यांच्यापैकी एक धनगर म्हणाला, "महाराज, आपण तसदी घेऊ नका. आपली

जखम तत्काळ बरी करणारा एक उपाय माझ्याजवळ आहे." असे म्हणून, त्याने काही सुगंधित पाने आणली–ती त्या परिसरात पुष्कळ होती. ती पाने चोळून व त्यात थोडे मीठ घालून, ते औषध त्या धनगराने क्विक्झोटच्या कानावर लावले आणि त्यावर कापडाची पट्टी बांधली व म्हटले, "आता दुसऱ्या औषधाची मुळीच गरज नाही." आणि थोड्याच वेळात खरोखर तसेच घडले.



## प्रकरण ४

# डॉन क्विक्झोटबरोबर जे लोक होते, त्यांना एका तरुण धनगराने सांगितलेली गोष्ट

हे सर्व चालले असताना एक तरुण माणूस तेथे आला. शेजारच्या खेड्यातून तो त्यांना किराणा माल आणून देत असे. त्या धनगराना उद्देशून तो म्हणाला, " ऐका, ऐका, दोस्तहो तुम्ही ही बातमी ऐकली काय ? "

" बातमी ? कोणती बातमी ? " एक धनगराने उत्सुकतेने विचारले.

"क्रिसोस्टोम हा विद्वान नि भला पाद्री आज सकाळी मेला. श्रीमंत वुईल्यम् यांची कन्या कुमारी मार्सेला या हडळीवरील प्रेमामुळे हा मृत्यू घडून आला असे लोक बोलतात. एखाद्या धनगराच्या पोरीसारखी ती गावातून इकडे तिकडे भटकत असावयाची." हे ऐकून एक धनगर ओरडला, "कोण ? मार्सेला ?" त्या तरुणाने उत्तर दिले, "होय, होय, तीच ती. तिच्यासाठीच त्याने जीव दिला, आणि असे म्हणतात की, त्याने आपल्या मृत्युपत्रात हेही लिहून ठेवले आहे की, जेथे आपल्याला तिचे प्रथमदर्शन घडले त्याच जागी, डोंगराच्या पायथ्याशी, कॉर्क वृक्षाजवळ, पाखंडी मूर लोकाप्रमाणे, रानात आपला देह पुरावा. एवढेच काय, पण त्याने दुसऱ्या अशाच पुष्कळ गोष्टी करण्याचे आदेश दिले आहेत. पण त्या करण्यास त्या प्रदेशातील धर्माधिकारी अनुज्ञा देणार नाहीत. कारण त्या पाखंडी लोकांच्या परंपरेत बसणाऱ्या आहेत. परंतु त्याच्या इच्छेप्रमाणे प्रत्येक विधि झाला पाहिजे असा निश्चय क्रिसोस्टोमचा मित्र अँब्रोज या दुसऱ्या विद्वानाने केला आहे. तोही स्वतः पाद्र्यासारखा पोशाख करतो. यामुळे साऱ्या गावात मोठी खळबळ उडाली आहे. पण अखेरीस अँब्रोज व त्याचे मित्र यांची सरशी होईल, असे मानले जाते. मी सांगितलेल्या ठिकाणी, मोठ्या रुबाबाने, उद्या सकाळी हा दफनविधी होईल. तो प्रेक्षणीय होईल असा माझा तर्क आहे. तो कसाही होवो, मी तेथे जाणार व तो पाहणार हे खचित— उद्या मला येथे परत येता आले नाही तरी बेहत्तर. "

" आपण सारेच जण जाऊ या. या मेंढरांवर लक्ष ठेवण्यासाठी कोणी थांबावे याकरिता आपण चिठ्या टाकू. " धनगर ओरडले. त्यापैकी एकजण म्हणाला, " छान बोललास, पीटर. पण चिठ्या टाकण्याचे तुमचे श्रम मी वाचवितो. मी मागे राहतो— तुमच्यावर दया करण्यासाठी नव्हे किंवा मला उत्सुकता नाही, म्हणून नव्हे, पण माझ्या पायात काटा टोचला आहे, तो मला चालू देत नाही म्हणून. " पीटर उद्गारला.

" धन्यवाद. " हे सर्व संभाषण ऐकून डॉन क्विक्झोट यानी पीटरला विचारले, " हा माणूस कोण होता ? " त्या धनगर–कन्यकेचा अल्पवृत्तांत सांगण्याची त्यांनी पीटरला विनंती केली.

पीटरने उत्तर दिले, " मला जे काही माहीत आहे ते एवढेच की, तो मेलेला माणूस हा एक सधन सद्‌गृहस्थ होता आणि तो फार दूर रहात नव्हता. सॅलामँका येथील विद्यापीठामध्ये तो कैक वर्षे होता, आणि आपल्या ज्ञानात प्रचंड वाढ झाल्यानंतर तो परत आला. पण सर्वांत विशेष महत्वाची गोष्ट ही की, त्याला आकाशातील ताऱ्यांचे गाढ ज्ञान होते. आकाशात सूर्य आणि चंद्र काय करतात, हे तो जाणतो, असे लोक बोलत असत. चंद्र–सूर्याची धरणे तो अचूक सांगत असे. " यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, " ग्रहण असे आम्ही त्याला म्हणतो— धरणे नव्हे. त्यावेळी, या दोन महान तेजोगोलापैकी एक काळसर होतो. " पण असे सूक्ष्म भेद पीटर पाळीत नसे. तो पुढे म्हणाला, " कोणते वर्ष समृद्धीचे जाईल व दुकाळाचे जाईल हेही तो आधी सांगत असे. " डॉन क्विक्झोट यांनी पुन्हा दुरुती केली, " दुकाळ नव्हे, दुष्काळ म्हणावे. " तरी तो उत्तरला, " दुष्काळ काय नि दुकाळ काय – मला सारे सारखेच. पण मी हे सांगतो की, त्याचे आई–वडील नि सोबती–सांगाती त्याच्या सल्ल्याप्रमाणे वागत असत आणि त्यामुळे थोड्याच काळात ते खूप श्रीमंत झाले. कारण तो त्यांना सांगे, ' यावर्षी तुम्ही सातू पेरा – गहू नको. या वर्षी तुम्ही वाटाणे लावा, सातू नको. पुढील वर्षी गळिताची धान्ये पेरा. त्यानंतर तीन वर्षांनी तुमच्या हाती धान्याचा कण येणार नाही. तो जे जे सांगे ते सारे खरे होई. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " या शास्त्राला खगोल–शास्त्र म्हणतात. " तेव्हा पीटरने उत्तर दिले, " तुम्ही त्याला काय म्हणता हे मला माहीत नाही. पण त्याला हे सारे ज्ञान होते— आणि याहूनही किती तरी अधिक ज्ञान होते, हे मला माहीत आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, विद्यापीठातून बाहेर आल्यानंतर काही महिन्यांचे आत, एके दिवशी सकाळी आम्ही त्याला गुराख्याच्या वेशात पाहिले आणि चकित झालो. पदवीधर म्हणून तो जो लांब झगा घालीत असे, तो बाजूस ठेवून त्याने मेंढरे वळण्यास सुरुवात केली. त्याच वेळी, त्याच्याबरोबर अध्ययन केलेला त्याचा एक मोठा मित्र, कोगी अंब्रोज, हाहि गुराख्यासारखा वागू लागला आणि त्याच्या संगतीत राहू लागला. याचे आम्हा सर्वांना मोठे नवल वाटले. मी तुम्हाला हे सांगावयाचे जवळजवळ विसरलोच की, तो मेलेला माणूस पद्य–रचनेत फार प्रवीण होता– खिस्ताची स्तोत्रे तो नेहमी रचीत असे आणि आम्ही ती नाताळात गात असू आणि त्यांनी लिहिलेली नाटके आमच्या शेजारची तरुण मुले करीत असत. ती गीते व ती नाटके यात सुधारणा करण्याला काही जागाच नाही, असे प्रत्येकजण म्हणे. याच्या आधी काही दिवस, क्रिसोस्टोमचे वडील वारले. त्यांनी त्याला जमीन, पैका, गुरेढोरे आणि इतर मालमत्ता– मिळून खूप संपत्ती ठेवली होती. त्या सर्वांचा मालक हा चंगीभंगी तरुण माणूस बनला.

त्या साऱ्या श्रीमंतीला तो पात्र होता हे खरे. या भूतलावर आतापर्यंत जेवढे सज्जन वावरले असतील, त्यांपैकी तो एक होता. गरीबांचा तो परम कनवाळू होता, साऱ्या प्रामाणिक माणसांचा तो मुख्य आधार होता आणि त्याची मुद्रा पाहिली की, कोणालाही आशीर्वाद मिळाल्यासारखे वाटे. शेवटी हे कळून आले की, त्याने आपला वेश तसा बदलला, याचे कारण मार्सेला या धनगर-कन्येच्या पाठीमागे आपल्याला जाता यावे हेच होते. तिच्याबद्दल आपल्या दोस्ताने तुम्हाला पूर्वीच सांगितले आहे. तो तिच्यासाठी प्रेमाने हैराण झाला होता. आता आपल्याला मी अशी एक गोष्ट सांगतो की, आतापर्यंतच्या आयुष्यात तुम्ही ती कधीच ऐकली नसेल आणि सार्नाहइतके आयुष्य तुम्हाला लाभले, तरी तशी गोष्ट ऐकण्याचा योग तुम्हाला येणार नाही." त्याच्या अशा शब्द-दोषांचा तिटकारा आल्यामुळे, डॉन क्विक्झोट खेकसले, "सार्नाह" नव्हे, सराह-अब्राहमची पत्नी. (कल्पांतापर्यंत, हा अर्थ.)" तेव्हा पीटर म्हणाला, "सर्नाह म्हणजे कंड असो नाही तर सराह असो- दीर्घायुष्य असणारी स्त्री, एवढेच मला म्हणावयाचे. पण तुम्ही जर अशा दुरुस्त्या करीत बसला आणि शब्दाशब्दागणिक माझी गोष्ट तोडू लागला, तर ती पूर्ण होण्यास सबंध वर्ष काही पुरणार नाही."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "मित्रा, मला क्षमा कर. सर्नाह आणि सराह यांमध्ये फरक आहे, हे तुला समजावे, म्हणूनच हे मी बोललो. पण तुझे म्हणणे ठीक आहे. कारण, सराहपेक्षा सर्नाह (कंड) अधिक काळ जगले. आता मी तुझ्या गोष्टीत अडथळा आणणार नाही. ती संपवून टाक, अशी मी विनंती करतो." तेव्हा पीटर म्हणाला, "ठीक तर, आपण माझे भले धनी. आमच्या शेजारी बुइल्यम् नावाचा एक शेतकरी रहात होता. तो क्रिसोस्टोमच्या बापापेक्षाही मातबर होता, हे आपण लक्षात ठेवा. त्याला एका मुलीशिवाय दुसरे अपत्य नव्हते. त्या मुलीची आई तिच्या बाळंतपणात मेली. (तिच्या आत्म्याला शांती मिळो.) दोन पायांवर चालणाऱ्या साऱ्याजणींत ती चांगली स्त्री होती. ती आताही माझ्यापुढे उभी आहे आणि तिची प्रसन्न मुद्रा मला दिसत आहे-त्या मुद्रेवर एका बाजूला सूर्य तळपत आहे, तर दुसऱ्या बाजूला चंद्र विलसत आहे-असे मला वाटते. ती उत्तम गृहिणी होती-गोरगरिबांच्या ती फार उपयोगी पडे. त्यामुळे आता ती नंदनवनात असली पाहिजे असे सांगण्याचे धाडस मी करतो. अरेरे! तिच्या मृत्यूने बिचाऱ्या बुइल्यमचे अंतःकरण फुटून गेले. तो बिचारा तिच्या पाठोपाठ लवकरच गेला-मार्सेला नावाच्या आपल्या मुलीला सर्व जिंदगी ठेवून गेला-आमच्या विभागातील जो पाद्री तो तिचा चुलता, त्याचे हवाली तिला देऊन गेला. आणि पुढे काय? ती मुलगी उत्तम निघाली-थेट आपल्या आईसारखी-पावलो-पावली ती आम्हाला आपल्या आईची आठवण करून द्यायची. पण ती याहून चांगली स्त्री होईल, असे आम्हाला वाटत होते-आणि घडलेही तसेच. ती १४-१५ वर्षांची झाली असेल, तेव्हा तिच्याकडे नजर टाकणाऱ्या प्रत्येक माणसाला वाटे, हिला इतके रूप देणाऱ्या प्रभूचे आभार मानावयास हवेत. बहुतेक तरुण तिच्यावर प्रेम करू लागले-

तिच्यासाठी वेड्यासारखे धावू लागले. हे सारे होत असताना, तिच्या चुलत्याने तिला आपल्या अगदी जवळ ठेवले. परंतु तिच्या अलौकिक सौंदर्याची व संपत्तीची कीर्ती सर्वत्र पसरली–ती इतकी की तिला असंख्य चाहते लाभले–किती, हे मला माहीत नाही आमच्या शहरातील बहुतेक साऱ्या तरुणांनी तिच्यासाठी तिच्या चुलत्याकडे मागणी घातली. आमच्यापासून किती मैलांपर्यंत हे मला सांगता येणार नाही. पण दूरदुरूनही, देशातील उत्तमोतम तरुणांचा तांडा तिच्या चुलत्याकडे लोटू लागला आणि तिच्यासाठी याचना करू लागला, प्रार्थना करू लागला. आपली पुतणी उपवर होताच तिच्या जबाबदारीतून मुक्त होण्यात तिच्या चुलत्याला आनंदच वाटला असता. पण तिच्या इच्छेविरुद्ध तिचे लग्न लावण्याची–किंवा तसा सल्ला देण्याची–त्याची तयारी नव्हती. कारण तो सज्जन होता. तो नखशिखांत खरा ख्रिश्चन होता. तिच्या जिंदगीचा फायदा घ्यावा म्हणून तिचे लग्न लांबणीवर टाकण्याची कल्पना त्याच्या मनाला शिवणे शक्य नव्हते. आमच्या विभागातील लोक जेव्हा एकत्र जमत, तेव्हा त्या चुलत्याला जिंदगीचा उपभोग घेण्याचा सल्ला ते वारंवार देत. तरी त्याने तसे करण्याचे नाकारले होते, ही त्याची प्रशंसनीय गोष्ट म्हणून सांगितली पाहिजे. महाराज, मी आपल्याला हे सांगितले पाहिजे की, या आमच्या खेड्यापाड्यात आणि लहान लहान शहरात, कोणी काही क्षुल्लक गोष्ट केली, तरी लोक तिचा बभ्रा करण्यास आणि तिचे दोष शोधून काढण्यास टपून बसलेले असतात. असे लटपटराव काहीही बडबडोत, पण आमच्या पाद्र्याची प्रशंसा हा सारा प्रदेश–त्यातले त्यात हे गाव–सतत करीत राहिले, यावरून तो किती सज्जन होता हे कळून येते. ”

“ बरोबर आहे, तुझे म्हणणे, प्रामाणिक पीटर. ही गोष्ट चटकदार आहे आणि ती तू सांगतोसहि मोठ्या रुबाबाने. ” डॉन क्विक्झोट म्हणाले.

त्यावर पीटर म्हणाला, “ त्यासाठी मला ईश्वराची करुणा भाकण्याची कधीही गरज न पडो. महत्त्वाची गोष्ट ही आहे. मी आपल्याला पूर्वी सांगितल्याप्रमाणे, आमच्या पाद्र्याच्या मनात आपल्या पुतणीचे लग्न लांबणीवर टाकण्याचे नव्हते. त्यामुळे तिचा पत्नी म्हणून स्वीकार करणारे जे जे कोणी होते, त्या सर्वांची माहिती त्याने तिला दिली. ते कोण आहेत आणि त्यांचेजवळ किती जिंदगी आहे, हे सारे तो तिला सांगे. त्यांच्या-पैकी कोणाशी तिची लगन–गाठ बांधावी, हे सांगण्यास तो तिच्याजवळच असे. पण ती कधी उत्तर देत नसे. ‘ अद्याप मी संसाराचा भार शिरावर घेण्याइतकी मोठी झाले नाही, म्हणून मला इतक्यात लग्न करावयाचे नाही. ’ एवढेच उत्तर ती देई. अशा गोष्टी घडून आल्यामुळे तिच्या चुलत्याने तिला या बाबतीत मोकळे सोडले. तिने स्वतः आपला पती निवडेपर्यंत आपण थांबावयाचे त्याने ठरविले. कारण तो नेहमी असे म्हणे, मुलांना ज्याची आवड नाही, अशा ठिकाणी त्यांना देणे, हे पालकांचे कर्तव्य नव्हे. सच्चा माणसाप्रमाणे तो हे बोले. नंतर असे घडले की, आमच्या स्वप्नातही नसताना ही बुजरी छोकरी स्वतंत्रपणे मेंढपाळीण बनली. त्याविरुद्ध तिच्या चुलत्याने आणि गावकऱ्याने तिला

पुष्कळ सांगितले. पण त्याचा तिच्या मनावर काही परिणाम झाला नाही. शहरातील इतर तरुण मुलींबरोबर ती रानात जाई व आपल्या शेळ्या वळी. पण यामुळे दसपट हानी झाली. ती गावाबाहेर दिसू लागताच, किती तरी ( नक्की आकडा मी सांगू शकत नाही. ) चलाख बहाद्दर तरुण–सभ्य गृहस्थ व श्रीमंत शेतकरी–तिच्या प्रेमामुळे आपला वेश बदलून मेंढपाळाच्या वेशात, तिच्या मागोमाग डोंगर–दऱ्यातून जाऊ लागले. क्रिसोस्टोम हा त्यांपैकीच एक– आता तो मरून पडला आहे. तो तिच्यावर प्रेम करीत होता, एवढेच नव्हे तर तिची पूजा करीत होता असे म्हणतात. तथापि यावरून तुम्ही काही अनुमान बांधू नये किंवा निष्कर्ष काढू नये. कारण तिने शेळ्यामेंढ्या वळण्याचा पेशा पत्करला आणि तिच्यावर कोणाचा अंकुश नव्हता, म्हणून ती उनाडपणे किंवा उथळपणे वागत नव्हती, ती नेहमी शालीन होती– आणि अजून तशी आहे. दुष्ट लोकांच्या निंदेपासून आपले शील मुक्त रहावे व शुद्ध असावे यासाठी ती डोळ्यात तेल घालून जपत असे. तिच्या असंख्य चाहत्यांपैकी कोणीही तिच्याइतक्या शीघ्र गतीने आपण चालतो अशी बढाई मारू शकत नव्हता. मेंढपाळांची संगत ती टाळत नसे. जोपर्यंत ते नीट वागत असत, तोपर्यंत ती त्यांच्याशी सौजन्याने वागे. पण केव्हा केव्हा त्यांच्यापैकी एखादा माणूस तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने आपले हृदय उघडे करण्याचा प्रयत्न करी, तेव्हा ती त्याला झटक्यासरशी दूर सारी आणि पुन्हा त्याच्याशी एक शब्द बोलत नसे.

" अशा प्रकारे, या देशात प्लेग उडवून देणार नाही, इतका धुमाकूळ या सुंदर कुमारिकेने घातला. तिच्या शालीनतेने व देखण्या रूपाने प्रत्येकजण तिच्यावर प्रेम करीत असे आणि तिच्याकडे ओढला जात असे. पण, तिच्या हटवादी अशा लाजाळूपणाने त्यांची हृदये भग्न होत आणि ते स्वतःला गळफास लावून घेण्यास सिद्ध होत. ते बिचारे कमनशिबी तरुण जोरदार तक्रार करण्यापलीकडे काय करणार ? क्रूर, निर्दय, कृतघ्न आणि अशाच कैक शब्दांची लाखोली ते तिच्यावर वहात, त्यावरून त्यांची किती दुर्दशा उडाली आहे हे स्वच्छ दिसून येई. महाराज, आपण जर येथे थोडा वेळ थांबला, तर तिने नाकारलेल्या तरुणांच्या दुःखी वेदनांनी या टेकड्या व या दऱ्या घुमत असल्याचे आपल्या कानी येईल. अजून त्यानी तिच्यामागे लपतं–छपतं जाण्याचे सोडलेले नाही. इथून जवळच एके ठिकाणी पाचपंचवीस बीच झाडे आहेत. त्या सर्वांच्या कोमल सालीवर ' मार्सेला ' हे नाव किती वेळा कोरलेले आहे, हे आपण पाहू शकाल. त्यांपैकी काही नावावर किरीट कोरलेला आढळेल. तो कोरणाऱ्याला वाटते, मार्सेला सौंदर्याची पताका धारण करण्यास योग्य आहे आणि सौंदर्याचा मुगुट ती आपल्या शिरावर धारण करीत आहे. इकडे एक मेंढपाळ सुस्कारे टाकीत आहे, तर तिकडे दुसरा लांब गळा काढून रडत आहे. इकडे एकजण शोकगीते गात आहे, तर दुसरीकडे दुसरा आपले हात चोळून दुःखाच्या तक्रारी करीत आहे. एखादा प्रेमिक जीव रात्रीच्या वेळेस खडकाच्या पायथ्याशी किंवा ओक वृक्षाच्या बुंध्याशी निजून राहतो आणि क्षणभरही झोप न घेता सतत आक्रोश करीत

असतो–रुदन करीत असतो–दुसरे दिवशी सूर्य उगवेपर्यंत तो स्वतःशी बडबडत असतो, असे तुम्हाला आढळेल. तुम्हाला असाही युवक दिसेल की, जो तापलेल्या वाळवंटावर पाय पसरून निजला आहे आणि ग्रीष्मातील सूर्याच्या कडक उन्हाची पर्वा न करता, आकाशाकडे पाहून आपला शोक व्यक्त करीत आहे. हे सारे होत असताना ती पाषाण–हृदयी मार्सेला त्यांच्यापैकी कोणाचीच पर्वा करीत नाही–कोणाबद्दल ती आस्था दाखवीत नाही. तिच्या या साऱ्या अभिमानी, लाजऱ्या वर्तनाचा परिणाम काय होईल, हे आम्हाला मुळीच कळत नाही. शेवटी तिला कोण भाग्यवान माणूस वश करील आणि आपल्या भजनी लावील, हे आम्ही जाणू शकत नाही. यापेक्षा नक्की काहीच माहीत नसल्यामुळे, क्रिसोस्टोमच्या मृत्यूसंबंधी आपल्या दोस्ताने जे काही सांगितले, तेच खरे मानण्याकडे माझा कल आहे. म्हणून उद्या सकाळी आपण समक्ष जाऊन त्याला त्याच्य थडग्यात पुरलेले पहावे, अशी माझी इच्छा आहे. आपण तेथे जाणे योग्य ठरेल असे मला वाटते. कारण त्याला पुष्कळ मित्र होते आणि त्याने इच्छिलेली दफन–भूमी येथून फक्त एका मैलावर आहे. ”

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, “ तेथे जाण्याचा माझा मानस आहे. तुझ्या या गोष्टीने मला अलौकिक समाधान वाटले. त्याबद्दल मी तुला धन्यवाद देतो. ”

यावर तो धनगर म्हणतो, “ काय म्हणावे महाराज ! या गर्विष्ठ जीवानें जे उत्पात केले आहेत, त्यातले निम्मेसुद्धा मी आपल्याला सांगितले नाहीत. पण उद्या कदाचित एखादा मेंढपाळ आपल्याला रस्त्यावर भेटेल आणि तो आपल्याला अधिक सांगेल. तो-पर्यंत येथल्या एखाद्या झोपडीत आपण विश्रांती घेतली तर काही बिघडणार नाही. कारण आपली जखम उघड्या हवेत राहणे चांगले नाही. तिला मी जे औषध लावले आहे, ते इतके वस्ताद आहे की, त्यामुळे आपल्याला बरे वाटेल. भीति वाटण्याचे काहीच कारण नाही. तरीही जपून राहणे चांगले. ”

धनगराची ही प्रदीर्घ कथा ऐकून सँकोचा जीव कासावीस झाला होता आणि आपल्या धन्यानें आराम करावा, असे त्याला वाटत होते. शेवटी पीटरच्या झोपडीत निजण्यासाठी त्याने क्विक्झोट यांचे मन वळविले. मार्सेलाच्या प्रियकरांचे अनुकरण करून डॉन क्विक्झोट यांनी उरलेली रात्र प्रिय डॅलसिनियाशी प्रेमाच्या कानगोष्टी करण्यात घालविली. सँको हा रोझिनांट व आपले गाढव यांच्यामध्ये निजला. एखाद्या अस्वस्थ प्रेमी माणसाप्रमाणे तो झोपला नाही, तर सकाळी ज्याला जोराच्या लाथा बसल्या होत्या आणि त्यामुळे सर्वांग खरचटले होते, अशा माणसाप्रमाणे तो गाढ झोपी गेला.

□ □

## प्रकरण ५

# मार्सेलाची गोष्ट [ पुढे चालू ]

पूर्व दिशेच्या गवाक्षातून रविराज उदय पावतात न पावतात तोच पाच धनगर उठले आणि डॉन क्विक्झोट यांना जागे करून त्यांनी विचारले, " अंत्यविधीला जाण्याचा आपला निश्चय कायम आहे ना? तिकडे आपल्याबरोबर जाण्यास आम्ही तयार आहोत. " सरदारजींना याहून दुसरे काय हवे होते? ते लगेच उठले आणि त्यांनी सँकोला हुकूम दिला, " रोझिनांट व गाढव याना तत्काळ तयार कर. " त्याने तसे झटपट केले आणि नंतर ते पुढे निघाले. ते दोघे अर्धापाऊण मैल गेले असतील नसतील तोंच, एका आडव्या रस्त्याने सहा मेंढपाळ आपल्याकडे येताना त्यांना दिसले. त्यांचे अंगावर काळी कातडी पांघरलेली होती, डोक्यावर फुलांच्या व पानांच्या माळा होत्या आणि हातात उंच काठ्या होत्या. घोड्यावरील दोन प्रतिष्ठित माणसांच्या दिमतीसाठी तीन तरुण मुले पायी चालली होती. ती माणसे जवळ येताच त्यांनी एकमेकाना आदबीने सलाम केला. " कुणीकडे चालला आहा आपण ? " हा नेहमीचा प्रश्न झाल्यावर त्यांच्या लक्षात आले की, त्या अंत्यविधीच्या दर्शनासाठी तेही त्याच रस्त्याने निघाले आहेत, म्हणून सारेजण बरोबर जाऊ लागले.

त्यांच्यापैकी एकजण दुसऱ्याला म्हणाला, " राजश्री विवाल्डो, आपण हा सुविख्यात अंत्यविधी पाहण्यास जाण्यासाठी जो वेळ खर्च करीत आहो तो वाया गेला, असे आपल्याला वाटणार नाही. कारण तो मृत मेंढपाळ आणि त्याला ठार मारणारी ती स्त्री यांची जी माहिती या लोकांनी आपल्याला दिली आहे, त्यावरून हा अंत्यविधी अलौकिक होईल यात शंका नाही. " विवाल्डोने उत्तर दिले, " माझे तर तुमच्याशी इतके सहमत आहे की, ते दृश्य पाहण्याचे चुकू नये म्हणून मी एक दिवसच काय, पण पुरा एक आठवडाही तेथे राहीन. "

हे ऐकल्यामुळे, क्रिसोस्टोम व मार्सेला यांच्याविषयी त्यांनी काय ऐकले होते हे विचारण्याची संधी डॉन क्विक्झोट यांना लाभली. त्यांच्यापैकी एका सद्गृहस्थाने उत्तर दिले, " आज सकाळी या मेंढपाळांची गाठ पडल्यानंतर, तुम्ही असा वेश धारण का केला, असे त्यांना विचारल्याशिवाय आम्हाला राहवेना. आम्ही पृच्छा केल्यानंतर, त्यांच्यापैकी एकाने आम्हाला या शोचनीय प्रकाराची माहिती सांगितली. मार्सेला नावाची मेंढपाळीण जितकी देखणी तितकीच क्रूर होती आणि तिच्या लाजाळूपणाने व

अव्हेर करण्याच्या वृत्तीने किती तरी प्रियकर दुःखी झाले, नि क्रिसोस्टोम याच्यावर तर मरणच ओढवले. ही सारी कहाणी त्याने आम्हास सांगितली आणि क्रिसोस्टोमच्या अंत्यविधीला आपण जात असल्याचेही सांगितले." थोडक्यात म्हणजे, आदल्या दिवशी रात्री पीटरने डॉन क्विक्झोट यांना जी कथा निवेदिली होती, तिचीच पुनरावृत्ति त्याने केली. नंतर विवाल्डोने सरदारजीना विचारले, "या शांतताप्रेमी देशात आपण सर्वांगानी सशस्त्र होऊन प्रवास का करता?" तेव्हा त्या वीरपुरुषाने उत्तर दिले, "अन्य स्वरूपात प्रवास करण्यास माझा व्यवसाय मला मुभा देत नाही. चमचमीत मेजवान्या, झकपक पोशाख आणि लोळत ठेवणारा आराम–या गोष्टी बायकी–दरबारी लोकांसाठी शोधून काढलेल्या आहेत. पण जग ज्यांना 'शिलेदार' म्हणून संबोधते, त्यांच्यासाठी श्रम, दक्षता व शस्त्रे ही साधने आहेत. अशा शिलेदारांपैकी मी एक माझ्या भाग्याने आहे–त्या परंपरेला अत्यंत अपात्र असा मी आहे–अत्यंत क्षुद्र आहे."

सरदारजींचे डोके ठिकाणावर नाही, याची खात्री त्यांना पटविण्यासाठी सरदारजींनी आणखी काही बोलण्याची गरजच नव्हती. पण त्यांचा मूर्खपणा कोणत्या स्वरुपाचा आहे हे स्वच्छ समजावे म्हणून विवाल्डोने त्यांना सवाल टाकला, "शिलेदार म्हणजे काय?" तो सवाल ऐकताच, तो नामवंत वीरपुरुष–डॉन क्विक्झोट–उसळून म्हणाला, "इंग्लंडचा इतिहास आणि बखरी तुम्ही वाचल्या नाहीत काय? त्यामध्ये राजे आर्थर यांची सुप्रसिद्ध कृत्ये वर्णिलेली आहेत. त्या राज्यातील एका प्राचीन परंपरेप्रमाणे, आर्थर कधीच मरत नाही–जादूने त्याचे रूपांतर कावळ्यात होते आणि पुढे एके दिवशी त्याला पूर्वीचे रूप प्राप्त होऊन, तो आपले राज्य परत मिळवील. यामुळे त्या काळापासून इंग्रज लोक कावळ्याला मारण्यास धजत नाहीत. या थोर राजाच्या काळात, 'गोलमेजाचे सरदार' ही अत्यंत उदात्त संस्था प्रथम स्थापन झाली. त्या इतिहासात असेही वर्णन आले आहे की, सरोवराचा सर लॅन्सेलॉट आणि राणी ग्विनेव्हर यांच्या प्रणयलीला खरोखर होत असत. लेडी क्विटानियोना या सन्माननीय पुरंध्रीच्या मध्यस्थीने त्या प्रणयलीला चालत असत. त्यांच्यावर जो उत्कृष्ट काव्यात्मक इतिहास लिहिलेला आहे, त्यातील गीते येथे स्पेनमध्ये गाऊन साजरी केली जातात—

सुंदर ललना सेविती ज्याला ।<br>
कधी न ऐसा वीर जाहला ॥<br>
लॅन्सेलॉट तो हिरा चमकला ।<br>
प्रिय देशा की टाकुनि गेला ॥

- त्याच्या प्रेमलीला आणि त्याचे समर–चमत्कार या दोहोंचे आनंददायक वर्णन बाकीच्या काव्यात आलेले आहे. त्यावेळेपासून शिलेदारांची संस्था हळूहळू विस्तार पावत गेली आणि जगाच्या कोनाकोपऱ्यापर्यंत पसरली. नंतर ॲमाडिस डी गॉल हा आपल्या वीरकृत्यांनी अलौकिक ठरला, आणि त्याच्यापुढील पाच पिढ्यांनीहि तो लौकिक कायम

टिकविला. व्हिकेनियाचा शूरवीर फेलिक्स मार्ट याने अमर कीर्ति संपादिली आणि तो अदम्य शिलेदार टिरान्ट दि व्हाईट—याची प्रशंसा करावी तितकी थोडीच. छेः! आपण जर थोडे आधी जन्माला आलो असतो, तर आपल्या काळातील तो अजिंक्य शिलेदार ग्रीसचा पराक्रमी डॉन बेलियानिस—याच्याशी संवाद करण्याचे भाग्य आपल्याला लाभले असते. सभ्य गृहस्थहो, मी कितीही पापी असलो, तरी या शिलेदारी संस्थेचा अभिमानी आहे. माझ्यापूर्वी होऊन गेलेल्या शूर शिलेदारांनी जे नियम पाळले, त्यांचे यथायोग्य पालन मी करीत आहे आणि त्यामुळे मी या निर्जन अरण्यातून भ्रमण करण्याचे ठरविले आहे. दीन—दलित आणि त्रस्त जीवांना माझ्या शस्त्रबळाने दुःखमुक्त करण्यासाठी मी, दैव आणील त्या भयंकर संकटांना तोंड देण्यासाठी, माझे शरीर सिद्ध ठेवण्याचे ठाम ठरविले आहे."

हे सारे ऐकल्यावर त्या प्रवाशांना डॉन क्विक्झोट यांच्या वेडेपणाची पुरीच खात्री पटली असेल हे तुमच्या लक्षात येईल. जो एवढा बुद्धिमान दिसत होता त्याच्या मेंदूची ही न समजणारी विकृती पाहून, आतापर्यंत पुष्कळ लोकांना जसे नवल वाटले, तसेच या प्रवाशांनाही वाटले. तथापि, विवाल्डोचा स्वभाव गमत्या होता. त्याने क्विक्झोटचा वेडे-पणा लक्षात येताच असे ठरविले की, ती लहानशी वाट संपेपर्यंत आपल्याला या वेडेपणाचा जितका उपयोग करून घेता येईल तितका घ्यावयाचा.

म्हणून क्विक्झोटच्या तऱ्हेवाईक बोलण्यामुळे सर्वांची करमणूक करण्यासाठी तो म्हणाला,

"शिलेदारमहाशय, आपण जगातील अत्यंत कडक व संयमी व्यवसाय स्वीकारला आहे. कार्थेजच्या भिक्षूपेक्षा आपल्याला कठिण समस्यांना तोंड द्यावे लागत असेल असे मला वाटते." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "कार्थेजच्या भिक्षूचे जीवन माझ्याइतकेच वैराग्यपूर्ण असेल, पण जगाला आमच्यापासून जितका लाभ होतो, तितका त्या भिक्षूपासून होत असेल की नाही याविषयी मला बरीच शंका आहे. कारण, खरे सांगावयाचे तर जो सैनिक आपल्या सेनापतीची आज्ञा अमलात आणतो, तो निदान त्या सेनापतीइतके तरी कार्य करतो असे म्हटले पाहिजे. हा दाखला येथे लागू करणे सोपे आहे. ते धार्मिक लोक जगाच्या कल्याणासाठी पूर्णपणे शांत व सुरक्षित असलेल्या ठिकाणी बसून फक्त प्रार्थना करतात—दुसरे काहीही करीत नाही. पण आम्ही शिलेदार, मानव-जातीच्या कल्याणार्थ त्यांनी केलेल्या प्रार्थनेप्रमाणे परिस्थिति निर्माण करण्यासाठी आमच्या शस्त्रबळाने, प्रसंगविशेषी प्राण धोक्यात घालूनही, प्रत्यक्ष कृती करीत असतो. धार्मिक लोक फक्त मध्ये लुडबुडतात. अशा कृती करीत असताना आम्हाला हवामानाच्या तापापासून निवारा मिळत नसतो. विस्तीर्ण आकाशाच्या छपराखाली, ग्रीष्म ऋतूच्या दाहक उन्हामध्ये आणि हिवाळ्यातील कडाक्याच्या थंडीमध्ये, आम्ही आमचे कर्तव्य पार पाडीत असतो. म्हणून आम्ही स्वतःला परमेश्वराचे दूत आणि जगतीतलावर न्यायाची संस्थापना करणारी त्याची साधने म्हणवून घेतले तर ते योग्यच ठरेल. युद्ध—कर्म म्हटले की त्यात

प्रचंड परिश्रम व कष्ट आलेच. म्हणून धर्मनिष्ठ भिक्षूंपेक्षा धर्मनिष्ठ सैनिक अधिक योग्यतेचा आहे हे निःसंशय. भिक्षू सुखासमाधानाने व शांतपणे राहून दीन–दलितासाठी फक्त प्रार्थना करतो–दुसरे काही करीत नाही. तथापि सभ्य गृहस्थहो, एखाद्या पवित्र संन्याश्याइतका शिलेदार पूर्णत्वास पोचलेला असतो असे मला सुचवायचे आहे, अशी कल्पना आपण करू नका. मी जे काही सांगितले–आणि जे काही स्वतः सोसले–त्यावरून मला इतकेच अनुमान करावयाचे आहे की, आमचे कार्य अधिक कष्टाचे आहे, अधिक आघात सहन करावयास लावणारे आहे, तहानभूक मारून उपवासाने शरीर झिजविण्याची तपस्या करावयास लावणारे आहे, थोडक्यात म्हणजे, दैन्य-दारिद्र्याचे आहे. काही शिलेदार आपल्या पराक्रमाने शेवटी सिंहासनाधीश होऊन सम्राट बनलेले तुम्हाला दिसत असतील, पण त्यासाठी त्यांना कितीतरी धर्म–बिंदू व रक्त–बिंदू गाळावे लागले असतील, याची खात्री बाळगा. त्या भाग्यवान शिलेदारांना त्यांच्या अडचणीच्या वेळी मुनींनी व मांत्रिकांनी मदत केली नसती, तर त्यांच्या प्रचंड आकांक्षा धुळीस मिळाल्या असत्या. ”

विवाल्डोने उत्तर दिले, “ माझेही मत असेच आहे. मात्र आपल्या व्यवसायातील एक गोष्ट मला पसंत नाही. ज्यावेळी आपण अत्यंत धोक्याचे साहस अंगावर घेता, तेव्हा आपले प्राण मोठ्या संकटात असतात, हे उघड आहे. अशा वेळी प्रत्येक भल्या ख्रिश्चनाने प्रभूची प्रार्थना करावयास हवी. पण आपण ती एकदाही करीत नाही. फक्त आपल्या प्रियकरिणीला शरण जाता – जणू काही दुसरी कोणती देवताच आपण पूज्य मानीत नाही, अशा उत्साहाने व भक्तीने आपण आपल्या प्रियकरिणीपुढे लोटांगण घालता. या अशा कृत्याला पाखंडीपणाचा वास येतो, असे माझे मत आहे. ”

डॉन क्विक्झोट उत्तरले, “ महाराज, त्या पद्धतीत काही फरक होणार नाही. कारण एखाद्या शिलेदाराने वेगळे व्हावयाचे म्हटले तर, शिलेदारीच्या प्राचीन व प्रतिष्ठित परंपरेपासून तो पुष्कळच च्युत होईल. त्या परंपरेचा लाभ त्याला सतत होत असतो. एखादा सरदार जेव्हा पुढे सरसावत असतो, पण यशाविषयी साशंक असतो, तेव्हा त्याची हृदय–सम्राज्ञी त्याच्या चित्तात खेळत असते आणि डोळ्यापुढे तरळत असते. हा त्याच्या जिवंत व प्रभावी प्रतिभेचा विलास असतो. त्यावेळी तो मृदु, प्रेमळ व उत्साही दृष्टीने त्या आपल्या दयितेकडे काकुळतीने पाहतो आणि संकटकाली आपले रक्षण करण्यास विनवितो. छेः ! एवढेच नव्हे, दुसरे कोणी आढून ऐकत नसेल तर, तो कुजबुजत–पुटपुटत आपल्या प्राणप्रियेला, कल्पनातीत उत्कटतेने प्रार्थना करीत असतो. अशा प्रसंगांची असंख्य उदाहरणे इतिहासात आहेत. हे सर्व ऐकून तुम्ही अशी कल्पना करू नका की, शिलेदार प्रभूला शरण जाण्यास विसरतात. ऐन युद्धाच्या धामधुमीतही त्यांना तसे करण्यास पुरेसा वेळ असतो. ”

विवाल्डो यांनी उत्तर दिले, “ महाराज, या बाबतीत माझे अद्याप पूर्ण समाधान झाले नाही असे सांगण्याची परवानगी असावी. कारण माझ्या वाचनात असे वारं व

आले आहे की, दोन शिलेदार आरंभी एकमेकांशी थोडेफार बोलतात, आणि नंतर एकदम हातघाईवर येतात आणि इतके बेफाम खवळतात की, दूर जाण्यासाठी आपापल्या घोड्यांची तोंडे वळवितात आणि परत दौडत येऊन एकमेकावर अत्यंत वेगाने, भरधाव तुटून पडतात. त्या ऐन धुमश्चक्रीत ते आपल्या दयितेची प्रार्थना घाईघाईने करतात. मग त्यांपैकी एकजण घोड्याच्या पिछाडीवरून जमिनीवर फेकला जातो. असे सर्वसाधारणतः नेहमी घडते. शत्रूच्या भाल्याने त्या घोड्याला आरपार भोसकलेले असते आणि दुसरा शिलेदार आपण खाली पडू नये म्हणून, आपल्या घोड्याची आयाळ घट्ट धरतो. आता मला हे कळत नाही की, ज्या शिलेदाराचा ग्रंथ इतक्या झटपट आटपला, त्याला प्रभूची प्रार्थना करण्यास वेळ कसा मिळणार? मला असे वाटते की, त्या प्रसंगी त्याने आपल्या हृदय-सम्राज्ञीची जी घाईघाईने प्रार्थना केली, तिच्याऐवजी परमेश्वराची प्रार्थना करावयास हवी होती. कोणत्याही सज्जन ख्रिश्चनाने असेच केले असते. शिवाय, माझा असा तर्क आहे की, प्रत्येक शिलेदाराला अशी प्रार्थना करण्यासाठी हृदय-सम्राज्ञी असतेच असे नाही आणि प्रत्येकजण प्रेमांकित असतो असेही नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "तुमचा तर्क चुकीचा आहे. हृदय-सम्राज्ञीशिवाय शिलेदार असूच शकत नाही. आकाशात चांदण्या असणे जितके अवश्य, तितकेच आम्ही प्रेमात असणे अवश्य. मी ठासून सांगतो की, प्रेमवीर नसलेला वीर इतिहासात एकदाही उल्लेखिलेला नाही. त्या उदात्त वासनेच्या प्रेरणेपासून जो शिलेदार मुक्त असेल त्याला कायदेशीरपणे शिलेदार होताच येणार नाही. त्याला 'अकुलीन उपटसुंभ' म्हटले पाहिजे. शिलेदारीच्या दारात ज्याला प्रवेश मिळाला नाही, अशा माणसाने कुंपणावरून उडी टाकून, चोरादरोडेखोराप्रमाणे लपूनछपून शिलेदारीच्या मंदिरात प्रवेश करण्यासारखे ते आहे."

हे ऐकल्यावर दुसरा धनगर म्हणाला, "महाराज, मी जर फारसा चुकत नसेन तर, माझ्या वाचनात असे आले आहे की, अमॅडिसचा बंधू डॉन गॅलोर याची पूजनीय अशी कोणतीच हृदय-सम्राज्ञी नव्हती-आणि तरीही त्याच्याविषयी लोकांमध्ये कमी आदरभाव नव्हता." पण डॉन क्विक्झोट न दबता म्हणाले, "एक सर आली म्हणजे पावसाळा आला असे नव्हे. शिवाय मला हे माहीत आहे की, तो शिलेदार गुप्तपणे प्रेमात-पुष्कळच प्रेमात- गुंतला होता. त्याला जी जी सुंदर स्त्री भेटे, तिची तो स्तोत्रे म्हणत सुटे. याचे कारण, त्याची स्वाभाविक प्रेरणा तशी होती आणि ती तो सहजपणे काबूत ठेवू शकत नसे. पण ते कांही असले तरी, हे सत्य कोणालाही नाकारता येणार नाही की, त्याची एक प्रियकरिणी होती-हृदय-सम्राज्ञी होती. तिची तो गुप्तपणे अधूनमधून प्रार्थना करीत असे. कारण आपले शहाणपण आणि प्रणयातील गुप्तता यावर त्याचा फार विश्वास असे."

विवाल्डो म्हणाला, "तर मग महाराज, प्रेम करणे हा जर शिलेदारीचा प्राण असेल, तर त्या व्यवसायात असणाऱ्या आपली कोणी तरी हृदय-सम्राज्ञी असेल, असे

मी गृहीत धरतो. डॉन गॅलोरप्रमाणे आपल्याला गुप्ततेचा मोह नसेल तर, या माझ्या सर्व सोबत्यांच्या वतीने मी आपल्याला नम्रपणे विनवितो की, आपल्या सम्राज्ञीचे शुभनाम आणि योग्यता, तिचे जन्मस्थान आणि तिची रूपसंपदा निवेदन करून, आपण आम्हाला उपकृत करावे. आपल्यासारख्या सुलक्षणी सरदाराच्या चिंतनाचा विषय झालेली ती ललना सर्व जगाला माहीत झाली तर ती स्वतःला अत्यंत सुखी मानील यात शंका नाही.''

धनगराची ही विनवणी ऐकून डॉन क्विक्झोट यांनी एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि ते म्हणाले, "माझ्या हृदयावर स्वामित्व गाजविणाऱ्या त्या महिलेची ओळख जगाला झाल्याने तिच्यावर काय परिणाम होईल, हे मी सांगू शकत नाही. ती चारुगात्री माझ्या जीवाचा विसावा आहे. तुमची विनंती मान्य करून मी एवढेच सांगू शकतो की, तिचे नामाभिधान डल्सिनिया असे आहे आणि तिचा देश ला मांचा हा आहे. तिने आपल्या वास्तव्याने भूषविलेले आनंदमय स्थान म्हणजे टोबोसो हे आहे. तिच्या पात्रतेविषयी काय सांगू ? राजकन्येपेक्षा रतिमात्र ती उणी नाही. ती माझी प्रेम–देवता आहे–सम्राज्ञी आहे. सर्व स्त्रीजातीचे सौंदर्य एकवटले तरी ते तिच्या सौंदर्याच्या पासंगास पुरणार नाही. प्रेम–कवींनी आपल्या स्वैर कल्पनाशक्तीने आपल्या प्रेमदेवतेच्या अंगी जे काही पूर्णत्व कल्पिले असेल, ते सर्व तिच्या बाबतीत खरे वाटू लागते–ती वर्णने कपोल–कल्पित मुळीच वाटत नाहीत. त्या कवींनी वर्णिलेली सारी आश्चर्यकारक सौंदर्य लक्षणे तिच्या ठायी दैवाने केंद्रित केलेली आहेत. तिच्या चमकणाऱ्या व तरंगित केसांचे कुरळे झुपके म्हणजे शुद्ध सुवर्ण होय. तिचा मृदुल भाल–प्रदेश म्हणजे दिव्यलोकांची भूमीच होय. आणि तिच्या भुवया ? त्या तर स्वर्गीय धनुष्याच्या कमानी होत. तिचे नेत्र म्हणजे दोन तेजःपुंज सूर्य आणि तिचे गाल म्हणजे गुलाबांचे दोन ताटवे, तिचे ओठ प्रवाळा-सारखे, दात मोत्यांसारखे, आणि कंठ ( नाजुक छटेच्या ) ॲलॅबॅस्टरसारखा आहे. तिचे उरोज संगमरवरासारखे नि तिचे कर हस्तिदंतासारखे असून तिच्या वक्षस्थळापुढे हिम-राशीची धवलता फिकी पडेल. याशिवाय, सभ्यतेमुळे तिच्या ज्या अवयवांचे मला वर्णन करता येत नाही, त्यांचे बाबतीत माझी कल्पनाशक्ती मौनाने गौरव करीत आहे. तिच्या अप्रतिम लावण्याची कल्पना देण्यासारखे निसर्गाजवळ काहीही नाही."

हे ऐकल्यावर विवाल्डो उद्गारला, "हे वर्णन पूर्ण करण्यासाठी महाराजानी आम्हाला कृपा करून तिच्या घराण्याचा आणि तिच्या जन्मस्थानाचा वृत्तांत निवेदन करावा अशी माझी प्रार्थना आहे."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "महाराज, ती प्राचीन रोम किंवा अर्वाचीन कोलोनास किंवा अर्सिनिस यामधून आलेली नाही. तसेच तिचे घराणे व्हॅलेन्शिया, लुनास किंवा ॲरागॉन या प्रदेशातील नाही–आणि पोर्तुगालमधीलही नाही; तर ला मांचा येथील टोबोसोच्या थोर घराण्यात तिचा जन्म झालेला आहे. तिचा वंश अर्वाचीन असला तरी भावी युगामध्ये दैदिप्यमान संतती निर्माण करण्यास समर्थ आहे. या माझ्या वर्णनाचे खंडन करण्याचा आव कोणी आणू नये. केल्यास ओरलँडोच्या चिलखताखाली झर्बिनने

जी अट ठेवली, तीच मी ठेवीन. ती म्हणजे,

ऑलँण्डोच्या कोपाला तोंड देण्याची हिम्मत ज्याची असेल
त्याच्याखेरीज कोणीही हा शस्त्रसंभार हलवू नये.

विवाल्डोने उत्तर दिले, " माझे घराणे लॅरेडो येथील कॅचोपाईन्सचे आहे. तथापि, ला मांचा येथील टोबोसो घराण्याशी मी माझी तुलना करण्यास धजत नाही. पण आपल्याला खरे सांगावयाचे तर, टोबोसो घराण्याविषयी मी या क्षणापर्यंत काहीही ऐकलेले नाही. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " त्या घराण्याविषयी आतापर्यंत तुमच्या कानी काही आले नाही हे नवलच म्हणावयाचे. "

या संवादाकडे बाकीच्या सर्व मंडळींनी फार लक्ष दिले आणि मेंढपाळ व धनगर यांचीही आता तंतोतंत खात्री पटली की, डॉन क्विक्झोटची कवटी उलटी–पालटी झालेली आहे. परंतु सँको पँझाचा विश्वास असा की, आपल्या धन्याच्या मुखातून बाहेर पडणारा प्रत्येक शब्द सत्यच आहे. कारण हा धनी पाळण्यात असल्यापासून सच्चा असल्याचे त्याला माहीत होते, तरीसुद्धा त्याच्या विश्वासाला अंमळसा धक्का बसला, तो टोबोसोच्या डल्सिनियाच्या हकीकतीने. कारण तो टोबोसोच्याजवळ रहात असला तरी त्याने अशी राजकन्या असल्याचे–किंबहुना तिचे नावसुद्धा–कधी ऐकले नव्हते.

त्याचा असा सुखसंवाद चालला असताना, त्या खोलगट रस्त्यावर, जवळच्या डोंगरामधून सुमारे वीस मेंढपाळ चालत असलेले त्यांना दिसले. त्या सर्वांच्या अंगावर काळी कातडी पांघरलेली होती आणि डोक्यावर फुलांच्या माळा होत्या. त्यांच्यापैकी सहाजण एक तिरडी नेत होते. तिच्यावर नाना तऱ्हेची फुले व फांद्या टाकलेल्या होत्या. ती तिरडी पाहून एक धनगर ओरडला, " तेच ते. बिचाऱ्या क्रिसोस्टोमला ते आपल्या आपल्या थडग्याकडे नेत आहेत. आपले प्रेत त्या पलीकडच्या खोलगट जागेत पुरावे, असे त्याने सांगितले होते. " हे ऐकल्यावर त्या सर्वांनी आपली गती द्विगुणित केली. हेतू हा की, आपण तेथे वेळेवर पोचावे–आणि घडलेही तसेच. त्या नव्या मेंढपाळांनी तिरडी जमिनीवर ठेवली. त्याचवेळी हे तेथे जाऊन पोचले. चार नव्या मेंढपाळांनी खडकाच्या अगदी पायथ्याशी कुदळीने जमीन उकरण्यास सुरवात केली. त्या सर्वांनी एकमेकाना अदबीने अभिवादन केले आणि या मृत्यूमुळे झालेल्या हानीबद्दल परस्परांचे सांत्वन केले.

त्यानंतर आपल्याबरोबर आलेल्या लोकांसह डॉन क्विक्झोट तिरडी पाहण्यास गेले. तेथे त्यांना एका तरुणाचे प्रेत दिसले. त्याच्या सर्वांगावर फुले पसरलेली होती. तो मृत माणूस सुमारे तीस वर्षांचा दिसत होता. तो मृत्यू पावला असला तरी त्याचा चेहरा व आकार अत्यंत देखणा होता हे सहज दिसून येत होते. त्या तिरडीवर थोडी पुस्तके व काही कागद होते. काही कागद उघडे होते तर काही घड्या केलेले होते. या दुःखद दृश्याने त्या सर्व मंडळींची मने इतकी शोकमग्न झाली की, तेथे जमलेले बघेच नव्हे तर खड्डा खणणारे लोक आणि अश्रू ढाळणारे सारे मेंढपाळ दीर्घ काळपर्यंत स्तब्ध

राहिले. नंतर त्या प्रेत-वाहकांपैकी एकजण बाकीच्यांना उद्देशून म्हणाला, “ हे पहा, अँब्रोज, क्रिसोस्टोमच्या मनात असलेले स्थान हेच आहे का ते पहा. त्याच्या इच्छे-प्रमाणे साऱ्या गोष्टी तुम्ही कटाक्षाने पार पाडल्या पाहिजेत. ”

दुसऱ्या मेंढपाळाने उत्तर दिले, “ हेच ते स्थान. याच स्थानी माझ्या या अभागी मित्राने मला आपल्या क्रूर दैवाची शोककथा अनेकवार सांगितलेली आहे– आणि येथेच त्याला मानवजातीचा तो घातक शत्रू प्रथम भेटला – येथेच त्याची वासना प्रथम जागृत झाली – ती जितकी निष्पाप, तितकीच तीव्र होती– येथेच त्या निर्दय मार्सेलाने त्याला शेवटचा नकार दिला आणि ती त्याच्यापासून दूर झाली. त्याच्या दुःखमय व शोकमय जीवनाचा भीषण अंत ज्या आत्यंतिक निराशेने व उद्वेगाने घडवून आणला, तिला कारणीभूत होणारा नकार मार्सेलाने त्याला येथेच दिला. अशा अनेक दुर्दैवांचे स्मारक म्हणून, येथेच धरणीमातेच्या उदरात, शाश्वत विस्मृतीच्या गुहेत, आपल्याला गाडून टाकण्यात यावे, अशी त्याची इच्छा होती. ”

नंतर डॉन क्विक्झोट आणि इतर प्रवासी यांच्याकडे वळून तो मेंढपाळ म्हणाला, “ सभ्य गृहस्थहो, येथे जो देह आपल्या दृष्टीस पडत आहे, तो एकेकाळी अत्यंत उदात्त अशा चैतन्याने स्फुरत होता. प्रभूने आपल्याजवळील अत्यंत मौल्यवान अशा देणग्यांनी याचा आत्मा संपन्न केलेला होता. हा देह धारण करणारा क्रिसोस्टोम बुद्धिमत्तेत अद्वितीय, सौजन्यात अतुल्य व आचार-गौरवांत अप्रतिम होता. तो मैत्रीचा सच्चा होता, गाजावाजा न करता उदार व भव्य कृत्ये करणारा होता आणि गर्व न वाहता, शहाणा व गंभीर होता. त्याची नम्रता कृत्रिम नव्हती. त्याचे वागणे मोठे गोड व आल्हाददायक होते. त्याच्या वर्तनात कोणत्याही प्रकारची नीचता नव्हती. थोडक्यात म्हणजे कोणत्याही प्रशंसनीय गुणामध्ये त्याचा क्रमांक पहिला – आणि दुर्दैवामध्येही पहिलाच. त्याने भलेपणाने प्रेम केले आणि त्याचा द्वेष करण्यात आला. त्याने पूजा केली पण त्याचा अव्हेर झाला. साक्षात् क्रौर्यापासून त्याने दयेची याचना केली. हट्टी पाषाणाला पाझर फोडण्याचा प्रयत्न त्याने केला– वाऱ्याचा पाठलाग केला, निर्जन अरण्यामध्ये तो दुःखाने विव्हळला— कृतघ्नतेशी तो अचल निष्ठेने वागला. त्या निष्ठेचे फल म्हणजे ऐन तारुण्यात त्याला मृत्युमुखी पडावे लागले. आपल्या काव्याने जिला अमर करण्यासाठी तो झटला, त्या एका मेंढपाळणीच्या रानटी वर्तनाने त्याचा मृत्यू घडून आला. येथे ठेवलेल्या कागदावर तुम्हाला त्याची काव्ये वाचता येतील. त्याचा देह पृथ्वीच्या पोटात ठेवला जाईल, तेव्हाच हे काव्याचे कागद अग्निसात् करण्याची आज्ञा त्याने मला केलेली आहे. ”

हे ऐकून विवाल्डो उद्गारला, “ तसे जर तुम्ही कराल, तर त्या काव्याच्या दिवंगत व दुर्दैवी जनकापेक्षाही तुम्ही अधिक क्रूर ठराल. महाराज, जरा विचार करा. मृत माणसाची विनंती आपल्या विवेक-शक्तीच्या विरुद्ध असेल, तर ती पूर्ण करणे शहाणपणाशी आणि न्यायीपणाशीही विसंगत आहे. स्वर्गीय व्हर्जिलने आपल्या मृत्युपत्रात जे कृत्य करण्याचा आदेश दिला होता, ते पार पाडण्यास ऑगस्टस सीझरने अनुमति दिली असती तर,

त्याचा सारा शहाणपणा मातीस मिळाला असता. म्हणून महाराज, आता तुम्ही जेव्हा आपल्या मित्राचा देह थडग्यात ठेवाल, तेव्हा त्या प्रिय नि अभागी माणसाचा हा एकमेव नि उदात्त अवशेष विस्मृतीच्या खड्यात–मृत्यूच्या मुखात–लोटण्याची घाई करू नका. आपल्या संतापाच्या भरात त्याने आपले काव्य नष्ट करण्याचा आदेश दिला असला म्हणून काय झाले ? त्या आदेशाचे पालन करण्याचा अविचार तुम्ही करता कामा नये. कायमच्या विनाशापासून तुम्ही ती काव्ये वाचविली पाहिजेत. तसे झाले म्हणजे, ती काव्ये जगभर पसरतील आणि तुमच्या मित्राच्या सद्गुणाची शोककथा नि मार्सेलाची कृतघ्नता युगानुयुगे सांगत राहतील. असे मोहजाल आणि मंत्रजन्य विनाश टाळण्याचा इषारा ती काव्ये इतरांना देतील. तुमच्या प्रेमवेडया व निराश जीवनकथा केवळ मलाच नव्हे तर, येथे जमलेल्या सर्व लोकांना चांगली माहीत आहे. तुम्हा दोघांची मैत्री आम्हाला अपरिचित नाही. तसेच, त्याचा मृत्यू घडवून आणणारे मार्सेलाचे क्रौर्यही आम्हाला अज्ञात नाही. काल रात्री आम्हाला कळले की, या मित्राचे दफन आज येथे व्हावयाचे आहे. ते ऐकल्यावर आमची अंतःकरणे केवळ उत्सुकतेने नव्हे तर करुणेने हेलावून गेली, आणि जे कानी पडताच आमच्या जीवाला इतकी व्यथा झाली, ते प्रत्यक्ष पाहण्यासाठी आम्ही येथे आलो. क्रिसोस्टोमच्या अलौकिक गुणांनी आणि त्याच्या अभागी दुर्दैवाने व्यथित झालेले माझ्यासारखे हे सारे लोक, अशा शोककारक अनर्थांची पुनरावृत्ती भविष्यकाळात होऊ नये अशी इच्छा बाळगतात. म्हणून आम्हा सर्वांच्या वतीने मी आपल्याला विनंती करतो की, यापैकी काही कागद तरी वाचविण्याची परवानगी आपण मला द्यावी–बाकीच्या कागदाचे आपण काय वाटेल ते ठरवावे. ”

उत्तराची वाट न पाहता, त्याने आपला हात पुढे केला आणि आपल्याजवळ पडलेले ते कागद उचलले. तेव्हा अँब्रोज म्हणाला, “ ठीक आहे महाराज, आपण चांगला मार्ग शोधून काढला. तो मला मान्य आहे. ते कागद आपण आपल्यापाशी ठेवावे. पण बाकीचे कागद जाळून टाकण्याचा माझा निर्धार कशानेही बदलणार नाही. ” यावर विवाल्डो काही बोलला नाही. अग्निज्वालेपासून आपण कोणते कागद वाचविले, हे पाहण्याच्या उत्कंठेने त्याने त्यातील एक कागद उघडला आणि त्यावरील काव्याचे नाव वाचले. ते होते–‘ निराश प्रियकर. ’ अँब्रोज म्हणाला,“ माझ्या प्रिय मित्राने लिहिलेले हे अखेरचे काव्य. म्हणून महाराज, मी आपल्याला विनंती करतो की, हे थडगे खणण्याचे काम चाललेले आहे तोपर्यंत आपण ते काव्य मोठ्याने वाचावे. म्हणजे, दुर्दैवी प्रेमाने माझ्या मित्राला कोणत्या दुःखी अवस्थेस पोचविले होते हे आपण सर्वांना कळेल.”

“ वा ! अगदी मनापासून मी वाचतो. ” असे उत्तर विवाल्डोने दिले. साऱ्या मंडळींची इच्छा तीच असल्यामुळे ते सर्वजण त्याच्या सभोवती तत्काळ गोळा झाले, नंतर विवाल्डोने पुढील काव्य वाचले :—

▣ ▣

## प्रकरण ६

# अभागी मेंढपाळाच्या कविता आणि इतर अनपेक्षित घटना.

### हताश प्रेमी

हृदय–स्वामिनी ! निर्दय असती । ऐक ऐक गे, घोर व्यथेसी ॥
दास सोशितो अतुल वेदना । लपविताहि जी कधीं लपेना ॥ १ ॥
जो जो पीडित, आक्रंदे तो । परि मम पीडा, तव निष्ठुरता ॥
वर्णन कोण करील तयाचें ? । हृदयच फुटते सखये ! साचें ॥ २ ॥
घुबड–कावळे दुष्ट लांडगे । पिशाच्च–भूतें निशा दाविते ॥
घों घों वारे करीत सुटले । सागर खवळे ! मेघ उसळले ॥ ३ ॥
त्यांचें तांडव अखंड चाले । व्यथेस माझ्या पंखचि फुटले ॥
प्रतिभा माझी पेटुन उठली । पाताळातुन ही कविता आली ॥ ४ ॥
भयाण गुंफा, भीषण डोंगर । गुहेंत फिरतो मीच निशाचर ॥
दुःख ओकतों, गाणें गातों । पडसाद तयाचा भेदि दिगंतर ॥ ५ ॥
वाऱ्यावरती माझे गाणे । प्रतिध्वनीनें राहि निरंतर ॥
व्यापुनि विश्वा घोर निराशा ॥ राहिल माझी तशि आकाशा ॥ ६ ॥
तीव्र तुच्छता देहा खाई । मत्सर दुःखा अपार देई ॥
विरह जाळतो जीवन सारें । दुःखाचें या भरले वारे ॥ ७ ॥
हृदयी माझ्या कधीं न फुटली । आशेची ती पहाट लाली ॥
करुणेचा ना किरण भेटला । दुःखित–पीडित मम हृदयाला ॥ ८ ॥
पुरी लोपली जीव–माधुरी । घोर निराशा मनीं पातली ॥
अंत करो ती अतां एकदां । अनंत अंता सोशि आपदा ॥ ९ ॥
अंतकालिं तरी प्रेम–भावना । सफल होइ कां ? प्रश्न मन्मना ॥
प्रणय–शून्य हें जीवन माझें । फेकुनि देतों सारें ओझें ॥ १० ॥
प्रिये साजणे, लोटिसि मज तूं । जवळ करी मी माझा मृत्यू ॥
मृत्यूनंतर करी निरंतर । करुणेची तूं वृष्टी मजवर ॥ ११ ॥
अश्रू ढाळी या दीनावर । सारे नंतर ! सारे नंतर ! ! ॥
किती मूर्ख मी ! काय अपेक्षा ! । अश्रूंची मी मागे भिक्षा ॥ १२ ॥

हे जीवांनो ! त्रस्त भुतांनो । तुम्हांपरिस मी त्रस्त जाहलों ॥
किंचाळत या, दिशा दणाणत । कराच तुम्ही माझी सोबत ॥ १३ ॥
नका गाऊं ते गीत शोकपर । नको अंत्य-विधि, मी तो पामर ॥
निराशास उपचार कशाला ? । पणती कसली ? चिरा कशाला ? ॥ १४ ॥
थिजलें जीवित झेली धरणी । विरली माझी सारी गाणी ॥
व्यथाचि माझी उरली आतां । पाताळातहि तशी न चिंता ॥ १५ ॥
ऐक साजणे ! माझें गाणे । गाणे नच हें मम गाऱ्हाणें ॥
जीवित संपे, परी न संपे । ऐसें माझें प्रेम दिवाणें ॥ १६ ॥

या कवितांची त्या साऱ्या मंडळींनी मोठी वाहवा केली. फक्त विवाल्डोने असे मत व्यक्त केले की, या मेंढपाळाने ज्या मत्सराविषयी व भीतिविषयी तक्रार केली आहे, ते दोष मार्सेलाच्या निष्कलंक नम्रतेशी व संकोची स्वभावाशी फारसे जुळणारे नाहीत. ते तिचे दोन दोष ज्याने पूर्वी ऐकलेले होते, तो ॲम्ब्रोज आपल्या मित्राच्या गुह्यात् गुह्य अशा विचाराशी नेहमी परिचित असे. ॲम्ब्रोजनें अशी माहिती पुरविली की, "दुर्दैव क्रिसोस्टोमनें आपल्या पूज्य दयितेपासून दूर होऊन मगच या कविता रचलेल्या आहेत. प्रीतीवर विरह हा नेहमीचा तोडगा. म्हणून त्याला असे वाटले की, आपण आपल्या प्रेयसीपासून दूर गेलो तर आपले दुःख कमी होईल आणि आपल्याला शांती लाभेल. विरहाकुल प्रेमिकाचे चित्त कशानेही अस्वस्थ होते आणि त्या चित्तात सहस्रावधी कल्पनातरंग उठून तो व्यथित होतो, हा नित्याचा अनुभव आहे. त्याप्रमाणे क्रिसोस्टोमचे चित्त मत्सराच्या व संशयाच्या भोवऱ्यात सापडले. त्याचा आधार म्हणजे अस्वस्थ चित्त एवढाच. म्हणून, त्या अस्वस्थ अवस्थेत तो जे जे काही बोलला असेल, त्याचा परिणाम मार्सेलाच्या सुस्वभावावर मुळीच होण्यासारखा नाही आणि तिच्या गुणाविषयी गैरसमज होण्याचेही कारण नाही. तिच्या अंगी निष्ठुरता, तुच्छताबुद्धी आणि तापटपणा हे दोष खुशाल असोत. पण तिच्या नम्रतेविषयी कोणी मत्सरी माणूसही एकही शिंतोडा उडवू शकणार नाही."

अशा प्रकारे विवाल्डोची खात्री पटल्यानंतर ते दुसरा कागद वाचणार होते, पण त्यात अकल्पित अडचण आली. ती म्हणजे एक आकृती त्यांच्यासमोर येऊन उभी ठाकली. ती साक्षात् मार्सेला होती. ती ज्या खडकाच्या माथ्यावर बसलेली होती, त्याच्याच पायथ्याशी लोक थडगे खणत होते. ती इतकी सुंदर दिसत होती की, तिच्या सौंदर्याच्या लौकिकापेक्षा वास्तवात ते सौंदर्य अधिकच होते. ज्यांनी तिला पूर्वी कधीच पाहिले नव्हते, ते तिच्याकडे स्तब्धपणे आश्चर्याने व आनंदाने टक लावून पहात राहिले. एवढेच काय पण तिला रोज रोज पाहणारे लोकही इतरांइतकेच आश्चर्याने मुग्ध झाले. परंतु ॲम्ब्रोजच्या दृष्टीस ती पडताक्षणीच त्याच्या अंतःकरणात क्रोधाची व संतापाची लाट उसळली आणि तो तिला ओरडून म्हणाला, "कशाला आलीस तू इथे ? तू हडळ आहेस – या डोंगरातील जहरी नागीण आहेस. या दुर्दैवी व खन झालेल्या माणसाच्या

जखमेतून आपल्या दर्शनाने पुनः रक्त वाहू लागते की काय, हे पाहण्यासाठी तू येथे आली आहेस की काय ? रोम जळत असलेले पाहून नीरोला जसा अभिमान वाटत होता, तसा अभिमान वाटून तू या डोंगरावर उच्च स्थानी बसली आहेस काय ? आपल्या उपजत अमानुषतेचे घातुक फळ पाहताना तुला मोठा अभिमान वाटत असेल नाही ? किंवा टार्क्विनच्या कृतघ्न कन्येने आपल्या पित्याच्या शवावर जसे नृत्य केले, तसे हे अभागी प्रत आपल्या पायाखाली तुडविण्यासाठी तू येथे आली आहेस काय ? बोल, बोल. तू इथे का आली आहेस आणि तुझी अजून कोणती इच्छा आहे हे लवकर सांग. जोपर्यंत क्रिसोस्टोम जिवंत होता, तोपर्यंत तो आपले सर्व ज्ञान तुझ्या सेवेसाठी आणि प्रसन्नतेसाठी खर्च करीत असे. आता तो मृत्यू पावला आहे. म्हणून मी त्याच्या साऱ्या मित्रांना असेच सांगेन की, तुम्हीही हिची तशीच सेवा करा. ''

मार्सेलाने उत्तर दिले, " असे कोणतेही कृतघ्नतेचे कृत्य करण्यासाठी मी येथे आलेली नाही, तर माझा निरपराधीपणा सर्वांच्या नजरेस आणावा आणि क्रिसोस्टोमचा मृत्यू आणि आपले दुर्दैव यांचे खापर जे लोक माझ्या डोक्यावर फोडतात, ते सर्वजण अन्याय करीत आहे हे दाखवावे म्हणून मी येथे आलेली आहे. म्हणून यावेळी, या ठिकाणी जे लोक जमलेले आहेत त्याना मी विनविते, माझे बोलणे थोडेसे ऐका. कारण, जे उघड उघड सत्य आहे, ते समजुतदार माणसांना पटविण्यासाठी मला फार शब्द वापरावे लागणार नाहीत. तुम्ही मेहरबानी करून म्हणता, देवाने तुला अलौकिक लावण्य दिले आहे; ते इतके की माझ्यावर प्रेम न करण्याचे प्रयत्न केले तरी तुमचे प्रेम माझ्यावर बसतेच आणि त्या प्रेमासाठी मी तुमच्यावर प्रेम केले पाहिजे असे तुम्ही म्हणता. जे जे सुंदर असते, ते प्रेम करण्यासारखे असते हे कळण्याइतकी मी समजुतदार आहे. पण मला हे समजत नाही की, ज्या सुंदर व्यक्तीवर कोणी तिच्या सं दर्यामुळे प्रेम करतो, त्या व्यक्तीने केवळ दुसरा आपल्यावर प्रेम करतो म्हणून त्याच्यावर प्रेम कां करावे ? एखाद्या सुंदर वस्तूवर प्रेम करणारा माणूस कुरूप असू शकेल आणि कुरूप माणसावर प्रेम कोण करील ? ' तू सुंदर आहेस, म्हणून मी तुझ्यावर प्रेम करतो आणि म्हणून तू, मी कुरूप असलो तरी माझ्यावर प्रेम केले पाहिजेस.' असे म्हणणे हास्यास्पद आहे. पण समजा, दोन स्त्री-पुरुष सारखेच देखणे आहेत, तरी त्याचा अर्थ असा नव्हे की, त्यांच्या आकांक्षा समान असतील–पूरक असतील. सादर्याचे सारे प्रकार प्रेमाची ज्योत पेटवू शकत नाहीत. काहीमुळे केवळ दृष्टीला सुख लाभते, पण ते सौंदर्य दुसऱ्याच्या हृदयापर्यंत जाऊन पोहोचत नाही–आणि पोहोचले तरी ते जिंकू शकत नाही. केवढी दुःखाची गोष्ट आहे की, जे जे म्हणून सुंदर, ते ते दुसऱ्याच्या मनाला बंदिवान करणारे प्रेममय करणारे असे झाले, तर मानवजातीच्या आशा–आकाक्षांमध्ये गोंधळ माजेल आणि त्या इतस्ततः धावत सुटतील. त्या आकांक्षांना निश्चित निवड करता येणार नाही. जशा सुंदर वस्तू अनंत आहेत, तशाच त्यांच्या-विषयीच्या लालसाही अनंत आहेत. उलट, खरे प्रेम एकावरच स्वेच्छेने बसलेले असते आणि ते सक्ती मानीत नाही, असे मी ऐकले आहे. हे जर मान्य केले, तर मी तुझ्यावर

प्रेम करतो असे तुम्ही म्हणता, याच एका कारणासाठी मी माझ्या अपेक्षेवर बंधन का घालावे ? समजा, प्रभूने मला जसे सुंदर बनविले आहे, तसेच कुरूप केले असते, तर तुम्ही माझ्यावर प्रेम करीत नाही, म्हणून तुमच्याविरुद्ध मी तक्रार करणे न्यायाचे ठरले असते काय ? हे मला सांगा. त्यासाठी मी तुमची प्रार्थना करते, आणि विनंती करते की, मला ही जी रूप-संपदा लाभलेली आहे, ती मी निवडलेली नाही. तिचा वर्षाव ईश्वराने माझ्यावर मुक्त हस्ताने केलेला आहे. याचाही विचार करा. एखादी नागीण आपल्या विषाने दुसऱ्याला ठार मारते, म्हणून त्या विषाबद्दल तिला दोष देता येईल काय ? निसर्गाने तिच्या अंगी विष घातलेले असते. त्याचप्रमाणे निसर्गाकडून मला लाभलेल्या सौंदर्याबद्दल माझी निंदा करणे योग्य नव्हे. सुशील स्त्रीचे सौंदर्य म्हणजे, एक दूरची ज्वाला किंवा तीक्ष्ण धारेची तलवार ! तिच्या फार जवळ जे जातील, ते जळून खाक होतील किंवा घायाळ होतील. प्रतिष्ठा आणि सद्‌गुण हे आत्म्याचे अलंकार होत. ते ज्या देहापाशी नसतील, तो मूळचा कितीही सुंदर असला तरी त्याला सुंदर मानता येणार नाही. शरीराला भूषविणाऱ्या अलंकारांमध्ये सर्वश्रेष्ठ असणारा, अब्रू हा अलंकार होय. मग जिच्या सौंदर्यासाठी एखादा माणूस तिच्यावर प्रेम करतो, तिने केवळ त्याच्या स्वैर वासना तृप्त करण्यासाठी आपल्या अब्रूचा बळी का द्यावा ? तिने आपली अब्रू कां गमावावी ? स्वार्थासाठी शक्य ते सर्व उपाय योजणाऱ्या त्या माणसासाठी तिने आपली प्रतिष्ठा का गमवावी ? मी जन्मतःच स्वतंत्र आहे. तशीच मी सदैव स्वतंत्र रहावी, म्हणून मी या निर्जन दऱ्या–खोऱ्यामध्ये येऊन राहिलेली आहे. येथील वृक्षवल्ली हे माझे सोयरे आहेत आणि येथील निर्मळ झरे हे माझे आरसे आहेत. या वृक्षाशी व झऱ्याशी मी गुजगोष्टी करीत असते–माझे विचार त्यांना सांगत असते–माझे सौंदर्य त्यांच्या नजरेस आणीत असते. मी एक दूरस्थ ज्वाला आहे–दूरस्थ तलवार आहे. माझ्या दर्शनाने मी ज्यांना आकृष्ट केले असेल, त्यांचा भ्रम–निरास मी माझ्या शब्दाने केलेला आहे माणसाची इच्छा आशेवर जगत असते. क्रिसोस्टोमला किंवा दुसऱ्या कोणालाही मी कधीही उत्तेजन दिलेले नाही. म्हणून असे म्हणता येईल की, त्यांच्या जीविताचा अंत त्यांच्या दुराग्रहामुळे झाला–माझ्या निष्ठुरतेमुळे नव्हे. त्याचे हेतू शुद्ध होते आणि म्हणून ते मी पूर्ण करावयास हवे होते, असे जर तुम्ही म्हणाल तर त्याला माझे उत्तर हे की, ज्या ठिकाणी तुम्ही त्याचे थडगे खणीत आहा, तेथेच त्याने आपली प्रेम–भावना मजपाशी प्रगट केली–आणि तेव्हाच मी त्याला सांगितले की, मी एकाकी जगणार नि एकाकीच मरणार. माझ्या स्वच्छंद स्वभावाचे फल केवळ धरणीमातेच्याच पदरात पडेल आणि माझ्या सौंदर्याचा उपभोग तीच घेईल, असे मी त्याला खडखडीतपणे बजा-वले असतानाही त्याने आपला हट्ट चालविला आणि माझा पाठलाग केला. पण तसे करणे म्हणजे प्रवाहाविरुद्ध पोहण्यासारखे होते. त्या प्रवाहाच्या लाटामध्ये गुदमरून तो मेला यात नवल काय ? मी जर त्याला प्रेम करण्यास उत्तेजन दिले असते किंवा गुळमुळीत बोलून त्याला नादी लावले असते, तर मी खोटी ठरले असते. त्याच्या इच्छा जर मी

पूर्ण केल्या असत्या तर मी माझ्या शुभ निर्धारापासून ढळले असते. मी त्याला योग्य तो इशारा दिला असतानाही त्याने माझा पिच्छा पुरविला. मी त्याचा द्वेष केला नाही, पण तो निराश झाला.

"आता, त्याच्या दुःखाबद्दल मला दोष देणे योग्य आहे का, हे ठरविण्याचे काम मी तुमच्यावरच सोपवते. मी जर कोणाला फसविले असेल, तर त्याने तक्रार करावी. मी जर कोणाचा वचनभंग केला असेल, तर त्याने निराश व्हावे. मी जर कोणाला उत्तेजन दिले असेल, तर त्याने माझ्या प्रातीची आशा धरावी. मी कोणाचे स्वागत केले असेल, तर त्याने त्याबद्दल बढाई मारावी. पण मी जोपर्यंत कोणाला फसवीत नाही, उत्तेजन देत नाही, स्वागत करीत नाही अथवा कोणाचा वचनभंग करीत नाही, तोपर्यंत मला कोणीही निष्ठुर किंवा खुनी म्हणता कामा नये. मी कोणावर प्रेम करावे हे नियतीने ठरविल्याचे परमेश्वराने कधी स्पष्ट केले नाही—त्याने आपली इच्छाही प्रगट केली नाही. मग मी दुसऱ्याच्या पसंतीने कोणावर प्रेम करीन असे मानणे व्यर्थ आहे. म्हणून आपल्या स्वार्थाच्या हेतूने जे कोणी मला उद्देशून प्रेमाचे चाळे करतील, त्या सर्वांनी हा माझा सर्वसामान्य इशारा ध्यानी घ्यावा, आणि यापुढे जर माझ्यामुळे कोणाचा मृत्यू ओढवला, तर त्या मृत्यूचे कारण माझी तुच्छताबुद्धी किंवा द्वेषबुद्धी आहे, अथवा परस्परांचा मत्सर हे आहे, असे कोणी मानू नये. कारण जी कोणावर प्रेम करण्याचे ढोंगसुद्धा कधी करीत नाही, ती कोणाच्या मनात मत्सर कसा उत्पन्न करील? माझा जो कृतनिश्चय मी स्पष्टपणे व निःसंदिग्धपणे जाहीर केला आहे, त्याला द्वेष किंवा तिरस्कार कसे म्हणता येईल? 'वाघीण—नागीण' म्हणून मला जो कोणी संबोधित असेल, त्याने मला भयप्रद मानून मला टाळावे; मला कृतघ्न म्हणणाऱ्याने माझ्या भजनी लागण्याचे सोडून द्यावे. मी त्यांचा कधीही पाठलाग करणार नाही आणि त्याच्या मागे मागे जाणार नाही, असे खात्रीने सांगते. म्हणून यापुढे माझ्या स्वास्थ्याचा भंग करण्याचा खटाटोप कोणी करू नये. सांप्रत मी जी शांतता उपभोगीत आहे, तिचा बळी कोणा पुरुषासाठी मी द्यावा, असा प्रयत्न कोणी करू नये. ती शांतता पुरुषामध्ये सापडणार नाही, असा माझ्या मनाचा ग्रह झालेला आहे. माझ्याजवळ भरपूर संपत्ती आहे. मी कोणावर प्रेम करीत नाही की कोणाचा द्वेष करीत नाही. शेळ्यांच्या कळपावर देखरेख करताना—आणि ती करीत असताना आजूबाजूच्या धनगरांच्या मुलींशी निरागस गप्पा-गोष्टी करण्यात माझा वेळ निघून जातो—एकाशी प्रेमचेष्टा कराव्या आणि दुसऱ्याला प्रेमजालात पकडण्याच्या लीला कराव्यात—असा माझा स्वभाव नाही. माझे विचार या पर्वतांनी सीमित झालेले आहेत. ते माझे विचार संचार करू लागले तर स्वर्गाच्या सौंदर्याचे गुणगान करतात, आणि त्यामुळे क्रमाक्रमाने माझा जीवात्मा निजधामाकडे वाटचाल करीत असतो."

एवढे बोलून झाल्यावर उत्तराची काहीही अपेक्षा न करता ती तेथून निघाली, आणि शेजारच्या घनदाट जंगलात पळत सुटली. तिच्या सौंदर्याबरोबरच तिच्या चातुर्याने

मंत्रमुग्ध झालेले सारे लोक तेथेच खिळून राहिले.

तथापि तिचे सौंदर्य इतके आकर्षक होते की, तिने गंभीरपणे निषेध केला असतानाही मुळीच खचून न जाता, त्या मंडळींपैकी काहीजण तिच्या मागोमाग जाऊ लागले, इतका तिचा विलक्षण प्रभाव त्यांच्या मनावर पडलेला होता. परंतु डॉन क्विक्झोट यांनी त्यांचा हेतू ओळखला आणि आपले शिलेदारीचे गुण दाखविण्यास ही नामी संधी आहे, असे मानून ते म्हणाले, " कितीही गुणवान किंवा धनवान कोणी असला तरी, त्याने सुंदर मार्सेलाचा पाठलाग करण्याचा विचार मनात आणू नये. तसे कोणी केल्यास त्याला माझा भयंकर क्रोध सहन करावा लागेल. क्रिसोस्टोमच्या मृत्यूला आपण कारण नाही, हे तिने ज्या युक्तिवादाने पटवून दिले आहे, तो नाकारता येण्यासारखा नाही. आपल्या कोणाही भक्ताची इच्छा पूर्ण करण्याची कृपा आपण कधीही करणार नाही, असा आपला दृढनिश्चय तिने स्पष्टपणे जाहीर केला आहे. त्यामुळे तिच्याविषयी कोणी आग्रह धरू नये आणि तिचा पाठलाग करू नये. त्याऐवजी सर्व सज्जनांनी तिचा सादर सन्मान केला पाहिजे. कारण, इतकी गुणवत्ता नि शालीनता असलेली साऱ्या जगात बहुधा तीच एकटी स्त्री असेल. "

डॉन क्विक्झोट यांच्या या धमक्यानी ते कामुक धनगर घाबरून गेल्यामुळे असो किंवा अँब्रोजने त्यांना तेथे थांबून आपल्या मित्राचे दफन करण्यास विनविल्यामुळे असो, तेथून एकही मेंढपाळ निघून गेला नाही.

थडगे तयार झाले – काव्याचे कागद जाळले गेले. ते शव धरणीमातेच्या उदरात ठेवण्यात आले. सर्वांच्या डोळ्यातून अश्रु घळघळा वाहू लागले. त्यांनी त्या थडग्यावर एक मोठी शिला बसविली. स्मारक पुढे होणार होते. तशी व्यवस्था अँब्रोजने केली होती. त्या स्मारकावर पुढील शिला-लेख लिहिला जाणार होता—

## क्रिसोस्टोमचा समाधी–लेख

दुःखी प्रेमिक होउनि गेला । इथें झोपलें शरीर त्याचें ॥
निर्दय दयिता कृतघ्न कुपिता । देह तयाचा निष्प्राण करी ॥
इथें तयानें प्रणय जोखिला । इथेंच त्यानें क्लेश भोगिला ॥
इथें तयाला नकार आला । इथेंच त्याची विश्रम–शाला ॥
शोक मेंढपाळाकरिता । करणारांनो दूर पळा ॥
अव्हेरी जी क्रिसोस्टोमा । मानवजातिस घातक ती ॥

त्या धनगरानी त्या थडग्यावर पुष्कळ पाने–फुले पसरली. प्रत्येकाने काही काळ क्रिसोस्टोमचा मित्र अँब्रोज याचे सांत्वन केले, आणि त्याचा निरोप घेऊन ते निघून गेले. विवाल्डो व त्याचा सोबती यानीही तसेच केले. डॉन क्विक्झोट यांनीही तसेच केले. अशा प्रसंगी स्वतःचे कर्तव्य विसरणारे ते नव्हते. त्या प्रेमळ मेंढपाळांनाही त्यांनी रामराम केला—त्यांनी त्यांचे स्वागत केले होते ना ? तसेच त्यांना आपल्याबरोबर सेव्हिलला

चलण्याचा आग्रह करणाऱ्या दोन प्रवाश्यांचाही क्विक्झोट यांनी निरोप घेतला. त्यांनीच त्याना खात्रीपूर्वक सांगितले होते की, "पराक्रम करण्याला सेव्हिलसारखे अन्य स्थान या पृथ्वी-तलावर नाही– तेथील प्रत्येक रस्त्यावर आणि प्रत्येक कोपऱ्यावर पराक्रम दाखविण्यास संधी आहे." त्यांनी प्रेमाने दिलेल्या या माहितीबद्दल डॉन क्विक्झोट यांनी त्याचे आभार मानले, पण त्यांना सांगितले की, "या साऱ्या डोंगराळ भागात चोरादरोडेखोरांचा सुळसुळाट झाला आहे. त्या सर्वांचा नायनाट करून हे सारे डोंगर निर्भय करीपर्यंत मी सेव्हिलला जाणार नाही – आणि जाणे योग्यही नाही." त्यांच्या या शुभ-संकल्पापासून त्यांना च्युत करण्यास ते प्रवासी राजी नव्हते. म्हणून त्यानी त्यांचा पुनः एकदा निरोप घेतला आणि आपला प्रवास पुढे चालविला. चालताचालता मार्सेला व क्रिसोस्टोम यांची प्रेम-कहाणी आणि डॉन क्विक्झोट यांचा मूर्खपणा – यावर ते बोलत होते. क्विक्झोट यांनी निश्चय केला की, शक्य तर, धनगर–कन्यका मार्सेला हिला आपण शोधून काढावे आणि तिच्या संरक्षणासाठी आपण पराकाष्ठेचा प्रयत्न करून तिची सेवा करावी. पण त्यांची ही योजना ढासळली. ती हकीकत तुम्हाला या सत्य-कथेच्या पुढील भागात वाचावयास मिळेल. कारण, दुसरे पुस्तक येथे समाप्त होते.



# खंड–३

## प्रकरण १

## कांही रक्तपिपासु व दुष्ट हमालाबरोबर डॉन क्विक्झोट यांचा जो दुर्दैवी सामना झाला, त्याचा वृत्तांत

साधु सिड हॅमेट बेनेनगेली याने लिहिले आहे की, क्रिसोस्टोमच्या अंत्यविधी-साठी जमलेल्या सर्व लोकांचा निरोप घेऊन डॉन क्विक्झोट व त्याचा नोकर मार्सेलाच्या पाठोपाठ अरण्यात गेले. दोन तासांहून अधिक काळ तेथे भटकल्यानंतरही त्यांना तिचा शोध लागला नाही. म्हणून ते एका हिरव्यागार कुरणात शिरले. तेथील लुसलुशीत हिरवळ एका लहानशा आनंदी व खेळकर नदीवर पोसलेली होती. ती हिरवळ त्यांना आपल्याकडें येण्यास खुणावीत होती—नव्हे, आपापल्या वाहनावरून खाली उतरण्यास सक्तीने पण सुखद रीतीने भाग पाडत होती. त्यावेळी उकाडा भयंकर भडकला होता. तो टाळण्यासाठी त्या दोघांनी गाढव व रोझिनांट या आपल्या वाहनाना चरावयास मोकळे सोडले आणि आपल्या पडशीतील खाद्यपदार्थांचा फडशा पाडला. जे जे पदार्थ मिळाले ते सर्व त्यांनी मोठ्या आवडीने, गाजावाजा न करता, फस्त केले. सँकोनें रोझिनांटला बांधून ठेवण्याची काळजी घेतली नाही. त्याला वाटले, हे घोडे गंभीर व पवित्र स्वभावाचे असेल. कोर्डोव्हामधील कुरणामध्ये जेवढ्या घोड्या असतील, त्या साऱ्या पाहूनही आपल्या मालकाचा घोडा असभ्य वर्तन करण्याचा प्रयत्न करणार नाही अशी सँकोची समजूत. पण दैव किंवा सैतान कधीही झोपी जात नाहींत. त्यांनी असे घडवून आणले की, यांग्वेसिअन माल वाहतूक करणारांच्या मालकीच्या बऱ्याचशा गॅलशियन घोड्या त्याच दरीमध्ये त्याच वेळी चरत होत्या. उन्हाळा कडक झाला म्हणजे जेथे आपल्या गुरांना गवत व पाणी मिळेल, तेथे थांबण्याची त्या वाहकाना सवय होती, आणि जेथे डॉन क्विक्झोट होते त्याहून अधिक चांगली जागा त्यांना मिळणे शक्य नव्हते.

मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, रोझिनांट शुद्ध व शालीन होता. पण तो हाडा-मांसाचा प्राणी होता. म्हणून त्या घोड्यांचा वास लागताच त्याने आपले उपजत गांभीर्य व संकोच यांचा त्याग करून आणि आपल्या मालकाची परवानगी न घेता उत्साहाने त्या घोड्याकडे धाव घेतली आणि त्याने त्यांना आपल्या लहानशा गरजेची जाणीव करून दिली. पण त्या घोड्यांचे लक्ष मौज करण्यापेक्षा गवत खाण्याकडे अधिक होते. त्यांनी

त्या शूर–वीर घोड्याचे स्वागत आपल्या खुरानी व दातानी अत्यंत उद्धटपणाने केले. त्याचा परिणाम म्हणजे एका झटक्यात त्या घोड्यांनी रोझिनांटचा कमरेवरील पट्टा मोडून टाकला, त्याचे खोगीर जमिनीवर पाडले आणि त्याच्या अंगावरील सारा जामानिमा उधळून लावला. या दुःखात भर म्हणूनच की काय, ते हमाल आपल्या घोड्यांवर अत्याचार होत असलेला पाहून त्यांच्या मदतीसाठी, काठ्या–लाठ्या घेऊन धावून गेले, आणि त्या बिचाऱ्या रोझिनांटला त्यांनी इतके बदडून काढले की, त्यांच्या निर्दय ठोशांच्या मारामुळे तो घोडा तत्काळ भूमीवर कोसळला.

रोझिनांटची ती दुर्दशा दुरून दृष्टीस पडताच, डॉन क्विक्झोट व सँको त्याच्या मदतीसाठी अत्यंत वेगाने धावून गेले. धापा टाकीत त्या ठिकाणाजवळ ते गेले, तेव्हा ते पार थकलेले होते. तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडले, " मित्रा सँको, हे सरदार नाहीत असे मला दिसते–हलकट बदमाषांचीच ही टोळी आहे. आपल्या डोळ्यासमोर त्यांनी रोझिनांटला जो उपद्रव दिला त्याचा सूड घेण्याचे कामी तू मला मदत करणे न्यायाचे होईल. " तेव्हा सँको म्हणाला, " सूडाचे काय बोलता ? अखेर आपलाच सूड उगविला जाईल ! ते वीसजण आहेत, हे तुम्ही पाहताच, आणि आपण फक्त दोघे–छे, दीडच ! " डॉन क्विक्झोट उत्तरले, " मी एकटा शंभरांना भारी आहे. " अधिक काही न बोलता, त्यानी आपली तलवार उपसली आणि त्या यांग्वेसिअनांवर ते धावून गेले. आपल्या धन्याच्या उदाहरणाने उत्तेजित होऊन सँकोनेही तसेच केले. डॉन क्विक्झोट यांनी त्यांच्यापैकी एकाला असा तडाखा दिला की, त्यामुळे त्याचा कातडी कुडता फाटला आणि त्याच्या खांद्यावर खोल जखम झाली. आपल्याशी अशी दांडगाई केल्याचे पाहून त्या यांग्वेसियन वाहकांनी आपापल्या लाठ्याकाठ्या घेतल्या, आमच्या शूर सरदारजींना व त्याच्या विश्वासू नोकराला एकदम वेढा घातला आणि अत्यंत त्वेषाने त्या दोघांवर हल्ला केला. दुसऱ्याच हल्ल्यात त्यांनी बिचाऱ्या सँकोला जमिनीवर लोळविले–आणि नंतर खुद्द डॉन क्विक्झोट यांनाही. योगायोग असा की, रोझिनांटच्या पायाशी क्विक्झोट जाऊन पडले. त्या घोड्याच्या तंगड्या अजून बऱ्या झाल्या नव्हत्या. त्या लाठीधारी खेडवळ लोकांच्या संतापापुढे आमच्या सरदारजींचे धैर्य किंवा चातुर्य यांचे काही चालेना. आपल्या खोडसाळपणाचे भयंकर परिणाम होतील, या भीतीने ते याग्वेसियन लोक शक्य तितक्या घाईने तेथून निघून गेले–आपल्या दोन वीरांना शोचनीय अवस्थेत टाकून निघून गेले.

प्रथम शुद्धीवर आला सँको पँझा. आपला धनी आपल्या शेजारी आहे असे पाहून त्याने क्षीण व दुःखी स्वराने त्याला हाक मारली, " धनीसाहेब ! धनीसाहेब ! सरदारजी ! सरदारजी ! " तशाच क्षीण व दुःखी स्वराने सरदारजींनी विचारले, " काय म्हणतोस, मित्रा सँको ? " सँकोने उत्तर दिले, " महाराजांजवळ मद्य असेल तर, त्याचे दोन घोट मला द्यावेत, अशी माझी इच्छा आहे. या मद्याची आपण नेहमी तारीफ करता. बाहेरच्या जखमा बऱ्या करणे जितके चांगले, तितकेच आतील मोडलेली हाडे दुरुस्त करणे चांगले. "

ते ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, यावेळी, या स्थळी, ते मद्य माझ्याजवळ थोडे तरी असायला हवे होते. ते असते म्हणजे आपल्याला दुसऱ्या कशाची गरज लागली नसती. पण प्रामाणिक सँको, शिलेदारीची शपथ घेऊन मी तुला सांगतो की, आता माझ्याजवळ दारूचा थेंबही नाही. ( दुसरे काही संकट माझ्यावर न कोसळल्यास ) दोन दिवसात माझ्याजवळ थोडी दारू येईल आणि ती मी तुझ्यासाठी राखून ठेवीन." सँको उत्तरला, "दोन दिवस ! महाराज, म्हणजे आपल्याला आपले पाय चालविण्यास किती दिवस लागतील असे आपल्याला वाटते ?" जखमी झालेले डॉन क्विक्झोट यांनी जबाब दिला, "आपण बरे होण्याला किती दिवसांचा अवधी लागेल, हे मी सांगू शकत नाही. पण या सर्व अनर्थाचे कारण मी आहे. कारण, शिलेदारीचा बहुमान ज्यांना लाभलेला नाही, अशा गुंडांच्या टोळीवर मी माझी समशेर उपसावयास नको होती. पण मी शिलेदारीच्या नियमांचे उल्लंघन केले आणि म्हणून त्या जगन्नियंत्याने मला ही शिक्षा दिली. म्हणून मित्रा सँको, तुला जे सांगत आहे ते नीट ऐक. कारण आपणा दोघांच्याही कल्याणाशी त्याचा निकटचा संबंध आहे. यापुढे जेव्हा जेव्हा अशा हलकट लोकांकडून आपल्याला काही उपद्रव होत असल्याचे तुला दिसेल, तेव्हा मी त्यांच्यावर उगारण्यासाठी माझी तलवार उपशीन अशी आशा तू करू नकोस. मी तसे मुळीच करणार नाही. त्यावेळी तूच तलवार उपस, आणि तुला योग्य वाटेल त्या मार्गाने त्यांना शासन कर. पण जर त्या लढयात कोणी शिलेदार भाग घेऊ लागले, तर तू आणि ते संकट यांच्यामध्ये मी उभा राहीन, आणि पराकाष्ठेच्या सामर्थ्याने व निर्भयतेने त्यांच्यावर हल्ला करीन ही खात्री बाळग. माझे शौर्य किती मोठे आहे आणि माझ्या भीषण शस्त्रांची शक्ती किती प्रभावी आहे, याचे हजारो पुरावे तुला यापूर्वीच मिळालेले आहेत."

( बहाद्दर बिस्केनर यांच्यावर विजय मिळविल्यापासून आपले सरदारजी इतके फु गू गेले होते. ) पण आपल्या धन्याच्या या बढाईने सँको फारसा खूष झाला नाही त्याना उत्तर देणे त्याला योग्य वाटले आणि म्हणून तो म्हणाला, "महाराज, मी एक शांतताप्रेमी माणूस आहे – अगदी निरुपद्रवी व्यक्ती आहे, हे लक्षात घ्या. ज्याला आपली बायको संभाळायची आहे आणि मुलेबाळे जोपासायची आहेत, अशा कोणत्याही कुटुंबवत्सल माणसाप्रमाणे मी हाणामारीपासून दूर असतो. म्हणून महाराज, माझा सल्ला म्हणून मी आपणाला सांगतो, ( मी माझ्या धन्याला आज्ञा करू शकत नाही. ) सरदार असो वा विदूषक असो, मी कोणावरही, कशासाठीही माझी तलवार उपसणार नाही– मुळीच नाही. राव असो वा रंक असो, उच्च असो वा नीच असो, मालक असो वा भिकारी असो – कोणीही, कधीही माझ्यावर अन्याय केलेला असेल – किंवा पुढे करणार असेल– तरी मी अखेर मानवजातीला अनिर्बंधपणे, निरपवादपणे क्षमाच करीन." हे ऐकून धनी म्हणाला, "सँको, तुला चोख उत्तर देण्याइतकी शक्ती माझ्या अंगी असावी अशोनाझो मना ासून इच्छा आहे. निदान माझ्या लहानशा बरगडीत मला ज्या वेदन होत आहेत, त्या तरी नाहीशा व्हाव्या, म्हणजे तुझी चूक मी तुला पटवून देऊ शकेन.

मूर्ख माणसा, हे पहा, आज दैवाचे वारे आपल्याला प्रतिकूल वहात आहेत. पण, शेवटी ते आपल्याला अनुकूल अशा दिशेने वाहू लागतील आणि आपल्या इच्छांच्या शिडांमध्ये तो वारा भरेल, आणि मग आपल्या जीवनाची नौका सुखाने आणि सुरक्षितपणाने एखाद्या बेटाला जाऊन पोहोचेल. त्यांपैकी एक बेट तुला बहाल करण्याचे वचन मी दिलेले आहे. त्यातील एक बेट मी जिंकून घेतल्यानंतर त्याचा राजा मी तुला करणार. मग तुझे काय होईल ? तू जर शिलेदारीची सारी लक्षणे आणि कर्तव्ये झुगारून दिलीस, मान–सन्मानाच्या साऱ्या कल्पना फेकून दिल्यास आणि अन्यायाचा सूड उगविण्याची व आपल्या राज्याचे रक्षण करण्याची इच्छा सोडून दिलीस, तर त्या बेटाच्या राजेपणाच्या प्रतिष्ठेला तू खचित योग्य ठरणार नाहीस. कारण तू हे समजून घेतले पाहिजेस की, नवीन जिंकलेल्या राज्यामध्ये व प्रांतामध्ये वास्तव करणाऱ्या लोकांची मने व अंतःकरणे पूर्णपणे कधीच जिंकली जात नाहीत, आणि नव्या राज्यकर्त्यांच्या हिताशी ती कधीच संलग्न होत नाहीत. उलट साऱ्या कारभाराचे स्वरूप बदलण्यासाठी काही गोंधळ माजविण्याचा–( काही लोक म्हणतात त्याप्रमाणे ) आपले नशीब उजळण्याचा प्रयत्न ते लोक करतील, असे सकारण भय वाटते. म्हणून नव्या राज्यकर्त्याला राज्यकारभाराचे केवळ ज्ञान असून भागणार नाही, तर आपल्या शत्रूंचा पाडाव करून, सर्व प्रसंगी आपले संरक्षण करण्याचे शौर्यही त्याने दाखविले पाहिजे. ''

यावर सँको म्हणाला, '' महाराज, आपण म्हणता ते ज्ञान नि शौर्य माझे अंगी असावे, अशी माझी फार इच्छा आहे. पण यावेळी मला उपदेशापेक्षा वैद्यराजाची अधिक गरज आहे, हे मी आपल्याला मोकळेपणी सांगतो. माझी आपल्याला प्रार्थना आहे की, आपल्याला उठून उभे राहणे शक्य आहे का, हे पहा आणि मग आपण रोझिनांटला हात देऊ. तशा मदतीला तो लायक नाही. कारण, या सर्व मारहाणीचे मुख्य कारण तोच आहे. त्याच्यावर आता माझा विश्वासच उरला नाही. पूर्वी मला वाटे, माझ्यासारखाच तो शुद्ध व शांत स्वभावाचा आहे. पण ते खोटे ठरले. सारांश, ' पुष्कळ खाणेपिणे झाल्यावरच आपल्याला आपला मित्र ओळखता येतो ' ही म्हण खरी आहे. तसेच ' या जगात कशाचीच खात्री देता येत नाही ' असे मला दिसत आहे. त्या शिलेदाराला आपण इतके भयंकर तडाखे दिल्यावर, आपल्या खांद्यावर ताबडतोब भयंकर आघातांचा वर्षाव होईल, असे कोणास वाटले असेल ? ''

डॉन क्विक्झोट उत्तरले, '' तुझ्या खांद्यांना अशा आघातांच्या वर्षावाची सवय आहे. पण माझे खांदे मऊ लोकरीमध्ये राहिलेले आहेत, म्हणून त्यांना या संकटाची जाणीव अधिक काळ होत राहील, हे निःसंशय. पण माझी अशी कल्पना आहे, ( कल्पना कशाला ? खात्री आहे. ) या साऱ्या गैरसोयी म्हणजे शिलेदारीच्या व्यवसायाचे अविभाज्य अंग आहेत. तशी मला खात्री वाटत नसती तर, मी शोकाने विव्हळ झालो असतो आणि केवळ निराशेने याच स्थानी प्राण सोडला असता. '' तेव्हां सँको म्हणाला, '' आपल्या शिलेदारीच्या धंद्यातील या जखमा हा अटळ भाग असेल तर

महाराज, कृपा करून मला हे सांगा की, असे प्रसंग वारंवार येत असतात की ठराविक वेळी त्यांची वाट आपण पहावयाची? कारण माझा असा तर्क आहे की, आणखी अशा दोन सरी कोसळल्या तर तिसरी सर पाहण्यास ईश्वराने अपार दया-बुद्धीने मदत न केल्यास आपण काही जिवंत राहणार नाही." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "मित्रा सँको, शिलेदारीच्या जीवनात हजारो संकटे आणि दुर्दैवे येणारच, हे तू समजून ऐस. पण त्याबरोबरच हेही लक्षात घे की, असे शिलेदार कोणत्याही क्षणी अकस्मात् राजे-महाराजे होऊन जातात. कैक शिलेदारांच्या जीवनात असे अनुभवास आले आहे. त्यांच्या जीवन-वृत्तांताचे मला परिपूर्ण ज्ञान आहे, (माझ्या वेदना जरा कमी होऊ देत.) मी तुला त्यांपैकी काही वृत्तांत निवेदन करीन. अरे, किती तरी शिलेदारांनी केवळ आपल्या शस्त्रांच्या शौर्याने उच्च पद प्राप्त करून घेतले आहे आणि तसे करण्यापूर्वी व त्यानंतरही किती तरी संकटांना तोंड दिले आहे. गॉलचा शूर अॅमॅडिस हा आर्चेलास या मांत्रिकाच्या वैरामध्ये गुरफटला गेला होता, आणि त्याने त्याला कैदी करून घोड्याच्या लगामाने दोनशेपेक्षा अधिक फटकारे दिले-अगोदर आपल्या घराच्या अंगणात त्याला एका खांबाला बांधून दिले, असे म्हणतात, आणि ते खरे असेल. दुसरा एक गुप्त विश्वसनीय लेखक असे सांगतो की, सूर्यचिन्ह धारण करणाऱ्या एका शिलेदाराला एका किल्ल्यात फसवून पकडण्यात आले, आणि एका खोल खड्डयात त्वरेने फेकून देण्यात आले. तेथे त्याचे हातपाय बांधून त्याला वाळू व बर्फाचे पाणी सक्तीने खावयास लावले. त्यामुळे तो मेलाच असता. पण त्याचा एक मित्र हा चतुर जादूगार होता, त्याने त्याला त्या संकटात मदत केली. मीही माझे दुर्दैव शांतपणे सहन करीन. आतापर्यंत मोठमोठ्या लोकांनी जी दुःखे सहन केली, त्यांच्यापेक्षा माझे दुःख मोठे आहे. कारण तू हे पक्के ध्यानात धर की, आपल्या हातात असतील त्या शस्त्रांनी व साधनांनी एखादा माणूस ज्या जखमा करतो, त्यांनी त्या माणसाला कमीपणा येत नाही. द्वंद्वयुद्धातील हा स्पष्ट नियम आपण वाचतो की, 'एखाद्या चांभाराने आपल्या हातीं असेल त्या साधनानें-मग ते लाकडाचे असो किंवा सोटा असो-दुसऱ्याला मारले तर, त्या दुसऱ्या माणसावर सोट्याचा आघात झाला, असे लोक म्हणत नाहीत. हे मी तुला याकरिता सांगत आहे की, आपल्याला या प्रतिहल्ल्यात जबरदस्त मार बसला असला तरी, त्यामुळे आपला काही अपमान झाला असे तुला वाटू नये. कारण त्या माणसांनी जी शस्त्रे वापरली, ती केवळ त्यांच्या धंद्याची साधने होती. त्यांपैकी एकही बरची, खंजीर किंवा तलवार नव्हती असे मला नक्की आठवते."

यावर सँको म्हणाला, "त्या वस्तूंचे इतक्या बारकाईने निरीक्षण करण्यास त्यांनी मला सवडच दिली नाही. कारण, मी माझ्या तलवारीला हात घालतो न घालतो तोंच, त्यांनी आपल्या दंडुक्यांचा कृपाप्रसाद माझ्या खांद्यावर असा काही केला की, त्यामुळे मी भूमीवर कोसळलो आणि माझी सारी शुद्धबुद्ध नि हालचाल थांबली. येथे मी पडलेला आपण पाहिलाच आहे. लाठ्यांनी किंवा काठ्यांनी आपल्यावर हल्ला होणे, आपल्याला

लांच्छनास्पद आहे की नाही, याचा शीण मी माझ्या डोक्याला देत नाही. ते तडाखे जसे असतील तसे असोत, पण माझ्या खांद्यावर ते इतक्या जबरदस्तपणे बसले की, त्यांच्या वेदनांमुळे मला दुःख होत आहे. ते तडाखे जितके माझ्या मनात, तितकेच माझ्या शरीरात रुतून बसले आहेत, असे मला वाटते. ''

डॉन क्विक्झोट उत्तरले, '' मित्रा सँको, या सर्व गोष्टींवर मी तुला एक समाधानाचा मार्ग सांगतो. काळाने पुसली जात नाही अशी आठवण नाही आणि मृत्यूने संपत नाही असे दुःख नाही, '' तेव्हां सँको म्हणाला, '' याने माझे काहीच समाधान होत नाही. तरी पण मी आपले आभार मानतो. केवळ मृत्यूचीच वाट पहावयास लावणाऱ्या संकटा-पेक्षा अधिक दुःखदायक काय असणार ? एकदोन मलमपट्ट्या लावून बरे होण्यासारखे दुखणे असेल, तर माणूस ते शांतपणे सहन करील. पण मला असे दिसते की, दवाखान्यातील सारी मलमे लावली तरी आपल्याला पुनः आपल्या पायावर नीट उभे राहता येणार नाही. '' तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडले, '' बस्स् कर तुझी बडबड. धैर्य धर आणि आलेली आपत्ती गोड मानून घे. तसे करण्याचा मी निश्चय केला आहे. रोझिनांटची स्थिती काय आहे हे आपण पाहू या. कारण या मोहिमेत त्या गरीब–बिचाऱ्या प्राण्यालाही पुष्कळ दुःख सोसावे लागले, अशी माझी समजूत आहे–आणि ती चुकीची नसेल असे वाटते. '' तेव्हा सँको म्हणाला, '' त्यात नवल काय ? तोही एक शिलेदारच आहे की ! आपली इतकी दुर्दशा झाली असताना, माझे गाढव या दुःखातून कसे निसटले नि सुरक्षित राहिले, याचे मला आश्चर्य वाटते. '' डॉन क्विक्झोट उत्तरले, '' आपल्या सर्व संकटांचे वेळी काही उपाय शोधण्यासाठी दैव नेहमी एखादे दार उघडे ठेवीत असते. सँको, मी असे म्हणतो याचे कारण हे की, मला एखाद्या किल्ल्यावर नेण्यासाठी रोझिनांटची गरज लागली तर ती हा छोटा प्राणी आता भरून काढील, आणि त्या किल्ल्यावर माझ्या जखमा मी बऱ्या करीन. गाढवावर बसून जाणे हे मी अपमानाचे समजत नाही. कारण मला हे आठवते की, आनंदमूर्ति मद्य–देवाचा गुरू व पालक जो भला म्हातारा सायलेनस, याने जेव्हा शंभर वेशी असलेल्या शहरात प्रवेश केला, तेव्हा तो एका उमद्या गाढवावरच बसून गेला. ''

हे ऐकून सँको म्हणाला, '' वा ! वा ! त्याच्याप्रमाणेच आपणही आपल्या गाढवा-वर सुखाने बसू शकला, तर फार चांगले. पण गाढवावर स्वार होणे निराळे आणि त्याच्या पाठीवर चिंध्यांच्या गाठोड्यासारखे बसून जाणे निराळे. '' पण डॉन क्विक्झोट म्हणाले, '' युद्धात झालेल्या जखमामुळे आपला मान वाढतो–नष्ट होत नाही. दोस्ता, आता आणखी काही उत्तरे देऊन मला सतावू नकोस. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे उभे राहण्याचा प्रयत्न कर आणि मला तुझ्या गाढवावर, तुझ्या मर्जीप्रमाणे, बसव. म्हणजे रात्र पडण्यापूर्वी आपण इथून निघून जाऊ. '' तरी सँको पुनः म्हणालाच, '' पण महाराज, आपण नेहमी असे म्हणता की, रानावनामध्ये वर्षातील पुष्कळ काळ उघड्या-वर निजणे हा शिलेदारांचा नित्याचा अनुभव असतो, आणि तो काळ म्हणजे आपल्या

जीवनातील अत्यंत सुखाचा काळ होय असे आपण मानता." यावर डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, "दुसरे काहीच करता येण्यासारखे आम्हाला नसेल किंवा आम्ही प्रेमात असू, तेव्हा ते बरोबर आहे. असे काही शिलेदार खरोखर होऊन गेले की, जे खडकावर राहिले आणि सूर्याचा ताप नि आकाशापासून होणारे अन्य ताप त्यांनी, आपल्या हृदय-सम्राज्ञीला न कळविता, दोन दोन वर्षे सहन केले. त्यापैकी एक म्हणजे अमॅडिस. 'अज्ञात प्रेमिक' या टोपण नावाने तो उवड्याबोडक्या खडकावर राहिला-आठ वर्षे की आठ महिने हे मला आता नक्की सांगता येणार नाही. कारण, त्या-संबंधीचा उतारा मला पुरा आठवत नाही. पण एवढे सांगितले म्हणजे पुरे की, त्याने तेथे वास्तव्य करून तप केले. त्याची हृदय-देवता ओरियाना हिने कोणती निर्दयता व्यक्त केली, हे मला माहीत नाही. पण या गप्पा बाजूला ठेव आणि उठून चालू लाग. नाही तर माझ्या रोझिनांटप्रमाणे तुझ्या गाढवालाही काही अपाय होईल."

तेव्हा सँकोने उत्तर दिले, "तसे झाले तर आकाशच कोसळल्यासारखे होईल." असे म्हणून आणि सुमारे तीस शोकोद्गार काढून, साठ सुस्कारे सोडून आणि आपल्याला तेथे डांबून ठेवणाऱ्या लोकांना एकशेवीस शिव्या-शाप देऊन, सँको आपल्या पायावर कसाबसा उभा राहिला. त्याला नीट उभे राहता आले नाही. म्हणून तो तुर्की लोकांच्या धनुष्याप्रमाणे आपले शरीर वाकवून ओणवा उभा राहिला. अशा वाकड्यातिकड्या अवस्थेतही आपल्या गाढवावर खोगीर घालण्यास तो तिथून हलला. त्या दिवशीच्या स्वैराचारात भाग घेण्यास ते गाढवही विसरले नव्हते. नंतर तो रोझिनांटच्या मदतीस गेला. आपल्या दुःखाला वाचा फोडण्याची शक्ती त्याच्या जिव्हेत असती, तर तो घोडा आपल्या मालकाच्या व सँकोच्या मागे खचित राहिला नसता. सँकोने तोंड वेडेवाकडे करून आणि कडवटपणे कण्हून डॉन क्विक्झोट यांना गाढवावर बसविले आणि रोझि-नांटला त्याच्या शेपटीस बांधले. नंतर लगाम धरून त्याने गाढवाला जवळच्या रस्त्याने राजमार्गावर नेले. मैल दीड मैल अशा प्रकारे चालून जाताच ते सारेजण राजमार्गावर आले. तेथे सँकोला एक खानावळ दिसली. तो किल्लाच असला पाहिजे, अशी डॉन क्विक्झोट यांची (गैर) समजूत झाली. तसे नसल्याचे सँकोने कितीही सांगितले तरी त्यांची ती समजूत कायमच राहिली. 'ही खानावळ आहे' असे सँकोने शपथेवर पुनः पुनः सांगितले, पण त्याच्या धन्याचे ठाम मत होते 'हा किल्ला आहे.' सारांश, त्यांचे भांडण इतका वेळ चालले की, त्याचा निकाल होण्यापूर्वीच ते दोघे खानावळीच्या दाराशी जाऊन पोचले. त्या दारातून सँको सरळ आत गेला—आणि त्याच्या पाठोपाठ त्याचा सारा लवाजमाही. ती खानावळ आहे की नाही, याचा विचार करण्याची तसदी त्यानंतर त्याने घेतली नाही.

▣ ▣

## प्रकरण २

# डॉन क्विक्झोट जिला किल्ला समजले, त्या खानावळीत डॉन क्विक्झोट यांचे काय झाले ?

गर्दभराजावर आडवी पडलेली डॉन क्विक्झोट यांची आकृती पाहून खानावळ-वाल्याने सँकोला विचारले, "यांना काय दुखणे झाले आहे?" सँकोने उत्तर दिले, "काहीच नाही. फक्त माझे धनी डोंगराच्या माथ्यावरून पायथ्यावर खाली पडले, आणि म्हणून त्यांच्या कुशीना थोडा मार बसला आहे."

खानावळवाल्याची बायको सर्वसामान्य गृहिणींपेक्षा अगदी वेगळी होती. तिचा स्वभाव उदार होता आणि आपल्या शेजाऱ्यांच्या दुःखाबद्दल तिला मोठा कळवळा वाटे. असे असल्यामुळे तिने डॉन क्विक्झोट यांची काळजी घेण्यास तत्काळ सुरुवात केली. त्यांना बरे करण्याचे कामी आपल्याला मदत करण्यासाठी तिने आपल्या मुलीला बोलावले (मुलगी मोठी सुंदर होती.) खानावळीतील एक नोकर-मुलगी अस्टुरिया प्रांतातील होती. लांबट चेहऱ्याची, सपाट डोक्याची, बसक्या नाकाची आणि गबाळ्या देहाची असून ती एका डोळ्याने आंधळी होती आणि तिचा दुसरा डोळा जवळ जवळ बाहेर आलेला होता. परंतु ती शरीराने इतकी चपळ होती की, त्यामुळे तिचे सारे दोष झाकले जात. टाचेपासून डोक्यापर्यंत तिची उंची तीन फुटांपेक्षा अधिक नव्हती. तिच्या खांद्यावर मांस खूप साचलेले होते. त्याच्या भाराने, तिच्या इच्छेपेक्षा अधिक वेळा, ती खाली पहात असे. अशी ही 'देखणी' नोकरीण आपल्या धनिणीला व तिच्या कन्येला मदत करीत असे. मुलीच्या मदतीने ती सरदारजींचा बिछाना तयार करी. तो बिछाना म्हणजे एक तापदायक प्रकरण होते. तो जेथे ठेवलेला होता, ती जागा जुगार खेळण्याची होती. पूर्वी तेथे कापलेला कडबा ठेवीत असत, असे दाखविणाऱ्या बऱ्याच खुणा तेथे दिसत होत्या. त्याच्यापुढे, एका लहानशा खोलीच्या कोपऱ्यात, एका हमालाने मुक्काम ठोकला होता. त्याचा बिछाना म्हणजे त्याच्या गाढवांच्या खोगीरापेक्षा दुसरे काहीच नव्हते; पण डॉन क्विक्झोटच्या बिछान्यापेक्षा तो पुष्कळच चांगला होता. क्विक्झोटचा बिछाना म्हणजे दोन लाकडाच्या खालीवर असलेल्या पायावर कसे तरी कापलेले चार तक्ते होते. त्यावर रजईसारखे आंथरूण पसरलेले होते. त्यात मधून मधून गाठी झालेल्या होत्या आणि त्या भोकाभोकातून बाहेर डोकावत होत्या. म्हणून त्या लोकरीच्या असाव्यात असे दिसत होते. नाही तर त्या गाठी म्हणजे दगडच वाटले असते. अशा विलक्षण

बिछान्यावर दोन चादरी होत्या. त्या लोकरीऐवजी चामड्याच्या असाव्यात असे दिसत होते. आणि ते पांघरूण तर काय ? त्याचा प्रत्येक धागान्धागा तुम्ही मोजून सांगू शकला असता—आणि सांगताना तुम्ही एक धागाही चुकला नसता.

अशा या बेडौल बिछान्यावर आमच्या सरदारजींनी आपले ठणकणारे शरीर टेकून दिले होते. थोड्याच वेळात खानावळवाली व तिची मुलगी यांनी त्यांच्या सर्वांगाला मलम लावले. त्यावेळी मॅरिटोर्नेस ( त्या अस्टुरियन नोकरीणीचे हे नाव होते. ) हिने मेणबत्ती धरली होती. खानावळवाली सरदारजींच्या अंगाला मलम लावीत असताना, त्यांच्या सर्वांगावरील जखमा पाहून चकित झाली आणि म्हणाली, " मला वाटते, हे फुगवटे वरून पडल्यामुळे झालेले नसावेत— लाकडाच्या घावाने झालेले असावेत." तेव्हा सँको म्हणाला, " मालकीणबाई, ही मारहाण नव्हे, हे मी वचनपूर्वक सांगतो. परंतु त्या डोंगराला किती तरी सुळके व गाठी होत्या, आणि त्यांच्यापैकी प्रत्येकीने माझ्या धन्याला आपल्या प्रेमाचा प्रसाद दिलेला आहे. जाताजाता मी आपल्याला विनंती करतो की, त्या मलमाचा थोडासा भाग माझ्यासाठीही राखून ठेवा. कारण माझ्या पाठीला काय झाले आहे, हे मला माहीत नाही, पण तिलाही थोडेफार मलम लावण्याची गरज आहे, असे मला वाटते. "

" काय ? तूहि डोंगरावरून खाली पडलास ? " मालकीणबाईंनी विचारले. तेव्हा सँको म्हणाला, " छे छे ! मी खाली पडलो नाही. पण माझा मालक डोंगरावरून खाली पडताना पाहून मला विलक्षण भीति वाटली. त्याचा परिणाम माझ्या शरीरावर इतका झाला की, जणू काही मला कोणी जोराने बडवून काढले आहे असे वाटते नि दुःख होते. " यावर खानावळवाल्याची मुलगी ओरडून म्हणाली, " तू म्हणतोस तसेच असेल. कारण मला कैक वेळा अशी स्वप्ने पडली आहेत की, एका उंच मनोऱ्यावरून मी खाली पडत आहे पण जमिनीवर मात्र येत नाही. तरी जागे झाल्यावर मी जणू काही खरो-खरच खाली पडले आहे, असे वाटण्याइतके माझे शरीर ठणकत असल्याचे आणि मन घाबरल्याचे मला दिसून येई. " तेव्हा सँको म्हणाला, " माझीही गोष्ट अशीच आहे. फरक इतकाच की, माझा मालक डॉन क्विक्झोट यांच्याइतकाच मी बदडला–बडवला गेलो असतो तरी, मी आता आहे तितकाच सताड जागा असतो. " तेव्हा मॅरिटोर्नेसने विचारले, " हे गृहस्थ कोण ? " सँकोने उत्तर दिले, " हे ला मांचाचे डॉन क्विक्झोट आहेत. ते एक शिलेदार आहेत. आतापर्यंत सूर्याने जे जे प्रथम श्रेणीतील शूर सरदार पाहिले असतील, त्यांच्यापैकी हे एक आहेत. " त्या नोकरीणीने विचारले, " शिलेदार म्हणजे काय ? " सँकोने खुलासा केला, " शाब्बास ! जगाची तुला काहीच माहिती नाही. जेवढे डबके तेवढेच तुझे जग. ठीक तर. मी सांगतो. दोन शब्दात सांगावयाचे तर शिलेदार म्हणजे प्रारंभी सशस्त्र असलेला आणि नंतर सम्राट बनलेला माणूस. आज पृथ्वीतलावर त्याच्याइतका दुःखी माणूस कोणी नसेल. पण उद्या त्याच्याजवळ दोनतीन राज्ये असतील आणि ती तो आपल्या नोकराला देऊन टाकील. "

यावर त्या मालकिणीने शंका काढली, " काय रे, या महापुरुषाचा तू चाकर असूनही तुला अद्याप सरदारकीसुद्धा कशी मिळाली नाही ? " सँकोने उत्तर दिले, " या गोष्टी हळुहळू घडत असतात. आमच्या मोहिमेला सुरुवात होऊन एक महिनाही झाला नाही. नाव घेण्यासारखा एकही सामना आम्ही आतापर्यंत दिलेला नाही. पुष्कळ वेळा आम्ही शोध घेतो एका गोष्टीचा, पण आम्हाला सापडते दुसरीच. आता माझा धनी डॉन क्विक्झोट जर बरे झाले आणि मी जर लुळापांगळा राहिलो नाही, तर माझ्या वाट्याला जे बक्षीस खात्रीने येईल, त्याच्यापुढे देशातील कोणतीही पदवी कःपदार्थ असेल. ती मी कदापी स्वीकारणार नाही. "

ही सारी चर्चा डॉन क्विक्झोट मोठ्या उत्सुकतेने ऐकत होते. ते पुष्कळ प्रयत्न करून आपल्या अंथरुणात उठून बसले आणि घरमालकिणीचा हात अत्यंत कृपाळूपणे आपल्या हातात घेऊन ते म्हणाले, " हे सुंदर स्त्रिये, तुला आपल्या किल्ल्यात माझ्या-सारख्याचे आदरातिथ्य करण्याची संधी लाभली आहे म्हणून तू स्वतःला भाग्यवान समजावेस, असे मी सांगतो. सन्माननीय व्यक्तीला आत्मस्तुती शोभत नाही म्हणून मी माझ्यासंबंधी काही बोलत नाही. पण मी कोण आहे हे माझा नोकर तुला सांगेल. त्यात मी एवढीच भर घालू इच्छितो की, तुझी कृपा मी माझ्या स्मृतिमंजुषेत कायमची जतन करून ठेवीन, आणि माझी कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी मिळेल ती संधी घेईन. ईश्वरी शक्तीने माझे भवितव्य असे घडविले आहे की, मी जर पूर्वीच प्रेमाचा बंदा गुलाम झालेला नसतो आणि माझ्या सर्व कोमल भावनांना व्यापून टाकणाऱ्या उन्मत्त प्रमदेच्या लावण्याने बंदिवान झालेला नसतो, तर तुझ्यासारख्या लावण्यवती युवतीच्या चरणी माझे जीवन अर्पण करण्यात मला अभिमान वाटला असता. " ही सारी दरबारी भाषा मुळीच न कळल्यामुळे ती घरमालकीण, तिची मुलगी आणि दयाळू अंतःकरणाची मॅरि-टोर्नेस – या सर्वजणी एकमेकींकडे टक लावून पाहू लागल्या. क्विक्झोटची उच्च भाषा-शैली त्यांना ग्रीक भाषेसारखीच अगम्य होती. तथापि, त्यांचे ते सारे शब्द प्रशंसेचे व प्रेमाचे आहेत असे समजून, त्या तिघीजणी त्यांच्याकडे आदराने पाहू लागल्या आणि निराळ्याच जगातील हा माणूस आहे, असे मानून त्याचे कौतुक करू लागल्या. खानावळवाल्याच्या खानदानीतल्या शक्य त्या शब्दांनी त्यानी त्यांचे आभार मानले आणि त्यांना विश्रांती घेण्यास मोकळे ठेवून त्या तेथून निघून गेल्या. फक्त मॅरिटोर्नेस तेथे सँकोची शुश्रूषा करण्यास थांबली. त्याला व त्याच्या धन्याला तिच्या मदतीची सारखीच गरज होती.

आता तुम्ही हे लक्षात घ्या की, तो हमाल व ती नोकरीण या दोघांनी रात्र एकत्र काढण्याचे ठरविले होते. ' खानावळीतील सारी माणसे झोपी गेली की मी तुझ्या सेवेसाठी खुषीने येईन. ' असे वचन तिने त्याला दिले होते. आणि या सुस्वभावी मुलीने एकदा वचन दिले की ते ती हमखास खरे करीत असे, असे म्हणतात–मग ते वचन तिने एखाद्या अरण्यात, कोणी साक्षीदार नसताना, दिलेले असेना का. कारण

तिला आपल्या कुलीनतेचा मोठा अभिमान वाटे. एका खानावळीत काम करण्याइतकी आपली योग्यता ती कमी लेखीत असली तरी, ती केव्हा केव्हा म्हणे ' केवळ अडचणी-मुळे आणि गरजेमुळे मला या धंद्यात खाली उतरावे लागले. '

त्या भिकारड्या खोलीत जे चार बिछाने होते, त्यात डॉन क्विक्झोट यांचा बिछाना भिकार, तोकडा, टणक व त्रासदायक होता. त्याच्या शेजारी सँकोची पडशी होती. त्यात फक्त एक चटई व एक पांघरूण होते. ते पांघरूण कसले ? फाटके-तुटके पोतेच होते ते. या दोन बिछान्यांच्या पलीकडे हमालाचे अंथरूण होते. त्याच्याजवळ जी बारा खेचरे होती, त्यांपैकी दोघांचे खोगीर तेथे पसरलेले होते. ते प्रत्येक खेचर चांगल्या जातीचे होते आणि चांगल्या अवस्थेत ठेवलेले होते. हा इतिहास सांगणारा मूरिश लेखक म्हणतो त्याप्रमाणे, ॲरेव्हॅलोमधील तो अत्यंत श्रीमंत खेचर-मालक होता. त्याचा आणि या इतिहास-लेखकाचा विशेष परिचय होता-काही लोक तर बिनदिक्कत म्हणतात, तो त्याचा दूरचा नातलगही होता. ते काहीही असो, सिड हॅमेट बेनेन गेली हा अत्यंत प्रामाणिक इतिहासकार होता, असे दिसते. कारण, अत्यंत नगण्य व क्षुद्र अशा गोष्टींचाही तपशील देण्याची काळजी तो घेतो. हे त्याचे प्रशंसनीय उदाहरण अन्य इतिहासकारांना अनुकरणीय वाटेल. कारण ते बहुधा साऱ्या घडामोडी अत्यंत संक्षेपाने निवेदन करीत असतात आणि त्यामुळे आपल्याला त्या घडामोडींचा पुरता वासही येत नाही. इतिहासातील अत्यंत महत्त्वाचा भाग ते इतर इतिहासकार उपेक्षेमुळे, मत्सरामुळे किंवा अज्ञानामुळे, आपल्या शाईच्या दौतीच्या तळाशी दडपून टाकतात. यामुळे रिकामोंटे येथील टॅबलँटे या चिकित्सक लेखकाला आणि कौंट टोमिल्ला यांचे पराक्रम वर्णन कर-ताना न थकणाऱ्या विद्वानाला सहस्र धन्यवाद दिले पाहिजेत. कारण त्या उभयतांनी अत्यंत बारीकसारीक व क्षुद्र घटना विलक्षण अचूकपणाने वर्णिल्या आहेत.

पण आता आपण आपल्या गोष्टीकडे वळू या. मध्यरात्री तो हमाल उठला आणि आपल्या खेचरांना त्याने गवत खाऊ घातले, आणि नंतर तो आपल्या बिछान्यावर येऊन पडला व अत्यंत वक्तशीर असणाऱ्या मॅरिटोर्नेसच्या प्रेमपूर्ण भेटीची वाट पाहात राहिला. या वेळपर्यंत, सँकोला मलम लावण्याचे काम संपले होते आणि म्हणून तो आपल्या घाणेरड्या जागेकडे सरपटत गेला होता. तेथे झोप येण्यासाठी त्याने सारे प्रयत्न करून पाहिले. पण त्याच्या बरगड्या दुखत असल्यामुळे त्याला झोप मुळीच येईना. त्याच्याप्रमाणेच त्याच्या सरदारजींच्या बरगड्याही दुखत होत्या. म्हणून एखाद्या सश्याप्रमाणे त्यांनी आपले दोन्ही डोळे सताड उघडे ठेवले होते. पण खानावळीतील बाकीची सारी माणसे झोपी गेली होती आणि सारे दिवे मालविले गेले होते-फक्त दाराच्या मध्यभागी एक दिवा लोंबत होता. या सार्वत्रिक शांततेमुळे डॉन क्विक्झोट यांची विचारचक्रे सुरू झाली, आणि त्यांच्या कल्पनेमध्ये अत्यंत वेडेपणाच्या गोष्टी तरळू लागल्या. प्रणयरम्य अशा कल्पित कथांच्या वाचनाने अस्वस्थ चित्तात ज्या वेडगळ कल्पनांचे बुडबुडे उठतात, ते त्यांच्या डोक्यात उसळू लागले. आता त्यांना असे वाटू

लागले की, आपण एका सुप्रसिद्ध किल्ल्यात आहो. ( ज्या ज्या खानावळीत त्यांनी मुक्काम केला, त्या सर्व त्यांना किल्लेच वाटत होत्या, हे आम्ही पूर्वीच सांगितले आहे. ) खानावळवाल्याची मुलगी ( अर्थात्, किल्लेदाराची कन्यका ) त्यांच्या भव्य शरीर-संपदेवर व शौर्यावर विलक्षण मोहित झाली होती, आणि म्हणून तिने त्यांना वचन दिले होते की, माझे आई-बाबा झोपी गेले की मी तुम्हाला माझ्या आलिंगनाचे सुख देईन. या कल्पनेने त्यांचे चित्त अस्वस्थ झाले. कारण, त्यांना तिचे वचन खरे वाटले. त्यांचे मन अत्यंत गोंधळून गेले. आपल्या कीर्तीला कलंक लावण्याचा धोका त्यांना दिसू लागला. पण अखेरीस त्या प्रमाथी मोहावर त्यांच्या सद्गुणांनी मात केली. त्यानी असे ठाम ठरविले की, आपल्याला फसवून या मोहजालात अडकविण्यासाठी, साक्षात् राणी गिनेव्हर ही आपल्या विश्वासू दासीसह-क्विंटानियोनासह- आपल्यापुढे उभी राहिली तरी, आपली हृदय स्वामिनी टोबोसाची डल्सिनिया हिच्याशी अणुमात्र प्रतारणा करण्याचा दोष आपण कधीही पत्करणार नाही.

क्विक्झोट यांच्या डोक्यात अशा स्वैर कल्पना खेळत असताना, शालीन मॅरिटोर्नेसला आपल्या नियोजित कार्याची आठवण होती. म्हणून, ती हळूहळू व मंद मंद पावलांनी आपल्या प्रियकर हमालाच्या खोलीत गुपचूप शिरली आणि त्याचा बिछाना चाचपून पाहू लागली. त्यावेळी तिच्या पायात काही नव्हते. तिने सैल अंगरखा परिधान केला होता आणि तिने आपल्या केसांचा डौलदार अंबाडा घातला होता. ती दारापाशी येऊन ठेपली असेल तोच डॉन क्विक्झोट यांना जाणीव झाली की, कोणी तरी आत येत आहे. त्यांनी आपले कान टवकारलेले होतेच. आपल्या अंथरुणात ते उठून बसले आणि त्यांचा देह दुखत असला आणि प्लॅस्टरमध्ये बांधलेला असला, तरी त्यांना वाटले, आपली प्रेयसी आली आहे. आणि म्हणून त्या कल्पनेतील प्रेयसीचे स्वागत करण्यासाठी त्यानी आपले हात पसरले व मॅरिटोर्नेसचे मनगट पकडले. त्यावेळी ती आपले हात पसरून आपल्या प्रियकराकडे जाण्यासाठी चाचपडत होती. क्विक्झोट यांनी तिला आपल्याकडे ओढले आणि आपल्या बिछान्याजवळ बसावयास लावले. हे सर्व होत असताना ती आपल्या तोंडातून ब्र काढण्यास धजली नाही. ती किल्लेदाराची कन्या असावी, असा तर्क त्यांनी केला आणि त्यामुळे सहजच त्यांना तिच्या अंगावरील गोणपाटाचा जाडाभरडा झगा रेशमाचा वाटला, तिच्या कमरेवरील काचेचे मणी हे मौल्यवान मोती वाटले, घोड्याच्या आयाळासारखे खरखरीत असणारे तिचे केस म्हणजे मृदू व कांतिमान सोन्याचे पदर भासले आणि शिळ्या मांसाच्यापेक्षा अधिक दुर्गंधी असलेल्या तिच्या श्वासोच्छ्वासात अरबस्थानातील सारा सुगंध एकवटला आहे असा भास त्यांना झाला.

सारांश, अशा कल्पना-तरंगांत खूष होऊन गेल्यामुळे क्विक्झोट यांना ती मोलकरीण मुलगी म्हणजे परीकथेतील लावण्यवती युवती वाटली. त्यांनी एका पुस्तकात असे वाचले होते की, अशीच एक रमणी आपल्या जखमी सरदाराला भेटण्यासाठी

गुपचुप आली आहे. कारण तिचे त्याच्यावर विलक्षण प्रेम जडले होते. क्विक्झोट यांच्या अशा आचरट वेडेपणामुळे त्यांची बाह्य इंद्रिये काम करेनाशी झाली होती आणि त्यामुळे त्या मोलकरणीचा स्पर्श किंवा गंध यांनी त्यांची धुंदी उतरली नाही. आपण आपल्या बाहूंमध्ये जणू मदनाची रतिच पकडली आहे, आणि तिचा संजीवक स्पर्श आपल्याला लाभला आहे, अशा भ्रमात ते होते. पण खरोखर त्यांनी कवटाळले होते, कुरूपतेचे एक गाठोडे ! ते पाहून हमालाशिवाय दुसऱ्या कोणाही माणसाचे माथे फिरून गेले असते. पण क्विक्झोट प्रेमाच्या धुंदीत ! त्यांनी तिला आणखीच कवटाळले आणि सौम्य व प्रेमळ आवाजात ते कुजबुजले, " हे चारुगात्री, तूं साक्षात मोहिनी आहेस आणि माझ्यावर आपल्या अपार कृपेचा वर्षाव करणार आहेस. त्याबद्दल मी आधीच तुझे अंतःकरणपूर्वक आभार मानतो. तुझी प्रिय आलिंगने मिळावीत, म्हणून हे सुंदरी, मी माझे साम्राज्यही तुला देण्यास तयार आहे. पण, दुर्दैव ! दुर्दैव ! ते खऱ्या लायक माणसाचे कट्टे वैरी असते. माझ्या जीवनाचा कृतांत–काळ असणाऱ्या त्या दुर्दैवाने मला द्वेषाने या अंथरुणावर लोळविले आहे. येथे मी इतका जखमी नि खिळखिळा झालो आहे की, मी तुझ्या इच्छा पूर्ण करण्यास उत्सुक असलो तरी या प्रिय नि अभागी क्षणी तसे करण्यास मी असमर्थ आहे. एवढेच नव्हे तर त्या दुर्दैवाच्या पाठीशी आणखी एक दुर्निवार विघ्न उभे आहे. ते म्हणजे माझ्या हृदयाची एकमेव स्वामिनी आणि माझ्या आकांक्षांची एकमेव सम्राज्ञी असलेल्या, टोबोसाच्या अप्रतिम डलसिनियावर जडलेली माझी वचनबद्ध श्रद्धा ! खरोखर माझ्या या सध्याच्या सौख्यावर दुर्दैवाने असा बिब्बा घातला नसता, तर हे प्रिये, तू माझ्यावर जी अलौकिक कृपा करण्याचे योजिले आहेस, तिचा लाभ न घेण्याइतका मी मूर्ख नि असमंजस सरदार खास नाही. "

क्विक्झोट यांची ही सारी प्रणयाराधना चालू असताना, बिचारी मॅरिटोर्नेस, भीतीने व चिंतेने, घामाघूम झाली होती. त्या सरदाराच्या बाहूंत अडकून पडल्यामुळे ती घाबरली होती. त्यांच्या त्या अलंकारिक भाषेचा तिला काहीच उमज पडेना – आणि उमज पडण्याची तिला इच्छाही नव्हती. त्यांच्या हातातून सुटावे एवढीच तिची इच्छा. म्हणून काही न बोलता, शक्य ते प्रयत्न करून ती तेथून पळून गेली. इकडे तो हमाल आपल्या मनातील कामुक विचारामुळे जागाच होता. ती मुलगी प्रथम जेव्हा आली तेव्हाच त्याला तिची चाहूल लागली, नंतर आमच्या सरदारजींनी प्रणयाराधनेचे जे भाषण केले तेही त्याने ऐकले. तेव्हा त्याला असे भय वाटले की, हिने आपला प्रियकर बदलला असावा. म्हणून काही गडबड न करता तो डॉन क्विक्झोटच्या बिछान्यापाशी हलकेच सरपटत गेला. त्यांच्या भाषणातील ओ का ठो त्याला कळत नव्हता.– पण त्या भाषणाचा शेवट कोठे होत आहे, हे पाहण्यासाठी तो ते ऐकू लागला. शेवटी त्याला कळून आले की, मॅरिटोर्नेस इमानी आहे आणि ती क्विक्झोटजवळ गेली यात तिचा काहीच दोष नाही– तिच्या इच्छेविरुद्ध तिला अडविण्याची धडपड सरदारजी करीत आहेत. तेव्हा त्याने सरदारजीशी असलेला आपला स्नेह गुंडाळून ठेवला आणि तो

संतापाने भडकला. आपली मूठ वळून त्याने त्या प्रणय–लुब्ध सरदारजींच्या जबड्यावर असा काही जोराचा ठोसा लगावला की, क्षणार्धात त्यांचे सर्व तोंड रक्तबंबाळ झाले. तेवढ्याने संतोष न पावता तो त्या सरदारजींच्या उरावर उभा राहिला आणि एखादी गवताची गंज तुडवावी, त्याप्रमाणे तो त्यांचे शरीर आपल्या फेंगड्या पायांनी तुडवू लागला. त्यामुळे, डळमळीत पायावर उभा असलेला तो बिछाना, हमालाच्या जादा भारामुळे, खाली खचला, एवढेच नव्हे तर, जमिनीवर कोसळला, तोही इतक्या मोठ्या आवाजाने की, त्यामुळे खानावळवाला जागा झाला. त्याला तत्काळ संशय आला की, मॅरिटोर्नेसच्या रात्रीच्या गडबडीमुळे हा आवाज झाला असावा. म्हणून, त्याने तिला मोठमोठ्याने हाका मारण्यास सुरुवात केली. परंतु तिचे उत्तर आले नाही, हे पाहून त्याने दिवा लावला आणि गडबडीचा आवाज जेथून आला, तिकडे तो निघाला. तो येत आहे, अशी चाहूल लागताच, ती मोलकरीण घाबरून गेली, आणि तिची बुद्धी बधिर झाली. कारण खानावळवाला संतापी स्वभावाचा आहे, हे तिला माहीत होते.

ती आश्रयासाठी सँकोच्या बिछान्याकडे धावली. तेथे ते राजेश्री एका सुरात घोरत पडले होते. त्या घाणेरड्या जागेत ती शिरली आणि त्याच्या पांघरुणाआड दडली. आरामशीरपणे ती तेथे पहुडली, आणि कोंबडीच्या अंड्याप्रमाणे ती तेथे आखडून निजली. इतक्यात तिचा धनी संतापाने लाल होऊन तेथे आला आणि ओरडून म्हणाला, "कोठे आहे ती हलकट रांड ? तिच्या प्रणयचेष्टांपैकीच ही एक असावी, असे मी खात्रीने सांगतो." त्याच्या या ओरडण्यामुळे सँको जागा झाला. आपल्या शरीरावर पडलेला असाधारण भार त्याच्या लक्षात आला. तेव्हा त्याला वाटले, एखादे भूतच आपल्या उरावर बसले आहे, आणि म्हणून त्याने त्याला गुद्दे लगावण्यास सुरुवात केली. त्या मोलकरिणीवर त्या गुद्द्यांचे तडाखे इतक्या निर्दयपणे बसले की, तिच्या अंगातील मांस व रक्त ते सहन करू शकले नाहीत. आपण कोणत्या संकटात आहो याचा आणि आपल्या लाडक्या लौकिकाचा तिला विसर पडला आणि तिने सँकोला आपल्या मुठींनी यथेच्छ बुकलले. त्यामुळे त्या पेंगणाऱ्या नोकराची सारी सुस्ती पार उडाली. त्याची इच्छा असो नसो, तो उठून उभा राहिला आणि आपल्या घरट्यात शिरून आपल्याला गुद्दे लगावणाऱ्या मॅरिटोर्नेसला त्याने पकडले. नंतर त्या दोघांमध्ये जी मौजेची चकमक सुरू झाली, तिला जगाच्या इतिहासात तोड नाही. खानावळवाल्याच्या दिव्याच्या प्रकाशात हमालाला दिसले की, आपली प्रिय कामिनी शोचनीय स्थितीमध्ये सापडली आहे. म्हणून तो तिच्या मदतीला धावला. सरदारजींना पुरते बुकलल्यानंतर त्यांना सोडून तो त्यांच्या चाकरावर तुटून पडला आणि त्याला त्याने चांगली अद्दल घडविली. उलट या साऱ्या गडबडीचे व गोंधळाचे कारण आपली मोलकरीण आहे, असे समजून खानावळवाल्याने तिला पुनः पुनः हातापायांनी बडविण्यास सुरुवात केली. हाताच्या मुठी व पायाच्या लाथा यांचे विलक्षण मिश्रण तेथे झाले. हमालाने सँकोला बदडले, सँकोने मोलकरणीला बडविले, तिने त्या चाकराचे अंग खिळखिळे केले आणि तिला खानावळवाल्याने खरपूस

मार दिला. या साऱ्या चकमकी इतक्या वेगाने घडत होत्या की, त्यांच्यापैकी कोणालाही वेळ गमावणे शक्य नाही असे वाटावे. पण खरी गंमत ही की, असे तुंबळ युद्ध चालू असतानाच दिवा विझला. सारे अंधारात बुडाले. म्हणून ते एकमेकांना मारीत सुटले-- एकमेकांचे कपडे फाडीत सुटले. सारेजण बेफाम झाले. त्यांच्या मुठींचे ठोसे व नखांचे ओरखडे कठोरपणे चालूच होते.

त्याच रात्री असे घडले की, टोलेडो येथील प्राचीन व 'पवित्र भ्रातृसंघाचा' सदस्य असलेला एक अधिकारी तेथे मुक्कामास आलेला होता. चोरावर व दरोडेखोरावर नजर ठेवणे, हे त्याचे मुख्य काम होते. तो भयंकर गोंगाट ऐकून हा अधिकारी जागा झाला आणि लगेच आपल्या अंथरुणातून उडी मारून बाहेर आला. एका हातात आपली लहानशी काठी आणि दुसऱ्या हातात आपले अधिकार-पत्र असलेली पत्र्याची लहानशी पेटी घेऊन तो अंधारात वाट शोधू लागला. खोलीत येताच तो ओरडला, "थांबा थांबा. सर्वांनी शांततेने वागावे, असा माझा हुकूम आहे. मी 'पवित्र भ्रातृसंघाचा' एक अधिकारी आहे." त्याचा हात प्रथम पडला तेथे बिचारे जखमी सरदारजी क्विक्झोट होते. आपल्या विस्कटलेल्या बिछान्यावर ते पाय पसरून उताणे पडलेले होते. त्यांच्या ठिकाणी काहीच संवेदना राहिलेली नव्हती. त्यांची दाढी पकडून तो अधिकारी एकदम ओरडला, "मला मदत करा-सहाय्य करा, असा माझा हुकूम आहे." त्याने त्याना अगदी गदगदा हलविले, तरी त्यांच्यामध्ये काहीच हालचाल दिसेना. तेव्हा त्याला वाटले, हा मेला असावा-खोलीतील बाकीच्या माणसांनी त्याचा खून केला असावा. असा संशय येताच खानावळीचे सारे दरवाजे बंद करण्याचा आदेश त्याने मोठ्याने दिला व तो ओरडून म्हणाला, "हा पहा, येथे एका माणसाचा खून झालेला आहे. येथून कोणी पळून जाणार नाही अशी दक्षता घ्या." हे शब्द ऐकताच, त्या सर्व योद्ध्यांची घाबरगुंडी उडाली, आणि एकमेकांच्या कानाशी लागून त्यांनी सारा वाद तसाच सोडला. खानावळवाला आपल्या खोलीकडे लपतछपत पळाला, हमाल आपल्या जागेकडे सटकला आणि मोलकरीण आपल्या खोलीकडे वळली. फक्त आमचे दुर्दैवी सरदारजी-आणि त्यांचा तितकाच दुर्दैवी नोकर- होते तेथेच पडून राहिले. हालचाल करण्याचे त्राणच त्यांच्या अंगी नव्हते. त्या अधिकाऱ्याने डॉन क्विक्झोट यांची दाढी सोडून, संशयित खुनी माणसांचा तलास लावण्यासाठी दिवा मिळवावा म्हणून बाहेर प्रयाण केले. परंतु खोलीतून बाहेर येताच, खानावळवाल्याने दारातील दिवा विझविण्याचे शहाणपण दाखविले होते. म्हणून, त्या अधिकाऱ्याला स्वयंपाकघरात जाणे, भाग पडले. तेथे पुष्कळ गडबड करून आणि बराच वेळ निखारे फुंकून, तो दिव्याच्या शोधार्थ बाहेर पडला.

□ □

## प्रकरण ३

# बहाद्दर डॉन क्विक्झोट यांना दुर्दैवाने जो किल्ला वाटला, त्या खानावळीत, त्यांना व त्यांचा लायक चाकर सँको याला ज्या असंख्य अडचणी भोगाव्या लागल्या, त्यांचा पुढील वृत्तांत.

डॉन क्विक्झोट योग्य वेळीं शुद्धीवर आले. त्या मैदानात त्यांना आदल्या दिवशी हमालानी चोप दिल्यानंतर त्यांनी ज्या विव्हळ स्वराने शब्द उच्चारले, त्याच स्वराने त्यांनी आता सँकोला हाका मारल्या, “ सँको, मित्रा सँको, निजला आहेस काय तू ? अरे मित्रा सँको, निजला आहेस काय तू ? ” तेव्हा खूप नाराज होऊन सँको म्हणाला, “ निजलो ! तसे झाले तर माझा पाळगा सैतान हलवील. पाताळातील सारी भुते रात्रभर मला छळीत असताना मला झोप कशी येणार ? ” तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, “ बरोवर, तुझे म्हणणे बरोबर आहे. एकतर या गोष्टी मला कळत नसतील, किंवा हा किल्ला जादूने मंतरलेला असेल. आता मी तुला जे सांगत आहे, ते नीट ऐक आणि माझ्या मृत्युपर्यंत त्याची वाच्यता करणार नाही, अशी शपथ आधी घे. ” सँको म्हणाला, “ घेतो मी तशी शपथ. ” तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, “ मी अशी सावधगिरी बाळगतो याचे कारण म्हणजे, कोणाही माणसाची अब्रू घेणे मला आवडत नाही. ” सँको म्हणाला, “ हे पहा, मी तुम्हाला पुनः सांगतो, आपण जिवंत आहा तोपर्यंत मी ब्र काढणार नाही, असे वचन मी देतो. पण उद्याच या प्रकरणाविषयी बोलण्याची मुभा मला मिळावी अशी माझी इच्छा आहे. ”

डॉन क्विक्झोट ओरडले, “ काय रे बाबा, मी काय तुझे घोडे मारले, म्हणून मी इतक्या लवकर मरावे असे तू इच्छितोस ? ” सँको उत्तरला, “ छेः छेः तसे काही नाही. कोणतीही गोष्ट फार काळ ठेवणे मला आवडत नाही. ती शिळी होईल, अशी मला भीती वाटते. ”

“ ठीक आहे, होऊ दे तुझ्या मनासारखे. ” डॉन क्विक्झोट म्हणाले, “ तुझ्या साजन्यावर आणि प्रेमावर मी याहून किती तरी मोठ्या गोष्टी सोपविणार आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, कल्पना करता येणार नाही असे विलक्षण धाडस आज रात्रीच माझ्या हातून घडले. या किल्ल्याच्या किल्लेदाराची कन्यका माझ्याकडे आली. निसर्गाला जिचा अभिमान वाटावा, अशी ती एक अत्यंत आकर्षक व सौंदर्य-संपन्न तरुणी आहे. अहाहा ! काय तो तिचा डौलदार आकार ! काय ती तिच्या मुद्रेची शोभा

आणि काय ती तिच्या मनाची परिपक्वता ! छेः छेः त्यांचे वर्णन मी करू शकत नाही. तिचे आणखी काही सुप्त सौन्दर्य–गुण मी तुला सांगणार नाही. ते मी विस्मृतीच्या व मौनाच्या दरीत लोटून देईन. त्याबद्दल मी चकार शब्द बोलणार नाही. बोलेन तर, टोबोसोची डल्सिनिया या माझ्या हृदय–देवतेवरील माझ्या निष्ठेला व विश्वासाला तडा जाईल ! म्हणून मी तुला इतकेच सांगतो की, दैवाने माझ्या ओंजळीत जे अपार सौख्य ओतले आहे, त्याचा हेवा वाटल्यामुळे असो किंवा हा किल्ला मंतरलेला असल्यामुळे असो, पण दैवाने असे घडवून आणले की, काल आपणा उभयतांमध्ये अत्यंत नाजूक व प्रेमळ सुख-संवाद चालला असताना, कोणा बलाढ्य राक्षसाचा अमंगल हात माझ्या अंगावर पडला. तो मला दिसला नाही की तो कोठून आला, हे मला कळले नाही. पण त्या हाताने माझ्या जबड्यावर असा काही जबरदस्त तडाखा दिला की, त्यामुळे त्यातून अजून रक्त वाहात आहे, माझी सध्याची दुर्बलता ध्यानी घेऊन त्या असभ्य दुष्टाने मला इतक्या रानटीपणाने बडविले की, काल रोझिनांटच्या स्वैराचारामुळे त्या हमालांनी जे मला धसमुसळेपणाने मारले, त्याच्यापेक्षा आता माझी स्थिती अधिकच शोचनीय झाली आहे असे मला वाटते. या सर्व प्रकारावरून मी असा तर्क करतो की, या सुंदरीच्या सौंदर्याचा ठेवा माझ्यासाठी राखून ठेवलेला नाही–त्याच्यावर कोणीतरी जादूगार मूर पहारा करीत असावा.''

सँको म्हणाला, ''तो सौंदर्य–ठेवा माझ्यासाठीही नाही. चारशेहून अधिक मूर लोकांनी माझ्या बरगड्यान् बरगड्या खिळखिळ्या केल्या आहेत आणि माझ्या हाडावर हातोड्याचे घाव इतके घातले आहेत की, काल त्या हमालांनी माझ्या अंगावर लाठ्या-काठ्यांनी जे हल्ले केले, ते या मारापुढे एखाद्या पिसाने केलेल्या गुदगुल्या ठरतील, असे मी बिनदिक्कत म्हणू शकतो. पण महाराज, आपण इतके कठोरपणे कुटले गेलो असताना, त्या घटनेला आपण आनंददायक साहस असे कसे म्हणू शकता, हे मला कृपया सांगा. त्या सुंदर तरुणीला आपण आपल्या बाहूंमध्ये कवटाळले, हे ऐकून मला वाटते, माझ्यापेक्षा आपली स्थिती चांगली आहे, पण माझ्या बिचाऱ्याच्या शिरावर इतके जबरदस्त घाव पडण्याखेरीज मला काय मिळाले आहे ? हे सांगण्याची आपण कृपा करावी. मी काही शूर शिलेदार नाही–आणि तसे होण्याचा माझा इरादा पण नाही, असे असूनही सारे अनर्थ अधिक प्रमाणात माझ्या नशिबी का यावेत हे मला कळत नाही. धिक्कार असो मला–आणि माझ्या जन्मदात्या आईला !'' डॉन क्विक्झोटनी विचारले, ''काय ? तुलाही माझ्यासारखा मार मिळाला काय ?'' सँको ओरडला, ''काय दुर्दैव आहे ! आतापर्यंत आपल्याला मी हेच सांगत आलो नाही काय ?'' डॉन क्विक्झोट उत्तरले, ''अच्छा ! मित्रा सँको, कष्टी होऊ नकोस, आता मी ते दुर्मिळ औषध तयार करतो, त्यामुळे डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच तू खडखडीत बरा होशील.''

या वेळेपर्यंत, सरकारी अधिकाऱ्याने आपला दिवा लावला आणि खून कोणाचा झाला, हे पाहण्यासाठी तो खोलीत आला. डोक्याला पागोट्याप्रमाणे हातरुमाल गुंडाळलेला

आणि अंगात सदरा घातलेला तो अधिकारी हातात दिवा घेऊन खोलीत येत असलेला पाहताच आणि त्याचे कुरूप दर्शन होताच सँको आपल्या धन्याला म्हणाला, “ महाराज, हाच तो मांत्रिक मूर आहे काय, हे कृपा करून पाहा. माझ्याशी पुनः झटापट करण्यासाठी तो येत असावा. माझ्या शरीराचा काही भाग न दुखावलेला राहिला असल्यास इतर अवयवांप्रमाणेच त्यालाही चोपून काढण्यासाठी तो इकडे येत असावा. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ तो मूर असू शकणार नाही. कारण, मांत्रिक लोक कोणाला दिसत नाहीत. ” तेव्हा सँको म्हणाला, “ दुसऱ्यांनी आपल्याला पहाणे त्यांना मानवत नसेल, पण ते आपले अस्तित्व इतरांना निदान जाणवू देत असतील. तसे नसेल तर माझे प्रेत साक्षी राहो. ” डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, “ मग माझेही ! परंतु आपल्याला जी व्यक्ती दिसत आहे ती मांत्रिक मूर आहे असे सिद्ध करण्यास हे पुरेसे कारण नाही. ”

त्या दोघांचा असा युक्तिवाद चालला असताना तो अधिकारी पुढे आला. ती दोन माणसे तेथे इतक्या शांतपणे बोलत आहेत, हे पाहून त्याला आश्चर्य वाटले. तो अभागी शिलेदार पूर्वीच्याच केविलवाण्या अवस्थेत प्रेताप्रमाणे पडून राहिलेला आहे, त्याचे शरीर रक्ताळलेले, ओरखडलेले व मलमपट्ट्या बांधलेले आहे आणि तो हालचाल करू शकत नाही, हे पाहून तो अधिकारी त्या वीरपुरुषाला म्हणाला, “ भल्या माणसा, कसे काय आहे ? तुझी प्रकृती कशी आहे ? ” ते ऐकताच डॉन क्विक्झोट उसळून म्हणाले, “ अरे रेम्याडोक्या, या देशात शिलेदाराशी बोलण्याचा हाच का तुझा मार्ग ? मी जर तुझ्या बरोबरीचा असतो तर तुझ्यापेक्षा अधिक शिष्टाचार दाखविला असता. ” हलकट दिसणाऱ्या माणसाकडून असे दुरुत्तर ऐकणे त्या अधिकाऱ्याच्या सहनशक्तीपलीकडचे होते. त्याने आपला तेलासकट दिवा वर उचलून डॉन क्विक्झोटच्या डोक्यावर असा काही तडाखा दिला की, आपल्या कृत्यामुळे एखाद्या शस्त्रकुशल भिषग्वराला बोलवावे लागेल की काय अशी भीति वाटून, रात्रीच्या संरक्षणाखाली तो त्या खोलीतून तत्काळ गुपचुप बाहेर पडला. ते पाहून सँकोने विचारले, “ काय महाराज, आता तरी आपल्याला तो मांत्रिक मूर होता असे वाटते की नाही ? माझ्यापुरते म्हणाल तर मला असे वाटते की, तुम्ही ज्याचे वर्णन करता तो खजिना तो दुसऱ्या लोकांसाठी ठेवतो, आणि महाराज, आपल्यासाठी नि माझ्यासाठी फक्त लाथा–बुक्या आणि ठोसे राखून ठेवतो. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ एरवी या आपल्या जखमा आपण लोकांना दाखविणे वाजवी ठरले असते, पण हे मांत्रिक आपल्या इच्छेप्रमाणे केव्हाही अदृश्य होऊ शकतात हे लक्षात घेता, जखमांमुळे आपल्याला आलेला संताप आपण सोडून दिला पाहिजे. त्यांचा सूड घेण्याचा विचार व्यर्थ आहे. पण सँको, तुला शक्य असेल तर तू कृपा करून ऊठ आणि या किल्ल्याच्या किल्लेदाराकडे जाऊन मला तेल, मीठ, दारू व रोजमेरीचे पान पाठविण्यास सांग. म्हणजे मी जखम भरून येणारे औषध तयार करीन. खरोखर त्याची मला फार फार गरज आहे. त्या पिशाचाने आताच मला जी जखम केली आहे, त्यातून रक्त फार जोरात वाहात आहे. ”

सँकोची हाडे दुखत होती तरी त्यातूनही त्याला जितके लवकर उठता आले तितके तो उठला आणि खानावळवाल्याचा शोध घेण्यासाठी मोठी गडबड करून तो खोलीबाहेर रांगत गेला. आपण काय अनर्थ केला त्याचा कानोसा घेण्यासाठी तो अधिकारी वाटेत उभा होता, त्याच्यावर सँको ठेचाळला आणि त्याला म्हणाला, " महाराज, या पृथ्वीतलावर होऊन गेलेल्या सर्व शिलेदारामध्ये अत्यंत श्रेष्ठ असा शिलेदार भयंकर दुखापत होऊन पडलेला आहे– या खानावळीतील मांत्रिक मूराने त्याला जखम केलेली आहे. ती भरून काढण्यासाठी औषध तयार करावयाचे आहे. म्हणून आपण थोडेसे तेल, मीठ, दारु व राजमेरी पाठविण्याची कृपा करावी. "

सँकोचे असे बोलणे ऐकून त्या अधिकाऱ्याला वाटले, याचे डोके बिघडले आहे. आता फटफटू लागले असल्याने त्याने खानावळीचा दरवाजा उघडला आणि सँकोला काय हवे होते ते खानावळवाल्याला सांगितले. खानावळवाल्याने लौकरच इच्छित वस्तू दिल्या. त्या घेऊन सँको आपल्या धन्याकडे आला. तेव्हा आपला धनी आपले डोके धरून बसला आहे आणि त्याला होणाऱ्या वेदनांनी दीनपणे विव्हळत आहे, असे त्याला आढळले. त्या अधिकाऱ्याच्या दिव्याच्या माराने डॉन क्विक्झोट यांना फक्त दोन मोठी टेंगळे आली होती. शरीरातून रक्त वहात असल्याचे त्याना जे वाटत होते, तो फक्त घाम आणि दिव्यातील तेल होते, त्यामुळे त्यांचे केस व चेहरा माखला गेला होता.

आमच्या शिलेदाराने त्या सर्व वस्तू घेतल्या आणि एकत्र मिसळल्या. ते मिश्रण अग्नीवर ठेवून, त्याने ते भरपूर उकळले. हे झाल्यावर त्यांनी हा अमूल्य अर्क ठेवण्यासाठी एक कुपी मागितली. पण तेथे ती नव्हती, म्हणून खानावळवाल्याने मातीचा एक जुना खुजा त्याला दिला. तेवढ्यावर संतोष मानणे डॉन क्विक्झोट यांना भाग होते. नंतर त्यांनी त्या भांड्यावर पुटपुटत शंभर वेळा प्रार्थना म्हटल्या आणि ईश्वराचे आशीर्वाद मिळविण्यासाठी प्रत्येक शब्दाबरोबर क्रॉसला वंदन केले. या समारंभाचे प्रसंगी सँको, खानावळवाला व अधिकारी उपस्थित होते. हमाल आपल्या खेचरांची वास्तपुस्त करण्यासाठी गेला होता. तेथे काय चालले होते याची दखल त्याने घेतली नाही.

हे दिव्य औषध तयार झाल्यानंतर, त्याचा प्रयोग स्वतःवर ताबडतोब करण्याचा निश्चय डॉन क्विक्झोट यानी केला, आणि म्हणून तो खुजा भरून उरलेल्या रसायनाचा बराचसा भाग त्यांनी घेतला. तो त्यांनी आपल्या घशात ओतला न ओतला तोंच त्यांना जोराने उलट्या होऊ लागल्या– त्यातून त्यांचे हृदय, यकृत व आतडी बाहेर पडतील, असे भय कोणालाही वाटले असते. त्या यातायातीमुळे क्विक्झोट इतके घामाघूम झाले की, आपल्या अंगावर कोणी तरी गरम पांघरुण घालावे आणि विश्रांती घेऊ द्यावी असे त्यांना वाटले. त्यांच्या इच्छेप्रमाणे सर्वांनी त्याना तेथे एकटे सोडले. ते तब्बल तीन तास निजले. नंतर जागे झाल्यावर त्यांना विलक्षण हुशारी वाटू लागली आणि खात्री पटली की, आपल्याला खरे रामबाण औषध मिळाले आहे. जगातील सारी भयंकर धाडसी कृत्ये आता आपण खुशाल हाती घेऊ शकू आणि त्यात आपल्या शरीराला

काहीही इजा होणार नाही, असा विचार त्यांच्या चित्तात आला.

आपल्या धन्यावर त्या पेयाचा विलक्षण परिणाम झाल्याचे पाहून सँकोला धीर आला आणि तो म्हणाला, "महाराज, त्या खुजात शिल्लक राहिलेले पेय घुटकाभर घेण्याची परवानगी आपण मला कृपया द्यावी." डॉन यांनी संमती दिली. खुज्यात ते रसायन थोडे नव्हते. प्रामाणिक सँकोने आपल्या दोन्ही हातांनी तो खुजा उचलला आणि मोठ्या श्रद्धेने– व त्याहून अधिक इच्छेने त्या रसायनाचा बिंदू न् बिंदू आपल्या घशात ओतला. त्याचा कोठा धन्यासारखा नाजूक नसल्यामुळे, त्या पेयाने त्याला उलट्या काही झाल्या नाहीत, पण त्याच्या पोटात अशी काही विलक्षण गुरगुर आणि गडबड सुरू झाली की त्यामुळे त्याच्या सर्वांगातून कळा येऊ लागल्या, थंडगार घामाच्या धारा वाहू लागल्या आणि त्याला चकरा येऊ लागल्या. त्यामूळे त्याला खरोखर असे वाटू लागले की, आपला अखेरचा क्षण जवळ आला आहे. या सर्व यातना सोशीत असता, तो विव्हळून ओरडला, "सैतानाकडे जावो ते औषध आणि ते बनविणाराहि !" त्याची ती दशा पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा, मला असे वाटू लागले आहे की, तुला शिलेदारीचा किताब मिळालेला नाही म्हणूनच या साऱ्या वेदना तुला सोसाव्या लागत आहेत. स्वतःला शिलेदार न म्हणविणाऱ्या कोणाही माणसाने हे रसायन वापरू नये असे माझे मत आहे." तेव्हा सँकोने विचारले, "मग मला ते प्राशन करावयास तुम्ही का लावले ? तुमच्या मनात काळेबेरे काय होते ? माझ्यावर नी माझ्या साऱ्या पिढीवर पटकी पडो ! हे तुम्ही मला आधीच का नाही सांगितले ?"

अखेरीस त्या पेयाचा काही परिणाम दिसू लागला; सँकोला उलट्या व जुलाब होऊ लागले. त्यामुळे त्याची चादर व पांघरूण दोन्हीही निकामी झाली. तो सारखा इतका तळमळत होता की, त्यालाच काय पण जवळच्या माणसांनाही वाटले, हा आता आटोपला. ही भयंकर वावटळ सुमारे दोन तास टिकली, आणि नंतरही सँको आपल्या मालकाइतका दुःखमुक्त झाला नाही. आपण उभे राहू शकणार नाही असे वाटण्याइतका तो गळून–थकून गेला होता.

पण आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे, डॉन क्विक्झोट विलक्षण हुशारीत होते. त्यांचा चैतन्यमय जीव लज्जास्पद विश्रांती घेण्यास नाराज होता. आपल्या धाडसी व्यवसायाची कर्तव्यकर्मे पार पाडण्यासाठी बाहेर जाण्यास ते उतावीळ झाले होते. कारण त्यांना असे वाटे की, मौज करण्यात किंवा इतर व्यवहार करण्यात आपल्या आयुष्याचे क्षण घालविणे म्हणजे आपले आयुष्य निकामी करणे, आणि कर्तव्य करण्यास विलंब लावणे म्हणजे दुःखी लोकांना सुखापासून वंचित करणे, आणि साऱ्या जगाला आपली मदत न देण्यासारखे होय. आपल्या रसायनावर त्यांनी इतका विश्वास ठेवला होता की, त्यामुळे त्यांचा निश्चय शक्य तर आणखीच बळावला होता. आपल्या अशा आतुर विचारांनी बेभान होऊन त्यांनी रोझिनांटवर स्वतः खोगीर घातले आणि मग गाढवावर खोगीर व खोगिरावर आपला चाकर लादला. अगोदर सँकोच्या अंगावर कपडे

चढविण्यासही त्यानी मदत केली. हे सारे झाल्यावर क्विक्झोट आपल्या घोड्यावर स्वार झाले. एका कोपऱ्यात एक छोटासा भाला उभा असलेला त्यांना दिसला, तो त्यांनी बळकावला आणि स्वतःसाठी वापरण्याचे ठरविले. त्या खानावळीत सुमारे वीस लोक होते. ते या साऱ्या घडामोडी पहात होते. त्यांच्यामध्ये खानावळवाल्याची मुलगी होती. तिच्यावरून आपली दृष्टी मागे घेण्याची शक्ती डॉन क्विक्झोट यांच्या अंगी नव्हती. तिच्याकडे ते जेव्हा जेव्हा नजर टाकीत, तेव्हा त्यांच्या अगदी हृदयाच्या गाभाऱ्यातून खोल सुस्कारा बाहेर पडे, आदले दिवशी रात्री त्यांना इतका मार बसलेला असूनही, त्या वेदनांचा तिच्या दर्शनाने त्याना विसर पडे.

आणि आता कूच करण्यास सिद्ध झालेले डॉन क्विक्झोट घरमालकाला हाक मारून मोठ्या रुबाबाने म्हणाले, "किल्लेदारसाहेब, आपल्या किल्ल्यामध्ये मला जे लाभ झाले, ते इतके महान नि अलौकिक आहेत की, त्यामुळे माझा जीव येथे कृतज्ञतेने कायमचा बांधला गेला आहे. आपल्या उपकाराची अंशतः फेड करण्यास मला आनंद वाटेल. आपल्याला जर कोणी उर्मट माणसाने दुखापत केली असेल किंवा उपमर्द केला असेल आणि त्याचा सूड उगविण्याची आपली इच्छा असेल, तर त्याचे नाव मला सांगा, म्हणजे आपली इच्छा पुरेपूर पूर्ण करण्यासाठी योग्य ते सर्व उपाय योजण्याचे अभिवचन मी आपल्याला देतो. कारण आमच्या शिलेदारीचा दंडकच असा आहे की, दुर्बलांचे संरक्षण करावे, दलितांचा उद्धार करावा आणि दुष्टांना शासन करावे."

कडक गांभीर्य धारण करून खानावळवाल्याने उत्तर दिले, "शिलेदारमहाराज, माझ्यावर कोणी अन्याय केला असल्यास त्याचा सूड उगविण्यासाठी मला आपली मदत लागणार नाही. कारण जर कोणी माणूस माझ्यावर अन्याय करू पाहील, तर त्याचा समाचार घेण्यास मी समर्थ आहे, हे आपण समजून असावे, अशी माझी इच्छा आहे. म्हणून मला जे कांही समाधान हवे आहे, ते इतकेच की, आपला व आपल्या घोड्याचा आहार आणि माझ्या खानावळीतील आपले इतर सारे खर्च यांचे पैसे आपण देऊन टाकावेत." ते ऐकताच डॉन क्विक्झोट आश्चर्याने ओरडले, "काय? ही खानावळ आहे?" यजमानाने उत्तर दिले, "होय, या रस्त्यावरील अत्यंत सुविख्यात अशी ही खानावळ आहे." डॉन क्विक्झोट उद्गारले, "मग माझी केवढी गफलत झाली! मी शपथेवर सांगतो की, मला हा किल्ला–चांगला किल्ला–वाटला. पण जर हा किल्ला नसून खानावळ असेल, तर मी इतकेच म्हणतो की, पैसे देण्याची आपण मला माफी द्यावी. कारण आम्ही शिलेदारांनी जे कायदे पाळणे अवश्य असते, त्यांचा भंग मी कदापि करणार नाही. शिलेदारांनी कोणत्याही खानावळीत कधी काही पैसे दिल्याचे मला माहीत नाही. त्यांच्या परिश्रमाचा किमान मोबदला आहे तो. रात्री आणि दिवसा, उन्हाळ्यात आणि हिवाळ्यात, पायी चालून आणि घोड्यावर बसून, भुकेने कासावीस होऊन आणि तहानेने व्याकुळ होऊन, शिलेदार वीर हवामानाचे सर्व आघात आणि जगातील सर्व अडचणी सोशीत असतात." खानावळवाला उत्तरला,

"मला त्याच्याशी काही कर्तव्य नाही. तुम्ही आपला हिशेब चुकता करा. आपल्या कावळ्या-चिमण्यांच्या आचरट गोष्टी सांगून मला सतावू नका. मी जर पैसे घेतले नाहीत तर मला माझे घर चालविता येणार नाही." हे ऐकून डॉन क्विक्झोट भडकले आणि उत्तरले, "तू खानावळवाला नाहीस, तर मूर्ख आहेस, दुष्ट आहेस." असे बोलून आणि त्या आपल्या यजमानावर आपला भाला उगारून, त्यांनी रोझिनांटला टाच मारली. त्यांना कोणीही अडथळा केला नाही. ते खानावळीतून दौडत बाहेर गेले. आपल्यामागे आपला नोकर येतो की नाही, हे पाहण्यासाठी त्यांनी एकदाही नजर मागे फिरविली नाही. ते मोठ्या रस्त्याला लागले.

शिलेदारसाहेबांनी तर कूच केले. मागे राहिला फक्त त्यांचा नोकर. हिशेब पुरा करण्यासाठी त्याला थांबविण्यात आले होते. पण त्याने शपथ घेऊन सांगितले की, "मी एक पैही देणार नाही. कारण, ज्या कायद्याने शिलेदार मोकळे सुटले, त्याच कायद्याने त्यांचा चाकरही पैसे देण्यापासून मुक्त आहे." यामुळे खानावळवाल्याच्या भावना एकदम उसळल्या आणि त्याने सँकोला असा जबरदस्त दम भरला की, "बऱ्या बोलाने तू माझे पैसे दिले नाहीस तर मी तुला याच क्षणी माझ्या पायाखाली तुडवीन." सँकोने आपल्या धन्याच्या शिलेदारीची शपथ घेऊन सांगितले, "यासाठी पैसे देण्यापेक्षा मी माझे प्राण देईन. मी जर पैसे दिले तर शिलेदारांच्या भावी चाकरांना वाईट किंवा घालून दिल्यासारखे होईल, किंवा त्यांच्या हक्कांचा भंग केल्यासारखे होईल आणि मग त्यांना माझी निंदा-नालस्ती करण्यास कारण सापडेल." पण सँकोचे दुर्दैव असे की, त्यावेळी त्या खानावळीत सेगोव्हियाचे चार कापड-व्यापारी, कोर्डोव्हाचे तीन लोहार आणि सेव्हिलचे दोन फेरीवाले होते. ते सारेजण तरतरीत, आनंदी व उत्साही होते. त्या सर्वांनी एकमत करून सँकोला वेढा घातला आणि त्याला त्याच्या गाढवावरून खाली ओढले. त्यांच्यापैकी एकाने आत जाऊन एक घोंगडे आणले. त्यांत त्या दुर्दैवी चाकराला घालून त्यांनी परसात नेले. कारण जेथे ते होते तेथील छप्पर फार ठेंगणे होते. परसात वर आकाशाशिवाय दुसरी कसलीच मर्यादा नव्हती. मग त्यांनी त्याला त्या घोंगड्यात खूप वेळ उडवले- 'पवित्र मंगळवारी' कुत्र्याला हिंदकळतात तसे. हे सर्व होत असताना बिचारा सँको इतक्या मोठ्याने आक्रोश करीत होता की, तो अखेर त्याच्या धन्याच्या कानावर पडला. तेव्हा त्याला वाटले, "संकटात सापडलेल्या कोणा तरी माणसाच्या या दुःखाच्या आरोळ्या असाव्यात. साहस करण्याला ही आपल्याला एक संधीच आहे." पण शेवटी त्यांनी तो आवाज ओळखला आणि अर्धवट दौडत ते खानावळीकडे परत गेले. पण काय? खानावळीची दारे बंद होती. तेव्हा आत जाण्यास दुसरा मार्ग सापडतो की काय, हे पाहण्यासाठी ते घोड्यावरून आजूबाजूस हिंडू लागले. त्यांना मागच्या बाजूस भिंत दिसली. ती फार उंच नव्हती. त्यामुळे आपल्या चाकराची होत असलेली दुर्दशा त्यांना प्रत्यक्ष दिसली. सँको वर जात होता आणि खाली येत होता, चपळाईने व हुषारीने हवेत नाचत होता. क्विक्झोट यांना फार संताप आला नसता तर, सँकोची ती कसरत पाहून

त्यांना हसू आवरले नसते. त्या भिंतीवरून आत जाण्याचा त्यांनी खूप प्रयत्न केला, पण हाय! त्यांचे अंग इतके ठणकत होते की, त्यांना आपल्या घोड्यावरून खाली उतरता येईना. त्यामुळे ते धुमसू लागले–संतापले आणि शेकडो शिव्याशाप व धमक्या देऊन, त्यांनी आपली संतप्त भावना प्रगट केली. त्या शिव्या इतक्या विविध व विलक्षण होत्या की, त्या येथे सांगणे अशक्य आहे.

क्विक्झोट जितके जितके खवळत व ओरडत, तितके आतील लोक सँकोला खालीवर फेकीत होते आणि हसत होते. बिचारा सँको त्यांची करुणा भाकीत होता, केकाटत होता, दमदाटी देत होता, धिक्कारीत होता–पण सारे व्यर्थ. त्याच्या धन्याच्या आरडाओरडीइतके व्यर्थ. सँकोची दीन दशाच त्या लोकांना त्या खेळापासून परावृत्त करू शकली असती. काही वेळाने त्यानी उदार मनाने हा उंच नाच आटोपता घेतला आणि त्याच्या अंगाभोवती त्याची वस्त्रे नीट गुंडाळून त्याला त्याच्या गाढवावर पुनरपि बसविले. पण मॅरीटोर्नेसच्या कोमल जीवाने त्या संकटग्रस्त पुरुषावर दया केली. त्याच्या नाचानाची-मुळे आणि फेकाफेकीमुळे, त्याच्या घशाला कोरड पडली असेल, असे समजून तिने त्याला पिण्यास पाणी देण्याचे औदार्य दाखविले. पाणी गार असावे म्हणून तिने ते विहिरीतून नुकतेच मुद्दाम काढले होते. सँकोने पाण्याचे भांडे तोंडाला लावले मात्र, तोंच त्याच्या धन्याने त्याला पाणी पिण्यास मनाई केली. तो ओरडला, " पुत्रा सँको, थांब थांब. ते पाणी पिऊ नकोस. बाळा, ते तुला ठार करील. हे पहा माझ्याजवळ हे अत्यंत पवित्र रसायन आहे. त्याचे दोन थेंब घेतलेस की तू खडखडीत बरा होशील. " सँकोने आपले डोके हलविले आणि आपल्या धन्याकडे रागाने कटाक्ष टाकून म्हटले, " हाय रे दैवा! मी शिलेदार नाही, हे आपण विसरला काय? काल रात्रीच्या प्रकरणानंतर माझ्या पोटात जी थोडी आतडी शिल्लक आहेत, ती मी ओकून टाकली असे तुम्हास वाटते काय? तुमचे रसायन तुमच्याजवळच ठेवा आणि मला एकटे सोडा." असे म्हणून त्याने पाण्याचे भांडे आपल्या नाकाजवळ नेले, पण त्यात केवळ पाणीच आहे, असे पाहून त्याने तोंडात गेलेले थोडे पाणी बाहेर फेकून दिले आणि जरा चांगली दारू आणण्यास मोलकरिणीस सांगितले. तेव्हा ती आत गेली आणि तिने दारू आणली. त्यासाठी तिने आपल्याच खिशातले पैसे दिले. ती जरी आपल्या कृपेची अशी उधळमाधळ करीत असल्याबद्दल प्रवाद होता तरी ज्याचा जो गुण असेल, तो मान्य केला पाहिजे आणि म्हणून ख्रिस्ती धर्माची काही तत्त्वे तिच्या अंगी होती हेही सांगायला हवे.

सँकोने आपले मद्यपान संपविताच आपल्या गाढवाकडे धाव घेतली आणि आपल्या टाचेने त्याच्या बरगड्याना दोनतीनदा ढोसले. बाहेर जाण्याचा परवाना त्याला आता मोफत मिळाला होता. आपला उद्देश सफल झाला आणि आपण मारहाणीतून बचावलो-फक्त आपले खांदे नेहमीप्रमाणे दुखावले तेवढेच – या विचाराने खूष होऊन, तो मोठ्या ऐटीत तेथून बाहेर पडला. खानावळवाल्याने पैशासाठी त्याची पिशवी ठेवून घेतली होती हे खरे, पण बिचारा सँको इतका भयभीत झालेला होता की, तो पिशवीची

आठवणही न काढता तेथून झपाट्याने निघून गेला. आणखी काही अनर्थ ओढवू नये म्हणून खानावळवाला दरवाजे लावण्यास निघाला. पण ते व्यापारी त्याला तसे करू देईनात. डॉन क्विक्झोट हे खरोखर गोलमेजाभोवतीचे एक सरदार असते, तरी त्यांना त्या व्यापाऱ्यांनी तृणवत् मानले असते.



## प्रकरण ४

# शिलेदार व त्यांचा नोकर यांच्यामधील चर्चा आणि इतर उल्लेखनीय घटना.

सँकोने आपल्या धन्याला गाठले. पण त्याचे तोंड इतके फिकट झाले होते – अंग इतके ठणकत होते आणि मन इतके खचले होते की, तो आपल्या गाढवावर नीट बसूही शकत नव्हता. त्याची ती दुर्दशा पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "प्रिय सँको, आता माझी बालंबाल खात्री झाली आहे की, हा किल्ला – किंवा खानावळ म्हण– जादूने मंतरलेला आहे. तुझ्याशी असा रानटी खेळ खेळणारे ते लोक परलोकीच्या पिशाच्चांशिवाय दुसरे कोण असणार? यावर माझा विश्वास बसण्याचे आणखी एक कारण असे की, मी जेव्हा भिंतीवरून डोकावून पाहिले आणि तुझे हाल होत असलेले मला दिसले, तेव्हा त्या भिंतीवरून आत जाण्याचा मी प्रयत्न केला; पण मी जागचा हलू शकलो नाही, फार काय, रोझिनांटवरून खाली उतरूही शकलो नाही. जर मी घोड्यावरून खाली उतरू शकलो असतो आणि ती भिंत ओलांडू शकलो असतो तर, माझ्या प्रतिष्ठेसाठी मी त्या उर्मट दुष्ट लोकांवर तुझ्याखातर असा काही जबर सूड घेतला असता कीं, त्यांना त्या भयंकर शिक्षेचे विस्मरण कधीच झाले नसते. पण हाय! शिलेदारीच्या नियमांचे उल्लंघन मी करू शकत नाही. ते नियम कोणते हे मी तुला वारं-वार सांगितले आहे. त्या नियमांमुळे, कोणताही शिलेदार हा शिलेदार नसलेल्या माणसा-वर हात टाकू शकत नाही. फक्त स्वसंरक्षणासाठी किंवा फार मोठी निकड असेल त्यावेळी तो कोणावरही हल्ला करू शकतो."

सँको म्हणाला, "तसे नाही मालक! शिलेदार असो वा नसो, मी त्यांचा खरपूस समाचार घेतला असता! पण तसे करणे माझ्या शक्तीबाहेरचे होते. तरीही मी असे म्हणण्याचे धाडस करतो की, माझ्या शरीराचा खुळखुळा करून मजा मारणारे ते लोक, आपल्या म्हणण्याप्रमाणे, पिशाच्च किंवा जादूगार नव्हते– आपल्यासारखीच ती हाडा-मांसाची माणसे होती. मला हवेत चेंडूसारखे फेकत असताना ते एकमेकांना ख्रिस्ती नावांनी नि आडनावांनी हाका मारीत होते असे मला पक्के आठवते. एकाचे नाव होते पेड्रो मार्टिनेझ, तर दुसऱ्याचे टेनोरिओ हर्नान्डेझ असे होते. आणि आपल्या त्या पाशवी यजमानाला ते 'डावखोरा जुआन पॅलोमेक' या नावाने हाक मारीत होते. आपण भिंत ओलांडू शकला नाही किंवा घोड्यावरून उतरू शकला नाही, ही कोणा मांत्रिकाची जादू

होती, असे आपण कृपया मानू नये. आणखी बडबड करणे मूर्खपणाचे आहे. माणसाला नाक असते हे जितके स्पष्ट आहे, तितकेच आपण चौफेर हिंडून ज्या साहसांचा शोध करीत आहोत, ती आपल्याला शेवटी संकटात आणि नुकसानीत टाकणार आणि त्यामुळे आपल्याला एक पाऊलही पुढे टाकता येणार नाही, हे स्पष्ट आहे. सारांश, आपण आपल्या घरी दुडदुडत जाणे आणि आपल्या शेतीकडे लक्ष देणे, हाच सर्वांत शहाणपणाचा मार्ग आहे. आपण उगाच इकडून तिकडे धावपळ करू नये, नाही तर 'आगीतून फोफाट्यात' किंवा 'सावलीतून उन्हात' पडल्याची अवस्था व्हायची "

डॉन क्विक्झोट उद्गारले, "अरे बिचाऱ्या सँको, शिलेदारीच्या बाबतीत तू किती रे अडाणी ! आता अवाक्षर काढू नकोस. धीर धर. शिलेदारीचा व्यवसाय करणे किती सन्मानाचे आहे, याची खात्री तुला पटवून देणारा दिवस लवकरच उजाडेल. आपल्या शत्रूला जिंकून त्याच्यावर विजय मिळविण्याइतका आनंद आणि संतोष या जगात दुसरा कोणता आहे, ते मला सांग. कोणताच नाही, हे निःसंशय." तेव्हा सँको म्हणाला, "असेल— तसे असेल, पण मला शिलेदारीची काहीही माहिती नाही. तथापि मी असे म्हणण्याचे धाडस करतो की, जेव्हा आपण ( म्हणजे महाराज, तुम्ही— माझ्यासारख्या क्षुद्र जीवाला शिलेदार हे नाव शोभत नाही. ) शिलेदार बनला, तेव्हापासून झालेल्या कोणत्याही लढाईत आपली सरशी झाली नाही; नाही म्हणायला बिस्केयनशी झालेली चकमक जिंकलीत, तरी आपण आपला एक कान आणि शिरस्त्राणाची नाकपट्टी गमावून बसलात. त्यानंतर आपल्याला ठोसे— आणखी ठोसे, जखमा— आणखी जखमा— याशिवाय दुसऱ्या कशाचा लाभ झाला, हे कृपा करून मला सांगा. घोंगड्यात घालून उडवले जाण्याचे भाग्य मलाच लाभले. त्याचा सूड घेणे शक्य नाही; कारण माझा खेळ करणारी ती पिशाच्चे होती. तरीसुद्धा त्यांचा सूड उगवायची मला फार तळमळ आहे. म्हणजे शत्रूला जिंकण्याचा आनंद तुम्ही म्हणता तो काय असतो, हे मला कळेल.

डॉन क्विक्झोट उद्गारले, "सँको, तुला आणि मला एकच रोग झाला आहे असे मला वाटते. पण मी आता लवकरात लवकर असा प्रयत्न करणार आहे की, कोणत्याही जादूचा प्रभाव जिच्यावर पडू शकणार नाही इतक्या कौशल्याने बनविलेली तलवार हस्तगत करावयाची—जी गॉलचा अमॅडिस याने धारण करून 'ज्वलंत तलवारीचा शिलेदार' असे स्वतःला संबोधले—ती माझ्या हाती दैवयोगाने येईल. कोणाही शिलेदाराने उपसलेल्या तलवारीमध्ये अमॅडिसची तलवार सर्वश्रेष्ठ होती; तिचा एक गुण तर मी आताच सांगितला. त्याशिवाय तिला वस्तऱ्यासारखी धार होती. त्यामुळे कोणत्याही मंतरलेल्या किंवा कठीण चिलखतामध्ये ती शिरत असे." हे ऐकून सँको म्हणाला, "धनी, आपल्याला अशी समशेर सापडली म्हणजे मी वाटेल त्या वस्तूची पैज लावतो कीं, आपल्या रसायनाइतकीच ती मला उपकारक ठरेल. म्हणजे तिचा उपयोग दीक्षा मिळालेल्या शिलेदाराशिवाय दुसऱ्या कोणास होणार नाही, आणि माझ्यासारख्या शागिर्दाने कितीही धडपड केली तरी ती व्यर्थ ठरेल." यावर डॉन क्विक्झोट उत्तरले,

" अरे, असे भय बाळगू नकोस. तुझ्या कल्पनेपेक्षां देव तुला अधिक अनुकूल असेल."

अशा प्रकारे त्यांची चर्चा चालू असताना, डॉन क्विक्झोट याना अगदी त्यांच्या-समोर रस्त्यावर धुळीचा मोठा लोट उठलेला दिसला. तो पाहून ते आपल्या नोकराकडे वळून म्हणाले, "पहा, पहा, सँको, दैवाने माझ्यासाठी जे सौख्य राखून ठेवलेले आहे, ते घेऊन येणारा दिवस आता आला आहे. या दिवशी माझे शस्त्रसामर्थ्य असे पराक्रम करून दाखवील की, त्याचे स्मरण मानवाच्या शेवटच्या पिढीपर्यंतही पोहोचेल. पाहिलास तो धुळीचा ढग, सँको ? असंख्य राष्ट्रांच्या प्रचंड सेना चाल करून इकडे येत असल्या-मुळे तो धुळीचा लोट उठला आहे." तेव्हा सँको म्हणतो, "एकच का ? दोन सेना येत असल्या पाहिजेत. कारण तिकडे दुसऱ्या बाजूस तेवढाच मोठा धुळीचा लोट दिसत आहे."

डॉन क्विक्झोट यांनी त्या दिशेकडे नजर टाकली आणि त्यांचा हर्ष गगनात मावेनासा झाला. त्यांना नक्की वाटू लागले की, दोन प्रचंड सेना त्या मैदानात परस्पराशी सामना करण्यासाठी सिद्ध आहेत. शूर वीरांच्या कथांमध्ये त्यांनी ज्या युद्धांचे, जादूगिरीचे, विलक्षण साहसाचे, प्रणयपूर्ण कल्पनांचे आणि अशाच इतर अद्भुत गोष्टींचे वर्णन वाचले होते, त्या सर्वांनी त्यांच्या डोक्यात एकच गर्दी करून सोडली, आणि त्यांच्या प्रबळ कल्पनाशक्तीने त्यांना जे जे पाहण्याची इच्छा होती ते ते सर्व दाखविले. त्यामुळे त्यांच्या मनातही आले नाही की, निरनिराळ्या भागातून आलेले मेंढ्यांचे दोन मोठे कळप त्याच रस्त्याने जात आहेत, आणि अगदी जवळ येईपर्यंत ते ओळखणे शक्य नव्हते. त्या दोन सेनाच आहेत असा त्यांचा इतका ठाम ग्रह झाला की, शेवटी सँकोनेही त्यांच्या बोलण्यावर पूर्ण विश्वास ठेवला आणि विचारले, "ठीक, ठीक, धनीसाहेब. आता आपण काय करायचे, तेवढे मला कृपा करून सांगा." डॉन क्विक्झोट उत्तरले, "दुर्बल व दलित लोकांना मदत करण्याशिवाय आपण दुसरे काय करायचे ? कारण सँको, हे लक्षात ठेव की, आपल्यावर जे सैन्य चाल करून येत आहे, त्याचे आधिपत्य टाप्रोबाना या विशाल बेटाचा सम्राट महान अलिफॅनफॅरॉन यांच्याकडे आहे, आणि आपल्यामागून जे सैन्य पुढे येत आहे, ते त्याच्या शत्रूचे—म्हणजे गॅरामॅन्टियन्सच्या राजाचे—पेंटॅपोलिनचे—आहे. आपला उजवा हात उघडा ठेवून तो नेहमी युद्धात उडी घेतो, म्हणून त्याला 'उघड्या हाताचा पेंटॅपोलिन' म्हणतात."

सँको म्हणाला, "ही दोन थोर माणसे इतक्या जवळून का जात आहेत, हे महाराज, मला कृपया सांगा." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "त्यांच्या कलहाचे कारण असे आहे—अलिफॅनफॅरॅन हा कट्टा पाखंडी आहे आणि त्याचे पेंटॅपोलिनच्या मुलीवर प्रेम बसले आहे. ती मुलगी अत्यंत सुंदर आहे आणि ख्रिस्ती धर्माची अनन्य भक्त आहे; म्हणून तिच्या पित्याने तिचे लग्न त्या अख्रिस्ती राजपुत्राशी लावण्यास नकार दिला. आपल्या खोट्या धर्मनिष्ठा टाकून जर ख्रिस्ती धर्माचा अंगीकार त्याने केला तरच हे लग्न होऊ शकेल." ते ऐकून सँको उसळून म्हणाला, "बरोबर आहे पेंटॅपोलिनचा आग्रह.

तो चूक असेल तर माझी दाढी जळो. मी त्याच्या खांद्याला खांदा लावून उभा राहीन आणि त्याला शक्य ते सर्व सहाय्य करीन." डॉन क्विक्झोट उत्तरले, "शाबास! तुझा निश्चय मला प्रशंसनीय वाटतो. तो केवळ न्यायाचा आहे असे नव्हे तर तो आवश्यकही आहे. अशा युद्धात भाग घेण्यासाठी माणसाने शिलेदार असण्याची गरज नाही." सँको म्हणाला, "तसाच तर्क होता माझा. पण मध्यंतरीच्या काळात माझे गाढव आपण कोठे ठेवावे? म्हणजे युद्ध संपल्यावर आपल्याला ते पुनः सापडेल. युद्धात अशा प्राण्यावर कोणी स्वार झाल्याचे आपण कधी ऐकले नसेल, असे मी समजतो." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "तुझे म्हणणे खरे आहे. तू ते गाढव मोकळे सोडावेस—मग ते पुनः सापडले नाही तरी बेहत्तर. कारण आज आपली फत्ते झाली म्हणजे आपल्याला किती तरी घोडे मिळतील. त्यामुळे खुद्द रोझिनांटच्या बदलीही दुसरी घोडी येण्याचा संभव आहे." नंतर डॉन क्विक्झोट एका लहानशा टेकडीच्या माथ्यावर चढले आणि धुळीने त्यांची दृष्टी झाकोळली गेली नसती तर तेथून त्यांना ते दोन्ही कळप दिसले असते. पण ते न दिसल्यामुळे ते सँकोला म्हणाले, "पहा, पहा, सोनेरी शस्त्रांनी सज्ज असलेला तो शिलेदार! त्याच्या ढालीवर उडी घेण्याच्या पवित्र्यात एक मुकुटधारी सिंह एका राजकन्येच्या चरणाशी आहे, आणि तो सिल्व्हर ब्रिजचा शूर स्वामी लॅरील्को हा आहे. त्याच्याजवळ उभा असलेला बहाद्दर मिकोकोलेंबो हा क्विरासियाचा महान ड्यूक आहे. त्याच्या चिलखतावर सोन्याची फुले आहेत आणि गर्द निळ्या रंगात तीन कावळे काढलेले आहेत. त्यांच्या उजव्या बाजूस धिप्पाड शरीराचा जो माणूस चालत आहे, तो तीन अरबी साम्राज्यांचा सम्राट बोलिचेचा हिंमतवान ब्रेडा-बार्बरन हा आहे. त्याने सापाचे कातडे पांघरले आहे आणि ढालीऐवजी त्याने एक प्रचंड दार आपल्या हाती घेतले आहे; सॅमसनने आपल्या शत्रूचा सूड उगविण्यासाठी आपल्या मृत्युसमयी जे मंदिर पाडले त्याचे ते दार असे लोक म्हणतात. पण, सँको, या बाजूला तू दृष्टी फेक आणि दुसऱ्या सैन्याच्या अग्रभागी असलेला न्यू बिस्केचा राजपुत्र, कार्काजोनाचा सदाविजयी टिमोनेल याकडे पहा. त्याचे चिलखत निळ्या रंगाचे असून, त्याच्या ढालीवर एक मांजर आहे. त्या ढालीवर miau ('मियॉ') ही चार अक्षरे ब्रीदवाक्य म्हणून कोरलेली आहेत. त्याच्या हृदयस्वामिनीच्या मियॉलिना या नावाची ती आद्याक्षरे आहेत. ती आलगाव्हींचा ड्यूक आल्फेनिकेन यांची सुंदर कन्या आहे. ते राक्षसी धूड पहा—पलिकडच्या जंगली घोड्याच्या पाठीवर ते बसलेले आहे. त्याची शस्त्रे बर्फासारखी पांढरी शुभ्र आहेत आणि त्याच्या ढालीवर कांही चिन्ह नाही. त्या फ्रेंच माणसाला नुकतेच शिलेदार करण्यात आले आहे. तो उट्रिकेचा सरदार असून त्याला पीरे पॅपिन म्हणतात. आणि त्या चित्रविचित्र घोड्याच्या कुशीला आपल्या काटेरी टाचेने टोचणारा तो शक्तिमान ड्यूक पहा. नर्बिया एस्पार्टा फिलार्डोचा हा वनाधिप ड्यूक आपल्या शुद्ध निळ्या ढालीवर कॅस्तिलिअन भाषेत हे वचन धारण करतो, "असे माझे दैव पळते किंवा रेंगाळते," अशा प्रकारे त्या दोन्ही सैन्यातील किती तरी लोकांची

नावे डॉन क्विक्झोट सांगत सुटले. त्या क्षणी ते सर्वजण खरोखर आपल्या डोळ्यापुढे उभे आहेत असे वाटूनच की काय, त्यांच्या सुपीक कल्पनेतून त्या प्रत्येक सैनिकाची शस्त्रे, हुद्दे, खाणाखुणा आणि ब्रीदवाक्ये बाहेर पडू लागली.

आणि नंतर काहीही मोघमपणा न बाळगता, डॉन क्विक्झोट पुढे म्हणाले, "आपल्या अगदी समोर उभे ठाकलेले जे प्रचंड सैन्य दिसत आहे, ते अनेक राष्ट्रांचे आहे. सुप्रसिद्ध झँथस नदीचे मधुर जल प्राशन करणारे सैनिक तुला इकडे दिसतील, तर मॅसिलियाच्या शेतात नांगर चालविणारे डोंगरी लोक तिकडे दिसतील. अरबस्तानाच्या खाणीतून सोने काढून ते शुद्ध करणारे लोक इकडे पाहा आणि थर्मोडॉन नदीच्या सुविख्यात व सुखदायक तीरावर वास्तव्य करणारे लोक तिकडे पाहा. पलीकडे, बहुमोल वाळू मिळविण्यासाठी सुवर्णमयी पॅक्टोलस नदी उपसून काढणारे वीर दिसत आहेत. आणि तसेच अस्थिर मनाचे व आपले वचन न पाळणारे न्यूमिडियन्स, तरबेज तिरंदाज असलेले इराणी, उडत्या मारीत मारीत लढणारे मीडीस व पार्थियन्य, एके ठिकाणी वास्तव्य न करणारे अरब, सुंदर चेहऱ्याचे पण क्रूर व रानटी सिथियन्स, काजळासारखे काळे असलेले इथिओपियन्स आणि असेच हजारो देशांचे सैनिक समोर दिसत आहेत. त्या सैनिकांची नावे मी विसरलो असलो तरी त्यांचे चेहरे माझ्या ओळखीचे आहेत. दुसऱ्या बाजूस, ऑलिव्ह वृक्षांच्या छायेखाली वाहणाऱ्या बेटिस नदीच्या स्फटिकवत् जलाने समृद्ध झालेल्या राष्ट्रांचे सैनिक उभे ठाकलेले आहेत. सुवर्णमयी टेगस नदीच्या समृद्ध जलप्रवाहात स्नान करणारे, दिव्य जेनिल नदीच्या उपकारक जलप्रवाहाने सुशोभित झालेले ज्यांचे राजवाडे आहेत असे, टार्टेसिअन अरण्यात राहणारे, केरेझाच्या हिरव्यागार कुरणात विलास करणारे, धान्याच्या सोनेरी कणसांनी फुललेल्या मांचाचे श्रीमंत रहिवासी, तुरुंगात पडलेल्या गॉथ लोकांचे प्राचीन वंशज, पिस्वेर्गा नदीच्या मंद प्रवाहात डुंबणारे, गुप्तपणे वाहणाऱ्या पण आपला प्रवास चिकाटीने चालू ठेवणाऱ्या ग्वाडियाना नदीने पोसलेल्या प्रशस्त मैदानात आपले असंख्य कळप चारणारे, दाट जंगल असलेल्या पिरेनियन टेकड्यांवर कडाक्याच्या थंडीमुळे कुडकुडणारे, किंवा हिमाच्छादित अपेनाईन पर्वताच्या प्राचीन शिखरांवर थंडीने कुडकुडणारे– सारांश, युरोपच्या विस्तीर्ण भूभागावर राहणारे, निम्मे जग या एका सैन्यात साठविलेले आहे."

डॉन क्विक्झोट यांनी किती देश पालथे घातले, किती राष्ट्रांची गणती केली, आणि आपल्या आश्चर्यकारक उत्साहाने त्यापैकी प्रत्येकाचे वैशिष्ट्य कसे निवेदन केले आणि तेही कल्पित ग्रंथांच्या भपकेदार भाषाशैलीने कसे नटविले, याची कल्पनाच करणे कठीण ! ही सर्व रोमांचकारक जंत्री सँको, एखाद्या माशाप्रमाणे निमूटपणे पण आश्चर्याने, कान देऊन ऐकत होता. ती ऐकताना आपल्या धन्याने उल्लेखिलेले सरदार व सेनापती आपल्याला दिसतात का हे पाहण्यासाठी सँको आपले डोके एकदा इकडे वळवी तर दुसऱ्यांदा दुसरीकडे. याशिवाय तो दुसरे काहीच करू शकत नव्हता. पण कोणाचीही ओळख न पटल्याने तो ओरडून म्हणाला," महाराज, आपण आतापर्यंत जे वर्णन केले

त्यातील एकही सरदार, सेनापती किंवा माणूस मला दिसत नाही. आता हिम–वृष्टि होत आहे असे आपण मला सांगावे, तसेच हे सारे वर्णन मला वाटते. कालच्या रात्रीप्रमाणे, हा सारा चेटक्यांचा व पिशाच्चांचा खेळ नसेल कशावरून ?" तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "काय ? तुला त्यांच्या घोडयांचे खिंकाळणे आणि त्यांच्या तुताऱ्यांच्या ललकाऱ्या आणि त्यांच्या नगाऱ्यांचे आवाज ऐकू येत नाहीत ?"

सँको म्हणाला, "छेः, छेः, पावसाच्या शेतातील डुकरीप्रमाणे मी माझे कान टवकारले आहेत. पण मेंढ्यांच्या बें, बें या आवाजाशिवाय दुसरे काहीच मला ऐकू येत नाही." सँकोने असे म्हणणे अगदी स्वाभाविक होते. कारण, त्यावेळेपर्यंत मेंढ्यांचे ते दोन कळप त्यांच्या अगदी जवळ येऊन ठेपले होते. डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, भीतीमुळे तुझी बुद्धी भ्रष्ट झाली आहे, आणि त्यामुळे तुला खरे ते ऐकू येत नाही किंवा दिसत नाही. पण त्याला काही महत्त्व नाही. भीतीने तुझी इतकी गाळण उडाली आहे, तर तू एखाद्या सुरक्षित ठिकाणी जाऊन बैस. कारण ज्या सैन्यावर कृपा करून मी मदतीचा हात देईन, ते विजयी करण्यास मी एकटा समर्थ आहे." असे म्हणून त्यांनी आपला भाला उचलला, रोझिनांटला टाच मारली आणि कडाडणाऱ्या विजेप्रमाणे ते त्या टेकडी-वरून मैदानाकडे धावत गेले. तेव्हा शक्य तितक्या मोठ्या आवाजात ओरडून सँको म्हणाला, "थांबा, थांबा महाराज, परत या. आपल्याला काय वाटते ? अहो, ज्यांचा आपण चक्काचूर करण्यास निघाला आहा, ती बिचारी मवाळ मेंढरे आहेत, हे मी खात्रीने सांगतो. या, या, परत या. मला जन्म देणाऱ्याचा धिक्कार असो ! कारण, मला हा प्रसंग पाहावा लागत आहे. महाराज, आपण वेडे तर नाही ? येथे सेनापती नाहीत, सरदार नाहीत, मांजरे नाहीत, बागा नाहीत, सोनेरी राजवाडे नाहीत– आणि आपण जे जे म्हणता ते काही काही नाही ! आपल्याला भुताने पछाडले आहे काय ? जवळ न आलेल्या कुंपणावरून आपण उडी मारीत आहा, भलत्याच डुकरीचा कान धरीत आहात. अरेरे, हा दिवस पाहण्यास मी कशाला जन्माला आलो ?" पण डॉन क्विक्झोट यांनी या उपदेशाकडे पाठ फिरविली आणि ते तसेच पुढे दौडत चालले. आपली कानउघाडणी करणाऱ्या आपल्या चाकरापेक्षा मोठ्याने ओरडून ते म्हणाले, "शूर सरदारांनो, धैर्य धरा, पुढे चला, उघड्या हाताच्या शूर पेंटॅपोलिनच्या झेंडयाखाली लढणाऱ्या सैनिकां-बरोबर लढा आणि माझ्या मागोमाग या. टाप्रोबानाच्या पाखंडी अलीफॅनफेरनवर मी किती सहजपणे सूड उगवतो हे पाहा."

असे म्हणून, त्यांनी त्या मेंढ्यांच्या पलटणीवर शौर्याने व निर्धाराने हल्ला चढविला. एकामागून एक हल्ले करून त्यांनी क्षणार्धात त्या पलटणीची फळी भोसकली,– भग्न केली आणि त्या मेंढ्यांना पळ काढावयास लावला. असा पराक्रम करताना त्यांनी आपल्या शत्रूंचा मोठा फन्ना पाडला, त्यांच्या पायाशी लोळण घ्यायला लावली आणि त्या मेंढ्यांना रक्ताच्या थारोळ्यात गडबडा लोळत धुळीस मिळवले. आपल्या मेंढ्याचा विध्वंस होत असलेला पाहून ते मेंढपाळ क्विक्झोटना जोरजोराने हाका मारू लागले. सरळ मार्ग

फोल ठरल्याचे पाहून त्यांनी आपल्या गोफणी काढल्या आणि आपल्या मुठीएवढे दगड गोफणीतून क्विक्झोटवर फेकण्यास प्रारंभ केला. पण आमच्या शूर शिलेदाराला असे दुरून दुरून युद्ध करणे कसे आवडेल ? दगडा–धोंड्यांचा वर्षाव होत असतानाही ते त्या पळ काढणाऱ्या मेंढ्यांकडे धावत सुटले. आपल्या त्या शत्रूच्या सेनापतीशी मुकाबला करून युद्धाची समाप्ती लौकरच करावी, म्हणून ते उतावीळ झाले होते. त्यामुळे, जिवंत व मेलेल्या मेंढरांना अत्यंत क्रूरपणाने पायाखाली तुडवीत ते धावत सुटले आणि ओरडून म्हणाले, "अरे उर्मट ॲलिफॅनफेरन, कोठे आहेस तू ? माझ्यासमोर उभा राहा. बहाद्दर पेंटॅपोलिन याच्याशी तू अन्यायाने व चढेलपणे जी लढाई सुरू केलीस, तिचे योग्य प्रायश्चित्त म्हणून तुला ठार मारण्यासाठी आणि तुझ्या बलवान हाताची माजलेली शक्ती समोरासमोर जोखून पाहण्यासाठी हा शिलेदार एकाकीपणे येथे उभा आहे आणि तुझा शोध सर्वत्र घेत आहे."

ते असे बोलत असताना गोफणीतील दगड त्यांच्या कानाजवळून वेगाने जात होते. त्यापैकी एक दुर्दैवाने त्यांच्या लहानशा बरगडीवर पडला आणि त्यांच्या देहाच्या मध्यभागी असलेल्या दोन बरगड्या भग्न होण्याच्या स्थितीस पोचल्या. आमच्या शिलेदारांना वाटले, आपण ठार झालो– निदान भयंकर जखमी झालो. म्हणून आपल्या अमूल्य रसायनाचे स्मरण करून त्यांनी आपला खुजा बाहेर काढला आणि तो तोंडाला लावला. एक घुटका त्यांच्या घशाखाली जातो न जातो, तोंच एका संतप्त धनगराने मारलेल्या दगडाने त्यांचा खुजा फुटला, हात दुखावला आणि तीन-चार दात पडले. त्या बेफाम झालेल्या धनगराचे दोन ठोसे इतके त्वेषाचे होते की, त्यामुळे आमचे गडबड्ये शिलेदार घोड्यावरून खाली कोसळले आणि मृत माणसाप्रमाणे जमिनीवर पडले. ते ठार झाले आहेत, अशी भीती वाटून त्या धनगरांनी आपले कळप अत्यंत जलदीने गोळा केले. त्या कळपातील निदान जी सात मेंढरे मेली होती, ती त्यांनी आपल्याबरोबर घेतली आणि संकटापासून दूर जाण्यासाठी शक्य तितक्या वेगाने ते तेथून निघून गेले. त्या साऱ्या प्रकरणात अधिक लक्ष घालण्याचा धीर त्यांना उरला नव्हता.

हे सारे होत असताना सँको टेकडीवर उभा होता. ते मूर्ख व साहसी कृत्य पाहून तो लज्जित झाला होता. तेथे तसा राहून तो पाय आपटू लागला, शिव्या–शाप देऊ लागला आणि आपला धनी 'ठाव नसलेल्या खोल खड्डयात जावो,' असे म्हणू लागला. वेड्यासारखे तो आपल्या दाढीचे केस उपटू लागला. आपल्या धन्याची व आपली प्रथम भेट ज्या क्षणी झाली, त्या क्षणाला तो शाप देऊ लागला. शेवटी, आपला धनी मार खाऊन भूमीवर लोळत पडलेला त्याला जेव्हा दिसला आणि पळत सुटलेले ते धनगर जेव्हा त्याला दिसले, तेव्हा टेकडीवरून खाली येण्याचे धाडस आता आपण करावे, असे त्याला वाटले. खाली येताच त्याला आपला धनी बेशुद्ध नसला तरी त्याची अत्यंत दुर्दशा झालेली त्याला दिसली. ती पाहून तो उद्गारला, "अरेरे ! धनीसाहेब, माझा सल्ला आपण ऐकला नाही म्हणून असे घडले. हे सैन्य नाही, मेंढ्यांचा कळप आहे, असे मी

आपल्याला सांगितले नव्हते काय ? ” यावर डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, “ मित्रा सँको, कोणत्याही वस्तूचे स्वरूप आपल्या इच्छेप्रमाणे बदलणे, पिशाच्च–विद्या–पारंगताला सहज शक्य असते. तो मत्सरी मांत्रिक माझा कट्टा वैरी आहे. माझ्या पराक्रमाचे पुरे फळ माझ्या पदरात पडण्याची वेळ आली आहे आणि मला मोठा लौकिक प्राप्त होणार आहे असे पाहून, तो लौकिक मला मिळू नये म्हणून त्याने एका क्षणात पराभूत पलट-णींचे रूपांतर मेंढ्यांच्या कळपात केले. सँको, यावर तुझा विश्वास बसत नसेल तर तू आपल्या गाढवावर बसून त्या तथाकथित मेंढ्यांमागून काही अंतर ठेवून जा. मग त्या मेंढ्या आपले पूर्वीचे रूप धारण करीत आहेत, आणि मी वर्णन केल्याप्रमाणे दिसत आहेत, असा अनुभव तुला येईल, हे मी खात्रीने सांगतो. पण थांब. इतक्यात जाऊ नकोस. कारण मला तुझी मदत हवी आहे. जवळ ये आणि माझे किती दात पडले आहेत, हे पाहा. माझ्या जबड्यामध्ये व हिरड्यांमध्ये इतक्या भयंकर वेदना होत आहेत की, माझे सारे तोंडच भग्न झाले आहे, असे मला वाटते. ”

असे बोलून आमच्या शिलेदारानी आपले तोंड शक्य तितके उघडले. त्या तोंडा-तील दात मोजण्याचा प्रयत्न सँकोने केला; दाढा मोजण्यासाठी नाक जवळ जवळ त्यांच्या जबड्यात नेले पण नेमक्या त्याच घातुक क्षणी, डॉन क्विक्झोट यांच्या पोटामध्ये ढवळणारे व खवळणारे ते सारे रसायन एका अभागी उचकीसरशी हिंदकळत बाहेर पडले. तोफेच्या तोंडातून स्फोटक दारू जितक्या जोरात बाहेर पडते, तितक्या जोराने क्विक्झोटच्या पोटातील सारे काही बाहेर पडले, आणि त्यांच्या त्या लुडबुड्या चाकराच्या दाढीवर, तोंडावर व डोळ्यांवर उडाले. तेव्हा बिचारा सँको ओरडला, “ सांता मारिआ ! आता माझे काय होणार ? माझा धनी मरून पडला आहे ! आपल्या अगदी हृदयातील रक्त तो ओकत आहे ! ” हे शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडतात न पडतात तोच क्विक्झोटच्या शरीराचा रंग, गंध व रस हे पाहून त्याचा भ्रम नाहीसा झाला. आपल्या धन्याच्या तोंडातील फेस पाहून सँकोच्या पोटात एकदम इतकी खळबळ झाली की, त्याने

त्यानंतर डॉन क्विक्झोट यांनी मोठ्या कष्टाने उठून उभे राहण्याचा प्रयत्न केला. आपल्या तोंडातील उरलेले व हलणारे दात बाहेर पडू नयेत, म्हणून त्यांनी आपल्या तोंडापुढे आपला डावा हात धरला आणि आपला उजवा हात रोझिनांटच्या लगामावर ठेविला. ( त्या प्राण्याचा स्वभाव इतका चांगला होता की, तो आपल्या धन्यापासून हातभरही दूर गेला नव्हता. ) नंतर दोघे आपला चाकर सँको याच्याकडे सरपटत गेले. त्यावेळी सँको आपल्या गाढवाजवळ उभा होता. त्याने आपल्या दोन्ही हाताच्या तळव्यात आपले तोंड झाकून घेतले होते. त्यावेळी त्याचे मन दुःखात, उद्वेगात व वैतागात बुडाले होते. त्याची ती शोकाकुल अवस्था पाहून क्विक्झोट त्याला म्हणाले, “ मित्रा सँको, दुसरा माणूस जे कांही करतो, त्याच्यापेक्षा आपण जर काही अधिक करीत नसू, तर त्या दोघांमध्ये कांहींच फरक नाही, हे तू माझ्यापासून शीक. ही सर्व वादळे आणि तुफाने म्हणजे आगामी शांततेची पूर्वचिन्हे होत. आपल्या पूर्वीच्या

संकटानंतर आपल्याला विजयश्री लौकरच माळ घालील. सुदैव काय किंवा दुर्दैव काय-यांचा चक्रनेमिक्रम असतो. कोणतीही हिंसा दीर्घकाळ टिकू शकत नाही, हा सिद्धांत आहे. म्हणून, यापुढे आपल्याला चांगले दिवस लौकरच येतील, असे आपण आपल्या चित्ताला सांगू शकतो. कारण आपल्या दुःखांनी आपल्यावर नेहमीच्या मर्यादेपेक्षा अधिक अधिराज्य गाजविले आहे. शिवाय, या दुर्दैवाबद्दल तू स्वतः इतका त्रास करून घेण्याचे कांहीच कारण नाही. कारण ते दुर्दैव तुझ्यामुळे ओढवलेले नाही. केवळ मैत्री आणि मानवता यांच्या प्रेरणेमुळे तू यात अंशभागी झालास."

"काय? या दुर्दैवात माझा कांहीच वाटा नाही?" सँकोने विचारले. "अहो, आज सकाळी त्या घोंगड्यात जो हिंदकळला गेला, तो मीच नव्हे काय? आणि मी जी पिशवी हरवली ती--आणि तिच्यातील सारे सामान--माझेच--माझ्या आईच्या मुलाचेच--नव्हते काय?" डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "काय? तुझी पिशवी हरवली?" सँकोने उत्तर दिले, "ती हरवली की नाही, मला माहीत नाही, पण तिचे काय झाले, हे मी खचित सांगू शकत नाही." त्यावर डॉन क्विक्झोट उत्तरले, "तर मग आपण आज उपोषण केले पाहिजे." सँको म्हणाला, "होय, केले हे पाहिजेच. या रानामध्ये असलेली काही कंदमुळे व वनस्पती आपल्याला माहीत आहेत, आणि त्यांचा उपयोग आपल्यासारख्या दुर्दैवी शिलेदारांना प्राणसंकटाचे वेळी होतो. असे मी आपल्या तोंडून ऐकले आहे. तरी ती कंदमुळे तरी गोळा करण्याची खटपट आपण करावी नाही तर उपोषणाने आपले प्राण जाणार." तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, "साऱ्या वैद्यकीय ग्रंथातील वनस्पतींची व कंदमुळांची भरती करण्यापेक्षा यावेळी पाव--कोंबडीचे पोटभर जेवण मला अधिक बरे वाटेल. म्हणून प्रिय सँको, तूं आपल्या गाढवावर चढ आणि माझ्यामागोमाग पुनः ये अशी माझी तुला प्रार्थना आहे. जो ईश्वर प्रत्येक प्राण्याच्या मदतीस धावून जातो, तो आपल्याला पाठमोरा कसा होईल? त्याच्या सेवेचेच कार्य करण्यास आपण निघालो आहो ना? हवेत उडणाऱ्या चिमण्या जीव-जंतूंची, पृथ्वीच्या पोटातील किड्या-मुंग्यांची आणि पाण्यातील माशा-वेडकांची तरतूद ईश्वर करतो. त्याची करुणा इतकी अपार आहे की, पुण्यवान नि पापी या उभयतावर तो आपल्या सूर्याचा प्रकाश पाडतो, तसाच सज्जन व दुर्जन या दोघांवरही तो पाऊस पाडतो."

आपल्या धन्याच्या या प्रवचनात अडथळा आणून सँको म्हणाला, "शब्दांच्या संभाराने पोट भरत नाही. आपण शिलेदारापेक्षा चांगले धर्मोपदेशक व्हाल. मी दुःखाने येथून निघून जातो." डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे, शिलेदारांना साऱ्या गोष्टी माहीत पाहिजेत. प्राचीन काळी तसे शिलेदार होते. ते सैन्याच्या आघाडीवर असे काही विद्वत्ता-प्रचुर व कल्पना-रुचिर व्याख्यान किंवा प्रवचन देत की, त्यांनी पॅरिसच्या विद्यापीठाची पदवी घेतली आहे असे वाटावे. यावरून आपण असे अनुमान केले पाहिजे की, भाल्यामुळे लेखणी बोथट होत नाही आणि लेखणीमुळे भाला गंजत नाही." तेव्हा

सँको मान हलवून म्हणाला, " ठीक तर, आपल्या इच्छेप्रमाणे आणखी एकदा होऊ द्या. या दुर्दैवी जागेचा आपण निरोप घेऊ या आणि दुसरे निवासस्थान शोधू या. तेथे धोंगड्या नसतील आणि धोंगड्या उडवणारे लोक नसतील, पिशाच्चे नसतील आणि मांत्रिक मूर नसतील, अशी मी देवाची प्रार्थना करतो. मला जर पूर्वीसारखा काही अडथळा झाला नाही, तर मी हा सारा धंदा सैतानाच्या हवाली करीन, असे शपथ-पूर्वक सांगतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, " सारे कांही ईश्वरावर सोपव. तुझ्या इच्छे-प्रमाणे तू चल, मी तुझ्यामागोमाग येतो. आपला मुक्काम कुठे ठेवावयाचा, हे मी सर्वस्वी तुझ्या बुद्धीवर सोपवतो. पण आधी हे अजमावून पाहा की, माझ्या वरच्या जबड्याच्या उजव्या बाजूस किती दात कमी आहेत. कारण तेथे मला फार वेदना होत आहेत."

सँको शिलेदाराच्या तोंडात आपले बोट फिरवून म्हणाला, " महाराज, त्या बाजूस आपले किती दात होते ? " डॉन क्विक्झोट उत्तरले, " चार. वरचा दात धरून सारे भक्कम होते." सँको म्हणाला, " नक्की सांगा," डॉन क्विक्झोट उत्तरले, " मी म्हणतो, चार, पाच नाहीत. माझ्या साऱ्या आयुष्यात एकही दात पडला नाही किंवा काढला नाही—किड्याने पोखरला नाही किंवा रोगाने खिळखिळा केला नाही." सँको म्हणाला, " छान ! या बाजूच्या खालच्या जबड्यात दोन दात व एक दाढ आहे. पण वरच्या जबड्यात दाढ नाही की दात नाही—सारे कसे सपाट—हाताच्या तळव्यासारखे !" ते ऐकून आमचे सरदार ओरडले, " दुर्दैवी डॉन क्विक्झोटा ! तलवार धरण्याचा माझा हात सोडून दुसरा माझा हात गळाला असता, तरी चालले असते. पण अरे सँको, दाढेशिवाय तोंड म्हणजे जात्याशिवाय गिरणी. माणसाच्या तोंडातील प्रत्येक दात हिऱ्याहून अधिक मोलाचा असतो. पण शिलेदारीच्या कडक निर्बंधामुळे आपल्याला ही सर्व संकटे सोसली पाहिजेत. दाताची हानी कधीही भरून येण्यासारखी नाही. अरे विश्वासू सँको, चढ, चढ, आपल्या गाढवावर चढ आणि आपल्या वाटेने चालू लाग. मी तुझ्यामागोमाग येतो."

सँकोने धन्याची आज्ञा पाळली आणि तो पहिल्याच वाटेने निघाला. ती वाट रुळलेली असल्याने लवकरच निवासस्थानाला आपल्याला नेऊन सोडील, असा त्याला भरंवसा वाटत होता. ते दोघे हळूहळू चालले होते. कारण डॉन क्विक्झोट यांच्या दुखावलेल्या हिरड्या व बरगड्या त्यांना जलद जाऊ देत नव्हत्या. आपल्या धन्याचे त्रस्त विचार त्याला विसरण्यास लावण्यासाठी सँकोने इकडच्या तिकडच्या गोष्टी सतत सांगण्याचे ठरवले. त्या गोष्टी पुढील प्रकरणात आपल्याला वाचावयास मिळतील.

◘ ◘

## प्रकरण ५

# सँको व त्याचा धनी यांच्यातील चर्चा, प्रेताच्या साहसाची कथा आणि अशाच इतर सुप्रसिद्ध घटना

सँको म्हणाला, "महाराज, आता मला असे खचित वाटू लागले आहे की, आपल्यावर नुकतीच जी संकटे कोसळली, ती आपल्या भीषण पापाचे योग्य प्रायश्चित्त होत. ते पाप म्हणजे आपण शिलेदारी परंपरेचा केलेला भंग. एका मूरचा मुकुट जिंके-पर्यंत रीतसर भोजन न करण्याची, हृदयस्वामिनीशी सुखसंवाद न करण्याची—आणि देवालाच माहीत अशा इतर गोष्टींची—जी शपथ आपण घेतली, तिचे पालन केले नाही. त्या मूरचे नाव मेलॅन्ट्रिनो असे आपण सांगितल्याचे मला स्मरते." डॉन क्विक्झोट उत्तरले, "सँको, तुझे म्हणणे बहुतांशी बरोबर आहे. आणि तुला खरे सांगायचे तर, मला या गोष्टीचे पूर्ण विस्मरण झाले होते. त्याचे स्मरण तू करून दिले नाहीस, म्हणूनच तुला घोंगड्यामध्ये खालीवर फेकण्यात आले हे तू पक्के समज. तथापि, मी आता पापाचे योग्य ते परिमार्जन करण्याची काळजी घेईन. कारण साऱ्या गोष्टी संभाळून घेण्याचे मार्ग शिलेदारी परंपरेत आहेत." तेव्हा सँकोने विचारले, "आपल्या व्रताचे स्मरण आपल्याला करून देण्याची शपथ मी कधी घेतली होती?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "तूं शपथ घेतली होतीस की नाही, याला काहीच किंमत नाही, पण माझ्या व्रतभंगा-पासून तूही मुक्त नाहीस, असे मला वाटते—आणि तेवढे पुरेसे आहे. आणखी काही वाईट घडू नये म्हणून आपण काही उपाय योजण्यात हानी नाही." तेव्हा सँको ओरडून म्हणतो, "महाराज, लक्षात घ्या, आपल्याला आपल्या शपथेचा जसा विसर पडला, तसा आपल्या प्रायश्चित्ताचा पडू नये, याची काळजी घ्या. नाही तर ती खवळलेली पिशाच्चे येथे येतील आणि मला बडवून काढतील—कदाचित आपल्यालाही 'अट्टल पापी' म्हणून बदडतील."

त्या दोघांना मुक्कामाचे ठिकाण सापडण्यापूर्वीच न कळत रात्र पडली. विशेष दुःखाची गोष्ट म्हणजे ते दोघे भुकेने कावलेले होते. त्यांचे सारे खाद्यपदार्थ असलेली पिशवी सँकोकडून दुर्दैवाने विसरून मागे राहिली होती. आणि त्यांची दुर्दशा पूर्ण करण्या-साठीच की काय, साहसाचा एक प्रसंग— निदान त्यांना तसा भासणारा— त्यांच्यापुढे उभा राहिला.

रात्रीने घेरलेले आमचे हे दोन मुशाफीर त्या अंधारात मोठ्या कष्टाने चालले

होते. शिलेदार भुकेने व्याकुळ झाले होते आणि त्यांचा नोकर अत्यंत अस्वस्थ झाला होता. अशा वेळी त्यांना कोणते दृश्य दिसले, तर असंख्य दिवे आपणाकडे येत आहेत. जणू काही अगणित तारका भ्रमण करीत आहेत असे त्यांना वाटले. हे विलक्षण दृश्य पाहून सँकोचे मन एकदम खोल खचले आणि डॉन क्विक्झोट यांनाही आश्चर्याचा झटका बसल्याशिवाय राहिला नाही. तत्काळ सँकोने आपल्या गाढवाचा व क्विक्झोट यांनी आपल्या घोड्याचा लगाम खेचला आणि दोघेही तेथेच थांबले. लौकरच त्यांना दिसले की, ते दिवे थेट आपल्याकडेच येत आहेत. ते जसजसे जवळ येऊ लागले, तसतसे मोठे दिसू लागले. ते भीषण व विस्मयकारक दृश्य पाहून, अर्धांगवायू झालेल्या माणसाप्रमाणे, सँकोच्या शरीराचा सांधा न् सांधा हलू लागला — कापू लागला आणि डॉन क्विक्झोट यांच्या अंगावर रोमांच उठले. पण त्या दृश्याने त्यांच्या चित्तावर विस्मयाचा जो पगडा बसविला होता, तो धैर्याने बाजूस सारून डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, खरोखर हा एक महान आणि अत्यंत संकटमय प्रसंग आहे. अशा वेळी मला माझ्या साऱ्या धैर्याचा नि सामर्थ्याचा उपयोग करावा लागेल." सँको म्हणाला, " दुर्दैव माझे! हा जर भुतांचा दुसरा खेळ असेल, तर तो सोसण्यासाठी मी बरगड्या कोठून आणू, याचीच भीति मला वाटते." ते ऐकून डॉन क्विक्झोट गरजले, " अरे जा रे, नरकातील सारी भूत–पिशाच्चे येथे आली तरी, तुझ्या डोक्यावरील एका केसालाही ती धक्का लावू शकणार नाहीत–मी त्यांना लावू देणार नाही. यापूर्वी त्यांनी तुझा अपमान केला याचे कारण, तुझ्या–माझ्यामध्ये भिंत होती आणि ती मी चढू शकत नव्हतो. पण आता आपण मोकळ्या मैदानावर उभे आहोत. येथे माझ्या समशेरीचा उपयोग करण्याचे स्वातंत्र्य मला आहे." यावर सँकोने शंका काढली, " छेः तुम्ही काहीही म्हणाला, तरी त्या पिशाच्चांनी तुमच्यावर पूर्वीप्रमाणे जादूटोणा केला, तर आपण मोकळ्या मैदानावर उभे असण्याचा आपल्याला काय उपयोग होईल?" डॉन क्विक्झोट उत्तरले, " हे पहा, सँको, धीर धर. या प्रसंगी तुला माझ्या शौर्याच्या प्रभावाची खात्री लवकरच पटेल." सँको म्हणाला, " देव करो आणि तसे होवो. मी माझ्याकडून शर्थ करीन."

असे म्हणून ते दोघेजण त्या रस्त्यावरून जरा बाजूस सरले. त्या दिव्याकडे एकाग्रतेने टक लावून पाहिल्यावर त्यांना लवकरच असे आढळून आले की, पांढराशुभ्र पोशाख केलेली पुष्कळ माणसे आपल्याकडे येत आहेत. ते भीषण दृश्य पाहून, बिचाऱ्या सँकोचे लटपटते धैर्य पार खलास झाले. हिवतापाचे वेळी वाजतात तसे त्याचे दात थड-थडा वाजू लागले, आणि ती माणसे जसजशी जवळ येऊ लागली, तसतशी त्याची कुडकुड वाढू लागली. आता त्यांना हे स्वच्छ दिसू लागले की, पांढरा पोशाख घातलेली व हातात मशाली घेतलेली सुमारे वीस माणसे घोड्यावरून येत होती. त्यांच्या पाठीमागे कृष्णवस्त्राने झाकलेली प्रेतवाहक गाडी येत होती. ती वाहणारी सहा माणसे शोकाकुल झालेली होती. त्यांची खेचरेही, थेट त्यांच्या टाचेपर्यंत, काळ्या कपड्याने झाकलेला

होती. शुभ्र वेशधारी माणसे हळू आवाजात व दुःखी स्वरात काही पुटपुटत मंद गतीने चाललेली होती. हे भयप्रद दृश्य, तशा रात्रीच्या वेळी आणि तशा विशाल एकांतात पाहून, सँकोपेक्षा अधिक शूर असणाऱ्या शागिर्दाच्याही धैर्याचा विध्वंस झाला असता, आणि डॉन क्विक्झोटशिवाय दुसरा कोणी धनी असता, तर त्याचीही स्थिती तीच झाली असती. पण डॉन क्विक्झोट यांच्या कल्पनाशक्तीने त्यांना असे भासविले की, " आपण शिलेदारीच्या ग्रंथात ज्या साहसी प्रसंगांचे वर्णन पूर्वी अनेकवार वाचले आहे, त्यापैकीच हा एक आहे, आणि ही प्रेतवाहक गाडी म्हणजे एक मेणा असून त्याच्यामध्ये भयंकर जखमी झालेल्या किंवा ठार झालेल्या सरदाराचे प्रेत आहे. त्या सरदाराच्या दुर्दैवाचा सूड घेण्याचे काम आपल्या पराक्रमी शस्त्रासाठी राखून ठेवलेले आहे. " म्हणून गाजा-वाजा न करता त्यांनी आपला भाला उचलला आणि आपल्या खोगिरावर भक्कमपणे बसून, ते रस्त्याच्या मध्यभागी जाऊन उभे राहिले. तेथूनच ती सारी मंडळी जावयाची होती. ती मंडळी जवळ येताच डॉन क्विक्झोट संतप्त स्वरात ओरडले, " थांबा, तुम्ही कोण आहा ? कोठून आला आहा ? कोठे जात आहा ? त्या मेण्यातून काय नेत आहा ? हे सारे मला सांगा. कारण तुम्ही कोणाला तरी खूप दुखापत केली आहे किंवा कोणाकडून सोसली आहे, असे मानण्यास मला सबळ कारण आहे. हे सारे प्रकरण मला कळणे अवश्य आहे. ते कळले म्हणजे तुम्ही दुष्कृत्य केले असल्यास, मी तुम्हाला शिक्षा करीन आणि तुम्हाला अन्याय सोसावा लागला असल्यास त्याचा मी सूड उगवीन. " त्या श्वेत-वस्त्रधारी माणसांपैकी एकाने उत्तर दिले, " महाराज, आम्ही घाईत आहो. येथून खानावळ फार दूर आहे. आपल्या इतक्या प्रश्नांची उत्तरे देण्यासाठी आम्ही थांबू शकत नाही. "

असे म्हणून त्याने आपल्या खेचराला टाच मारली आणि तो पुढे निघाला. पण त्याच्या उत्तराने डॉन क्विक्झोट पुरे नाराज झाले. त्यांनी त्याच्या खेचराचा लगाम धरला आणि त्याला थांबविले व ओरडून म्हटले, " अरे गर्विष्ठ नि असभ्य सरदारा, थांब. नीट वाग. मी विचारलेल्या प्रश्नांची माहिती मला ताबडतोब दे. नाही तर, मी तुम्हा सर्वांना माझ्याशी भयंकर सामना खेळण्यास आव्हान देतो. " ते खेचर बुजरे व नाचरे होते. त्याचा लगाम खेचून धरला गेल्याने ते एकदम घाबरले आणि आपल्या मागच्या पायावर उभे राहिले. त्यामुळे त्याच्या पाठीवरील स्वार जमिनीवर कोसळला. हे पाहून त्या मंडळीतील एका पादचारी माणसाने डॉन क्विक्झोट यांना दुरुत्तरे केली. त्यामुळे क्विक्झोट इतके संतापले की, त्यानी त्या सर्वांचा सूड घेण्याचा निर्धार केला आणि भयंकर क्रोधाच्या भरात ते दुसऱ्या माणसावर धावून गेले. तो त्यांच्यापैकीच एक सुतकी माणूस होता. त्याला खूप इजा करून क्विक्झोट यांनी जमिनीवर लोळविले. नंतर मोठ्या चपळाईने ते बाकीच्या माणसांकडे वळले आणि त्यांच्यावर इतक्या त्वेषाने तुटून पडले की, त्यानी त्या सर्वांना लगेच पळ काढावयास लावले. त्यावेळी रोझिनांट इतका चपळ आणि भयंकर दिसत होता की, त्याला पंख फुटले आहेत की काय, असेच तुम्हास

वाटले असते.

अशा भारी शत्रूविरुद्ध टिकाव धरणे, निःशस्त्र असलेल्या आणि त्यामुळे भयभीत झालेल्या त्या लोकांना खरोखर शक्य नव्हते, ती शुभ्रवेषधारी मंडळी लगेच पसार झाली, यात काही आश्चर्य नाही. कोणी या दिशेने तर कोणी त्या दिशेनें पळत सुटले, आणि आपल्या पेटत्या मशालीनिशी त्या मैदानातून बाहेर पडले. सणाच्या रात्री नाचण्या–बागडणाऱ्या आनंदी–चैनी लोकांचा हा मेळावा आहे, असेच तुम्हाला वाटले असते. अंत्यविधीसाठी जमलेली ती गरीब बिचारी माणसे आपल्या लांबलचक व भोंगळ झग्या-मध्ये इतकी अडकली होती की, त्यांना स्वतःचे रक्षण करणे शक्य नव्हते. त्यामुळे ते लोक तत्काळ उधळले गेले आणि इतरांप्रमाणेच पळत सुटले. विशेष म्हणजे त्यांना वाटले, आपण जे प्रेत स्मशान–भूमीत नेत आहोत, ते घेऊन जाण्यासाठी प्रत्यक्ष सैतानच येथे अवतीर्ण झाला आहे–हा कोणी मर्त्य मानव नव्हे. हे सारे होत असताना सँकोचे मन विस्मय व कौतुक यामध्ये बुडून गेले, आपल्या मालकाच्या पराक्रमाने त्याचे मन मोहित झाले. आपला मालक, स्वतःची बढाई मारीत असे त्याप्रमाणे, खरोखर अत्यंत शूर आहे अशी त्याची खात्री पटली.

यानंतर आमचे शिलेदार जमिनीवर पडलेल्या एका माणसाकडे दौडत गेले. जमिनीवर जळत असलेल्या मशालीच्या प्रकाशात त्यांना तो माणूस दिसला. त्याला त्याच्या खेचराने जमिनीवर फेकून दिले होते अन् ते खेचरही तेथे पडले होते. डॉन क्विक्झोट, आपला भाला त्या माणसाच्या गळ्यावर रोवून, मोठ्याने ओरडून म्हणाले, "शरण ये, आपले प्राण वाचविण्याची करुणा भाक, नाही तर तू ठार झालास म्हणून समज." तेव्हा तो माणूस ओरडून म्हणाला, "हाय हाय महाराज, आपण मला शरण येण्यास का सांगत आहा? मी जागचा हलू शकत नाही. कारण माझी एक तंगडी मोडलेली आहे, आपण जर ख्रिस्ती असाल तर मला ठार मारू नका, अशी माझी प्रार्थना आहे. मी पारंगत–पदवी घेतलेला एक धर्मोपदेशक आहे. माझा प्राण घेणे हे दारुण पाप ठरेल." ते ऐकून डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "अरे, तू जर धर्मोपदेशक आहेस, तर तुला कोणत्या पिशाच्चाने येथे आणले?" तो शरणार्थी उत्तरला, "माझ्या दुर्दैवा-शिवाय दुसरे कोण मला येथे आणणार?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी जो जो प्रश्न विचारीन त्याचे उत्तर तू ताबडतोब दिले नाहीस, तर तुझ्या मस्तकावर अरिष्ट कोसळेल!"

"देईन, देईन, महाराज मी उत्तरे देईन. पण प्रथम मला आपली क्षमा मागितली पाहिजे. कारण, मला 'पारंगत' पदवी मिळालेली नसून, 'विशारद' पदवी मिळाली आहे." त्या माणसाने उत्तर दिले, "माझे नाव अलोन्झो लोपेझ. मी अल्कोव्हेंडासचा आहे, आता मी बीका शहरातून आलो आहे, माझ्याबरोबर अकरा पाद्री होते. मशाली घेऊन आता जे पळाले, तेच ते. बीका येथे मरण पावलेल्या एका सभ्य माणसाचे प्रेत पुरण्यासाठी आम्ही सेगोव्हिया येथे चाललो होतो, ते प्रेत आता

त्या पलीकडच्या प्रेतवाहक–गाडीत पडलेले आहे." डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "त्याला ठार मारले कोणी?" त्याने उत्तर दिले, "देवाने–प्लेगने!" डॉन क्विक्झोट म्हणाले, "असे असेल तर त्याच्या मृत्यूचा सूड घेण्याचे माझे कर्तव्य उरले नाही. दैवानेच त्याचा प्राण घेतला, मग आपण काय बोलावे? माझाही प्राण असा घेण्याचे दैवाच्या मर्जीस आले असते, तर मलाही ते मान्य करावेच लागले असते. माननीय धर्मगुरो, मी आपल्याला माझी माहिती देतो. मी ला मांचा येथील सरदार आहे. माझे नाव डॉन क्विक्झोट. साहसाचे प्रसंग शोधीत जगभर हिंडावे, ज्या निष्पाप लोकांवर अन्याय झाला असेल, त्यांना दुःखमुक्त करावे आणि अन्यायकर्त्याला शासन करावे, हा माझा व्यवसाय." तेव्हा तो धर्मोपदेशक म्हणतो, "खरोखर, महाराज, मला हे कळत नाही की, आपण लोकांच्या तंगड्या मोडता आणि त्यांना दुःखमुक्त करण्याची भाषा कशी बोलता? पूर्वी जे ठीक–सरळ होते ते तुम्ही वाकडे केले आहे—अन् ते पुनः माझ्या हयातीत कधी दुरुस्त होईल की नाही, हे देव जाणे. पीडितांना सुखी करण्याऐवजी आपण मला इतकी पीडा दिली आहे की, ती दूर होणे कठीण, असे भय मला वाटते. तुम्ही साहसाचे प्रसंग शोधीत आहा पण मला अतिसाहसाच्या प्रसंगाला तोंड द्यावयास तुम्ही भाग पाडले आहे."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "सज्जन श्रीमान विशारदा, साऱ्या गोष्टी काही सारख्याच यशस्वी होत नाहीत, अशा या निर्जन मैदानात, रात्रीच्या संशयास्पद काळी, पांढरे पोशाख घालून आणि हातात जळत्या मशाली घेऊन, लोकांना गर्भगळीत करणाऱ्या भूतपिशाच्चाप्रमाणे, तुम्ही मिरवीत जावयास नको होते. कारण मी माझे कर्तव्य सोडू शकत नव्हतो–तुमच्यावर हल्ला करण्याचे टाळू शकत नव्हतो. तुम्ही सर्वजण पाताळातील भूत–वेताळ आहात असे मी समजलो. तसे तुम्ही खरोखर असता तरी मी तुमच्यावर हल्ला केला असता–या क्षणापर्यंत मी तुम्हाला तसेच मानीत आलो." त्यावर तो विशारद म्हणाला, "ठीक, ठीक. माझे दुर्दैवच तसे होते, म्हणून माझ्या कामगिरीचे वाटोळे झाले. आपण शिलेदार आहा, तेव्हा आता मला माझ्या खेचराच्या भाराखालून वर येण्यास आपण मदत करावी. माझ्या शरीरावर त्याचा भार इतका पडलेला आहे की, मी त्याच्या खोगीरातून माझा पाय वर काढू शकत नाही." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "अरे, तू आपले दुःख यापूर्वीच मला का नाही सांगितलेस? उद्या सकाळपर्यंत मी असाच बोलत राहिलो असतो. आणि तुझ्या आपत्तीचा काही विचारच केला नसता." असे म्हणून त्यांनी सँकोला बोलावले. तो लवकर आला नाही. कारण ते धर्मोपदेशक आपल्या खेचरावरून जे खाद्यपदार्थ नेत होते, ते गोळा करण्याच्या मोठ्या कामात तो गुंतलेला होता. त्याने आपला कोट जमिनीवर पसरला होता आणि त्यात मावतील तितके खाद्य–पदार्थ घातले होते आणि त्याची एक पिशवी करून ती सारी लूट त्याने आपल्या गाढवावर लादली होती. नंतर तो आपल्या धन्याकडे धावत गेला, आणि त्या विशारदाला त्याच्या खेचरावर बसविण्याचे कामी आपल्या धन्याला

मदत करू लागला. तो बसल्यावर सँकोने त्याच्या हातात त्याची मशाल दिली. त्याला निरोप देताना डॉन क्विक्झोट म्हणाले, "आता तुम्ही आपल्या मंडळींच्यामागोमाग जा. मला माझ्या चुकीबद्दल क्षमा करा. तथापि सर्व गोष्टींचा विचार करता मला असे वाटते की, मी जे केले, ते मला टाळता आले नसते." सँकोने पुष्टी दिली, "महाराज, त्या सज्जनांना, आपली हाडे खिळखिळी करणारा कोण हे जाणण्याची इच्छा असेल, तर आपण त्यांना सांगावे, ला मांचा येथील सुप्रसिद्ध डॉन क्विक्झोट—'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार'—हाच तो होता."

तो विशारद गेल्यावर डॉन क्विक्झोट यांनी सँकोला विचारले, "तू मला 'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार' का म्हटलेस?" सँकोने उत्तर दिले, "सांगतो महाराज. त्या दुर्दैवी पाद्याच्या मशालीच्या प्रकाशात हा सारा वेळ मी आपल्या चेहऱ्याकडे टक लावून पहात होतो. इतका दुःखी चेहरा माझ्या साऱ्या जन्मात मी कधी पाहिल्याचे मला आठवत नाही. त्या दुःखाचे कारण काय हे मी सांगू शकत नाही. कदाचित या चकमकीमुळे आपण थकून गेला असाल किंवा महाराजांची दंतपंक्ती नष्ट झाल्यामुळे आपण खिन्न दिसला असाल." डॉन क्विक्झोट गरजले, "छे! छेः ते त्याचे कारण नव्हे. माझा तर्क असा आहे की, माझ्या पराक्रमाची नोंद करण्यासाठी दैवाने एखादा ऋषी खाली पाठवला असेल आणि त्याला वाटले असेल की, प्राचीन काळच्या शिलेदारांप्रमाणे मीही काही नवी पदवी धारण करावी. प्राचीन शिलेदारांपैकी एकाला म्हणत, ज्वलंत तलवारीचा शिलेदार, तर दुसऱ्याला 'युनिकॉर्नचा' म्हणून संबोधीत. तिसरा, 'फिनिक्सचा' चवथा 'रमणीचा शिलेदार,' कोणी 'ग्रिफीनचा' तर आणखी एकादा 'कृतांताचा शिलेदार.' अशाच टोपण नावांनी आणि विशिष्ट गुणांनी ते शिलेदार सर्व भूतलावर परिचित होते. म्हणून 'दुःखी आकृतीचा सरदार' असे नवे अभिधान मला देण्याची स्फूर्ती तुला त्या विद्वान ऋषीने—माझ्या इतिहासकाराने—दिली असली पाहिजे यात शंका नाही. तेव्हा मी ते अभिधान धारण करतो, आणि त्या संज्ञेनेच अतःपार मी ओळखले जावे, असे इच्छितो. माझ्या ढालीवर 'अत्यंत दुःखी चेहरा' मी पहिल्याच संधीस रंगवून घेईन; तसे करणे अधिक उचित दिसेल."

सँको म्हणाला, "महाराज, आपण दुःखी चेहरा रंगवून घेण्यापेक्षा केवळ आपला स्वतःचा चेहरा दुसऱ्यास दाखविला की पुरे, हे मी खात्रीने सांगतो. तसे केल्याने तुमचे पैसेही वाचतील. कोणी म्हणेल की मी चेष्टा करतो आहे, पण खरोखर, महाराज, आपले दात पडल्यामुळे आणि आपल्याला भूक लागली असल्यामुळे, आपण इतके दुःखी व चमत्कारिक दिसता की, खुद्द आपल्याइतका आपल्या कार्याला अनुरूप चेहरा रंगविणे कोणाही चित्रकाराला शक्य नाही." सँकोच्या या गमतीच्या कल्पनेने त्याच्या धन्याच्या उग्र मुद्रेतून स्मित बाहेर पडले. तथापि त्याने ते नाव आणि ते चित्र धारण करण्याचा आपला निर्धार कायम ठेवला. थोड्या वेळाने, बुद्धीला धक्का देणारा एक विचार डॉन क्विक्झोट यांच्या मनात एकदम चमकून गेला आणि ते म्हणाले, "सँको, धार्मिक

परंपरेतील एका माणसावर मी रागाने हात टाकला म्हणून मला वाळीत टाकतील, अशी भीती वाटते. त्या अर्थाचे एक धार्मिक सूत्र माझ्या वाचनात आले आहे. तरीही पुन्हा विचार करता मला असे आठवते की, मी त्याला माझ्या भाल्याने स्पर्श केला, हातांनी नव्हे. शिवाय धर्मोपदेशकाशी मी झटापट करीत आहे, अशी कल्पना मला मुळीच नव्हती. प्रत्येक भल्या कॅथॉलिक माणसाने आणि निष्ठावंत ख्रिश्चनाने धर्मोपदेशकाला जितका मान व आदर दाखवावयास पाहिजे,तितका मी दाखवतोच, पण मला वाटते, ही दुष्ट पिशाच्चे आहेत. ठीक आहे, व्हायचे ते होऊ दे. पोपच्यासमोर राजाच्या प्रतिनिधीची खुर्ची छिन्न–विच्छिन्न केल्याबद्दल सिड् रू डियाझ याला बहिष्कृत करण्यात आले. पण तरीही त्या दिवशी रोडेरिगो डी व्हिव्हार हा शूर सरदाराप्रमाणे आणि सन्मान्य माणसाप्रमाणे वागला ! ”

असे बोलून डॉन क्विक्झोट त्या प्रेतवाहक गाडीकडे निघाले. त्या गाडीत काय आहे, फक्त हाडेच असली तरी ती त्यांना पाहावयाची होती. पण सँको त्यांना तसे करू देईना. तो म्हणाला, “ महाराज, आपली सारी कातडी शाबूत राखून आपण आता सुखरूप आहा–पूर्वीपेक्षा आता पुष्कळच बरे राहिला आहा. कोणी सांगावे ? आताच पळून गेलेली ती माणसे कदाचित असा विचार करतील की, एकट्या माणसाकडून आपण उधळले गेलो ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे आणि म्हणून ती माणसे कदाचित परत येतील आणि आपल्यावर एकदम तुटून पडतील. मग आपल्या नशिबी पुष्कळच कामगिरी येऊन पडेल. माझे गाढव सुस्थितीत आहे, जवळच एक टेकडी आहे आणि आपल्या पोटात कावळे ओरडत आहेत. तर चला, आपण संकटाच्या मार्गातून दूर जाऊ. ‘ उंदीर पकडायला नांगर थांबवा कशाला ? ’ अशी म्हणच आहे. ‘ मृत माणसाबरोबर स्मशानात जावे आणि जिवंत माणसाबरोबर जेवायला जावे. ’ अशीही दुसरी म्हण आहे. ” असे म्हणून तो दुडक्या चालीने आपल्या गाढवावरून निघाला. त्याचे म्हणणे बरोबर आहे असे त्याच्या धन्याला पटले, म्हणून काही उत्तर न देता तोही त्याचे मागोमाग गेला.

थोडा वेळ ते चालून गेल्यानंतर दोन टेकड्यामध्ये दडलेली दरी त्यांना दिसली. तेथे ते खाली उतरले. सँकोने आपला कोट उलगडला आणि जमिनीवर पसरला. त्याने गोळा केलेले खाद्यपदार्थ त्यात होते. त्यावर आमच्या या दोन साहसी वीरांनी ताव मारला. त्यांचा जठराग्नी क्षुधेने अत्यंत भडकलेला होता. म्हणून सकाळची न्याहारी, दुपारचे जेवण, संध्याकाळचा फराळ आणि रात्रीचे भोजन हे सर्व त्यांनी एकाच वेळी सेवन केले. विविध प्रकारच्या मांसाहाराची त्यांना मेजवानीच मिळाली. ते उत्तम मांस त्या पाद्र्यानी आपल्या आहारासाठी आणलेले होते. इतर पाद्र्यांप्रमाणेच ते आपल्या अन्नाविषयी जागरूक आणि आपली सुखसोय पाहण्यास तत्पर होते.

जेवण झाल्यावर त्या दोघांना एका अत्यंत दारुण दुर्दैवाची जाणीव झाली. बिचाऱ्या सँकोने तर, ही कधी ओढवली नव्हती इतकी घोर आपत्ती आली म्हणून हळहळ व्यक्त

केली. चमचमीत आहारानंतर पिण्यास आणि आपली तहान भागविण्यास दारूचा किंवा पाण्याचा एक पाण्याचा थेंबही आपल्याजवळ नाही हे त्यांच्या लक्षात आले. यापूर्वी भुकेने त्यांचा जीव जितका कासावीस झाला होता, त्यापेक्षा अधिक आता त्यांचा जीव होरपळत होता– गुदमरत होता. तथापि आपण ज्या ठिकाणी बसलो आहो तेथील गवत हिरवेगार व ताजेतवाने आहे, हे पाहून सँको आपल्या धन्याला म्हणाला – काय ते पुढील प्रकरणात वाचा.



## प्रकरण ६

# जगातील अत्यंत प्रख्यात अशा कोणत्याही शिलेदाराने कधीही केले नसेल, असे जे आश्चर्यकारक धाडस ला मांचा येथील शूर डॉन क्विक्झोट यांनी केले, त्याचा वृत्तांत.

तहानेने अर्धा गुदमरलेला सँको म्हणाला, "येथले गवत इतके टवटवीत आहे की, आपल्याला जवळपास कोठेतरी एखादा झरा किंवा ओहोळ आढळेल असे मी माझ्या प्राणांची पैज मारून सांगतो. म्हणून महाराज, मी आपल्याला विनंती करतो, आपण आजूबाजूला शोध घेऊ या. भुकेने आपल्या पोटात जितकी कासावीशी झाली, त्याच्या दसपट चालमेल या दुष्ट तहानेने आपल्या घशात सुरू केली आहे. ती तहान आपण भागवू या." त्यानंतर डॉन क्विक्झोट रोझिनांटचा लगाम धरून, आणि सँको आपल्या गाढवाची काढणी धरून, ते इकडे तिकडे पाहू लागले. सँकोने आपल्या जेवणातील उरलेले पदार्थ गुंडाळून ठेवले होते. ते दोघेजण केवळ अदमासाने चालले होते. कारण आता काळोख इतका पडला होता की, त्यांना आपले स्वतःचे हातही दिसत नव्हते. ते दोनशे पावले चालले असतील—नसतील, तोंच त्यांना प्रचंड धबधब्याचा आवाज ऐकू आला. त्यावेळी त्यांना अधिक स्वागतार्ह अशी दुसरी कोणती गोष्ट या जगात होती? ती उपकारी कुजबूज कोणत्या दिशेने येत आहे हे समजून घेण्यासाठी त्यांनी आपले कान टवकारले. तेव्हा त्यांच्या कानी, दुसऱ्याच एका प्रकारचा आवाज अकस्मात् आला. त्यामुळे त्यांचा – विशेषतः सँकोचा – पहिल्या आवाजामुळे झालेला आनंद एकदम ओसरला. सँको जात्याच भित्रा व कचखाऊ असल्याने जास्तच घाबरला. आडदांड आघात नियमितपणे पडून होणारे भीषण ध्वनी आणि त्याहून भयंकर लोखंडी साखळदंडांची व कड्यांची खळखळ हे आवाज त्यांच्या कानावर पडले. धबधब्याची गर्जना तर चालूच होती. तो सर्व संमिश्र घोष ऐकून डॉन क्विक्झोटशिवाय दुसऱ्या कोणाच्याही छातीत भयविस्मयाची धडकीच भरली असती. त्यातच भरीस भर म्हणून उंच उंच झाडांच्या पानांची सळसळ आणि वाऱ्याची शीळही चालू होती. ते अज्ञात स्थान, ती अंधारी रात्र, तो भीषण एकांतवास, त्याच दुर्दैवी क्षणी दैवयोगाने त्या दोघांनी त्या झाडाखाली येणे, दुसरे भयोत्पादक आवाज आणि पूर्वी सांगितलेल्या धबधब्याची गर्जना, आघातांचा गडगडाट व बेड्यांचा खळखळाट – मिळून तो सारा प्रसंग विलक्षण भीतीदायक झाला होता. सर्वांत वाईट हे होते की, ते आघात न थांबता दुप्पट जोराने

वाजत होते, वाऱ्याचा उद्घोष एकसारखा चालू होता आणि सूर्यप्रकाश तर दूरच होता.

पण डॉन क्विक्झोटची अविभाज्य सहचारिणी म्हणजे निर्भयता. ती त्यांना संरक्षण देत होती. ते आपल्या रोझिनांटवर स्वार झाले, त्यांनी आपली ढाल घट्ट धरली, आपला भाला परजला आणि आपला आत्मा भयाला भीक घालीत नाही, सुख–दुःखाला जुमानीत नाही हे दर्शविले. ते म्हणाले, "सँको, तू हे लक्षात ठेव की, मी या लोह–युगात जन्मलो, तो सुवर्णाचे युग–किंवा काही लोक म्हणतात त्याप्रमाणे 'सुवर्ण–युग'––या जगतीतलावर पुनः निर्माण करण्यासाठी, ज्याच्यासाठी दैवाने अत्यंत भयंकर व बिकट उद्योग राखून ठेवले आहेत, अत्यंत अवाढव्य आणि वैभवशाली साहसी कृत्ये व अत्यंत शौर्यशाली शस्त्र–चमत्कार राखून ठेवले आहेत, तो मानव मी आहे. गोलमेजाची ( Round Table ) संस्था–फ्रान्समधील बारा उमराव आणि नऊ श्रेष्ठी या सर्वांचा पुनरुद्धार करणारा आणि तुमचे ते प्लॅटिर्स, तुमचे ते टॅब्लँटेस, तुमचे ते ऑलिव्हँटिस, आणि तुमचे ते टिरँटिस–या सर्वांची स्मृती पुसून टाकणारा मानव मी आहे. तुमचे ते देव–पुत्राचे सरदार, तुमचे ते बेलियानिसेस अन् तशाच इतर सुप्रसिद्ध शूर–वीरांची असंख्य पथके आणि प्राचीन युगातील झाडून सारे शिलेदार या सर्वांना आपल्या साऱ्या अत्यंत उज्ज्वल कृत्यांची प्रभा त्याहून तेजस्वी अशा पराक्रमांनी झाकोळल्याचे पाहावे लागेल. अरे माझ्या विश्वासू सेवका, आपल्याभोवती किती नानाविध भयंकर गोष्टी एकत्र झाल्या आहेत ते पाहा. भीषण अंधार, दुःखद एकांत, पर्ण–संभाराचा संमिश्र नाद, शृंखलांचा खेदजनक खळखळ आवाज–वायु–लहरींचे आक्रंदन, धबधब्याचा विस्मय-कारक घोष–जणू काही चंद्रावरील उंच पर्वतावरून वेगाने वाजत–गाजत येणारे पाण्याचे लोटच–पुनः पुनः आदळणारे भयप्रद आवाज–मेघांच्या गडगडाटाप्रमाणे आपल्या कानांचे पडदे फाडून टाकणारे ते आवाज, मर्त्य मानवाचे खचणारे धैर्य जागृत करतात. त्यांनी धारण केलेले गाढ व सार्वत्रिक मौन ! संकटांचे असे डोंगर कोसळले असताना, प्रत्यक्ष मार्सची–युद्धदेवतेची–गाळण उडाली असती. पण या सर्व अवर्णनीय अशा भयानक परिस्थितीमध्ये मी अद्याप अचल धैर्याने उभा आहे. या सर्व संकटांमुळे माझ्य शौर्याला उत्तेजनच मिळते आणि माझ्या हृदयाला जोम चढतो. माझे हृदय माझ्या छातीत मावणार नाही इतके प्रचंड व बलाढ्य बनते आणि अशा भयप्रद संकटाची चाहूल लागताच ते उडी घेऊ पाहते. सँको, ये, इकडे ये. आणि रोझिनांटला नीट सरळ उभे कर. ईश्वर तुझे रक्षण करो. तू येथेच माझ्यासाठी थांब. तीन दिवसांत मी जर परत आलो नाही, तर तू आपल्या गावी परत जा. आणि मित्रा, माझ्यासाठी एवढे कर की, टोबोसोला जाऊन माझी अतुल्य हृदय–स्वामिनी डल्सीनिया हिला सांग, ' तुझा हा निष्ठावंत सरदार प्रेम व सन्मान यांन बळीं पडला. तुझा भक्त म्हणवून घेण्यासाठी जी जी कृत्ये करावयास हवीत, ती करताना कामी आला. "

आपल्य धन्याचे हे बोलणे एकून सँको अत्यंत करुण स्वराने रडू लागल आणि म्हणाला, " महाराज आपण स्वतः संकटात उडी का घेता ? दुःखदायक अश

वेड्या साहसामागे का धावता ? येथे गडद अंधार आहे, आणि आपल्याला पाहणारा एकही जीव आजूबाजूस नाही. आपण फक्त पळ काढायचा आणि संकटांच्या तावडीतून सुटायचे. गेल्या तीन दिवसांत आपल्या तोंडात पाण्याचा थेंब गेला नाही. आपण भीतीने पळून गेलो तर ते कोणाच्या लक्षात येणार आहे ? आपल्याला परिचित असलेला आपला धर्मोपदेशक एकदा असे म्हणाला होता की, जो संकटांमागे धावतो, तो संकटातच मरतो. म्हणून केवळ चमत्कारानेच साध्य होणाऱ्या वस्तूमागे आपण धावू नये आणि ईश्वरावर भार टाकू नये. माझ्याप्रमाणे आपल्याला घोंगडीमध्ये हिंदकळावे लागले नाही, हे पुरेसे नाही काय ? त्या प्रेताबरोबर आलेल्या पिशाच्चांच्या तावडीतून आपल्याला देवाने सुरक्षितपणे व धडधाकटपणे बाहेर आणले हे थोडे झाले काय ? महाराज, आपल्या कठोर अंतःकरणावर या सर्वांचा काही परिणाम होत नसेल तर निदान माझा विचार करा ! आपल्या बिचाऱ्या सँकोला आपण एकदा का सोडले, तर तो असे उपद्व्याप करण्याचे भीतीमुळे कायमचे सोडून देईल, आणि दुसरा जो कोणी माणूस पुढे येईल, त्याच्या हाती सारी कामगिरी सोपवील, हे पक्के समजा. मी माझे घरदार सोडले, माझी बायकामुले सोडली, ते कशासाठी ? आपल्यामागोमाग आल्याने माझी स्थिती सुधारेल, बिघडणार नाही–या आशेने ! पण लोभ सर्वनाश करणारा आहे. त्याने माझा आणि माझ्या आशांचा नाश केला आहे. आपण मला एक बेट बहाल करण्याचे वचन पुनः पुनः दिले होते ! त्या खट–नट बेटाचा राजा होण्याची मला बालंबाल खात्री होती. पण कसचे काय नि कसचे काय ? त्या बेटाऐवजी या विलक्षण स्थळी, आपण मला सोडीत आहा. परमप्रिय धनीसाहेब, असे कठोर होऊ नका हो. या क्षुद्र साहसामध्ये न गुंतण्यास आपण राजी नसाल, तर निदान उद्या सकाळपर्यंत आपले प्रयाण लांबणीवर टाका. एक गुराखी म्हणून मी जे चातुर्य संपादन केले आहे, त्यावरून असा अंदाज बांधू शकतो की, सूर्योदय आता तीन तासांपेक्षा दूर नाही. कारण मृग–नक्षत्राचे तोंड नेमके आपल्या डोक्यावर आहे. आणि म्हणून आता मध्यरात्र झाली आहे, हे उघड आहे. ”

तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, “ तुला मृगाचे तोंड कसे दिसते ? आकाशात तर एकही तारा दिसत नाही. ” सँकोने उत्तर दिले, “ ते खरे आहे, पण भीती तीक्ष्ण दृष्टीची असते. ती पाताळातील गोष्टी पाहू शकते आणि आकाशातील गोष्टी तर स्पष्टपणेच पाहू शकते. ” ते ऐकून आमचे वीर–पुरुष गरजले, “ दिवस उगवो वा न उगवो–सारे मला सारखे. कोणाच्या डोळ्यातील आसवे किंवा तोंडच्या प्रार्थना यामुळे हा आपल्या शिलेदारीच्या कर्तव्यास चुकला, असे डॉन क्विक्झोट यांच्याबद्दल कधीही लिहिले न जावे. म्हणून सँको, आता तू एक अक्षर बोलू नकोस. हे भीषण साहस करण्याचा निश्चय ज्या ईश्वराने माझ्या अंतःकरणात निर्माण केला आहे, तो तुझी–माझी काळजी खचित घेईल. चल, ये लवकर. माझ्या घोड्याचा पट्टा बांध आणि माझी वाट पाहात येथे थांब. मी जिवंत आहे का मेलो आहे, हे लवकरच तुझ्या कानी पडेल. ”

आपला मालक हट्टी आहे आणि आपल्या अश्रूंचा किंवा आपल्या उपदेशाचा त्याच्या मनावर काहीच परिणाम होत नाही, हे पाहून, त्याला सकाळपर्यंत तेथे थांबवून ठेवण्यासाठी, सँकोने एक युक्ती करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे खोगिराचा पट्टा आवळण्याचे ढोंग करीत असताना, त्याने रोझिनांटच्या मागील तंगड्या आपल्या गाढवाच्या पट्ट्याशी बांधण्याची लबाडी केली. त्याचा संशय डॉन क्विक्झोट यांना मुळीच आला नाही, त्यामुळे त्यांनी पुढे जाण्यासाठी आपल्या घोड्याला कितीही टाचा मारल्या, तरी तो एक पाऊलही पुढे टाकीना. आपली युक्ती यशस्वी झाली, असे पाहून सँको म्हणाला, " पहा महाराज, पहा, देव माझ्या बाजूला आहे, तो रोझिनांटला एक पाऊल पुढे टाकू देत नाही. आता आपण त्याला कितीही टाचा मारल्या, तरी ते प्रवाहाच्या उलट दिशेस पोहत जाण्यासारखे ठरेल–काट्यांना लाथा मारणे म्हणतात, तसे होईल हे मी पैजेनें सांगतो, " आपले घोडे इतके अडेलतट्टू झालेले पाहून डॉन क्विक्झोट त्रस्त झाले, संतप्त झाले, रागाने बडबडू लागले आणि अत्यंत त्वेषाने धुमसू लागले. पण आपण त्याला जितक्या टाचा माराव्या आणि त्याच्या कमरेत जितक्या लाथा घालाव्यात, तितके ते घोडे सुस्त व थंडच राहात होते, म्हणून त्यानी नाखुषीने असे ठरविले की, दिवस उजाडेपर्यंत धीर धरावयाचा. ते म्हणाले, " ठीक आहे. रोझिनांट येथून हलत नाही, म्हणून मला पहाटेपर्यंत येथे थांबले पाहिजे. त्याच्या या सुस्तीमुळे सुस्कारे टाकण्याची पाळी मजवर येणार आहे. " पण सँको म्हणाला, " सुस्कारे टाकण्याची किंवा दुःखी होण्याची आपल्याला गरज नाही. दिवस उजाडेपर्यंत आपल्याला गोष्टी सांगण्याचे काम मी माझ्या अंगावर घेतो. परंतु महाराजांनी आपल्या घोड्यावरून उतरून, शिलेदारांच्या सवयीप्रमाणे, या हिरव्यागार गवतावर डुलकी घ्यावी म्हणजे आपण ताजेतवाने व्हाल आणि आपली वाट पहात असलेल्या राक्षसी प्रसंगाला सकाळीं तोंड देण्यास अधिक समर्थ व्हाल. " यावर डॉन क्विक्झोट उत्तरले, " खाली उतरा नि झोपा, या तुझ्या म्हणण्याचा अर्थ काय ? संकट दाराशी दत्त म्हणून उभे असताना, जे आरामप्रेमी शिलेदार झोपा काढतात आणि आळसात लोळतात, त्यांच्यापैकी मी आहे, असे तुला वाटते काय ? छेः, तसे होणार नाही. तू झोप. झोपण्यासाठीच तू जन्माला आला आहेस. नाही तर तुला वाटेल ते कर, माझ्याविषयी म्हणशील तर, मी काय करावे हे मला माहीत आहे. " तेव्हा सँको म्हणाला, " महाराज, असे भावनावश होऊ नका, माझ्या म्हणण्याचा अर्थ तसा नव्हता—मुळीच नव्हता. "

असे बोलून, त्याने रोझिनांटच्या खोगिराच्या टोकावर आपला एक हात ठेवला आणि दुसरा हात शेपटीजवळील पट्ट्यावर ठेवला. आपल्या धन्याच्या डाव्या मांडीला मिठी मारून तो उभा राहिला. एक इंच पुढे जाण्याचे धैर्य त्याला नव्हते. त्याच्या कानात सतत आदळणाऱ्या आघातांचे आवाज त्याच्या मनात भीती उत्पन्न करीत होते. त्याने आपले वचन पूर्ण करावे, या उद्देशाने डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे, वेळ घालविण्यासाठी तू काही गोष्टी सांग. " तेव्हा सँको म्हणाला, " महाराज, मी फार

घाबरलो आहे. गोष्टी सांगण्याची उमेद माझ्या अंगी नाही. तथापि मी प्रयत्न करतो. एका गोष्टीचे मी आता स्मरण करतो. हां, एक गोष्ट माझ्या डोक्यात आली आहे. ती जर मी बरोबर सांगू शकलो आणि माझे मन बहकू देण्यासारखे काही घडले नाही तर, तुम्ही आपल्या आयुष्यात कधी ऐकली नसेल इतकी उत्तम गोष्ट मी तुम्हाला सांगतो. तेव्हा ऐका. मी आता सुरुवात करतो—

'प्राचीन काळी, जेव्हा सर्वांचे भले होते आणि वाईट करणाराचे वाईट होते'—

महाराज, येथे आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, जुनेपुराणे लोक आपल्या गोष्टींची सुरुवात धोपटमार्गाने करीत नसत. 'वाईट करणाराचे वाईट होते' असे केटो नावाचा रोमन अधिकारी म्हणत असे. ही म्हण बोटाला आंगठी बसावी त्याप्रमाणे आपल्या बेताला बरोबर बसते, आपण गडबड करू नये आणि दुष्ट संकटाचा शोध घेऊ नये, तर त्याच्यापासून बारा हात दूर असावे. पाताळातील भूत-पिशाच्चे आपल्याला गिळंकृत करण्यासाठी वाट पाहात आहेत. त्यांच्या तोंडात उडी घेण्याची सक्ती आपल्या-वर कोणी केली आहे ?" ते ऐकून डॉन क्विक्झोट ओरडले, "सँको, चालू दे तुझी गोष्ट पुढे. बाकीचे सारे माझ्या बुद्धीवर सोपव." सँको म्हणाला, "सांगतो तर मी ती गोष्ट. एस्ट्रेमेडुरामध्ये एका शहरात एक गुराखी राहात होता— मी धनगर म्हणायला हवे होते— त्या धनगराचे नाव लोपे रुइझ होते, असे त्या गोष्टीत आहे. या लोपे रुइझचे प्रेम टोराल्व्हा नावाच्या गुराखिणीवर बसले होते. ती एका श्रीमंत गुरेवाल्याची मुलगी होती. आणि हा श्रीमंत गुरेवाला-- "

डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, "अरे, तू जर याच गतीने गोष्ट सांगत राहिलास आणि फालतू गोष्टींची पुनरुक्ती करीत राहिलास, तर या दोन दिवसांत तुझी गोष्ट काही पुरी होणार नाही. म्हणून, शहाण्या माणसाप्रमाणे तू कृपा करून आपली गोष्ट थोडक्यात सांग. नाही तर राहू दे ती गोष्ट." तेव्हा सँको म्हणतो, "आमच्या देशात साऱ्या गोष्टी ज्या प्रकाराने सांगितल्या जातात, तशीच ही गोष्ट मी तुम्हाला सांगत आहे. दुसऱ्या कोणत्याही प्रकाराने मी ती सांगू शकणार नाही, हे मी माझ्या प्राणांची शपथ घेऊन सांगतो. आणि कथाकथनाची ही जुनी पद्धत बदलणे योग्य नाही, असे मला वाटते." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "सांग रे बाबा, तुझ्या मर्जीस येईल त्याप्रमाणे. कारण, माझ्या दुर्दैवामुळे मला येथे थांबणे आणि तुझी गोष्ट ऐकणे भाग आहे." तेव्हा सँको म्हणाला, "ठीक तर, महाराज, मी मघाशी सांगत होतो त्याप्रमाणे त्या गुराख्याचे त्या गुराखिणीवर— टोराल्व्हावर— फार फार प्रेम होते. ती चांगली बांधे-सूद, वाटोळी गरगरीत आणि नम्र अशी तरुणी होती. पण ती थोडीशी पुरुषासारखी दिसे. कारण, तिच्या वरच्या ओठावर बारीकशी मिशी दिसे. ती यावेळी माझ्यासमोर उभी आहे, असे मला वाटते." डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "तू तिला ओळखतोस काय ?" सँकोने उत्तर दिले, "छे छेः, मी साऱ्या आयुष्यात तिला कधी पाहिलेले नाही. पण ज्याने मला ही गोष्ट सांगितली तो म्हणाला, हे सारे

वर्णन खरे आहे. म्हणून मी ते खरे आहे असे खात्रीने सांगतो. तिला मी स्वतः पाहिली आहे, असे शपथेवर सांगतो. बरे ते असो. आपल्याला माहीतच आहे की, दिवस येतात आणि जातात आणि गुलाबाची झाडे कालांतराने फुलतात. आणि तसेच घडले. पुष्कळ दिवस आले आणि गेले. सैतान काही मेल्यासारखा पडून राहात नाही, प्रत्येक गोष्टीत नाक खुपसण्याची सवय त्याला असते. त्याने त्या गुराख्याचे त्याच्या प्रेयसीशी भांडण करविले. त्याचे तिच्यावरील प्रेम खलास झाले आणि त्याच्या जागी रुसवा नि वाकडेपणा आला. त्याचे कारण काय? त्या दोघांविषयीही सद्भाव न बाळगणारे खोडसाळ कथाकार असे सांगतात की, ती तरुणी जशी असावयास हवी होती तशी नाही, काहीशी स्वैराचारी आहे, असे त्याला वाटले. त्याला फार दुःख झाले, तो तिचा फार द्वेष करू लागला. फार काय, तिचे दर्शनसुद्धा नको म्हणून त्याने तो देश सोडण्याचे ठरविले. पण म्हणतात ना? प्रत्येकाची सद्दी असते. तो गुराखी आता आपल्या प्रेमाची याचना करीत नाही– उलट आपल्याकडे पाहून नाक उडवितो आणि आपल्याला टाळण्याचा प्रयत्न करतो, हे पाहून त्या खेडवळ तरुणीने त्याच्यावर प्रेम करण्यास सुरूवात केली, आणि त्याचेच चिंतन ती आपल्या मनात सतत करू लागली."

हे ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, स्त्रियांचा तो स्वभावच आहे. आपण त्यांच्यावर प्रेम करतो, तेव्हा त्या आपल्यावर प्रेम करीत नाहीत, आणि जेव्हा आपण त्यांच्यावर प्रेम करीत नाही, तेव्हा त्या आपल्यावर प्रेम करतात. पण चालू दे तुझी गोष्ट."

सँकोने आपली गोष्ट पुढे चालू ठेवली. "त्या गुराख्याने तिला चुकविले आणि आपली बकरी हाकीत हाकीत, एस्ट्रेमाडुराच्या प्रदेशातून, पोर्तुगालचा रस्ता धरला. पण टोराल्व्हाचे नाक तिखट! तिला त्याच्या योजनेचा वास लागला. नंतर तिने काय केले असेल असे आपल्याला वाटते? अनवाणी व उघड्या पायांनी ती त्याच्यामागोमाग चालू लागली. तेव्हा तिच्या हातात यात्रेकरूचा दंडा होता आणि तिच्या पाठीशी चामड्याची पिशवी होती. त्या पिशवीत आरशाचा एक तुकडा, अर्धा मोडलेला एक कंगवा, रंगाचे एक फुटके भांडे आणि नटण्यासाठी (मला माहीत नाहीत अशा) इतर सटर–फटर वस्तू भरलेल्या होत्या, असे लोक म्हणतात. पण तिच्या इच्छेस आल्या त्या कोणत्याही वस्तू ती नेईना का? मला त्याचे ना सुतक ना सोयर. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे तो गुराखी आपल्या बकऱ्यांसह शेवटी ग्वाडियाना नदीपाशी जाऊन पोहोचला, असे म्हणतात. त्यावेळी त्या नदीला पूर आलेला होता. दुर्दैवाची गोष्ट म्हणजे नदीतून पार होण्यास तेथे नाव किंवा सांगड नव्हती. त्यामुळे तो वैतागला. कारण त्याला माहीत होते की, टोराल्व्हा आपल्या पावलावर पाऊल टाकून येत आहे. तिच्या रडण्या–ओरडण्यामुळे आपल्याला खिजविल्यासारखे, त्रासल्यासारखे होईल, असे भय त्याला वाटले. अखेरीस त्याला एक कोळी दिसला. त्याची होडी छोटी होती. इतकी की, तिच्यातून एका वेळी

एक माणूस व एकच बकरे जाऊ शकेल. ठीक, तरीही त्याने त्या कोळ्याला हाक मारली, आणि आपल्या तीनशे बकऱ्यांसह आपल्याला नदीपार करण्याचा करार त्याने त्याच्याशी केला. करार झाला. कोळी आपली होडी घेऊन आला. नंतर त्याने एक बकरे नेले. होडी वल्हवीत तो परत आला आणि दुसरे बकरे त्याने नेले. नंतर तिसरे......चवथे ...किती बकरी त्या कोळ्याने नेली, याचे गणित, महाराज, आपण मांडीत आहा ना ? कारण त्यातले एक बकरे चुकले तरी माझी गोष्ट खलास झाली–मग मला एक शब्द नाही सांगता येणार ! बरे तर, मी कोठवर आलो होतो ? हां, आले माझ्या ध्यानात. नदीच्या पैलतीरावरील जागा अत्यंत निसरडी होती. तेथे चिखल फार माजला होता. त्यामुळे त्या कोळ्याला जाण्यायेण्यास फार वेळ लागे. तथापि त्याने मोठ्या सौजन्याने नि धडाडीने एकामागून एक बकरी नेण्यास सुरवात केली. एक नेले, दुसरे नेले, तिसरे नेले.......

डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे, त्याने ती सारी बकरीं नदीच्या पलीकडे नेली, असे आपण समजू. कारण तू एकेकाची मोजदाद करू लागलास, तर वर्षाचे बारा महिने काही पुरणार नाहीत." तेव्हा सँकोने उत्तर दिले, " महाराज, मला माझ्या मार्गाने जाऊ द्या. आतापर्यंत किती बकरी नेली ?" डॉन क्विक्झोट उत्तरले, " छेः ते मला सांगता येणार नाही. " सँको उद्गारला, " हेच ते ! मी आपल्याला गणती करावयास सांगितले नव्हते का ? मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे आता माझी गोष्ट संपली ! बाकीच्या गोष्टीची वाट पाहा." ते ऐकून डॉन क्विक्झोट ओरडले, "अजब आहे ! किती बकऱ्यांना नदीपार नेले, याचा नक्की आकडा मला कळल्याशिवाय तू आपली गोष्ट पुढे सांगणार नाहीस का ? " सँको उत्तरला, " नाही, देवाशपथ नाही ! बकऱ्यांचा आकडा आपण सांगू शकत नाही, असे उत्तर आपण ज्या क्षणी दिले, त्याच क्षणी उरलेली सारी गोष्ट माझ्या डोक्यातून साफ, पार निघून गेली. ही गोष्ट फार महत्त्वाची होती. तिचा असा विचका व्हावा, ही खरोखर मोठ्या दुःखाची गोष्ट आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, " असं ? एकूण गोष्ट संपली तर ! " सँको म्हणाला, " तर काय ? सारा मामला खतम् ! माझी मेलेली आई पुनः जिवंत करण्याइतकेच ती गोष्ट पुनः सांगणे कठीण आहे. " ते ऐकून डॉन क्विक्झोट मोठ्या आवाजात म्हणाले, " खरोखर, ती एक अत्यंत अलौकिक गोष्ट होती आणि अलौकिक पद्धतीनेच ती सांगितली गेली अन गुंडाळली गेली, मी शपथेवर सांगतो. ही काही अशी–तशी गोष्ट नव्हती, हे मी तुला खात्रीने सांगतो. तुझ्यासारख्या असामान्य बुद्धीच्या माणसाकडून मी याहून कमी दर्जाची गोष्ट अपेक्षिलीच नव्हती. पण सँको, या भीषण गोंगाटाने तुझे डोके फिरून गेले असावे, असे भय मला वाटते." सँको म्हणाला, "तसे असेलही. पण, माझ्या गोष्टीपुरते सांगावयाचे तर, मला अधिक काहीच सांगता येणार नाही. कारण जेव्हा तुम्ही बकऱ्यांची गणती करण्याचे सोडले, तेव्हाच माझ्या गोष्टीची इतिश्री झाली. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " होऊं दे, होऊ दे. आता आपण रोझिनांटची तबियत पुढे कूच करण्यासारखी आहे की नाही, हे पाहू या. " असे म्हणून त्यांनी रोझिनांटला दोन टाचा मारल्या. त्यामुळे

त्या अश्वराजाने एक उडी मारली. पण मागचे पाय त्याचे ऐकत नसल्यामुळे तो जागच्या-जागी खांबासारखा उभा राहिला.

याच सुमारास रात्रीच्या थंड हवेमुळे असो किंवा सँकोने रात्रीच्या जेवणात भरपूर पदार्थ चापल्यामुळे असो अथवा (हेच कारण अधिक संभवनीय दिसते) तिसऱ्या प्रहरानंतर करावयाचे कृत्य पार पाडण्याची प्रेरणा निसर्गाने दिल्यामुळे असो, नेकदार सँकोला असा एक विधी करणे भाग पाडले की, जो त्याच्यासाठी दुसरे कोणी करू शकले नसते. पण तो इतका घाबरलेला होता की, आपल्या धन्यापासून काडीमात्र दूर जाण्यास तो धजावत नव्हता. पण त्याच्या पोटातील असह्य ओझे वाहणेही त्याला तितकेच अशक्य झाले होते. अशा गांगरलेल्या स्थितीत (हे सांगितलेच पाहिजे की,) त्याने खोगिरावरचा आपला उजवा हात काढून घेतला आणि आपला पायजमा हळूहळू सैल केला–त्याच्या टाचेवर तो पडला. हे केल्यावर त्याने आपला सदरा, तितक्याच शांतपणे, वर केला आणि आपला पृष्ठभाग (जो काही लहानसहान नव्हता). तो मोकळ्या हवेत उघडा केला.

पण मुख्य प्रश्न हा होता की, काही आवाज न करता, एवढे भयंकर ओझे त्याने आपल्या पोटातून मोकळे कसे करावे? त्यासाठी त्याने आपले दांत घट्ट दाबून धरले, आपले तोंड पक्के मिटून घेतले, आपले खांदे वर उचलले आणि आपला श्वास शक्य तितका कोंडून धरला. तरीही पाहा, अत्यंत सुव्यवस्थित अशी योजना पार पाडण्याचे कामी किती मोठमोठी विघ्ने येतात! त्याचा सारा विधी पूर्ण होण्याचे बेतात असताना, त्याला प्रचंड आवाज आवरता आला नाही. सँकोला भीती वाटावयास लावणाऱ्या आवाजापेक्षा हा आवाज अगदी निराळा होता. दुर्दैवाने त्याचा स्फोट अकस्मात् झाला. तो ऐकताच डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, "ऐक, सँको, हा आवाज कसला आहे?" सँकोने उत्तर दिले, "काही तरी नवे संकट असणार, हे मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतो. आपल्याला माहीतच आहे, दुर्दैव कधी एकटे येत नाही." अशा तऱ्हेने एक विधी पार पाडल्यावर त्याने तसाच दुसरा ताणही सैल करण्याचे धाडस केले आणि ते इतक्या कौशल्याने की, अणुमात्र आवाज किंवा गोंगाट न होता त्याचे कार्य पूर्णपणे पार पडले आणि त्याचे मन व शरीर पुरेपूर मोकळे झाले.

परंतु डॉन क्विक्झोट यांचे श्रवणेंद्रिय जितके तीक्ष्ण होते, तितकेच घ्राणेंद्रियही होते. आणि सँको तर त्यांच्या अगदी जवळ उभा होता–त्यांना अगदी चिकटलेलाच होता. त्यामुळे तेथून जो गंध वर आला तो क्विक्झोट यांच्या नाकात शिरला. पण तो तितकासा सुवासिक नव्हता. म्हणून त्यानी नेहमीचा उपाय केला–म्हणजे आपले नाक घट्ट दाबून धरले. त्यामुळे त्या दुर्गंधीपासून त्यांना होणारा त्रास वाचला. नंतर श्वास जोराने आत ओढून घेऊन ते म्हणाले, "सँको, नक्कीच तुझ्या देहाला फार धोका आहे." सँको उत्तरला, "होय महाराज. पण पूर्वीपेक्षा आता आपल्याला तो अधिक का दिसतो?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "पूर्वीपेक्षा आता तुझ्या अंगाचा वास वाईट

येत आहे.” तेव्हा सँको उद्गारला, “वा! तसे असेल. पण हा दोष कोणाचा? त्यासाठी आपण स्वतःलाच धन्यवाद द्यावयास हवेत. आपण मला मृगजळाचा शोध लावण्यास का घेऊन जाता आणि अशा भयंकर ठिकाणी, अशा अयोग्य वेळी, का आणता? मला त्याची सवय नाही, हे आपल्याला माहीत आहे.” अजून आपले नाक दाबून धरून डॉन क्विक्झोट म्हणाले, “अरे बाबा, मी हात जोडतो, पण तू माझ्यापासून तीन-चार पावले दूर जा. यापुढे अधिक काळजी घे आणि तुझ्या-माझ्यातील अंतर लक्षात घे. मी तुझ्याशी सलगी केली, यामुळे मला तुझ्याविषयी तिरस्कार वाटू लागला आहे.” तेव्हा सँको म्हणाला, “जे मी करावयास नको होते, असे काही मी करीत आहे, असे आपल्याला वाटते, हे मी खात्रीने सांगतो.” डॉन क्विक्झोट म्हणाले, “तू गप्प बैस, अधिक बोलू नकोस. तू अधिक हालचाल केलीस तर सारे बिघडेल.”

या साऱ्या वादविवादाचा उपयोग त्यांना ती रात्र घालविण्यास चांगला झाला. आता सकाळ झाली आहे, असे जाणून रोझिनांटचे पाय मोकळे करण्याची आणि आपला पायजमा चढविण्याची वेळ आली आहे, असे सँकोने पाहिले. या दोन्ही गोष्टी त्याने इतक्या सावधगिरीने पार पाडल्या की, त्याच्या धन्याला कसलाही संशय आला नाही. रोझिनांटला स्वतंत्र झाल्याचा इतका आनंद झाला की, तो आपल्या पायाने जमीन उकरू लागला. कारण त्याच्या परवानगीने आम्ही हे सांगतो की, डौलात नाचण्याची किंवा उड्या मारण्याची सवय त्याला नव्हती. आपला घोडा आता चालण्याच्या तयारीत आहे, हा डॉन क्विक्झोट यांना शुभशकुन वाटला— दयाळू दैवाने आपल्याला भावी साहसास सिद्ध राहण्याचा हा इशाराच दिला आहे असे त्यांना वाटले.

आता उषादेवतेने आपला गुलाबी शेला लाजेने लाल झालेल्या आकाशावर पसरला होता आणि निशादेवतेने आपला काळा बुरखा काढून घेतला होता. विश्वातील साऱ्या वस्तू मानवाला दृष्टि-गोचर झाल्या होत्या. आपण उंच अशा चस्टनट झाडाखाली होतो असे डॉन क्विक्झोट यांना आता दिसून आले. त्या झाडाच्या दूरवर पसरलेल्या जाड फांद्यामुळे त्या स्थानावर भीषण छाया पसरली होती. पण त्या सतत होणाऱ्या आघातांचा दुःखद आवाज कोठून येत होता, हे काही अजून त्यांच्या लक्षात आले नाही. ते शोधून काढण्याचा निश्चय करून त्यानी सँकोचा निरोप पुनः एकदा घेतला. निघताना त्यानी त्याला पूर्वीच्याच सूचना दिल्या. त्यात भर म्हणून त्यांनी सँकोला सांगितले, “अरे, आपल्या सेवेचा मोबदला काय मिळेल, याची चिंता तू करु नकोस कारण, मी माझ्या मृत्युपत्रात त्याची व्यवस्था केलेली आहे. मी घर सोडण्यापूर्वी दूरदर्शीपणाने एक व्यवस्था-पत्र करून ठेवले आहे. पण जर या संकटातून मी विजयी होऊन बाहेर पडलो, तर मी वचन दिलेले बेट आपल्याला मिळेल, अशी अपेक्षा तू खचित धर. ते बेट मिळाल्याने तू संतुष्ट होशील.” आपल्या धन्याचे हे हळुवार उद्गार ऐकून सँकोला रडू आवरले नाही. धन्याचा हा पराक्रम पूर्ण होईपर्यंत त्याला आपण सोडावयाचे नाही, असा सँकोने निश्चय केला. त्याच्या त्या उदात्त निश्चयावरून आणि तीव्र चिंतेवरून

या इतिहास-लेखकाचे अनुमान असे आहे की, तो चाकर एका कुलीन घराण्यात जन्मास आलेला होता- निदान जुन्या खिस्ती आई-बापांचे पोटी तो आलेला होता. (स्पेनमध्ये असलेल्या यहुदी किंवा मूर कुटुंबातील तो नव्हता. ) त्याच्या सुस्वभावामुळे त्याच्या धन्याचे हृदय भरून आले. ही आपली भावना व्यक्त करण्यास डॉन क्विक्झोट तयार नव्हते. सारे कोमल विचार झाडून टाकण्याची ती वेळ होती. कारण जेथून त्या आघातांचा आणि पाण्याचा आवाज येत होता, तिकडे कूच करण्यासाठी ते आपल्या घोड्यावरून निघाले होते. तेव्हा सँको त्यांच्या पाठोपाठ निघाला. आपल्या सुखदुःखांच्या क्षणी आपला जिगरदोस्त असलेल्या गाढवाचा लगाम हाती धरून तो रखडत चालला.

चेस्टनट वृक्षांच्या सुखद छायेखाली बरेच अंतर चालून गेल्यानंतर ते दोघे एका कुरणात आले. त्याच्याजवळ काही खडक होते आणि त्यांच्या माथ्यावरून मोठा धबधबा वाहात होता. त्या खडकांच्या पायथ्याशी त्यांना काही ओबडधोबड इमारती दिसल्या. ती राहण्याची घरे असावीत, असे दिसत नव्हते-पडलेल्या घरांचे अवशेष वाटत होते. आघातांचा जो भयप्रद आवाज अजून ऐकू येत होता, तो त्या इमारतींतूनच निघत होता. त्यांच्याजवळ ते जेव्हा गेले, तेव्हा त्या भयप्रद आवाजामुळे शांत रोझिनांटसुद्धा दचकला. पण त्याच्या धन्याने त्याला शांत केले व धीर दिला, आणि मग तो घोडा थकलेल्या पावलांनी हळूहळू त्या इमारतीजवळ जाऊ लागला. हा सर्व प्रवास चालू असताना, आमचे शिलेदारजी आपल्या हृदयस्वामिनीची-डल्सिनियाची-अत्यंत भक्ति-भावाने आळवणी करीत होते, आणि मधून मधून ईश्वराची प्रार्थना करणारे छोटे छोटे उद्‌गार काढीत होते. सँको आपल्या धन्याला बिलगला होता. रोझिनांटला कशाचे भय वाटले, हे शोधून काढण्यासाठी तो त्याच्या तंगड्यांमधून एकसारखा डोकावून पाहात होता. थोडे अंतर चालून गेल्यावर एका खडकाला वळसा घालताच त्यांना असे स्पष्ट दिसले की, (प्रेमळ वाचका, हे नीट समजून घेण्यास चुकू नकोस.) कापडखळणीच्या गिरणीतील सहा मोठमोठे हातोडे कापडाच्या अनेक तुकड्यांवर आलटून-पालटून आदळत होते, आणि त्यातून तो भयप्रद आवाज निघत होता. आदले दिवशीच्या रात्री डॉन क्विक्झोट यांना चिंता वाटावयास लावणारा आणि सँकोला उपद्रव देणारा जो आवाज होता, त्याचे मूळ हे.

ते अनपेक्षित दृश्य पाहून डॉन क्विक्झोट स्तिमित झाले. शरमेने व गोंधळाने ते आपल्या घोड्यावरून खाली पडण्याच्या बेतात होते. सँको त्यांचेकडे टक लावून पाहू लागला, तेव्हा खाली डोके लववून व खिन्न-उद्विग्न मुद्रेने उभे असलेले ते त्याला दिसले. भयंकर निराशेने गळून गेलेल्या माणसाप्रमाणे ते दिसत होते. त्याच वेळी क्विक्झोट यांनी सँकोकडे पाहिले, तेव्हा त्याला हसू फुटत आहे अन् त्यामुळे त्याचे गाल फुगलेले आहेत, असे त्यांना आढळले. तेव्हा त्या त्रस्त मनःस्थितीतही त्यांना स्वतःला हसू आवरेना. आणि गंमत ही की, आपला धनी हसतो आहे, हे पाहून सँकोने आपल्या आनंदाला तत्काळ वाट करून दिली आणि तो खो खो करून हसू लागला.

इतका की, आपल्या दुखऱ्या बरगड्या मोडू नयेत म्हणून, त्याला आपल्या दोन्ही हातांनी आपली कमर घट्ट धरून ठेवावी लागली. चार वेळा तो हसण्याचे थांबला आणि चार वेळा त्याला अनावर हास्य फुटले. तेव्हा मात्र या त्याच्या उद्धटपणाचा क्विक्झोट यांना मोठा संताप येऊ लागला—आणि तो संताप वाढला सँकोच्या चेष्टेने ! तो आवाज प्रथम कानी पडला तेव्हा क्विक्झोट यांनी जे ऐटदार भाषण केले होते, त्यातील काही भागाचा शब्दन्‌शब्द उच्चार सँकोने, जणू काही त्यांची मस्करी करण्यासाठी, पुनः केला. ते शब्द म्हणजे, "सँको, ध्यानात ठेव. सुवर्ण-युग पुनः प्रस्थापित करण्यासाठी या लोह-युगात मी जन्मास आलो आहे. अत्यंत भयप्रद व वैभवशाली पराक्रमाचे प्रसंग दैवाने ज्याच्या-साठी राखून ठेवले आहे, तो मानव मी इ. इ. इ...." असे तो बोलत सुटला.

त्याच्या या औद्धत्यामुळे त्याचा धनी त्याच्यावर भयंकर खवळला आणि त्याने आपल्या भाल्याचे दोन तडाखे त्याच्या खांद्यावर दिले. ते त्याच्या डोक्यावर पडले असते तर नंतर त्याला वेतन देण्याची कटकट डॉन क्विक्झोट यांना पडली नसती; मग त्याच्या वारसांचे त्यांनी पाहून घेतले असते. आपली चेष्टा मालकांनी मनाला लावून घेतली, हे पाहून सँकोने अत्यंत नम्रतेने त्यांची क्षमा मागितली व म्हटले, "महाराज, माझ्यावर दया करा. माझी हाडे शिल्लक ठेवा अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. आपल्याला दुखविण्याचा माझा उद्देश नव्हता. मी थोडीशी गंमत केली इतकेच !" तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, "तू गंमत करतोस पण मी करीत नाही. अरे विदूषका, इकडे ये. माझी मस्करी करण्याची बतावणी करतोस काय ? तर मला सांग, हे भयंकर विघ्न आता खोटे ठरले असले तरी, ते खरे असते तर त्याचा विध्वंस करण्याचा चंग मी बांधला नव्हता काय ? अरे, मी शिलेदार असलो तरी यंत्राच्या प्रत्येक आवाजाचा अर्थ मला समजलाच पाहिजे, आणि आवाजा—आवाजातील फरक मला कळलाच पाहिजे, असे थोडेच आहे ? शिवाय कापड भिजवून—बडवून खळीने जाड करणारी गिरणी मी यापूर्वी कधीच पाहिली नव्हती. तू तर हलकट, बदमाश आहेस. त्यामुळे, अशा काबाडकष्टाच्या क्षुद्र यंत्रांच्या परिसरात तू जन्मला आहेस—वाढला आहेस. पण हे सहा हातोडे राक्षसांचे रूप घेऊ देत आणि माझ्यावर एकामागून एक—किंवा सारे एकदम—तुटून पडू देत. मग मी त्यांना माझ्या पायाशी उताणे पाडतो की नाही हे पाहा. तसे मी न केले तर तुझ्या मर्जीप्रमाणे हवी तितकी आचरट वटवट करण्याची मुभा मी तुला देईन."

सँको म्हणाला, "महाराज, शांत व्हा. अधिक काही बोलू नका, अशी प्रार्थना आहे. मी चेष्टा फार ताणली, हे मला कबूल आहे. आता साऱ्याला 'आळीमिळी गुपचिळी.' पण आपण अत्यंत खेदाने मला कृपया हे सांगा की, अशा सर्व संकटांतून त्वरेने पार पडून, सुखरूप नि सुरक्षित राहण्याची आपण आशा धरता हे ठीक आहे. पण आपण—म्हणजे मी—काल ज्या भीतीच्या मनःस्थितीत होतो, ती आपल्या लोकांना चेष्टा करण्यास चांगला विषय वाटेल की नाही ?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "वाटेल,

मान्य करतो. पण मी ती लोकांना सांगणार नाही. कारण साऱ्या गोष्टी ज्या पाहावयास हव्यात, तशा पाहण्याइतका विवेक सामान्य लोकांना नसतो. कोणत्या ा कोणते स्थान द्यावे हे त्यांना कळत नाही." तेव्हा सँको म्हणाला, "मी ़ वतीने सांगेन की, कोणतीही गोष्ट योग्य ठिकाणी कशी ठेवावी हे आपण जाणता— डोक्यावर वार करण्याचा आपला हेतू असताना आपण तो माझ्या खांद्यावर मी जर एका बाजूस झुकलो नसतो तर मी छानदार अवस्थेत असतो! पण ते ग्रा. ते सारे धुऊन जाईल. माझी आजी म्हणत असे 'जो माणूस तुम्हाला ाे, त्याचे तुमच्यावर खरे प्रेम असते.' चांगले धनी काही वेळा आपल्या नोकर-वर खेकसत असतात. पण तसे दोन–चार कठोर शब्द उच्चारल्याबरोबर ते त्याला ा जुना पायजमाही बक्षिस देतात. मग त्यांनी नोकराला मारपीट केली तर ते काय हे देव जाणे. मला माहीत आहे ते इतकेच की, चाकराच्या तळपायावर फटके ानंतर शिलेदार आपल्या चाकराला एखादे बेट बहाल करतात किंवा मुख्य-तील एखादे जुने–पुराणे राज्य बक्षिस देतात."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, तू जे जे म्हणतोस, ते सर्व घडून यावे, अशी दैव करीलही. म्हणून सँको, माझ्या कठोरपणाचा तू यापुढे मुळीच विचार करू , अशी माझी तुला प्रार्थना आहे. कोणताही मनुष्य आपल्या भावनांचा पहिला आपल्या ताब्यात ठेवू शकत नाही, हे तू जाणतोस. उलट, मी तुला असा सल्ला की, भविष्यकाळाविषयी इतकी चिंता करू नकोस आणि माझ्याशी इतकी सलगी कोस. सेवकाला ते शोभत नाही. शिलेदारीचे इतके ग्रंथ मी वाचले, पण त्या ध्ये मला असे कोठेही आढळले नाही की, माझ्याशी बोलताना तू जितका आगाऊ-रतोस तितका कोणत्याही चाकराने कधी केलेला आहे. आपणा उभयतांचा तो दोष आहे, असे मी खरोखर मानतो. तुझा दोष असा की, तू माझा अनादर ा, आणि माझा दोष असा की, मी स्वतःला अधिक आदरणीय करीत नाही. ा अॅमॅडिस याचा नोकर गँडॅलिन हा एका बेटाचा पक्क्या मालकीने सरदार होता. ो आपल्या धन्याशी हातात टोपी घेतल्याशिवाय, आपली मान लववल्याशिवाय आपले शरीर निम्मे वाकविल्याशिवाय, कधी बोलत नसे. तुर्की लोकांची ही ोची तऱ्हा असे. पण, डॉन गॅलोर यांचा चाकर गॅसाबाल याच्याविषयी आपण काय ? कोणालाही नवल वाटावे इतका तो मितभाषी असे. तो कडकडीत मौनच पाळीत धन्य तो! त्या शिलेदाराच्या अधिकृत, प्रचंड इतिहास–ग्रंथात, त्याचे नाव एकदा आले आहे. सँको, या सर्वांवरून तू हे ध्यानी घ्यावयास हवे की, धनी क, शिलेदार व नोकर, यांमध्ये काही अंतर राहिलेच पाहिजे. म्हणून मी तुला एकदा सांगतो की, यापुढे आपण आपापल्या प्रतिष्ठेनुसार भाव राखून एकत्र राहू आणि या बाबतीत एकमेकांना अधिक त्रास देण्याचे टाळू या. कारण काही झाले आपणा दोघांमध्ये केव्हाही मतभेद झाले तर त्यामुळे तुझेच नुकसान नेहमी

होणार. आता तुला बक्षिसे देण्यासंबंधी मी जे वचन दिले, त्यासंबंधी मी इतकेच सांगतो की, ती बक्षिसे तुला योग्य वेळी मिळतील. त्या बाबतीत तुझ्या पदरी निराशा आली तरी, मी सांगितल्याप्रमाणे तुला तुझे वेतन मिळेलच, यावर विश्वास ठेव."

हे ऐकून सँको म्हणाला, "आपण फार चांगले सांगितले. पण महाराज, ती बक्षिसे मिळाली नाहीत आणि मला माझ्या वेतनालाच चिकटून राहणे भाग पडले, तर प्राचीनकाळी शिलेदाराच्या नोकराला काय मिळत असे, हे जाणण्याची माझी इच्छा आहे. त्या नोकरांना मासिक वेतन मिळे की आपल्या मजुरांप्रमाणे प्रत्येक दिवशी रोज मिळे?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "ते रोजंदारीने राहात असत, असे मला वाटत नाही. आपल्या धन्याच्या औदार्यावर ते विश्वास ठेवीत असत. मी माझे जे मृत्युपत्र सीलबंद करून माझ्या घरी ठेवले आहे, त्यात तुझ्या वेतनाची तरतूद केलेली आहे. तिचा हेतू, तुझे नुकसान होऊ नये, एवढाच. या भ्रष्ट कालात, मला शिलेदारीत किती यश मिळेल हे मला माहीत नाही. तुझ्या वेतनासारख्या क्षुद्र गोष्टीसाठी माझा आत्मा परलोकात तडफडत राहावा, अशी माझी इच्छा नाही. शिलेदाराच्या जीवनात जितकी संकटे असतात, तितकी दुसऱ्या कोणाच्याही वाट्यास येत नाहीत." सँको म्हणाला, "शक्य आहे. एका कापडखळणीच्या गिरणींतील केवळ आवाजाने आपल्यासारख्या शूर शिलेदाराचे हृदय किती त्रस्त व संतप्त झाले! पण मी आपल्याला खात्रीने सांगतो की, आपल्या कृत्यांची चेष्टा करण्यासाठी किंवा काही बडबडण्यासाठी मी माझे तोंड यापुढे उघडणार नाही. माझे प्रभू आणि स्वामी म्हणून मी आपल्याला सदैव मान देईन. आणि आपला दरारा मनी बाळगूनच मी नेहमी आपल्यापुढे उभा राहीन." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "असे केलेस तर तू या पृथ्वीतलावर दीर्घकाल जगशील कारण, आपल्या माता-पित्याच्या खालोखाल आपण आपल्या मालकांना मान दिला पाहिजे—जणू ते आपले वडीलच असल्यासारखा."



## प्रकरण ७

# आमच्या अजिंक्य शिलेदाराने मँब्रिनोचे शिरस्त्राण मोठया धडाडीने जिंकून घेतले, त्या अचाट पराक्रमाचे आणि तशाच इतर घटनांचे वर्णन.

त्याच वेळी पाऊस पडू लागला. सँकोने त्या कापडखळणीच्या गिरणीत आनंदाने आश्रय घेतला असता. पण त्या गिरण्यांनी आपल्याला शरम आणली, म्हणून डॉन क्विक्झोट यांच्या मनात त्यांच्याविषयी इतके वैमनस्य निर्माण झाले होते की, तेथे जाण्यास त्यांचे मन कोणीही वळवू शकला नसता. उजव्या बाजूस वळले असता, त्यांना एक राजमार्ग अकस्मात दिसला. त्या मार्गाने ते फार दूर जाण्यापूर्वीच त्याना एक घोडेस्वार आढळला. त्याच्या मस्तकावर सोन्याप्रमाणे चकाकणारी एक वस्तू होती. तो दृष्टीस पडतो न पडतो, तोंच डॉन क्विक्झोट आपल्या नोकराला ओरडून म्हणाले, "सँको, कोणतीही म्हण खोटी नसते असा माझा विश्वास आहे. त्या म्हणी म्हणजे अनुभवांच्या खाणी—सर्व शास्त्रांच्या जननी. उदाहरणार्थ, 'जेव्हा एक दार बंद होते, तेव्हां दुसरे उघडते,' ही म्हण पहा. काल रात्री आपल्या नशिबाने आपल्याला पराक्रमाच्या संधीचा आभास उत्पन्न करून फसविले, तर आज सकाळी त्याची भरपाई करण्यासाठी नशिबाने पराक्रमाची एक खरी संधी आपल्यापुढे उभी केली. सँको, अशा संकटाचे वेळी मी जर उत्तुंग यश मिळविले नाही, तर माझ्या निराशेला अज्ञात आवाज, रात्रीचा अंधार किंवा दुसरे काही निमित्त मी सांगू शकणार नाही. सारांश, मँब्रिनोचे सोनेरी शिरस्त्राण आपल्या मस्तकी धारण करून समोरून एक माणूस येत आहे, असा पूर्ण संभव आहे. मी कोणते व्रत घेतले आहे, हे तुला माहीत आहे." तेव्हां सँको म्हणाला, "महाराज, आपण म्हणता याचा विचार करा आणि काय करता याची काळजी घ्या. माझे प्रेत आणि माझा मेंदू त्या गिरणीतील हातोड्याने ठोकला–कुटला–तिंबला, तरी ते मला चालेल." डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, "मूर्ख माणसा, थांब. शिरस्त्राण आणि खळीची गिरणी यात काहीच फरक नाही का?" पण सँको म्हणाला, "ते मला माहीत नाही. पण माझ्या सवयीप्रमाणे मला जर मनमोकळेपणाने बोलण्याची मुभा असेल, तर मी आपल्याला अशी मुख्य कारणे देईन की, आपला तर्क चुकला हे तुमचे तुम्हालाच पटेल."

"अरे, तू तर पक्का पाखंडी! मी चुकेन कसा? करड्या रंगाच्या घोड्यावर स्वार

होऊन आणि मस्तकी सोन्याचे शिरस्त्राण धारण करून तो सरदार थेट आपल्याकडे येत आहे, हे तुला दिसत नाही काय?" डॉन क्विक्झोट यांनी विचारले. तेव्हा सँकोने उत्तर दिले, "मला जे दिसते, ते मी पाहतो. माझ्या गाढवासारख्याच दुसऱ्या करड्या गाढवावर बसून कोणी एक माणूस येत असलेला मी पहात आहे. त्याच्या डोक्यावर चकाकणारी काही वस्तू आहे, एवढेच." डॉन क्विक्झोट उत्तरले, "ते मॅब्रिनोचे शिरस्त्राण आहे असे मी तुला सांगतो. तू जरा दूर उभा रहा आणि त्याच्याशी सामना करण्यास मला मोकळा सोड. व्यर्थ बडबड करण्यात एक क्षणही वाया न घालविता, मी या संकटावर मात करीन आणि मला हवे असलेले ते शिरस्त्राण मी बळकावीन, हे तू पाहशीलच." तेव्हा सँको म्हणाला, "मी दूर उभा राहतो याची आपण खात्री बाळगा. पण ही घटना म्हणजे दुसरी चकमक किंवा कापड-गिरणीसारखे प्रकरण होणार नाही, अशी मी आशा करतो." हा त्याचा टोमणा ध्यानी घेऊन डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, त्या गिरणीचे नाव काढू नकोस, म्हणून मी तुला यापूर्वीच बजावले नाही काय? आणखी एकदा ते नाव घेण्याचे-नव्हे, मनात आणण्याचे-धाडस तू कर की मी अशी शपथ घेतो की-पण मी अधिक काही बोलत नाही. मी तुझी कणिक चांगलीच तिंबेन, एवढेच सांगतो." या धमक्यांमुळे सँकोच्या तोंडाला एकदम कुलूप बसले. कारण आपल्या हाडांचा बळी देऊन आपल्या मालकाने आपली शपथ पूर्ण करावी, अशी सँकोची इच्छा नव्हती.

या प्रकरणातील सत्य असे होते--देशाच्या त्या विभागात दोन खेडी होती. त्यांपैकी एक इतके लहान होते की, तेथे एकही दुकान नव्हते की एकही न्हावी नव्हता. त्यामुळे मोठ्या खेड्यातील न्हावी लहान खेड्यातील लोकांच्याही उपयोगी पडे. आता आता एकदा काय झाले, एका माणसाची दाढी करावयाची होती. म्हणून हा न्हावी तिकडे निघाला. त्यावेळी त्याने आपल्या डोक्यावर पितळेचे पातेले घातले होते, आणि त्याखाली आपली टोपी ठेवली होती. ते पातेले नवे कोरे होते-पावसाने खराब झालेले नव्हते-उलट, ते नुकतेच घासून-पुसून स्वच्छ केलेले होते. म्हणून त्याचा चकचकाट दूरपर्यंत दिसत होता. तो न्हावी करड्या रंगाच्या गाढवावर बसून चालला आहे, हे सँकोने नीट न्याहाळून पाहिले होते. पण डॉन क्विक्झोटची विपर्यस्त बुद्धी प्रत्येक वस्तूवर रहस्याचा रंग चढवीत असे. त्यामुळे त्यांना ते गाढव म्हणजे करडा अश्वराज, तो न्हावी म्हणजे शिलेदार आणि त्याचे पितळेचे पातेले म्हणजे सोन्याचे शिरस्त्राण वाटले. म्हणून तो बिचारा काल्पनिक शिलेदार जवळ येतो आहे असे दिसताच डॉन क्विक्झोट यांनी आपला भाला-किंवा शूल—आपल्या मांडीवर टेकला. आपल्या मूर्ख शत्रूशी वाटाघाटी करण्यासाठी क्षणभरही न थांबता, ते रोझिनांट नेईल तितक्या जलद दौडीने त्या न्हाव्यावर तुटून पडले, आणि त्याचे सर्वांग रक्तबंबाळ करण्याचा त्यांनी निर्धार केला. ते गरजले, "दुष्टा, हलकटा! आपला बचाव कर. नाही तर ताबडतोब मला शरण ये. तुझ्या शरणागतीवर माझा हक्क आहे!"

बिचारा न्हावी आपल्या वाटेने शांतपणे चालला होता. त्याला एकदम दिसले की, एक भयानक भूत गर्जना करीत आपल्यावर धावून येत आहे. त्याचा भाला आपल्या देहातून आरपार जाऊ नये म्हणून त्याने आपल्या गाढवावरून जमिनीवर उडी टाकली. दुसरे काय करू शकणार होता तो ? मग घाईघाईने तो उठला आणि पाठीला पाय लावून पळत सुटला. आपले गाढव–आपले पातेले–सारे काही मागे टाकून, वाऱ्यापेक्षाही अधिक वेगाने तो शेतातून धावत सुटला. तेव्हा रणक्षेत्राचे आणि त्या पातेल्याचे स्वामी आपण आहो, असे पाहून डॉन क्विक्झोट ओरडले, "दुष्टा ! तू आपले शिरस्त्राण टाकून दिलेस, हा तुझा शहाणपणाच होय. शिकाऱ्यांनी जोराने पाठलाग सुरू केल्याचे पाहून, एखादा बीव्हर आपले प्राण वाचविण्यासाठी आपली शेपटी आपल्या दातांनी कुरतडून कापून टाकतो. कारण, त्या शेपटीसाठीच आपला पाठलाग होत आहे, हे त्याला उपजत बुद्धीने कळते. त्याचे शहाणपण तुझ्या अंगी आहे, हे मला दिसून आले." ते शिरस्त्राण उचलून घेण्याची आज्ञा त्यांनी सँकोला केली. तेव्हा सँको ते शिरस्त्राण हाती घेऊन म्हणाला, "हे पातेले मुद्दाम बनविलेले दिसते. त्याची किंमत जबर असली पाहिजे." असे म्हणून त्याने ते पातेले आपल्या धन्याच्या हाती दिले. त्यांनी तत्काळ ते आपल्या डोक्यावर चढविले. त्याचे टोक कुठे आहे, हे पाहण्यासाठी त्यांनी ते मागेपुढे वळविले. पण त्याला टोक कोठले असणार ? म्हणून शेवटी ते म्हणाले, "हे प्रख्यात शिरस्त्राण ज्या नास्तिकासाठी प्रथम बनविले असेल, त्याचे डोके प्रचंड आकाराचे असले पाहिजे हे खचित. पण त्याचा अर्धा भाग हरवलेला दिसतो, हे वाईट आहे." आपला मालक न्हाव्याच्या पातेल्याला शिरस्त्राण म्हणतो, हे ऐकून सँकोला हसू आल्याशिवाय राहिले नाही. त्याला जी गंमत वाटली, तिच्यामुळे तो खो खो करून खचित हसला असता. पण भीतीने त्याची सारी गंमत उडवून लावली होती. डॉन क्विक्झोट ओरडले, "मूर्खा, आता का दात विचकतोस ?" तेव्हा सँको म्हणाला, "न्हाव्याच्या पातेल्याप्रमाणे नक्की दिसणारे हे शिरस्त्राण जो धारण करीत असेल, त्याचे डोके किती अवाढव्य असेल, या विचाराने मला हसू येत आहे."

डॉन क्विक्झोट तर्क करीत म्हणाले, "हे जादूचे शिरस्त्राण, काही विलक्षण योगायोगाने, कोणा तरी माणसाच्या हातात पडले असावे, आणि त्याला त्याची किंमत न कळल्याने थोड्याशा द्रव्यासाठी त्याने त्याचा अर्धा भाग वितळविला असेल. ते सोन्याचे असल्यामुळे त्यातून त्याला चांगले पैसे मिळाले असतील. शिरस्त्राणाच्या उरलेल्या अर्ध्या भागाचा हा टोप बनविला असावा आणि तू म्हणतोस त्याप्रमाणे न्हाव्याच्या पातेल्यासारखे ते दिसत असावे. पण त्याचे खरे महत्त्व मला कळते. रूपांतराला माझ्या दृष्टीने काही महत्त्व नाही. शस्त्रे घडविणारा माणूस ज्या शहरात आहे, तेथे जर मी गेली, तर मी त्याचे रूप तावडतोब इतके पालटीन की, शिल्पाच्या देवाने युद्ध–देवासाठी जे शिरस्त्राण बनविले असेल तेही याच्यापुढे कःपदार्थ ठरेल. तसे होईपर्यंत ते आहे तसेच मी धारण करतो. डोक्यावर काहीच आच्छादन नसण्यापेक्षा

हे बरे. त्यामुळे निदान माझ्या डोक्याचा धोंड्यांच्या वर्षावापासून बचाव तरी होईल."

सँको म्हणाला, "होईल, होईल, तसा उपयोग होईल. मात्र ते धोंडे गोफणीतून फेकलेले नसावेत. दोन सैन्यांच्या लढाईत गोफणीतून दगड आल्यामुळे ते आपल्याला लागले आणि आपल्या दाढेला नम्र स्पर्श करून गेले. आपल्या कानाजवळील भांडे त्या दगडामुळे फुटले. माझे सारे पोट ढवळून काढणारे ते दिव्य रसायन आपण त्या भांड्यात ठेवीत होता." डॉन क्विक्झोट म्हणाले, "खरे आहे ते. तेव्हा माझे मौल्यवान रसायन नष्ट झाले. पण त्याबद्दल मला फार हळहळ वाटत नाही. कारण त्या रसायनाची घटक-द्रव्ये माझ्या स्मृतीमध्ये आहेत, हे तू जाणतोस." तेव्हा सँको म्हणाला, "मलाही ती द्रव्यें माहीत आहेत आणि जोपर्यंत माझ्या शरीरात श्वास आहे, तोपर्यंत ती माझ्या आठवणीत राहतील. पण जर कधी काळी मी त्या द्रव्यांचे रसायन पुनः बनविले किंवा चाखले, तर मात्र माझी धडगत नाही. शिवाय त्याचा उपयोग करण्याची पाळी येईल, असे कांहीही कृत्य करण्याचा माझा इरादा नाही. माझ्या पंचेंद्रियाच्या साक्षाने मी असा ठाम निश्चय केला आहे की, आपण कोणाला दुखापत करावयाची नाही आणि दुसऱ्या कोणाकडून करून घ्यावयाची नाही. आता घोंगडीमध्ये उडविले जाण्यासंबंधी मला काही म्हणावयाचे नाही. कारण अशा अपघातावर शांतपणाशिवाय दुसरा तोडगा नाही असे मला वाटते. म्हणून पुनः तसा भोग माझ्या वाट्यास आला तर मी माझे खांदे उंच करीन, माझा श्वास रोखून धरीन आणि माझे डोळे घट्ट मिटून अत्यंत आनंदात राहीन—मग ते घोंगडे आणि माझे नशीब मला जगाच्या अंतापर्यंत खेळविनात का!"

डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, खरोखर मला असे भय वाटते की, तू काही चांगला खिश्चन नाहीस— आपल्याला झालेले अपाय तू कधीच विसरत नाहीस. क्षुद्र गोष्टीकडे लक्ष न देणे हा उदात्त नि उदार माणसांचा स्वभाव असतो, हे मी तुला सांगतो. अरे, तुझा पाय काय लंगडा झाला आहे? तुझी कोणती बरगडी मोडली आहे? आणि तुझ्या कवटीचा कोणता भाग दुखावला गेला आहे? त्या गमतीच्या प्रकाराचा विचार करताना तुझ्या मनात तेढ का उत्पन्न होते? अखेरीस ती सारी गंमत होती—निरुपद्रवी करमणूक होती. मी जर तसे मानले नसते, तर त्या जागी मी यापूर्वीच गेलो असतो आणि आपल्याला तेथे भोगाव्या लागलेल्या आपत्तींचा सूड म्हणून मी चांगलीच गडबड उडवून दिली असती. प्राचीन काळी सर्व जगात सुविख्यात असलेली सौंदर्यशालिनी हेलेन हिला डांबून ठेवल्याबद्दल संतप्त ग्रीक लोकांनी ट्रॉय येथे जी धाम-धूम केली, तिच्यापेक्षा मी अधिक गडबड करून दाखवली असती. हेलेन सांप्रतकाळी विद्यमान असती किंवा तिच्या काळी डल्सीनिया जिवंत असती तर माझ्या स्वामिनीच्या लावण्यपूर्ण दर्शनाने आपले सौंदर्य पराभूत झाल्याचे तिला आढळले असते." असे म्हणून त्यांनी एक खोल सुस्कारा सोडला. तेव्हा सँको म्हणाला, "ठीक, ठीक. पण मी जुन्या जखमा उकरीत नाही. एक गंमत म्हणून मी ते सारे सोडून देतो. कारण त्यात

खरोखर सूड घेण्यासारखे काही नाही. पण करड्या रंगाच्या गाढवासारख्या दिसणाऱ्या या घोड्याचे आपण काय करावयाचे ? त्या भुताने हे घोडे येथे सोडले असावे आणि त्याने कोठेही जावे असे त्याला वाटत असावे. घोड्यासाठी तो परत येईल असे मला वाटत नाही. हा करडा प्राणी विशेष योग्यतेचा आहे असे मी दाढीशपथ सांगतो."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "ज्यांना मी जिंकतो, त्यांना लुटण्याचा माझा शिरस्ता नाही. आम्हा शिलेदारांचा तसा शिरस्ता कधीच नसतो. आपण ज्याचा पराभव केला त्या शत्रूचा घोडा विजयी वीराने घ्यावा आणि त्या शत्रूला पायी जाऊ द्यावे– असा शिलेदारांचा शिरस्ता नाही. युद्धात त्या वीराचा घोडा गारद किंवा घायाळ झाला तर गोष्ट वेगळी! म्हणून सँको, तो घोडा– किंवा गाढव— तुझ्या इच्छेप्रमाणे तू त्याला काहीही म्हण— तू सोडून दे. आपण येथून निघून गेल्याचे पाहताच घोड्याचा मालक त्याच्यासाठी येथे खात्रीने येईल." सँको म्हणाला, "ते घोडे आपल्याबरोबर घेऊन जावे– निदान माझ्या भिकार गाढवाशी त्याची अदलाबदल करावी, असे माझ्या मनात फार फार आहे. माणसाने एक गाढव देऊन दुसरे बदलून घेऊ नये, असे शिलेदारीचे नियम कडक आहेत काय ? निदान खोगीरांची अदलाबदल करण्यास तरी मला त्या नियमाप्रमाणे मुभा मिळेल, अशी मला आशा आहे." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "तुझ्या या शेवटच्या कलमासंबंधी काय नियम आहे, हे मला नक्की माहीत नाही. म्हणून सँको, मला अधिक माहिती मिळेपर्यंत, तुला जर सबळ कारण असेल तर खोगिरांची अदलाबदल करण्यास मी तुला मुभा देतो." सँको म्हणाला, "व्वाः! माझे कारण सबळ आहे. मला स्वतःसाठी तरी ते खोगीर निकडीने हवे आहे." म्हणून आणखी काही बडबड न करता, आपल्या धन्याच्या अनुज्ञेने, त्याने सामानाची अदला-बदल केली आणि त्यामुळे त्याचा लाभच झाला—हलक्या मालाबदली चांगला मिळाला.

हे झाल्यानंतर, त्यांनी रात्रीच्या जेवणातील उरलेल्या खाद्यपदार्थांनी आपली न्याहारी भागविली, आणि कापड खळीच्या गिरण्या चालविणाऱ्या ओढ्यावर जाऊन आपली तहान भागविली. त्या गिरण्यांकडे नजर न टाकण्याची काळजी त्यांनी घेतली, कारण त्या गिरण्यांचा नुसता विचार करणेही त्यांना नकोसे वाटत होते. अशा प्रकारे आपले पोट भरल्यावर आणि संतप्त व खिन्न विचार शांत झाल्यावर ते पुनः उठले आणि रोझिनांट नेईल त्या दिशेने जाऊ लागले. आपल्याला कोणत्या रस्त्याने जावयाचे आहे, याचा त्यांनी मुळीच विचार केला नाही. आपल्या धन्याची आणि गाढवाचीही इच्छा घोडा बरोबर जाणत होता. त्याने त्यांना पुनः मोठ्या रस्त्यावर लौकरच आणले. आपण कोणत्या दिशेने चाललो आहो, याचा विचार न करता ते दोघेजण त्या रस्त्याने हळुहळू जाऊ लागले.

अशा प्रकारे ते दुडक्या चालीने चालले असताना सँको आपल्या धन्याला म्हणाला, "धनीसाहेब, आपल्याशी थोडे बोलण्याची परवानगी मला द्याल काय ? मी गप्प बसावे असा कडक हुकूम आपण माझ्यावर बजावला असल्यामुळे माझ्या मनातील

पाच–सात विचित्र कल्पना माझ्या घशात कुजून जात आहेत. आणि आता तर एक कल्पना माझ्या जिभेच्या शेंड्यावर घोळत आहे, ती मी, काही झाले तरी, दाबून टाकणार नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "बोल, बोल, पण थोडक्यात बोल. कोणतेही भाषण लांबलचक झाले म्हणजे ते कोणाला आवडत नाही."

सँकी म्हणाला, "ठीक, ठीक. अलीकडे माझ्या मनात असा विचार येत आहे की, त्या ओसाड अरण्यात विलक्षण प्रदेशात तुम्ही शिलेदारीची कितीही बिकट आणि भयंकर कार्ये सिद्धीस नेली तरी, ती पाहण्याला किंवा ऐकण्याला एकही जिवंत माणूस तेथे असते नाही. मग आपण सैरावैरा भटकून काय उपयोग ? आपले सारे श्रम मातीत मिळाल्यासारखेच आहेत. म्हणून ( महाराजांच्या विवेकबुद्धीला पटले तर ) मी असे म्हणतो की, युद्ध करीत असलेल्या एखाद्या बादशहाच्या किंवा मोठ्या राजाच्या सेवेस आपण सादर झालो, तर ते अधिक चांगले नाही का ? तेथे आपण स्वतः किती शूर आहो–विलक्षण शक्तिमान आणि बुद्धिमान आहो–हे आपण दाखवू शकाल. मग ज्याची सेवा आपण करू त्या स्वामीला आपले पराक्रम दिसून येतील आणि ते आपल्यापैकी प्रत्येकाला, त्याच्या त्याच्या पात्रतेप्रमाणे, बक्षिसे देतील. आपली थोर कृत्ये कधी विसरली जाऊ नयेत म्हणून त्यांची नोंद करणाऱ्या कोणा विद्वानाची गरज आपल्याला भासणार नाही. माझ्या पराक्रमासंबंधी मी काही बोलत नाही. आपल्याबरोबरीने त्यांची नोंद होणार नाही. पण शिलेदारीच्या इतिहासात सेवकाच्या कार्याची दखल जर घेतली गेली, तर माझ्या कार्यांचा उल्लेख खचित होईल, असे म्हणण्याचे धाडस मी करतो."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "खरे आहे, सँको, तुझे म्हणणे. तुझ्या बोलण्यात काही तथ्य आहे. पण पहिली अट ही आहे की, साहसाचे प्रसंग शोधण्यासाठी शिलेदाराने जगाच्या विविध भागात काही काळ घालवून उमेदवारी केली पाहिजे. म्हणजे काही अलौकिक यश मिळवून तो जवळच्या नि दूरच्या देशांमध्ये आपली कीर्ती पसरवील. असे झाले म्हणजे, एखाद्या महान् नृपतीच्या दरबारात गेला असताना त्याचा मोठा सन्मान होईल. कारण त्याची कीर्ती, त्याची दूती म्हणून, त्याच्यापुढे तेथे जाऊन पोचलेली असेल. तो कीर्तिमान शिलेदार राजधानीच्या वेशीपाशी दाखल होताच त्याच्याभोवती त्याच्या चाहत्यांची गर्दी उसळेल आणि ते चहाते त्याच्याकडे बोट दाखवून मोठ्याने उद्गारतील, "पहा, पहा, तो सूर्यचिन्हांकित शिलेदार ! ( किंवा सर्पचिन्हांकित अथवा त्या शिलेदाराने धारण केलेली कोणतीही पदवी ते चहाते उच्चारतील ) याने एकाच सामन्यात अजिंक्य सामर्थ्याचा प्रचंड वीरपुरुष ब्रोकॅब्रुनो याचा पराभव केला आणि इराणच्या मॅमॅलुको या महापुरुषाला बंधमुक्त केले—ज्याला सुमारे नऊशे वर्षे एका मांत्रिकाने कोंडून ठेवले होते." अशा प्रकारे त्याच्या पराक्रमांचे पवाडे ते चहाते उच्चस्वराने सर्वत्र गातात आणि त्याची प्रशंसा शेवटी राजवाड्यापर्यंत जाऊन थडकते. अशा शूरवीराला आपण आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी पहावे अशी इच्छा त्या

देशाच्या राजाला सहजच होते आणि म्हणून तो आपल्या राजवाड्याच्या खिडकीतून त्याला पाहण्यास चुकत नाही. त्या शिलेदाराची शस्त्रे किंवा त्याच्या ढालीवरील आकृती, यावरून राजा त्याला नेमके ओळखील आणि आपल्या जवळच्या लोकांना असे खचित म्हणेल, "सरदार–दरकदारांनो आणि सभ्य गृहस्थांनो, तुमच्यापैकी जे कोणी शिलेदार असतील, त्या सर्वांनी आपल्या दरबारात येणाऱ्या या सर्वश्रेष्ठ शिलेदाराचे स्वागत करण्यासाठी जावे." राजाच्या आज्ञेप्रमाणे ते सर्वजण त्या शिलेदाराची ओळख करून घेण्यासाठी त्वरेने धावत जातील आणि त्याला घेऊन राजवाड्यात येतील. राजवाड्याच्या जिन्याचे मध्यभागी खुद्द राजेसाहेब त्याची भेट घेतील आणि त्या पराक्रमी पाहुण्याला आलिंगन देतील— त्याच्या गालाचे चुंबनही घेतील. नंतर त्या शिलेदाराला आपल्या हाताने धरून राजा त्याला थेट राणीच्या महालात घेऊन जाईल. तेथे राणीजवळ तिची कन्या बसलेली शिलेदाराला दिसेल. ती राजकन्या विश्वाच्या या विशाल परिसरात अत्यंत लावण्यवती आणि अत्यंत गुणवती अशी असेल यात शंका नाही. त्याच वेळी दैवयोगाने असे घडेल की, राजकन्या आणि शिलेदार यांची दृष्टादृष्ट होईल. ते दोघे एक-मेकांना मानव म्हणून न मानता दैवी अवतार मानून एकमेकांचा गौरव करतील. दोघांच्या असामान्य सौंदर्यामुळे ते दोघेही प्रेमाच्या अतूट जाळ्यात सापडतील. आपा-पल्या हृदयातील प्रणयव्यथा प्रगट करण्यासाठी योग्य संधी न मिळाल्यामुळे ते दोघे गोंधळून जातील. यानंतर राजा त्या शिलेदाराला राजवाड्यातील अत्यंत संपन्न अशा महालात घेऊन जाईल हे खास. तेथे शिलेदाराचे चिलखत अंगावरून उतरून सेवकवर्ग त्याला कडेला अर्मिनचे केसाळ मऊ कातडे लावलेला, गर्दलाल रंगाचा शोभिवंत अंगरखा देतील. पोलादी चिलखतामध्ये तो शिलेदार जर इतका डौलदार दिसत होता तर दरबारी लोकांच्या उंची उंची आभूषणांमध्ये तो किती सुंदर दिसेल! रात्र पडल्यावर राजा, राणी आणि राजकन्या यांच्यासमवेत तो भोजन करील. त्यावेळी कोणाच्या लक्षात न येईल अशा बेताने शिलेदाराच्या नेत्रांना मोहिनीच्या सौंदर्याची मेजवानी मिळेल आणि त्याने टाकलेल्या कटाक्षांना तीही तेवढ्याच सावधपणे उत्तर देईल. कारण ती नृपकन्या अत्यंत कलानिपुण आहे असे मी सांगितले आहेच. भोजनानंतर एक विस्मय-कारक दृश्य अनपेक्षितपणे तेथे दिसू लागेल. प्रथम एक कुरूप खुजा माणूस प्रवेश करील आणि त्यानंतर दोन धिप्पाड माणसांच्यामध्ये उभी असलेली एक सुंदर तरुणी दिसेल. पिशाच्चविद्या जाणणाऱ्या एखाद्या प्राचीन काळच्या माणसाने काही एक साह-साची संधी आणलेली असते. ती कामगिरी इतकी कठीण असते की, जो कोणी त्या कामी यश मिळवील, तो अखिल दुनियेत सर्वोत्तम शिलेदार मानला जाईल. इतक्यात राजाच्या मनात येते की, आपल्या सर्व दरबारी लोकांनी ती बहादुरी करून दाखवण्याचा प्रयत्न करावा. तसा प्रयत्न ते करतात पण ते सारे अपेशी ठरतात. यशाचा मान त्या पराक्रमी पाहुण्यासाठी राखून ठेवलेला असतो. इतरांनी जेथे हात टेकले ते कार्य तो पाहुणा सहज लीलेने पार पाडतो. तेव्हा राजकन्येचा आनंद पोटात मावेनासा होतो.

अशा योग्य माणसावर आपण आपल्या प्रेमाचा वर्षाव केला या विचाराने तिला मोठे सुख वाटते. जगात अत्यंत सुखी जीव आपणच आहो, असे ती मानते.

" याचवेळी, सुदैवाने या राजाचे–किंवा बादशहाचे–आपल्याइतक्याच बलाढ्य अशा एका शेजाऱ्याशी युद्ध चालू असते. काही दिवस दरबारात राहिल्यामुळे शिलेदाराला या युद्धाची वार्ता कळते आणि तो राजाची सेवा करण्याची तयारी दाखवितो. राजा ती आनंदाने मान्य करतो. राजाने एवढा महान अनुग्रह आपल्यावर केला हे पाहून शिलेदार त्याच्या हाताचे चुंबन नम्रतेने घेतो. रात्रीच्या वेळी हा प्रेमिक राजकन्येचा निरोप घेतो. त्या दोघांच्या प्रेमाचे संधान जमवून देणारी एक दासी राजकन्येच्या विश्वासातली असते. तिच्या प्रयत्नांमुळे शिलेदार व राजकन्या यांच्या कैक मुलाखती उद्यानामध्ये झालेल्या असतात. त्या उद्यानाकडे आपल्या महालाच्या खिडकीतून नजर टाकीत असलेल्या राजकन्येचा निरोप लोखंडी जाळीजवळ हा प्रेमिक शिलेदार घेतो. शिलेदार सुस्कारे सोडतो आणि राजकन्या बेशुद्ध पडते. तिला शुद्धीवर आणण्यासाठी ती दासी गार पाणी घेऊन येण्यासाठी धावत जाते. तिची फार गडबड उडते. कारण प्रातःकाळचा प्रकाश फाकू लागलेला असतो. त्या प्रकाशात ते दोघे तेथे असलेले लोकांना दिसू नये अशी तिची इच्छा. दिसल्यास राजकन्येच्या प्रतिष्ठेला धक्का पोचेल असे तिला वाटते. शेवटी राजकन्या शुद्धीवर येते आणि त्या लोखंडी जाळीतून आपला सुंदर हात शिलेदाराला चुंबनासाठी देते. तो त्या कमनीय कर—कमलाचे चुंबन हजारवेळा घेतो आणि तसे करीत असताना त्यावर आपल्या अश्रूंचा अभिषेक करीत असतो. विरहाच्या प्राणाघातक काळामध्ये आपण परस्परांना पत्रे पाठवून आपले विचार एकमेकांना गुप्तपणे कसे कळवावेत हे ती दोघे ठरवितात. ' प्रेमिकाच्या वेगाने तू परत ये. ' अशी प्रार्थना राजकन्या त्याला करते आणि तसे करण्याचे अभिवचन शिलेदार देतो आणि त्यासाठी पुनःपुनः शपथा वाहतो व हजारो प्रेमळ शब्दांनी आश्वासन देतो.

आपल्या सर्व प्रियजनांपासून—नव्हे, स्वतःच्या हृदयापासून—स्वतःला तोडून दूर करण्याचा तो घातकी क्षण अखेरीस जवळ आला आहे असे पाहून तो तिच्या हिम–धवल आणि मृदुल हातांचे पुनश्च चुंबन घेऊन आपले प्रेम मोहोरबंद करतो. त्यावेळी त्याचा प्राण ओठापाशी आलेला असतो आणि तो त्याच्या श्वासातून प्रकट होत असतो. त्याचे प्राण तेथेच वास्तव्य करावयास मिळावे म्हणून देहत्याग करण्यास तयार असतात. नंतर ती भयभीत विश्वासू दासी त्याला त्वरेने दुसरीकडे नेते. अशा कठोर वियोगानंतर तो आपल्या महालात परत येतो आणि शय्येवर आपले शरीर झोकून देतो. डोळे मिटले तरी दुःखामुळे त्याला झोप येत नाही. दुसरे दिवशी सूर्योदयाबरोबर तो उठतो आणि राजाराणीचा निरोप घ्यावयास जातो. राजकन्येचाही निरोप धन्यवादपूर्वक घ्यावा अशी त्याची इच्छा असते, पण ती आजारी असल्याचे त्याला सांगण्यात येते. तिच्या आजाराचे कारण आपला विरह हेच असले पाहिजे, असे समजून त्याला इतके दुःख होते की, आपल्या अंतःकरणात जपून ठेवलेले गुह्य प्रकट करण्यास तो तयार होतो. ते

पाहून राजकन्येची सखी तिच्याकडे जाते आणि तेथला वृत्तांत तिला निवेदन करते. तो ऐकून ती सुंदरी शोक करते आणि तिचे सारे शरीर आसवांनी न्हाऊन निघते. राजकन्या सखीला सांगते, " हा देखणा शिलेदार राजघराण्यातील आहे की नाही हे न कळल्याने माझ्या जिवाला घोर यातना होत आहेत. " पण सखी तिला सांगते, " एवढा महान पराक्रम आणि इतकी उदात्त गुणवत्ता विख्यात राजघराण्यातच निःसंशय आढळते. "

हे ऐकून राजकन्या शांत होते आणि तिचे दुःख नाहीसे होते. आपली मुद्रा शांत ठेवण्याचा ती शक्य तितका प्रयत्न करते. नाही तर राजा व राणी यांना आपल्या वृत्तीतील बदलाचे कारण कळून येईल असे तिला वाटते. म्हणून काही दिवसांनंतर ती पूर्वीप्रमाणे लोकांमध्ये वावरू लागते. इकडे शिलेदारजी काही काळ गैरहजर असतात, पण नंतर ते राजाच्या शत्रूंशी भिडून त्यांच्याशी युद्ध करतात आणि त्यांना जिंकून ( किती ती मला माहीत नाही. ) शहरे ताब्यात घेतात. असे किती सामने ते जिंकतात हेही मला माहीत नाही. पण असा विजय मिळवून ते दरबारी परत येतात आणि विजयचिन्हांनी मंडित अशा स्वरूपात आपल्या स्वामिनीपुढे उभे राहतात. पुन्हा पूर्वीप्रमाणे शिलेदार राज-कन्येची भेट गुप्तपणे घेतो. त्या दोघांत असे ठरते की, आपल्या सेवेचे पारितोषिक म्हणून त्याने राजापाशी लग्नासाठी तिला मागणी घालावी, पण त्याचे कुळ माहीत नसल्यामुळे राजा ती मागणी मान्य करणार नाही, तरीही शिलेदार त्या राजकन्येशी लग्न करतो— त्यासाठी तो तिचे गुप्तपणे हरण करतो की दुसरी काही युक्ती योजतो, कोण जाणे ! थोड्याच काळाने राजा या विवाहावर अत्यंत संतुष्ट होतो. कारण हा शिलेदार एका बलाढ्य राजाचा पुत्र आहे असे त्याला आढळून येते. तो राजा कोणत्या देशाचा आहे हे मी सांगू शकत नाही. कारण तो देश नकाशात दाखविलेला नाही असे मला वाटते. काही काळानंतर राजा मृत्यू पावतो आणि राजकन्या त्याची वारस होते. त्यामुळे क्षणा-र्धात आपला शिलेदार राजा बनतो. अशा प्रकारे आपले सौख्य परिपूर्ण झाल्यानंतर त्याच्या मनात विचार येतो की, आपल्या सेवकाला आणि आपल्याला सिंहासनारूढ होण्याचे कामी ज्यांनी ज्यांनी मदत केली, त्या सर्वांना आपण संतुष्ट करावे. म्हणून तो आपल्या सेवकाचे लग्न राजकन्येच्या एका सखीशी लावतो. ती राजकन्येची लाडकी असते आणि तिच्या प्रेम–प्रकरणाची माहीतगार असते. राज्यातील एका अत्यंत थोर सरदाराची ती मुलगी असते. "

सँको म्हणाला, " आतापर्यंत मी असे घडण्याचीच वाट पाहत आहे. माझे तसे कल्याण करा, मग सारे जग खुशाल हात चोळीत बसो. मग मी आपल्याला चिकटून राहीन. आपण वर्णन केलेल्या प्रसंगातील कणन्‌कण खरा होईल आणि महाराजांची स्वारी राजाच्या सिंहासनावर बसेल हे खचित, मात्र त्यासाठी आपण " दुःखी चेहऱ्याचा शिलेदार " हे आपले टोपणनाव पुनः धारण केले पाहिजे. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " सँको, अगदी खरे आहे. अशाच पद्धतीने, पायरी–पायरीने, शिलेदार नेहमी सिंहासनावर आरूढ होण्यास गेलेले आहेत. म्हणून आता आपले मुख्य कर्तव्य हे की,

आपल्या शेजाऱ्याशी युद्ध करीत असलेला आणि सुंदर राजकन्या असलेला असा एखादा महान राजा–मग तो खिश्चन असो किंवा पाखंडी असो–शोधून काढणे. त्याचा तलास करण्यासाठी आपल्याला पुष्कळ वेळ आहे. कारण मी तुला पूर्वीच सांगितले आहे की, आपण राजदरबारी जाण्याचा बेत करण्यापूर्वी अन्यत्र कीर्ती संपादन केली पाहिजे. दुसऱ्याही एका गोष्टीने मी बेचैन आहे. समज, मी माझ्या अतुल्य पराक्रमाने व यशाने ही सारी पृथ्वी माझ्या कीर्तीने व्यापून टाकली आणि एक राजा व एक राजकन्या शोधून काढली तरी माझा जन्म राजघराण्यात झालेला आहे–मग तो सम्राटाच्या चुलत चुलत्याच्या घराण्यात का असेना–असे मी कसे सांगू शकणार ?

" माझ्या सेवेमुळे मी राजकन्येशी विवाह करण्यास योग्य आहे असे जरी राजाला वाटले, तरी मी राजकुलोत्पन्न असल्याची ग्वाही निःशंकपणें दिल्याशिवाय राजा आमच्या विवाहाला संमती देईल अशी आशा धरता येत नाही. म्हणून माझ्या शौर्यामुळे मला जे न्यायाने मिळावयाचे, ते कुलीनत्वाचा शिष्टाचार पाळता न आल्यामुळे, मी गमावून बसेन की काय असे मला भय वाटते. मी एक सभ्य गृहस्थ आहे आणि माझा जन्म एका प्राचीन सुविख्यात कुळात झालेला आहे. दरसाल एकशेवीस क्राऊन देणाऱ्या मालमत्तेचा मालक मी आहे. माझ्या जीवनाचा इतिहास जो कोणी लिहील, तो माझ्या कुलपरंपरेचे वर्णन असे सुरेख करील की, कोणत्या तरी राजाच्या वंशातील मी पाचवा किंवा सहावा पुरुष आहे असे त्या राजाला वाटेल. सँको, जगामध्ये दोन प्रकारच्या कुलपरंपरा असतात. एक परंपरा अशी की, जिच्या वंशजाचा जन्म मोठमोठ्या राजे–महाराजांच्या कुळांत झालेला असतो, पण ते कुळ हळुहळू क्षीण व अप्रसिद्ध होत जाते, आणि पुढील पिढ्यांतील मानसन्मान व मालमत्ता शून्यांशावर पोचते–शंकूच्या अग्राप्रमाणे ते कुळ शेवटी बिंदुमात्र राहते. दुसऱ्या परंपरेतील कुळाचा प्रारंभ सामान्य व क्षुद्र असतो. पण ते हळुहळू चढत जाते आणि शेवटी मनुष्यजातीच्या मोठेपणाचा कळस गाठते. हा बदल इतका विलक्षण आहे की, ज्यांना पूर्वी काही महत्त्व होते, ते आता कःपदार्थ बनतात आणि जे पूर्वी कःपदार्थ होते, त्यांना आता महत्त्व येते. म्हणून कोणी सांगावे, मी एखाद्या सुविख्यात कुळात जन्मला आलेलो असेन. योग्य ती चौकशी केल्यानंतर माझ्या कुळाचा नीट तपास लागेल आणि मग माझा सासरा असणाऱ्या त्या राजाचे समाधान निःसंशय होईल. पण तरीही तो प्रतिकूलच राहिला तरी राजकन्येचे माझ्यावर इतके गाढ प्रेम असेल की, मी एखाद्या हलक्या पाणक्याचा मुलगा असलो तरी, राजाच्या संमतिविना ती माझ्याशी लग्न करील. पण जर आपल्या मानसन्मानाच्या नाजूक कल्पनांमुळे ती आपल्या पित्याच्या इच्छेविरुद्ध जाऊन मला धन्य करण्यास नाराज असेल, तर तिच्या पित्याच्या तावडीतून तिला सक्तीने पळवून नेणे आणि तिला सुखकारक बंधनात ठेवणे हे चुकीचे ठरणार नाही. नंतर तिच्या पित्याने कितीही पाठलाग केला तरी काळ किंवा मृत्यू त्याला पूर्णविराम देतील यात शंका नाही. "

सँको म्हणाला, " वाः ! या तुमच्या विचाराशी चपखल बसणारी एक म्हण बाजारबुणगे म्हणत असतात, ' बळाने जे ये हाता । त्यासाठी लाचार का होता ? ' हीच म्हण अशी असती तर मला बरे वाटले असते – ' कुंपणावरून चोराची उडी, याचनेवर करी कडी. ' आपले सासरे – राजेसाहेब – आपल्याला योग्य मार्गाने आपली कन्या नेऊ देत नसतील, तर आपण तिला घेऊन उघड उघड पळून जावे, असे म्हटल्यावाचून मला राहावत नाही. मला जी अडचण वाटते ती इतकीच की, आपण त्या राजेसाहेबां-बरोबर तह करून मोकळे व्हाल, पण आपल्या बिचाऱ्या सेवकाला अनवाणीच दूरवर चालत जावे लागेल. राणीची ती दासी राणीबरोबरच पळून जाऊन त्या सेवकाची बायको झाली नाही, तर तुम्ही त्याचे ढीग कल्याण केले तरी त्याला त्याचा काय उपयोग ? त्या शिलेदाराने काही गाजावाजा न करता आम्हा दोघांची लग्नगाठ घालून द्यावी हे चांगले. त्यातच त्या सेवकाचे समाधान ! " डॉन क्विक्झोट उत्तरले, " अगदी बरोबर !" सँको म्हणाला, " मग आम्हाला आमची संधी साधू द्या. नंतर जग खुशाल हात चोळीत बसो. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " आपल्या इच्छा दैव पूर्ण करो. जो आपल्यापुरताच विचार करतो तो माणूस तुच्छ होय. " सँको म्हणाला, " तथास्तु ! मी जुन्या खिश्चनांपैकी एक आहे. उमराव होण्याला एवढी लायकी पुरी आहे ! " डॉन क्विक्झोट म्हणाले, " पुरी का ? जास्तच आहे ! तुझा जन्म उच्चकुळात झालेला नसता तरी मी, राजा म्हणून, कुलीनत्वाचा किताब दिला असता. त्यासाठी तुला काही खटपट करावी लागली नसती किंवा माझी रतिमात्र सेवाही करावी लागली नसती–तू एकदा उमराव झाला असतास म्हणजे लोकांनी तुला ' महाराज, महाराज ' म्हटले असते – मग तसे म्हणताना त्यांना कितीही दुःख होईना का. "

सँको म्हणाला, " माझ्या समानतेप्रमाणे मी वागणार नाही, असे आपल्याला वाटते काय ? " डॉन क्विक्झोट म्हणाले, " ' समानते 'प्रमाणे नव्हे, ' गुणवत्ते 'प्रमाणे म्हण. " सँकोने उत्तर दिले, " बरे तर, तुम्ही म्हणाल तसे ! पण मला हे म्हणावयाचे आहे की, मी उमराव लौकर झालो पाहिजे. मी पूर्वी एकदा प्रार्थनामंदिरातील सेवक होतो. त्या सेवकाचा झगा माझ्या अंगाला इतका शोभून दिसत असे की, प्रत्येकजण म्हणे, एखाद्या धर्मगुरुसारखा तू दिसतोस. मग परदेशच्या सरदाराप्रमाणे सोन्या–मोत्यांनी शृंगारलेला ड्यूकचा उंची पोषाख माझ्या अंगावर चढला तर मी कसा दिसेन असे आपल्याला वाटते ? मला पाहण्यासाठी शेकडो कोसांवरून लोक येतील असा मला विश्वास वाटतो. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे, तू खचित चांगला दिसशील. पण गड्या, एक गोष्ट मात्र कर – तुझ्या दाढीचे हे जंगल निदान एक दिवसाआड तरी तू साफ कर. नाही तर तुला पाहताच लोक तुझ्या मुद्रेवरून तुझी योग्यता ठरवतील." सँको म्हणाला, " त्यात काय अवघड आहे ? एक न्हावी मी माझ्या घरी ठेवला म्हणजे झाले. अमीर – उमरावाच्या पाठीमागे घोडेवाले असतात ना ? तसा तो न्हावी, जरूर तेव्हा, मी जेथे जाईन तेथे माझ्या पाठोपाठ येईल. " डॉन क्विक्झोट यांनी विचारले, " अमीर

उमरावांचे घोडेवाले त्यांच्या पाठोपाठ घोड्यावर बसून जातात, हे तुला कसे कळले ?" सँको म्हणाला, "सांगतो, सांगतो. काही वर्षांपूर्वी दरबारी लोकांत एक महिनाभर वावरण्याचा योग मला आला होता. त्यावेळी घोड्यावर बसून एक बुटका, छानछोकी माणूस चालला होता. तो अत्यंत महान् सरदार आहे असे लोक म्हणत होते. तो जेथे जेथे जाई, तेथे त्याच्या पाठोपाठ एक घोडेस्वार जाई. तो वळला की हा वळे, तो थांबला की हा थांबे – जणु काही त्याच्या घोड्याच्या शेपटीलाच तो बांधलेला आहे असे तुम्हाला वाटावे. तेव्हा मी विचारले, "हा मागचा माणूस स्वतंत्रपणे का जात नाही ? त्याच्या मागोमाग का जातो ?" तेव्हां लोकांनी मला सांगितले, "हा त्याचा घोडेवाला आहे. आणि अशी माणसे अमीर–उमरावांच्या पाठीशी नेहमी असतात.' हे मी इतके लक्षात ठेवले की, अजून मला त्याचा विसर पडला नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "तुझे म्हणणे बरोबर आहे. अशा पद्धतीने तू आपल्याबरोबर न्हावी बाळगणे सयुक्तिक आहे. कोणतीही रूढी एकदम पडत नाही. ती एकदा सुरू होते आणि हळुहळू सुधारली जाते. म्हणून आपल्या पाठीशी न्हावी बाळगून ऐटीने घोड्यावरून जाणारा पहिला उमराव तू ठरशील. घोड्यावर खोगीर घालण्यापेक्षा माणसाची दाढी करणे, हे काम अधिक जोखमीचे असते, हे लक्षात घेतले तर, तुझे वागणे योग्य ठरेल." सँको म्हणाला, "ठीक आहे. हे दाढी–प्रकरण माझ्यावर सोपवा. आपण फक्त स्वतः राजा होण्याची आणि मला उमराव करण्याची काळजी घ्या म्हणजे झाले." 'निःसंशय' असे म्हणून डॉन क्विक्झोट इकडे–तिकडे पाहू लागले, तेव्हा त्यांना दिसले–काय ? ते पुढील प्रकरणात वाचा.



## प्रकरण ८

# डॉन क्विक्झोट यांनी अनेक दुःखी जीवांना बंधमुक्त कसे केले, याचा वृत्तांत. या दुःखी जीवांना, त्यांच्या इच्छेविरुद्ध, त्यांना न आवडणाऱ्या ठिकाणी नेले जात होते.

हा इतिहास अतिशय गंभीर, सूक्ष्म, मृदु, विनोदी व उच्च भाषेतील आहे. त्याचा लेखक अरबी व मँचेगन आहे. सिड हॅमेट बेनेनगेली हे त्याचे नाव. तो निवेदन करतो की, सातव्या प्रकरणाचे शेवटी आम्ही सुविख्यात डॉन क्विक्झोट व त्यांचा सेवक यांचा जो संवाद नमूद केला आहे, त्यानंतर आमच्या शिलेदाराने आपली दृष्टी वर उचलली, तों त्यांना सुमारे बारा माणसे पायी येताना दिसली. ते सर्वजण एकामागे एक असे, एका रांगेने रस्त्यावरून रखडत चालले होते. माळेत गुंफलेल्या मण्याप्रमाणे ते सारे, गळ्याभोवती असलेल्या भल्यामोठ्या लोखंडी साखळीने, एकमेकास बांधलेले होते—आणि शिवाय त्यांच्या हातांत बेड्या घातलेल्या होत्या. छोट्या बंदुका घेतलेले दोन घोडेस्वार त्यांचेवर पहारा करीत होते आणि भाला व तलवार घेतलेली व पायी चालणारी दोन माणसेही त्यांच्यावर पहारा करीत होती.

ते सारे लोक दृष्टीस पडताच सँको ओरडून म्हणाला, "पहा, पहा, महाराज, जहाजांवरील राजाच्या चाकरीसाठी या दुर्दैवी लोकांची टोळी सक्तीने, त्वरेने, नेण्यात येत आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "काय ? राजा कोणावर सक्ती करणे शक्य आहे काय ?" तेव्हां सँकोने उत्तर दिले, "मी तसे म्हणत नाही. माझ्या म्हणण्याचा अर्थ हा की, राजाची जहाजे वल्हविण्याची शिक्षा कायद्याने या बदमाष लोकांना त्यांच्या दुष्कृत्याबद्दल दिलेली आहे." डॉन क्विक्झोट उत्तरले, "तरीही त्यांच्यावर सक्तीच होत आहे– ते काही आपल्या इच्छेने जात नाहीत." सँको म्हणाला, "खात्रीने." डॉन क्विक्झोट उद्‌गारले, "तसे असेल तर ते माझ्या कर्तव्याच्या कक्षेत येतात. हिंसेला नि जुलुमाला प्रतिबंध करणे आणि दैन्यात सापडलेल्या सर्व लोकांना साहाय्य करणे हे तर माझे कर्तव्यच होय." तेव्हां सँको म्हणाला, "पण महाराज, राजा किंवा कायदा अशा दुष्ट लोकांची कांही हिंसा करीत नाहीत– त्यांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे शासन मिळत आहे."

एवढे बोलणे होईपर्यंत गुलामांची ती साखळी जवळ आली. तेव्हा डॉन क्विक्झोट त्या पहारेकऱ्यांना अत्यंत सभ्यपणे म्हणाले, "या गरीब बिचाऱ्या माणसांना

अशा रीतीने का नेले जात आहे ? " एका घोडेस्वाराने उत्तर दिले, " महाराज, हे गुन्हेगार आहेत आणि राजाच्या जहाजावर चाकरी करण्याची शिक्षा त्यांना झालेली आहे. मी तुम्हांला एवढेच सांगू शकतो; तुम्ही अधिक चौकशी करू नये. " तरी डॉन क्विक्झोट म्हणाले, " या लोकांच्या दुर्दैवाची कारणे थोडक्या शब्दांत जाणून घेण्याची मला मोठी इच्छा आहे. ती माझी जिज्ञासा आपण तृप्त केली, तर मी तो आपला मोठा कृपाप्रसाद समजेन. " तेव्हा दुसरा घोडेस्वार म्हणाला, " त्यांच्या विविध शिक्षांची पत्रके नि प्रमाणपत्रे आमच्याजवळ आहेत; पण ती काढून वाचून दाखविण्यासाठी आम्ही थांबू शकत नाही. तुम्ही त्या लोकांजवळ जा आणि चौकशी करा. आपल्याला शिक्षा का झाली, हे ते स्वतःच सांगतील, असे मला वाटते. कारण ते प्रामाणिक आहेत आणि आपल्या बदमाषीची बढाई मारण्यास त्यांना लाज वाटत नाही. "

अशी परवानगी डॉन क्विक्झोट यांना मिळाली. ती मिळाली नसती तरी त्यांनी ती स्वतःच घेतली असती. ते त्या साखळबंद लोकांकडे घोड्यावरून गेले. पहिल्या माणसाला त्यांनी विचारले, " कोणत्या गुन्ह्यामुळे तुम्ही या दुःस्थितीत सापडले आहा?" गुलामाने उत्तर दिले, " प्रेम करण्याच्या गुन्ह्याबद्दल ! " तेव्हां डॉन क्विक्झोट उद्गारले, " काय, केवळ प्रेम करण्याबद्दल ही शिक्षा ? प्रेमात पडणाऱ्या साऱ्यांची अशीच वाट लागणार असली, तर माझी रवानगी त्या जहाजावरील चाकरीसाठी यापूर्वी केव्हाच झाली असती ! " गुलाम उत्तरला, " अहो, तुम्ही कल्पना करता तसले माझे प्रेम नव्हते. कपड्याच्या गांठोड्यावर माझे जबरदस्त प्रेम बसले होते. ते गांठोडें मी इतके घट्ट धरून ठेवले होते की, न्यायाधीशानें ते माझ्यापासून सक्तीने काढून घेतले नसते, तर मी राजीखुषीने त्याचा त्याग केला नसता. सारांश, मी चोरी करीत असतानाच पकडला गेलो. पण म्हणून मला खोड्यात घालण्याची गरज नव्हती. माझ्यावर आरोप स्पष्टपणे करण्यात आला. कोर्टात माझा खटला चालू झाला, चौकशी–पुरावा झाला, हलकेसे फटकेही मारण्यात आले आणि तीन वर्षे समुद्रावर चाकरी करण्याची शिक्षा ठोठावण्यात आली. बस्स ! संपली माझी कहाणी !! " डॉन क्विक्झोट यांनी आश्चर्याने विचारले, " काय, समुद्रावर चाकरी ? म्हणजे कोणती ? " गुन्हेगाराने उत्तर दिले, "जहाजावरील गुलाम ! " तो तरुण होता–असेल चोवीस वर्षांचा. पीड्रा–हिटा येथे आपला जन्म झाल्याचे त्याने सांगितले.

नंतर डॉन क्विक्झोट यांनी दुसऱ्या माणसाची चौकशी केली. परंतु तो इतका दुःखी व खिन्न होता की, तो त्यांच्या प्रश्नांना काहीच उत्तर देईना. पण पहिल्या बदमाषाने त्याच्या कार्याची माहिती शिलेदाराला दिली. तो म्हणाला, " हा पिवळा पक्षी आमच्याबरोबर आहे याचे कारण त्याने विपुल गायन केले आहे. " तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, " हे शक्य आहे काय ? गायनाबद्दल माणसांना कधी शिक्षा होते काय ? " तेव्हा तो अट्टल बदमाष म्हणाला, " होय महाराज. वेदना होत असताना केलेल्या गायनापेक्षा अधिक वाईट काहीच नसते. " डॉन क्विक्झोट याने

विचारले, " ते कसे ? 'दुःख हरी, चिंता सारी, हीच संगीताची खुमारी' या म्हणीशी हे विसंगत आहे. " तेव्हा त्या गुलामाने उत्तर दिले, " पण आमची गोष्ट निराळी आहे. जो संकटात गातो, तो त्यानंतर जन्मभर रडत बसतो. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मला न सोडविता येण्यासारखे हे कोडे आहे. " तेव्हा एक पहारेकरी म्हणाला, "महाराज, तुरुंगातल्या या लोकांच्या भाषेत 'दुःखात गाणे म्हणणे' म्हणजे हाल केल्या-वर गुन्हा कबूल करणे होय. या माणसाने गुरे चोरली होती. त्याचे छळ करण्यात आले, तेव्हा त्याने आपला गुन्हा कबूल केला. त्यावेळी त्याने जो चीत्कार केला–किंवा गाणे गाइले म्हणा–त्यामुळे त्याला सहा वर्षे जहाजावर काम करण्याची शिक्षा देण्यात आली. शिवाय, नऊ वाद्या असलेल्या चाबकाने त्याला शंभर फटके मारण्यात आले. त्या चाबकाने त्याचे खांदे पूर्वीच खिळखिळे केले होते. आता तो इतका खिन्न नि बेचैन झालेला आहे याचे कारण इतकेच की, त्याने गुन्हा नाकबूल करण्याचे धैर्य दाखविले नाही, म्हणून त्याच्या बरोबरचे बदमाष त्याच्याकडे पाहून एकसारखे हसत असतात आणि त्याची टर उडवीत असतात. जणू काही, होकार देण्याइतके नकार देणे त्याला सोपे नव्हते. एखाद्या माणसावर काही आळ आला आणि त्याने आपल्या तोंडच्या शब्दांनी काही सांगितले नाही, तर त्याच्याविरुद्ध दुसरा काही प्रत्यक्ष पुरावा नसला, तर त्याचे सुदैव. इतर बदमाष त्याला हसत आहेत व ते थोडेफार बरोबर आहेत असे माझे मत आहे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मलाही तसेच वाटते. "

नंतर तिसऱ्या माणसाकडे वळून डॉन क्विक्झोट यांनी विचारले, " आणि तू रे काय केलेस ? " त्या माणसाने तत्काळ आनंदाने उत्तर दिले, " महाराज, माझ्याजवळ दहा ड्यूकॅट नाणी नव्हती म्हणून, ही विस्तीर्ण हिरवळ पाच वर्षे साफ करण्याची शिक्षा मला मिळाली आहे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " तुला त्या आपत्तीतून सोडविण्यासाठी मी मनापासून वीस नाणी देईन. " तेव्हा तो गुलाम म्हणाला, " काहीच देऊ नका. तरी मी आपला आभारी आहे. ' मांसानंतर मोहरी ' या म्हणीप्रमाणेच हे उघड आहे. किंवा एखादा माणूस भुकेलेला आहे आणि विकत घेण्यासाठी खाद्य पदार्थ नाहीत, अशा वेळी त्याला पैसे देण्यासारखे हे आहे. तुम्ही मला जी वीस नाणी देऊ केली आहेत, ती माझ्यावर खटला होण्यापूर्वी मला मिळाली असती तर मी कोर्टातील कार-कुनाचा ( किंवा शिरस्तेदाराचा ) हात ओला केला असता आणि माझ्या वकिलाची बुद्धी पाजळली असती. मग मी झोकोडोव्हरच्या बाजारात टोलेडो येथे यावेळी उभा असतो––कुत्र्याप्रमाणे, साखळी बांधून, फरफटत नेला गेला नसतो. पण ईश्वर सर्वशक्ति-मान आहे. मी अधिक काही बोलत नाही. "

नंतर डॉन क्विक्झोट चौथ्या माणसाकडे गेले आणि त्याला त्यांनी तोच प्रश्न विचारला. हा एक आदरणीय वृद्ध शिक्षक होता. त्याच्या छातीपर्यंत रुळणारी त्याची दाढी करडी दिसत होती. तो बिचारा म्हातारा एकदम रडू लागला. उत्तर देण्यास तो समर्थ नव्हता. म्हणून त्याच्या मागच्या माणसाने त्याच्या जिभेचे काम केले. तो

म्हणाला, " महाराज, शहरात सन्मानाने शिक्षण घेऊन आणि योग्य त्या जागी काम करून आता हा प्रामाणिक माणूस चार वर्षांसाठी जहाजावर जात आहे. " तेव्हा सँको म्हणाला, " याच्या आधी गाढवावरून त्याची धिंड काढली असेल असे मी मानतो. " गुलामाने उत्तर दिले, " बरोबर. मानवी देहाची विक्री करण्यात हा दलाली करीत असे. याबद्दल त्याला ही शिक्षा झालेली आहे. खरे सांगायचे तर हा गृहस्थ वेश्यांचा दलाल आहे आणि शिवाय त्याला थोडीफार जादूही करता येते. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " जादूटोणा तो करीत नसता, तर केवळ सौदेगिरी केल्याबद्दल त्याला जहाजावर पाठविणे योग्य ठरले नसते—जहाजाचा कप्तान म्हणून पाठविले असते तर ते योग्य ठरले असते. कारण कुंटणखाना चालविणे, वेश्यांची दलाली करणे किंवा प्रेमाचे निरोप पोचविणे—हा धंदा इतर मामुली उद्योगासारखा नाही. त्या व्यवसायाला फार मोठा शहाणपणा आणि समंजसपणा लागतो—विश्वास व वजन असावे लागते. अत्यंत सुयंत्रित अशा राज्यामध्ये या व्यवसायाची अतिशय गरज असते. उच्च कुलात जन्मलेल्या व सद्गुणांनी मंडित असलेल्या सुशिक्षित व सभ्य माणसांनी करण्यासारखा हा व्यवसाय आहे. अन्य व्यवसायाप्रमाणे याही व्यवसायाचे निरीक्षण व नियंत्रण करणारा अधिकारी असणे अवश्य आहे. अडत—बाजारातील दलालांप्रमाणे त्यांचीही संख्या निश्चित व मर्यादित असावी. तसे झाले म्हणजे, दररोज घडणारे असंख्य अनर्थ टळतील. कारण या व्यवसायात गरीब व अडाणी असे ढोंगी लोक शिरतात आणि वेड्या व आळशी स्त्रियाही शिरतात. डोक्यात चक्कर असलेले तरुण नोकर, आणि उथळ वृत्तीचे हुजरे—अशा अननुभवी कच्च्या लोकांचा भरणा त्यात होतो. एखादी अकल्पित गोष्ट घडली किंवा एखादा पेचप्रसंग निर्माण झाला म्हणजे हे लोक तोंडात बोट घालून उभे राहतात, चकित होतात—आपला उजवा हात कोणता हे त्यांना ओळखता येत नाही. आणि एखादी गोष्ट लपविण्यास किंवा युक्तीने तडीस नेण्यास बुद्धीची जी चपळाई लागते, ती त्यांचे अंगी नसल्याने साऱ्या प्रकरणाचा बट्ट्याबोळ होतो. मला जर वेळ असता, तर राष्ट्र—समूहातील अत्यंत आवश्यक अशा या व्यवसायाचे म्होरक्ये म्हणून कोणत्या प्रकारची माणसे योग्य आहेत, हे मी दाखवून दिले असते. तथापी, दुसऱ्या एखाद्या चांगल्या वेळी, या व्यवसायातील घोटाळा दूर करू शकणाऱ्या माणसांना मी ती माहिती देईन. सध्या मला इतकेच सांगायचे आहे की, दलालीचा अत्यंत उपयुक्त आणि चतुर धंदा केल्याबद्दल संकटात सापडलेल्या या सन्माननीय वृद्ध गृहस्थाला पाहून मला जे दुःख झाले आहे, ते त्याच्या जादुगिरीच्या जादा लक्षणामुळे आता नष्ट झाले आहे. जादू किंवा चेटूक यांच्याविषयी मला तिटकारा आहे. काही अडाणी व भोळ्या-भाबड्या लोकांना सहजच वाटते की, जादूचा परिणाम माणसाच्या इच्छाशक्तीवर होतो. पण जगातील कोणतीही जादू इच्छाशक्तीवर सक्ती करू शकत नाही असे माझे ठाम मत आहे. आपली इच्छाशक्ती ही एक स्वतंत्र शक्ती आहे—तिच्यावर कोणतीही वनस्पती किंवा कोणतीही जादू बंधन घालू शकत नाही. काही वेड्या स्त्रिया आणि धूर्त ढोंगी

माणसे वशीकरणाची औषधे तयार करतात. पण माझ्या दृष्टीने ती विषारी असून त्यांचे सेवन करणारी माणसे वेडी होतात. हे लबाड लोक असे सांगण्याचा प्रयत्न करतात की, 'आम्ही एका माणसाला दुसऱ्या माणसावर प्रेम करण्यास लावू शकतो.' ही गोष्ट अशक्य आहे, हे मी सांगितलेच आहे. आपली इच्छाशक्ती ही स्वतंत्र आणि अनिर्बंध शक्ती आहे."

तो म्हातारा माणूस म्हणाला, "महाराज, आपण फार चांगले सांगितले. चेटूक करण्याचा जो आरोप मजवर लादण्यात आला आहे, त्या बाबतीत मी पूर्ण निरपराधी आहे, या माझ्या शब्दांवर आपण विश्वास ठेवावा. आता दलालीच्या धंद्यासंबंधी म्हणाल तर, तो आरोप मी नाकारू शकत नाही. पण ते गुन्हेगारीचे कृत्य आहे असे मी कधीच मानले नाही. कारण त्यात माझा हेतु इतकाच होता की, साऱ्या जगाला प्रेमाची मधुर फळे चाखता यावीत आणि परस्परांच्या सहवासाचा आनंद उपभोगता यावा. पृथ्वीला त्रस्त करणाऱ्या दुःखापासून आणि यातनांपासून मुक्त होऊन लोकांनी मैत्रीने व शांततेने एकत्र राहावे, हा माझा हेतू. पण माझ्या या निरुपद्रवी योजनेला यश आले नाही. जेथून कधीही परत येण्याची आशा नाही, अशा ठिकाणी आता माझी रवानगी होत आहे. वार्धक्याच्या अजस्र भाराने मी वाकलो आहे आणि या शिक्षेमुळे मी गुदमरून गेलो आहे. त्यामुळे माझ्या वेदना क्षणभरही थांबत नाहीत." एवढे बोलून तो पूज्य दलाल पुन्हा जोराने अश्रू ढाळू लागला आणि विलाप करू लागला. ते पाहून सँकोचे अंतःकरण इतके विरघळले की, त्याने आपल्या उराशी बाळगलेल्या पैशातून एक नाणे काढले आणि भिक्षा म्हणून ते त्याला दिले.

नंतर डॉन क्विक्झोट पाचव्या माणसाकडे वळले. त्याला कसलीच चिंता नाही, असे दिसत होते. तो म्हणाला, "मी बादशहांची सेवा करण्यास जात आहे. याचे कारण इतकेच की, मी माझ्या दोन पुतण्याशी जरा जादा सलगी केली आणि दोन प्रेमळ कुमारिकांशीही— त्या बहिणीबहिणी होत्या- तसेच वागलो. त्यामुळे माझी प्रजा वाढली. आणि एकाच रक्ताचे इतके विविध नी गुंतागुतीचे वंशज जन्मास आले की, नीतिशास्त्राच्या वादसभेतील विद्वानालाही वंशशास्त्राच्या दृष्टीने हे कोडेच वाटावे. माझ्यावरील हे सर्व आरोप सिद्ध करण्यात आले. मला कोणी मित्र नाहीत— आणि त्याहून वाईट म्हणजे, पैसे नाहीत. त्यामुळे मी फाशीच जायचा. पण सहा वर्षे खलाशाचे काम करण्याचीच शिक्षा मला देण्यात आली. ती मी शांतपणे स्वीकारली. अजून मी तरुण आहे असे मला वाटते—आणि त्याचे मला समाधान वाटते. कारण माझ्या आयुष्याची दोरी बळकट राहिली तर सारे काही योग्य वेळी ठीक होईल. आम्हा गरीब पापी लोकांना आपण काही देण्याची कृपा केली, तर त्याचे बक्षीस परमेश्वर तुम्हांस देईल. आम्ही जेव्हा प्रार्थना करू, तेव्हा आपले स्मरण अवश्य करू आणि प्रभूपाशी प्रार्थना करू की, आपले स्वरूप जसे भव्य आणि उदात्त आहे, तसेच आपले जीवन दीर्घकाळ उत्कर्षाचे असावे." हा चमकदार तरुण विद्यार्थी असावा असे त्याच्या

बोलण्या-वागण्यावरून वाटत होते. आणि काही पहारेकरी म्हणाले, " हा उत्तम वक्ता आहे आणि लॅटिन भाषेचा पंडित आहे."

त्यानंतर सुमारे तीस वर्षांचा एक माणूस आला. तो देखणा, चतुर आणि सुव्यवस्थित दिसत होता. फक्त एका डोळ्याने तो भयंकर तिरळा होता. त्याच्या अंगावर बेड्यांचे आणि साखळ्यांचे भयंकर ओझे होते. त्याच्या पायात एक अवजड साखळी होती आणि ती इतकी लांब होती की, ती त्याने कमरपट्ट्याप्रमाणे आपल्या कमरेभोवती गुंडाळली होती. त्याच्या गळ्याभोवती दोन पट्टया होत्या– एकीने त्याला इतर गुलामांशी बांधले होते आणि दुसरीने लोखंडी साखळ्या जोडलेल्या होत्या. त्यांना 'मित्रराखी' किंवा 'सखापाय' असे लोक म्हणतात. त्या दोन लोखंडी साखळ्या त्याच्या कमरेपर्यंत लोंबत होत्या आणि त्यांना दोन बेड्या पक्क्या ठोकलेल्या होत्या. त्याच्या मनगटातील बेड्यांना मोठे कुलूप ठोकलेले होते. त्यामुळे तो आपले हात तोंडापाशी नेऊ शकत नव्हता किंवा आपले डोके हातापर्यंत वाकवू शकत नव्हता. इतरांपेक्षा याला बेड्यांचे बंधन जास्त का ? अशी चौकशी डॉन क्विक्झोट याने केली असता, एका पहारेकऱ्याने सांगितले, " या सर्वांनी मिळून जितके गुन्हे केले असतील, त्याहून अधिक गुन्हे याने एकट्याने केले आहेत. हा इतका बेछूट आहे, सैतान आहे की, कोणताही तुरुंग किंवा कितीही बेड्या त्याला डांबून ठेवू शकणार नाहीत. आमच्या तावडीतून तो पळून जाईल असे आम्हास वाटत नाही. कारण त्याला भक्कमपणे अडकवून ठेवले आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, " याने कोणत्या प्रकारचे गुन्हे केले आहेत म्हणून त्याला केवळ खलाशी होण्याची शिक्षा देण्यात आली आहे ?" पहारेकऱ्याने उत्तर दिले, " असे का म्हणता ? दहा वर्षे गुलामगिरीत राहण्याची शिक्षा त्याला ठोठावण्यात आली आहे. नागरी जीवनातील हा मृत्यूच आहे. पण याच्याविषयी अधिक काही सांगण्यासाठी मी येथे थांबण्याची गरज नाही. एवढेच सांगितले म्हणजे पुरे की, पॅसामॉंटेचा जिनेस ऊर्फ पॅरापिलाचा जिने सिलो म्हणून जो बदमाष कुप्रसिद्ध आहे, तो हाच !" तेव्हा तो गुलाम सौम्य शब्दात म्हणाला, " ऐका महाराज, एखाद्या माणसाला जितकी नावे खरोखर असतील, त्यापेक्षा अधिक नावे तुम्ही त्याला का देता ? जिनेस हे माझे ख्रिश्चन नाव आहे आणि पॅसामॉंटे हे माझे आडनाव आहे. तुम्ही म्हणता त्याप्रमाणे जिनेसिलो नाही की पॅरापिला नाही. खबरदार ! प्रत्येकाने आपण काय बोलत आहोत याचा विचार करावा, नाही तर त्याचे नुकसान होईल." तेव्हा त्याचा अधिकारी त्याला म्हणाला, " अरे मूर्खा, इतक्या उद्धटपणाने बोलू नकोस. नाही तर मी तुझ्या तोंडात नवी जीभ घालीन." गुलाम म्हणाला, " एखादा माणूस फटक्याच्या भीतीने गप्प बसू शकेल, पण केव्हा ना केव्हा हे उघडकीस येईल की, माझे नाव पॅरापिला आहे की नाही." तेव्हा त्या अधिकाऱ्याने उत्तर दिले, " अरे खुळ्या, लोक तुला त्या नावाने हाक मारतात की नाही ?" जिनेस उत्तरला, " होय, ते हाक मारतात, पण मला दुसऱ्या नावाने संबोधण्यास मी त्यांना भाग पाडीन. नाही तर मी त्यांना इतके ओरबाडीन–चावीन की,

याचे वर्णन आज मी तुम्हाला सांगत नाही."

नंतर तो डॉन क्विक्झोटकडे वळून म्हणाला, "महाराज, आपण इतकी चौकशी चालविली आहे, तर आम्हाला काही देण्याचे तुमच्या मनात आहे काय ? असल्यास ताबडतोब देऊन टाका आणि आपला मार्ग सुधारा. कारण येथे उभे राहून प्रश्नांची उत्तरे देणे मला आवडत नाही. मी पॅसामॅंटेचा जिनेस आहे – माझ्या नावाची मला लाज वाटत नाही. माझे जीवन आणि माझे संभाषण हे मी माझ्या गणिती हाताने पांढऱ्यावर काळे करून लिहिले आहे." अधिकारी म्हणाला, "हे तो खरे सांगत आहे. त्याने स्वतःचा इतिहास लिहिलेला आहे आणि त्यात आपल्या गुन्हेगारीच्या लीलांचा कणही वगळलेला नाही. त्याने ते हस्तलिखित तुरुंगामध्ये दोनशे नाण्यांसाठी गहाण ठेवलेले आहे." जिनेस म्हणाला, "ते मी सोडवून आणणार आहे. निश्चित ! त्यासाठी सोन्याची नाणी ( ड्यूकॅट ) द्यावी लागली तरी देईन." डॉन क्विक्झोट म्हणाले, "याचा अर्थ तो लेख अलौकिक असला पाहिजे." तेव्हा जिनेसने उत्तर दिले, "इतका अलौकिक की, टोर्मेसचा लॅझरिलोवर तो मात करील. एवढेच नव्हे तर तशा प्रकारचे जे जे लेखन यापूर्वी लिहिले गेले आहे आणि पुढे लिहिले जाईल, त्यापेक्षा माझे आत्म-चरित्र सरस ठरेल. कारण त्यातील शब्दन्‌शब्द खरा आहे. त्यात युक्त्या आणि अपघात यांची तर इतकी गर्दी झालेली आहे की, कोणत्याही कल्पित कथेला त्याची सर येणार नाही." डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "पुस्तकाचे नाव काय ?" त्याने उत्तर दिले, "पॅसामॅंटोच्या जिनेसचे चरित्र." शिलेदाराने विचारले, "ते अगदी संपूर्ण आहे काय ?" गुलामाने उत्तर दिले, "मी अजून जिवंत आहे, मग ते पूर्ण कसे होणार ? माझ्या जन्मापासून आता जहाजाकडे चालू असलेल्या शेवटच्या प्रवासापर्यंतच्या आयुष्यातील प्रत्येक महत्त्वाची घटना त्यात नोंदलेली आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "यावरून तू तेथे पूर्वी होतास असे दिसते." जिनेस उत्तरला, "देवाची व राजाची सेवा करण्यासाठी मी यापूर्वी एकदा तेथे सुमारे चार वर्षे होतो. माझ्या शरीराला तेथली बिस्किटे नि बैलाचे मांस किती मानवते, हे मला माहीत आहे. तेथे पुन्हा जाताना मला दुःख होत नाही. कारण तेथे माझ्या पुस्तकावरून शेवटचा हात फिरवण्यास मला सवड सापडेल, त्यात भर काय घालावयाची हे मला ठाऊक आहे. आणि आमच्या स्पेनच्या जहाजावर नेहमी पुरेशी सवड असते आणि रिकामा वेळ असतो. पुस्तकात मला जे घालावयाचे आहे, त्यासाठी मला फारसा वेळ लागणार नाही. कारण ते सारे मला तोंडपाठ आहे."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "तू मोठा गमत्या प्राणी दिसतोस." गुलाम उत्तरला, "गमत्या आणि दुर्दैवीही म्हणा, कारण हे बेटे दैव बुद्धिमान माणसाशी कठोरपणाने वागते." अधिकारी म्हणाला, "म्हणजे तुझ्यासारख्या दुष्ट बदमाषाशी ना ?" तेव्हा जिनेस म्हणाला, "अम्मलदारजी, हे पाहा, आपण चांगली भाषा वापरावी अशी माझी इच्छा मी पूर्वीच प्रकट केली आहे. कायद्याने आम्हाला तुमच्या हवाली केले आहे ते

तुम्ही आम्हाला शिवीगाळ करावी म्हणून नव्हे. राजाला जेथे आमची गरज आहे, तेथे आम्हाला पोचविणे एवढेच तुमचे काम. प्रत्येक माणसाने आपले काम करावे आणि चांगले बोलावे, नाही तर गप्प बसावे. मी अधिक काही सांगत नाही, पण एवढे खात्रीने म्हणतो की, केव्हा ना केव्हा खून उघडकीस येणारच. इतरांप्रमाणे सर्वांची दुष्ट कृत्ये उजेडात येणारच." त्या गुलामाच्या या धमक्यांनी तो अधिकारी खवळला आणि त्याला मारण्यासाठी त्याने आपला दंडुका उगारला, पण डॉन क्विक्झोट त्या दोघांच्या मध्ये उभे राहिले आणि अधिकाऱ्याला म्हणाले, "असे करू नका. गुलामाने आपली जीभ स्वैर सोडली, तरी त्याला क्षमा केली पाहिजे. कारण त्याचा दुसरा कोणताही अवयव स्वतंत्र नसतो." नंतर त्या सर्व गुलामांना उद्देशून ते म्हणाले, "माझ्या प्रियतम बांधवांनो, आपण मला जे सांगितले, त्यावरून मला असे दिसते की, ज्या विविध गुन्ह्यांबद्दल तुम्हाला शिक्षा झालेली आहे, तिला तुम्ही पात्र आहा. त्या शिक्षेची अंमलबजावणी सक्तीने होत आहे, त्याचा त्रास तुम्हाला सोसावा लागत आहे, त्याशिवाय तुम्हाला गत्यंतर नाही. शिवाय या माणसाजवळ निश्चय नाही, तर त्या माणसाजवळ पैसा नाही, या तिसऱ्या माणसाजवळ मित्र व वशिला नाही—सारांश, न्यायाधीशांनी तुमच्याविरुद्ध निकाल देण्यासाठी कायद्याशी झोंबाझोंबी करून तो उलटापालटा केला असेल, आणि तुमच्या दुःखाचे ते एक कारण असणे असंभवनीय नाही. आता, माझा व्यवसाय शिलेदारीचा आहे आणि परमेश्वराने मला, दुःखी माणसांना सुख देण्यासाठी आणि दुर्बल माणसांना अरेरावांच्या जुलुमातून सोडविण्यासाठी, या जगात पाठविले आहे. या दोन्ही गोष्टींचा विचार करून मला असे वाटते की, मी तुम्हाला संरक्षण द्यावे. पण जेथे सरळ मार्गाने काम होत असेल, तेथे शहाण्या माणसाने हिंसेचा वापर करू नये. म्हणून मी या सज्जन पहारेकऱ्यांना विनंती करतो की, या गरीब माणसांना सोडून द्या. त्यांच्याऐवजी सम्राटाची सेवा करण्यासाठी दुसरी पुष्कळ माणसे आहेत. ईश्वराने आणि निसर्गाने ज्या मानवांना स्वतंत्र ठेवले आहे, त्यांना गुलाम करणे ही अवघड गोष्ट आहे. या गुलामांनी तुमच्यावर काहीही अन्याय केला नाही, हे लक्षात घेता, त्यांना असे कठोरपणाने तुम्ही वागविण्यास काही कारण नाही. त्यांना आपल्या पापाचे प्रायश्चित्त परलोकात घेऊ द्या. ईश्वर न्यायी आहे आणि तो दुष्टांना शासन आणि सुष्टांना बक्षीस खचित देतो हे तुम्ही जाणता. शिवाय सज्जनहो, तुम्ही हा विचार करा की, माणसांनी एकमेकांचे छळवादी व खाटिक बनावे आणि त्याच्यापासून काही लाभ निष्पन्न न व्हावा—हे खिस्ती माणसाला शोभत नाही आणि ते सन्मानाचे कृत्यही नव्हे. म्हणून मी अत्यंत नम्रतेने आणि शांततापूर्ण पद्धतीने तुमच्याकडे जी मागणी करतो, ती तुम्ही कृपया पूर्ण करावी म्हणजे मला तुमचे आभार मानण्याची संधी मिळेल. पण माझी विनंती नाकारून तुम्ही मला प्रक्षुब्ध केले तर, माझ्या नम्र विनंतीला मान न देणाऱ्या तुम्हाला माझ्या शौर्यास शरण यावे लागेल. हा माझा भाला, ही माझी समशेर आणि त्या दोहोंचा उपयोग करणारा हा माझा अजिंक्य बाहु, तुम्हाला माझी विनंती मान्य करावयास लावील, हे

तुम्हाला सांगणे मला भाग आहे. ”

अधिकारी म्हणाला, “ फारच नामी थट्टा ! असे लाड तुमच्या डोक्यात येतात तरी कसे ? राजाच्या कैद्यांना आम्ही मोकळे सोडावे, असे आपल्याला वाटते काय ? तसे करण्याचा आम्हाला अधिकार काय ? आणि तसा आदेश देण्याचा आपल्याला अधिकार काय ? महाराज, जा जा, आपण आपले काम करीत जा आणि आपल्या पोकळ डोक्या-वर ते पातेले नीट बसवा. आपला ज्याच्याशी काही संबंध नाही, अशा गोष्टीमध्ये लुडबुड करीत जाऊ नका, एवढीच माझी विनंती. कारण, जे मांजराशी खेळ खेळतील, त्यांना त्याचे ओरखडे सोसावे लागतील. ”

डॉन क्विक्झोट ओरडले, “ अरे, तू मांजर आहेस, उंदीर आहेस आणि भेक-डही आहेस. ” असे म्हणन त्यांनी त्या अधिकाऱ्यावर अकस्मात असा काही विलक्षण त्वेषपूर्ण हल्ला केला की, आपला बचाव करण्यासाठी योग्य पवित्रा घेण्यास त्याला संधीच मिळाली नाही. डॉन क्विक्झोट यांनी आपल्या भाल्याने त्याला भयंकर जखमी केले आणि खाली पाडले. योगायोग असा की, हा अधिकारी म्हणजे बंदुक बाळगणारा घोडेस्वार होता. डॉन क्विक्झोट यांच्या या धडाडीच्या कृत्यामुळे इतर अधिकारी काही काळ आश्चर्यचकित होऊन उभे राहिले. पण शेवटी आपल्या तलवारींनी आणि भाल्यांनी ते त्या वीरपुरुषावर तुटून पडले. त्यामुळे डॉन क्विक्झोट प्राणासच मुकावयाचे, पण आपले स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठी त्या गुलामांनी साखळदंड तोडण्याची हीच संधी पकडली. तथापि पहारेकऱ्यांना आपले प्रयत्न फोल होतील असे वाटले आणि एका वेड्या माणसाशी लढण्यापेक्षा त्या गुलामांना आवरणे अधिक महत्त्वाचे आहे, असे त्यांनी पाहिले. एका बाजूने डॉन क्विक्झोट त्यांना जोराने ढकलीत होते आणि दुसऱ्या बाजूने गुलाम त्यांना विरोध करून स्वतः मुक्त होण्याचा प्रयत्न करीत होते. यामुळे इतका मोठा घोटाळा माजला की, पहारेकरी गोंधळून गेले आणि त्यांनी योग्य ती काहीच हाल-चाल केली नाही. दरम्यान पॅसामाँटेचा जिनेस याला बंधमुक्त होण्याचे कामी सँकोने मदत केली. कल्पनेपेक्षा त्वरेने जिनेस बेड्यातून मोकळा झाला. नंतर त्या बेहोष माणसाने त्या जखमी अधिकाऱ्याची समशेर व बंदूक ताब्यात घेतली आणि डॉन क्विक्झोट यांच्या खांद्याला खांदा लावून तो उभा राहिला. एकदा एकावर तर एकदा दुसऱ्यावर गोळीबार करण्याच्या हेतूने तो नेम धरीत होता. पण अजून गोळी सुटली नव्हती. त्याच वेळी इतर गुलामांनी पहारेकऱ्यावर दगडधोंड्यांचा वर्षाव केला आणि पाठीला पाय लावून ते पळत सुटले. डॉन क्विक्झोट आणि प्रमुख गुन्हेगार तेथेच राहिले. या विजयाने सँकोला मुळीच आनंद वाटला नाही. मुख्य संधी साधण्याकडे त्याचे नेहमी लक्ष असे. त्याने अंदाज केला की, पळून गेलेले पहारेकरी ओरडाओरड करतील आणि त्यांच्या मदतीला धर्म-संस्थेतील सर्व संरक्षकगण धावून येईल आणि मग बंड केल्याबद्दल त्या गुलामांना पुनः पकडण्यात येईल.

या अंदाजामुळे सँकोने आपल्या धन्याला असा सल्ला दिला की, या रस्त्यावरून

आपण शक्य तितक्या लवकर दूर जावे आणि जवळपासच्या डोंगरात दडून बसावे. आपल्या सेवकाच्या या सूचनेला डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "तुझी सूचना मी ऐकली. मी काय करावे, हे मला माहीत आहे." नंतर त्यांनी साऱ्या गुलामांना आपल्याकडे बोलावले. तोपर्यंत त्या गुलामांनी आपल्या पहारेकऱ्यांना तिंबून काढले होते. शिलेदाराची इच्छा काय आहे, हे समजावून घेण्यासाठी ते त्यांच्याभोवती जमले. तेव्हा ते त्यांना म्हणाले, "आपल्याला जे काही लाभ मिळतात, त्याबद्दल कृतज्ञता बाळगणे हे उदार स्वभावाचे लक्षण आहे. कृतघ्नतेपेक्षा निंद्य असा दुसरा गुन्हा नाही. सभ्य गृहस्थहो, मी तुमच्यासाठी काय केले आहे, हे तुम्ही पहात आहा. तुम्ही माझ्या उपकाराखाली किती आहा, याची जाणीव तुम्हाला खचित आहे. आता मी याची भरपाई म्हणून एकच मागणी करतो; ती ही की, तुमच्या गळ्याभोवती असलेल्या ज्या साखळदंडातून मी तुम्हाला मुक्त केले, ते घेऊन तुमच्यापैकी प्रत्येकाने टोबोसो शहराकडे तत्काळ प्रयाण करावे. तेथे टोबोसोची स्वामिनी डल्सीनिया हिच्यापुढे तुम्ही दाखल व्हावे आणि तिला सांगावे, "आपला परमभक्त–'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार'– यांच्या आज्ञेनुसार आम्ही आपल्या सेवेस हजर आहो. आपल्या चरणी शिलेदारांची गाढ भक्ती आहे." नंतर तुम्ही तिला या प्रसिद्ध पराक्रमाचा यथार्थ वृत्तांत तपशीलवार सांगावा म्हणजे तुम्हाला स्वातंत्र्याची मधुर फळे पुनः एकदा चाखता येतील. त्यानंतर तुम्ही आपल्या इच्छेप्रमाणे आपले नशीब काढण्यासाठी कोठेही जाण्यास मी तुम्हाला परवानगी देतो."

यावर त्या गुलामांचा म्होरक्या व अट्टल चोर पॅसामाँटेचा जिनेस बाकिच्यांच्या वतीने म्हणाला, "हे थोर उद्धारकर्त्या, आम्ही जे करावे अशी आपली इच्छा आहे, ते करणे पूर्णपणे अशक्य आहे–असंभवनीय आहे. जगाचे राज्य मिळत असले, तरी आम्ही सारे एकत्र कोणाच्या दृष्टीस पडणार नाही. आम्ही एकमेकापासून दूर गेले पाहिजे आणि कोणी इकडे, तर कोणी तिकडे, लपून–छपून राहिले पाहिजे. भूमिगत होऊन आम्ही कोनाकोपऱ्यांत दडून राहिले पाहिजे. कारण, माणसाची पारध करणारे ते दुष्ट लोक आरडाओरड करीत, आमचा पाठलाग करतील असे भय आहे. म्हणून या बाबतीत आम्ही एवढेच करू शकतो–आणि तेवढेच आम्ही करावे–की, टोबोसाची स्वामिनी डल्सीनिया हिला आम्ही जे धन्यवाद द्यावेत अशी आपली इच्छा आहे, त्याचे–ऐवजी आम्ही आपल्या कल्याणार्थ मेरीमातेची प्रार्थना–स्तोत्रे रात्रंदिवस, येता येता, युद्धाच्या नि शांततेच्या काळी, गात जाऊ. पण इजिप्तमधील त्या विलास–मंदिरात आम्ही परत जाऊ—म्हणजे पुनः बेड्या अडकवून घेऊ आणि ते पाठवितील त्या ठिकाणी परत जाऊ, अशी कल्पना करणे म्हणजे, आता सकाळचे दहा वाजले असताना रात्र पडली आहे, अशी कल्पना करण्याइतकेच खुळचटपणाचे आहे. आमच्याकडून तशी अपेक्षा धरणे हे एल्मच्या झाडापासून पेअर फळांची आशा करण्यासारखे आहे."

तेव्हा डॉन क्विक्झोट गरजले, "अरे रांडलेका, पॅरापिलाचा सर जिनेसेलो—

किंवा कोणतेही तुझे नाव असेना का--तू एकटा टोबोसाला जा, असा हुकूम, मी माझ्या समशेरीची शपथ घेऊन, तुला देतो. शेपटी भाजलेल्या कुत्र्याप्रमाणे आपल्या खांद्यावर सारा साखळदंड घेऊन तू स्वतः जा." जिनेस स्वभावतःच अत्यंत तापट होता. गुलामांना बंधमुक्त करण्यात दाखविलेल्या अचाट धाडसावरून डॉन क्विक्झोट फारसा शहाणा नाही हे त्याने ताडले होते. त्याने आपल्या सोबत्यांना डोळा घातला. अशा खुणा ओळखण्यात ते पटाईत होते. ते एकदम मागे वळले आणि डॉन क्विक्झोट-वर, डावीकडून व उजवीकडून, दगडांचा वर्षाव करू लागले. त्यापासून आपल्या ढालीने बचाव करण्याचे त्यांचे सारे कौशल्य व्यर्थ गेले. बिचारा रोझिनांट, टाच मारली तरी, जागचा हालेच ना-जणू तो घोडयाचा पुतळाच होता. सँको आपल्या गाढवाआड दडला. आपली हाडे खिळखिळी करणाऱ्या त्या शिला-वर्षावापासून त्याने आपला बचाव केला. त्याच्या धन्याला मात्र इतका मार बसला की, थोड्याच वेळात तो खोगिरावरून जमिनीवर कोसळला. तो खाली पडतो न पडतो तोच कैदी--विद्यार्थ्याने त्याच्यावर झडप घातली आणि त्याच्या डोक्यावरील पातेले काढून त्याचेच तीन-चार प्रहार त्याच्या खांद्यावर केले. अंगावर येणाऱ्या दगडांना तोंड देता देता ते पातेले फुटून गेले. नंतर त्यांनी त्यांचा वरचा डगला काढून घेतला आणि त्यांचे पायमोजेहि चोरले पण त्याच्य चिलखतामुळे त्यांचे काम थांबले. त्यांनी सँकोचाही अंगरखा काढून घेतला आणि त्याला जवळ जवळ उघडानागडा केला. त्या लुटीची वाटणी त्यांनी आपापसात केली आणि प्रत्येकजण आपापल्या वाटेने गेला. टोबोसोच्या लेडी डल्सीनियाकडे रखडत जाण्यापेक्षा, आपण पुनः पकडले कसे जाणार नाही आणि आपल्या हातात पुनः बेड्या कशा पडणार नाहीत, याचाच विचार ते करीत होते.

अशा प्रकारे, ते गाढव, तो रोझिनांट, तो सँको आणि ते डॉन क्विक्झोट-सारे-जण त्या मैदानाचे विजेते होऊन तेथे राहिले-पण अत्यंत वाईट स्थितीत. गाढवाने डोके खाली घातले होते आणि ते आपले कान वरचेवर हालवीत होते--जणुं काही दगडांचा वर्षाव अजून सू सू करीत आपल्यावर होत आहे असे वाटून ते गाढव चिंतातुर झाले होते. रोझिनांट खिन्नपणे पडून राहिला होता, त्याच्या स्वाराप्रमाणेच त्यालाही घाव बसले होते. धर्म-संरक्षक येतील या भयाने वस्त्रविहीन सँको थरथरा कापत होता--आणि डॉन क्विक्झोट यांचे अंतःकरण दुःखाने व्याप्त झाले होते. आपण ज्यांच्यावर इतके उपकार केले त्यांनीच आपल्यावर असे रानटी प्रहार करावेत, या विचाराने ते खिन्न झाले होते.

□ □

## प्रकरण ९

# या प्रमाणभूत इतिहास-ग्रंथातील अत्यंत दुर्मिळ असा साहसी प्रसंग. कृष्ण पर्वतामध्ये सुप्रसिद्ध डॉन क्विक्झोटवर ओढवलेला अनर्थ.

आपली अशी दुर्दशा झालेली पाहून डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाला म्हणाले, " सँको, अडाण्यावर दया करणे म्हणजे समुद्रात पाणी फेकणे होय, असे मी नेहमी ऐकत आलो आहे. मी जर तुझा सल्ला ऐकला असता तर माझी ही दुर्दशा टळली असती. पण आता काय त्याचे ? गोष्ट होऊन गेली. त्याबद्दल पस्तावा करून उपयोग नाही. पुढील काळासाठी हा मी इशारा समजतो. " तेव्हा सँको म्हणाला, ' दैव आंधळे असले म्हणजे असेच होते. पण महाराज, आपण माझ्यावर विश्वास ठेवला असता तर हे संकट टळले असते असे आपण म्हणता, म्हणून सांगतो की, आता तरी माझ्यावर विश्वास ठेवा म्हणजे याहून मोठे संकट टळेल. कारण, मी आपल्याला हे सांगितले पाहिजे की, धर्मगुरूंचे सैनिक आपल्या शिलेदारीला वचकून असत नाहीत— जगातील साऱ्या शिलेदारांना ते काडीचीही किंमत देत नाहीत. त्यांचे बाण माझ्या कानांजवळून सूं सूं करत जात आहेत, असे मला मघापासून वाटत आहे. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " सँको, तू स्वभावतःच भित्रा आहेस. पण मी हट्टी आहे आणि तुझा सल्ला कधी ऐकत नाही, असे तू म्हणू नयेस म्हणून मी तुझा उपदेश शिरसामान्य करतो. आणि एकदा तरी, तुला इतके भयभीत करणाऱ्या त्या भीषण सैनिकांच्या आटोक्यातून मी स्वतः दूर जातो. मात्र ते एका अटीवर. ती अट ही की, मी जिवंत असताना किंवा माझ्या मरणानंतर तू कोणाही मर्त्य प्राण्याला असे सांगता कामा नये की ' माझा धनी भीतीमुळे या संकटापासून पळाला. ' केवळ तुझ्या विनंतीला मान देण्यासाठी मी येथून निघून जात आहे, असेच तू सर्वांना सांगितले पाहिजेस. त्याच्या उलट काही सांगण्याचा तू कधी प्रयत्न केलास तर तू मला खोटा ठरवशील. मग या क्षणापासून जगाच्या अंतापर्यंत मी तुला खोटा ठरवीत राहीन. जोपर्यंत तू असे खोटे बोलत राहशील किंवा खोटे बोलण्याचे मनात आणशील तोपर्यंत मी तुझा खोटेपणा सदा उघडकीस आणीन. म्हणून तू या भानगडीत पडू नकोस. भयाच्या केवळ छायेमुळे मी कोणतेही संकट—विशेषतः प्रस्तुतचे—टाळले असे तू म्हणशील, तर मी येथेच एकटा खंबीरपणे उभा राहीन—मग माझ्या मदतीस कोणी नसेनात का. तुला ज्यांची इतकी धास्ती वाटते, त्या धर्मसैनिकांना मी एकटा तोंड देईन, एवढेच नव्हे तर सर्व धर्मगुरूंना

किंवा इस्रायलच्या बारा प्रमुखांना--मॅकाबीजच्या सात नेत्यांना- कॅस्टर आणि पोलक्स या मित्रद्वयाला— अलम दुनियेतील समस्त बंधूंना आणि बंधुभावाच्या संस्थांना— मी एकाकी तोंड देईन. ”

तेव्हा सँको म्हणाला, “ महाराज, आपल्या इच्छेप्रमाणे आपण येथून निघून गेला, तर त्याचा अर्थ ‘पळ काढला’ असा होणार नाही. आशेपेक्षा भीती बाळगण्याला जेव्हा सबळ कारण असते, तेव्हा तेथेच थांबणे हे काही शहाणपणाचे कृत्य ठरत नाही. शहाण्या माणसाने उद्या आपण जिवंत कसे राहू याचा विचार आज केला पाहिजे. आणि आपली सारी शक्ती एकाच प्रसंगी खलास करता कामा नये. मी जरी मूर्ख असलो, किंवा आपण म्हणता त्याप्रमाणे गांवढळ असलो, तरी खरे काय आहे, हे मला समजते, हे आपल्याला कळावे अशी माझी इच्छा आहे. मी नेहमी मुख्य मुद्याची गोष्ट संभाळतो. माझ्या म्हणण्याप्रमाणे वागण्यात आपल्याला काही लाज वाटण्याचे कारण नाही. आपल्याला शक्य असेल तर आपण घोड्यावर चढावे. मी आपल्याला हातभार लावतो. मग माझ्यामागोमाग आपण यावे. कारण, या वेळी आपल्या दोघांच्या चार हातांपेक्षा चार पायांचाच आपल्याला अधिक उपयोग होईल, असे माझ्या मनात एकसारखे येत आहे. ”

डॉन क्विक्झोट यांनी काही उत्तर न देता. रोझिनांटवर स्वार होण्यासाठी आपले पाऊल उचलले. सँको आपल्या गाढवावर बसून जवळच्या डोंगरी वाळवंटाकडे निघाला आणि त्याच्यामागोमाग डॉन क्विक्झोट जाऊ लागले. त्या डोंगराचे नाव होते सीरा मोरेना. तो ओलांडण्याचा बेत त्या चतुर सेवकाच्या मनात होता. तो डोंगर ओलांडून विसो किंवा कॅपोचा अल्माडोव्हर या दूरच्या ठिकाणी जाऊन पोचावे आणि तेथे पोचेपर्यंत त्या विशाल पर्वताच्या एखाद्या खडकाळ व अति दुर्गम स्थानी जाऊन लपून राहावे, म्हणजे धर्मगुरूंच्या सैनिकांच्या हातात आपण सापडणार नाही—असा सँकोच विचार होता. त्याने आपल्या गाढवावर खाद्यपदार्थांची जी पिशवी ठेवली होती, ती त्या लुटीतून वाचली होती, म्हणून तर तो या मार्गाने जाण्यास अधिक उत्सुक होता. त्या गुलामांनी लुटीसाठी कोपरान्कोपरा धुंडाळला होता हे लक्षात घेतले म्हणजे सँकोची पिशवी सुरक्षित राहिली, हा एक चमत्कारच म्हटला पाहिजे. पर्वताच्या अत्यंत वैराण अशा मध्यभागी हे आमचे दोन मुशाफीर जाऊन पोचण्यापूर्वीच रात्र पडली. तेथे काही दिवस—निदान आपले खाद्यपदार्थ पुरतील तोपर्यंत—आपण मुक्काम करावा असा सल्ला सँकोने आपल्या धन्याला दिला. त्याप्रमाणे त्या दोघांनी कॉर्क वृक्षांच्या गर्द राईत, दोन खडकांमध्ये, त्या रात्री मुक्काम ठोकला. परंतु खऱ्या श्रद्धेचा प्रकाश ज्यांना दिसत नाही त्यांच्या मताप्रमाणे, दैव हे आपल्या इच्छेनुसार साऱ्या घटना योजते आणि घडवून आणते; त्या दैवाने पॅसामॉंटेच्या जिनेसला नेमक्या त्याच स्थानी पाठविले. आपला पाठलाग होण्याचे भय त्याला वाटत होते हे योग्यच आहे. त्या भयाची तीव्रता कमी होईपर्यंत डोंगराच्या त्या भागात लपून राहण्याचे त्याने ठरविले. ( डॉन क्विक्झोट

यांच्या मूर्खपणामुळे व शौर्यामुळे या बदमाषाने त्यांना अपाय करण्याचे ठरविले होते. ) आमचे हे दोघे साहसी वीर जेव्हां झोपी गेले, त्याच सुमारास त्याला ते दिसले. दुष्ट माणसे नेहमी कृतघ्न असतात. एरवीं ज्या कृत्यांच्या केवळ विचाराने माणसे दचकतात, तीच कृत्ये करण्यास पुष्कळ माणसांना तातडीच्या निकडीमुळे प्रेरणा मिळते. आणि जिनेस तर कृतज्ञता व भूतदया यांना पूर्ण पारखा होता. सँकोचे गाढव घेऊन त्यावरून पळून जाण्याचा त्याने निश्चय केला. त्याच्या दृष्टीने रोझिनांटचा उपयोग, विक्री करण्यासाठी किंवा गहाण ठेवण्यासाठी, काहीच नव्हता. म्हणून बिचारा सँको घोरत पडला असताना, त्याच्या लाडक्या प्राण्याला घेऊन जिनेस पळून गेला. तो इतक्या वेगाने की, त्या अभागी मालकाच्या पाठलागापासून आपण आपल्या घबाडासह सुरक्षितपणे दूर आलो असे जिनेसला दिवस उजाडण्यापूर्वीच वाटले.

आता उषादेवता सस्मित मुद्रेने उदयास येत होती आणि साऱ्या पृथ्वीला आनंदित व चैतन्यमय करीत होती. पण हाय ! याच सकाळी सँकोला आपले गाढव चोरीस गेल्याचा शोध लागला आणि त्याचे त्याला भयंकर दुःख झाले आणि भय वाटू लागले. त्याने डोळे उघडताच्च त्याला दिसून आले की, आपले गाढव जाग्यावर नाही. आपल्या सौख्याचा प्रिय वाटेकरी आणि आपल्या प्रवासातील अत्यंत संतोषदायक जो सहचर त्याला आपण मुकलो, हे लक्षात येतांच जगात कोणी केला नसेल इतका दुःखपूर्ण आणि करुणापूर्ण विलाप त्याने सुरू केला. त्याच्या विवळण्यानें डॉन क्विक्झोट जागे झाले. तो म्हणाला, " अरे माझ्या पोटच्या गोळ्या ! माझ्या घरात जन्मलेल्या आणि वाढलेल्या जीवा ! माझ्या बालबच्चांच्या खेळगड्या ! माझ्या बायकोच्या सुखनिधाना ! माझ्या शेजाऱ्याच्या मत्सराचा विषय बनलेल्या प्राण्या ! माझा भार हलका करणाऱ्या सख्या ! माझ्या जीवनाच्या आधारस्तंभा ! नव्हे माझ्या जीवनाच्या अर्धांगा ! तुझ्यामुळे मी दररोज सव्वीस नाणी कमावित असे आणि माझ्या कुटुंबाचा अर्धाअधिक चरितार्थ चालवीत असे. "
या रडगाण्याचे कारण डॉन क्विक्झोट यांनी चटकन् ताडले आणि त्यांनी प्रेमळ व सांत्वनपूर्ण शब्दांनी त्याचे समाधान करण्याचा प्रयत्न केला. मानवी सौख्य किती क्षणभंगुर आहे, यावर त्यांनी विद्वत्तापूर्ण प्रवचनही दिलें. पण त्या कशाचाही परिणाम त्याचे दुःख हलके करण्याच्या कामी झाला नाही. मात्र आपल्या घरी असलेल्या पाच गाढवांपैकी तीन त्याला देण्यास आपल्या पुतणीला कळविण्याचे आश्वासन त्यांनी दिलें. तेंव्हां त्याचे दुःख ओसरले. या प्रभावी युक्तिवादाने सँकोच्या डोळ्यातील अश्रु आटले, त्याचे सुस्कारे व कण्हणें थांबले. आपल्या उदार धन्याने एवढा मोठा अकल्पित अनुग्रह केल्यामुळे सँकोने आपली कुरकुर थांबवून त्याला धन्यवाद दिले.

यानंतर ते उभयता त्या पर्वतावर भ्रमण करू लागले असताना डॉन क्विक्झोट एकदम आनंदाने उल्हसित झाले. कारण आपल्या शौर्याची चुणूक दाखविण्यासाठी नवे साहसी प्रसंग मिळण्याची आणि त्यामुळे आपली महत्त्वाकांक्षा तृप्त होण्याची आशा त्यांना वाटू लागली. अशा निर्जन प्रदेशात पूर्वी इतर शिलेदारांनी जे

आश्चर्यकारक पराक्रम केले होते, त्यांचे स्मरण डॉन क्विक्झोट यांना आपल्या समोरची विस्तीर्ण मैदाने पाहून झाले. हवेतील त्या कल्पनांनी त्यांचे मन भारले गेले आणि म्हणून ते दुसऱ्या कशाचाही विचार करीनासे झाले. पण सँकोला भूक होती प्रत्यक्ष अन्नाची. धर्मगुरूंच्या सैनिकांच्या तावडीतून आपण पूर्णपले सुटलो आहोत असे समजून, त्याने आता आपल्याजवळ शिल्लक असलेल्या खाद्यपदार्थांनी आपले पोट भरण्याकडे लक्ष दिले. आपल्या गाढवावर¶ एका बाजूस पाय टाकून, बायकांप्रमाणे बसून, त्याने मांसाचा एक तुकडा गुपचूप काढून घेतला आणि तसाच दुसराही घेतला--आणि आपल्या पायांपेक्षा आपले दात जोराने चालविले. अशा तऱ्हेने त्याचे खाद्यकर्म चालू असतांना कोणत्याही साहसी प्रसंगाकडे त्याचे लक्ष जाणे शक्य नव्हते.

अशा खाद्यकार्यात सँको मग्न असताना त्याला असे दिसून आले की, जमिनीवर पडलेली काही वस्तू आपला धनी आपल्या भाल्याच्या टोकाने वर उचलण्याचा प्रयत्न करीत आहे. हे पाहून तो आपल्या धन्याच्या मदतीस धावला. तेथे एक गाठोडे होते. त्यात काही कपडे आणि खोगीराची बैठक होती. हवेत उघडे पडल्याने ते सारे कपडे अगदी कुजलेले होते. त्यातील कपड्यांची पिशवी काहीशी जड होती. ती साखळीने व कुलुपाने बंद केलेली होती. तिच्यात काय आहे, हे पाहण्यास डॉन क्विक्झोट यांनी सँकोला फर्मावले. त्या बंद पिशवीच्या फटीतून सँकोला आत काय आहे, हे सहज दिसले. त्याने त्या पिशवीतून चार तलम शर्ट आणि स्वच्छ व सुरेख लोकरीचे कापड ओढून बाहेर काढले. त्याशिवाय हातरुमालात बांधून ठेवलेले बरेचसे सोनेही त्याने बाहेर काढले. ते पाहून सँको आनंदाने ओरडला, "धन्य माझे नेत्र! आमच्या आयुष्यात एकदा तरी असा भाग्याचा प्रसंग ईश्वराने निर्माण केला म्हणून आभार मानतो मी त्याचे." असे म्हणून त्याने ती कपड्याची पिशवी आणखी चाचपून पाहिली, तेव्हा त्याला सुंदर बांधणीचे एक पुस्तक आढळले. डॉन क्विक्झोट म्हणाले, "ते मला दे आणि सोने तू घे." सँकोने आपल्या धन्याच्या हाताचे चुंबन घेतले आणि लोकरीचे कपडे वगैरे वस्तू त्याने आपल्या खाद्यपदार्थांच्या थैलीत भरल्या. "परमेश्वर महाराजांना बक्षिस देवो." असे तो उद्गारला. डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझा असा तर्क आहे की, कोणी तरी वाटसरू या डोंगरामध्ये आपली वाट चुकला असावा आणि दरोडेखोरांच्या तावडीत सापडला असावा. त्यांनी त्याला ठार मारले असेल आणि त्याचे शरीर येथेच जवळपास पुरले असेल." सँकोने उत्तर दिले, "महाराज, आपला तर्क खचित चुकीचा आहे. ते जर दरोडेखोर असते तर अशी लूट मागे ठेवून ते गेले नसते." डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, "बरोबर आहे तुझे म्हणणे. हे काय असावे याचा मला तर्क करता येत नाही. पण थांब. मी ते पुस्तक

---

¶ ही उघडच चूक आहे. त्याचे गाढव हरवले होते. पण इतिहासकार कशा चुका करतात, याची चेष्टा करण्याकरता लेखकाने ही चूक मुद्दाम केली असावी.

पाहतो म्हणजे कदाचित् आपल्याला जे शोधून काढावयाचे आहे, त्याला उपयोगी पडेल असे काही लिहिलेले त्यात सापडेल.'' असे म्हणून त्यांनी ते पुस्तक उघडले. त्यात त्यांना प्रथम दिसले ते एक चतुर्दशक काव्य. त्याचा तो कच्चा खर्डा होता. तो सहज वाचता यावा अशा बऱ्या रीतीने लिहिलेला होता. म्हणून त्यांनी तो मोठ्याने वाचला. आपल्याप्रमाणेच सँकोलाही त्यात काय आहे हे कळावे, हा त्यांचा उद्देश.

**निर्धार** ( एक चतुर्दशक )

ज्याला आमच्या वेदना कधीही कळत नाहीत असा प्रणय हा एक देव आहे,
अथवा क्रौर्य हेंच त्याचें प्रिय लक्षण आहे;
अन्यथा त्यानें मला तक्रार करण्यास भाग पाडलें नसतें,
आणि माझ्या तीव्र यातनांचें कारण त्याचा दुष्टपणा असें म्हणण्यास.
पण खरोखर प्रणय हा जर देव असेल तर त्याला असायला हवें
त्याच्या शक्तीइतकेंच ज्ञानही;
आणि देवाला अन्यायी मानणें हा गुन्हा आहे;
मग आतां माझें हृदय फाडून खाणाऱ्या वेदना येतात कोठून ?
फिलिसकडून ? नाहीं. मी कां थबकतो ?
अशा दुष्ट व्यथाना इतकें मधुर कारण कधीच असत नाही;
किंवा देवांकडूनही असा छळ आम्हीं सोशीत नाही.
तेव्हां मृत्यूच माझा तात्काल दुःखपरिहार करो,
जेव्हा आम्ही अशा अज्ञात आपत्ती भोगतो,
निराशेला तोच सर्वांत जवळचा मार्ग.

सँको म्हणाला, "यातील फिल कोण, हे कळले नाही तर या कवितेतून कोणता अर्थ काढता येईल कोण जाणे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी फिल म्हटले नाही, फिलिस म्हटले." सँको म्हणाला, "असे का ? मग या माणसाने आपली फटाकडी मुलगी गमावली असेल." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, या चतुर्दशकाचा कर्ता बऱ्यापैकी कवी असेल असे दिसते. त्याचे प्रेम ज्या स्त्रीवर होते, तिचे नाव फिलिस असे आहे. हे माझे म्हणणे खोटे असेल, तर मला फारशी अक्कल नाही असे म्हटले पाहिजे." सँकोने विचारले, "कविता कशा कराव्या हेही आपल्याला माहीत आहे काय, महाराज ?" डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "होय, मी कविता करतो– तुला वाटत असेल त्यापेक्षा चांगल्या कविता करतो. माझी हृदयस्वामिनी – टोबोसाची डल्सीनिया– हिला देण्यासाठी मी जेव्हा तुला संपूर्ण काव्यमय पत्र देईन, तेव्हा तुला हे कळून येईल. मित्रा सँको, प्राचीन काळी होऊन गेलेले सर्व– निदान बहुसंख्य शिलेदार महाकवी होते– महागायकही होते– हे मी तुला सांगितले पाहिजे. प्रेमासाठी करावयाच्या पराक्रमाला हे दोन गुण– किंवा देणग्या अथवा लक्षणे– असणे अत्यंत अगत्याचे असते. पण मी हे कबूल केले पाहिजे की, प्राचीन काळच्या शिलेदारांच्या कविता विचारांनी

आणि कल्पनांनी जितक्या भरलेल्या असत, तितक्या सभ्यतेने किंवा शब्दालंकारांनीं मुळींच मंडित नसत."

सँको म्हणाला, "महाराज, पुनः एकदा त्या पुस्तकात पहा. म्हणजे आपल्याला जी माहिती पाहिजे आहे, ती कदाचित् मिळू शकेल." हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी पुस्तकाची काही पाने चाळली आणि ते म्हणाले, "येथे काही गद्य मजकूर आहे. तो प्रेमपत्राचा मसुदा असावा, असे मला वाटते." सँको आनंदाने ओरडला, "वाः महाराज, कसेही करून ते वाचाच. प्रेमकथा ऐकण्यात मला फार आनंद वाटतो."

डॉन क्विक्झोट यांनी ते पत्र मोठ्यांदा वाचले. त्यात पुढील मजकूर होता--

"तुझ्या वचनभंगामुळे आणि माझ्या निराशेमुळे मी तुझ्यापासून त्वरेने दूर होत आहे. लवकरच तुला माझ्या तक्रारीऐवजी माझ्या मृत्यूची बातमी ऐकायला मिळेल. हे कृतघ्न सुंदरी! माझ्यापेक्षा श्रीमंत असणाऱ्या, पण तू टाकलेल्या या तुझ्या बंद्या गुलामापेक्षा कमी योग्यता असलेल्या माणसासाठी तू माझा त्याग केला आहेस. तुझ्यासारख्या अविचारी स्त्रियांनी सद्‌गुणांची योग्यता जाणून त्यांना अमूल्य ठेवा मानले, तर इतरांच्या संपत्तीचा हेवा करण्यास मला काही कारण राहणार नाही आणि मग मी माझ्या दुर्दैवाबद्दल विलाप करीत बसणार नाही, हे सांगण्याचे मी धाडस करतो. तुझ्या सौंदर्याने माझ्या मनी-मानसी जी लालसा निर्माण केली, ती तुझ्या कृतीने धुळीस मिळविली. तुझ्या सौंदर्यामुळे मी तुला स्वर्गांगना मानण्याची चूक केली, पण तुझ्या कृतीमुळे माझी खात्री पटली की, तू केवळ एक स्त्री आहेस. तथापि हे सुंदरी, माझ्या मनःशांतीचा विध्वंस करणारी तू असलीस तरी तुला अखंड सुखसमाधान लाभो, अशी माझी प्रार्थना आहे. तुझ्या पतीचा बेइमानपणा क्षमाशील प्रभू झाकून ठेवो. नाही तर तुला पश्चात्ताप होईल आणि माझ्यासारख्या विश्वासू प्रियकरावर अन्याय केल्याबद्दल सुस्कारे सोडण्याची पाळी येईल. त्या अन्यायामुळे सूड घेण्याची प्रेरणा मला होईल, पण तो घेण्याची मला इच्छा नाही. रामराम!"

डॉन क्विक्झोट म्हणाले, "आपल्याला ज्या गोष्टींची माहिती पाहिजे आहे, त्यांचा काही अधिक सुगावा या पत्राने लागत नाही. त्यावरून मी एवढाच तर्क करू शकतो की, हे पत्र लिहिणारा माणूस म्हणजे एक फसलेला प्रियकर होता." नंतर पुस्तकाची बाकीची पाने त्यांनी चाळली, तेव्हा त्यांना पुष्कळ पत्रे व कविता आढळल्या. त्यांपैकी काही सुवाच्य होत्या तर काही कशा तरी खरडलेल्या होत्या. त्यांचा काही अर्थ त्यांना लागत नव्हता. त्यांनी जे वाचले, त्यामध्ये त्यांना आरोप, तक्रारी आणि कान-उघाडणी, अविश्वास आणि मत्सर, आनंद व असंतोष, मेहरबानी आणि तिरस्कार-याशिवाय दुसरे काही आढळले नाही. सुखद अनुभवांची मोठी प्रशस्ती केलेली होती आणि दुःखद अनुभवांबद्दल संताप व्यक्त केलेला होता. त्या पुस्तकात शिलेदारानी लक्ष घातले असताना सँको कपड्यांची कातडी पेटी आणि खोगीर अत्यंत बारकाईने तपाशीत होता. एकही कोपरा किंवा शिवण अथवा लोकरीची गुंडी तपासण्याचे त्याने बाकी ठेवले

नव्हते. त्याला जे सोने सापडले होते, त्याची किंमत शंभर ड्यूकॅटपेक्षा अधिक होती. त्या लाभामुळे त्याची लोभवासना उत्तेजित झाली आणि अधिक सोने मिळविण्याची हाव त्याला सुटली. पण त्याला एवढेच सापडले. तरी आपण आतापर्यंत जे प्रचंड सायास केले, त्याचा आपल्याला चांगला मोबदला मिळाला असे त्याला वाटले. धोंगड्या-मध्ये आपली झालेली उचलबांगडी, रसायनामुळे आपल्याला झालेला त्रास, गुलामांनी दिलेले शिव्याशाप, हलकट हमालांनी लगावलेले ठोसे, आपला अंगरखा, आपली आवडती पिशवी आणि सर्वांपेक्षा आपले लाडके गाढव यांचा झालेला वियोग, तसेच आपल्या कृपाळू धन्याच्या सेवेमध्ये आपल्याला सोसावी लागलेली तहानभूक व परिश्रम यांपैकी कशाबद्दलही त्याला आता दुःख होत नव्हते. उलट, 'दुःखी चेहऱ्याच्या शिलेदारा' ला अशी विलक्षण इच्छा होती की, या कातडी पिशवीचा मालक कोण आहे हे आपल्याला कळावे. त्याच्या कविता, पत्र, लोकरीचे कपडे आणि सोने यावरून त्यांनी अंदाज बांधला की, ही असामी मोठ्या योग्यतेची असावी, पण त्याच्या हृदयस्वामिनीने केलेल्या तिरस्कारामुळे आणि कठोरपणामुळे तो निराशेच्या गर्तेत लोटला गेला असावा. शेवटी त्यांनी त्यासंबंधी विचार करण्याचे सोडून दिले. त्या विस्तीर्ण अरण्यात त्यांना एकही माणूस दिसेना. ते आपल्या घोड्यावर स्वार झाले—रोझिनांट नेईल तिकडे जाऊ लागले. तो गंभीर व शहाणा प्राणी सरळ व सपाट रस्ताच नेहमी पसंत करीत असे. त्याच्या धन्याला अजून असा ठाम विश्वास होता की, त्या वैराण अरण्यात आपल्याला काही आश्चर्यकारक साहस करण्याचे प्रसंग खचित मिळतील.

अशा आशा-आकांक्षांनी त्यांचे मन भारले गेले असतानाच त्यांच्या दृष्टीस एक माणूस पडला. तो एका उंच सुळक्यावर उड्या मारीत चालला होता. खडका-खडका-वरून आणि झाडा-झुडुपांवरून, तो विलक्षण चलाखीने उडया मारीत होता. कमरेपासून त्याचा वरचा भाग उघडा दिसत होता. त्याची दाढी जाड व काळी-कुळकुळीत होती आणि त्याचे लांब केस एकमेकात गुंतलेले होते. त्याचे डोके, पाय आणि मांड्या उघड्या होत्या. त्याच्या कमरेला जो चोळणा होता, त्याचा रंग विटका होता. तो जागोजाग इतका फाटलेला होता की, पुष्कळ ठिकाणी त्याचे अंग दिसत होते., तो जात असताना डॉन क्विक्झोट यांनी त्याची ही सारी लक्षणे निरखून पाहिली आणि त्याला गाठण्यासाठी ते त्याच्यामागोमाग गेले. त्या कातडी पेटीचा मालक हाच असावा, असा अंदाज त्यांनी तत्काळ बांधला. पण रोझिनांट मूळचाच थंड नि सुस्त! अशा शीघ्रगती भुताबरोबर शर्यत लावण्याचे त्राण त्याच्या अंगी कोठून येणार? तरीसुद्धा त्या दुर्दैवी प्राण्याचा शोध लावण्याचा निश्चय 'दुःखी चेहऱ्याच्या शिलेदारा'ने केला, मग त्यासाठी तब्बल वर्ष लागले तरी बेहेत्तर. म्हणून त्यांनी सँकोला, पर्वताच्या एका बाजूने तलास करण्यास फर्मावले आणि आपण स्वतः दुसऱ्या बाजूने तपास करण्यास ते निघाले.

सँको म्हणाला, "महाराज, मला क्षमा करा. पण मला हे सांगू द्या की, आपल्यापासून मी तिळभर दूर गेलो तरी मी भीतीने अर्धमेला होतो. म्हणून आपण

यापुढे मला आपल्यापासून नखभरसुद्धा दूर जाण्यास सांगू नये." शिलेदारसाहेब म्हणाले, "ठीक आहे. मी तुझ्या सूचनेचा विचार करीन. सँको, माझ्या पराक्रमावर तू इतका विसंबून आहेस हे पाहून मला वाईट वाटत नाही. मी तुला आश्वासन देतो की, तुझ्या कुडीतुन तुझा आत्मा भीतीने बाहेर पडण्याची वेळ आली, तरी मी माझ्या पराक्रमाने तुझे संरक्षण करीन. म्हणून ये, माझ्यामागून ये. पावलापावलाने पण त्वरेने ये. आपण या खडकाचा कोपरान्कोपरा शोधून काढू. तुझी नजर चौफेर फिरू दे. येथेच तो दुर्दैवी प्राणी--या कातडी पिशवीचा धनी-भेटण्याचा संभव आहे."

सँको म्हणाला, "छेः छेः महाराज, त्याच्या वाटेतून मला दूर जाऊ द्या. कारण आपण जर त्याला भेटलो आणि त्याने जर या चामडी पिशवीवर आपला हक्क सांगितला, तर मला मिळालेले पैसे सोडून देणे भाग पडेल, हे अगदी उघड आहे. यामुळे मला असे वाटते की, आपण आता काही गडबड करू नये. ते पैसे मी माझ्याजवळ शहाजोगपणे ठेवावेत. कोणाच्या मागे नाचत न जाता, सहजगत्या आपल्याला त्या पिशवीचा खरा धनी सापडेपर्यंत, हे पैसे माझ्याजवळच राहू देत. ते सारे आपण खर्च करीपर्यंत तो धनी भेटण्याचा संभव नाही. नंतर तो भेटला तर मी कायद्याच्या कचाट्यातून मोकळा होईन, आणि त्यालाही नुसते शीळ घालीत जावे लागेल." डॉन क्विक्झोट म्हणाले, "चुकतो आहेस तू, सँको, या पिशवीचा धनी कोण आहे, हे समजण्यास आपल्याला काही कारण मिळाले आहे. अशा वेळी त्याचा शोध घेऊन ती पिशवी त्याला परत करणे हे आपले कर्तव्य होय. शिवाय या मालमत्तेचा मालक तो आहे, असा आपला ठाम समज असताना त्याला भेटण्याची खटपट आपण केली नाही तर आपण चोर ठरू. आणि ती मालमत्ता ज्याची गमावली आहे असा संशय आपण बाळगतो, तेच लोक तिचे खरे मालक आहेत असे ठरेल. म्हणून मित्रा सँको, त्याचा शोध करण्यामुळे तू फार कासावीस होऊ नकोस. आपल्याला जर तो सापडला, तर माझ्या मनाला परम शांती मिळेल." असे म्हणून त्यांनी रोझिनांटला टाच मारली आणि सँको नाराज असला तरी त्यांचेमागोमाग निघाला. आपल्या धन्याने आपल्याला तीन गाढवे देण्याचे कबूल केले आहे, या आशेवर तो संतुष्ट होता.

त्या पर्वताचा पुष्कळसा भाग त्या दोघांनी पायाखाली घातल्यानंतर ते एका ओढ्याजवळ आले. तेथे एक खेचर मरून पडले होते. त्याचे खोगीर व लगाम जवळ पडले होते. त्याचे निम्मेशिम्मे शरीर लांडग्या-गिधाडांनी खाल्ले होते. या शोधामुळे त्या दोघांची खात्री झाली की, आपल्यापासून चपळाईने पळून गेलेला माणूस या खेचराचा व कातडी पिशवीचा मालक असावा, हा आपला संशय खरा आहे. ते तेथे थांबले असताना आणि या गोष्टीचा विचार करीत असताना, शेळ्या राखणाऱ्या धनगरासारखी शीळ त्यांचे कानी आली. आणि लगेच त्यांना आपल्या डाव्या बाजूस डोंगरमाथ्यावर शेळ्यांचा मोठा कळप दिसला. त्यांच्या मागे एक म्हातारा गुराखी होता. याला डॉन क्विक्झोट यांनी हाक मारून खाली बोलावले. पण त्यांना काही उत्तर न

देता त्या मेंढपाळाने अत्यंत मोठ्या आवाजाने त्यांना विचारले, "तुम्ही या अरण्यात कसे आला ? शेळ्या, लांडगे आणि इतर हिंस्र पशू यांच्याशिवाय दुसरा कोणी जिवंत प्राणी येथे कधी फिरकत नाही." सँकोने उत्तर दिले, "आम्ही आहो तेथे तू आलास तर याचा खुलासा करून आम्ही तुझे समाधान करू." हे ऐकून तो मेंढपाळ त्यांचेकडे खाली आला. ते दोघे त्या खेचराच्या मढ्याकडे पहात आहेत, हे दृष्टीस पडताच तो म्हातारा म्हणाला, "हे मढे गेले सहा महिने याच जागी पडून आहे. पण महाराज, मला मेहेरबानी करून सांगा, त्याचा मालक तुम्हाला वाटेत कुठे भेटला नाही काय ?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "आम्हाला कोणी भेटले नाही, पण येथून जवळच आम्हाला एक चामड्याची पिशवी आणि खोगीराची बैठक सापडली." मेंढपाळ म्हणाला, "ती मीही पाहिली होती. पण तिला स्पर्श करण्याचे धाडस मी केले नाही—तिच्याजवळही मी गेलो नाही. तिच्यातील वस्तूंची चोरी मी केली असा आरोप माझ्यावर येईल, या भयाने मी दूर राहिलो. केव्हा काय घडेल हे कोणी सांगावे ? सैतानाचे मार्ग सूक्ष्म असतात. काही वेळा तो आपल्याला मोह पाडण्यासाठी आपल्या वाटेत आमिषे टाकतो, तर काही वेळा आपण अडखळून पडावे असे दगडधोंडे फेकतो." सँको म्हणाला, "मलाही असेच वाटले. मीदेखील ती पिशवी पाहिली—अगदी दोन हातांवर ती होती—पण मी ती टाकून दिली—अजून ती तेथेच असेल. जो मेंढा चोरतो, तो त्या मेंढ्याच्या गळ्यातील घंटेमुळे सापडतो." डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "इमानी दोस्ता, या वस्तूंचा मालक कोण आहे हे तुला माहीत आहे काय, हे मला सांग."

मेंढपाळाने उत्तर दिले, "या प्रकरणी मला जी माहिती आहे ती एवढीच की, उणेपुरे सहा महिने झाले असतील त्या गोष्टीला. इथून आठ–दहा मैलांवर एक सुडौल बांध्याचा, उत्तम पोशाख केलेला, तरुण, सभ्य माणूस मेंढ्यांच्या कळपात आला. येथे मरून पडलेल्या खेचरावर तो बसलेला होता आणि त्याच्यावर उशी नि कपड्याचे गाठोडे होते. ते तुम्ही पाहिले आहे पण त्याला स्पर्श केला नाही, असे म्हणता. त्या तरुणाने आम्हाला विचारले, "या डोंगराचा कोणता भाग अत्यंत ओसाड आणि निर्जन आहे ?" तेव्हा आता आपण जेथे उभे आहो, तो भाग आम्ही त्याला दाखविला. आम्ही त्याला निखालस सत्य सांगितले की 'येथून तुम्ही मैल-दीड मैल जाण्याचे जरी धाडस केले तरी तुम्ही ताबडतोब काही परत येऊ शकणार नाही असा हा प्रदेश आहे. येथपर्यंत तरी तुम्ही कसे आला, याचेच मला नवल वाटते. कारण इकडे येण्यास राजमार्ग नाही की पायवाट नाही.' आमचे उत्तर ऐकताच तो तरुण माणूस आपल्या खेचराचे तोंड वळवून आम्ही दाखविलेल्या जागेकडे आला. त्याच्या देखणेपणामुळे आम्ही चकित झालो होतो. त्याचा तो प्रश्न ऐकून आणि डोंगराच्या मध्यभागी येण्यासाठी त्याने केलेली घाई पाहून आम्हाला मोठा अचंबा वाटला. नंतर बराच काळ त्याच्याविषयी आमच्या कानावर काही पडले नाही. पण एके दिवशी एक धनगर सहज इकडे येत असताना त्याच्यावर हा तरुण तुटून

पडला. का ? कशासाठी ? हे काही न सांगता त्या तरुणाने धनगराला निर्दयपणे बडविले. नंतर आमचे खाद्यपदार्थ नेणाऱ्या गाढवाकडे तो गेला आणि तेथे असलेल्या साऱ्या रोट्या आणि लोणी त्याने बळकावले नि आश्चर्यकारक वेगाने तो डोंगराकडे धावत परत गेला. हे वृत्त समजल्यावर आमच्यापैकी पुष्कळजणांनी त्याचा शोध घेण्याचे ठरविले.

या निबिड अरण्यात जवळजवळ दोन दिवस खर्च केल्यानंतर एका भल्या मोठ्या कॉर्क वृक्षाच्या ढोलीत लपून बसलेला तो आम्हाला अखेरीस सापडला. तेथून तो बाहेर आला आणि शक्य तितक्या सौम्य मुद्रेने आम्हाला भेटला. पण तेव्हा तो इतका बदलला होता, त्याचा चेहरा इतका कुरूप, फिकट आणि उन्हाने कोळपलेला होता की, आम्हां 'तोच हा' हे मुळीच ओळखू शकलो नसतो. पण त्याचे कपडे फाटके-तुटके असले तरी पहिलेच होते. त्या लक्तरांवरून आम्ही त्याला ओळखले. त्याने आम्हाला आदबीने सलाम केला आणि मोजक्याच पण अत्यंत सुंदर शब्दांनी आम्हाला सांगितले, "मला असे पाहून चकित होऊ नका. मी केलेल्या महापातकाचे प्रायश्चित्त म्हणून मी तप करीत आहे आणि म्हणून अशा स्वरूपात तुम्हाला दिसत आहे." "आपण कोण आहा, हे आम्हाला सांगा," अशी आम्ही त्याला प्रार्थना केली. पण तो मुळीच सांगेना. तेव्हा आम्ही त्याला म्हटले, "तुमचे ठिकाण कोणते ? तुम्ही आम्हाला कोठे भेटाल, हे सांगा. म्हणजे तुम्हाला जेव्हा खाद्यपदार्थांची गरज असेल, तेव्हा ते आम्ही तुम्हाला खचित आणून देऊ. नाही तर या ओसाड प्रदेशात तुमची उपासमार होईल. बरे, तुमच्या मुक्कामाचे ठिकाण सांगावयाचे नसले तर नका सांगू, पण तुम्हाला जे काही पाहिजे असेल, ते आमच्याकडे येऊन मागा. पूर्वीप्रमाणे बळजोरीने घेऊ नका." आमच्या या मदतीबद्दल त्याने आमचे हार्दिक आभार मानले आणि धनगराला केलेल्या दुखापतीबद्दल माफी मागितली. "यापुढे मी कोणावर हल्ला न करता तुमच्याकडे भीक मागेन. माझ्या मुक्कामाचे ठिकाण नक्की नाही. मी जेथे असताना रात्र पडते, तेथे मी पहुडतो." या भाषणाचे शेवटी त्याने अशा काही दुःखाच्या गोष्टी सांगितल्या की, त्याबद्दल आम्हाला जर काही हळहळ वाटली नसती आणि आम्ही जर त्याला सोबत केली नसती, तर आम्ही पाषाणहृदयीच ठरलो असतो.

आम्ही त्याला पूर्वी पाहिले होते, त्यापेक्षा तो आता अगदीच पालटला होता. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे तो अत्यंत सुंदर, देखणा होता, आणि त्याच्या बोलण्या-चालण्यावरून तो थोर कुळात जन्मलेला असावा असा आम्ही कयास केला. त्याचे शरीर चांगले सुदृढ होते. आम्ही जरी अडाणी असलो तरी त्याच्या सभ्य वर्तनाचा आमच्या मनावर पगडा बसल्याशिवाय राहिला नाही. बोलता बोलता तो एकदम थांबला--जणू मुकाच झाला आणि जमिनीकडे टक लावून पाहू लागला. आम्ही सारेजण आश्चर्यचकित होऊन ताडकन् उठून उभे राहिलो. बराच वेळ टक लावून पाहिल्यानंतर त्याने आपले डोळे मिटले, नंतर ते पुनः उघडले, आपले ओठ चावले, भुवया आकुंचित केल्या आणि आपल्या मुठी आवळल्या. थोड्या वेळापूर्वी त्याने आपले शरीर जेथे

पसरले होते, त्या जमिनीवरून तो उठला आणि आपल्याजवळ उभ्या असले
माणसावर इतक्या त्वेषाने धावून गेला की, आम्ही जर त्याला मोठ्या ब
बाजूस ओढले नसते, तर त्याने त्या माणसाला चावून आणि ब
ठारच केले असते. तो एकसारखा ओरडत होता, "अरे, बेइमान फर्डिनांड
माझ्यावर जो अन्याय केला आहेस, त्याचे प्रायश्चित्त तुला येथे–येथेच द्यावे लागेल,
लबाड हृदय मी उपसून बाहेर काढतो." आणखीही पुष्कळ तो बोलला, त्या फर्डिनांड
निंदानालस्ती करणारे शब्द त्याने तोंडावाटे काढले. त्यानंतर एक शब्दही न बोल
जाळ्या—झुडुपांवरून वेगाने उड्या मारीत तो तेथून झपाट्याने निघून गेला, त्या
त्याच्याजवळ जाणे आम्हाला शक्य झाले नाही. आम्ही ताडले की, त्याला वेडाचे झ
येत असावेत आणि त्याची अशी अवस्था होण्याचे कारण फर्डिनांड नावाच्या माणस
त्याचे काही तरी वाकडे केले असावे. पुनः पुनः आमचा हा ग्रह कायम झाला. जे
तो शुद्धीवर असतो, तेव्हा तो आमच्याकडे येतो आणि अन्नाची भीक मागतो. आ
त्याला अन्न दिल्यावर डोळ्यात अश्रू आणून तो आम्हाला धन्यवाद देतो. पण एक
का त्याला वेडाचा झटका आला, म्हणजे तो आम्हाला मारीत सुटतो. मग आम्ही त्या
नम्रपणाने मांसाहार देऊ केला तरी तो थाबत नाही. महाराज, मी आपल्याला
सांगतो की, आम्ही पाचजण आहो. त्यातील दोघे माझे नोकर आहेत आणि दोघे दो
आहेत. आम्ही सर्वांनी काल असे ठरविले की, सरळ मार्गाने किंवा दांडगाईनेही त्या
शोधून काढावयाचे आणि पकडावयाचे, नंतर वीस–पंचवीस मैल दूर असलेल्या आल
डोव्हर शहरात त्याला न्यावयाचे आणि शक्य तर त्याला बरे करावयाचे. तो ताळ्या
असताना त्याला विचारावयाचे, 'तू कोण आहेस? आणि तुझे कोणी मित्र आ
काय?' ते कळले म्हणजे आम्ही त्याला त्या मित्रांकडे पाठवावयाचे ठरविले आ
याबाबतीत मला माहिती आहे ती एवढीच. तुम्हाला वाटेत ज्या वस्तू आढळल्या त्यां
मालक तोच आहे. तुमच्याजवळून वेगाने निघून गेलेला हाच माणूस आहे, असे
आपल्याला खात्रीने सांगतो." खडकावरून उड्या मारीत जाताना तो माणूस आ
पाहिल्याचे डॉन क्विक्झोट यांनी मेंढपाळाला एव्हापर्यंत सांगितले होते.

मेंढपाळाने सांगितलेली कहाणी ऐकून शिलेदाराना फार चिंता वाटू लागल
कितीही वेळ लागला आणि कितीही दुःख सोसावे लागले तरी या अभागी वेड्याचा श
लावण्याचा त्यांनी पुनः निश्चय केला. त्यांच्या अपेक्षेपेक्षा दैव त्यांना त्यां
इच्छापूर्तीच्या बाबतीत अधिक अनुकूल होते. कारण त्यांचे असे संभाषण चालू असताना
ते उभे होते त्या जागेच्या विरुद्ध दिशेला, तो त्यांना दिसला. खडकाच्या सुळक्याव
तो त्यांचेकडे येत होता आणि स्वतःशी काही तरी पुटपुटत होता. ते त्याच्याजवळ
असते. तरी तो काय पुटपुटत होता, हे त्यांना कळले नसते; मग इतक्या दुरून त्या
पुटपुटण्याचा आशय त्यांना कसा कळणार? तो जवळ आला तेव्हा डॉन क्विक्झ
यांना दिसले की, पूर्वी वर्णन केलेलाच पोशाख त्याच्या अंगावर होता. पुष्कळ ठिका

फाटलेले कातडी जाकीट त्याच्या अंगावर होते. पण त्याच्या अंगाला चंदनाचा वास येत असल्याचे शिलेदाराना आढळले. त्यावरून आणि त्याच्या इतर कपड्यांवरून तो मोठा प्रतिष्ठित माणूस असावा असा तर्क त्यांनी केला. त्यांच्याजवळ येताच त्या दुर्दैवी प्राण्याने त्याना अत्यंत नम्रतेने प्रणाम केला आणि घोगऱ्या आवाजात काही शब्द उच्चारले. डॉन क्विक्झोट यांनीही तितक्याच नम्रपणाने त्याला अभिवादन केले आणि रोझिनांटवरून खाली उतरून त्याचे स्वागत मोठ्या गौरवाने केले; एवढेच नव्हे तर, जणू काही तो आपला जिवलग मित्र आहे, अशा भावनेने त्यांनी त्याला प्रेमाने कवटाळले. डॉन क्विक्झोट हे जर 'दुःखी चेहऱ्याचे शिलेदार' असतील, तर आपण या तरुणाला 'फाटक्या कपड्यातील शिलेदार' असे म्हणण्याचे धाडस करू या. डॉन क्विक्झोट यांच्या मिठींतून सुटल्यानंतर तो तरुण किंचित मागे सरला आणि त्या वीरपुरुषाच्या खांद्यावर हात ठेवून त्याच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात उभा राहिला—जणू काही त्यांना त्याने पूर्वी पाहिले असावे आणि त्याची आठवण तो करीत असावा. त्याची दुर्दशा डॉन क्विक्झोट यांनी पूर्वी जशी निरखून पाहिली, तशीच डॉन क्विक्झोट यांची मुद्रा, विलक्षण आकृती आणि त्यांचे चिलखत तो न्याहाळून पाहात होता आणि विस्मयचकित होत होता. असा थोडा वेळ गेल्यानंतर त्या 'फाटक्या कपड्यातील शिलेदाराने' आपले तोंड प्रथम उघडले. नंतर तो काय म्हणाला, हे या कथेच्या पुढील भागत तुम्हाला वाचावयास सापडेल.



## प्रकरण १०

# सीएरा मोरेना डोंगरातील आणखी काही धाडसी प्रसंग

या इतिहासात पुढे असे निवेदन केले आहे की, डोंगरातील त्या संकटग्रस्त शिलेदाराचे बोलणे डॉन क्विक्झोट यांनी मोठ्या आस्थेने ऐकले. त्या शिलेदाराने त्यांना पुढील शब्दांत धन्यवाद दिले– " ( आपण कोण आहा, हे मला माहीत नाही. ) महाराज, आपण कोणीही असा, पण आपण सभ्यतेचे व मैत्रीचे जे शब्द काढले, त्याबद्दल मी आपला फार ऋणी आहे. त्यामुळे मला जी गाढ कृतज्ञ–भावना वाटते, ती व्यक्त करण्यास आज माझ्याजवळ शब्दांशिवाय दुसरे काही नाही. ती कृतज्ञता अन्य मार्गाने सिद्ध करण्याच्या परिस्थितीत मी असतो तर किती चांगले झाले असते ! परंतु माझ्या दुर्दैवामुळे आपल्या कृपाप्रसादाची परतफेड पोकळ सदिच्छेशिवाय दुसऱ्या कशानेही मी करू शकत नाही."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " महाशय, आपली सेवा करण्याची मला इतकी मनापासून इच्छा आहे की, आपला शोध लागेपर्यंत या डोंगरातून दूर जावयाचे नाही, असा मी ठाम निश्चय केला होता. हा विलक्षण जीवनमार्ग आपण ज्या असंतोषामुळे निवडला असेल, त्याची कारणे तुमच्यापासून समजावून घ्यावीत आणि त्यावर काही उपाय आहे की नाही हे पहावे असा माझा विचार होता. मला जर ती कारणे कळली, तर आपल्याला स्वास्थ्य मिळवून देण्यासाठी मी आकाशपाताळ एक करीन, असे खात्रीने सांगतो. आपल्याला तसे स्वास्थ्य मिळावे, अशी माझी मनापासून इच्छा आहे. पण जर का आपली संकटे दूर होण्याची आणि स्वास्थ्य लाभण्याची आशा न करण्याइतकी दारुण असतील, तर मी तुमच्या दुःखात सहभागी होईन. तुमच्या दुःखाच थोडाफार भाग शिरावर घेऊन मी आपल्याला तो अवजड भार सहन करण्याचे कामी मदत करीन. आपल्या दुःखात कोणी सहभागी असणे, हेच काय ते दुःखी माणसाला समाधान असू शकते. तेव्हा सदिच्छेला काही महत्त्व असेल, किंवा तिची परतफेड कृतज्ञतेने करणे योग्य असेल, तर महाराज, मी आपल्याला एक विनंती करतो. संकटामुळे आपल्या डौलदार स्वरूपावर दुःखाची छाया पसरली आहे. अशा दुःखातून उदारता जन्मास येते. तेव्हा त्या कृतज्ञतेने व उदारतेने, आपण कोण आहा आणि आपल्या सहकाऱ्यांपासून आपण कोणत्या दुर्दैवामुळे दूर झाला आहा, नि या भीषण एकांतवासात आपण स्वतःला गाडून का घेतले आहे, आणि त्यामुळे खडतर जीवन का घालवीत आहांत, त्यासाठी स्वास्थ्यावर, सर्व मानवजातीवर व स्वतःवरही तिलांजली का सोडीत

आहांत, हे सर्व आपण मला सांगावे अशी माझी विनंती आहे. शिलेदारी परंपरेचा मी एक पामर पाईक आहे. म्हणून मी शिलेदारीची गंभीरपणे शपथ घेऊन सांगतो की, आपण जर माझी ही विनंती मान्य केली, तर आपले संकट अनिवार्य नसल्यास ते दूर करण्यासाठी मी माझ्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीन, आणि ते संकट अटळ असेल तर मी आपल्या दुःखात सहभागी होईन आणि त्यायोगे आपले दुःख हलके करण्याचा प्रयत्न करीन."

'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार' अशा प्रकारे बोलत आहे असे पाहून, तो 'अरण्यवासी शिलेदार' त्यांच्याकडे टक लावून दीर्घकाळ पाहत राहिला आणि त्यांचे नखशिखांत निरीक्षण पुनःपुनः करू लागला. बराच वेळ असे निरीक्षण केल्यानंतर तो म्हणाला, "महाराज, आपल्याजवळ काही खाद्यपदार्थ असतील तर कृपा करून ते मला द्या. माझी भूक भागली म्हणजे मी आपली इच्छा पूर्ण करण्यास समर्थ होईन. आपली महान संस्कृती आणि माझ्या लायकीपेक्षा आपण देऊ केलेले साहाय्य यामुळे मी आपली इच्छा तृप्त करणे अवश्य आहे." सँको आणि मेंढपाळ यांनी त्याचे ते बोलणे ऐकून लगेच आपल्या पिशवीतून काही खाद्यपदार्थ बाहेर काढले आणि त्या 'लक्तरातील शिलेदाराची' क्षुधा शमविण्यासाठी ते त्याला दिले. त्या पदार्थांवर तो इतक्या अधाशी-पणाने तुटून पडला की, तो अन्नाचे सेवन करीत नसून ते नुसते बकाबका गिळीत चालला आहे, असे वाटत होते. एकेक तुकडा खाताना तो मध्ये थांबतच नसे. त्याने भराभर सारे पदार्थ खाऊन टाकले. हे खाणे चालले असताना, त्याने किंवा त्याच्या जवळच्या माणसांनी चकार शब्द काढला नाही. आपली अधाशी भूक भागल्यानंतर त्याने डॉन क्विक्झोट व इतर माणसे यांना आपल्यामागून येण्यास पाचारिले. जवळच्या कुरणात त्यांना नेल्यानंतर तो तेथील हिरवळीवर सुखाने पहुडला. बाकीचे लोक त्याच्याभोवती बसून राहिले. खाद्यपदार्थांवर तो तुटून पडल्यापासून त्याच्या किंवा इतरांच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडला नव्हता. पण आता तो बोलू लागला—

"सद्गृहस्थहो, माझ्या दुर्दैवाची कहाणी जाणण्याची तुम्हाला इच्छा असेल, तर माझी शोककथा ऐकताना प्रश्न विचारून किंवा अन्य काही अडथळा आणून तुम्ही कथेचा धागा तोडणार नाही, असे वचन तुम्ही मला आधी दिले पाहिजे. ज्याक्षणी तुमच्यापैकी कोणी तसे करील, त्याचक्षणी मी माझे बोलणे एकदम थांबवीन आणि नंतर माझी कहाणी पुढे सांगणार नाही." ही अट ऐकून डॅन क्विक्झोट यांना सँकोच्या हास्यास्पद गोष्टीची आठवण झाली. बकऱ्यांची संख्या न सांगता त्याने आपली गोष्ट मध्येच संपविली होती. फाटक्या कपड्यातील शिलेदार पुढे म्हणाला, "मी ही सावध-गिरी बाळगतो याचे कारण इतकेच की, मी झपाट्याने बोलत असतो. माझ्या मागील दुर्दैवाचे केवळ स्मरण केल्याने माझ्यावर नवे दुर्दैव ओढवल्यासारखे मला वाटते. तरीही मी आपल्याला असे आश्वासन देतो की, महत्त्वाची एकही गोष्ट मी गाळणार नाही आपल्या इच्छेप्रमाणे मी माझ्या संकटांचा शक्य तितका संपूर्ण वृत्तांत आपल्याला निवेदन

करतो.'' तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी स्वतःच्या व इतरांच्या वतीने अखंड अवधान देण्याचे अभिवचन त्याला दिले. त्यानंतर त्याने आपले निवेदन पुढीलप्रमाणे सुरू केले–

"माझे नाव कार्डेनिओ असे आहे. माझे जन्मस्थान अँडालुसिआमधील एक उत्तम शहर आहे. मी उच्च कुळात जन्मलेलो आहे. माझे आईबाप श्रीमंत. परंतु माझे दुर्दैव इतके मोठे आहे की, माझ्या साऱ्या नातलगांची अंतःकरणे निःसंशय दारुण दुःखाने भरून गेली असतील. माझे दुर्दैव संपत्तीने दूर होण्यासारखे नाही. ईश्वराच्या कोपापुढे दैव बिचारे काय करणार? त्याच शहरात सुंदर लुसिंडा राहत होती. निसर्गाने आतापर्यंत इतकी सुंदर स्त्री कधीच निर्माण केली नसेल. उच्च कुल आणि ऐश्वर्य या बाबतीत ती माझ्या बरोबरीची होती. ती माझ्यापेक्षा अधिक सुखी पण चंचल स्वभावाची होती. तिच्या बाल्यापासून मी तिच्यावर प्रेम केले– नव्हे, तिची जवळजवळ पूजा केली. आपल्या कोवळ्या वयाला साजेल अशा निरागस मोकळेपणाने ती माझ्याशी वागत होती आणि माझ्या प्रेमाची परतफेड करून मला धन्य करीत होती. प्रारंभीच्या त्या आमच्या मैत्रीची जाणीव आमच्या माता-पित्यांना होती. या निर्मळ भावनेचा विकास होऊन तिची परिणती आमच्या विवाहात होईल आणि आमच्या दोन्ही कुटुंबांत सौख्याचे बंधन निर्माण होईल, असे त्यांना वाटत होते. कुल आणि वित्त यांची समानता आमच्यामध्ये असल्यामुळे आम्ही एकमेकांकडे आकर्षित झालो. नंतर जसजशी वर्षे लोटत गेली, तसतशी आमची प्रेमभावना वाढत गेली. पण लुसिंडाच्या बापाला वाटले असावे, आमच्या मैत्रीमुळे आपल्या कन्येच्या प्रतिष्ठेला बाध येत आहे. यामुळे असो किंवा दुसऱ्या काही कारणामुळे असो, मी त्यांच्या घरी वारंवार जाण्याचे बंद करावे अशी आपली इच्छा त्याने मला कळविली. परंतु या बंधनाचा परिणाम काय झाला? कवी लोकांनी वर्णिलेली प्रेमळ थिस्बी हिच्यावर तिच्या आईबापांनी असेच बंधन घातल्यामुळे आगीत तेल ओतल्यासारखे झाले आणि तिच्या इच्छा अनावर झाल्या. तसाच परिणाम आमच्या प्रेमसंबंधावर घडून आला.

"अशा प्रकारे आमच्या जिव्हांचे स्वातंत्र्य कुंठित झाले. तेव्हां आम्हाला आमच्या लेखणीचा आश्रय घ्यावा लागला. त्यामुळे आमच्या अंतःकरणातील अत्यंत गूढ रहस्ये प्रकट करण्यास आम्हाला अधिकच स्वातंत्र्य मिळाले. कारण आपल्या प्रिय वस्तूच्या प्रत्यक्ष दर्शनाने काहीसा दरारा नि लाजाळूपणा बहुधा निर्माण होतो––आणि त्यामुळे प्रेमवेड्या माणसाच्या मनातही गोंधळ उत्पन्न होतो आणि तो गप्प राहतो. त्या चित्त-चोर चारुगात्रीला मी किती तरी पत्रे लिहिली असतील! तिला उद्देशून मी किती तरी कोमल नि हृदयद्रावक कवने रचली असतील! तिच्याकडून मला किती तरी प्रेमाची सभ्य उत्तरें मिळाली असतील! आमच्या गुप्त प्रेमाच्या आणाभाका आम्ही किती तरी वेळा घेतल्या असतील! आमच्या तीव्र भावनांचे समाधान आम्ही किती तरी निष्पाप मार्गांनी केले असेल! शेवटी, तिच्या लालसेने झिजत––झुरत मी किती दिवस काढणार? माझ्या जीवाला संजीवन देणाऱ्या तिच्या भेटींना मी किती काळ आंचविलेला राहणार?

तेव्हा माझ्या एकमेव सौख्याच्या आड येणारा तिच्या बापाचा अडथळा दूर करण्याचे मी ठरविले. त्याने आम्हाला वाजवी दक्षतेमुळे हा अडथळा आणला होता. तो नाहीसा करण्यासाठी मी लग्नासाठी तिची मागणी तिच्या पित्याकडे करण्याचा निश्चय केला. ती ऐकून तो अत्यंत सभ्यतेने मला म्हणाला, "ही मागणी घालून तुम्ही माझा सन्मानच केला आहे. त्याबद्दल मी तुमचे आभार मानतो. पण तुमचे पिताजी विद्यमान आहेत. माझ्याप्रमाणेच त्यांचीही संमती मिळणे अवश्य आहे. अशी मागणी घालण्याला अत्यंत लायक व्यक्ती तीच आहे." त्यांच्या या शालीन उत्तराबद्दल मी त्यांचे आभार मानले.

त्यांच्या सूचनेत काही तथ्य आहे असे मला वाटले. माझे वडील या सूचनेला तत्काळ संमती देतील याविषयी मला मुळीच शंका नव्हती. म्हणून मी लगेच त्यांचेकडे गेलो आणि त्यांची मान्यता व साहाय्य मिळविण्याचा बेत केला. ते आपल्या खोलीमध्ये होते. त्यांच्यापुढे एक उघडा लिफाफा होता. मला पाहाताच तो त्यांनी माझ्या हाती दिला. त्यामुळे माझे काम त्यांचे कानी घालण्यास मला संधी मिळाली नाही. ते म्हणाले, "कार्डेनिओ, या पत्रावरून तुझ्या लक्षात येईल की, ड्यूक रिकार्डो यांना तुझ्याविषयी विलक्षण प्रेम वाटत आहे." सभ्य गृहस्थहो, मी तुम्हाला हे सांगण्याची गरज नाही की, हा ड्यूक रिकार्डो म्हणजे स्पेनमधील एक बडी असामी आहे. त्याची बहुतेक सारी मालमत्ता अँडालुसियाच्या उत्तम प्रदेशात आहे. मी ते पत्र वाचले. त्यामध्ये इतकी काही प्रेमपूर्ण आणि लाभदायक योजना लिहिली होती की, माझ्या वडिलांना तिचा साभार स्वीकार करण्याशिवाय गत्यंतर नव्हते. त्या पत्रात ड्यूकने माझ्या वडिलांना अशी विनंती केली होती की, 'आपल्या मुलाला आपण माझ्याकडे त्वरित पाठवा. माझ्या मोठ्या मुलाचा सवंगडी होऊन तो राहील. त्याच्याविषयी माझे जे चांगले मत आहे, त्याला अनुसरून मी त्याला मोठी जागा देईन.'

"या अकल्पित वार्तेने माझी वाचाच खुंटली. पण माझे आश्चर्य आणि निराशा वाढविण्यासारखे भाषण माझ्या पित्याने केले. ते म्हणाले, "कार्डेनिओ, दोन दिवसांत येथून जाण्याची तू तयारी केली पाहिजेस. तुला जी योग्य अशी बढती मिळणार आहे, त्याबद्दल तू परमेश्वराचे आभार मान." नंतर त्यांनी मला, पिता म्हणून आणि व्यवहारी माणूस म्हणून, पुष्कळच समंजस सूचना केल्या आणि नंतर ते तेथून निघून गेले. माझ्या प्रवासाचा दिवस चटकन् उगवला. पण त्याच्या आदल्या रात्री लुसिंडा खिडकीपाशी उभी असताना मी तिला घडलेला सारा वृत्तांत सांगितला. तिच्या बापाचीही भेट घेऊन मी त्यांना सारा वृत्तांत निवेदन केला आणि विनंती केली, "माझ्याविषयीचे आपले चांगले मत कायम राहावे. मी ड्यूक रिकार्डोच्या सहवासात असेपर्यंत आपण आपल्या कन्येचे दान लांबणीवर टाकावे." तसे करण्याचे त्यांनी प्रेमाने वचन दिले. नंतर लुसिंडा आणि मी यांनी आपले प्रेम शाश्वत ठेवण्याच्या शपथा व प्रतिज्ञा घेतल्या. कोमल स्वभावाच्या आणि भावनाशील अशा दोघा प्रेमिकांना विरहाच्या वेळी जे दुःख होते, ते सहन करीतच आम्ही एकमेकांचा निरोप घेतला.

"मी आमच्या शहरातून निघालो आणि ड्यूककडे गेलो. त्यांनी माझे स्वागत आणि आतिथ्य इतक्या विलक्षण प्रेमाने आणि आदबीने केले की, त्यांच्या अत्यंत प्रियजनांना लौकरच माझ्याविषयी हेवा वाटू लागला. पण माझे अत्यंत प्रेमाने चुंबन कोणी घेतले असेल, तर ड्यूकचा दुसरा मुलगा–डॉन फर्डिनांड–याने. तो देखणा, सुंदर, उदार आणि अत्यंत प्रेमळ स्वभावाचा तरुण होता. मी आल्याने त्याला फार हर्ष झाला होता असे दिसले. त्याने मला अत्यंत नम्रतेने सांगितले, "तू माझा जीवश्चकंठश्च मित्र व्हावेस अशी माझी इच्छा आहे. थोडक्यात सांगावयाचे तर, त्याच्या वडील भावानेही आपल्या मजवरील प्रेमाचे आणि आदराचे पुरावे दाखविले तरी, त्या दोन भावांच्या प्रेमामध्ये फरक आहे, आणि धाकट्या भावाचे मजवर विलक्षण प्रेम आहे अशी माझी खात्री पटली. आता जीवश्चकंठश्च मित्राची अशी वहिवाट असते की, एकमेकांपासून चोरून काही ठेवायचे नाही. मी त्याच्यावर जितका विश्वास टाकला, तितकाच त्याने माझ्यावर टाकला आणि आपले अत्यंत खाजगी विचारही माझ्यापुढे उघड केले. त्यापैकी एक विचार म्हणजे त्याच्या वडिलांच्या एका कुळाच्या अत्यंत श्रीमंत शेतकऱ्याच्या मुलीवर त्याचे प्रेम बसलेले आहे. त्या सुंदर ग्रामकन्येचे लावण्य, तिचे सद्गुण, तिचा समंजसपणा आणि तिचे इतर मानसिक गुण–यामुळे जो कोणी तिच्याजवळ जाई, तो तिची तारीफ करीत सुटे. तिच्या या असाधारण गुणांनी डॉन फर्डिनांड याच्या मनावर इतकी मोहिनी घातली की, तिच्याशी लग्न करण्याचे त्याने ठरविले. नुसती प्रेयसी म्हणून तिला आलिंगन देऊन तिचे शील भ्रष्ट करणे त्याला अयोग्य वाटले. या दोघांचा जोडा मला अनुरूप वाटला नाही आणि म्हणून त्याला त्यापासून परावृत्त करणे हे मला, मैत्रीच्या व कृतज्ञतेच्या बंधनामुळे, अवश्य वाटले. म्हणून मी त्याच्याशी इतके युक्तिवाद केले की, त्यामुळे कोणाचेही मन पालटले असते. पण त्याच्यासारख्या दृढनिश्चयी प्रियकराचे मन त्या अयोग्य पसंतीपासून चळले नाही. माझे सारे युक्तिवाद फोल ठरलेले पाहून शेवटी मी असे ठरविले की, त्याच्या वडिलांना–ड्यूकना–त्याचे सारे हेतु आपण कळवावे. पण डॉन फर्डिनांड हुशार होता. त्याचे बेत मला पूर्ण नापसंत आहेत हे त्याच्या लक्षात चटकन् आले. मी त्याच्या पित्याच्या कानावर ही गोष्ट घालीन अशी भीती त्याला वाटली. त्याची आणि माझी कितीही निकट मैत्री असली तरी त्याच्या पित्याला मी हा सारा वृत्तांत निवेदन करणे हे माझे कर्तव्य आहे हे त्याने ओळखले. त्या दोघांच्या प्रतिष्ठेला या लग्नाने बाध येईल असे मला वाटते, हेही त्याने ताडले. म्हणून आपल्या प्रेमभावनेचा स्फोट आपल्या पित्यापाशी मी करू नये, म्हणून त्याने मला ठासून सांगितले की, हे माझे प्रेम–प्रकरण माझ्या वडिलांना सांगण्याची काही गरज नाही. माझ्या डोळ्यात धूळ फेकण्यासाठी त्याने मला असेही सांगितले की, प्रेमावरील नित्याचा तोडगा म्हणजे विरह. त्याची शक्ती अजमावून पाहण्याचा प्रयत्न मी करीन आणि माझी दुर्दैवी प्रेमभावना झिजून झिजून नष्ट कशी होईल हे पाहीन. त्यासाठी मी तुझ्याबरोबर तुझ्या बापाच्या घरी येतो. जगातील उत्तम

घोड्यांची पैदास तुमच्या गावी होते. म्हणून तेथे घोडे खरेदी करण्यासाठी म्हणून मी येईन. " त्याची ही समंजस योजना ऐकताच मी ती मान्य केली. तसे करण्यात माझा स्वतःच्या प्रेमाबाबत स्वार्थही होता. माझ्या प्रिय लुसिंडाची भेट घेण्याचीही संधी मला त्यायोगे मिळेल अशी आशा मला वाटली.

त्यानंतर मला कळले की, डॉन फर्डिनांड याच्या हृदय—स्वामिनीने विवाहाचे वचन मिळाल्यावर प्रेमाचे सारे स्वातंत्र्य बहाल करून त्याला कृतार्थ केले होते. त्याला आपल्या पित्याचा क्रोध ओढवून घेण्याचे भय वाटत असल्यामुळे, आपले प्रेम निर्धास्तपणे प्रकट, करण्याची फक्त संधीच तो शोधीत होता. पण ज्याला आपण 'गद्धेपंचविशीतील प्रेम' म्हणतो, ती बहुधा केवळ स्वैर–भावना आणि तीव्र लालसा असते. तिचा उद्देश वैषयिक आनंदाशिवाय दुसरा काही नसतो आणि तो आनंद मिळताच ती भावना लुप्त होते. पण खरे प्रेम जे असते, ते मानसिक परिपक्वतेवर अवलंबून असते आणि दृढ होत होत शाश्वत स्वरूप पावते. डॉन फर्डिनांड याने आपली अनैतिक वासना पूर्ण करून घेतली आणि तत्काळ त्याच्या प्रेमाची ज्योत मंदावली. प्रेमभावनेतून मुक्त होण्यासाठी त्याने विरह सोसण्याची जी तयारी दाखवली होती, ते केवळ ढोंग होते; एवढेच नव्हे तर आपल्या वचनाची पूर्तता करण्याचे तो टाळू लागला. त्याहून अधिक प्रिय गोष्ट त्याला कोणतीच वाटेना. म्हणून ड्यूकची परवानगी घेऊन आम्ही दोघेजण माझ्या वडिलांच्या घरी चटदिशी जाऊन दाखल झालो. त्याच्या योग्यतेप्रमाणे डॉन फर्डिनांड यांचा पाहुणचार तेथे झाला. नंतर मी माझ्या लुसिंडाची भेट घेण्यास गेलो. तिच्या हजारो प्रेमवचनांनी माझी अशी खात्री पटली की, आम्हा उभयतांमधील प्रेम–भावना विरहामुळे कमी होण्याऐवजी वाढलीच आहे–अर्थात् एवढ्या महान् आणि परिपूर्ण प्रेमात वाढ होणे शक्य असेल तर! नंतर मला वाटले, ज्या मित्राने आपल्याला आपल्या अंतरीच्या गुजगोष्टी इतक्या उदारतेने सांगितल्या, त्या डॉन फर्डिनांडला आपणही आपल्या हृदयातील प्रेमाचे रहस्य उलगडून दाखवले पाहिजे. इतक्या प्रेमळ आणि जिव्हाळ्याच्या मित्रापासून आपले प्रेम चोरून ठेवणे हे मित्रधर्माला धरून धरून होणार नाही असे मला वाटले. म्हणून मी माझे प्रेम दुर्दैवाने त्याच्यापाशी उघड केले आणि माझा कायमचा सत्यानाश करून घेतला !

लुसिंडाचे लावण्य, तिची बुद्धिमत्ता आणि तिची गुणवत्ता यांची मी त्यांच्याजवळ स्तुती केली—प्रेमिकाला शोभेल इतक्या उत्कटपणे आणि वारंवार मी तिची इतकी स्तुती केली की, अशा गुणी स्त्रीची भेट घ्यावी आणि आपली जिज्ञासा तृप्त करून घ्यावी अशी लालसा मी त्याच्या मनात निर्माण केली. त्याचा परिणाम म्हणजे एके दिवशी संध्याकाळी, एका दिव्याच्या मदतीने, मी खालच्या भागातील खिडकीजवळ उभी असलेली ती डॉन फर्डिनांड याला दाखविली. तेथेच आमच्या प्रेमाच्या मुलाखती नेहमी होत असत. डॉन फर्डिनांडला ती अत्यंत सुंदर वाटली आणि तिची मोहिनी त्याच्या मनावर जबरदस्त पडली. त्याच्या अंतःकरणावर तिच्या प्रभावी प्रतिमेने इतका खोल

ठसा उमटविला की, तोपर्यंत त्याच्या स्वैर विचारांना व्यापून टाकणाऱ्या पूर्वीच्या साऱ्या सुंदर स्त्रियांच्या प्रतिमा पार पुसल्या गेल्या. त्या आनंदमयी मूर्तीच्या दर्शनाने त्याचे चित्त विस्मय व हर्ष यांनी भरून गेले आणि तो अवाक् झाला. तिला पाहताच तिच्यावर त्याचे प्रेम बसले आणि प्रेम म्हटले की ते आत्यंतिक असावयाचेच, हे मी काही निराळे सांगावयास नको. तिची मुद्रा पाहून त्याच्या अंतःकरणात प्रेमाचा जो स्फुल्लिंग पेटला, तो तिच्या चतुर संभाषणाने चांगलाच प्रज्वलित झाला, तिची पत्रे आपल्याला दाखवावीत अशी आग्रहाची विनंती तो मला वारंवार करू लागला. माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाच्याही डोळ्यास मी ती पत्रे कधीही पडू दिली नसती, पण एके दिवशी माझ्या दुर्दैवाने त्याला एक पत्र सापडले. त्यात तिने मला आपल्या बापाजवळ मागणी घालण्यास आणि लग्न लवकर करण्यास सुचविले होते. ते पत्र इतक्या कोमल भावनेने व विवेकाने लिहिलेले होते की, ते वाचताच तो बेभानपणे ओरडला, "जगातील सर्व सुंदर स्त्रियांच्या अंगी जी जी म्हणून प्रेमाची नि लावण्याची लक्षणे विखुरलेली नि पसरलेली असतील, त्या सर्वांचा तिळतिळ घेऊन विधात्याने जी तिलोत्तमा निर्माण केली ती म्हणजे लुसिंडा—एकमेव लुसिंडा." येथे एका लज्जास्पद सत्याची कबुली मी दिली पाहिजे. डॉन फर्डिनांड यांच्या तोंडून तिची जी स्तुतीस्तोत्रे बाहेर पडली, ती यथायोग्य होती यात शंकाच नाही, पण त्याच्या तोंडून ती ऐकताना मला बरे वाटले नाही. अविश्वास आणि मत्सरजन्य भय यांनी माझ्या मनात घर केले. तिच्याविषयी बोलण्याची अणुमात्र संधी आली तरी तो तिचा फायदा घेऊन लुसिंडाची प्रशंसा करीत राही. आमच्या नित्याच्या संभाषणामध्ये इतर विषय आले, तरी त्यांना वळण देऊन तो तिच्याविषयीच बोलत राही. लुसिंडा रतिमात्र बेइमान होईल अशी भीती मला वाटत नव्हती.—मुळीच वाटत नव्हती. ती मला दररोज आपल्या अढळ प्रेमाची खात्री देत असे. पण माझ्या पापग्रहांमुळे माझे केव्हाही अनिष्ट घडेल असे भय मला वाटत असे. नाही तरी, प्रेमीजन स्वतःला बेचैन करण्याचा उद्योग सतत करीत असतातच की!

"एके दिवशी काय झाले, शिलेदारीचे ग्रंथ वाचण्यात लुसिंडाला मोठा आनंद वाटे. तिने मला गॉलच्या अॅमॅडिसच्या प्रेमकथा हे पुस्तक वाचावयास मागितले—

शिलेदारीचा उल्लेख कार्डेनियोने करताच डॉन क्विक्झोट मध्येच म्हणाले, "महाराज, आपण जेव्हा लेडी लुसिंडाचा उल्लेख प्रथम केला, तेव्हाच जर ती शिलेदारीच्या ग्रंथांची चहाती आहे, असे मला सांगितले असते, तर ती अलौकिक बुद्धीची व्यक्ती आहे, अशी माझी खात्री पटविण्यासाठी तुम्हाला काही खुलासा करण्याची गरज भासली नसती. तथापि महाशय, उदार निसर्गाने तिला उत्तमोत्तम अशा सर्व गुणांनी भूषविले असले तरी, तिने जर शिलेदारीच्या ग्रंथांची प्रभावी साधने – शहाणपणाचे ते अचूक मार्ग – वापरली नसती, तर आपल्या योग्यतेच्या पुरुषाचे प्रेम संपादन करण्यास तिची गुणवत्ता पुरेशी पडली असती की नाही, याविषयी मला शंका वाटली असती. आता तिचे लावण्य, तिच्या गुणांचे श्रेष्ठत्व किंवा तिच्या शहाणपणाची खोली यांचे वर्णन

करण्यासाठी आपण आपली वक्तृत्व–कला राबविण्याची काही गरज नाही. शिलेदारीचे ग्रंथ वाचण्यात तिला फार आनंद वाटतो हे ऐकूनच मी असे जाहीर करतो की, या विश्वातील अत्यंत लावण्यवती – नव्हे, अत्यंत गुणवती – स्त्री ती आहे. तुम्ही तिला 'गॉलचा अमॅडिस' हा ग्रंथ पाठविला, त्याबरोबरच 'ग्रीसचा डॉन रगेल' हा सुयोग्य ग्रंथही पाठवावयास हवा होता, असे मी मनापासून इच्छितो. कारण त्यातील डेरिडा व गराया, तसेच सुज्ञ डेरिनेल याच्या संगतीत लेडी लुसिंडाला अत्यंत हर्ष वाटला असता. बुकोलिक्स याची गीते गौरवास्पद आहेत आणि ती तो पुनः पुनः अत्यंत डौलदार शैलीने गात असतो. तीही तिला फार आवडली असती. पण हरकत नाही. असा काळ केव्हा तरी येईल की, जेव्हा आपण माझ्या घरी येण्याची कृपा कराल, तेव्हा मी आपल्याला ते अभिजात ग्रंथ अर्पण करीन आणि आपण तिला ते दिल्यावर त्यांच्या वाचनाने तिला परम संतोष लाभेल. मी आपल्याला माझ्या घरी तीनशेहून अधिक ग्रंथ देईन. ते ग्रंथ म्हणजे माझ्या अंतरात्म्याचे आनंदनिधान होत – माझ्या जीवनाचे अत्यंत प्रिय असे सौख्य-साधन होत. पण आताच मला असे आठवते की, त्या दुष्ट मांत्रिकांनी माझ्या मत्सरामुळे ते सारे ग्रंथ माझ्या घरून पळवून नेले आहेत. आणि माझ्या अभ्यासिकेत आता एकही ग्रंथ शिल्लक उरलेला नसेल अशी सकारण भीती मला वाटत आहे. मी आपल्याला दिलेले वचन मोडून आपल्या निवेदनात अडथळा आणला याबद्दल मी आपली क्षमा मागतो. पण मी काय करू ? उष्णता न देणे हे जसे सूर्यकिरणांच्या ठायी संभवत नाही किंवा शीतलता न देणे हे चंद्राच्या अंगी असू शकत नाही, त्याप्रमाणे शिलेदारीचा अल्पसाही उल्लेख झाला की, त्यासंबंधी काही न बोलणे हे माझ्या आटोक्यात राहात नाही. म्हणून महाराज, मी विनंती करतो की, आपली कथा पुढे चालू द्या."

डॉन क्विक्झोट यांचे हे धाडसी विषयांतर चालू असताना, एखाद्या शोकमग्न माणसाप्रमाणे, कार्डेनियोने आपले डोके आपल्या छातीवर टेकले. त्याने वर पहावे किंवा एका शब्दाने उत्तर द्यावे, म्हणून डॉन क्विक्झोट यांनी कितीही दाताच्या कण्या केल्या, तरी त्याचे मन काही वळले नाही. बराच वेळ अशा प्रकारे स्तब्धपणे उभा राहिल्यानंतर, शेवटी त्याने आपले डोके वर उचलले आणि आपल्या मौनाचा भंग एकाएकी करून म्हटलें, "माझा निश्चय ठाम आहे. त्याविरुद्ध वागण्यास मला जगातील कोणताही माणूस भाग पाडू शकणार नाही. (गॉलचा अमडिसमधील) राणी मॅडासिमाजवळ तो अट्टल दुर्जन वैद्य मि. एलिसाबॅट कधी निजला नाही असे म्हणणारा माणूस मूर्ख होय."

डॉन क्विक्झोट अत्यंत संतप्त होऊन उद्गारले, "झूट आहे ते सारे! राणी मॅडासिमा हिच्याविषयी असे बोलणे ही केवळ कुटाळकी आहे—दुष्ट बदनामी आहे, हे मी स्वर्गातील सर्व देवतांची शपथ घेऊन सांगतो. ती एक अत्यंत थोर आणि सद्गुणी स्त्री होती. जादूटोणा करणाऱ्या एखाद्या वैदूच्या प्रेमजालात पडण्याइतका त्या थोर

राजकन्येचा अधःपात झाला असेल, असे मानता येत नाही. तिचा तसा अधःपात झाला असे म्हणण्यास जो कोणी धजतो, तो अट्टल दुर्जनाप्रमाणे खोटे बोलतो. तो त्याचा खोटेपणा त्याला पटविण्यासाठी मी पायी किंवा घोड्यावरून, सशस्त्र किंवा निःशस्त्र, दिवसा किंवा रात्री, किंवा त्याच्या इच्छेप्रमाणे कसेही, त्याच्याशी युद्ध करीन." कार्डेनियोने डॉन क्विक्झोटवर आपले डोळे तीव्रतेने रोखले. त्याला धुडकावून लावून राणी मॅडासिमा ही जणु काही आपलीच खरी धर्मपत्नी आहे, असे मानून तिचा कैवार घेणाऱ्या डॉन क्विक्झोटकडे तो टक लावून पाहू लागला. त्यानी त्याला उद्देशून जे अपशब्द वापरले, त्यामुळे त्याचे वेड उसळून आले आणि आपल्याजवळ पडलेला एक मोठा धोंडा उचलून त्याने तो डॉन क्विक्झोट यांच्या छातीवर इतक्या जोराने मारला की, त्यामुळे ते मागच्या बाजूस खाली कोसळले. आपला स्वामी आणि धनी असा बेफामपणे बदडला जात आहे, हे पाहून सँको आपली मूठ आवळून त्या मूर्ख शिलेदारावर तुटून पडला. पण पहिल्या झटक्यासरशी त्याने सँकोला उडवून लावले आणि एका ठोशात आपल्या पायाशी लोळण घ्यावयास लावले, आणि आचाऱ्याने कणीक लिंबावी त्याप्रमाणे त्याच्या पोटातील आतड्यावर कार्डेनियो थयथया नाचू लागला, एवढेच नव्हे तर, सँकोच्या मदतीला धावून जाणाऱ्या मेंढपाळाचीही दशा तशीच झाली. अशा प्रकारे त्यांना यथेच्छ बडवून आणि एकमेकांवर आदळून तो 'फाटक्या कपड्यातील शिलेदार' तेथून निघाला आणि जंगलात धावत गेला. त्याला काडीमात्र विरोध कोणी केला नाही

तो गेला असे पाहून सँको उठून उभा राहिला. काही कारण नसताना आपल्याला अशी बेदम मारहाण सोसावी लागली म्हणून तो अत्यंत कष्टी झाला होता. त्याने त्या मेंढपाळाशी भांडण उकरून काढले. 'फाटक्या कपड्यातील शिलेदारा'च्या वेडेपणाची माहिती आधी न दिल्याबद्दल तो त्या मेंढपाळाला खूप टाकून बोलला. तशी माहिती आधी मिळाली असती तर आम्ही आपला बचाव केला असता असे तो म्हणाला. तेव्हां मेंढपाळ उत्तरला, "मी तसा इशारा तुम्हाला प्रथम दिला होता. तो तुम्हाला ऐकू आला नसला, तर तो दोष माझा नव्हे." तेव्हां सँकोने त्याला उत्तर दिले आणि त्याला मेंढपाळाने प्रत्युत्तर दिले. अशा शाब्दिक वादावादीवरून ते गुद्दागुद्दीवर आले—एकमेकांच्या दाढ्या ओढू लागले—एकमेकांना निर्दयपणे ओढू–आपटू लागले आणि बडवू लागले. त्यांना डॉन क्विक्झोट यांनी दूर सारले नसते, तर एकमेकांच्या हनुवटयाच त्यांनी उपटून बाहेर काढल्या असत्या. सँकोने आपल्या प्रतिपक्षावरील आपला ताबा कायम ठेवला आणि अत्यंत संतापाने तो आपल्या धन्याला म्हणाला, "'दुःखी चेहऱ्याचे शिलेदार' साहेब, मला मोकळे सोडा. हा काही नामवंत शिलेदार नाही—माझ्यासारखाच साधा माणूस आहे. त्याने माझी जी कुरापत काढली आहे, तिचा मी सूड घेतल्याशिवाय राहणार नाही. शूर मर्दाप्रमाणे मी त्याला चारीमुंडे चीत करीन." डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे, तो तुझ्या बरोबरीचा आहे, म्हणून तू त्याच्याशी लढा देशील. पण त्याने आपल्यावर काही अन्याय केलेला नाही, म्हणून तू लढा देता कामा

नये." त्यानंतर त्यांनी त्या दोघांना शांत केले आणि मेंढपाळाला विचारले, "पुनः कार्डेनियो भेटणे शक्य आहे का? म्हणजे त्याच्या कथेचा शेवट ऐकता येईल." मेंढपाळानें उत्तर दिले, "महाराज, मी आपल्याला पूर्वीच सांगितले आहे की, तो कोठे राहतो असे कोणतेही कायमचे ठिकाण मला माहीत नाही. पण जर का आपण येथेच जवळपास मुक्काम ठोकला, तर आज ना उद्या, वेडेपणाच्या किंवा शहाणपणाच्या अवस्थेत, तो तुम्हाला नक्की भेटेल."



## प्रकरण ११

# त्या कृष्णगिरीवर ला मांचाच्या शूर शिलेदाराला ज्या विलक्षण प्रसंगांतून जावे लागले आणि देखण्या व अज्ञात बेल्टेनेब्रॉसप्रमाणे तेथे त्याने जी तपश्चर्या केली, त्याचा वृत्तांत.

डॉन क्विक्झोट यांनी मेंढपाळाचा निरोप घेतला. ते रोझिनांटेवर स्वार झाले व आपल्या पाठोपाठ येण्यास त्यांनी सँकोला फर्माविले. त्याप्रमाणे तो काहीशा नाखुषीने त्यांचेमागोमाग गेला. त्याच्या धन्याने त्याला त्या पर्वताच्या अत्यंत खडबडीत आणि खडकाळ भागात नेले. एकमेकाशी एकही शब्द न बोलता, त्यांनी काही काळ असा प्रवास केला. सँको अर्धमेला झाला होता—गप्पागोष्टी करण्यासाठी अत्यंत उतावीळ झालेला होता. पण मौन पाळण्याची सक्त आज्ञा त्याला त्याच्या धन्याने दिलेली असल्यामुळे प्रथम तोंड उघडण्यास तो धजला नाही. आपला धनी केव्हां तोंड उघडतो, याची तो अत्यंत आतुरतेने वाट पहात राहिला. पण यापुढे त्याला दम धरवेना आणि म्हणून शेवटी तो म्हणाला, " महाराज, मला येथून जाण्याची परवानगी आशीर्वादपूर्वक द्यावी अशी माझी विनंती आहे. तसे झाले म्हणजे मी घरी जाऊन बायका-मुलांत पडेन आणि थकेपर्यंत मी बोलत राहीन. तेव्हां मला कोणी अडथळा करणार नाही. मी आपल्याला हे सांगणे अवश्य आहे की, दऱ्या-खोऱ्यांतून, झाडाझुडुपांतून, रात्र-दिवस, ओठ न उघडता, प्रवास करीत राहाणे म्हणजे मला जिवंत गाडणेच होय. इसापच्या काळी पशू बोलत असत. तसे ते आता बोलू लागले तर माझे अर्धेअधिक दुखणे नाहीसे होईल. कारण मग मी माझ्या गाढवाबरोबर मनमुराद बोलू शकेन आणि माझे सारे दुःख विसरून जाईन. पण अशा प्रकारे सर्व आयुष्यभर रखडत जाणे आणि साहस करूनही लाथाबुक्या, ठोसे-गुद्दे, याशिवाय काही मिळू नये—घोंगड्यामध्ये नाचानाची व्हावी—आणि हे सारे दुःख सोशीत असताना माणसाचे ओठ शिवलेले असावेत आणि त्याला आपल्या मनातील विचार बोलून दाखविता येऊ नयेत—छेः छेः! कोणताही मानवी जीव हे सहन करू शकणार नाही, हे मी पुनः सांगतो. "

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " सँको, तुझे म्हणणे मला कळते. आपल्या वाचाशक्तीचा उपयोग करण्यास तू अधीर झाला आहेस आणि तुला आपल्या जिव्हेवरील बंधन अत्यंत ताप देत आहे. म्हणून मी तुझ्या जिव्हेला बोलण्याचे स्वातंत्र्य देतो; मात्र ते या अटीवर की, या डोंगरावर आपले वास्तव्य आहे तोपर्यंतच हे स्वातंत्र्य तुला

उपभोगता येईल." सँको म्हणाला, "छान, छान, उन्ह पडले आहे तोवर वैरण वाळवून घेऊ या. मला शक्य आहे तोवर मी बोलत राहीन. नंतर मी काय करीन, देव जाणे!" आपल्याला मिळालेल्या स्वातंत्र्याचा उपयोग करून तो म्हणाला, "महाराज, खरोखर मला सांगा, राणी मॅगीमॅसा–किंवा तुम्ही तिला काय म्हणत असाल ते–हिचा कैवार इतक्या आवेशाने घेण्याचे कारण काय होते? तोच ॲबट ( एलिसाबॅटच्या ऐवजी सँकोने हे नाव घेतले. ) तिचा मित्र होता की नाही, याच्याशी तुम्हाला काय करावयाचे होते? तो माणूस काय सांगत होता, याकडे तुम्ही लक्ष देण्याचे काहीच कारण नव्हते. ते आपले कर्तव्य नव्हते. म्हणून आपण तिकडे लक्ष दिले नसते, तर तो मूर्ख माणूस आपली कथा सांगत राहिला असता आणि मग तुम्हाला तुमच्या छातीवर भरभक्कम ठोसा बसला नसता आणि मलाही माझ्या तोंडावर पाच-सहा तडाखे सोसावे लागले नसते नि माझ्या खाद्यपदार्थांची चटणी उडाली नसती." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "मित्रा सँको, मी तुला खात्रीने सांगतो की, राणी मॅडासिमा ही किती गुणी नि विख्यात स्त्री होती, हे माझ्याप्रमाणेच तुला माहीत असते, तर तू म्हणाला असतास, 'महाराज, आपण फारच धीर धरला. आणि राणीची इतकी नालस्ती ज्या दुष्टाच्या पाखंडी मुखातून बाहेर पडली, त्या पापी मुखावर आपण प्रहार केले नाहीत हा आपला केवढा संयम!' कारण, एक राणी एका न्हाव्याशी निंद्य संबंध ठेवते असे म्हणणे म्हणजे केवढी मानहानी करणे होय! त्यातील सत्य हे आहे की, त्या मूर्खाने ज्याचा उल्लेख केला तो मि. एलिसाबॅट हा एक अत्यंत शहाणा व समंजस माणूस होता आणि त्या राणीचा वैद्य होता. महत्त्वाच्या गोष्टीत तीसुद्धा त्याचा सल्ला घेत असे. पण तिने आपली अब्रू धाब्यावर बसवून अशा खालच्या दर्जाच्या माणसाला मिठ्या मारल्या आणि ती स्वतः वेश्या बनली, हा आरोप निराधार, निंद्य नि निर्लज्जपणाचा आहे. त्याला कडक शिक्षा झालीच पाहिजे. अशा हीन अपराधाचा आरोप राणीवर करताना कार्डेनियोला आपण काय बोलत आहो हे कळत नव्हते. त्याला वेडाचे झटके येत होते अन् त्यामुळे त्याच्या विवेकाचे अधिष्ठान ढळले होते हे उघड आहे."

सँको म्हणाला, "अगदी बरोबर! वेडा माणूस काय म्हणतो याकडे फक्त वेडाच लक्ष देतो. आपल्या छातीवर जी गारगोटी आदळली, ती आपल्या डोक्यावर आपटून त्यातील मेंदू बाहेर आला असता तर? वाटाण्याच्या शेंगेसारख्या असणाऱ्या त्या स्त्रीचा कैवार आपण घेतला, म्हणून आपली मोठी अवघड स्थिती झाली. कार्डेनियोने आपल्या डोक्यावर प्रहार केला असता, तरी तो निर्दोषी म्हणून सुटला असता. कारण कायदा वेड्यांचे काही वाकडे करू शकत नाही." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "अरे सँको, कोणत्याही दर्जाची स्त्री असो, तिची अब्रू संभाळणे हे आम्हा शिलेदारांचे कर्तव्यच असते. शहाण्या किंवा वेड्या–कोणत्याही माणसाने स्त्रीवर हात टाकला, तरीही आम्ही आमचे हे कर्तव्य बजावलेच पाहिजे आणि राणी मॅडसिमासारख्या प्रतिष्ठित आणि अलौकिक स्त्रीच्या बाबतीत तर विशेषच. तिच्या असामान्य गुणसंपदेविषयी मला

विशेषच आदर वाटतो. ती अत्यंत सुस्वरूप, सुजाण आणि समंजस होती. तिची वाहवा करावी तितकी थोडीच ! आपल्या सर्व संकटांच्या वेळी ती पराकाष्ठेच्या शांत-पणाने वागली. तिच्या दुःखाचा भार हलका करण्यास मि. एलिसार्बट याचा सहवास नि हिताचा सल्ला फार उपयोगी पडला. तेवढ्यावरून तिचा त्याच्याशी अनैतिक संबंध असल्याचा संशय घेऊन तशा कंड्या पिकविण्यास अडाणी नि दुर्बुद्धीच्या गांवढळ लोकांना संधी मिळाली. पण मी पुनः सांगतो की, इतकी नीच निंदानालस्ती जे लोक उर्मटपणे बोलतात, सुचवितात, मनात आणतात अथवा अंदाजतात, ते कोणीही असोत, ते खोटे बोलतात, हजारदा खोटे बोलतात."

सँको म्हणाला, "छेः, असे किंवा तसे मी काहीच म्हणत नाही-- मनातही आणीत नाही- मुळीच नाही. जे बोलतात त्यानी आपले खोटे शब्द गिळावेत-आपल्या रोटीबरोबर गिळावेत. जे कोणी असे खोटे बोलले असतील, त्यांना त्याचे प्रायश्चित्त यापूर्वीच मिळाले आहे. दुसऱ्याच्या भानगडीत मी कधीच नाक खुपशीत नाही. माझ्या पोटापाण्याशी त्याचा काय संबंध ? ज्याने त्याने आपल्यापुरते पहावे, ईश्वर आपणा सर्वांची काळजी करतो, असे मी म्हणतो. जो खोटे बोलतो, तो फशी पडतो. जो गाईचा मालक असेल, त्याने तिचे शेपूट पकडावे नि तिला घेऊन जावे. मी या जगात नागवा आलो आणि या जगातून मी नागवाच जाणार. घरात पाय पसरायला खाट नसेना का, पण आपल्याला सुग्रास जेवण मिळावे, असे पुष्कळांना वाटते. पण बोलणाऱ्याच्या तोंडाला हात कोणी लावावा ? थोडे बोलले, तर ते चटदिशी सुधारता येते. पण सैतानाबद्दल खोटी कल्पना देणे पाप आहे. गैरसमजामुळे गावात खोट्या कंड्या उठतात. लोकांच्या तोंडाला कुलूप घालता येत नाही. जो गप्प बसतो, त्याच्या तोंडात माशा जात नाहीत.

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, अरे, किती शिळ्या म्हणींच्या जंगलातून तू हिंडून आलास ? नकली दागिन्यांचा केवढा हा हार गुंफलास तू ? आणि सारी विधाने मूळ मुद्याला सोडून ! बस्स, आता पुरे कर आणि यापुढे तुझे सारे श्रम आपले गाढव हाकण्याकडे खर्च कर. तुझ्या कक्षेत जे विषय येत नाहीत, त्याकडे तू लक्ष देऊ नकोस. सारी पंचेंद्रिये एकवटून तू ध्यानात धर की, मी जे जे काही करतो—किंवा केले असेल-अथवा करणार असेन— ते सर्व परिपक्व विचारानेच असेल आणि शिलेदारीच्या नियमांना पूर्णपणे धरूनच असेल. शिलेदारी मिरविणाऱ्या साऱ्यांपेक्षा मला ते नियम अधिक चांगले समजतात." तेव्हा सँको म्हणाला, "वा : ! वा : ! महाराज, आपण दऱ्याखोऱ्यांतून, डोंगरपर्वतांतून, पायवाट किंवा घोड्याची वाट नसलेल्या ओसाड मुलुखांतून, एकाद्या वेड्याच्या मागे लागून, वरखाली धावत सुटावे असा काही शिलेदारीचा नियम आहे का, हे मला मेहेरबानी करून सांगा. अहो, आपल्याला जर तो वेडा माणूस पुनः भेटला, तर तो आरंभिलेले कार्य शेवटास नेईल ना ? जळून-भाजून गेलेल्या घोड्याची कहाणी नव्हे, तर आपल्याला नि मला पुरेपूर बडवून काढण्याची कामगिरी तो पार

पाडील, आणि माझी आतडी या टोकापासून त्या टोकापर्यंत बाहेर काढील ना ?"

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, पुरे, पुरे. मी तुला पुन्हा सांगतो, तुझे बोलणे पुरे कर. या वेडपट माणसाचा शोध लावण्यापेक्षा दुसरी अधिक महत्त्वाची कामे मला आहेत. या ओसाड नि निर्जन अरण्यात मी थांबलो आहे, तो त्या कामासाठी नव्हे. मला अमर कीर्ती ज्यामुळे मिळेल, आणि ती कीर्ती पृथ्वीतलाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरेल असे पराक्रमाचे काही विशिष्ट कार्य करण्याची माझी इच्छा आहे–आणि त्यामुळे मी येथे थांबलो आहे. त्या माझ्या दिगंत कीर्तीमुळे जगातील आदर्श शिलेदारांच्या कर्तृत्वावरही कळस चढेल." सँकोने विचारले, "पण आपला हा पराक्रम अत्यंत संकटाचा असणार नाही ना?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "मुळीच नाही ! दैवाच्या मनात आले तर, आपल्या आकांक्षा निराशेमुळे व अपवातामुळे कदाचित् धुळीस मिळतील. पण मुख्य यश तुझ्या उद्योगावर अवलंबून आहे." सँकोने विचारले, "माझ्या उद्योगावर ?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "होय, माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, मी तुला जेथे पाठविण्याचे योजले आहे, तेथून तू जर कल्पनातीत वेगाने परत आलास, तर माझ्या वेदना तत्काळ शमतील आणि माझ्या कीर्तीची प्रभा फाकू लागेल. आपल्या धन्याच्या कल्याणासाठी तुला मोठा उत्साह वाटतो याविषयी मला शंका नाही. म्हणून मी माझी योजना आता तुझ्यापासून लपवून ठेवीत नाही. अरे माझ्या विश्वासू सेवका, तू हे ध्यानात धर की, गॉलचा अमॅडिस हा एक सर्वगुण-संपन्न शिलेदार होता–नव्हे तोच काय तो अत्यंत श्रेष्ठ नि आदर्श असा शिलेदारांचा शिरोमणी होता. श्रेष्ठतेचा मान मिळविण्याचे बाबतीत त्याची बरोबरी करण्याचा आव बेलियानिसेसने किंवा दुसऱ्या कोणी आणता कामा नये; कारण तसा प्रयत्न कोणी केला तर त्याची मोठी नामुष्की होईल, असे माझे मत आहे. तू हेही लक्षात घे की, जेव्हा एखादा चित्रकार आपल्या कलेत प्रावीण्य मिळविण्यासाठी आणि कीर्ती संपादिण्यासाठी कलेचा अभ्यास सुरू करतो, तेव्हा तो मूळच्या उत्तम कलाकृतींचे अनुकरण दक्षतेने करीत असतो. हा नियम अन्य सर्व कला व शास्त्रे यातही पाळला गेला पाहिजे, तरच सुयंत्रित राष्ट्रसमूहाला अलंकार म्हणून ती शोभतील. सुज्ञ नि विवेकी माणूस म्हणून कीर्ती मिळविण्याची महत्त्वाकांक्षा ज्याला आहे, त्याने युलीसिसचे अनुकरण करण्यास प्रवृत्त झाले पाहिजे. त्याच्या संकटांचे व एकूण व्यक्तिमत्त्वाचे चित्रण होमरने मोठ्या कौशल्याने केले आहे आणि शौर्य नि शहाणपणा यांचा एक पूर्ण आदर्श उभा केला आहे. त्याचप्रमाणे व्हर्जिलने आपल्या एनियसचे व्यक्तिमत्त्व रंगविताना पितृभक्तीचा दुर्मिळ आदर्श जगापुढे ठेवला आहे आणि पराक्रमी व अनुभवी अशा सेनापतीचा शहाणपणा रंगविला आहे. या ग्रीक व रोमन कवींनी आपले नायक खरोखर जसे होते तसे दाखविलेले नसून, ते कसे असावेत, म्हणजे पुढील पिढ्यांना सद्गुणाचा कित्ता घालून दिल्यासारखे होईल, असा विचार करून त्यांनी त्यांचे चित्रण केले आहे. त्याच-प्रमाणे, शूर व प्रणयी शिलेदारांचा ध्रुवतारा–किंबहुना सूर्य–असणारा अमॅडिस, हाच

आपण आपल्या डोळ्यापुढे आपला महान् आदर्श म्हणून ठेवला पाहिजे. स्त्री–प्रीती व स्त्री-दाक्षिण्य ह्यांच्या झेंड्याखाली लढणाऱ्या आपल्यासारख्या लोकांचा तो आदर्श आहे. त्याचे अनुकरण जो पराक्रमी पुरुष सर्वोत्तम रीतीने करील, तोच शिलेदारीच्या पूर्णतेप्रत जाऊन पोहोचेल. सँको, त्या वीरपुरुषाची सुज्ञता आणि धैर्य, त्याची निष्ठा आणि प्रीती, आणि त्याचे इतर शौर्यपूर्ण गुण जर कोठे उत्कटपणे प्रगट झाले असतील, तर त्या सर्वांत त्याने आपल्या तिरस्कृत ओरियानाचा निरोप घेऊन 'रंकपर्वता'वर तपश्चर्या आरंभिली, हा प्रसंग अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यावेळी त्याने आपले नाव बदलून, बेल्टेनेब्रास–म्हणजे 'अज्ञात देखणा'–असे नाव धारण केले. हे नाव अत्यंत समर्पक होते आणि त्याने संकल्पिलेल्या जीवनमार्गास शोभेसे होते. म्हणून या बाबतीत मी त्याचा कित्ता गिरविण्याचा निश्चय केला आहे. राक्षसांची शरीरे फाडणे, सर्पांच्या फणा कापणे, भयंकर असुरांना ठार मारणे, शत्रूंची सैन्ये उधळून लावणे, त्यांची आरमारे बुडविणे आणि मांत्रिकांच्या जादूची शक्ती नष्ट करणे–इत्यादी त्याच्या अन्य पराक्रमांचे अनुकरण करण्यापेक्षा सोपी असलेली गोष्ट मी करणार आहे. डोंगरावरील या जंगलांनी मला तशी नामी संधी आणून दिलेली आहे. तिच्याकडे मी पाठ का फिरवावी, याला काही कारण नाही. म्हणून मी आता ती संधी साधणार आहे."

सँकोने विचारले, "जगाच्या या शेवटच्या टोकाला आपण काय करावयाचे योजले आहे?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "त्वेष, निराशा आणि मूर्खपणा याबाबतीत अमॅडिसचा कित्ता गिरविण्याचे मी योजले आहे हे मी तुला पूर्वीच सांगितले नाही काय? एवढेच नव्हे तर, ओर्लँडो फ्युरिओसो याला जेव्हा सुंदर अँजेलिकाचा मेडोरोशी झऱ्यापाशी अनैतिक संबंध झाल्याच्या दुर्दैवी खुणा सापडल्या, तेव्हा त्याचे माथे भडकले आणि त्याच्या वेडाचा अतिरेक झाला, त्या शूर ओर्लँडोचे अनुकरण मी करणार आहे. त्याने तेव्हा काय केले, माहीत आहे? निराशेच्या भरात त्याने झाडे मुळापासून पाडली, स्वच्छ झऱ्यांचे पाणी गढूळ केले, धनगरांना ठार मारले, त्यांचे मेंढ्यांचे कळप नष्ट केले, त्यांच्या झोपड्यांना आगी लावल्या, त्यांची घरे जमीनदोस्त केली, त्यांचे घोडे हाकून नेले आणि शाश्वत अशा कीर्ती-मंदिरावर कोरून ठेवावीत अशी शेकडो–हजारो अतिरेकी कृत्ये केली. अर्थात्, रोलँन ओर्लँडो किंवा रोटोलॅण्ड यांचे अनुकरण सर्व बाबतीत करण्याचे मी योजलेले नाही, (ही सारी नावे त्याचीच आहेत) पण त्याने प्रेमाच्या निराशेमुळे जी उन्मत्त कृत्ये केली, त्यांपैकी अत्यंत महत्त्वाच्या आणि अनुकरणीय अशा कृत्यांचा कित्ता मी गिरवीन नव्हे, कदाचित् मी अमॅडिसचेच पूर्ण अनुकरण करीन. त्याने अशी विध्वंसक आणि विघातक कृत्ये केली नाहीत, तर आपल्या मनाची व्यथा आपल्या शोकालापांनी आणि गाऱ्हाण्यांनीच व्यक्त केली; पण तरीही त्याला कोणाही वीरोत्तमापेक्षा अधिक नसली तरी, त्याच्याइतकी कीर्ती खचित मिळाली."

सँको म्हणाला, "महाराज, ज्या शिलेदारांनी असे तप केले, त्यांना वेडे होण्याला काही कारण होते, असे मी म्हणतो. पण आपण वेडे होण्याची काय गरज?

आपल्याला कोणा स्त्रीने विन्मुख पाठविले आहे ? किंवा आपला अपमान केला आहे ? टोबोसोची लेडी डल्सीनिया त्या मूरशी ( मेडोरोच्या ऐवजी सँको हे नाव घेतो. ) किंवा ख्रिश्चनाशी जसे वागावयास नको होते तशी वागली असे आपल्याला कधी आढळले आहे काय ? " डॉन क्विक्झोट म्हणाले, " वा, हा चांगला मुद्दा आहे ! यामुळे माझ्या कामगिरीला विशेष महत्त्व प्राप्त होणार आहे सँको, तू हे लक्षात घे की, योग्य कारणामुळे एखाद्या शिलेदाराचे डोके फिरले, तर त्यात काही नवल नाही किंवा प्रशंसनीयही नाही. पण कारणाशिवाय, काहीही जरूरी नसता, कोणतेही निर्बंध नसता, एखाद्याचे डोके फिरणे ही दुर्मिळ गोष्ट आहे. सँको, तुझ्यावर माझे फार प्रेम आहे. माझ्या प्रीतीची संपूर्ण कल्पना माझ्या स्वामिनीला आली पाहिजे. कारण काहीही नसताना मी जर अशा गोष्टी केल्या, तर कारण असताना मी काय काय करीन याची कल्पना ती करू शकेल. शिवाय, मी माझ्या दुःखाला स्वैर वाचा फोडण्यास एक योग्य कारणही आहे. माझी सार्वभौम स्वामिनी टोबोसोची डल्सीनिया हिच्यापासून मी फार काळ दूर आहे. ' मॅथियाज् ॲम्ब्रोसियो ' या काव्यातील धनगर म्हणतो—

' प्रिय सुंदरीपासून दूर असलेले बिचारे प्रेमी
सर्व आपत्तींना नुसते भीतच नाहीत तर त्या सहन करतात. '

म्हणून इतक्या दुर्मिळ, अलौकिक आणि सुखदायक अशा कृत्याचे अनुकरण करण्यापासून मला परावृत्त करण्याचा प्रयत्न करण्यात तू अधिक वेळ वाया घालवू नकोस. तू लेडी डल्सीनियाकडे माझे पत्र घेऊन जा. त्याचे उत्तर तू आणीपर्यंत मी वेडाच राहणार ! माझ्या अढळ निष्ठेला योग्य असे अनुकूल उत्तर तू आणलेस तर माझा मूर्खपणा आणि माझी तपश्चर्या समाप्त होईल. पण जर का तिने माझ्या प्रतिज्ञांची आणि सेवेची परतफेड कृतघ्नतेने आणि तिरस्काराने केली असे मला आढळून आले, तर मी खात्रीने वेडा बनेन, आणि माझ्या वेडेपणाची तार इतकी वर खेचली जाईल की, माझ्या निर्दय स्वामिनीच्या तीव्र भावनांची जाणीव मला राहणार नाही. उतावळ्या विचारांनी माझ्या दिलाचे सध्या तुकडे तुकडे होत आहेत. त्या माझ्या प्रेमभावनेची परतफेड तिने कशीही केली तरी, माझा प्राण–भंग करणाऱ्या दुःखापासून मी, या किंवा त्या प्रकाराने, मुक्त होईन. तिच्या संजीवक प्रीतीचे वृत्त तू आणलेस तर मी शहाण्यासारखे वागून त्याचे स्वागत करीन. नाही तर माझ्या वेडेपणाची कमान चढवून मी असे दाखवून देईन की, तिच्या क्रौर्याची मी पर्वा करीत नाही. पण सँको, तोपर्यंत मला हे सांग की, मॅम्ब्रिनोचे शिरस्त्राण तू काळजीपूर्वक जतन करून ठेवले आहेस ना ? कृतघ्नतेचा पुतळा असणाऱ्या त्या राक्षसाने परवा ते शिरस्त्राण रागाने फोडण्याचा फोल प्रयत्न केल्यानंतर तू ते उचलून घेतल्याचे मी पाहिले आहे. ते शिरस्त्राण उत्तम धातूचे बनविलेले आहे हेही तेव्हा सिद्ध झाले आहे. "

सँको म्हणाला, " देवा रे देवा ! अहो, ' दुःखी चेहऱ्याचे शिलेदार 'साहेब, अशा प्रकारची वटवट मी यापुढे क्षणभरही सहन करू शकणार नाही. आपण आपल्या

शिलेदारीची— राज्ये कमावण्याची— आपल्या सेवकाला बेटे वगैरे वहाल करण्याची—जी बढाईची—तोऱ्याची भाषा आतापर्यंत काढली, ती सारी मूर्खपणाची बडबड होती—ढोंगी व खोटी भाषा होती— अशी खात्री कोणाही माणसाची आपल्या या बोलण्यावरून होईल. नाही तर न्हाव्याच्या पातेल्याला शिरस्त्राण म्हणून कोणता माणूस म्हणेल आणि सतत चार दिवस तसा धोशा लावील? तसे म्हणणाऱ्याला ठार वेडा किंवा बेअक्कल असे कोण म्हणणार नाही? ते पातेले माझ्या पिशवीत सुरक्षित आहे. आणि जर माझ्या घरी माझ्या बायकामुलात जाऊन पडण्याचे भाग्य मला लाभले तर मी ते पातेले दुरुस्त करीन आणि स्वतः वापरीन." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, मी माझ्या साऱ्या आयुष्यात शिलेदारांच्या ज्या सेवकांचे वर्णन ऐकले किंवा वाचले आहे, त्या सर्वांत तू अत्यंत उथळ, वेडा आणि महामूर्ख आहेस. माझ्या सेवेमध्ये इतका वेळ राहूनही तुझ्या डोक्यात हे कसे आले नाही की, आम्हा शिलेदारांची सारी कृत्ये आणि सारे पराक्रम अजब, उद्भट किंवा मूर्खपणाचे दिसतात? खरोखर ते तसे नसतात पण लोकांच्या चोंबडेपणामुळे ते तसे वाटतात किंवा, अदृश्य राहून आमचा छळ सतत करणाऱ्या जादूगारांच्या द्वेषामुळे ते तसे दिसतात. आमच्या कृत्यांना ते आपल्या राग-द्वेषाप्रमाणे, लहर येईल तेव्हा, निराळे रूप देत असतात. याच कारणामुळे, मला जे मँब्रिनोचे शिरस्त्राण स्वच्छपणे दिसते ते तुला न्हाव्याच्या पातेल्यासारखे भासते. दुसऱ्या एखाद्या माणसाला ते भलतेच काही वाटेल. ते अमूल्य शिरस्त्राण पातेल्यासारखे भासविण्यात माझे कल्याण करण्याचा ज्या विद्वानाचा हेतू असेल त्याच्या शहाणपणाची तारीफ करावी तितकी थोडीच. कारण, ती वस्तू योग्य स्वरूपात सर्वांना दिसू लागली तर, तिच्या मोहामुळे, जगात जितकी माणसे आहेत, तितके मला शत्रू निर्माण होतील. एवढे मोठे घबाड माझ्यापासून हिरावून घेण्यास सारे लोक अधीर होतील. पण जोपर्यंत ती वस्तू न्हाव्याच्या पातेल्यासारखीच दिसत राहील तोपर्यंत तिची किंमत लोकांना कळणार नाही. न्हाव्याने ती वस्तू आपल्यामागे जमिनीवर टाकून दिली यावरूनच हे उघड होते. ती वस्तू खरोखर काय आहे, हे त्याला माहीत असते तर त्याने तिचा त्याग करण्याआधी स्वतःचा प्राणत्याग केला असता. म्हणून सँको, हे शिरस्त्राण सुरक्षित ठेव. आता मला त्याची गरज नाही. एवढेच नव्हे तर माझे चिलखतही काढून ठेवावे आणि मी माझ्या मातेच्या गर्भातून जसा बाहेर आलो तसाच नागवा रहावे असे मला वाटते—जर अॅमॅडिसच्या तपापेक्षा ओलँडोच्या आवेशाचे अनुकरण करण्याचा निश्चय मी केला तर."

असा संवाद करीत करीत ते दोघे एका उंच खडकाच्या पायथ्याशी येऊन ठेपले. साऱ्या डोंगरातून तो खडक जणू काही कापून काढल्यासारखा स्वतंत्रपणे उभा होता आणि डोंगराच्या इतर भागापासून वेगळा दिसत होता. त्याच्या एका कडेला एक झरा झुळझुळ आवाज करीत वहात होता आणि तो शेजारच्या हिरवळीवरून हळूहळू वळणावळणाने जात होता. तेथले हिरवेगार व ताजे टवटवीत गवत, असंख्य रानटी

वृक्ष, वनस्पती आणि फुले— याचे दर्शन म्हणजे त्या निर्जन प्रदेशात डोळ्यांना मिळालेली मेजवानीच. आपल्या प्रणयाराधनेचे तप करण्यास हे उत्तम स्थान आहे, असे ' दुःखी चेहऱ्याच्या शिलेदारा 'स वाटले. त्या स्थानातील सर्वत्र विखुरलेल्या सौंदर्यावर त्यांची भिरभिरती नजर आनंदाने काही काळ फिरू लागली. ते दृश्य मनात साठवून त्यांनी त्या स्थानाचा जणू कबजाच घेतला. त्यावेळी त्यांनी जे भाषण केले, त्यावरून त्याच्या डोक्यात अकलेचा जो अत्यल्प अंश होता तोही पार नाहीसा झाल्याचे दिसून येते. डॉन क्विक्झोट म्हणाले,

" पहा, पहा, प्रभो, तू या अभागी प्रेमिकाला ज्या दुर्दशेत लोटले आहेस, त्याबद्दल शोक करण्यासाठी त्याने पसंत केलेले हे स्थान पहा. येथे माझ्या नेत्रातून वाहणारे अश्रू या स्फटिकवत् झऱ्याच्या पाण्यात भर घालतील आणि माझे दीर्घ सुस्कारे या वृक्षांची पाने अखंड चाळवितील. त्यामुळे माझ्या अंतःकरणाला व्यथित करणारे दुःख व वेदना प्रगट होतील. हे वनदेवतांनो, या निर्जन प्रदेशात आपले निवासस्थान निर्माण करणाऱ्या तुम्ही कोणीही असा, पण या दुर्दैवी प्रेमिकाची गाऱ्हाणी ऐका. विरहाने तो व्याकुळ झाला आहे आणि मत्सरग्रस्त अविश्वासाचे दडपण त्याच्या मनावर थोडेफार पडलेले आहे. यामुळे या निराशेच्या मुलखात त्याला यावे लागले आहे. येथे तो आपल्या खडतर भवितव्याबद्दल शोक करणार आहे आणि मानवी सौंदर्याचा पूर्णावतार असणाऱ्या त्या लावण्यवती युवतीने दाखविलेल्या क्रूर कृतघ्नतेबद्दल विलाप करणार आहे. रानावनात मूक वास्तव्य करणाऱ्या हे वनदेवतांनो आणि जलदेवतांनो, माझ्या दुर्दैवाबद्दल मला शोक करण्यास मदत करा—निदान माझ्या दुःखाची कहाणी तरी ऐका. म्हणजे तुमच्या द्वेषाचा विषय असलेला कोणताही पाशवी नि कारस्थानी वनदेव तुमच्या विश्रांतीत अडथळा आणू शकणार नाही. हे टोबोसोच्या डलसीनिये, माझ्या अंधारी रात्रीचे दिवसात रूपांतर करणारा सूर्य तू आहेस ! माझ्या दुःखाचे वैभव तू आहेस ! माझ्या प्रवासाचा ध्रुवतारा तू आहेस ! माझ्या हृदयावर साम्राज्य चालविणारा प्रभावी ग्रह तू आहेस ! तुझ्या विरहामुळे तुझा हा निस्सीम निष्ठावंत प्रियकर अपरंपार दुःखसागरात बुडालेला आहे. त्याच्यावर तू दया कर आणि त्याच्या निष्ठेला योग्य तो प्रतिसाद देण्याची कृपा कर अशी माझी तुला कळकळीची विनंती आहे. तू ज्यांची लालसाही कधी मनात धरू शकणार नाहीस अशा सर्व सुखांचा वर्षाव उदार नियतीने तुझ्यावर करावा—नाही तर प्रत्यक्ष प्रभूने तुला तसे वरदान द्यावे. हे एकाकी वृक्षांनो, या माझ्या निरर्थक जीवनाची दुःखी सावली खितपत ठेवण्यासाठी मी तुमच्या विस्तीर्ण शाखांखाली येऊन ठेपलो आहे. या तुमच्या छाया देणाऱ्या स्थानी तुम्ही माझे स्वागत करीत आहा, असे दर्शविण्यासाठी तुम्ही आपल्या सळसळत्या पानांच्या मृदु भाषेने मला सांगा. तुमच्या तरारणाऱ्या शाखा-पल्लवांनी प्रेमाने मान डोलावून तुम्ही माझे स्वागत केल्यास मी संतुष्ट होईन. हे माझ्या विश्वासू सेवका, माझ्या साहसाच्या अभिन्न भागीदारा, या निर्जन प्रदेशात मी काय करीत आहे, हे तू बारकाईने पाहा म्हणजे माझ्या

विनाशाचे कारण असणाऱ्या त्या प्रिय व्यक्तीला तू माझ्या तपाची खडानखडा माहिती देऊ शकशील."

असे म्हणून डॉन क्विक्झोट घोड्यावरून खाली उतरले आणि त्याचा लगाम व खोगीर काढून घेऊन म्हणाले, "रोझिनांट, जा." त्याच्या पाठीवर थाप मारून ते पुढे म्हणाले, "ज्याने आपले स्वातंत्र्य गमावले आहे, तो तुला स्वातंत्र्य देत आहे. आपल्या अलौकिक कामगिरीमुळे आणि दुर्दैवामुळे तू प्रख्यात आहेस! आता तू येथून जा आणि तुझ्या इच्छेप्रमाणे कोठेही संचार कर. ॲस्टोल्फोचा हिप्पोग्रिफॉन किंवा ब्रॅडामँटेने भारी किंमत देऊन घेतलेला सुप्रसिद्ध फ्रॉंटिनो या अश्वराजांना तुझी बरोबरी करता येणार नाही असे स्थान तू मिळव."

सँको म्हणाला, "त्याचे भले होवो. माझ्या गाढवालाही गवत खाण्यास पाठविण्याचा माझा त्रास त्याने चुकविला. ते बिचारे गाढव येथे असते तर त्याचे खोगीर मी काढून घेताच ते पळाले असते. पुठ्ठयावर दोन-चार चापट्या मारण्याची किंवा त्याच्या प्रशंसेचे फक्कड भाषण करण्याची काही गरज लागली नसती. पण थांबा, ते गाढव येथे असते तर त्याचा सरंजाम काढून घेण्याची गरजच काय होती? खुळचट प्रेमलीलांशी त्याचा माझ्यापेक्षा अधिक काही संबंध नव्हता. दैवयोगाने मी त्याचा मालक झालो आहे. पण 'दुःखी चेहऱ्याचे शिलेदार' साहेब, मी काय म्हणतो ते ऐका. मूर्ख होण्याचे आणि मला दूर पाठविण्याचे महाराजांनी खरोखर ठरविले असेल, तर आपण रोझिनांटच्या पाठीवर खोगीर खरोखर चढविले पाहिजे. कारण खरे सांगायचे तर, मला दुःखाने पायी चालावे लागत आहे. मी जर घोड्यावर बसून घरी गेलो नाही तर मी परत कधी येऊ शकेन हे मला माहीत नाही" डॉन क्विक्झोट उत्तरले, "सँको, तुला योग्य वाटेल ते तू कर. आजपासून तीन दिवसांनी तू येथून कूच करावेस असे मी योजिले आहे. तोपर्यंत मी माझ्या हृदयस्वामिनीसाठी जे काही करीन ते तू पाहा, म्हणजे तुला सारा वृत्तांत तिला सांगता येईल." सँकोने विचारले, "माझे नेत्र धन्य होतील. पण महाराज, आतापर्यंत मी जे पाहिले त्यापेक्षा निराळे मी काय पाहणार?" डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "अजून तू काहीच पाहिले नाहीस. मी माझे चिलखत फेकून देईन, माझे कपडे फाडीन, खडकावर डोके आपटून घेईन आणि अशाच प्रकारच्या हजारो गोष्टी करीन. ते तू सारे नीट पाहा म्हणजे तुझे मन विस्मयाने भरून जाईल." तेव्हा सँको उद्‌गारला, "महाराज, या कठोर खडकाशी झुंज घेताना नीट काळजी घ्या. नाही तर पहिल्याच तडाख्यासरशी तुमच्या डोक्याचा तडा जाईल अन् तुमच्या तपश्चर्येला खो बसेल. छेः छेः, तसे करणे मला मुळीच पसंत नाही. तुम्हाला जर आपले डोके फोडूनच घ्यायचे असेल, तर अशा वेड्यावाकड्या मार्गाने जाण्याचे कारण नाही. ती नुसती चेष्टा होईल— गांभीर्य नि विडंबना यांची खिचडी होईल. म्हणून, या मठ्ठ दगडापेक्षा जरा मऊ असणाऱ्या वस्तूवर तुम्ही आपली करामत का दाखवीत नाही? पाण्यावर किंवा कापसावर अथवा रोझिनांटच्या खोगिरावर तुम्ही आपले डोके का आपटून घेत नाही? म्हणजे मी

स्वस्थ विश्रांती घेत पडेन, आणि नंतर मी लेडी डल्सीनियाला असेच सांगेन की, हिऱ्यापेक्षा कठीण असणाऱ्या खडकाच्या टोकावर आमच्या शिलेदारसाहेबांनी आपले डोके आपटून घेतले."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "प्रिय सँको, तुझ्या या सदिच्छेबद्दल मी आभारी आहे. पण मी तुला हे ठामपणे सांगतो की, मी आता ही जी दिसण्यात अतिरेकी अशी कृत्ये करणार आहे, ती काही मस्करी नव्हे. छेः छेः ती गंभीरपणे व मनापासून केली पाहिजेत, नाही तर आम्ही शिलेदारीच्या नियमाचे उल्लंघन केले असे होईल. हे नियम खोटे बोलण्यास प्रतिबंध करतात आणि खोटे बोलणाऱ्याचा अधःपात करतात. एक गोष्ट करतो म्हणावयाचे आणि दुसरीच करावयाची, ही शुद्ध टाळाटाळी होय. ती खोटे बोलण्याइतकीच वाईट आहे, असे मी मानतो. म्हणून मी माझ्या डोक्यावर जे प्रहार करून घेणार आहे, ते खरे, भक्कम व भरीव असले पाहिजेत. त्यात काही लबाडी किंवा मानसिक अंगचोरपणा असता कामा नये. म्हणून तू मला थोडा कापूस आणि मलम द्यावेस अशी माझी इच्छा आहे. आपल्याजवळ जे सर्वगुणकारी मलम होते, ते दैवाने हिरावून घेतले." सँको म्हणाला, "माझे गाढव गेले, ही त्याहून मोठी हानी होय. कारण त्याच्याबरोबरच आपला बाड-बिछाना, कापूस, मलम सारे सारे गेले. पण त्या दुष्ट मलमाचे नाव काढू नका. त्याच्या नुसत्या कल्पनेनेच माझ्या पोटात ढवळू लागते. माझ्या अंतःकरणात त्याच्या नुसत्या नावाने धडधडू लागते. आता आपले वेडेचार पहाण्यासाठी मी येथे तीन दिवस घोटाळत राहावे, अशी तुमची इच्छा आहे. पण मी म्हणतो ते वेडेचार होऊन गेले आहेत असे आपण खुशाल समजावे. ते प्रत्यक्ष न पाहता, ते घडले असे मी समजेन, आणि आपल्या हृदयस्वामिनीला त्यांचे रसभरित वर्णन करून सांगेन. म्हणून महाराज, आपण आपले पत्र लिहा आणि शक्य तितक्या त्वरेने ते घेऊन जाण्यास मला सांगा. मला परत येण्यास आणि या यातनालोकातून तुम्हाला बाहेर काढण्यास मी जर उशीर केला तर मला फाशी द्या."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, तू या जागेला यातना-लोक म्हणतोस? सैतान लोक म्हण किंवा त्याहून दुसरे एखादे नाव येथील यातनांना शोभणारे असे असेल तर ते दे." सँको म्हणाला, "छेः छेः, मी या जागेला सैतानलोक म्हणणार नाही. कारण आमचा धर्मगुरू असे म्हणत असे, 'सैतानलोक कायमची स्थिती ('मुक्ती' असे सँकोला म्हणावयाचे होते.) नाही'" डॉन क्विक्झोट ओरडले, "काय म्हणतोस, स्थिति? त्या शब्दाचा अर्थ तू काय करतोस?" सँकोने जोरात उत्तर दिले, "स्थिती म्हणजे स्थिति. जो एकदा सैतान लोकात गेला, तो त्यातून कधीच बाहेर पडत नाही. आपले काम तशा स्वरूपाचे नाही. मी जर रोझिनांटला टाच मारून लेडी डल्सीनियाकडे वेगाने गेलो, आणि तिला तुमच्या विक्षिप्त युक्त्या आणि मूर्खपणाच्या नि वेडेपणाच्या खोड्या (कारण त्या तशाच आहेत) सांगितल्या, तर मी तिचे हृदय लोण्यासारखे मऊ करीन. पूर्वी तिचे हृदय मला पाषाणासारखे वाटले होते. पण आता ते मी वितळावयास लावीन आणि मोठ्या

लाडीगोडीने मी तिच्याकडून मधासारखे मधुर उत्तर आणीन आणि आपल्याकडे झगाट्याने परत येईन. एखादी चेटकीण केरसुणीवर बसून जलदीने अंतर तोडते, तसे मी करीन आणि या घोर यातनातून मी तुम्हाला मुक्त करीन. हा सैतानलोक नसला तरी पापाबद्दल यातना देऊन शिक्षा करणारा यातनालोक आहे हे माझे म्हणणे आपण खोडून काढू नये. या जागेतून तुम्ही मुक्त होण्याची काही आशा आहे असे मी आपल्याला पूर्वीच सांगितले आहे. ''

'दुःखी चेहऱ्याचे शिलेदार 'साहेब म्हणाले, "ठीक आहे, होऊ द्या तर तसे. पण मी पत्र कसे लिहू ?" सँकोने पुष्टी दिली, "आणि मला तीन गाढवे देण्याचा हुकूम आपण द्यावयाचा आहे." डॉन क्विक्झोट उत्तरले, "ते मी विसरणार नाही. पण येथे आपल्याजवळ कागद नाही. म्हणून प्राचीन काळातल्याप्रमाणे मला झाडांच्या पानांवर किंवा सालींवर, नाहीतर मेणावर लिहावे लागेल. पण मला आता असे दिसते की, आपल्याजवळ जसा कागद नाही, तसेच मेणही नाही. पण थांब. मला आठवते की, कार्डेनियोची वही आपल्याजवळ आहे. या अडचणीच्या प्रसंगी आपली गरज ती भागवील ! त्यातील पानांवर मी पत्र लिहून देईन. ते तू, तुझ्या प्रवासातील पहिल्या खेड्यात जाताच, चांगल्या कागदावर तेथील शाळामास्तराकडून नीट लिहून घे. तेथे शाळामास्तर नसेल तर पाद्री तुला सापडेल. पण दस्तऐवज लिहिणाराकडे किंवा वकिली कारकुनाकडे हे काम देऊ नकोस. कारण त्यांचे अक्षर बहुधा इतके गिचमीड असते की, सैतानालासुद्धा ते वाचता येणार नाही." सँकोने विचारले, "पण त्या पत्रावर तुमची सही कशी येणार ?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे, त्यात काय आहे? अमॅडिस आपल्या पत्रावर स्वतः कधीच सही करीत नसे." सँको उत्तरला, "पण महाराज, तीन गाढवांच्या किमतीच्या बिलावर मात्र आपली सही पाहिजे. कारण मी जर त्या बिलाची नक्कल काढून कोणाला दाखविली तर तो म्हणेल, 'हे काही शिलेदार-साहेबांचे हस्ताक्षर नव्हे.' म्हणजे मला गाढवांनाच मुकावे लागेल." डॉन क्विक्झोट म्हणाले, "गाढवे देण्याचा हुकूम मी माझ्या खाजगी वहीत लिहून देईन आणि त्यावर माझी सही करीन. माझे हस्ताक्षर पाहताच माझी पुतणी तुला गाढवे देण्यास खळखळ करणार नाही. आता माझ्या प्रेमपत्राबद्दल म्हणशील तर, ते तू सुंदर अक्षरात लिहून घेतल्यानंतर त्याच्याखाली असे लिहून घे-"आमरण तुझाच-'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार.'" पत्र आणि सही एकाच माणसाची आहे की नाही हा महत्त्वाचा मुद्दा नाही. कारण माझ्या माहितीप्रमाणे डल्सीनियाला लिहितावाचता येत नाही-तिने माझे एकही पत्र पाहिले नाही-पत्रच काय, पण माझे काहीही लेखन तिने पाहिले नाही. माझे-तिचे प्रेम शुद्ध, सात्त्विक, तात्त्विक आहे. नम्रतेने एकमेकांकडे पाहण्यापलीकडे आमचे प्रेम कधी गेले नाही आणि आम्ही सामाजिक नियमांचे उल्लंघन कधी केले नाही. आमची ही जी दृष्टादृष्ट होत असे, तीही इतकी क्वचित् की, गेल्या बारा वर्षांत मी तिला चार वेळाही पाहिले नाही. वास्तविक माझ्या डोळ्यांना प्रकाश

जितका प्रिय, तितकी ती माझ्या जीवाला प्रिय आहे. पण आम्ही मर्यादा पाळीत होतो, असें मी शपथेवर बिनदिक्कत सांगू शकतो. आणि ज्या थोड्या वेळीं मी तिला पाहिले, तेव्हा मी तिला पाहात आहे, हे तिने एकदाही पाहिले नसेल. तिचे वडील लोरेंझो कोर्चुलो आणि तिची आई ॲल्डोन्झा नॅगॅलेस यांनी तिला इतके दक्षतेने संभाळले होते नि शिकविले होते." सँको उद्गारला, "अरे वा! हे मी कधी पूर्वी ऐकलेच नव्हते! आपली हृदयस्वामिनी टोबोसोची डल्सीनिया ही लोरेंझो कोर्चुलो याची मुलगी आहे काय? तिलाच आम्ही म्हणतो अल्डोन्झालोरेन्झो!" डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे, तीच ती! विश्वसुंदरी होण्याची पात्रता असणारी तीच ती!" सँको म्हणाला, "ती तर माझ्या पुऱ्या माहितीची आहे. ती एक धिप्पाड तरुणी आहे. आमच्या परिसरातील कोणाही लंपट तरुणाला ती चांगलीच चमकावते. ती सर्वांच्या डोळ्यांत भरणारी आहे–जाडजूड बांध्याची आहे, चांगली अंगकाठी असलेली ती एक पुरुषी तरुणी आहे. हनुवटीला चिखल लागू देणार नाही. एखादा शूर शिलेदार तिच्या वाटेला गेला तर त्याला ती खचित रोखून धरील. अहाहा! ती जेव्हा बोलू लागते, तेव्हा तिचा आवाज आणि फुप्फुसे किती भक्कम आहेत हे कोणासही कळून येते! एके दिवशी ती मला आमच्या चर्चच्या मनोऱ्यावर दिसली. पडीत जमिनींत नांगरट करीत असलेल्या काही शेतकऱ्यांना ती हाका मारीत होती. ते मैल–दीड मैल दूर होते, तरी तिच्याजवळच्या चर्चच्या पटांगणांत उभे असल्याप्रमाणे त्यांना तिच्या हाका स्पष्टपणे ऐकू गेल्या. मुख्य म्हणजे ती लाजाळू नाही की बावळट नाही. तिच्याशी बोलावे असे कोणासही वाटेल. एखाद्या दरबारी माणसाला ती योग्य आहे. मांजरीच्या पिलाप्रमाणे ती तुमच्याशी खेळेल-बागडेल आणि कोणाशीहि चेष्टामस्करी करील. अहो 'दुःखी चेहऱ्याचे शिलेदारसाहेब,' खरे सांगायचे तर, आता तुम्ही यथेच्छ हसा–नाचा, तिच्यासाठी तुम्ही वेडे व्हा–जिवावर उदार व्हा. तुम्ही शहाणपणाच करीत आहा, असे सर्वजण म्हणतील. तुम्हांला सैतानाने पाठीवर वाहून नेले तरी, दुसरे कांही काम नसले तरी केवळ तिला भेटण्या-साठी तिच्याकडे जाण्यास मी उतावीळ झालो आहे. कारण पुष्कळ दिवसांत मी तिला पाहिलेले नाही. मी तिला पुनः ओळखीन की नाही याची शंका आहे. कारण उन्हा-तान्हांत आणि रानावनांत काबाडकष्ट करणाऱ्या स्त्रीच्या चेहऱ्यांत विलक्षण बदल होतो. आतापर्यंत माझी मोठी गैरसमजूत झाली होती, हे मी कबूल केलेच पाहिजे. आपले जिच्यावर प्रेम जडले आहे ती लेडी डल्सीनिया ही एक महान् राजकन्या आहे असे मी समजत होतो. आपण तिच्या अंगीं जे जे अलौकिक गुण पाहात होता, तिला ती पात्र आहे असे मला वाटत होते. आपण बिस्केनर, गुलाम वगैरे लोकांना तिच्याकडे, मी आपला सेवक होण्यापूर्वी, पाठविले असेल–किंवा यापुढें पाठवाल, त्याला ती लायक असेल अशी माझी समजूत होती. ते लोक तेथे जाऊन तिच्यापुढे साष्टांग लोटांगण घालतील, तेव्हा मात्र ती लेडी अल्डोन्झा लोरेन्झा (टोबोसोची लेडी डल्सीनिया, असे मी म्हणावयास हवे होते) कशी वागेल, काय करील, या कल्पनेने मला हसू आल्याशिवाय

रहात नाही. कारण त्यावेळी ती अंबाडीचे धागे पिंजत बसलेली असेल किंवा धान्याची मळणी करीत असेल हे नक्की. त्यावेळी ते कसे थक्रकून उभे राहातील, याची मी कल्पना करू शकतो ! तेव्हाच्या स्वतःच्या केविलवाण्या अवस्थेबद्दल ते आपल्या दुर्दैवाला शाप देतील हे खचित! मी जिवंत आहे हे जितके खरे, तितकेच हेही खरे आहे. ती स्वतःच त्यांना पिटाळून लावील आणि एकंदर प्रकाराने चिडून–संतापून जाईल. ''

डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे सँको, मी तुला यापूर्वी किती तरी वेळा सांगितले आहे—आणि आतां पुनः सांगतो—तूं आपल्या बडबड्या नि तिखट जिव्हेला लगाम घातला पाहिजेस—किंवा बंदिवान केले पाहिजेस. तूं खरोखर रेम्याडोक्या, महाशंख आहेस; आणि तरीही तूं अधूनमधून वेड्यावाकड्या चेष्टा–कुचेष्टा करीत असतोस आणि दुसऱ्याच्या हृदयाला घरे पाडतोस. परंतु तुझ्या मूर्खपणाची नि माझ्या शहाणपणाची जाणीव एकदम करून देणारी एक छोटीशी गोष्ट मी आता तुला सांगतो. एक सुंदर, चुणचुणीत, तरुण, श्रीमंत विधवा होती. ती फारशी शहाणी नव्हती. तिचे प्रेम एका नीटनेटक्या नि धडधाकट अशा तरुणावर बसले. तो धर्मविद्यालयातील एक साधा नोकर होता. त्यांच्या या प्रेम–प्रकरणाची कुणकुण लागताच, महाविद्यालयांतील एक वरिष्ठ अधिकारी तिच्याकडे गेले आणि तिची कानउघाडणी प्रेमाने करू लागले, ' बाईसाहेब, मला फार फार आश्चर्य वाटते कीं, आपल्या योग्यतेची स्त्री——सौंदर्याबद्दल नि चातुर्याबद्दल जिची इतकी वाहवा होते––आणि शिवाय जी धनकनकसंपन्न आहे–ती आपल्या प्रियकराची निवड इतकी चुकीची कशी करू शकते आणि एका हलक्या, खुळचट नि तुच्छ माणसावर लुब्ध कशी होते ! आपण तशी निवड केल्याचे माझे कानी आले आहे. आमच्या घराण्यात किती तरी विशारद नि पारंगत तरुण आहेत, धर्मविषयाचे पंडितही आहेत, त्यांपैकी कोणालाही निवडून बाईसाहेबांनी पसंत करावें. गोड फळांची करंडी आपल्यापुढे कोणी ठेवली, तर आपण नाही का म्हणता, " मला हे आवडते––ते आवडत नाही. " तशी निवड आपण या बाबतीत करू शकता.' तेव्हा त्या तरुणीने त्या गंभीर अधिकाऱ्याला तत्काळ सस्मित उत्तर दिले, " महाशय, आपली फार मोठी चूक होत आहे. जुन्यापुराण्या रीतिरिवाजाप्रमाणे आपण विचार करीत आहा, म्हणून माझी निवड आपल्याला चुकीची वाटते. तो तरुण खुळा आहे असे आपल्याला वाटत असेल, पण मला तर वाटते, अरिस्टॉटलइतका–किंबहुना कांकणभर अधिकच–तो तत्त्ववेत्ता आहे. " म्हणून सँको, तूं लक्षात ठेव कीं, मी जिचा दास आहे, ती लेडी डल्सीनिया जगातील सर्वश्रेष्ठ राजकन्या आहे. या किंवा त्या सुंदरींची स्तुतिस्तोत्रे ज्या ज्या कवींनी आजवर गाइली, त्या सर्वांच्या हृदय–देवता खऱ्याखुऱ्या होत्या असे तुला वाटते काय, हे तू मला कृपा करून सांग. प्रत्येक रंगमंचावर––नव्हे, कर्तनालयातही कैक काव्यांत नि गीतांत, प्रणय–कथांत नि पोवाड्यांत, अनेक अमॅरीलिस्, फिलिस्, सिल्हिया, डायना, गॅलेटी, ॲलिडाज इत्यादि ज्या लावण्यवतींचा गौरव केलेला असतो, त्या साऱ्या हाडामांसाच्या स्त्रिया होत्या आणि त्या कविजनांच्या हृदय–देवता होत्या,

असे का तुला वाटते ? छेः छेः तसे मुळीच समजू नकोस. मी तुला ठाम सांगतो की, त्यांच्यापैकी बहुतेक साऱ्या सुंदरी केवळ कवि-कल्पनेतील होत्या—आपल्या बुद्धि-कौशल्याचे प्रदर्शन करण्यासाठी आणि जगाने आपल्याला प्रणयवीर नि रणवीर मानावे म्हणून त्यांनी त्या मानस-रमणी निर्मिलेल्या होत्या. म्हणून अल्डोन्झा लॉरेन्झो शुद्ध-सुंदर आहे, असे मी मानणे पुरेसे आहे. तिच्या कुलपरंपरेचा माझ्याशी फारसा संबंध येत नाही. आपणा पुरुषांना काही सन्मान-चिन्ह द्यावयाचे असले म्हणजे त्याच्या कुलशीलाची चौकशी करतात, तरी स्त्रियांच्या बाबतीत करण्याची काहीच गरज नाही. म्हणून माझ्या दृष्टीने ती जगातील सर्वश्रेष्ठ राजकन्या ठरते. सँको, तुला हे माहीत नसले तर आता समजून घे की, स्त्रीवर प्रेम करण्यास पुरुषाला फक्त दोन कारणांनी उत्तेजन मिळते—एक, आकर्षक सौंदर्य नि दुसरे, निष्कलंक कीर्ति. डल्सीनियाच्या अंगी हे दोन्ही गुण वास करीत आहेत हे सुदैव. सौंदर्याचे बाबतींत तिची सर कोणासच येणार नाही आणि कीर्तीच्या बाबतींत तिची बरोबरी फारच थोड्या स्त्रिया करू शकतील. पण तिच्या-संबंधीचे तुझे सारे आक्षेप एकदम उडवून लावण्यासाठीं मी तुला असे सांगतो कीं, तिच्याबद्दल मी जे जे बोलतो, ते सारे खरे असते – त्यांत कमीजास्त कांहीच नसते. सौंदर्य नि चातुर्य यांची जी जी लक्षणे तिच्या अंगी असावीत असे मला वाटते, ती सारी तिच्या अंगी आहेत, अशी माझी कल्पना आहे. तिची बरोबरी हेलेन करू शकणार नाही– लुक्रेशियाहि नाहीं – ग्रीक, रोमन किंवा बार्बेरियन् यांच्यापैकी ज्या ज्या सुंदरींबद्दल प्राचीन काळी लोक अभिमान बाळगीत, त्यापैकी कोणालाहि तिच्या नखाची सर येणार नाहीं, इतकी ती सर्वगुणसंपन्न आहे – अप्रतिम आहे. जग काय वाटेल ते म्हणो, अडाणी नि गांवढळ लोक माझी कितीहि निंदा करोत, माझ्या मताला अत्यंत विवेकी नि नीतिमान माणसांची मान्यता आहे. यावर मी संतुष्ट आहे. ”

सँको म्हणाला, “ महाराज, मी शरण आहे. आपण जे म्हणता, ते सयुक्तिक आहे. मी गाढव आहे, हे मी कबूल करतो. गाढवासंबंधी बोलणारा मी गाढवच आहे. फाशी गेलेल्या माणसाच्या घरात फासाच्या दोरीसंबंधी बोलणे चुकीचे नाही का ? पण मी न्यायचे पत्र आहे कुठे ? ” हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी वही काढली आणि एका बाजूस जाऊन त्यांनी पत्र लिहिण्यास अत्यंत गांभीर्याने सुरुवात केली. ते लिहून पुरे होताच त्यांनी सँकोला हाक मारली व म्हटले, “ मी हे पत्र तुला वाचून दाखवितो, ते नीट लक्ष देऊन ऐक. ते जसे वहीत, तसेच तुझ्या स्मृतीत जपून ठेव, म्हणजे दुर्दैवाने वाटेत पत्र हरवले, तरी तू ते सांगशील. अरे, दुर्दैव तर माझ्या पाचवीस पूजले आहे, म्हणून मला कोणत्याही अपघाताची भीती वाटते. ” तेव्हा सँको म्हणाला, “ पण महाराज, आपण ते पत्र त्या वहीत दोन-तीनदा लिहावे आणि मग मला द्यावे. म्हणजे मी आपला संदेश सुरक्षितपणे पोचवीन हे मी खात्रीने सांगतो. कारण, ते पत्र मला पाठ होईल असे मानणे मूर्खपणाचे आहे. माझी स्मरणशक्ती इतकी मद आहे की, पुष्कळदा मी माझे स्वतःचे नावही विसरतो ! पण तरीही आपण आपले पत्र मला वाचून

दाखवावे अशी माझी विनंती आहे. कारण ते ऐकण्याची मला प्रचंड इच्छा आहे. ते पत्र छापल्याइतके चांगले लिहिलेले असेल, असे मी ठामपणे सांगतो."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "ठीक तर, ऐक आता."

टोबोसोच्या डल्सीनियाचे चरणी
ला मांचा येथील डॉन क्विक्झोट
याचे प्रणिपात,

हे थोर सार्वभौम श्रीमती,

विरहाची कट्यार ज्याच्या मर्मस्थानी घुसलेली आहे आणि प्रेमाच्या अत्यंत तीक्ष्ण बाणांनी ज्याचे हृदय विद्ध झालेले आहे, तो स्वतःला आरोग्याची अत्यंत गरज असूनही, मधुरतर टोबोसोच्या डाल्सिनिये, ते तुला प्राप्त होवो असे इच्छीत आहे. तुझे सौंदर्य मला झिडकारीत असेल, तुझे गुण माझ्या अस्तंगत आशा फुलवीत नसतील आणि तुझ्या तिरस्कारामुळे माझे दुःख हरण होणार नसेल, तर अखेरीस मला यातनांच्या भाराखाली रुचून मरावेच लागेल. होय, आता वेदना सहन करणे माझ्या अंगवळणी पडले आहे, पण माझ्यावेदना अत्यंत तीव्र आहेत, एवढेच नव्हे तर, कायम टिकणाऱ्या आहेत. हे कृतघ्न सुंदरी ! तू आणि तुझ्यावरील प्रेम यामुळे माझी काय अवस्था झाली आहे, याचा अचूक वृत्तांत माझा विश्वासू सेवक सँको तुला निवेदन करील. अखेरीस तुला जर माझी करुणा आली आणि माझ्या दुःखाची दया आली, तर मी जिवंत राहीन आणि तू आपले जे काही आहे ते संभाळून ठेवशील, एवढेच मी सांगतो. पण जर का तू मला निराशेच्या गर्तेत लोटलेस, तर मी ते दुःख शांतपणे सोसले पाहिजे आणि श्वासोच्छ्वास करण्याचे थांबवून तुझ्या क्रौर्याची आणि माझ्या प्रेमाची भूक शमविली पाहिजे.

आमरण तुझा
दुःखी चेहऱ्याचा शिलेदार.

पत्र ऐकून सँको उद्गारला, "खरोखर, माझ्या बापाशपथ सांगतो, उभ्या आयुष्यात मी याहून चांगले पत्र कधी पाहिले नाही ! आपण आपले मनोगत किती व्यवस्थितपणे नि स्पष्टपणे उघड केले आहे ! आणि पत्राच्या शेवटी "दुःखी चेहऱ्याचा शिलेदार" किती चतुराईने आणलेला आहे ! खरेच, मी पुनः मनापासून सांगतो, प्रत्येक गोष्टीत तुम्ही हुशार आहा. साऱ्या जगात अशी एकही गोष्ट नसेल की जी तुम्ही हाताळू शकत नाही." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझा जो व्यवसाय आहे, त्याला योग्य रीतीने पात्र होण्यासाठी प्रत्येक गोष्टीचे थोडेफार ज्ञान माणसाला असलेच पाहिजे." सँको म्हणाला, "ठीक तर. आता या कागदाच्या उलट बाजूस, तीन गाढवे मला देण्याचा हुकूम लिहा कसा. ते अगदी स्पष्ट स्पष्ट लिहा म्हणजे पाहाताक्षणीच त्यांना कळेल की, हे आपले हस्ताक्षर आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी तसे लिहितो" त्याप्रमाणे त्यांनी लिहिले आणि सँकोला वाचून दाखविले, ते असे :—

" प्रिय पुतणीस,

गाढवांची ही माझी पहिली हुंडी पाहताक्षणीच, मी घरी तुझ्या ताब्यात जी पाच गाढवे ठेवली, त्यापैकी तीन माझा सेवक सँको पँझा याला कृपा करून द्यावी. त्यांचेऐवजी तितकीच गाढवे त्याचेकडून मला मिळाली आहेत. त्याची पावती या हुंडीसोबत तू आपल्या ताब्यात ठेवावीस म्हणजे तुझी जबाबदारी राहणार नाही–सिरा मोरेना पर्वताच्या गुहेतून, विद्यमान वर्षी २२ ऑगस्ट रोजी दिलेला कागद."

सँको म्हणाला, " जसे असावे तसे हे आहे. मात्र त्यात एकाच गोष्टीची उणीव आहे. खाली आपले नाव नाही." डॉन क्विक्झोट उत्तरले, " माझे नाव घालण्याची काही गरज नाही. मी तेथे फक्त दोन आद्याक्षरे लिहीन. संपूर्ण नाव लिहिण्याइतकेच ते कायदेशीर होईल. तीनच काय पण तीनशे गाढवांचे बाबतीतही हा हुकूम कायदेशीर ठरेल." सँको म्हणाला, " स्वामींचा शब्द मी प्रमाण मानतो. आता मी रोझीनांटवर खोगीर घालतो. नंतर आपण मला आशीर्वाद द्या. आपली एकही खुळचट कृती न पाहता मी तत्काळ निघण्याचे योजले आहे. आपले पुष्कळ पराक्रम पाहिल्याचे मी तिला निवेदन करीन. त्यामुळे तिला अधिक काही ऐकण्याची इच्छा उरणार नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले," नाही, तसे नाही. सँको, तू अंमळ थांब. मला तू संपूर्ण नागवा पहा. मी वीस-पंचवीस वेडेचार करीन, ते तू पाहणे अत्यंत अवश्य आहे. ते सारे अर्ध्या तासात उरकले जातील. ते तू प्रत्यक्ष पाहिलेस म्हणजे तू छातीवर हात ठेवून तिला शपथपूर्वक सांगू शकशील की, शिलेदारांचे हजार थेर मी पाहिले आहेत. मी जितक्या लीला करीन, त्यांहून तू अधिक आकडा कधी सांगणार नाहीस असे मी खात्रीने म्हणतो." सँको म्हणाला," भले महाराज आपले मजवर प्रेम आहे ना ? मग आपल्याला नागवे पाहण्यासाठी मला थांबवून घेऊ नका, त्यामुळे माझे हृदय इतके पिळवटेल की, ते पाहताना माझी बुब्बुळे डोळ्यातून बाहेर पडतील. माझे गाढव हरवल्यामुळे काल रात्रीपासून मी खूप आक्रोश नि आक्रंदन केले आहे. त्यामुळे पुनः ओरडण्याचे त्राण माझ्या अंगी नाही. माझे डोके गरगरत आहे. पण जर आपल्या काही करामती मी पाहणे आपल्याला अवश्य वाटत असेल, तर आपण अंगावर कपडे ठेवून त्या कराव्यात, आणि आपल्या कार्याला त्या अत्यंत उपयुक्त असाव्यात. मी येथून जितका लवकर जाईन, तितका लवकर परत येईन येथे थांबणे हा काही येथून निघून जाण्याचा मार्ग नव्हे. आपल्या अंतःकरणाला संतोष होईल, असे उत्तर आणण्याची माझी इच्छा आहे. तसे मी करीन अशी मला खात्री वाटते. पण तो लेडी डल्सीनियाचा प्रश्न आहे. तिने उत्तर द्यावयास हवे. पण जर ते तिने दिले नाही, तर तिला लाथाबुक्क्यांचा प्रसाद देऊन तिच्या आतड्यातून मी उत्तर बाहेर काढीन. आपल्यासारख्या महनीय शिलेदाराने एका छोकरीसाठी वेड्यासारखे वागावे हे मला सहन होण्यासारखे नाही. मला जे माहीत असावयास हवे, ते माहीत आहे. ते बोलून दाखविण्यास तिने मला भाग पाडू नये. नाही तर, देवाशपथ मी आकाशात उड्डाण करीन आणि तिचे रूप बदलून टाकीन."

डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, मी तुझा निषेध करतो, माझ्याइतकाच तू वेडा आहेस असे मला वाटते. " सँको उत्तरला, " नाही, तितका नाही, पण जरा अधिक तापट आहे. पण त्याविषयी काही बोलू नका. आता आपण हा विचार करू या की, मी येथून गेल्यावर आपल्या खाण्यापिण्याचे काय ? त्या पलीकडच्या वेड्या माणसाप्रमाणे आपण वागणार आहात का ? राजमार्गावर जाऊन दंडेलीने मेंढपाळांचे खाद्यपदार्थ हिरावून घेणार का ? " डॉन क्विक्झोट उत्तरले, " त्यासाठी तू आपले डोके शिणवू नकोस. एखाद्या ऐश्वर्यशाली माणसाच्या जिभेला संतुष्ट करण्यासारखी उंची उंची पक्वान्ने माझ्याजवळ असती, तरीही या अरण्यात मला मिळतील त्या कंद–मुळांवरच मी माझी भूक भागवीन. कारण माझ्या सध्याच्या कार्याचे वैशिष्ट्य उपवासात, अर्धपोटी राहण्यात आणि अशाच इतर तपाचरणात साठविलेले आहे. " सँको म्हणाला, " पण महाराज, माझ्या डोक्यात आणखी एक गोष्ट आली आहे. हे ठिकाण इतके आडवळणाचे आहे की, पुनः येथे येण्यास मला रस्ता कसा सापडेल ? " डॉन क्विक्झोट म्हणाले, " ते तू आधीच चांगले लक्षात ठेव. तू परत येईपर्यंत मी माझ्या खाणाखुणा ठेवण्याची खटपट करीन. शिवाय तू जेव्हा परत येशील असे मला साधार वाटेल, त्या सुमारास त्या पलीकडच्या उंच खडकावर तुझ्या येण्याची वाट पाहात मी उभा राहीन. पण मला याहून अधिक चांगली युक्ती आता सुचली आहे. तू झाडाच्या पुष्कळ फांद्या तोड आणि येथून जाताना त्या रस्त्यावर टाकीत जा. मैदानावर जाईपर्यंत असे कर. त्यामुळे परत येताना तुला मी सहज सापडेन–क्रीटमध्ये घोटाळ्यांच्या वाटेने जाताना पर्सिअसने खुणा ठेवल्या त्याप्रमाणे. "

सँको म्हणाला, " तर मग निघतो मी येथून. " असे म्हणून तो निघाला. त्याने फांद्या तोडल्या आणि त्यांची मोळी बांधली. नंतर धन्याकडे जाऊन त्याने त्याचे आशीर्वाद मागितले. दोघांच्याही डोळ्यातून अश्रूंचा वर्षाव झाला. नंतर सँको रोझिनांटवर स्वार झाला. त्यावेळी डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, " घोड्याची काळजी नीट घे. स्वतःच्या शरीराप्रमाणेच या उत्कृष्ट घोड्याशी ममतेने वाग. " नंतर सँको मैदानाकडे दौडत गेला, आणि जाताना, धन्याच्या आज्ञेनुसार, कैक फांद्या पसरीत गेला. जाण्यापूर्वी त्याने थोडा वेळ थांबून आपल्या दोनतीन करामती पहाव्यात अशी विनंती त्याच्या धन्याने त्याला केली, पण तिचा काही प्रभाव त्याचेवर पडला नाही; तथापि धन्याच्या दृष्टीचे टप्प्याबाहेर जाण्यापूर्वी त्याने त्या विनंतीचा विचार केला आणि तो परत आला व म्हणाला, " महाराज, मी चांगला विचार केला. तेव्हा मला वाटते, मी आपल्या सल्ल्याप्रमाणे वागावे. आपल्या वेड्या उड्या – किंवा खोड्या– मी प्रत्यक्ष पाहिल्या म्हणजे मी निर्धास्तपणे तिला शपथपूर्वक वर्णन करून सांगेन. म्हणून आपण निदान एक तरी कृती करावी म्हणजे ती मी पाहीन. अर्थात् त्याहून फार मोठी अशी कृती आपण यापूर्वीच केली आहे – ती म्हणजे या अरण्यात एकाकी राहण्याची ! "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " मी तुला योग्य सल्ला दिला होता. तू थोडा वेळ थांब

म्हणजे तुला जे पहावयाचे आहे, ते मी तुला दाखवीन. " असे म्हणून त्यांनी आपला पायजमा खाली सोडला आणि कमरेपर्यंत ते नग्न झाले. नंतर त्यांनी हवेत दोन-तीन उड्या मारल्या आणि हात वर करून त्यांनी आपले तळवे आपल्या डोक्यावर दोनदा टेकविले, पाय वर असताना ते खाली कोसळले आणि त्यांनी असे काही चमत्कारिक अंगविक्षेप केले की, सॅकोला ते आणखी पहावेनात. म्हणून त्याने आपल्या घोड्याचे तोंड घाईघाईने वळविले आणि तो तेथून दौडत गेला. आपला धनी वेडा आहे असे शपथेवर सांगण्यास तो पूर्ण तयार झाला. आता जलद जाऊन परत येण्यास आपण त्याला मोकळीक देऊ या. कल्पनातीत वेगाते तो तेथून गेला आणि परत आला.



## प्रकरण १२

# ला मांचाच्या शूर शिलेदाराने आपले प्रेम प्रकट करण्यासाठी सीएरा मोरेनामध्ये जी सुसंस्कृत स्वैर कृत्ये केली, त्यांचा पुढील भाग.

या इतिहास-ग्रंथात असे लिहिले आहे की, 'दुःखी चेहऱ्याचे' आपले शिलेदार-साहेब एकटे राहिल्यानंतर त्यांनी स्वतःकडे एकदा निरखून पाहिले. आपल्या प्रेममय तपस्येची पूर्वतयारी करण्यासाठी त्यांनी आपल्या अंगावरील कपडे काढले होते. तशा नग्नावस्थेत ते एका उंच खडकाच्या माथ्यावर चढले. अशा या नाजुक पेचप्रसंगी आपण काय करावे याचा निश्चय करण्यासाठी ते गंभीरपणे विचार करू लागले, मोकाट आणि अनावर अशा आवेशातील ओर्लँडोचे आपण अनुकरण करावे की दुःखमग्न अमॅडिसचे? या संदेहाने त्यांचे मन गोंधळून गेले होते! तेव्हा ते स्वतःशीच असा विचार करू लागले, "महापराक्रमी ओर्लँडोचे मला काही आश्चर्य वाटत नाही. त्याच्या तळव्यामध्ये लांब खिळा घुसला तरच तो ठार होईल, एरवी नाही, अशी जादू एका मांत्रिकाने केलेली होती. म्हणून त्याने आपल्या बुटाला लोखंडाचे सात तळ बसवून आपला तळवा पूर्णपणे सुरक्षित ठेवला होता. पण तरीही कार्पिओच्या बर्नार्डोपुढे त्याचे काही चालले नाही. त्याचा आधार काय आहे, हे माहीत असल्यामुळे बर्नार्डोने त्याला रोन्सेस-व्हॅलेन्स येथे आपल्या मिठीत घट्ट आवळून ठार मारले. त्याचे शौर्य बाजूस ठेवून आपण त्याच्या मूर्खपणाचा विचार करू! तो मूर्ख होता याविषयी काही प्रश्न नाही. ते जितके सत्य, तितकेच हेही सत्य की, त्याच्या माथेफिरूपणाला कारण अँजेलिका ही सुंदरी झाली. मेडोराच्या अनैतिक प्रेमजालात ती आपण होऊन सापडली. मेडोरा हा एक तरुण अरब होता. कुरळ्या केसाचा हा तरुण अॅग्रामँटेचा शागीर्द होता. आपल्या हृदयस्वामिनीच्या या बदफैलीपणाची खात्री पटल्यामुळे त्याचे डोके फिरले, यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. पण तसे काही कारण माझ्या बाबतीत घडले नसताना मी त्याच्या सावेश कृत्याचे अनुकरण कसे करू? कारण मला अशी बालंबाल खात्री वाटते की, माझी प्रियतमा टोबोसोची डल्सीनिया हिने जन्मापासून – सूर्याचे प्रथम दर्शन झाल्यापासून – खराखुरा अरब त्याच्या वेषात कधी पाहिलाच नसेल. तिला जन्म देणाऱ्या मातेसारखीच योग्य भाषा तिच्या तोंडून सध्या बाहेर पडत असते. म्हणून तिच्या वर्तना-संबंधी मी माझ्या मनात काही अपमानास्पद विचार येऊ दिले तर तिच्यावर मोठा अन्याय केल्यासारखे होईल, आणि म्हणून मला ओर्लँडो फ्यूरिओसोप्रमाणे वेडे होत

येत नाही. उलटपक्षी गॉलच्या अमॅडिसने अशा प्रक्षोभाने आपल्याला शासन करून घेतले नाही, आणि आपला संताप अशा बेफाम बडबडीने व आरडाओरडीने व्यक्त केला नाही, तरीही दुसऱ्या कोणाहीइतकाच तो प्रेमीजन होता असा त्याचा मोठा लौकिक झाला. तो शोकसागरात का बुडाला याचे इतिहासात जे कारण दिले आहे, ते असे— ' त्याचा धिक्कार करण्यात आला. त्याची हृदयस्वामिनी ओरियाना हिने त्याला आपल्या दृष्टिपथातून दूर जाण्यास फर्मावले आणि ' मी परवानगी देईपर्यंत माझ्यासमोर पुनः उभा राहू नकोस '. असे बजावले. एका एकान्तवासी साधूबरोबर तो ' रंक पर्वता'-वर का गेला आणि शोकसागरात बुडून त्याने अश्रूंचा पूर का वाहविला याचे खरे कारण हे आहे. शेवटी प्रभूला त्याची करुणा आली आणि त्याच्यावर दया दाखवून त्याला प्रभूने सुख दिले. त्याचे दुःख शिगेस पोचले असताना त्याला देव पावला. ' आता ज्याअर्थी हे सारे खरे आहे— आणि ते खरे आहे हे मला माहीत आहे— त्या-अर्थी मी माझे कपडे फाडून टाकण्याची, हे निष्पाप वृक्ष उन्मळून टाकण्याची किंवा या झऱ्याचे पाणी गढूळ करण्याची काय गरज आहे ? मला तहान लागली तर हे झरे मला पाणी देतील. बस्स् ! गॉलच्या अमॅडिसची स्मृती अमर असो ! त्याचे शक्य तितके अनुकरण सर्व बाबतीत ला मांचाचा डॉन क्विक्झोट करील, तो त्याचा महान् आदर्श राहील. त्यामुळे त्या मृतवीराप्रमाणेच या जिवंत वीराचाही लौकिक असा होईल की, याने मोठ्या गोष्टी केल्या नसल्या तरी महत्कृत्ये करण्याची आकांक्षा त्याच्याइतकी दुसऱ्या कोणीच बाळगली नाही. डल्सीनियाने मला हेटाळले नाही किंवा झिडकारले नाही हे खरे. पण मी तिच्यापासून दूर आहे एवढे कारण पुरेसे आहे ! बस्स ! ठरला निश्चय ! अमॅडिस या महापुरुषाच्या सुविख्यात कृत्यांचे स्मरण आता मला सदैव होवो आणि तो माझा विश्वासू वाटाड्या ठरो. त्याचाच कित्ता मी गिरविणार. ''

असे म्हणून त्यांनी मनात आणले की, त्या वीराचे एकांतवासातील प्रधान कार्य म्हणजे प्रार्थना करणे हे होते. त्यासाठी आमच्या या अर्वाचीन अमॅडिसने ताबडतोब मण्यांऐवजी बांडगुळांच्या फळांची माळ केली. आपल्या पापाचा कबुलीजबाब ऐकून आपल्याला आपल्या दुःखात समाधान देणारा साधुपुरुष आपल्याजवळ कोणी नाही, याचा त्यांना अत्यंत खेद वाटला. तरीही आपल्या प्रेमविषयक विचारांच्या चिंतनात गढून जाऊन डॉन क्विक्झोट त्या कुरणात इकडे तिकडे फिरू लागले आणि मऊ मऊ वाळूवर व झाडांच्या सालीवर काही काव्यमय पंक्ती लिहू लागले, त्यात त्यांच्या स्वतःच्या दुःखाचे प्रतिबिंब जसे पडलेले होते, तसेच डल्सीनियाच्या प्रशंसेचे वर्णनही होते. पण दुर्दैवाने एकही काव्य पूर्ण झाले नव्हते— आणि वाचता येण्यासारखे नव्हते. तथापि पुढील काव्यपंक्ती वाचता येण्यासारख्या होत्या.

हे शाखांचे बाहू विस्तारणाऱ्या उंच वृक्षांनो,
तुम्ही समरभूमीचे अभिमानस्थान आणि आश्रयस्थान आहात;

हे नम्रतर झुडुपांनो आणि उमलत्या वैभवात
राज्य करणाऱ्या मोहक फुलझाडांनो !
माझ्या गाऱ्हाण्यांनी जर तुम्हाला पाझर फुटेल,
तर माझ्या प्रीतीची करुण कहाणी ऐका,
माझ्यासह येथे कालक्रमणा करीत आहांत तोपर्यंत.
माझ्या चिंतांनी जर तुम्ही कोमेजून जाल,
तर टवटवीत करणाऱ्या वर्षावाची लांच मी तुम्हाला देईन,
माझ्या अश्रूंचे पाणी तुम्हाला घालीन.
जरी कल्पनेत सध्या ती दूर असली
तरी येथे नसलेल्या माझ्या डल्सीनिया डेल टोब्रोसोसाठी
मी शोक करीत आहे.
प्रेमाच्या एकनिष्ठ दासाने हताशपणे निवडले,
हे एकांत अरण्यस्थळ, हे वाळवंटी मैदान,
ते मूकपणे साक्षी आहे त्याने भोगावयाच्या दुःखांचे,
जरी तो निरपराधी असला तरी.
ह्या वेदना का सहन करायच्या हे न कळता
तो कण्हतो, बडबडतो, निराश होतो
प्रीती न विझणाऱ्या ज्वाळांनी माझ्या जीवाचा छळ करते
व्यर्थ मी दुःख करतो, व्यर्थ मी शोक करतो;
हालहाल होणाऱ्या पिशाच्चासारखा रडतो, कोकलतो
आणि जळतो, पण कधीही पस्तावूं शकत नाही.
जरी कल्पनेत सध्या ती दूर असली
तरी येथे नसलेल्या माझ्या डल्सिनिआ डेल टोबोसोसाठी
मी शोक करीत आहे.
मानप्रतिष्ठेच्या कांटेरी मार्गामधून
दूरस्थ यशश्रीच्या शोधार्थ मी भटकत असता
दुष्टबुद्धि दैव माझ्या कष्टांची फेड करते
अनन्त दुःखे देऊन आणि प्रेमाला निराश करून.
याप्रमाणे मी उजाड खडकांवर हताश होतो
आणि दैवाला शाप पण माझ्या सुंदरीला आशीर्वाद देतो.
सर्वशस्त्रसज्ज प्रेमाने आपला बाण रुतवला आहे
आणि तो पिसाटपणे अंगप्रत्यंगावर फटके नी दंश मारून
या दासाला वेडा करीत आहे
जरी कल्पनेत सध्या ती दूर असली

तरी येथे नसलेल्या माझ्या डल्सिनिया डेल टोबोसोसाठी
मी शोक करीत आहे.

डल्सीनियाच्या नावाला 'टोबोसोची' हे पद जोडल्यामुळे, हे काव्य ज्यांना सापडले, त्यांचे पोट हसता हसता दुखू लागले. आणि त्यांनी कल्पना केली की, या काव्य-पंक्ती डॉन क्विक्झोट यांनी जेव्हा रचल्या, तेव्हा त्या कोणावर रचल्या हे वाचकांना, तिच्या जन्माचे व वास्तव्याचे स्थान कळल्याशिवाय, समजणार नाही, असे त्यांना वाटले असावे. खरे कारण हेच होते. आणि ते त्यांनी स्वतःच पुढे कबूल केले. अशा उद्योगात आमच्या उदास शिलेदाराने आपला कंटाळवाणा काळ घालविला. केव्हा केव्हा त्यांनी आपला शोक गद्यात प्रगट केला, हवेत सुस्कारे सोडले आणि वनदेवता, वनस्पति-देवता, जल-देवता आणि जवळच्या वनराईतील देवता यांना आवाहन केले. त्याचा दुःखद प्रतिध्वनी त्यांचे कानी पडत होता. त्या सर्वांचे लक्ष आणि कृपा मिळविण्यासाठी त्यांनी वारंवार आर्जवे केली. काही वेळा त्यांनी आपल्या थकत जाणाऱ्या प्रकृतीला सांभाळण्यासाठी कंद-मुळे गोळा करण्याचा उद्योग चालविला. अल्प-आहार आणि ओढवून घेतलेली चिंता व तीव्र चिंतन या सर्वांमुळे त्यांची प्रकृती झपाट्याने खालावली; ती इतकी की, सँको त्यांच्यापासून तीन आठवडे दूर राहिला असता, (सुदैवाने तो तीन दिवसच दूर राहिला.) तर 'दुःखी चेहऱ्याच्या या शिलेदारा'चे स्वरूप इतके विकृत झाले असते की, खुद्द त्याच्या आईनेदेखील आपल्या पोटचा हा गोळा ओळखला नसता.

पण आता आपण त्यांना त्यांच्या सुस्काऱ्यावर, हुंदक्यावर आणि प्रेमपूर्ण विलापावर सोडून देणे अवश्य आहे. सँको पँझाने आपली कामगिरी कशी बजावली हे आपण आता पाहिले पाहिजे. त्या डोंगरातून बाहेर पडण्यासाठी त्याने शक्य तितकी त्वरा केली आणि टोबोसोचा सरळ रस्ता धरला. दुसरे दिवशी तो त्या खाणावळीच्या जवळ जाऊन पोचला. तेथेच त्याची घोंगडीत उडवणी झाली होती. त्या भयानक भिंती पाहताच त्याच्या शरीरात अकस्मात हुडहुडी भरली. आपण पुनः हवेत उडवले जात आहो अशी त्याची कल्पना झाली. ती जेवणाची वेळ होती. गरम गरम मांस खाण्याच्या कल्पनेने त्याच्या तोंडाला पाणी सुटले. कारण आतापर्यंत बराच काळ त्याला थंड मांसावर आपली भूक भागवावी लागली होती. म्हणून पुढे जाण्याची आपली इच्छा दडपून टाकून तो मांसाहाराच्या लोभाने त्या खाणावळीजवळ गेला. त्या स्थानाबद्दल त्याला तिटकारा होता. तो दाराशी जाऊन पोचला पण आत जाण्याचे धैर्य त्याला होईना. 'आत जावे की न जावे?' या संभ्रमात तो तेथेच थांबला.

तो असा विचार करीत बसला असताना दोन माणसे आतून बाहेर आली. सँकोला आपण ओळखतो असे त्यांना वाटत होते. म्हणून एकजण दुसऱ्याला म्हणाला, "डॉक्टरसाहेब, पहा, हाच तो सँको पँझा ना? त्यालाच डॉनबरोबर जाण्यास आपल्या धन्याने फर्मावले असल्याचे घरधनीण आपल्याला सांगत होती." दुसऱ्याने उत्तर दिले, "तोच तो! विशेष म्हणजे डॉन क्विक्झोटच्या घोड्यावर तो स्वार झाला आहे." हे

दोघे गृहस्थ म्हणजे पाद्री व न्हावी. त्यांनीच डॉन क्विक्झोटच्या ग्रंथावर खटला भरून त्यांना शिक्षा ठोठावली होती. हे संभाषण होताच त्यांनी सँकोला बोलावले आणि विचारले, " आपल्या धन्याला तू कोठे सोडलेस ? " त्या विश्वासू सेवकाने त्या दोघांना चटकन् ओळखले. पण आपला धनी कोणत्या जागी, कोणत्या स्थितीत आहे, हे त्यांना सांगण्याची त्याला इच्छा नव्हती. म्हणून तो म्हणाला, " माझ्या धन्याने फार मोठे महत्त्वाचे कार्य एके ठिकाणी अंगावर घेतले आहे. जीव गेला तरी मी ते ठिकाण सांगणार नाही. " न्हावी म्हणाला, " अरे सँको, काही तरी खोटीनाटी गोष्ट सांगून आम्हाला फसवू नकोस. तुझा धनी कोठे आहे, हे तू आम्हाला सांगितले नाहीस तर, आम्ही असे समजू की, तू त्याचा खून केला आहेस आणि त्याचा घोडा चोरला आहेस. म्हणून तू त्याला कोठे सोडलेस हे आम्हांला सांग, नाही तर आम्ही तुला पायाखाली तुडवू. "

सँको म्हणाला, " शेजाऱ्यांनो, हे पहा, मी शब्दांना भीत नाही. मी चोर नाही की दरोडेखोर नाही. मी कोणाला मारत नाही आणि म्हणून मला कोणी मारीत नाही. ज्याला त्याला मी आपल्या कर्माने किंवा स्वतःच्या हाताने मरू देतो. माझ्या धन्याला मी पलीकडच्या डोंगरांमध्ये मनसोक्त खेळण्या-बागडण्यास आणि तपश्चर्या करण्यास मोकळे सोडले आहे. " नंतर त्या दोघांनी आणखी विनंती केली नसतानाच त्याने तेथील सारा वृत्तांत आणि आपले सारे पराक्रम त्यांना ऐकविले आणि म्हटले, " आता मी माझ्या धन्याचे एक पत्र घेऊन 'टोबोसोच्या लेडी डल्सीनिया 'कडे जात आहे. लोरेन्झो कुर्चेलोच्या त्या कन्येवरील प्रेमात आमचा धनी आकंठ बुडाला आहे. " हा सारा तपशील ऐकून पाद्री व न्हावी चकित झाले. डॉन क्विक्झोटचा वेडेपणा त्यांना पुरा पुरा माहीत होता. तरीही तो इतक्या थराला जाऊन पोचला आहे आणि इतक्या विलक्षण स्वरूपात अतिरेक करीत आहे याचे त्यांना अधिकाधिक आश्चर्य वाटू लागले. सँकोने ते पत्र आपल्याला दाखवावे, अशी त्यांना इच्छा झाली. तो म्हणाला," ते वहीच्या पानावर लिहिले आहे. आणि मी प्रथम ज्या खेड्यात जाईन, तेथे चांगल्या कागदावर ते उतरवून घेण्यास माझ्या धन्याने मला बजावले आहे. " तेव्हा पाद्याने आपण स्वतःच ते पत्र अत्यंत सुंदर अक्षरात लिहून देण्याचे वचन दिले. म्हणून ती वही त्याला देण्यासाठी सँकोने आपल्या छातीवर आपला हात बराच काळ फिरवला. पण त्याला ती वही काही सापडेना. ती त्याने पुनः पुनः शोधली, पण व्यर्थ ! जगाच्या अंतकाळापर्यंत जरी त्याने शोध केला असता तरी तो फुकट गेला असता, कारण ती वही न घेताच तो डॉन क्विक्झोटपासून झटकला होता. त्यामुळे त्याच्या अंगाला दरदरून घाम फुटला आणि मृतमाणसाप्रमाणे तो फिक्कट दिसू लागला. त्याने आपले कपडे तपासले. खिसे आतून बाहेर काढले आणि पुनः आपल्या छातीवर हात फिरविले. शेवटी त्याची खात्री पटली की, ते पत्र आपल्याजवळ नाही. तेव्हा तो बडबडू लागला, हात आपटू लागला आणि स्वतःला वेडा म्हणून शिव्याशाप देऊ लागला. आपल्या दोन्ही हातांनी तो आपली

दाढी उपटू लागला. आपल्या विसराळू मेंदूवर आणि फुगलेल्या गालावर ताडताड बुक्या मारू लागला. क्षणार्धात् त्याच्या नाकातून रक्त वाहू लागले. न्हावी व पाद्री यांनी त्याला विचारले, "अरे, झाले तरी काय ? तू स्वतःला अशा विलक्षण रीतीने शिक्षा का करून घेतोस ?" सँको म्हणाला, "त्या शिक्षेला मी पूर्णपणे पात्र आहे. मी किती महामूर्ख आहे पहा. एका तडाख्यासरशी मी तीन गाढव की हो गमावले ! त्यातले अगदी भिकार गाढवसुद्धा एका किल्ल्याच्या किमतीचे होते."

न्हावी म्हणाला, "ते कसे ?"

सँको उत्तरला, "कसे म्हणजे ? अहो, मी जी वही हरवली तिच्यात डल्सीनियाला लिहिलेले पत्र होते आणि माझ्या धन्याने आपल्या पुतणीला आपल्या घरातील पाचां-पैकी तीन गाढवे मला देण्याचा हुकूम केला होता." नंतर त्याने आपले स्वतःचे गाढव कसे हरवले, हे त्यांना सांगितले. तेव्हा पाद्री त्याला आनंदित करण्यासारखे बोलला, "अरे, मी तुला तुझ्या धन्याकडून चांगल्या कागदावर दुसरी हुंडी आणून देतो. वहीतील हुंडी योग्य प्रकारे लिहिलेली नसल्यामुळे ती मानली गेली नसती." हे ऐकून सँकोला धीर आला आणि तो त्यांना म्हणाला, "तसे जर असेल, तर डल्सीनियाच्या पत्राबद्दल मी काडीची पर्वा करीत नाही. कारण ते मला बहुतेक सर्व तोंडपाठ आहे." तेव्हा न्हावी म्हणाला, "अरे, मग आम्हाला ऐकू देच ते पत्र. आम्ही ते ऐकू आणि लिहू." त्यासाठी सँको थांबला आणि शब्द शोधू लागला. लगेच तो आपले डोके खाजवू लागला, एकदा एका पायावर तर दुसऱ्यांदा दुसऱ्या पायावर उभा राहिला, एकदा आकाशाकडे तर एकदा जमिनीकडे टक लावून पाहू लागला. शेवटी आपला अंगठा कुरतडून तो बोलू लागला. न्हावी व पाद्री यांचा धीर सुटत चालला होता, तेव्हा सँको म्हणाला, "हे धर्मगुरो, देवाशपथ मला असे वाटते की, माझ्या डोक्यात सैतान शिरला असावा. माझा गोंधळ करणाऱ्या त्या पत्रातील एक शब्द मला आठवत असेल तर शपथ ! फक्त प्रारंभीचे, "उच्चकुलीन नि भूमिगत स्त्रिये," एवढेच शब्द मला आठवतात." तेव्हा न्हावी म्हणाला, "'सार्वभौम नि अतिमानुष स्त्रिये,' असे तू म्हणावयास हवेस." सँको म्हणाला, "हो रे हो, तुझे म्हणणे बरोबर आहे. पण थांब, त्यानंतर त्या पत्रात काय लिहिले होते, हे मला आता थोडेफार आठवू लागले आहे. हां, हां, आठवले मला आता मला पुरे आठवले-"मला जखम झाली आहे आणि झोप पाहिजे आहे. मी तुझ्याकडे कट्यार पाठवीत आहे. ती मला स्वतःला पाहिजे आहे–तिने माझे हृदय भोसकले आहे. हा घायाळ माणूस बाईसाहेबांच्या हाताचे चुंबन घेत आहे' आणि सेवटी चाचरत–गुणगुणत शेकडो शब्द लिहून 'टोबोसोची मधुरतम डल्सीनिया' अशा प्रकारे बराच वेळ माझ्या धन्याचे डोके फिरत होते. दुःखाने त्याला मूर्च्छा येत होती आणि पुनः तो ताजातवाना होऊन पत्र लिहीत होता. त्या पत्राच्या शेवटी त्याने लिहिले, 'आमरण तुझाच–दुःखी चेहऱ्याचा शिलेदार.'

सँकोच्या या अलौकिक स्मरणशक्तीमुळे पाद्री व न्हावी यांना खूपच आनंद झाला.

इतका की, ते पत्र आणखी दोन-तीनदा म्हणून दाखव म्हणजे आम्हाला ते तोंडपाठ होईल आणि आम्ही ते लिहून काढू, असे ते म्हणाले. सँकोने मोठ्या मोकळ्या मनाने तसे केले. पण प्रत्येक वेळी तो पत्राच्या मजकुरात विलक्षण असे पुष्कळ बदल आणि फेरफार करीत असे; त्यात भरही घालीत असे. त्यामुळे पहिल्या पत्राइतकाच पुढील मजकूरही आल्हाददायक होत होता. नंतर त्याने त्यांना आपल्या धन्याच्या इतर पुष्कळ गोष्टी सांगितल्या, पण खाणावळीत आपली स्वतःची घोंगड्यामध्ये झालेली उडवणी मात्र त्याने एका शब्दाने सांगितली नाही. तो म्हणाला, "मी जर लेडी डल्सीनियाकडून प्रेमपूर्ण उत्तर आणले, तर माझा धनी तिला भेटण्यासाठी ताबडतोब निघेल, आणि स्वतः बादशहा-निदान राजा— बनेल. तसा आम्हा दोघांमध्ये करारच झालेला आहे. माझ्या धन्याची शक्ती आणि शस्त्रबळ इतके प्रचंड आहे की, राजा–महाराजा होणे हा त्याच्या तळहातचा मळ आहे. माझा धनी सम्राट झाला की, सम्राज्ञीच्या एका दासीशी तो माझे लग्न लावून देईल आणि ती सुंदरी राज्यातील एका मोठ्या प्रदेशाची वारसा-हक्काने मालकीण बनेल—एखादे बेट– किंवा काही बेटे— यांची मालकी मला नको आहे." हे सारे तो बिचारा सँको इतके मनापासून बोलत होता— भावना उचंबळून येऊन बोलत होता– की, पुनः पुनः तो आपले नाक पुशीत होता आणि आपली दाढी ओढीत होता. त्यामुळे पाद्री व न्हावी यांना त्याचे पूर्वीपेक्षाही अधिक आश्चर्य वाटले. डॉन क्विक्झोट यांच्या मूर्खपणाचा इतका विलक्षण प्रभाव या भोळ्या-खुळ्या माणसावर पडला आहे, हे पाहून ते चकित झाले. पण त्याचा भ्रमनिरास करण्याची काही गरज आहे, असे त्यांना वाटले नाही. कारण त्याचा भ्रम निरुपद्रवी होता आणि त्यामुळे त्यांची थोडा वेळ करमणूक होत होती. म्हणून त्यांनी त्याला आग्रहाने सांगि-तले, "अरे, आपल्या धन्याच्या आरोग्यासाठी आणि दीर्घायुष्यासाठी तू देवाची प्रार्थना कर; तू म्हणतोस त्याप्रमाणे तो योग्य वेळी सम्राट होणे– किंवा निदान धर्माध्यक्ष होणे— अथवा त्यासारखेच काही तरी होणे– मुळीच अशक्य नाही."

सँकोने विचारले, "हे धर्मगुरो, मला कृपा करून सांगा की, माझ्या धन्याच्या मनात सम्राट होण्याचे नसले आणि धर्माध्यक्ष होण्याचा त्याला जर छंद लागला, तर धर्माध्यक्ष आपल्या सेवकांना नेहमी काय देतात?" पाद्र्याने उत्तर दिले, "का? त्याला धर्मोपदेशकाच्या जागेत राहावयास मिळते, नाही तर अल्पसे वेतन किंवा दुसरी काही तरी प्राप्ती होते. चर्चमधील वेदीवर भरपूर पैसा ठेवला जातो." सँको म्हणाला, "ते खरे, पण त्यासाठी सेवक ब्रह्मचारी असावा लागतो आणि प्रार्थनेच्या लोकांना कशी मदत करावी किंवा कशी उत्तरे द्यावीत हे तरी त्याला माहीत असावे लागते पण दुर्दैवाने माझे लग्न झालेले आहे आणि ख्रिस्ती धर्माची मुळाक्षरेसुद्धा मला येत नाहीत. इतर शिलेदारांप्रमाणे माझा धनी सम्राट न होता, धर्माध्यक्ष होण्याचे त्याच्या डोक्यात शिरले, तर माझे काय होणार?" न्हावी म्हणाला, "मित्रा सँको, या विचाराने तू आपले डोके शिणवू नकोस. आम्ही त्यासंबंधी तुझ्या धन्याशी बोलणे करू, उपदेश करू, नव्हे

आग्रह करून सांगू की, " धर्माध्यक्ष होण्यापेक्षा बादशहा होणे चांगले, कारण तुमच्याजवळ विद्वत्तेपेक्षा शौर्य अधिक आहे. "

सँको म्हणाला, " बरोबर ! माझेही मत तसेच आहे. तो इतका डोकेबाज आहे की, तो कोणताही व्यवसाय करू शकेल असे मी ठासून सांगतो. तथापि, मी परमेश्वराला मुख्य प्रार्थना हीच करीन की, त्याला जे अत्यंत अनुरूप आहे आणि ज्यामुळे मला बक्षिस देण्यास तो अत्यंत समर्थ ठरेल, असाच व्यवसाय त्याने निवडावा अशी प्रभूने त्याला बुद्धी द्यावी. " तेव्हा पाद्री म्हणाला, " अरे, तू तर एखाद्या शहाण्या माणसासारखा–सज्जन खिश्चनासारखा– बोलतोस. पण सध्या आपल्याला जे काही करावयाचे आहे, ते म्हणजे तुझ्या धन्याने सांप्रत जे कडक नि निरुपयोगी तप चालविले आहे, ते तो कसा थांबवील याचा विचार करणे. म्हणून आपण त्या प्रश्नाचाच विचार करू आणि आपले जेवणही करू. कारण आतापर्यंत आपले जेवण तयार झाले असेल, असा माझा तर्क आहे. " सँको म्हणाला, " इच्छा असेल तर तुम्ही दोघे आत जा, पण मी बाहेर राहीन. मी दाराचे आत का जाऊ इच्छित नाही हे मी तुम्हाला लवकरच सांगतो. तुम्ही मला खाण्यासाठी काही गरमागरम मांस पाठवून द्या आणि रोझिनांटसाठी चारावैरणही पाठवा. "

तेव्हा ते दोघे आत गेले अन् थोडया वेळाने न्हाव्याने त्याच्यासाठी काही मांस आणले. तो पाद्र्याकडे परत गेला आणि आपली योजना कशी पार पाडावी, याचे खलबत ते दोघे करू लागले, शेवटी पाद्र्याने अशी एक युक्ती शोधून काढली की, ती डॉन क्विक्झोटच्या स्वभावाला अगदी साजेशी होती. ती युक्ती अशी की, त्याने स्वतः दासीचा वेष धारण करावा आणि न्हाव्याने आपला पोशाख शक्य तितका बदलून सेवक किंवा सद्गृहस्थ म्हणून वावरावे. तो पुढे म्हणाला, " असे वेषांतर करून आपण दोघे डॉन क्विक्झोटकडे जाऊ. मी एक दुःखी–कष्टी तरुणी आहे, असे सोंग करून त्याच्यापाशी एक वर मागेन. तो शूर शिलेदार असल्यामुळे तो वर देण्यास चुकणार नाही. एका लबाड आणि असभ्य शिलेदाराने माझी फार मोठी हानी केली आहे, आणि ती भरून काढण्यासाठी तुम्ही माझ्याबरोबर चला, अशी मी त्याची विनवणी करीन आणि त्याला असेही सांगेन, ' त्या दुष्ट शिलेदाराचा तुम्ही सूड घेईपर्यंत माझा चेहरा पाहण्याची इच्छा धरू नका किंवा माझ्या परिस्थितीबद्दल काही विचारू नका. " या आमिषाने तो माझ्या जाळ्यात गुंतेल आणि आपल्या युक्तीमुळे आपण त्याला त्याच्या स्वतःच्या घरी भुलवून नेऊ शकू. तेथे त्याचे प्रेमाचे वेड बरे करण्याचे प्रयत्न आपण करू. "

□ □

## प्रकरण १३

# पाद्री व न्हावी यांनी आपली योजना अमलात कशी आणली याचा वृत्तांत, तसेच या महत्त्वाच्या इतिहास-ग्रंथात नोंदविण्याजोग्या इतर काही गोष्टी.

पाद्र्याची योजना न्हाव्याला इतकी पसंत पडली की, त्या दोघांनी ती तत्काळ अमलात आणली. प्रथम त्यांनी घरधनिणीकडून स्त्रीचा संपूर्ण वेष उसना आणला. त्यासाठी गहाण म्हणून त्यांनी पाद्र्याचा नवा काळा झगा तिच्याजवळ ठेवला. न्हाव्याने बैलाच्या पांढऱ्या केसाच्या शेपटीची लांबलचक दाढी स्वतःसाठी बनविली. त्या शेपटीच्या केसात खाणावळवाला आपला कंगवा ठेवीत असे. हा सारा खटाटोप कशासाठी आहे, हे जाणण्याची इच्छा घरधनिणीला झाली. तेव्हा डॉन क्विक्झोट यांच्या वेडेपणाचे आणि आपल्या योजनेचे स्वरूप पाद्र्याने तिला समजावून सांगितले. ते ऐकताच खाणावळवाला व त्याची बायको यांनी तत्काळ तर्क केला की, ते अमोल मलम तयार करणारा प्रेमवीर शिलेदार हाच असावा. म्हणून त्यांनी त्या दोघांना, डॉन क्विक्झोट यांच्या तेथील निवासाची आणि सँकोच्या घोंगडीतील उचलबांगडीची सारी हकीगत सांगितली. ती सांगून झाल्यावर घरधनिणीने पाद्र्याला स्त्रीचा वेष इतक्या चातुर्याने चढविला की, त्या वेषात त्याला पाहून कोणालाही आनंद वाटला असता. काळा, मखमली, भोके पाडलेला व नागमोडी वीतभर रुंद किनार असलेला सुती झगा तिने त्याच्या अंगावर चढविला. त्याचप्रमाणे हिरवे मखमली, पुढे पांढरी साटीन लावलेले बाह्यांचे पोलके त्याच्या अंगात घातले. हा सारा जामानिमा बहुधा बँबा राजाच्या अतिप्राचीन काळी रूढ असावा स्त्रियांच्या शिरोभूषणाचा भार पाद्री सहन करू शकत नव्हता, म्हणून त्याने रात्रीच्या वेळी आपल्या वापरात असलेली रूमरू पांढरी टोपी आपल्या डोक्यावर ठेवली आणि आपले कपाळ काळ्या पट्टीने बांधून टाकले व दुसऱ्या पट्टीने एक प्रकारचा गळपट्टा नि बुरखा बनवला. त्याचे अर्धेमुर्धे डोके त्याच्या टोपीखाली झाकले गेले; ती खाली ओढून त्याचे कानावरून घेतली. त्या टोपीची रुंद कडा त्याच्या डोळ्यावर लोंबत असल्यामुळे त्याची टोपी छत्रीसारखी दिसू लागली. हे सारे झाल्यावर त्याने आपला झगा आपल्या अंगाभोवती गुंडाळून घेतला आणि स्त्रियांप्रमाणे खेचरावर आडवा बसला. नंतर न्हाव्याने बैलाच्या शेपटीची अर्धवट तांबडी आणि अर्धवट पिकलेली दाढी आपल्या हनवटीला बसवली, ती त्याच्या कमरेपर्यंत रुळत होती. तोही आपल्या खेचरावर स्वार झाला. नंतर त्या

दोघांनी यजमान व यजमानीण या दोघांचा निरोप घेतला आणि तसाच निरोप घेतला सुस्थितीतील मॅरिटोर्नेसचाही. तिने व्रत घेतले की, आपण पापी असलो तरी पाद्री व न्हावी यांच्या खडतर व खऱ्याखुऱ्या ख्रिस्ती कार्याला सुयश लाभावे म्हणून जप करू.

त्या खानावळीतून ते दोघेजण बाहेर पडले असतील नसतील तोंच, आपण स्त्री-वेष धारण केला याची टोचणी पाद्र्याच्या मनाला लागली. धर्मगुरूने असे सोंग घेण्यात असभ्यता असल्याचे भय त्याला वाटले. आपला हेतू चांगला आहे, तेव्हा शिष्टपणाच्या सक्त बंधनातून आपण मुक्त आहो असा विचार त्याच्या मनात आला, तरीसुद्धा त्याचे ते भय कायम राहिले. म्हणून त्याने न्हाव्याला सांगितले, आपण आपल्या पोषाखांची अदलाबदल करू या. त्यामुळे न्हाव्याचा सेवकाचा दर्जा व स्वरूप यांना फारसा धक्का लागणार नाही, कारण तो एक नोकर होता, अशी समजूत पाद्र्याने न्हाव्याची घातली आणि म्हटले, " डॉन क्विक्झोट याच्यापेक्षा आपल्या प्रतिष्ठेला आपण अधिक जपले पाहिजे. पण या अदलाबदलीला तू संमती दिली नाहीस तर एक पाऊलही पुढे न टाकण्याचा माझा पक्का निर्धार आहे. डॉन क्विक्झोट यांचा जीव नरकात न जावा म्हणूनही, या स्त्री–वेषात मी पुढे एक पाऊल टाकणार नाही. " त्यांच्या त्या ऐन वादावादीच्या वेळी सँको तेथे येऊन टपकला. त्या दोघांची ती विचित्र सोंगे पाहून बरगड्या दुखेपर्यंत तो हसू लागला. शेवटी न्हाव्याने स्वतः स्त्री होण्याचे आणि पाद्र्याने शागीर्द होण्याचे कबूल केले. ते अशा प्रकारे लिंगांतर करीत असताना, डॉन क्विक्झोट यांना त्यांच्या तपश्चर्येतून लाडीगोडीने बाहेर काढण्यासाठी स्त्रीवेषात न्हाव्याने कसे वागावे हे त्याला पाद्री शिकवू लागला. पण न्हाव्याने त्याला सांगितले, " पाद्रीबुवा, त्याबाबतीत आपण काही तसदी घेऊ नका. बायकांच्या बोलण्या–चालण्याची मला पुरी माहिती आहे. म्हणून कोणाकडून काही सूचना न घेता, मी सुंदर स्त्रीप्रमाणे वागू शकेन. पण माझा रुबाब वाढविण्यासाठी केसात आकडे बसविण्यात मी आता वेळ घालविणार नाही. आपण डॉन क्विक्झोट यांच्या झोपडीपाशी गेल्यावर त्यासाठी आपल्याला भरपूर वेळ मिळेल. ". तेव्हा न्हाव्याने आपले कपडे गुंडाळले, पाद्र्याने आपली दाढी गुंडाळली आणि ते दोघे वेगाने निघाले. जाता–जाता त्यांचा वाटाड्या बनलेल्या सँकोने त्यांना डोंगरात भेटलेल्या वेड्या माणसाची हकीगत सांगितली. मात्र चामड्याची पिशवी किंवा सोने याबद्दल त्याने चकारशब्द काढला नाही. कारण तो कितीही मूर्ख असला तरी त्याला पैशाचे प्रेम होते; आणि पैसा मिळाला तर तो जतन कसा करावा, हे त्याला कळत होते. या बाबतीतील मौन ठेवण्याइतका तो शहाणा होता.

डॉन क्विक्झोट यांच्याकडे जाणारा रस्ता कळावा, म्हणून सँकोने ज्या जागी झाडांच्या फांद्या पसरलेल्या होत्या, तेथे ते दुसरे दिवशी जाऊन पोचले. आपापल्या सोंगाचे कपडे अंगावर धारण करण्यास सँकोने त्यांना सांगितले. सम्राट होण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी जो खडतर जीवन–मार्ग पत्करला होता, त्यातून त्यांना बाहेर काढणे हाच

आपल्या योजनेचा हेतू असल्याचे त्यांनी त्याला सांगितले होते. आपण कोण आहो याकडे सँकोने अजिबात लक्ष देऊ नये असे त्यांनी त्याला शपथ घालून बजावले, आणि म्हटले, "डल्सीनियाच्या पत्रासंबंधी डॉन क्विक्झोट यांनी काही विचारले तर तू आपल्या धन्याला सांग, मी ते पत्र तिला दिले पण तिला लिहिता-वाचता येत नसल्यामुळे तिने आपले उत्तर तोंडीच सांगितले आहे. ते उत्तर असे की, 'मी रागावू नये असे वाटत असेल तर तुम्ही आपली कडक तपश्चर्या तत्काळ थांबवा आणि माझ्या सान्निध्यात या.'" त्याबरोबरच आपण स्वतः काय बोलणार आहो, हेही त्यांनी सँकोला सांगितले आणि म्हटले, "असे केल्यानेच तुझा धनी या अरण्यातून बाहेर पडेल आणि स्वतः सम्राट होण्याचा उपाय योजील. धर्मगुरू होण्याचा विचार त्याच्या डोक्यात तिळभरही येणार नाही, याची काळजी आम्ही घेऊ, हे तू पक्के समज."

त्यांच्या या साऱ्या सूचना सँकोने कान देऊन ऐकल्या आणि आपल्या मनात काळजीपूर्वक साठविल्या. आपल्या धन्याने धर्मगुरू न होता बादशहा होण्याचा सल्ला देण्याचा विचार केल्याबद्दल पाद्री व न्हावी यांना सँकोने शतशः धन्यवाद दिले. तो म्हणाला, "माझा आपला असा साधा सरळ विचार आहे की, धर्मगुरू होण्यापेक्षा बादशहा होणे दसपट चांगले. कारण तो आपल्या सेवकाला पुष्कळच मोठे बक्षिस देऊ शकतो. तुम्हा दोघांच्या आधी मी माझ्या धन्याकडे जाणे आणि त्याच्या हृदयस्वामिनीच्या कृपाळू उत्तराचा वृत्तांत त्याला निवेदन करणे योग्य ठरेल. कारण, कोणी सांगावे, केवळ ते उत्तर ऐकूनच तो त्या जागेतून बाहेर येईल आणि मग तुम्हाला त्यासाठी काही यातायात करावी लागणार नाही."

सँकोची ही सूचना त्या दोघांना फार आवडली. त्याने पुढे जावे आणि आपल्या यशाची बातमी देण्यासाठी तो परत येईपर्यंत त्या दोघांनी तेथेच थांबावे, हे सर्वांना मान्य झाले. तेव्हा सँको दौडत गेला आणि आपल्या धन्याला शोधण्यासाठी त्या खडकाच्या खिंडीमध्ये शिरला. पाद्री व न्हावी एका झऱ्याच्या काठावर बसले. त्या काठावर वाढलेल्या झाडांमुळे आणि सभोवतालच्या टेकड्यांमुळे ते स्थान प्रशांत व प्रसन्न वाटत होते. प्रखर सूर्यकिरणांपासून निवारा घेण्यासाठी ते तेथे बसले. त्या प्रदेशात त्यावेळी नेहमी सूर्यप्रकाश असह्य होण्याइतका तीव्र असतो. ऑगस्ट महिन्याचा तो मध्यकाल होता आणि त्यावेळी दुपारचे अदमासे तीन वाजले होते. सँको परत येईपर्यंत तेथेच थांबण्याचे त्यांनी ठरविले. त्या रम्य स्थळी बसल्यावर ते अगदी ताजेतवाने झाले. इतक्यात त्यांना एक स्वर-लहरी ऐकू आली. तिला कोणत्याही संगीत-वाद्याची जोड नव्हती, तरी तिने आपल्या माधुर्याने त्यांचे कान वेधून घेतले. अशा जंगली ठिकाणी कोण कशाला येतो ? तरीही तेथे इतके कलात्मक व कोमल संगीत कानी पडले म्हणून त्यांना विशेष विस्मय व कौतुक वाटले. अशा ठिकाणी खेडवळ लोकसुद्धा क्वचितच यावयाचे, मग कुशल गायक कोठले ? ज्या व्यक्तीचे स्वर त्यांच्या कानी पडले, ती कुशल गायक असली पाहिजे हे निःसंशय ! रानावनामध्ये प्रियकर तरुण-तरुणींची गर्दी असते आणि ते कल्पनातीत कोमल व मधुर

अशी गीते गात असतात, असे वर्णन कवीलोक खुशाल करोत. पण सर्वांना हे पक्के माहीत आहे की, कवीचा भर सत्यापेक्षा कल्पितावर असतो. आणि अजिबात अस्तित्वात नसलेल्या व केवळ आपल्या कल्पनेत असलेल्या गोष्टींची वर्णने खुलवून सांगण्याचे त्यांना वेड असते. त्या गीताचे शब्द जेव्हा त्यांच्या ध्यानी येऊ लागले, तेव्हा गाणारी व्यक्ती शेतकरी असेल, असे त्यांना वाटेना. त्या गीताची रचना दरबारी थाटाची होती– खेडवळ थाटाची नव्हती. ती गीते पुढीलप्रमाणे होती––

**एक गाणे**

१

मला क्षीण करून विवळण्यास लावणारा कोण ?
अहा, तो अवमान !
त्याहूनही माझे अधिक हाल हाल करणार कोण ?
तो मत्सर,
मी धीर कसा सोडला ?
वियोगाने खंडित होऊन.
मग आशांनो, निरोप द्या, सांत्वन नाही;
जुलमी दुःखभाराखाली मी खचतो
आणि मंदभाग्य हताश झाल्याशिवाय,
तिरस्कार, असूया नी विरह सहन करू शकत नाही.

२

ही वेदना माझ्या हृदयात कुणी खुपसली ?
आगंतुक प्रेमाने.
इतके घोर अनर्थ कोण निर्माण करू शकला ?
अंधदैवाचा द्वेष.
माझी दैवगती कोणत्या क्रूर शक्तींना रुचते
वरच्या ( स्वर्गातल्या ) शक्तींना.
मग मला सहन करू दे आणि विवळणे थांबवू दे;
असा घात होणे हे तेजस्वी आहे;
याचे आक्रमण येते तेव्हा विरोध करण्याची छाती कोणाला ?
स्वर्ग, प्रेम आणि दैव हे माझे वैरी आहेत.

३

त्वरित उपाय मला कोठे सापडेल ?
मृत्यु निश्चित आहे.

त्याहून माझ्या मुक्ततेला अधिक सौम्य मार्ग नाहीत ?
निष्ठाहीनता.

दुसऱ्या कशानेच माझ्या यातना शमणार नाहीत काय ?
वेड लावणारा संताप.

काय, मरायचे की वदलायचे ? लुसिंदा हरून बसायचे;
अहा, त्यापेक्षा मला वेडेपणा पत्करू दे.
पण हे देवहो, निर्णय द्या, आम्ही काय सोसतो,
जेव्हा मरण किंवा वेड हीच ( व्याधीवर ) औषधे असतात !

तो काळ, तो क्षण, ते निर्जन वन, आणि अज्ञात गायकाने सुखद शैलीने व स्वराने गाइलेले ते गीत— या सर्वांमुळे श्रोत्यांची मने विस्मयानंदाने भरून गेली आणि ते सर्वजण ते संगीत एकतानतेने ऐकू लागले. संगीत संपले तरी त्यांची एकतानता काही काळ कायमच राहिली. आणखी काही स्वर-विलास कानी पडावा म्हणून ते कान टवकारून बसले. त्यांच्या त्या मूक प्रशंसेवरून त्यांचा पूर्ण संतोष प्रगट होत होता. शेवटी हा माणूस आणखी काही गाणार नाही असे पाहून, त्यांनी त्या वेड लावणाऱ्या गायकाचा शोध लावण्याचा निश्चय केला. तसे ते करणार इतक्यात त्यांच्या कानी अपेक्षित स्वरविलासाचा ध्वनी आला. त्यामुळे ते होते तेथेच ठाम बसून राहिले. त्या स्वरातून पुढील सुनीत त्यांना ऐकू येऊ लागले—

## एक चतुर्दशक

हे पवित्र मैत्री, स्वर्गास सुखदायिनी,
जी तूं मानवाच्या अक्षम मनाला कंटाळून,
आपल्या जन्मद आकाशात उडून गेलीस,
आणि तुझी पुरती छायादेखील मागे उरली नाही.
खाली ( धरणीवर ) कल्याण वितरणाऱ्या तुझ्यापासून,
शान्ति आणि तिच्या परिवारातले हर्ष यांचा माग आम्हीं लावतो,
पण फसव्या दिखाऊपणाने असत्य,
फार वेळां तुझी पवित्र मुद्रा बळकावते
हे धन्यमति, मग पुन्हा स्थानापन्न हो !
दंभ आणि वंचना यांचा नाश कर,
जे तुझ्या वेषात नृत्योत्सव संभ्रान्त करतात !
सुसंवादी शान्ति आणि सत्य पुन्हा आण,
खोटी मैत्री खऱ्या मैत्रीपासून वेगळी करून दाखव,
अन्यथा निसर्गाचें व्यस्ततेपुढें पतन निश्चित होणार.

हे चतुर्दशक संपल्यावर एक दीर्घ सुस्कारा आणि सखेद हुंदका पाद्री व न्हावी यांच्या कानी पडला. तेव्हा त्या दोघांनी जिज्ञासेमुळे व दयाबुद्धीमुळे, हा शोकाकुल गायक कोण आहे याचा तत्काळ तपास लावण्याचा निश्चय केला. ते फार दूर गेले नाहीत तोच खडकाजवळ त्यांना एक माणूस आढळला. त्याची आकृती आणि स्वरूप ही दोन्हीही, सँकोने कार्डेनियोच्या केलेल्या वर्णनाशी, तंतोतंत जुळत होती. त्याने या दोघांना पाहताच आपले गाणे थांबविले. पण त्याच्या मुद्रेवर भीतीची कोणतीच लक्षणे दिसत नव्हती. फक्त त्याने आपली मान शोकग्रस्त माणसाप्रमाणे खाली लवविली होती. ते दोघे काय करीत आहेत हे पाहण्यासाठीसुद्धा त्याने आपली दृष्टी वर उचलली नाही. पाद्री सज्जन होता आणि भाषणचतुर होता. त्याने तत्काळ ताडले की, सँकोने आपल्याला ज्याची हकीगत सांगितली तोच हा असला पाहिजे. तेव्हा पाद्री त्याच्याकडे गेला आणि मोठ्या नम्रतेने आणि धोरणीपणे त्याला म्हणाला, "हे अरण्य आणि हे एकाकी खडतर जीवन तुम्ही सोडून द्यावे, अशी माझी कळकळीची विनंती आहे. आपण येथे राहिल्यास पुढे याहून अधिक चांगले जीवन प्राप्त होणे कठीण जाईल. आपण स्वेच्छेने हे दैन्य आज स्वीकारले आहे, पण त्यामुळेच मोठ्या व शाश्वत दुःखाच्या खाईत आपण जाऊन पडाल." कार्डेनियोला वारंवार विमनस्क करणारा क्षोभ आता नाहीसा झाला होता. त्याच्याकडे त्या जंगलात जे खेडवळ लोक वारंवार येत असत, त्यांच्यापेक्षा अगदी निराळ्या वेशातील हे दोघेजण पाहून, आणि परकेपणाची काहीही भावना न ठेवता बोलत असलेले ऐकून, त्याला प्रथम थोडेसे आश्चर्य वाटले. त्यांच्याकडे काही काळ लक्षपूर्वक पाहिल्यानंतर तो त्यांना म्हणाला, "सद्गृहस्थहो, आपण कोणीही असा. पण मला असे वाटते की, माझ्या दुर्दशेची करुणा येऊन प्रभूनेच तुम्हाला या निर्जन प्रदेशात आणले असावे. या माझ्या भीषण निवृत्तीतून मला काढून मानवी समाजात मला पुनः प्रविष्ट करावे, असा प्रभूचा हेतू असावा. पण मित्रांनो, माझे नशीब किती वक्र आहे, आणि एका दुःखातून मुक्त होताच मी दुसऱ्या मोठ्या दुःखात कसा पडतो, हे आपल्याला माहीत नसेल. म्हणून आपल्याला कदाचित असे वाटत असेल की, माझ्या अंगी स्वभावतःच अकलेची पुंजी फार थोडी असावी – किंबहुना बुद्धीचा लवलेशही ज्यांच्या ठायी नाही अशा अभागी माणसांपैकी मी एक असावा. माझ्याविषयी अशी कल्पना कोणी केली तर मी त्याला दोष देऊ शकत नाही. कारण मला स्वतःलाच असे पुरेपूर पटले आहे की, माझ्यावरील संकटांच्या केवळ स्मरणाने माझे चित्त अत्यंत अस्वस्थ होते, आणि त्यामुळे बुद्धी आणि ज्ञान हे सर्व मी गमावून बसतो, एवढेच नव्हे, तर काही काल मी माणूसच राहात नाही, आणि आत्यंतिक उन्माद आणि मूर्खपणा यामुळे घडणारी अचाट कृत्ये मी करू लागतो. अशा भयंकर क्षोभाच्या उद्रेकात मी जी जी कृत्ये केली म्हणून लोक मला सांगतात आणि त्यांचे पुरावेही देतात, त्यांची जाणीव झाली म्हणजे माझी मनोवृत्ती अधिकच अस्वस्थ होते. त्या आततायी संतापाचे कारण माझ्या दुर्दैवाशिवाय दुसरे काही आहे असे मी मानीत नाही. म्हणून माझ्या

खडतर नशिबाची कहाणी ऐकण्याचा धीर ज्यांना असेल, त्यांना ती मी सांगतो. विचारी माणसांना कारण कळले म्हणजे त्याच्या परिणामाचे आश्चर्य वाटत नाही. ते माझे दुःख निवारू शकत नाहीत, पण निदान ते माझा धिक्कार तरी करणार नाहीत. माझ्या उत्पातांचे नुसते निवेदन मी केले तरी, माझ्या क्षोभामुळे घडलेल्या कृत्याबद्दल त्यांना येणारा राग नाहीसा होतो आणि माझ्या दुर्दैवाबद्दल त्यांना करुणा वाटू लागते. म्हणून सज्जनहो, आपण त्या हेतूने येथे आला असाल तर मला उपदेश करण्याची किंवा माझी कान-उघाडणी करण्याची तसदी घेण्यापूर्वी कृपा करून माझ्यावरील संकटांचे निवेदन आपण लक्षपूर्वक ऐकावे अशी माझी विनंती आहे. कारण आपण माझे निवेदन ऐकल्यानंतर आपल्याला कदाचित् असे वाटेल की, ही संकटे निवारण्यापलीकडची आहेत, तेव्हा या बाबतीत काही तसदी घेऊ नये." त्याची ही सूचना ऐकून ते दोघे अत्यंत संतुष्ट झाले. त्याच्या तोंडून त्याची हकिगत ऐकण्याची इच्छा त्या दोघांना होती. म्हणून पाद्री व न्हावी त्याला म्हणाले, "आपली दुःखे दूर करण्याचा आव आणून ती वाढविण्याचा आमचा इरादा नाही ही खात्री बाळगा. आम्ही आपल्या प्रवृत्तींना विरोधही करू इच्छित नाही. आपण आपली हकीकत सांगण्यास सुरवात करावी, अशी आमची विनंती आहे."

नंतर अभागी कार्डेनियोने आपली कहाणी सुरू केली. डॉन क्विक्झोट आणि धनगर यांना त्याने त्या कहाणीचा पूर्वार्ध ज्या शब्दांनी सांगितला होता, त्याच शब्दांनी त्याने आता तो त्या दोघांना निवेदन केला. शिलेदारीची शान संभाळण्याची भ्रामक कल्पना मनात बाळगून डॉन क्विक्झोट यांनी एलिझाबॅट याचेविषयी वादविवाद केला आणि कार्डेनियोच्या निवेदनात खंड पाडला, हे सारे आम्ही पूर्वीच सांगितले आहे. त्यानंतर लुसिंडाने आपल्याला पाठविलेल्या पत्रासंबंधीचा भाग कथन करण्यास कार्डेनियोने प्रारंभ केला. डॉन फर्डिनांड याला आपल्याजवळ पडलेले 'गॉलचा अमॅडिस' हे पुस्तक उघडताना ते पत्र दुर्दैवाने सापडले होते. ते पत्र त्या पुस्तकाच्या पानामध्ये घालून लुसिंडाने ते पुस्तक कार्डेनियोकडे परत पाठविले होते. ते पत्र पुढीलप्रमाणे होते :—

## लुसिंडाचे कार्डेनियोस पत्र

"दिवसानुदिवस मला तुमच्या अंगी इतके गुण दिसू लागले आहेत की, तुमच्याविषयी अधिकाधिक आदर बाळगणे मला भाग पडत आहे—किंबहुना तशी सक्ती होत आहे. ही माझी कबुली आपल्या उपयोगी पडण्यासारखी आहे, असे तुम्हाला वाटत असेल तर, आपल्या नि माझ्या प्रतिष्ठेला धरून तिचा जो उपयोग करता येण्यासारखा असेल तो करावा. मला वडील आहेत आणि ते तुम्हाला ओळखतात. ते इतके प्रेमळ आहेत की, माझ्या योजना न्यायाच्या नि सन्मानाच्या आहेत अशी त्यांची खात्री पटली तर ते त्यांना कधीही विरोध करणार नाहीत. माझ्यावर तुमचे प्रेम आहे असे तुम्ही

भासविता आणि त्यावर माझा विश्वास पण आहे. आता ते प्रेम व्यक्त करणे हे तुमचे कर्तव्य होय."

कार्डेनियो पुढे म्हणाला, "या पत्रामुळे मी पुनः निश्चय केला की, लुसिंडासाठी तिच्या बापाकडे आपण मागणी करावयाची. या पत्रामुळे तिच्याविषयीचा डॉन फर्डिनांड यांचा आदरभाव वाढला, तिचा समंजसपणा व शहाणपणा त्याच्या लक्षात आला आणि त्यामुळे त्याचा अंतरात्मा इतका पेटून उठला की, माझ्या सर्व आशांचा चक्काचूर करण्याचा निर्धार त्याने त्याच क्षणी आपल्या मनाशी केला. माझ्या आशा सफल होऊन मला सौख्य मिळण्यापूर्वीच तो माझी आशा भंग करणार होता. लुसिंडाच्या बापाने मला कोणता सल्ला दिला, हे मी त्या बेइमान मित्राला सांगून टाकले. माझी बायको म्हणून लुसिंडाची मागणी मी तिच्या बापाकडे उतावीळपणाने केल्याचे मी जसे त्याला सांगितले, तसेच हेही सांगितले की, हा सारा वृत्तांत मी माझ्या बापाला सांगण्यास धजावत नाही. मी इतक्यात लग्न करावे याला त्याची तत्काळ संमती मिळणार नाही असेही मी त्याला सांगितले. लुसिंडाची पात्रता, चारुता आणि गुणवत्ता यामुळे ती स्पेनमधील कोणत्याही थोर घराण्यास भूषणभूत होईल, हे माझ्या वडिलांना माहीत नव्हते असे नाही. पण माझ्यासाठी ड्यूकसाहेब काय करीत आहेत हे कळेपर्यंत माझे वडील मला लग्न करू देणार नाहीत असे भय मला वाटत होते. पण तो फर्डिनांड! कृतघ्न माणूस! लबाड मित्र! महत्त्वाकांक्षी मेरियस! क्रूर कॅटलिन! दुष्ट सिल्ला! विश्वासघातकी गॅलेलॉन! बेइमान व्हेलिडो! मत्सरी ज्युलियन! मित्रद्रोही आणि अतिलोभी ज्युडास! ही सर्व घातुक आणि तिरस्कृत माणसे एकट्या तुझ्यामध्ये, फर्डिनांड, एकवटली आहेत! अरे लुच्चा, तुझ्यावर माया असलेल्या या विश्वासू पण अभागी मित्राने तुझे काय घोडे मारले होते? त्याने आपल्या अंतःकरणातील सारी रहस्ये, सारी सुखदुःखे, साऱ्या चिंता-व्यथा तुझ्याजवळ उघड्या केल्या होत्या ना? अरे, तुझा मान वाढावा आणि तुला लाभ व्हावा यासाठीच मी तुला नेहमी सल्ला देत आलो ना? तुझे नुकसान करील असा एक शब्द तरी मी उच्चारला काय? पण मीच अभागी! मूर्खासारखा बडबडत राहिलो आहे! त्यापेक्षा मी माझ्या अमंगळ ग्रहांनाच दोष देणे चांगले. त्यांच्या अनिष्ट प्रभावा-मुळे माझ्यावर संकटांच्या राशी ओतल्या जात आहेत. त्यांचा प्रतिकार कोणतीही भौतिक शक्ती करू शकत नाही की कोणतीही मानवी कला त्यांना विरोध करू शकत नाही. खरोखर डॉन फर्डिनांड याची पात्रता व गुणवत्ता इतकी मोठी होती की, त्यामुळे अत्यंत उच्च कुळातील सुंदर स्त्रिया कायदेशीरपणे त्याच्या ताब्यात आल्या असत्या. अहो, मैत्री आणि सेवा यांच्या हजारोहजार प्रेमळ गोष्टी करून मी त्याचे चित्त माझ्याकडे ओढून घेतले होते. पण त्याने आपला स्वाभिमान नि सत्यनिष्ठा पूर्णपणे गमावली आणि माझ्या आयुष्यातील सुखसर्वस्व नष्ट करण्याची घातुक योजना आखली. पण मला माझी कहाणी पुरी करण्यासाठी हा टीकेचा भाग सोडला पाहिजे.

"त्या मित्रद्रोही फर्डिनांडला वाटले, मी जोपर्यंत लुसिंडाच्या सन्निध आहे, तोपर्यंत

आपली योजना व्यवहारात उतरू शकणार नाही. म्हणून त्याने माझ्या वडिलांशी ज्या दिवशी बोलणे करण्याचे वचन दिले होते, त्याच दिवशी सहा नामी घोडे खरेदी केले, आणि त्यांची किंमत देण्यासाठी पैसे आणण्याकरता मी त्याच्या भावाकडे घोड्यावरून जावे अशी इच्छा प्रगट केली. हाय! त्याच्या विश्वासघाताचा मला एवढाही संशय आला नाही, म्हणून त्याची ही अल्पशी सेवा करण्याचा मला आनंद वाटला. त्याच दिवशी संध्याकाळी मी लुसिंडाचा निरोप घेण्यास गेलो, तेव्हा तिला मी सांगितले, "आपल्या लग्नाच्या बाबतीत माझ्या वडिलांशी बोलण्याचे वचन डॉन फर्डिनांड याने दिले आहे." आतुर प्रेमिकाच्या त्वरेने परत येण्यास तिने मला सांगितले. माझ्या वडिलांनी तिच्या वडिलांपाशी बोलणे करताच आपल्या न्याय्य इच्छा यशस्वी होतील याविषयी तिला काडीमात्र शंका नव्हती. असे बोलल्यानंतर तिच्या डोळ्यांतून आसवे गळू लागल्याचे मी पाहिले. तिला एकाएकी दुःखाचा हुंदका आला आणि त्यामुळे तिचे बोलणे थांबले. मला आणखी काही सांगण्याचा प्रयत्न ती करीत आहे, असे दिसले. पण तिच्या तोंडावाटे शब्द उमटेना. दुःखाच्या या विलक्षण दृश्याने मी चकित झालो आणि माझे हृदय हादरून गेले. पण मी माझी आशा गारद करण्यास तयार नव्हतो. म्हणून हे सारे दृश्य तिच्या कोमल भावनेतून आणि माझ्या विरहाच्या भयातून प्रगट झालेले आहे असे मी समजलो. थोडक्यात सांगायचे तर, तेथून मी एकदम झटकलो. तेव्हा मी दुःखात खोल बुडालो होतो आणि माझ्या मनात नाना कल्पनांनी आणि भयांनी गर्दी केली होती. त्यांचे कारण काही मी सांगू शकत नाही. डॉन फर्डिनांडचे पत्र मी त्याच्या भावाला दिले. त्याने माझे स्वागत कल्पनातीत प्रेमाने केले. पण माझ्या अपेक्षेप्रमाणे तो मला तेथून जाऊ देईना. त्याने मला तेथे तब्बल एक आठवडा राहण्यास सांगितले, याचे मला दुःख वाटले. तो मला म्हणाला, "ड्यूकसाहेबांच्या दृष्टीस तू पडणार नाहीस अशी काळजी घे. माझ्या भावाने पैशाची जी मागणी केली आहे, ती आमच्या वडिलांना कळता कामा नये." पण ही त्या लबाड फर्डिनांडची केवळ एक युक्ती होती. त्याच्या भावाला पैशाची वाण नव्हती. ते देऊन त्याने मला तत्काळ रवाना केले असते. पण मी लवकर परत जाऊ नये अशी त्याची गुप्त इच्छा होती.

"त्याची ही आज्ञा मला अत्यंत अप्रिय वाटली. पैसे न घेताच परत येण्यास मी तयार झालो. लुसिंडाला मी कोणत्या परिस्थितीत सोडले, हे लक्षात घेता, तिच्यापासून इतका काळ दूर राहणे मला शक्य नव्हते. परंतु माझ्या उतावळेपणावर माझ्या मित्र-प्रेमाने मात केली! तेथे राहण्याचे बंधन शेवटी मी माझ्यावर लादून घेतले. पण चार दिवस कंटाळवाण्या अवस्थेत जाण्यापूर्वीच एका दूताने मला एक पत्र आणून दिले. ते लुसिंडाच्या हस्ताक्षरात आहे हे मी चटकन ओळखले. मी ते कापऱ्या हातांनी फोडले. तिने ते पत्र तेथे मला पाठविले याचे कारण काही सामान्य असणार नाही, असे अनुमान मी बांधले आणि माझे अंतःकरण व्यथित झाले, पत्र वाचण्यापूर्वी मी त्या दूताला विचारले, "हे तुला कोणी दिले?" त्याने उत्तर दिले, "दुपारच्या वेळी योगायोगाने

आपल्या शहरातील एका रस्त्याने मी जात असताना, अश्रुपात करीत असलेल्या एका अत्यंत सुंदर स्त्रीने मला आपल्या खिडकीकडे बोलावले. आणि घाई-घाईने म्हटले, " मित्रा, तू खिश्चन दिसतोस. तसा तू असलास तर कृपा करून हे पत्र घे आणि ज्याच्या नावाने ते लिहिले आहे त्याच्याच हाती ते जलदीने नेऊन दे. ते तुझे मोठे सत्कृत्य ठरेल असे मी ठामपणे सांगते. पत्र पोचविण्यास तुला साधनांची कमतरता भासणार नाही. या रुमालात काय गुंडाळून ठेवले आहे ते घे." असे म्हणून तिने माझ्याकडे हातरुमाल फेकला. त्यात शंभर रील नागी होती, आणि त्याबरोबरच तुम्ही पाहात असलेली सोन्याची अंगठीही होती, आणि आता मीं आपल्याकडे आणलेले पत्रही होते. तिच्या इच्छेप्रमाणे मी सारे काही करीन असे मी तिला खुणेने सांगताच, उत्तराची वाट न पाहता, ती त्या खिडकीच्या जाळीतून आत गेली. या बक्षिसामुळे आणि त्याहीपेक्षा त्या सुंदरीच्या डोळ्यातील अश्रूंमुळे आणि कळकळीच्या विनंतीमुळे, मी त्याच क्षणी आपल्याकडे त्वरेने येण्यास निघालो, आणि सोळा तासांत मी पन्नास मैल प्रवास करून येथे आलो. त्या दूताचे हे भाषण ऐकत असताना काही तरी भयानक वृत्त आपल्याला कळणार, याचे दुःख माझ्या मनात उत्पन्न झाले. त्यामुळे माझ्या शरीराला इतका कंप सुटला की, मी माझ्या मूर्च्छित होणाऱ्या देहाला सावरू शकलो नाही. तथापि अंगी धैर्य आणून शेवटी मी ते पत्र वाचले. त्याचा आशय पुढील-प्रमाणे होता—

" आपल्या पिताजींनी माझ्या पिताजींशी बोलणे करावे, अशी डॉन फर्डिनांड यांची इच्छा होती, असे आपण समजलो. कारण त्याने तसे वचन दिले होते. पण त्याने ते काम स्वतःसाठीच पार पाडले. तुमच्यासाठी त्याने मला मागणी घालावयाची होती, पण त्याने स्वतःसाठीच मागणी घातली. त्याच्याशी विवाह–संबंध घडून आल्यास जे लाभ होतील, त्यांची मोहिनी माझ्या वडिलांच्या मनावर पडली आणि म्हणून त्यांनी या लग्नाला संमती दिली. आजपासून दोन दिवसांनी हे लग्न व्हावयाचे आहे – आणि ते इतक्या गुप्तपणे की, फक्त ईश्वर आणि काही कुटुंबीय मंडळी एवढीच त्याला साक्षी असतील. प्रिय कार्डेनियो, यामुळे माझ्या अंतःकरणाला किती वेदना झाल्या असतील, याची कल्पना कर. तुझ्या हृदयवेदना मी जाणते. आणि म्हणून तू त्वरेने माझ्याकडे धावत ये. या एकंदर प्रकरणावरून, माझे तुझ्यावर किती प्रेम आहे, हे तुला कळून येईल. आता देवदयेने हे पत्र तुझ्या हाती पडो – आपले वचन पायाखाली तुडविणाऱ्या माणसाच्या हातात माझा हात गुंतला जाण्यापूर्वी हे पत्र तुझ्या हाती पडो म्हणजे झाले !"

कार्डेनियो पुढे म्हणाला, " ते पत्र वाचताक्षणीच मी तेथून तत्काळ निघालो. निरोप घेण्यासही थांबलो नाही. डॉन फर्डिनांडची दगाबाजी मला स्पष्टपणे कळून आली. माझ्या गैरहजेरीचा फायदा घेण्यासाठीच त्याने मला आपल्या भावाकडे पाठविले हे माझ्या लक्षात आले. सूड, प्रेम आणि अधीरता या विकारांमुळे मला जणू पंखच फुटले. त्यामुळे दुसऱ्याच दिवशी मी माझ्या घरी गुपचुप येऊन पोहोचलो. ती संध्याकाळची

वेळ होती – लुसिंडाशी संभाषण करण्यास योग्य वेळ होती. तिचें पत्र मला ज्या इमानी माणसानें आणून दिले, त्याच्या घरी माझे खेचर सोडून मी माझ्या हृदयस्वामिनीच्या भेटीस गेलो. सुदैवाने त्यावेळी ती त्या खिडकीत होती– आमच्या प्रणयाचा एकमेव साक्षीदार अशी ती खिडकी होती. तिने मला तत्काळ ओळखले– आणि मी तिला. पण माझ्या अपेक्षेप्रमाणे तिने माझे स्वागत केले नाही. आमच्या परिस्थितीत मला योग्य वाटणारा वेषही तिने धारण केलेला नव्हता. पण स्त्रीचे मन म्हणजे एक कोडे. ते पूर्ण-पणे जाणण्याचे ढोंग कोणता पुरुष करू शकेल ? आणि तिचा चंचल स्वभाव स्थिर करण्याची आशा कोण बाळगू शकेल ? लुसिंडा मला म्हणाली, "कार्डेनियो, माझा लग्नाचा पोषाख तयार आहे. बेइमान फर्डिनांड, माझा लोभी पिता आणि इतर माणसे विवाह–विधि पार पाडण्यासाठी दिवाणखान्यात माझी वाट पाहात थांबलेले आहेत. पण त्यांना लौकरच माझ्या लग्न–सोहळ्याऐवजी माझा मरण-सोहळा पाहावा लागेल. प्रिय कार्डेनियो, हे ऐकून तू खिन्न होऊ नकोस. माझ्या बलिदानाच्या प्रसंगी हजर राहण्याचा प्रयत्न कर. मी तुला वचन देते की, माझ्या शब्दांनी नि विनवण्यांनी हा लग्न–समारंभ थांबला नाही, तर मला न्याय देण्यासाठी ही कट्यार माझ्याजवळ आहे. निदान माझ्या मृत्यूने तुला माझ्या प्रेमाची आणि निष्ठेची बालंबाल खात्री पटेल."

"मी काय बोलत होतो, हे मला कळत नव्हते. केवळ अविचाराने मी तिला ओरडून म्हटले, 'प्रिये, तसेच कर, तुझ्या शब्दांचा पडताळा तुझ्या कृतीमधून येवो. आपणा उभयतांचे हित साधण्यासाठी कोणताही प्रयत्न करण्याचे आपण बाकी ठेवू नये. आपल्या हिताचे संरक्षण जर माझी समशेर करू शकली नाही, तर निराशेचे दुःख सोशीत बसण्यापेक्षा मी ती समशेर माझ्याच छातीत खुपशीन.' माझे हे भाषण लुसिंडाने ऐकले की नाही, हे मी सांगू शकत नाही. कारण, तिला घाई-घाईने बोलावण्यात आले होते. तिची वाट वर आतुरतेने पहात होता. ती माझ्यापासून दूर गेली तेव्हा माझ्या अंगातील सारे चैतन्य गळून पडले. माझ्या मनात उडालेला गोंधळ आणि शोक शब्दांनी वर्णन करता येणार नाही. सूर्य कायमचाच मावळला आहे असे मला वाटले. माझे डोळे आणि माझी इंद्रिये माझ्या मनःक्षोभाने आंधळी झाली होती. त्यामुळे घरात जाण्याचे दारही मला दिसेना. मी जेथे उभा राहिलो होतो, तेथेच मी खिळला गेलो. या आश्चर्यचकित मनःस्थितीतून मला माझ्या प्रेमाच्या विचाराने अखेर बाहेर काढले. कोणाला नकळत मी घरामध्ये शिरलो. प्रत्येकजण घाईत होता – दिवाणखान्यात जात होता. दोन पडद्यांमागे उभा राहून मी लपलो. त्यामुळे मी कोणाला दिसलो नाही, पण दुसऱ्यांना पाहण्याची मुभा मला मिळाली. तेथे वाट पाहात मी उभा असताना, माझ्या मनाला गोंधळात टाकणारे आणि हिंदकळावयास लावणारे नाना तऱ्हेचे विचार, शंका, भीती आणि यातना कोण वर्णन करू शकेल ? डॉन फर्डिनांड दिवाणखान्यात आला, तो नेहमीच्या पोशाखात – वराच्या थाटात नव्हे. त्याच्याबरोबर लुसिंडाचा एक चुलत भाऊ होता. बाकीचे लोक घरातीलच होते. थोड्या वेळाने खुद्द लुसिंडाच आली

तिच्याबरोबर तिची आई आणि दोन दासी होत्या. तिच्या योग्यतेनुरूप आणि समारंभाच्या गांभीर्यास साजेल असा उंची वेष तिने परिधान केलेला मी पाहिला. पण माझ्या मनःक्षोभामुळे मला तिच्या अंगावरील वेष-भूषेकडे बारकाईने लक्ष देता आले नाही. मी फक्त त्याचे रंग पाहिले, ते जांभळे व पांढरे होते. तिचा वेष भूषविण्यासाठी जागोजाग जी रत्ने लावलेली होती, त्यांचे तेज माझ्या डोळ्यात भरले. पण या सर्व आवरणांनी नि आभरणांनी तिच्या शरीराला जितके भूषविले नसेल, तितके तिच्या केवळ लावण्याच्या प्रभेने तिला शोभिवंत केले होते. हे स्मरण-देवते! माझ्या मनःस्वास्थ्याची तू कट्टी वैरीण आहेस. लुसिंडाच्या अप्रतिम लावण्याचे यथार्थ दर्शन तू आता माझ्या मनश्चक्षूंना का घडवीत आहेस ? तिने त्यानंतर काय केले हे तू मला का दाखवीत नाहीस ? तिने केलेल्या अन्यायामुळे माझे मन इतके प्रक्षुब्ध झाले की मी सूड घेण्याचा विचार करू लागलो – अन् ते शक्य नसले तर निदान प्राण देण्याचा विचार करू लागलो. सज्जनहो, हे मी जे विषयांतर केले, ते कंटाळवाणे आहे, त्याबद्दल मला क्षमा करा. अरेरे! थोडक्यात सांगावीत अशी माझी दुःखे नाहीत. प्रत्येक घटना विस्ताराने सांगण्यासारखी आहे, असे मला वाटते."

पाद्री कार्डेनियोला म्हणाला, "आपला प्रत्येक शब्द आम्ही आनंदाने पण दुःखाने लक्षपूर्वक ऐकत आहो याची खात्री बाळगा. आपल्या निवेदनाचा लहानसान भागही ऐकण्यास आम्ही उत्सुक आहो." ते ऐकून कार्डेनियोने आपली प्रेमकथा पुढे चालू केली. तो म्हणाला, "सारे लोक जमले, तेव्हा धर्मगुरु आले आणि त्या तरुण जोडप्याला हाताने धरून त्यांनी लुसिंडाला विचारले, "डॉन फर्डिनांड याचा विवाहबद्ध पति म्हणून स्वीकार करण्यास तू राजी आहेस काय ?" तिच्या उत्तरावर माझे जीवित आणि सौख्य अवलंबून होते. म्हणून ते ऐकण्यासाठी, धडधडत्या अंतःकरणाने, मी त्या दोन पडद्यांतून माझे डोके बाहेर काढले. धिक्कार असो माझ्या मठ्ठ हृदयाला! त्यावेळी मी प्रगट का झालो नाही ? मोठ्याने तिला हाक का मारली नाही आणि म्हटले नाही—'लुसिंडा, तू काय करीत आहेस याचा विचार कर. तू माझी आहेस आणि दुसऱ्या कोणाची होऊ शकणार नाहीस. तू 'होय' म्हणू नकोस. तो 'हो'कार घातुक ठरेल. त्यामुळे तुझा कार्डेनियो ठार होईल आणि तुझ्यावर, माझ्यावर नि परमेश्वरावरही अन्याय केल्यासारखे होईल. अरे, बेइमान फर्डिनांडा! माझे भांडार चोरून नेण्यासाठी तू सर्व मानवी आणि दैवी नियम धाब्यावर बसविले आहेस. माझे सुख–सर्वस्व तू हिरावून घेतोस आणि आपल्याला त्यासाठी काही शिक्षा होणार नाही अशी आशा धरतोस ? अरे, माझा स्वाभिमान आणि माझे प्रेम धोक्यात आल्यामुळे मला जो संताप आला आहे, तो कोणत्या तरी विचाराने दडपून टाकता येईल असे तुला वाटते काय ?' किती मी मूर्ख! आता किती विलंब झाला नि संकट किती दूर गेले ? मी काय करावयास हवे होते हे मी आता सांगत आहे—तेव्हा मी काय केले, हे नव्हे! आता कुरकुर करण्यात जो निर्धार मी दाखवीत आहे, तो सूड घेण्याच्या बाबतीत दाखविला असता,

तर त्या चोराला त्याच्या नीच कृत्याबद्दल मी तेव्हाच शासन केले असते. माझ्या जीवनाच्या सर्वस्वाची चोरी मी निमूटपणे गिळली आणि आता त्या चोराविरुद्ध हात चोळीत बसलो आहे. ज्या माझ्या दुबळ्या हृदयाने मला न्याय देण्याचे धैर्य दाखविले नाही त्यालाच मी दोष देतो. समाजाने आणि निसर्गाने बहिष्कृत केलेल्या आणि विवेकाने नि स्वाभिमानाने सोडलेल्या माझ्यासारख्या नादान माणसाला येथेच मरू द्या ! लुसिंडा काय उत्तर देते, हे पाहण्यासाठी धर्मगुरु बराच वेळ तिष्ठत उभे राहिले होते. त्यावेळी मी माझ्या मनात अशी अपेक्षा करीत होतो की, लुसिंडा आपली कट्यार उपसून काढील किंवा माझ्याशी तिचे असलेले प्रेमसंबंध प्रगट करण्यासाठी आपली जीभ सैल सोडील. पण छेः, माझी कायमची निराशा करणारा तो प्राणघातक ' हो 'कार शेवटी तिच्या मंद स्वरातून बाहेर पडलेला मला ऐकू आला. नंतर डॉन फर्डिनांडनेही तसाच होकार दिला आणि तिला अंगठी दिली. मग त्यांच्या लग्नाची पवित्र गाठ बांधली गेली ! ती सोडविणे फक्त मृत्यूलाच शक्य आहे. नंतर तो बेइमान वर आपल्या वधूला आलिंगन देण्यासाठी पुढे गेला. पण त्याच क्षणी आपल्या छातीवर हात ठेवून ती आपल्या मातेच्या बाहूत मूर्च्छित होऊन पडली. लुसिंडाच्या वचनभंगामुळे माझ्या मनाचा किती गोंधळ उडाला आणि माझ्या मनाला किती वेदना, किती यातना झाल्या ! माझ्या साऱ्या आशा उद्ध्वस्त झाल्या ! ज्या एकाच कारणासाठी मला जगावेसे वाटत होते, ते माझ्यापासून कायमचे हिरावले गेले. मी गोंधळलो—निराश झालो. माझ्या क्रूर दैवाच्या जाळ्यात परमेश्वराने मला फेकून दिले आहे, असे मला वाटू लागले. माझे दुःख इतके तीव्र झाले की, माझे सुस्कारे बाहेर पडेनात आणि माझ्या अश्रूंच्या लोटाला वाट मिळेना. त्या प्राणघातक व्यथेमुळे आणि मत्सर, संताप व सूड यांनी माझे मन पेटल्या-मुळे मी तेथे स्तब्धपणे उभा राहिलो !

" तिकडे सारे लोक लुसिंडाच्या मूर्च्छेमुळे संत्रस्त झाले होते. तिच्या आईने, तिला मोकळी हवा मिळावी म्हणून, तिच्या अंगावरील झगा पूर्वीच काढून टाकला होता. लुसिंडाच्या छातीवर एका पत्राची घडी दिसत होती. ते पत्र डॉन फर्डिनांडने ताबडतोब छिनावून घेतले आणि थोडेसे बाजूला जाऊन त्याने ते उघडून पाहिले व मेणबत्तीच्या प्रकाशात ते वाचले. ते वाचून होताच तो मटकन् एका खुर्चीवर बसला, आणि आपल्या एका गालावर हात ठेवून राहिला. शोक व निराशा यांची लक्षणे त्याच्या मुद्रेवर दिसत होती. आपल्या वधूला झालेल्या अपघाताची त्याची जाणीवच जणू हरपली होती. तो तिच्याकडे लक्षच देत नव्हता. साऱ्या कुटुंबात असा हलकल्लोळ झालेला पाहून, मी ते दुष्ट स्थान सोडण्याचा निश्चय केला. आपल्याला कोणी पाहील की नाही याची पर्वा मी केली नाही. जर कोणी मला पाहिलेच तर त्या दगाबाज फर्डिनांडला चांगली अद्दल घडविण्याचे मी ठरविले. त्यामुळे त्याच्या बेइमानीची आणि माझ्या योग्य नि तीव्र संतापाची जाणीव तरी साऱ्या जगाला होईल. पण हाय ! दैवाने मला अधिक दुःख भोगण्यास शिल्लक ठेवले (त्यावेळेपेक्षा अधिक दुःख असू शकेल तर मी ते भोगणार.) दैवाने माझ्या अंगी

जी थोडीबहुत अक्कल शिल्लक ठेवली होती, तीही नंतर पार नाहीशी झाली. मी माझ्या शत्रूचा सूड न घेता त्या घरातून बाहेर पडलो. वास्तविक त्या अकल्पित गोंधळामध्ये मी माझ्या शत्रूची आहुती माझ्या क्रोधाग्नीमध्ये सहज टाकू शकलो असतो. पण शत्रूच्या बेइमानीला जी शिक्षा द्यावयाची ती मी माझ्या इमानदारीला दिली.

"मी माझे खेचर जेथे सोडले होते, त्या दूताच्या घरी गेलो. आणि त्याचा निरोपही न घेता, त्यावर स्वार होऊन, लॉटप्रमाणे ते शहर सोडून बाहेर झटकलो, मी त्या शहराकडे नजर टाकण्यासाठी मागे वळून पाहिले नाही. मी शेतातून दौडत चाललो आणि अंधार नि शांतता यांनी मला वेढले. त्या बेइमान फर्डिनांडबद्दल मला जो तिटकारा वाटत होता आणि लुसिंडाच्या वचनभंगाबद्दल नि कृतघ्नतेबद्दल जो खेद वाटत होता त्या सर्व भावनांना मी मोठमोठ्याने वाचा फोडली. मी तिला 'क्रूर, कृतघ्न, लबाड' आणि त्याहीपेक्षा 'स्वार्थी, क्षुद्र' अशा नावांनी संबोधू लागलो. कारण, माझ्या वैऱ्याच्या संपत्तीमुळे ती मला दिलेली वचने विसरली. पण मी पुनः स्वतःशी म्हणालो, इतके चांगले शिक्षण घेतलेल्या तरुणीने आपल्या माता-पित्याच्या उपदेशापुढे शरणागती पत्करावी, ही काही विलक्षण गोष्ट नव्हे. त्यांनी तिला मोठ्या योग्यतेचा व ऐश्वर्याचा नवरा मिळवून दिला होता. ती पूर्वीच माझी झालेली होती हे तिला, सत्याला व न्यायाला स्मरून, सांगता आले असते. पण तिच्या प्रेमावर तिच्या महत्त्वाकांक्षेने मात केली असावी आणि कार्डेनियोला दिलेली वचने विसरावयास लावले असेल, असा निष्कर्ष मी शेवटी काढला. अशा विचारांच्या वादळात गुरफटून जाऊन मी सर्व रात्रभर माझ्या खेचरावरून वाटचाल करीत होतो. दुसरे दिवशी सूर्योदयाचे सुमारास, या डोंगराकडे येणाऱ्या एका वाटेला मी लागलो. या डोंगरात मी सतत तीन दिवस, कोणताही एक रस्ता कायम न ठेवता, भटकत राहिलो. शेवटी येथे जवळपास असलेल्या एका दरीजवळ आलो तेव्हा मला काही धनगर भेटले; मी त्यांना विचारले, "या डोंगरात अत्यंत दुर्गम नि कडे असलेल्या खडकाळ भागाकडे जाण्याची वाट कोणती?" त्यांना मला वाट दाखविली आणि तेथे जाण्यासाठी मी शक्य तितकी त्वरा केली. कृतघ्न आणि लबाड मानवापासून दूर राहून आपले तिरस्कृत आयुष्य झिजवून झिजवून संपवावे असा निश्चय मी केला. मी या अरण्यात जेव्हा आलो, तेव्हा माझे खेचर थकून गेले होते आणि भुकेने कासावीस झाले होते. कदाचित माझ्यासारख्या निरुपयोगी माणसाच्या भारातून मुक्त व्हावे म्हणून, ते मरून खाली पडले. मी स्वतः अत्यंत अशक्त, थकलेला आणि निराश झालो होतो. भुकेने तळमळत होतो-आणि तरीही कोणाच्या मदतीची पर्वा करीत नव्हतो. असा मी निराधार होतो. मी लगेच जमिनीवर पडलो-बेशुद्ध पडलो-म्हणा ना! तेथे मी प्रेतासारखा बराच वेळ पडून राहिलो होतो. किती वेळ? हे मला माहीत नाही. मी शुद्धीवर येताच उठून उभा राहिलो. खाण्याची काही वासना माझ्या अंगी राहिली असल्याचे कळेना. माझ्याजवळ काही मेंढपाळ बसले होते. त्यांनी मला काही खावयास दिले असे वाटते. पण त्याची मला काही जाणीव नव्हती. माझी दुरवस्था पाहून ते घाबरून गेले होते. माझी

शुद्ध-बुद्ध हरपली आहे, असे त्यांना वाटत होते. त्यानंतर चिंतन करण्यासारखे माझ्या-जवळ फारसे काही उरले नाही. माझी बुद्धी केव्हा केव्हा मला सोडून जाते, आणि मग अविचारी संताप आणि त्वेष यामुळे मी ती अतिरेकी कृत्ये करीत असतो. कधी मी माझे कपडे फाडीत असतो तर कधी या अरण्यात आरोळ्या ठोकीत असतो आणि शापाच्या नि शोकाच्या उद्‌गारांनी सारे वातावरण भरून टाकतो. लुसिंडाच्या नावाच उच्चार हजारो वेळा मी उगाच करतो. तिचे प्रिय नाव माझ्या ओठावर खेळत असताना, माझ्या जीवाचे पाखरू उडून जावे, अशी तेव्हा माझी इच्छा असे. जेव्हा मी शुद्धीवर येतो तेव्हा मी इतका थकला-भागलेला असतो की, थोडीही हालचाल करण्यास मी समर्थ नसतो. माझे निवासस्थान म्हणाल तर कॉर्क-वृक्षाची ढोली बहुधा असते. तीत मी रात्री जाऊन बसतो. त्यावेळी काही मेंढपाळ आपली गुरे जवळच्या डोंगरावर चरावयास सोडून माझे जीवन टिकविण्यासाठी, दयाबुद्धीने आणि ख्रिस्ती धर्मातील औदार्याने, मला कधी कधी खाद्यपदार्थ देतात. माझी बुद्धी मला सोडून गेली, तरी निसर्ग आपले भौतिक कार्य करीतच असतो. माझी भूक भागविण्याची मला सहजच प्रेरणा होते. केव्हा केव्हा मी शुद्धीवर असतो तेव्हा हे सज्जन लोक मला टाकून बोलतात. कारण ते मला राजीखुषीने जे देण्यास सदैव तत्पर असतात, ते खाद्यपदार्थ मी त्यांच्यापासून अकस्मात् बळजबरीने हिरावून घेतो. त्या माझ्या हिंस्त्र वर्तनाला मी कोणतेही कारण देऊ शकत नाही. दुःखाचा अतिरेक हेच एक कारण ! असेच केविलवाणे जिणे मी घालविले पाहिजे. माझ्या दुःखामुळे परमेश्वराने माझ्यावर दया दाखवून माझ्या जीविताचा अंत तरी करावा, अथवा लबाड लुसिंडाची चारुता आणि कृतघ्नता नि फर्डिनांडची बेइमानी माझ्या स्मरणातून नाहीशी करावी. मरणापूर्वी मला जर थोडेसे सुख मिळाले, तर मी माझे वेडेवाकडे विचार एकत्र आणू शकेन अशी मला आशा वाटते. पण तशी कृपा ईश्वर करील, अशी मला आशा नसल्यामुळे मी माझा जीव ईश्वराच्या कृपेवर सोपविला आहे. माझा देह आणि माझे मन यांना मी ज्या दुर्दशेमध्ये दुर्दैवाने लोटून दिले आहे, त्यातून मी त्यांना बाहेर काढू शकत नाही.

"सज्जनहो, अशा प्रकारे मी माझ्या दुर्दैवाचा खरा इतिहास तुम्हाला निवेदन केला आहे. याहून कमी दुःखाने मला तो सांगता आला असता की नाही, हे आपणच ठरवा. कृपा करून या रोग्याला काही औषध सांगू नका, कारण तो ते कोणतेच घेणार नाही. लुसिंडाशिवाय माझे आरोग्य टिकणार नाही. तिने माझा त्याग केला आहे म्हणून मी मेलेच पाहिजे. माझा सत्यानाश व्हावा, अशी आपली इच्छा असल्याचे तिने आपल्या बेइमानीने मला पटवून दिले आहे. मी अखेरपर्यंत अतुल वेदना सहन करीत राहीन. त्यामुळे तिची खात्री पटविण्याचा प्रयत्न करीन की, माझ्या नशिबी याहून चांगली स्थिती यावयास हवी होती. म्हणून मला सतत दुःख सोसू द्या. इतर अभागी जीवांना जे सुख मिळते, तेही मला मिळण्याची शक्यता नाही. निराशेमुळे दुःखमुक्त न होणारा मीच एक अभागी प्राणी असेन."

येथे कार्डेनियोने आपली शोक-कथा समाप्त केली. त्याचे योग्य ते सांत्वन करण्याची तयारी पाद्री करीत असतानाच त्या सर्वांचे लक्ष दुसऱ्या काही दुःखोद्गारांकडे खेचले गेले. आणि तो पाद्री गप्प बसला. पण त्या प्रसंगाचे वर्णन या इतिहास-ग्रंथातील चवथ्या खंडासाठी राखून ठेवलेले आहे. कारण, आपला समंजस व न्यायनिष्ठ इतिहासकार सिड हॅमेट बेनेनगेली- याने तिसऱ्या खंडाला येथे विराम दिला आहे.



# खंड-४

## प्रकरण १

## सीएरा मोरेनामध्ये वा कृष्णपर्वतामध्ये पाद्री व न्हावी यांच्यावर जो नवा आनंददायक प्रसंग आला, त्याचे वर्णन.

ला–मांचा येथील डॉन क्विक्झोट यांच्यासारख्या अत्यंत धाडशी शिलेदाराचा जन्म या जगतामध्ये ज्या काळी झाला, तो काळ अत्यंत भाग्याचा व सौख्याचा होता. त्यापूर्वी शिलेदारीची प्राचीन परंपरा पूर्णपणे उपेक्षित होती, एवढेच नव्हे तर ती जवळजवळ लुप्त आणि नष्ट झालेली होती. तिचे पुनरुज्जीवन करण्याचा त्यांचा निश्चय उदात्त होता. सौख्यापासून व आनंदापासून वंचित झालेल्या सध्याच्या काळात त्यांच्या या खऱ्या इतिहासापासून कोणालाही आनंद लुटता येईल. त्याचबरोबर त्यांच्याविषयी ज्या नानाविध कथा आणि दंतकथा आहेत, त्याही काही कमी कलात्मक किंवा कमी आनंददायक नाहीत, किंबहुना काही बाबतीत मूळ इतिहासापेक्षा या कथाच अधिक अधिकृत आहेत.

आम्ही आपल्याला हे सांगितले आहेच की, कार्डेनियोचे योग्य ते सांत्वन करण्याची तयारी पाद्री करीत असताना त्याच्या कानी पडलेल्या करुण गाऱ्हाण्यांच्या आवाजाने तो थांबला. तो अदृश्य माणूस शोकाकुल स्वराने ओरडून म्हणत होता, "हे प्रभो! या माझ्या दुःखीकष्टी देहाचा भार मी किती काळ सोसू? त्या देहाला एका गुप्त थडग्यात आसरा देणारे स्थान मला येथे सापडले आहे काय? होय, या अरण्यातील शांतता आणि एकांत हे जर फसवे नसतील, तर कोणाही मानवी नेत्रांना न दिसता, मी येथे मरू शकेन. किती अभागी प्राणी आहे मी! माझ्या दुःखाचा कडेलोट झाला आहे आणि त्यामुळे मी या भयाण अरण्याला आणि डोंगराला प्रेमाचे विश्रांतिस्थान मानीत आहे. लबाड मानवजातिकडे मी जर सुखाची मागणी केली तर ती फोल ठरेल, पण येथे मी परमेश्वराकडे मला दुःखमुक्त करण्याची मागणी मुक्तकंठाने करू शकेन. सल्ला, स्वास्थ्य, उपाय यांचा शोध या भूतलावर करणे व्यर्थ आहे असे मला आढळून आले आहे."

हा सारा विलाप पाद्री वगैरे मंडळींच्या कानी स्पष्टपणे पडला. तेव्हा त्यांनी रास्त कल्पना केली की, आपले दुःख व्यक्त करणाऱ्या माणसाच्या अगदी जवळ आपण

आहोत. म्हणून त्याला शोधून काढण्यासाठी ते उठले. ते वीस एक पावले चालून गेले नसतील, तोंच त्यांना गावढळ पोषाखातला एक तरुण दृष्टीस पडला. एका ॲश झाडाच्या मागे, खडकाच्या पायथ्याशी तो बसला होता. त्याचे डोके जवळजवळ त्याच्या गुडघ्यापर्यंत वाकलेले होते, त्यामुळे ते त्याचे तोंड नीट पाहू शकत नव्हते. जवळून वाहणाऱ्या एका ओढ्यात तो आपले पाय धूत होता. ते त्याच्याजवळ इतक्या हलक्या पावलाने गेले की, त्याने त्यांना पाहिले नाही. त्या स्वच्छ पाण्यात तो आपले पाय हळूहळू हलवीत होता. त्याचे पाय संगमरवरासारखे पांढरेशुभ्र व निमुळते होते, आणि ते इतके सुंदर आणि प्रमाणबद्ध होते की त्याहून अधिक सुंदर पाय कोणाला कधी दिसणे शक्यच नव्हते. ते पाहून आमच्या प्रेक्षकांना मोठे नवल वाटले आणि ते असा तर्क करू लागले, अशा वेशातील सर्वसामान्य माणसे ओबडधोबड रस्त्यावरून चालत जातात आणि नांगराला जुंपलेल्या बैलांच्या पावलामागोमाग जातात. पण हे कोमल पाय त्या कामाला सरावलेले नसावेत. या दृश्यामुळे पाद्र्याच्या जिज्ञासेची तार खेचली गेली आणि म्हणून इतरांना मागे टाकून तो पुढे गेला. त्याने त्यांना खुणावून सांगितले, 'एका बाजूस व्हा आणि जवळच्या छोट्या खडकामागे दडा.' त्याप्रमाणे त्यांनी केले. तेथून त्यांना त्याचे सूक्ष्म निरीक्षण करता आले. तेव्हा त्यांना असे आढळले की, त्याच्या अंगावर करड्या रंगाची दुहेरी घोळाची बंडी आहे आणि ती सणकापडाच्या रुमालाने देहाला घट्ट बांधली आहे. शिवाय त्याने तशाच रंगाचा पायजमा घातलेला होता आणि डोक्यावर तशाच रंगाची शिकाऱ्याची टोपी चढविली होती. आता त्याचा पायजमा पोटऱ्यांपर्यंत वर ओढलेला होता. त्याचे पाय खरोखर बर्फासारखे शुभ्र संगमरवरी दिसत होते. आपले देखणे पाय धुण्याचे कार्य त्याने संपविले आणि लगेच आपल्या टोपीखालून एक हातरुमाल काढून ते पुसले. नंतर त्याने वर पाहिले. तेव्हा त्याची मुद्रा इतकी मोहक दिसू लागली आणि त्याचे सौंदर्य इतके परिपूर्ण भासू लागले की, "अरे, ही ज्याअर्थी लुसिंडा नाही त्या-अर्थी ही कोणी तरी देवदूत असावी—मानवी प्राणी नसावी." असे पाद्र्याला म्हटल्या-शिवाय कार्डेनियोला राहावेना. नंतर त्या तरुणाने आपली टोपी काढली आणि आपले मस्तक हलविले. तेव्हा त्याच्या खांद्यावर सुंदर केसांचा, विश्वास बसणार नाही इतका मोठा कलाप रुळू लागला, आणि त्यामुळे त्याचे केवळ खांदेच नव्हेत, तर त्याचे बहुतेक सारे शरीरही झाकले गेले. त्यावरून त्यांची खात्री पटली की, आपण प्रथम ज्या व्यक्तीला खेडवळ छोकरा समजलो, ती एक तरुण स्त्री आहे – आणि साऱ्या जगातील अत्यंत रूपवती आहे. त्या दोघांपेक्षा कार्डेनियोला काही कमी आश्चर्य वाटले नाही. तो पुन्हा एकदा म्हणाला, लुसिंडाशिवाय दुसऱ्या कोणाचाही चेहरा तिच्या चेहऱ्याशी बरोबरी करू शकणार नाही.

आपले विस्कटलेले केस बाजूस सारण्यासाठी, तिने केवळ आपल्या नाजुक बोटांचाच उपयोग केला. त्यावेळी तिचे दोन्ही बाहू आणि हात इतके छान दिसले—पांढरेशुभ्र आणि सौंदर्यसंपन्न दिसले – की, ती कोण आहे, हे जाणण्यास आमचे तिघे

लुब्ध प्रेक्षक अधीर झाले. तिचा पूसतपास करण्यासाठी ते तिच्याकडे निघाले. त्यावेळी जो आवाज झाला, त्यामुळे तो देखणा जीव दचकला. आपल्या डोळ्यावर आलेले केस तिने आपल्या दोन्ही हातांनी बाजूस सारले आणि तसे करताना त्या तिघांकडे ओझरते पाहिले. आपल्याकडे तीन पुरुष येत आहेत असे दिसताच ती अत्यंत घाबरली आणि आपल्याजवळ पडलेले छोटेसे गाठोडे घाईने उचलून ती शक्य तितक्या त्वरेने धावत सुटली. आपले बूट पायात घालण्यासाठी किंवा आपले केस नीट करण्यासाठीही ती थांबली नाही. पण हाय ! ती सहा पावले गेली असेल नसेल तोच, रस्त्यावरील खड-बडीत दगडावर तिचे कोमल पाय अडखळले आणि तो बिचारा भयभीत सुंदर जीव कठीण जमिनीवर पडला. त्यामुळे, तिने ज्यांच्यापासून पळ काढला होता, ते तिघेही तिला मदत करण्यासाठी धावत गेले.

पाद्री मोठ्याने म्हणाला, “ थांबा, बाईसाहेब, थांबा. आपण कोणीही असा, पण आपण पळ काढण्याचे काहीच कारण नाही. आपल्या सेवेशिवाय आमच्या मनात दुसरा कोणताही हेतू नाही. ” असे म्हणून तो तिच्याजवळ गेला आणि तिचा हात त्याने आपल्या हातात घेतला. तिच्या मनात गोंधळ उडाला आहे आणि ती घाबरली आहे आणि म्हणून ती एका शब्दानेही उत्तर देऊ शकत नाही असे पाहून, तिचे मन स्वस्थ करण्यासाठी पाद्री तिला प्रेमळ शब्दांनी म्हणाला, “ बाईसाहेब, आपण मुळीच घाबरू नका. आमच्यापासून आपल्या वेषांतराने जे दडविले, ते आपल्या केसांनी उघड केले, त्यामुळे आपल्याला सर्व तऱ्हेची मदत करण्यास आम्ही अधिकच उत्सुक आहो. ती मदत आणि ती सेवा आम्ही उत्तम प्रकारे कशी करावी हे आपण आम्हाला कृपा करून सांगावे. इतक्या भिकार वेषामध्ये आपण आपले अलौकिक सौंदर्य का झाकले आणि या अरण्यात येण्याचे धाडस का केले, याचे कारण सामान्य असणार नाही, असा माझा तर्क आहे. तुम्ही आम्हाला येथे भेटला हा जगातील एक मोठाच योगायोग होय. तथापि आपल्या दुर्दैवावर काही तोड काढणे अशक्य नाही, अशी आम्हास आशा वाटते. बुद्धी व काळ यांना अजिंक्य असे कोणतेच दुर्दैव नसते. म्हणून बाईसाहेब, आपण जर सर्व मानवी सौख्यांचा संपूर्ण त्याग केलेला नसेल, तर आपण आपल्या दुःखाचे कारण आम्हास सांगावे अशी माझी विनंती आहे, हे आम्ही केवळ कुतूहलाने विचारीत नाही अशी खात्री बाळगा. आपली सेवा करण्याची–आपल्या दुःखाचे शमन करण्याची–आम्हाला खरीखुरी इच्छा आहे. ”

त्या भयकंपित सुंदरीचे भय निवारण करण्याचा प्रयत्न अशा प्रकारे पाद्री करीत असताना ती चकित होऊन उभी राहिली आणि त्याच्याकडे टक लावून पाहू लागली. अर्धवट जागा झालेल्या माणसाप्रमाणे किंवा काही विचित्र दृश्य पाहणाऱ्या अडाणी विदूषकाप्रमाणे, एकदा याच्याकडे तर एकदा त्याच्याकडे, ती पाहू लागली. तिच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडत नव्हता. तिने आपले मन सावरावे म्हणून पाद्र्याने काही काळ जाऊ दिला आणि सभ्यतेने व कळकळीने पुनःपुन

तिला विनवण्या केल्या. तेव्हा शेवटी तिने एक दीर्घ श्वास घेतला आणि आपले ओठ उघडून मौनाचा भंग पुढील शब्दांनी केला—" ज्या अर्थी हे अरण्य मला लपवू शकले नाही आणि माझ्या केसांनी माझा विश्वासघात केला; त्याअर्थी तुमच्यापासून मी काही लपवून ठेवण्याची गरज नाही. माझी दुर्दैवाची कहाणी ऐकण्याची तुम्हाला इच्छा आहे आणि तुम्ही मला मदत करण्यासाठी मोठी तयारी दाखविली आहे, म्हणून मी तुम्हांला नकार देणे सभ्यतेचे ठरणार नाही. पण सद्गृहस्थहो, मला जे काही सांगावयाचे आहे त्यामुळे तुम्हाला खेद वाटेल—फारसे समाधान वाटणार नाही—असे भय मला वाटते. माझ्यावरील संकटे दूर करता येण्यासारखी नाहीत हे तुम्हाला आढळून येईल. मला एका गोष्टीचा विशेष त्रास होत आहे. माझ्याबरोबरच जी माझी रहस्ये थडग्यात पुरली जावीत अशी माझी इच्छा होती, ती तुमच्यापुढे उघड करणे मला भाग पडत आहे, याचा मला धक्का बसतो. पण तुम्ही मला ज्या स्थानी आणि ज्या वेषात पाहिले आहे, त्याचा विचार करता, मी तुम्हाला सर्व काही सांगणे चांगले, असे मला वाटते. मी जर खोटा संकोच बाळगून तुम्हाला काही सांगितले नाही, तर माझ्या पूर्वायुष्याविषयी आणि सांप्रतच्या योजनेविषयी शंका घेण्यास तुम्हांला काही कारण सापडेल."

त्या वेषांतरित स्त्रीने अत्यंत विवेकाने व विनम्र लज्जेने असे उत्तर दिल्यामुळे, पाद्री वगैरे मंडळींना तिच्या शहाणपणाचे विशेषच कौतुक वाटू लागले आणि ते मदतीची आपली प्रेमळ इच्छा पुनः पुनः व्यक्त करू लागले व आपला वृत्तांत सांगण्यास तिला आग्रहाची विनंती करू लागले. तिला आपले कपडे नीटनेटके करता यावेत म्हणून काही काळ दुसरीकडे जाण्यास त्यांनी तिला नम्रपणे सुचविले. तसे करून ती परत आली. तेव्हा सारेजण गवतावर बसून राहिले. आपले अश्रू आवरण्याचा जोराचा प्रयत्न करून तिने आपली कहाणी सांगण्यास सुरुवात केली :

" माझा जन्म अँडाल्युसियामधील एका शहरात झाला, या प्रदेशावरूनच ड्यूकला पदवी मिळाली आणि त्यामुळे तो स्पेनमधील बडी असामी ठरला. या ड्यूकला दोन मुले आहेत. त्यांपैकी मोठा मुलगा त्याच्या मालमत्तेचा वारस आहे—आणि त्याच्या गुणवत्तेचाही असावा असे मानता येईल. पण धाकटा मुलगा कशाचा वारस आहे हे मला माहीत नाही. राजाला विश्वासघाताने मारणाऱ्या व्हेलिडोची दगाबाजी नि ( फ्रेंच सैन्याचा विश्वासघात करणाऱ्या ) गॅलेलॉन याची ढोंगबाजी—हे दोष त्याच्या अंगी आहेत. माझा बाप ड्यूकचा कूळ आहे, पण हलक्या कुळातील आहे; तथापि तो अत्यंत श्रीमंत आहे. दैवाने त्याच्या श्रीमंतीइतकी कुलीनता त्याला दिली असती, तर त्याला कशाचीच उणीव राहिली नसती—आणि मी कदाचित् इतकी दुःखी झाले नसते. कारण मला असे खात्रीने वाटते की, उच्च कुळात माझा जन्म झाला नाही, हेच माझ्या सत्यानाशाचे मुख्य कारण होय. आता हे खरे की, ज्याच्याबद्दल लज्जा वाटावी अशा हीन कुळात माझ्या आईबापांचा जन्म झालेला नाही, पण माझ्या दुःखाचा जन्म त्यांच्या कुलहीनतेत झालेला आहे, हे माझे मत बदलण्याइतक्या उच्च कुळात त्यांचा

जन्म झालेला नाही. पिढ्यानुपिढ्या ते शेतकरी आहेत हे खरे, पण त्यांच्या रक्तात निंदा-नालस्ती करण्यासारखे काहीहि मिसळलेले नाही. दुर्लौकिकाचा कलंक त्यांच्या कुळाला लागलेला नाही. ते जुने–पुराणे ख्रिश्चन आहेत. (पूर्वीच्या स्पॅनिश लोकांना आम्ही असेच संबोधितो). त्यांची प्राचीन कुल-परंपरा, त्यांची विशाल मालमत्ता आणि त्यांची खानदानी राहणी–यामुळे त्यांच्या व्यवसायाने मिळणाऱ्या प्रतिष्ठेपेक्षा अधिक प्रतिष्ठा त्यांना प्राप्त झालेली आहे, आणि हळुहळू त्यांना बहुतेक सर्वांनी 'सद्‌गृहस्थ' अशी पदवी दिली आहे—त्यामुळे जगातील सद्‌गृहस्थांच्या पंक्तीत त्यांना स्थान मिळाले आहे मी त्यांची एकुलती एक मुलगी; त्यांची लाडकी. अत्यंत कोमल अंतःकरणाने त्यांनी माझ्यावर प्रेम केले. आपल्या अफाट जिंदगीचा शांततेने उपभोग घेताना त्यांना जितके सौख्य वाटत असेल, त्याहून अधिक सौख्य आपल्या मुलीपासून आपल्याला मिळत आहे असे त्यांना प्रेमातिरेकाने वाटत असे. त्यांच्या प्रेमाचा ठेवा लाभण्याचे भाग्य मला मिळालेले असल्यामुळे, त्यांनी आपल्या ऐश्वर्याचे अधिकार मजकडे आनंदाने सोपविले. सारे घर आणि सारी मालमत्ता यांची व्यवस्था माझ्याकडे आली. त्यांनी माझ्यावर टाकलेल्या विश्वासाचा घात होऊ नये अशी मी काळजी घेत होते. त्यामुळे माझ्या समंजसपणाविषयीचे त्यांचे अनुकूल मत कधीही नष्ट झाले नाही. कुटुंब-व्यवस्थेतून जो वेळ मला मिळे, तो मी तरुण स्त्रियांच्या नित्याच्या कामधामांत बहुधा खर्च करीत असे. कधी भरतकाम तर कधी शिवणकाम मी करी. अधूनमधून मी चांगली पुस्तके वाची किंवा वीणा वाजवी. थकल्या–भागलेल्या मनाला ताजेतवाने करण्यास संगीत फार उपयोगी पडते असा अनुभव मला आला. असे निरागस जीवन मी घालवीत होते. पोकळ बडे-जावीसाठी मी हा सारा तपशील तुम्हाला सांगत नाही; तर माझ्या दुराचारामुळे माझी ही दुरवस्था झाली आहे असे तुम्हांला वाटू नये हाच माझा हेतू आहे.

"अशा प्रकारे, स्वतःच्या घरातील माणसापेक्षा माझ्या कल्पनेप्रमाणे दुसऱ्या कोणाच्याही नजरेस न पडता, मी संन्यासिनीचे जीवन घालवीत होते. केवळ प्रार्थना-मंदिरांत जाण्यासाठीच मी घराबाहेर पडे–आणि तेही बहुधा सकाळच्या वेळी–आणि नेहमी आई बरोबर असताना. त्यावेळी माझ्या तोंडावर इतका दाट बुरखा असे की, मला माझा रस्ताही नीट सापडत नसे. जगाच्या दृष्टिआड राहण्यासाठी मी इतका प्रयास करीत असूनही, मी सुंदर असल्याचा बोभाटा माझ्या दुर्दैवाने परदेशात झाला. माझ्या प्रशांत नि निवृत्त जीवनात प्रणयाने प्रवेश केला. मी सांगितलेला ड्यूकचा दुसरा मुलगा डॉन फर्डिनांड याने मला पाहिले...."

डॉन फर्डिनांडचे नाव कार्डेनियोचे कानी पडले मात्र, त्याच्या चेहऱ्याचा वर्ण एकाएकी बदलला आणि त्याच्या शरीरात व मनात विलक्षण चलबिचल झाल्याचे दिसून आले. त्याला वारंवार येणारे झटके आता त्याला येतील की काय अशी भीती, पाद्री व न्हावी यांना वाटू लागली. पण सुदैवाने तशी स्थिती झाली नाही. ती खेडवळ तरुणी कोण आहे, याचा तर्क करीत तो तिच्याकडे एकटक पाहू लागला इतकेच. त्याच्या मुद्रे-

वरील बदलत्या हावभावाकडे लक्ष न देता तिने आपली कहाणी पुढे चालू केली—

"मला पाहताक्षणीच त्याच्या अंतःकरणात तीव्र प्रेम-भावना उत्पन्न झाली (असे नंतर त्यानेच मला सांगितले.) त्या प्रेमाचे असंख्य पुरावेही त्याने मला पुढे दिले. पण प्रत्येक तपशिलाचे अनावश्यक वर्णन करून मी तुम्हाला शीण देत नाही. आपल्या प्रेमाची साक्ष पटविण्यासाठी त्याने जे जे उपाय योजले, ते सांगण्याचे मी टाळते. आमच्या साऱ्या नोकरांना गुप्तपणे चिरीमिरी देऊन त्याने त्यांना वश करून घेतले. माझ्या वडिलांचीहि हजारो प्रकारांनी सेवा करण्याची तयारी त्याने दाखविली. आमच्या परिवारातील लोकांना, उगवणारा प्रत्येक दिवस आनंद देऊन जाई आणि मावळणारा प्रत्येक दिवस प्रेमगीतांचा प्रारंभ करून जाई. सतत चालणाऱ्या त्या संगीताने रात्रीच्या वेळी आमच्या झोपेत अडथळाही येई. त्याने मला असंख्य प्रेम–पत्रे पाठविली, कशी, ते मला माहीत नाही. त्या प्रत्येक पत्रांत् अत्यंत कोमल भावना व्यक्त केलेल्या असत–आणि वचने, शपथा नि प्रतिज्ञा हेही असत. पण या साऱ्या प्रेमाराधनेच्या प्रयत्नांना माझे अंतःकरण प्रतिसाद देण्यास प्रवृत्त झाले नाही. उलट त्यामुळे माझा राग मात्र वाढला–तो इतका की, डॉन फर्डिनांड हा आपला सर्वांत मोठा वैरी आहे आणि आपला सत्यानाश करण्यास अगदी टपून बसलेला आहे, असा माझा ग्रह झाला. याचा अर्थ, त्याच्या पराक्रमावर मी संतुष्ट नव्हते असा मात्र नव्हे. असा पराक्रमी पुरुष आपली प्रणयाराधना करीत आहे याचा चोरटा आनंद मी उपभोगीत होते. प्रेमाचे असे प्रदर्शन कोणत्याही स्त्रीला नाराज करीत नाही. स्त्रिया कितीही लाजाळू असल्या, तरी अशा भक्ताबद्दल त्यांच्या अंतःकरणात थोडाफार तरी ओलावा निर्माण झालेला असतोच. अगदी तिरस्कार करणाऱ्या स्त्रियासुद्धा त्याच्याशी गोड बोलण्यास तयार असतात. पण आम्हा दोघांच्या गुणामध्ये इतकी विषमता होती की, मी समंजसपणाने कोणतीच आशा बाळगू शकत नव्हते. त्यांचे शौर्य अलौकिक होते आणि त्यामुळे माझे मन दुरावले होते. डॉन फर्डिनांडच्या या दांभिकपणाचा योग्य तोच अर्थ माझ्या वडिलांनी ताबडतोब लावला आणि शीलाविषयी माझ्या ज्या कल्पना होत्या, त्यांना त्यानी पुष्टी दिली आणि मला शहाणपणाचा उपदेश केला व त्याच्या प्रेमाविषयींच्या माझ्या मनातील साऱ्या अनुकूल भावना उडवून लावल्या. पण माझे वडील प्रेमळ होते. माझ्या मनाची अस्वस्थता त्यांनी ओळखली.

"अशा थोरामोठ्यांशी सोयरीक जमली तर पुढे आपला किती उत्कर्ष होईल, या विचाराचा आनंद मला अजून होत आहे हे लक्षात घेऊन, एक दिवस त्यांनी, माझ्या चांगुलपणावर आपला विश्वास आहे, हे मला सांगितले. डॉन फर्डिनांडच्या अपमानास्पद इच्छेला पायबंद घालण्यास हा विश्वासच फार उपयोगी पडेल असे त्यांना वाटले. तरीही, "त्याचा दुष्ट पिच्छा दूर व्हावा आणि आपल्या कीर्तीचा नायनाट होऊ नये, म्हणून तुझी इच्छा असल्यास तू आपल्या पसंतीप्रमाणे, आपल्या शहरांतील किंवा परिसरांतील, योग्य वराची निवड करण्याचे स्वातंत्र्य तुला आहे," असेही त्यानी मला सांगितले. कोणत्याही प्रेमळ पित्याकडून जी जी अपेक्षा केली जाते, ती मी पूर्ण करीन असेही आश्वासन त्यांनी

मला दिले. त्यांच्या प्रेमळपणाबद्दल मी त्यांचे आभार नम्रतेने मानले आणि म्हटले, "लग्नाचा विचार माझ्या मनात कधीच आलेला नाही. म्हणून डॉन फर्डिनांडचा ससेमिरा, दुसऱ्या कोणत्या तरी मार्गाने दूर करण्याचा प्रयत्न मी करीन." त्याप्रमाणे त्याला टाळण्याचा प्रयत्न मी अत्यंत कसोशीने करण्याचे ठरविले. माझ्याशी बोलण्याची संधिच त्याला मिळू नये असे करण्याचे मी योजले. पण मी जो जो दूर राहू लागले, तो तो त्याची प्रेमभावना क्षीण होण्याऐवजी बळकटच होऊ लागली. थोडक्यात म्हणजे, माझे लग्न व्हायचे आहे असे ऐकल्यामुळे किंवा तशी शंका आल्यामुळे, डॉन फर्डिनांडने एक युक्ती करण्याचे योजले. त्यामुळे त्याच्या साऱ्या आशांचा चक्काचूर होणार होता.

"एके दिवशी रात्री, मी माझ्या दासीसह, माझ्या खोलीत बसले होते. दारांना पक्क्या कड्या लावलेल्या होत्या. हेतू हा की, डॉन फर्डिनांडच्या कोणत्याही कृत्याची झळ मला लागू नये. आपले हेतू सिद्ध करण्यासाठी तो काहीही करण्यास कचरणार नाही, असे मी मानीत होते. पण काय सांगावे ! काही कल्पना नसताना तो माझ्यासमोर उभा असलेला मला दिसला. त्या विलक्षण दृश्याने मी चकित झाले – माझी वाचा खुंटली – आणि भीतीने मी मूर्च्छित पडले. कोणाला मदतीसाठी हाक मारण्याचेही त्राण माझ्या अंगी नव्हते – आणि मी प्रयत्न केला असता तर तसे करण्यास त्याने मला सवड दिली असती असेही मला वाटत नाही. माझे मन भीतीमध्ये आकंठ बुडालेले असताना, तो एकदम माझ्याकडे धावत आला आणि मला आपल्या बाहूत कवटाळून इतक्या काही प्रेमळ शब्दांनी बोलला, इतक्या कौशल्याने बोलला, कळकळीचा नि मृदुलतेचा आव आणून बोलला की, शुद्धीवर आले तरी मी ओरडण्यास धजले नाही. त्याने आपल्या प्रामाणिकपणाची शपथ घेतली आणि तिला त्याच्या सुस्काऱ्यांनी नि त्याहून त्याच्या आसवांनी पुष्टी दिली. मग त्याचा प्रामाणिकपणा मी कसा नाकारू शकेन ! मी तरुण होते – माझ्या सद्गुणी मातापित्यांशिवाय बाकीच्या साऱ्या समाजापासून सतत दूर राहून वाढलेली होते आणि प्रेम-प्रकरणात अननुभवी होते. प्रेमाच्या बाबतीत भल्याभल्या शहाण्यांचीही फसगत होते; मग माझी काय कथा ! माझी नाराजी हळूहळू ओसरू लागली. माझी अब्रू शाबूत ठेवून मी त्याच्यावर थोडीथोडी दया दाखवू लागले. पण भीतीच्या पहिल्या झटक्यातून मी मुक्त होताच माझा पूर्वीचा निश्चय पुन्हा जागृत झाला आणि माझ्या अंगी जितके धैर्य असावे असे मला वाटत होते, त्यापेक्षा अधिक धैर्याने मी त्याला म्हटले, "महाराज, आपण आपले प्रेम मला अर्पण करीत आहात आणि त्या प्रेमाचे असे विचित्र प्रदर्शन माझ्यापुढे करीत आहात, त्याच वेळी आपण मला विषही द्यावे आणि प्रेम की विष यातील निवड करण्यास मला मोकळे ठेवावे. असे झाले म्हणजे त्या दोहोंपैकी मी काय स्वीकारावे, याचा निर्णय मला चटकन् करता येईल. मृत्यूची निवड करून मी आपली अशी खात्री पटवीन की, माझ्या जीवितापेक्षा मला माझी अब्रू अधिक प्रिय आहे. स्पष्टच सांगावयाचे तर ज्यामुळे माझ्या कीर्तीला कलंक लागेल, असे काही मी करणार नाही. तुम्ही यावेळी मला मोकळे सोडले नाही तर,

माझ्याविषयी तुमचा किती गैरसमज झाला आहे हे मी तुम्हाला परिणामकारकपणे पटवून देईन. तुमच्या ठायी मानापमानाची अल्पशी भावनाही शिल्लक असेल तर, मला या दुर्दशेच्या टोकाला खेचून आणण्यात आपण जी चूक केली आहे, तिच्याबद्दल तुम्हाला आमरण पश्चात्ताप करावा लागेल. माझा जन्म तुमची एक ' रयत ' म्हणून झाला असेल, पण गुलाम म्हणून नव्हे. आपल्या उच्च कुळामुळे आपल्यापेक्षा खालच्या लोकांची खराबी करण्याचा हक्क आपल्याला मिळालेला आहे असे आपण समजू नका. सारी कुळे जमीन-दाराला जे कर भरतात, त्यापेक्षा अधिक काही आमच्याकडून सक्तीने मिळविण्याची तुम्ही अपेक्षा धरू नका. एवढा भाग सोडला तर, मला माझ्या हलक्या कुळामुळे काही कमीपणा येतो असे वाटत नाही. आपण उच्च वर्गाचे आहो, म्हणून तुम्ही स्वतःची किंमत कितीही मोठी माना, पण आपल्या वैभवाने मला दिपविण्याचा किंवा घाबरविण्याचा विचार तुम्ही सोडून द्या. त्याचप्रमाणे भयाने किंवा सक्तीने नीच कृत्य करण्यास माझी संमती मिळेल असेही समजू नका. मानमरातब, थाटमाट आणि साधनसंपन्नता – यांचा मोह मला कधीच पडणार नाही. त्याचप्रमाणे पोकळ सुस्कान्यांनी आणि खोट्या अश्रूंनी हृदय हलावे इतकी मी दुर्बल नाही. सारांश, माझी इच्छा मी माझ्या वडिलांच्या हाती पूर्णपणे सोपविलेली आहे. त्यांच्या संमतीविना मी कोणाही पुरुषाला माझा प्रियकर मानणार नाही. म्हणून महाराज, आपले माझ्यावर मनापासून प्रेम आहे असे मला वाटावयास लावण्याची तुम्हाला इच्छा असेल तर, तुम्ही माझा निरर्थक नि घातक पाठलाग करण्याचे सोडून द्या. माझी अब्रू सुरक्षितपणे संभाळून मला माझ्या जीवनाची फळे शांततेने चाखू द्या. अब्रू गेली की जीवनाची सारी मधुर फळे कायमची सुकून जातात. तुम्ही माझे पति होऊ शकत नाही. म्हणून पतीशिवाय दुसऱ्या कोणाला न मिळणाऱ्या माझ्या प्रेमाची अपेक्षा तुम्ही माझ्याकडून करू नका. ”

तेव्हा तो विश्वासघातकी सरदार ओरडला, “ हे मनोहारी डोरोथी, तुझ्या म्हणण्याचा अर्थ काय ? तुझ्या पतित्वाचे पवित्र पद मला मिळणार नाही काय ? तू संमती दिलीस तर मला कोण अडविणार ? दुसरी काही धोंड माझ्या वाटेत नसेल तर मला फार आनंद वाटेल. हे सौंदर्यवती डोरोथी, या क्षणापासून मी तुझाच आहे. तुझा – आणि सदैव केवळ तुझाच – म्हणून मी माझा हात आता तुझ्या हातात देतो. याला साक्ष सर्वसाक्षी प्रभू आणि प्रार्थनामंदिरातील पवित्र प्रतिमा असोत. ”

तिने स्वतःला डोरोथी म्हणून संबोधिले हे पाहून कार्डेनियोची पक्की खात्री झाली की, ती जी असावी असे आपल्याला वाटत होते, तीच ती आहे. पण तिच्या प्रेमकथेचा शेवट ऐकण्यास तो उतावीळ झालेला असल्याने, त्याने तिच्या कथा-कथनांत खंड पाडला नाही. त्याने तिला एवढेच विचारले, “तर मग आपले नाव डोरोथी आहे काय ? त्या नावाच्या स्त्रीची हकीगत मी ऐकली आहे. तिच्या दुर्भाग्याचे तुमच्या दुर्भाग्याशी फार साम्य आहे. पण ते जाऊ द्या. तुम्ही आपली गोष्ट पुढे सांगावी, अशी माझी विनंती आहे. ती सांगून झाल्यावर, मी तुम्हाला तशाच काही गोष्टी सांगून कदाचित

चकित करीन. " तेव्हा कार्डेनियोची मुद्रा आणि त्याचा भिकार वेष न्याहाळण्यासाठी डोरोथी काही काळ थांबली. आणि म्हणाली, "माझ्यासंबंधी तुम्हाला काही माहिती असेल तर तुम्ही आताच सांगावी अशी माझी तीव्र इच्छा आहे. आतापेक्षा मला अधिक दुःखी कोणीही करू शकणार नाही. माझ्यावर जी जी संकटे कोसळतील, ती निमूटपणे सहन करण्याचे धैर्य, हेच माझ्या सुखाचे एकमेव साधन उरलेले आहे. " कार्डेनियोने उत्तर दिले, "खरे आहे बाईसाहेब, माझ्या कल्पना सत्य आहेत अशी मला खात्री पटेल, तेव्हा मी आपल्याला सारे काही सांगेन. पण आतापर्यंत मी जे काही ऐकले आहे, त्यावरून मला असे वाटते की, तुम्हाला ते इतक्यात सांगणे योग्य होणार नाही. त्यासाठी मी योग्य वेळ शोधून काढीन. " नंतर डोरोथीने आपले भाषण पुढे चालू केले व म्हटले, "डॉन फर्डिनांड याने आपल्या लग्नाच्या शपथा अत्यंत गंभीरपणे पुनःपुनः घेतल्या आणि आपला हात माझ्या हातात दिला. अत्यंत दृढ शब्दांनी आणि पवित्र शपथांनी त्याने आपला विश्वास माझ्यावर दाखविला. पण अशा प्रकारे त्याने माझ्याशी वचनबद्ध होण्यापूर्वी, आपल्या बुद्धीवर आपल्या अनावर भावनेने कसे आक्रमण केले आहे हे लक्षात घेण्यास मी त्याला सांगितले. त्यामुळे त्याचे भावी सौख्य धोक्यात कसे येईल हेही मी त्याला सांगितले. मी म्हटले, "महाराज, सौंदर्याच्या काही थोड्या काल्पनिक नि क्षणभंगुर लक्षणांमुळे, तुम्ही आपल्या आयुष्याचा नाश घाईघाईने करून घेऊ नका. आपण प्रेमाचे जे प्रदर्शन केले आहे, ते त्या सौंदर्यामुळे क्षम्य ठरणार नाही. आपल्यापेक्षा खालच्या कुळात जन्मलेल्या स्त्रीशी विवाह करून आपण आपल्या थोर पित्याला लज्जित नि नाराज करू नका. ज्याचा तुम्हाला पश्चात्ताप करावा लागेल आणि ज्यामुळे माझे जीवन दुःखाचे होईल, असे कृत्य करण्याचा वेडेपणा करू नका. " उतावळेपणाने लग्न करण्यापासून त्याला परावृत्त करण्यासाठी मी दुसरीही पुष्कळ कारणे सांगितली. पण त्यांपैकी कशाकडेही त्याने लक्ष दिले नाही.

"डॉन फर्डिनांड आपल्या इच्छेशिवाय दुसऱ्या कोणाचेही ऐकावयास तयार नव्हता. आपल्या वासनेपायी सर्वस्वाची होळी करणाऱ्या अविचारी प्रेमिकाप्रमाणे किंवा वचनभंगाला काहीही किंमत न देणाऱ्या लबाड माणसाप्रमाणे, तो स्वतःच्याच विचारात गर्क झालेला होता. तो इतका हट्टास पेटलेला असतांना मी काय करावयास पाहिजे, याचा विचार मी करावयास लागले. मी मनाशी म्हटले, विवाहामुळे अनपेक्षित मोठेपणा मिळविणारी आणि आपल्या कुळाची नि गुणांची उणीव केवळ सौंदर्याने भरून काढणारी मीच काही पहिली स्त्री नव्हे. डॉन फर्डिनांड याच्याशिवाय हजारो लोकांनी केवळ प्रेमासाठी विवाह केलेले आहेत—आणि तसे करताना संपत्ती किंवा कुलीनता यांच्या विषमतेकडे मुळीच लक्ष दिलेले नाही. ही संधी नामी आहे—मोहक आहे. दैव काही सदैव आपल्याला अनुकूल असत नाही. म्हणून ते जेव्हा अनुकूल असेल, तेव्हा ते वाया घालविणे हा शहाणपणा नव्हे असे मला वाटले. मी मनाशी म्हटले, अभंग प्रीतीचे आश्वासन देणारा पती सुदैवाने मला मिळत असताना मी त्याला अविचाराने नकार का द्यावा

आणि अशा मित्राचे शत्रुत्व का पत्करावे ? आणखी एक गोष्ट माझ्या मनात आली. मी जर त्याला अकाली नकार दिला तर त्याला निराशेत लोटल्यासारखे होईल—आणि तसे होणे धोक्याचे आहे असे भय मला वाटले. मी एकटी त्याच्या तावडीत सापडले असताना मी सुरक्षित आहे असे मला वाटेना. बळजोरीने आपली वासना तृप्त करून घेण्याचा निश्चय तो करील आणि तसे केल्यावर तो कोणतेही वचन पाळणार नाही. मग मला अपमानाचे जिणे घालवावे लागेल. कारण माझ्या संमतीशिवाय हा सरदार माझ्या खोलीत आला, यावर माझ्या वडिलांचा किंवा छिद्रान्वेषी जगाचा विश्वास कधीच बसणार नाही. ही सारी कारणे माझ्या मनात क्षणार्धात आपोआप उत्पन्न झाली आणि त्यामुळे माझा पूर्वीचा निश्चय ढासळला. डॉन फर्डिनांड याचे सुस्कारे, त्याचे अश्रू, त्याच्या शपथा, त्या शपथा घेताना त्याने उच्चारलेले पवित्र साक्षीदार, आणि त्याबरोबरच त्याची डौलदार चाल, त्याची अलौकिक गुणवत्ता आणि त्याच्या सर्व कृतींमधून ( माझ्या कल्पनेप्रमाणे ) प्रगट होणारे त्याचे प्रेम—या सर्वांमुळे माझा पुरापुरा नाश झाला. माझ्याइतकी स्वतंत्र व सुरक्षित असणाऱ्या कोणत्याही मुलीच्या अंतःकरणावर त्याच्या गुणांचा असाच पगडा बसला असता असे मला वाटते.

" डॉन फर्डिनांड याच्या शपथांना आणि पवित्र करारांना साक्षी म्हणून राहण्यास मी माझ्या दासीला बोलाविले. त्याने पूर्वीच्या आणाभाका वारंवार घेतल्या आणि नव्या शपथा घेऊन नि नवी वचने देऊन त्या दृढ केल्या. तो उच्च स्वराने म्हणाला, ' हे प्रभो, हे साधुसंतांनो ! माझ्या प्रामाणिकपणाला तुम्ही साक्षी आहा. मी जर कधीकाळी माझा शब्द मोडला तर माझ्या माथ्यावर आपले हजारो शिव्याशाप आदळोत ! ' पुन्हा तो सुस्कारे सोडू लागला—पुन्हा तो रडू लागला—आणि प्रेमाच्या नवनव्या लक्षणांनी त्याने माझे हृदय हलवून सोडले. ती बेइमान दासी खोलीतून बाहेर गेली आणि त्या दगलबाज सरदाराने, मी दुबळी आहे असे पाहून, आपला दुष्ट हेतू साध्य करून घेतला. त्या दुःखदायक रात्रीनंतर दुसरा दिवस उजाडण्यापूर्वीच डॉन फर्डिनाड याने मला सोडून जाण्याची शक्य तितकी घाई केली, तेथून जाण्यास तो उतावीळ झाला होता. पाशवी भूक तृप्त झाल्यानंतर ती तृप्त करणाऱ्या साधनापासून दूर होण्यात फार मोठा आनंद असतो. पूर्वीइतके प्रेमाचे प्रदर्शन न करता आणि पूर्वीइतक्या प्रेमाचे शब्द न बोलता, त्याने मला सांगितले, " माझ्या दानतीवर आणि माझ्या शपथावचनांच्या प्रामाणिकपणावर तू विश्वास ठेव. " त्याने आपल्या बोटातून बहुमोल अंगठी काढली आणि ती माझ्या बोटात घातली. एकूण काय, तो तिथून निघून गेला. माझ्या दासीने त्याला गुप्तपणे जसे आत घेतले होते, तसेच सूर्योदयापूर्वी त्याला तेथून बाहेर रस्त्यावर जाऊ दिले होते. तिनेच ह्याची कबुली पुढे मला दिली. या सर्व घटनांचा विचार करीत मी विलक्षण अस्वस्थ झाले होते. तेव्हा मी सुखी होते का दुःखी होते, हे मी बरोबर सांगू शकत नाही. माझे मन अगदी बेभान झाले होते. माझ्या दासीने माझे कल्याण केले की अकल्याण केले हे मला समजत नव्हते. तिला तिच्या विश्वासघाताबद्दल रागे

भरण्याचे धैर्य मला झाले नाही – किंवा तसे करण्यास मी विसरले म्हणा ना.

"डॉन फर्डिनांड तेथून जाण्यापूर्वी त्याला मी म्हटले होते, "आता मी तुझीच आहे. म्हणून मला भेटण्यासाठी पूर्वीच्याच मार्गाने तू ये. आपली पत्नी म्हणून जाहीरपणे माझा स्वीकार करीपर्यंत आणि तो मान मला देईपर्यंत अशाच पद्धतीने मला भेटत जा." पण तो फक्त दुसऱ्या रात्री मला भेटला.तेव्हापासून त्याची माझी भेट कधीच झाली नाही. प्रार्थना-मंदिरात नाही किंवा रस्त्यावर नाही. तब्बल एक महिना त्याचा शोध करण्याचा प्रयत्न करून मी कंटाळले. पण मला अशी खात्रीलायक बातमी मिळाली की, तो अजून आमच्याजवळच आहे आणि जवळजवळ दररोज तो शिकारीस जातो. तो माझी उपेक्षा करीत आहे आणि विश्वासघातही करीत आहे, अशा संशयात मी तो कंटाळवाणा काळ किती अस्वस्थतेमध्ये घालविला असेल याची कल्पना तुम्हीच करा. माझ्यावर कोसळणाऱ्या संकटांमध्ये त्याचे पलायन हे अत्यंत भयानक संकट होते. त्याच्या या अनपेक्षित पलायनामुळे मी अगदी गुदमरून गेले. नंतर मला आढळून आले की, माझ्या दासीने मला फसविले आहे. तोपर्यंत मी तिच्याविषयीचा संशय माझ्या मनात दाबून ठेवला होता. पण आता त्याबद्दल मी जोराने तक्रार करू लागले. डॉन फर्डिनांड याला मी दोष देऊ लागले. माझे दुःख हलके करण्यापेक्षा मी सुस्कारे सोडू लागले आणि आसवे गाळू लागले. त्याहीपेक्षा वाईट म्हणजे मी माझ्या मुद्रेवर पहारा ठेवू लागले. कारण मला असे भय वाटले की, माझ्या मुद्रेवरून माझे आईबाप माझ्या असंतोषाच्या कारणाची चौकशी करतील आणि मग मला माझे लाजिरवाणे संकट लपविण्यासाठी लज्जास्पद असे असत्य बोलावे लागेल आणि टाळाटाळ करण्याचा गुन्हाही करावा लागेल. पण शेवटी मला असे दिसून आले की, लपवाछपवी करणे व्यर्थ आहे. म्हणून मी माझ्या संतापाला वाट करून दिली. मी माझे मन अधिक काळ आवरू शकले नाही. कारण मला कळले की, डॉन फर्डिनांड याने जवळच्याच शहरातील एका तरुणीशी लग्न केले आहे आणि ती तरुणी श्रीमंत नि उच्च कुळातील आहे, शिवाय ती अत्यंत रूपवती आहे. तिचे नाव लुसिंडा असल्याचे कळले."

लुसिंडाचे नाव ऐकताच कार्डेनियोच्या मनाला पूर्वीप्रमाणे अस्वस्थता आली. पण सुदैवाने पूर्वीप्रमाणे ती तीव्र स्वरूपाची नव्हती. त्याने फक्त आपले खांदे उडविले, आपले ओठ चावले, आपल्या भुवया आकुंचित केल्या आणि थोड्या वेळाने आपल्या डोळ्यांतून अश्रूंचा प्रवाह वाहू दिला. पण त्यामुळे डोरोथीच्या निवेदनास काही अडथळा आला नाही ती पुढे सांगू लागली, "त्याच्या विवाहाच्या या वार्तेमुळे दुःखाने आणि आश्चर्याने माझे रक्त गोठून जाण्याऐवजी माझे चित्त ज्वलंत संतापाने पेटले. निराशेने माझ्या अंतःकरणाचा ताबा घेतला. त्वेषाच्या भरात मला अशी ऊर्मी आली की, रस्त्यावरून आरडत–ओरडत पळत सुटावे आणि स्वतःच्या लौकिकाचा बळी देऊनही डॉन फर्डिनांडच्या दगलबाजीचा बभ्रा करावा. माझ्या अंगी जो काही थोडाफार विवेक उरला होता, त्यामुळे माझी ही तीव्र भावना लौकरच शमली. एक नवी योजना माझ्या

डोक्यात खेळू लागली आणि त्यासरशी मला पुष्कळच स्वस्थता वाटू लागली. माझ्या वडिलांची नोकरी करणाऱ्या एका तरुण खेडवळ माणसाला मी माझ्या दुःखाचे कारण सांगितले आणि पुरुषाचा पोषाख मला उसना देण्याची विनंती केली. डॉन फर्डिनांड जेथे आहे, असे मी ऐकले होते, त्या शहरात माझ्याबरोबर येण्यास मी त्या नोकराला सांगितले. असे विक्षिप्त कृत्य करण्यापासून मला परावृत्त करण्यासाठी त्या माणसाने चांगले युक्तिवाद केले. पण माझा निश्चय अढळ आहे असे पाहून, माझी सेवा करण्यास आपण तयार असल्याचे अभिवचन त्याने मला दिले. नंतर तुम्ही पाहता, हा पोषाख मी अंगावर चढविला. माझेही काही कपडे मी घेतले. थोडे सोने आणि थोडी रत्ने हीही मी घेतली. कोणी सांगावे, कोणाची केव्हा गरज लागेल. अशा तयारीने त्याच रात्री मी घरून निघाले. बरोबर होता तो नोकर आणि माझे अनेक दुःखद विचार ! माझ्या या योजनेचा पत्ता मी माझ्या दासीला लागू दिला नाही. तुम्हाला खरे सांगायचे तर मी बाहेर कशासाठी पडले, हे मलाही नीट माहीत नव्हते. डॉन फर्डिनांड याचा दुसऱ्या मुलीशी प्रत्यक्ष विवाह झालेला होता आणि आता त्यावर काही उपाय नव्हता. अशा स्थितीत त्याला भेटून मी काय मिळविणार होते ? त्याच्या दगलबाजीबद्दल त्याची कानउघाडणी केल्याचे भिकार समाधान तेवढे मला मिळेल. अडीच दिवसांत आम्ही त्या शहरात जाऊन पोहोचलो. जाताच मी पहिली गोष्ट केली, ती ही की, लुसिंडाचा बाप कोठे राहतो याची चौकशी. त्या एका प्रश्नाने माझ्या इच्छेपेक्षा मला पुष्कळच अधिक ऐकावयास मिळाले. पहिल्या प्रथम ज्या माणसाला मी विचारले, त्याने तिचे घर दाखविले आणि लुसिंडाच्या लग्नात जे जे घडले ते ते सर्व सांगितले. ते इतके जाहीर होते की, साऱ्या शहरातील गप्पांचा तो विषय झाला होता. त्याने मला सांगितले, "पाद्र्याच्या प्रश्नाला, आपण डॉन फर्डिनांड याची पत्नी होण्यास राजी आहो, असे उत्तर देताच लुसिंडा मूर्च्छित पडली. तिला श्वासोच्छ्वास करण्यास मोकळी हवा मिळावी म्हणून मी तिचे कपडे सैल करण्याकरता तिच्याजवळ गेलो. तेव्हा तिच्या हातात एक पत्र असलेले मला आढळले. त्यात तिने लिहिले होते की, 'मी डॉन फर्डिनांडची पत्नी होऊ शकत नाही. कारण याच शहरातील एका प्रतिष्ठित तरुणाशी माझे लग्न पूर्वीच ठरलेले आहे. त्याचे नाव कार्डेनियो असे आहे. या विवाहाला मी संमती दिली, ती केवळ माझ्या पित्याची आज्ञा मानण्यासाठी.' त्या पत्रावरून व तिच्याजवळ सापडलेल्या कट्यारीवरून असे दिसले की, लग्न-समारंभ संपल्यावर स्वतःला ठार मारण्याचा तिचा हेतू होता. आपली अशी फसवणूक झाल्याचे पाहून डॉन फर्डिनांड क्रुद्ध झाले. त्यांनी स्वतःच तिला त्याच कट्यारीने ठार केले असते, पण तेथे हजर असलेल्या माणसांनी त्यांना थांबविले. हा प्रकार झाल्यानंतर डॉन फर्डिनांड त्या शहरातून ताबडतोब निघून गेले असे म्हणतात. लुसिंडा दुसऱ्या दिवसापर्यंत शुद्धीवर आली नव्हती. शुद्धीवर आल्यावर तिने आपल्या आईबापांना सांगितले, 'मी खरोखर कार्डेनियोची बायको आहे आणि मी डॉन फर्डिनांड यांना पहाण्यापूर्वीच आम्हा उभयतांचे लग्न ठरलेले होते.'

" हा कार्डेनियो लग्नाचेवेळी हजर होता असेही मी ऐकले आहे. तिचे लग्न दुसऱ्याशी होईल या गोष्टीवर त्याचा विश्वास कधीच बसला नसता. पण ते लग्न झाल्याचे तो प्रत्यक्ष पहात होता. म्हणून त्याने निराशेने ते गाव सोडले. सोडताना त्याने एक पत्र मागे ठेवले होते. त्यात त्याने लुसिंडाच्या विश्वासघाताबद्दल खूप तक्रारी केलेल्या होत्या आणि आपल्या मित्रांना कळविले होते की, माझ्याविषयी तुम्हाला यापुढे काहीही ऐकावयास येणार नाही, अशा ठिकाणी जाण्याचा मी निश्चय केला आहे. मी त्या शहरात गेले तेव्हा हाच विषय चर्चिला जात होता. थोड्याच काळाने आमच्या कानी पडले की, लुसिंडाही बेपत्ता आहे. तिचे काय झाले असेल, हे न कळल्याने तिच्या आईबापांना इतके दुःख झाले की, त्यामुळे त्यांना वेड लागण्याची पाळी आली. पण या बातमीने माझ्या आशा पुनः फुलल्या. डॉन फर्डिनांड अविवाहित असेल असे मानण्यास मला जागा मिळाली. परमेश्वराने त्याचे हे दुसरे लग्न मोडून, पहिले लग्न मोडल्याची जाणीव त्याला कदाचित् करून दिली असेल अन् त्याच्या मनाला टोचणी लागली असेल, अशा आशेमुळे मी खुषीत होते. खऱ्या ख्रिश्चनाचे आणि सन्मान्य मानवाचे कर्तव्य तो करील अशी मला आशा वाटू लागली. माझ्या नशिबात, दीर्घकाळा-नंतर का होईना, काही फरक पडेल अशा काल्पनिक आशेमुळे मी माझी चिंता दूर सारण्याचा प्रयत्न केला. दुःखाच्या भाराने मी खचून न जाता, माझे आयुष्य सुखात वाढेल, अशा पोकळ आशांच्या वावड्या मी आनंदाने उडवीत होते. पण त्यामुळे माझे दुःखच दीर्घकाळ मला भोगावे लागले असते. जगण्याच्या त्रासापासून मुक्त होण्याचीच मला अधिक इच्छा होती. डॉन फर्डिनांडचा पत्ता मला लागत नव्हता आणि आपण काय करावे हे मला कळत नव्हते. तरी मी त्या शहरात राहिले. तेव्हा एक दवंडीवाला जाहीरपणे उघड्या रस्त्यावर माझी शरीरयष्टी, माझा वेष आणि माझे वयोमान घोषित करीत असल्याचे मी ऐकले, 'डोरोथीची बातमी जो कोणी आणून देईल त्याला चांगले बक्षिस मिळेल,' असेही त्याने जाहीर केले. माझ्या सेवेत असलेल्या नोकराबरोबर मी माझ्या बापाच्या घरातून पळून गेल्याची अफवा उठली असल्याचेही माझ्या कानी आले. त्या अफवेमुळे, डॉन फर्डिनांडच्या दगलबाजीइतकेच, माझ्या अंतःकरणाला दुःख झाले. कारण त्या अफवेमुळे माझी सारी अब्रू खलास झाली असे मला वाटले—आणि तीही इतक्या नीच नि अप्रशस्त कारणामुळे! तेव्हा मी माझ्या नोकराबरोबर त्या शहरातून त्वरेने बाहेर पडण्याचा प्रयत्न केला. त्याने माझ्याशी ज्या निष्ठेने वागण्याचे वचन दिले होते, तिचा द्रोह केल्याचीही काही लक्षणे मला त्याचे ठिकाणी आढळली. आपण उघडकीस येऊ नये म्हणून आम्ही दोघे त्याच रात्री या डोंगराच्या अत्यंत ओसाड भागात येऊन पोचलो. पण 'संकटे कधी एकटी येत नसतात आणि एक संकट संपले की त्याहून मोठे असे दुसरे संकट बहुधा आपल्यापुढे उभे ठाकते' या म्हणीप्रमाणे मी त्या जागी पोचले आणि आपण सुरक्षित आहो असे मानले.

" त्याच क्षणी, पूर्वी नम्र नि आदबशीर असणाऱ्या त्या नोकराने माझ्यापाशी

प्रेमाची भाषा काढण्याचे औद्धत्य दाखविले. याला कारण माझ्या सौंदर्यापेक्षा त्याचा दुष्टपणाच अधिक होता आणि त्या स्थानाने त्याला तशी संधी मिळाली होती. मी त्याला संतापाने नि धिक्काराने उत्तर दिले, तेव्हां प्रेमिकाप्रमाणे प्रणयाराधन करण्यात वेळ न घालविता, आपला दुष्ट हेतु सिद्धीस नेण्यासाठी अत्याचार करण्याचा निर्धार त्याने केला. पण परमेश्वर न्यायी आहे आणि न्याय्य योजनांना हातभार लावण्यास तो क्वचितच चुकतो— किंबहुना कधीच चुकत नाही. त्याने मला हात दिला. पाशवी वासनेमुळे तो नोकर इतका आंधळा बनलेला होता की, आपण एका उंच कड्यावर उभे आहो, हे त्याच्या लक्षात आले नाही. मी त्याला सहज खाली ढकलले. नंतर त्याचे काय झाले हे पहाण्यास मी थांबले नाही, मी थकलेले होते आणि आश्चर्यात बुडालेले होते. तेव्हा माझ्या अंगी चपळता किती असणार ? पण नाही ! मोठ्या चापल्याने, मी स्वतःचे संरक्षण व्हावे म्हणून, या जंगलातील अत्यंत घनदाट भागात धावत सुटले. दुसरे दिवशी मला एक खेडवळ माणूस भेटला. त्याने मला या डोंगरात असलेल्या आपल्या घरी नेले आणि तेव्हापासून मला गुरे राखण्याचे काम दिले. माझे स्त्रीत्व लपविण्यासाठी मी शक्य तितका वेळ रानात काढीत असे. काही महिने असे मी काढले. मी कितीही काळजी घेतली आणि खटपट केली तरी शेवटी त्याने, मी स्त्री असल्याचे, ओळखलेच. त्यानेही आपली पाशवी वासना माझ्यापाशी व्यक्त केली. त्यांतून मुक्त होण्याची संधी मला दैवाने पूर्वीप्रमाणे दिली नाही. तेव्हा मी त्याचे घर सोडले आणि या रानावनात आसरा घेतला. येथे आसवे गाळीत आणि सुस्कारे सोडीत मी ईश्वराची प्रार्थना करू लागले, “ हे प्रभो, माझ्यावर दया कर ! मी काय करू हे मला सांग. या एकाकी अवस्थेतून मला मोकळे कर, नाही तर निदान माझे हे खडतर जीवन समाप्त कर आणि या अभागी जीवाची स्मृती या अरण्यात पुरून टाक. रिकामटेकड्या जगाला माझ्या लौकिकाचा खेळखंडोबा करण्याचा उद्योग मिळाला, याचे कारण माझी बुद्धी वाईट होती असे नव्हे, तर माझे नशीबच वाईट होते. ”



## प्रकरण २

# सुंदर डोरोथीच्या शहाणपणाची हकीकत आणि इतरही काही सुखद गोष्टी

डोरोथी पुढे सांगू लागली, " सद्गृहस्थ हो, माझ्या दुःखमय साहसी जीवनाचा हा खरा इतिहास आहे. मी जी कुरकूर करीत होते आणि जी तुम्ही मला न कळत ऐकली, ती सकारण आहे की नाही याचा निर्णय आता तुम्हीच द्या. माझ्यासारख्या अभागी आणि निराश जीवाला सौख्य मिळण्यासारखी परिस्थिती आहे काय, याचाही विचार तुम्हीच करा. मी तुमच्याकडून फक्त एकच कृपा-प्रसाद मागते. माझ्या आई-बापांच्या चौकशीला आणि शोधाला दाद न देणारे एखादे ठिकाण मला दाखवा, म्हणजे तेथे मी माझे उरलेले आयुष्य घालवीन. माझ्या पूर्वीच्या वर्तनाचा विचार करून ते मला घरी येऊ देतील, असे मला वाटले तर मी घरी परत जाईन आणि तेव्हां ते माझे प्रेमाने स्वागत करतील. त्यांचे माझ्यावरील पूर्वीचे प्रेम याची पुरी ग्वाही देईल. पण ते मला अपराधी समजत असतील आणि माझे निरपराधित्व सिद्ध करण्यास केवळ शब्दा-शिवाय दुसरे काही माझ्याजवळ नाही, हे लक्षात घेऊन मी त्यांच्या दृष्टीपुढे उभे रहाण्याचे धारिष्ट कधीच करणार नाही. " येथे डोरोथी थांबली. तेव्हा तिच्या गालावर लज्जेची लाली पसरली. तिच्या विचाराची' आणि तिच्या अकृत्रिम नम्रतेची ती निशाणी होती. ज्यांनी तिची कहाणी ऐकली होती, त्यांचे हृदय तिच्या कठोर दैवामुळे करुणेने हालले होते. तिला काही समाधान आणि उपदेश देण्यासाठी आता पाद्रीबुवा अधिक काळ थांबू इच्छित नव्हते. त्यांनी बोलण्यास सुरवात केली; तोंच कार्डेनियोने त्यांना अडविले आणि डोरोथीला उद्देशून आणि तिचा हात आपल्या हातात घेऊन तो म्हणाला, " याचा अर्थ, श्रीमंत क्लिओनार्डोची एकुलती एक कन्या, सौंदर्य-संपन्न डोरोथी तुम्हीच आहा ना ? " आपल्या बापाचे नाव ऐकून डोरोथीला विलक्षण आश्चर्य वाटले आणि ते नाव फाटक्या कपड्यातील एका माणसाने उच्चारलेले ऐकून तर तिचे आश्चर्य दुणावले. ती त्याला म्हणाली,

" मित्रा, तू कोण आहेस, ते मला कृपया सांग. माझ्या वडिलांचे नाव तुला इतके चांगले कसे माहीत आहे ? माझ्या साऱ्या निवेदनात मी त्या नावाचा उल्लेख एकदाही केला नव्हता असे मला वाटते. " कार्डेनियोने उत्तर दिले, " मी कार्डेनियो. तुम्ही सांगितल्याप्रमाणे, लुसिंडाने ज्याला आपला पती म्हणून जाहीर केले, तोच हा

अभागी जीव. तुम्हाला या शोचनीय अवस्थेस ज्याने पोचविले आहे, त्याच्याच दुष्ट-पणामुळे या अभागी कार्डेनियोला या दुर्दशेत लोटले आहे आणि फाटके कपडे घालण्याच्या, नागवेपणाच्या आणि निराशेच्या—फार काय वेडेपणाच्या—अवस्थेस पोचविले आहे. सर्व तऱ्हेचे कष्ट आणि मानवी सौख्याचा अभाव यांचा अनुभव सध्या मी घेत आहे. मधून मधून माझी बुद्धी जागी होते, ती केवळ माझ्या दुःखाची जाणीव अधिकच करून देण्यासाठी आणि त्याकरिता शोक करण्यासाठी. हे सुंदर डोरोथी, डॉन फर्डिनांडच्या अन्याय्य विवाह-समारंभाचा अभागी साक्षीदार तो मीच. त्याची पत्नी होण्यास लुसिंडाने दिलेली संमती ऐकणारा तो मीच. इतकी पराकोटीची निराशा सहन करणे ज्याला अशक्य झाले आणि म्हणून दुःखाने नि आश्चर्याने जो घराबाहेर झटकला तो हृदयशून्य प्राणी म्हणजे मीच. बेशुद्धीनंतर तिचे काय होईल आणि तिच्या वक्षस्थळावरून काढून घेतलेल्या पत्रात काय असेल, हे जाणण्यासाठी न थांबणारा माणूस तो मीच. मी निराशेत बुडून गेलो होतो. लुसिंडाच्या हातात देण्यासाठी मी एक पत्र एका माणसाजवळ दिले आणि जगापासून दूर जाण्यासाठी या अरण्यात त्वरेने आलो. त्या क्षणापासून मी माझ्या जीविताला महान शत्रू समजत आलो आणि त्याचा तिटकारा करू लागलो, एवढेच नव्हे तर, येथे त्याचा अंत करण्याचाही निश्चय मी केला. पण दुसऱ्या एखाद्या चांगल्या कार्यासाठी मी माझे जीवित कारणी लावावे म्हणून नशिबाने मला येथे जिवंत ठेवले असावे. आतापर्यंत तुम्ही जे काही सांगितले, त्याविषयी संशय घेण्यास मला काही कारण नाही. तरीसुद्धा मी अशी आशा करण्यास धजतो की, आतापर्यंत आपण ज्याची अपेक्षा केली असेल, त्यापेक्षाही अधिक चांगले जीवन परमेश्वराने आपल्यासाठी योजलेले असेल. तो डॉन फर्डिनांडला तुमच्या हवाली करील—कारण तो लुसिंडाचा होऊ शकत नाही—आणि तो लुसिंडाला माझ्या हवाली करील—कारण ती डॉन फर्डिनांडची होऊ शकत नाही. माझ्यापुरते सांगावयाचे तर, माझे नि आपले हितसंबंध पूर्वी एकत्र गुंतलेले नव्हते—पण आता आहेत. तरी तुमच्या दुर्दैवाची मला पुरेपूर जाणीव आहे. डॉन फर्डिनांड याने तुमच्याशी न्यायाने वागावे म्हणून मी कोणताही धोका पत्करण्यास तयार आहे. तो न्यायाने वागेपर्यंत मी तुम्हाला सोडणार नाही असे शपथपूर्वक वचन, एक सभ्य माणूस आणि एक ख्रिश्चन माणूस म्हणून, मी तुम्हाला देतो. मी जे जे युक्तिवाद करीन आणि जे जे औदार्य दाखवीन, ते सारे फोल ठरले, तर मी माझा जीव धोक्यात घालून त्याला न्यायाची गोष्ट करण्यास भाग पाडीन आणि धन्य होईन.''

हे ऐकून डोरोथी हर्षभरित झाली. कार्डेनियोच्या उपकाराबद्दल आपण कृतज्ञता कशी व्यक्त करावी, हे न कळल्यामुळे ती त्याच्या पायावर लोटांगण घालणार होती, पण त्याने तिला तसे करण्यास नम्रतेने प्रतिबंध केला. त्याच वेळी पाद्री त्या दोघांच्या बाजूने धोरणीपणाने बोलू लागला. त्याने कार्डेनियोच्या उदार निश्चयाबद्दल त्याची मुक्त-कंठाने प्रशंसा केली आणि डोरोथीचे सांत्वन केले. त्याने त्या दोघांना आपल्या घरी येण्याचे अंतःकरणपूर्वक निमंत्रण दिले व म्हटले "तेथे तुम्हाला अवश्य त्या गोष्टी

घेता येतील आणि डॉन फर्डिनांड याचा शोध कसा लावावा, याचा विचार एकत्रपणे करता येईल नि डोरोथीला आपल्या वडिलांच्या घरी पोचविता येईल." त्याची ही प्रेमळ सूचना त्या दोघांनी साभार स्वीकारली. आतापर्यंत गप्प बसलेल्या न्हाव्याने आता संभाषणात भाग घेतला आणि त्यांना खात्रीपूर्वक आश्वासन दिले, माझ्या कुवती-प्रमाणे आपली सर्व सेवा करण्यास मी सिद्ध आहे. या शिष्टाचाराच्या गोष्टी झाल्यानंतर, त्याने त्या दोघांना, त्या ठिकाणी आपण व पाद्री कोणत्या योजनेने आलो आहो, याची कल्पना दिली. डॉन क्विक्झोट यांच्या विचित्र वेडेपणाची माहिती त्याने त्यांना सांगितली. त्यांचा शागीर्द येईपर्यंत तेथेच थांबण्याचा आपला इरादाही त्याने त्यांना सांगितला. डॉन क्विक्झोट यांचा उल्लेख ऐकून कार्डेनियोला त्यांच्याशी झालेला आपला सामना थोडाफार आठवला. जणू काही स्वप्नात ती गोष्ट घडून गेली असे त्याला वाटले. त्या सामन्याची हकीगत त्याने त्या मंडळींना सांगितली, पण त्याचे कारण सांगितले नाही.

इतक्यात आपल्याला कोणी तरी हाक मारीत आहे असे त्यांना ऐकू आले. आवाजावरून त्यांनी ओळखले की सँको पँझा आला असावा. त्याने त्या लोकांना जेथे सोडले होते, तेथे ते त्याला आढळले नाहीत म्हणून तो आपली अगदी फुप्फुसे फाडून आरोळी ठोकीत होता. ती ऐकून ते सर्वजण त्याला भेटण्यासाठी गेले. भेट झाल्यावर त्यांनी त्याला विचारले, "डॉन क्विक्झोटचे काय झाले ?" सँकोने उत्तर दिले, "हाय ! मी त्यांना पलीकडे सोडले तेव्हा त्यांची दुर्दशा झालेली होती. त्यावेळी त्यांनी अंगात सदरा घातलेला होता. ते कृश, फिक्कट आणि जवळजवळ उपाशी दिसत होते. लेडी डल्सीनियासाठी ते सुस्कारे सोडीत होते आणि आक्रोश करीत होते. मी त्यांना सांगितले, 'तुम्ही आताच टोबोसोला गेला तर ती तुमचे स्वागत करील. ती तुमची वाट पाहात असेल.' पण हे सारे ऐकूनही ते एक हातभरही हालले नाहीत. उलट त्यांनी मला सांगितले, 'तिच्या भलेपणाला पात्र होण्यासारखे काही पराक्रम मी करी-पर्यंत तिच्या मुखचन्द्राचे दर्शन मी कधीही घेणार नाही, असा माझा निश्चय आहे.' अशाच तऱ्हेने माझा धनी काळ कंठीत राहिला तर तो कधीच बादशहा होणार नाही. धर्मगुरू होण्यापेक्षा बादशहा होण्याचे वचन त्यांनी मला दिले आहे. म्हणून महाराज, आपण त्यांना भेटा आणि कसेही करून येथून घेऊन जा, अशी माझी आपणास विनंती आहे."

पाद्री सँकोला म्हणाला, "अरे, अंगी उत्साह बाळग. त्यांची इच्छा असो वा नसो, त्यांना येथून नेण्याची व्यवस्था आम्ही करू." नंतर कार्डेनियो व डोरोथी यांच्याकडे वळून पाद्र्याने डॉन क्विक्झोट यांना सुधारण्यासाठी आपण व न्हाव्याने केलेला बेत त्यांना सांगितला. निदान त्यांना त्यांच्या घरी पोचविण्याची योजना आपण दोघांनी काय केली आहे, हेही त्याने सांगितले. आपले नशीब आता उजळणार या कल्पनेने डोरोथीचे मन पुष्कळच शांत झाले होते. संकटग्रस्त स्त्रीचे सोंग स्वतः घेण्याचे तिने दयाळूपणाने मान्य केले, आणि म्हटले, "त्यासाठी मला लागणारा पोशाख योग्य

असाच आहे. न्हाव्याने ते सोंग करण्यापेक्षा मी ते करणे चांगले शोभून दिसेल. शिवाय, शिलेदारीवरील पुष्कळ ग्रंथ मी वाचलेले आहेत आणि त्यामुळे एखाद्या शिलेदाराचे सहाय्य मिळविण्यासाठी संकटग्रस्त स्त्रिया कसे बोलतात हेही मला मला माहीत आहे."

ते ऐकून पाद्री म्हणाला, "फार उपकार झाले, बाईसाहेब! याहून दुसरे काहीच आम्हाला नको. आता आपण शक्य तितक्या जलदीने कामास लागू. आमची योजना तडीस नेण्याचे काम आपण इतके सुकर केले असल्यामुळे ते यशस्वी होईल, अशी आम्हाला आता आशा वाटते." लगेच डोरोथीने आपल्या गाठोड्यातील अत्यंत उंची कापडाचा एक पोलका आणि हिरव्यागार रेशमाचा एक सुंदर झगा बाहेर काढला. त्याबरोबरच एका पेटीतून तिने एक मोत्यांची माळ व दुसरी पुष्कळ रत्ने काढली. हे सारे अलंकार तिने आपल्या अंगावर क्षणार्धात चढविले. त्यामुळे ती इतकी सुंदर व तेजस्वी दिसू लागली की, अशा सौंदर्यसंपन्न स्त्रीचा अवमान करण्याचा डॉन फर्डिनांड याने अन्याय का करावा, याचे त्या सर्वांना आश्चर्य वाटले. तिचे सर्वांत अधिक कौतुक केले, सँको पँझा याने. असा देखणा जीव आपल्या डोळ्यांना पूर्वी कधी दिसलाच नाही, असे त्याला वाटले— आणि त्याचे ते वाटणे अगदी बरोबर होते. त्याने पाद्र्याला कळकळीने विचारले, "ही सुंदरी कोण? या रानावनात आणि दऱ्याखोऱ्यांत तिला कोणत्या संकटाच्या झंझावाताने इकडे आणले आहे?" पाद्री उत्तरला, "सँको, ही सुंदरी कोण म्हणून विचारतोस? अरे, ही तर मिकोमिकोनाच्या विशाल राज्याची एकमेव वारस आहे. तुझ्या धन्याच्या पराक्रमाची कीर्ती सर्व गिनीभर पसरलेली आहे आणि त्यामुळेच आकृष्ट होऊन ही सुंदरी तुझ्या धन्याला शोधण्यासाठी येथे आली आहे. एका दुष्ट राक्षसाने तिच्यावर जो अन्याय केला आहे, तो दूर करण्याचा वर ती त्यांच्याकडे नम्रपणाने मागणार आहे."

सँको म्हणाला, "वाः! हे तर उत्तमच आहे! तिचा शोधही चांगला आणि तिचा लाभही चांगला! तुम्ही ज्या राक्षसाचे वर्णन केले, त्या रांडलेकाला ठार मारून या बाईवरील अन्याय दूर करण्याचे भाग्य माझ्या धन्याला लाभले तर मी कृतार्थ होईन. तो त्याला खचित ठार मारील—मात्र तो त्याच्याकडे आला पाहिजे आणि पिशाच्च नसला पाहिजे. कारण पिशाच्चावर माझ्या मालकाची मात्रा काही चालत नाही. पण पाद्रीबुवा, मी आपल्याकडे एका कृपाप्रसादाची याचना करीत आहे. तुम्ही माझ्या धन्याला धर्मगुरू होण्याच्या महत्त्वाकांक्षेपासून दूर ठेवा. ते तसे होतील एवढेच भय मला आहे. ते माझे भय नष्ट करण्यासाठी, या राजकन्येशी विवाह जमवून आणण्याची कल्पना तुम्ही त्यांच्या डोक्यात घाला. मग ते बादशहा होतील आणि मी बडा असामी होईन, हे नक्की! मी या सर्व गोष्टींचा चांगला विचार केला आहे. त्यावरून मला असे वाटते की, माझा धनी धर्मगुरू होण्याने माझे काहीही भले व्हावयाचे नाही. त्यामुळे मला काय मिळणार? प्रार्थना—मंदिरातील कोणत्याही कामास मी योग्य नाही. मी विवाहित आहे. प्रार्थना—मंदिरात काम करण्यासाठी परवाना मिळविण्याची यातायात

करून मी माझे डोके का शिणवावे ? ते मोठ्या जिकीरीचे काम आहे. म्हणून याच राजकन्येचे पाणिग्रहण त्यांनी करणे चांगले. यांचे नाव मी सांगू शकत नाही. कारण मी ते कधीच ऐकले नाही." पाद्री म्हणाला, "लोक त्यांना प्रिन्सेस मिकोमिकोना म्हणतात. त्यांच्या राज्याचे नाव मिकोमिकॉन असल्याने त्यांना तसे नाव मिळणे सरळच आहे." सँको म्हणाला, "अगदी योग्य. जेथे जी माणसे जन्मली असतील त्या स्थानाच्या नावावरून पुष्कळांना तीच नावे पडलेली मी माझ्या आयुष्यात पाहिलेली आहेत उदाहरणार्थ, पेड्रो डी अल्काला, ज्यूएन डी उबेडा, डीगो डी व्हॅलाडोलिड. गिनीमध्येही असाच प्रघात असावा आणि राजकन्यांना त्यांच्या त्यांच्या राज्यावरून नावे मिळत असावीत."

पाद्री उत्तरला, "हा तुझा अभिप्राय समर्पक आहे. आता या दोघांच्या विवाहासाठी मी माझ्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीन." या अभिवचनाने सँकोला मनापासून आनंद वाटला. आपण बादशहा होणार, या आपल्या मालकाच्या मूर्ख कल्पनांचा संसर्ग त्याच्या या गरीब बिचाऱ्या सेवकाला इतक्या विलक्षणपणे व्हावा, याचे पाद्र्याला नवल वाटले. या वेळेपर्यंत डोरोथी पाद्र्याच्या खेचरावर आरूढ झाली होती. न्हाव्याने आपल्या बैलाच्या शेपटीपासून बनविलेली दाढी आपल्या हनुवटीला चिकटविलेली होती. आता सँकोने रस्ता दाखवावा, अशी आज्ञा करण्यापलीकडे काही करावयाचे राहिले नव्हते. त्याला पुनः एकवार साऱ्या योजनेच्या सूचना देणे, त्यांना अवश्य वाटत होते. त्या आपल्याला माहीत आहेत, असे तो दाखवील, पण तरीहि आपली सारी योजना ढासळून टाकील. असे झाले तर 'तुझ्या साऱ्या आशा धुळीस मिळतील आणि तुझ्या धन्याचे साम्राज्यही नष्ट होईल' असे त्यांनी त्याला सांगितले. त्या सर्वांबरोबर आपण जाणे योग्य आहे असे कार्डेनियोला वाटले नाही. कारण, त्याचे तेथे काहीच काम नव्हते. त्याचा डॉन क्विक्झोटशी नुकताच जो संघर्ष झाला होता, त्याचे स्मरण मात्र त्याला पाहून त्यांना व्हावयाचे. पाद्र्यालाही वाटले, आपण तेथे हजर असण्याची काही गजर नाही. म्हणून त्याने कार्डेनियोच्या संगतीत राहण्याचे ठरविले. डोरोथीने कोणते काम करावयाचे याची सूचना पुनः एकवार त्याने दिली. ती आणि न्हावी सँकोसह पुढे गेले आणि बाकीचे दोघे त्यांच्यापासून काही अंतरावर पण त्यांच्या मागोमाग चालत निघाले.

अशा प्रकारे सुमारे दोन मैल गेल्यानंतर, त्या खडकामध्ये त्यांना डॉन क्विक्झोट दिसले. त्या वेळेपर्यंत त्यांनी आपले कपडे घातले होते—चिलखत घातले नव्हते. तोच हा माणूस आहे हे ओळखून डोरोथीने आपल्या तट्टाला तत्काळ चमकावले. ती जेव्हां डॉन क्विक्झोटच्या जवळ गेली तेव्हां तिचा शागीर्द खाली उतरला आणि त्याने तिला तिच्या खोगिरावरून खाली उतरविले. ती आपल्या पायावर उभी राहिली, त्या शिलेदाराकडे डौलाने चालत निघाली आणि तिच्याबरोबर तिचा सेवकही निघाला. शिलेदाराने अडविले असतानाही तिने त्याच्यापुढे गुडघे टेकले, आणि ती म्हणाली, "शूर

व अजिंक्य शिलेदारांचा त्रिवार विजय असो! आपल्या कीर्तीत भर घालणारा एक वर आपण मला औदार्याने देईपर्यंत मी या जागेवरून उठणार नाही. आजपर्यंत सूर्याने कधी पाहिली नसतील अशी संकटे माझ्यावर कोसळली आहेत, त्यामुळे मी अत्यंत दुःखी नि त्रस्त झाले आहे. आपण माझे दुःख हरण करावे. आपल्याला जी अमर कीर्ती मिळालेली आहे, तिला शोभेसे शौर्य आणि सामर्थ्य आपल्याला लाभलेले असेल तर, आपण धारण केलेल्या शिलेदारीच्या आणि प्रतिष्ठेच्या नियमानुसार, संत्रस्त राजकन्येला मदत करणे हे आपले कर्तव्य आहे. आपल्या विस्मयकारक आणि अजिंक्य अशा शस्त्रबलाचा लौकिक ऐकून, फार दूरच्या प्रदेशातून, मी येथे आपले संरक्षण मागण्यासाठी आले आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे सुंदर रमणी! तू या जागेवरून उठेपर्यंत मी तुझा एकही शब्द ऐकणार नाही की तुला काही उत्तर देणार नाही." याचकाच्या अवस्थेत असलेल्या त्या रमणीने उत्तर दिले, "उदार शिलेदारजी, क्षमा करा. मी जो वर नम्रतेने मागत आहे, तो देण्याची आपण सौजन्याने कृपा करीपर्यंत, माझे गुडघे येथेच रुतून बसतील." डॉन क्विक्झोट उत्तरले, "मान्य आहे तुमचे म्हणणे. मात्र आपली मागणी माझ्या राजाला, माझ्या देशाला आणि माझ्या अंतःकरणाची नि स्वातंत्र्याची गुरुकिल्ली असलेल्या सुंदर स्त्रीला अपायकारक असता कामा नये.' तेव्हा ती स्त्री म्हणाली, "यापैकी कोणाचीही हानी कारणारी माझी मागणी नाही."

सँको आपल्या धन्याजवळ गेला आणि त्याच्या कानात कुजबुजला, "कबूल करा, महाराज, कबूल करा, मी आपल्याला सांगतो, एका राक्षसाला ठार मारणे ही किती क्षुद्र गोष्ट आहे--तिच्यांत काहीच अर्थ नाही. तसे करण्यास आपल्याला सांगणारी ही स्त्री म्हणजे थोर नि बलाढ्य राजकन्या मिकोमिकोना ही आहे. इथिओपियामधील मिकोमिकोन या विशाल राज्याची ती राणी आहे." डॉन क्विक्झोट उत्तरले, "ती कोणीही असो, माझ्या शिलेदारीच्या नियमाप्रमाणे मी माझे कर्तव्य पार पाडीन आणि माझ्या विवेक-बुद्धीच्या आज्ञांचे पालन करीन." असे म्हणून आणि त्या स्त्रीकडे वळून ते मोठ्याने म्हणाले, "हे सुंदरी, ऊठ, माझी तुला विनंती आहे. तुझ्या अलौकिक सौंदर्यामुळे जो वर तुझ्या हक्काचाच आहे तो मी तुला देत आहे." ती स्त्री म्हणाली, "महाशय, आपल्या उदार शौर्यामुळे मी आपल्याला वर मागत आहे तो हा की, मी आपल्याला जिकडे नेईन तिकडे आपण तत्काळ येण्याची कृपा करावी, आणि सारे मानवी नि दैवी नियम मोडून माझे राज्य बळकावणाऱ्या बेइमान माणसाचा सूड माझ्यासाठी आपण घेईपर्यंत दुसऱ्या कोणत्याही पराक्रमी कृत्यास हात न घालण्याचे वचन आपण मला द्यावे." डॉन क्विक्झोट म्हणाले. "ठीक आहे, दिले सारे. आपल्या मनावर दडपण टाकणारे सारे निराशेचे विचार या क्षणापासून आपण झुगारून द्यावेत आणि खचत चाललेल्या आशा पुन्हा जिवंत करण्याचा प्रयत्न करावा. परमेश्वराच्या साह्याने आणि माझ्या भक्कम बाहूंच्या सामर्थ्याने, आपल्या राज्यावर आणि आपल्या पूर्वजांच्या सिंहासनावर

पुनः आरूढ झाल्याचे आपण पाहाल. आपल्या हक्काला विरोध करणाऱ्या साऱ्या बेइमान लोकांना मी मोडून काढीन. म्हणून आता आपण आपले कार्य त्वरेने पार पाडू या! विलंबातून नेहमी संकटे निर्माण होतात आणि एखादी महान योजना लांबणीवर टाकणे म्हणजे तर तिचे वाटोळे करणे होय."

डॉन क्विक्झोटच्या औदार्याबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्या राजकन्येने शिलेदाराच्या हाताचे चुंबन घेण्याचा प्रयत्न केला. सर्व शूर आणि शालीन शिलेदारांमध्ये श्रेष्ठ असणाऱ्या आमच्या शिलेदाराने तिला तसे करू दिले नाही. त्याने तिला हलकेच उठविले, आणि करारी सभ्यतेने नि डौलदारपणे तिला आलिंगन दिले. नंतर त्यांनी सँकोला आपली शस्त्रे आणण्यास सांगितले. त्याप्रमाणे सँको झटकन् तेथून गेला आणि विजयचिन्हाप्रमाणे झाडावर ठेवलेली ती शस्त्रे घेऊन आला. त्याने ती शस्त्रे क्षणार्धात आपल्या मालकाच्या अंगावर चढविली. आता नखशिखांत नटलेला तो शूरवीर म्हणाला, "चल ये, आपण आता या पदच्युत राजकन्येचे हक्क मिळविण्यासाठी येथून जाऊ या." हा सर्व वेळपर्यंत न्हावी आपल्या गुडघ्यावर बसलेला होता. तोंडचे हसू आवरण्यासाठी आणि हनुवटीची दाढी खाली पडू न देण्यासाठी त्याला फार परिश्रम करावे लागत होते. ती दाढी खाली पडेल अशी भीती त्याला वाटत होती. त्याप्रमाणे ती पडली असती, तर त्याचा चेहरा आणि त्यांची सारी योजना एकदमच उघडकीस आली असती. पण डॉन क्विक्झोट यांनी आपले चिलखत अंगावर चढविण्याची घाई केल्यामुळे, न्हावी उठून उभा राहिला. राजकन्येचा हात धरून डॉन क्विक्झोट व न्हावी या दोघांनी तिला आपल्या खेचरावर बसविले. नंतर शिलेदार रोझिनांटवर बसले आणि न्हावी आपल्या जनावरावर चढला, पण बिचारा सँको! त्याचे प्रिय गाढव – डॅपल – हरवल्यामुळे तो मोठमोठ्याने सुस्कारे सोडीत होता. त्याला पायीच जावे लागत होते, पण त्याने ही सारी अडचण शांतपणे सोसली. कारण आपला धनी आता बादशाहीच्या उंबरठ्यावर उभा आहे असे त्याला वाटले. त्याने राजकन्येला प्रश्न विचारले नाहीत, पण तो तिच्याशी लग्न लावील आणि निदान मिकोमिकोनाचा राजा होईल अशी कल्पना तो करू लागला. पण आपल्या धन्याचा मुलूख निग्रोंच्या भूमीत असेल हे कळल्याने त्याला दुःख झाले. ज्यांच्यावर तो राज्यपाल म्हणून शासन करणार, ते सारे लोक काळे असणार, याचा त्याला खेद वाटला. पण त्यावर त्याने एक नामी उपाय तत्काळ शोधून काढला आणि तो म्हणाला, "ते काळे असले तर त्याची पर्वा मी का करावी? मी जहाजात भरून त्यांना स्पेनमध्ये नेईन आणि त्यांचा लिलाव करीन. मला रोख पैसे देऊन त्यांना नेणारे व्यापारी मला सहज मिळतील. मग मला खूप पैसा मिळेल आणि त्यामुळे एखादा किताब किंवा अधिकारपद मी मिळवू शकेन. माझ्या आयुष्याचा उरलेला सारा काळ मी त्यावर उघडपणे मजेत घालवू शकेन. ज्याला लटपटी-खटपटी येत नाहीत, तो खड्डयात जाईल, असे मी म्हणतो. स्वतःला दोष देण्यात काय अर्थ आहे? इतर लोकांप्रमाणे मी पुस्तकी पंडित नसलो, तरी हां हां म्हणता पांच-पंचवीस हजार

गुलामांची विक्री कशी करावी हे कळण्याइतकी अक्कल माझ्या डोक्यात खास आहे. लहान–मोठया साऱ्या नीग्रोंची विक्री एकदमच केली पाहिजे. ते पापलोकीच्या सैतानासारखे काळेकभिन्न असले म्हणून काय झाले ? त्या सर्वांना गोरे किंवा पिवळे करायला मला संधी मिळाली की पुरे. माझे नशिब कसे उघडावे हे मला माहीत आहे. ”

अशा कल्पनांच्या भराऱ्या मारीत, सँको संतुष्ट व प्रसन्न चित्ताने चालला होता. त्यामुळे पायी चालत जाण्याचे दुःख तो विसरला होता. कार्डेनियो आणि पाद्री यांना झाडीतून सुंदर देखावा दिसत होता. दोन्ही मंडळींनी एकत्र येण्यासाठी आपण काय करावे हे त्यांना कळत नव्हते. पण पाद्र्याचे डोके मोठे चलाख होते. त्याने एक युक्ती योजली. तो आपल्या खिशात नेहमी कात्री बाळगीत असे. ती त्याने बाहेर काढली आणि तिने एका क्षणात कार्डेनियोची दाढी छाटून टाकली. आपल्या अंगावरील काळा झगा आणि पोक्त रंगाचा घोडेस्वाराचा डगला त्याने काढला. ते दोन्ही कपडे कार्डेनियोच्या अंगावर घातले आणि स्वतः बंडी व तुमान एवढ्याच कपड्यात राहिला. या नव्या कपड्यामुळे कार्डेनियोचे स्वरूप इतके विलक्षण पालटले की, ते आरशात पाहून त्याला स्वतःची ओळख पटली नसती. हे झाल्यावर ते मोठ्या रस्त्याला लागले. डॉन क्विक्झोट आणि त्यांचे सोबती खडकातून आणि आडमार्गातून बाहेर पडेपर्यंत ते तेथेच थांबले. त्या आडमार्गावरून घोडेस्वारांना पादचारी माणसाइतके जलद जाता येत नसे. ते जेव्हां जवळ आले, तेव्हां पाद्री डॉन क्विक्झोटकडे अत्यंत उत्सुकतेने पाहू लागला. तो आपल्याला ओळखील की नाही याचा विचार तो करीत होता. नंतर एखाद्या प्रश्नाचे उत्तर सापडल्याप्रमाणे, तो हात पसरून शेजाऱ्याकडे धावत गेला आणि ओरडून म्हणाला, “ हे आदर्श शिलेदारा ! ला-मांचा येथील डॉन क्विक्झोट महाराज ! माझ्या थोर देशबांधवा ! तू संस्कृतीचा तुरा आहेस ! दुःखग्रस्तांचा आश्रयदाता आहेस ! तू दुःखहर्ता आहेस !– शिलेदारीचे तर सारसर्वस्व आहेस ! तुझी भेट झाल्याने मला किती परम हर्ष झाला आहे ! ” असे म्हणून त्याने त्याच्या डाव्या पायाला घट्ट मिठी मारली.

आपल्या शौर्यशाली गुणांचा हा एवढा भक्त कोण आहे, याचे डॉन क्विक्झोट यांना आश्चर्य वाटले आणि ते त्याच्याकडे उत्सुकतेने पाहू लागले. शेवटी त्यांनी त्याला ओळखले आणि त्याची भेट तेथे झाली म्हणून त्यांना थोडेसे नवलही वाटले. त्याला अभिवादन करण्यासाठी ते घोड्यावरून खाली उतरणार होते, पण पाद्र्याने त्यांना अडविले. तेव्हा शिलेदारजी म्हणाले, “ पूज्य महाराज, आपल्या योग्यतेचा आणि चारित्र्याचा माणूस पायी चालत असताना मला घोड्यावर बसण्याचा उद्धटपणा करण्यास लावू नका, अशी माझी विनंती आहे. ” पाद्र्याने उत्तर दिले, “ महाराज, आपण मुळीच खाली उतरू नका. महाराजांनी आपल्या खोगीरावरच बसून राहावे. कारण तसे करून आपल्या या युगात कधी कोणी पाहिली नसतील अशी अचाट धाडसे आणि अफाट शस्त्र–चमत्कार आपण दररोज करून दाखवीत असता. आपल्या सोबत्यांनी मला

परवानगी दिली तर मी त्यांच्या मागे राहीन आणि माझ्यासारख्या क्षुद्र धर्मगुरूला तो मोठा मान वाटेल. पेगॅसस किंवा झेब्रा अथवा विख्यात मूर मुसाराकची घोडी यांच्यावर स्वार झाल्याइतका मला परमानंद वाटेल. तो मूरमुसाराक कॉम्प्लूटो या महानगरीपासून फार दूर नसलेल्या झूलेमाच्या ओसाड गुहेमध्ये मंत्र-सामर्थ्यामुळे या क्षणापर्यंत पडून राहिलेला आहे.'' डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, ''महाराज, आपण म्हणता ते खरे आहे. हा विचार मी केला नव्हता. पण मला वाटते, राजकन्या आपल्या नोकराला स्वतःच्या खोगीरावर तुम्हाला बसू देण्याचा हुकूम करील. त्याच्या खेचराला दोन माणसे नेण्याची सवय असेल तर आपण त्याच्या पाठीमागे बसावे.'' तेव्हा राजकन्या म्हणाली, ''तसे घडेल असे मला वाटते. आपले खोगीर तुम्हाला देण्यासाठी माझा हुजऱ्या माझ्या हुकूमाची वाट पाहात बसणार नाही, असे मी समजते. धर्मगुरू पायी चालत असलेला पाहणे त्याला सहन होणार नाही. तो फार सौजन्यशील आणि सुसंस्कृत आहे. तो आपले खेचर धर्मगुरूला अवश्य देईल.'' न्हावी उद्गारला, ''नक्कीच!'' असे म्हणून तो खेचरावरून खाली उतरला आणि आपल्या खोगिरावर बसण्यास त्याने पाद्रयास सांगितले. फारशी आर्जवे करून न घेता पाद्री कबूल झाला. पण दुर्दैवाने ते खेचर भाडोत्री होते आणि म्हणून कमनशिबी होते. जेव्हा न्हावी पाद्रयाच्या मागे बसू लागला, तेव्हा त्या म्हाताऱ्या सुस्त प्राण्याने आपल्या मागच्या तंगड्यांनी दोनतीन झटके दिले. तिच्या सपाट्यात निकोलसची कवटी किंवा बरगड्या सापडल्या असत्या, तर त्या न्हाव्याने आपली भ्रमंती, डॉन क्विक्झोटमागची वारसा म्हणून, सैतानाकडेच सोपविली असती. पण त्याने चपळाईने दूर उडी मारली. दुखापतीपेक्षा त्याला भीतीच अधिक वाटली होती. खेचरावरून तो खाली पडत असताना त्याची दाढी निसटली. हा अपघात लक्षात येताच त्याला एक युक्ती सुचली. त्याने आपले दोन्ही गाल आपल्या हातात दाबून धरले आणि ''माझ्या जबड्याचे हाड मोडले हो!'' असे तो ओरडू लागला.

दाढीचे वाढलेले जंगल जमिनीवर पडलेले पाहून डॉन क्विक्झोट यांना आश्चर्य वाटले. त्या दाढीबरोबर जबडा नव्हता किंवा रक्ताचा थेंबही नव्हता. ते पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, ''धन्य आहे माझी! हा चमत्कार किती अजब आहे! एखाद्या न्हाव्याने कापाची त्याप्रमाणे अपघाताने ही दाढी सफाईदारपणे कापलेली आहे.'' आता आपण ओळखले जाण्याचे भय आहे, हे पाहून पाद्र्याने ती दाढी चटकन् पकडली आणि कण्हतविव्हळत असलेल्या न्हाव्याजवळ जाऊन त्याचे डोके त्याने आपल्या छातीकडे ओढले, 'गळून पडलेली दाढी पुन्हा पक्की चिकटविण्याचा मंत्र मी म्हणत आहे,' असे सांगून पाद्री काही शब्द पुटपुटला आणि त्याने ती दाढी इतक्या सफाईने न्हाव्याच्या हनुवटीवर बसविली की, आता तो पूर्वीसारखा चांगला व दाढीवाला दिसू लागला. त्यामुळे डॉन क्विक्झोट यांचे आश्चर्य वाढले आणि ते पाद्र्याला म्हणाले, ''आपल्या सवडीप्रमाणे मला हा मंत्र शिकवा. त्याचा उपयोग दाढी

चिकटविण्यापेक्षा अधिक काही होईल यात मला शंका वाटत नाही. मांसाचा कण किंवा रक्ताचा थेंब न सांडता दाढी पडणे अशक्य आहे, आणि तशीच ती पुन्हा चिकटविणे हेही आश्चर्यकारक आहे. हा उपाय मला प्रसंगविशेषी चांगलाच उपयोगी पडेल."

आता सारे काही ठाकठीक झाले असल्यामुळे त्या सर्वांनी असे ठरविले की, प्रथम एकट्या पाद्र्याने खेचरावर बसावे आणि नंतर बाकीच्या दोघांनी दुसऱ्या खेचरावर आळीपाळीने बसावे—एकाने बसावे, तेव्हा दुसऱ्याने चालावे. तेथून सुमारे सहा मैल अंतरावर खानावळ होती. तेथपर्यंत अशा पद्धतीने जाण्याचे त्यांनी ठरविले. त्याप्रमाणे डॉन क्विक्झोट, राजकन्या व पाद्री स्वार झाले आणि कार्डेनियो, न्हावी व सँको पायी जाण्यास निघाले. तेव्हा शिलेदारजींनी त्या संत्रस्त तरुणीला उद्देशून म्हटले, "आपली सेवा करण्यासाठी आम्ही कोणत्या मार्गाने जावे हे आपण मला कृपया सांगावे अशी मी विनंती करतो." तिने उत्तर देण्यापूर्वीच तिला एक प्रश्न विचारणे पाद्र्याला योग्य वाटले. त्यामुळे ती योग्य ते उत्तर देण्यास समर्थ होईल असे त्याला वाटले तो म्हणाला, "बाईसाहेब, कोणत्या देशाकडे आपण कूच करण्याचे योजिले आहे? मिकोमिकोनाच्या राज्याकडेच ना? आपण जिकडे जाण्याची इच्छा धरीत आहो, तो प्रदेश हाच भूभाग असेल असे मानण्यात मी काही चूक करीत नाही ना?" या प्रश्नातून आपल्या उत्तराचा धागा त्या स्त्रीने पकडला आणि पाद्र्याचा हेतू तिने बरोबर ताडला. "तुमचे म्हणणे बरोबर आहे." असे ती म्हणाली. तेव्हा पाद्री म्हणाला, "तर मग, बाईसाहेब मी ज्या खेड्यात राहातो, त्यातून आपला मार्ग सरळ जातो. त्या खेड्यापासून कार्थाजेनाला एक सरळ रस्ता जातो, तेथून पुढे जहाजात बसून जाणे सोयीचे. हवा चांगली असेल आणि वारा अनुकूल असेल, तर तुम्ही नऊ वर्षांपेक्षा कमी वेळात मिओना—म्हणजे पॅलस मिओटिस—या विशाल सरोवरापाशी जाऊन पोहोचाल. तेथून आपले राज्य शंभराहून थोडे अधिक दिवस प्रवास केल्यावर आपल्याला लागेल." हे ऐकून ती स्त्री उत्तरली, "महाराज, आपली काही तरी चूक होत आहे हे खचित. कारण मी माझे स्थान सोडून पुरी दोन वर्षे झाली नाहीत आणि आमच्या प्रवासात चांगले हवामानही फारसे नव्हते. तरी मी येथे केव्हाच येऊन पोहोचले. मी स्पेनमध्ये पाऊल टाकताच माझ्या कानी ज्यांच्या पराक्रमाची कीर्ती आली, त्या ला मांचा येथील सुविख्यात डॉन क्विक्झोट यांचे दर्शन मला झाले, तेवढ्यापुरता माझा उद्देश सफल झाला. त्याना मी शोधून काढले आहे आणि त्यांच्या कृपाछत्राखाली मी स्वतःला झोकून दिले आहे नि त्यांच्या अजिंक्य पराक्रमाच्या हाती माझे न्याय्य कार्य सोपविले आहे."

ही प्रशंसा ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "पुरे, पुरे, बाईसाहेब, माझी प्रशंसा मी माझ्या कानानी ऐकण्याचा त्रास मला आपण देऊ नये अशी माझी विनंती आहे. जे जे म्हणून स्तुतिपर असेल, त्या सर्वांचा मी भयंकर तिटकारा करतो. आपली प्रशंसा माझ्याहून अधिक चांगल्या माणसाला शोभून दिसेल. पण अशा स्तुतिस्तोत्रांची सवय

माझ्या नम्र कानाना नाही. आपली योग्यता वाढवावी पण प्रशंसा टाळावी असा माझा सतत प्रयत्न असतो. माझ्या अंगी शौर्य असो वा नसो, मी आपली सेवा, माझ्या रक्ताचा शेवटचा बिंदू खर्च करूनही, पुरेपूर करीत राहीन एवढेच म्हणण्याचे धाडस मी करतो. म्हणून योग्य संधी येईपर्यंत या साऱ्या गोष्टी बाजूस सारून मी या पूज्य धर्म-गुरूना विचारतो, "एकही सेवक बरोबर न घेता आणि अंगावर इतके थोडे कपडे असता आपण येथे येण्याचे प्रयोजन काय? अशा अवस्थेत त्यांना पाहून मला फार आश्चर्य वाटले हे मी कबूल करतो." तेव्हा पाद्री उत्तरला, "थोड्या शब्दात ते प्रयोजन सांगावयाचे तर, आपला मित्र हा न्हावी मि. निकोलस माझ्याबरोबर सेव्हिल येथे आला. तेथे इंडिज्मधून माझ्या एका नातलगाने मला पाठविलेले काही पैसे मला घ्यावयाचे होते. तो नातलग तिकडे पुष्कळ वर्षे वास्तव्य करून आहे. त्याने पाठविलेल्या पैशाची रक्कम लहान नव्हती-सत्तर हजार नाण्याहून कमी नव्हती. त्या सर्व नाण्यांचे वजन योग्य तेच होते. अशी गोष्ट नेहमी घडत नाही, हे आपल्याला माहीत असेलच. या जागेच्या जवळपास आम्ही रस्त्यावर असताना आम्हाला चार दरोडेखोर भेटले. त्यानी आमचे सर्वस्व लुबाडले-आमच्या दाढ्यासुद्धा ओरबाडल्या. म्हणून या बिचाऱ्या न्हाव्याला दाढीसाठी खोट्या केसांचा टोप बसविणे भाग पडले." नंतर कार्डेनियोकडे बोट करून तो पुढे म्हणाला, "तेथे तुम्हाला जो तरुण माणूस दिसत आहे, त्याच्या अंगावरील सदऱ्याशिवाय सारे काही त्याने ओढून घेतले-आणि त्याला किती विरूप केले, हे तुम्ही पहातच आहा. येथील प्रत्येकजण असे सांगतो की, आम्हाला ज्यानी लुटले ते शिक्षा झालेले बदमाष होते. त्यांच्या टोळीला जहाजावर काम करण्याची शिक्षा झालेली होती आणि ती भोगण्यासाठी ते चालले होते. पण त्या सर्वांना एका माणसाने या जागेच्या जवळपास मुक्त केले. राजाचा अधिकारी आणि त्याचे पहारेकरी यांच्याशी मोठ्या शौर्याने लढून त्याने एकट्याने त्या सर्वांना स्वतंत्र केले. तो मनुष्य खरोखर मूर्ख असला पाहिजे किंवा त्यांच्यासारखाच एक बडा बदमाष असला पाहिजे. नाही तर, ज्याच्या डोक्यात काही अक्कल किंवा प्रामाणिकपणा असेल असा माणूस शेळ्यांच्या कळपात लांडगे कसा सोडील? निष्पाप कोंबड्यांमध्ये कोल्हे कशाला घुसवील? आणि मध-माशांच्या मोहोळात गांधीलमाशा कशाला सोडील? सार्वजनिक न्याय योग्य मार्गाने अमलात येण्यास त्याने अडथळा आणला, आपल्या कायदेशीर सम्राटावरील निष्ठेचा भंग केला, आपल्या आरमाराचे सामर्थ्य खच्ची केले, राजाविरुद्ध बंड उभारले, कायदा धाब्यावर बसवून राजाच्या अधिकाऱ्यांना प्रतिबंध केला आणि तोपर्यंत शांत असलेल्या धर्मगुरूंच्या पथकाला भयभीत केले, एवढेच नव्हे तर, इहलोकातील आपले जीवित आणि परलोकातील आपला मोक्ष धोक्यात आणला."

जहाजावर शिक्षा भोगण्यासाठी जाणाऱ्या गुलामांच्या संघर्षाचा वृत्तांत सँकोने पाद्र्याला सांगितला होता. तो त्याने आपल्या निवेदनात पक्का गोवला आणि त्याचा परिणाम डॉन क्विक्झोट यांच्यावर काय होतो हे तो पाहू लागला. त्याच्या प्रत्येक

शब्दासरशी शिलेदारजींच्या चेहऱ्याचा रंग बदलत होता. त्या सज्जनांना बंधनातून मुक्त करणारा पवित्र सरदार मीच आहे, हे कबूल करण्याचे धाडस त्यांना होईना. शेवटी समारोप करताना पाद्री म्हणाला, "आपल्याला या दुर्दशेस आणून पोहोचविणारी माणसे तीच होती. त्यांना जी शिक्षा झाली होती, ती योग्यच होती. पण तिच्यापासून त्यांना ज्याने मुक्त केले त्या माणसाला प्रभु दयाबुद्धीने क्षमा करो !"



## प्रकरण ३

# छांदिष्ट शिलेदाराने सुरू केलेल्या खडतर तपश्चर्येतून त्याची सुटका करण्यासाठी योजलेले गमतीचे डावपेच.

पाद्र्याने आपले भाषण पुरे केले नसेल, तोंच सँको त्याला म्हणाला, "पाद्रीबुवा, सत्याला स्मरून मी आपल्याला सांगतो, ते अलौकिक कृत्य करणारा माणूस म्हणजे माझा धनीच होय. ते न करण्याविषयी योग्य ती सूचना त्याला मिळाली नव्हती असे नव्हे, कारण मी स्वतःच त्याला वारंवार सांगितले होते, "आपण काय करीत आहात याची काळजी घ्या. अशा दुष्ट बदमाषांच्या टोळीला बंधनातून मुक्त करणे हे महाभयंकर पाप आहे. ते सारेजण आपल्या बदमाशीबद्दल शिक्षा-भोगण्यास जहाजाकडे जात आहेत." ते ऐकून डॉन क्विक्झोट ओरडले, "अरे मठ्ठ माणसा, जेव्हा एखाद्या शिलेदाराला शृंखलाबद्ध माणसे भेटतात, आणि ती जुलमाखाली रगडलेली असतात, तेव्हा त्यांना तशी दशा त्यांच्या गुन्ह्यामुळे प्राप्त झालेली आहे की केवळ त्यांच्या दुर्दैवामुळे ओढवलेली आहे याची चौकशी करणे, हे काय शिलेदाराचे कर्तव्य आहे? त्यांच्या गुन्ह्याकडे लक्ष देणे हे आमचे काम नव्हे — आम्ही फक्त त्यांचे दुःख पहातो आणि ते दूर करतो. एखाद्या माळेच्या मण्याप्रमाणे एकत्र गुंफलेल्या दुःखी-कष्टी अभागी जीवांची टोळी मला भेटली आणि लगेच मला माझ्या अंतःकरणाने आणि माझ्या व्यवसायाने जे कर्तव्य करण्यास सांगितले, ते मी पार पाडले. यासंबंधी कोण काय बोलू शकेल? या पूज्य धर्मगुरूला आणि त्याच्या अंगी असलेल्या पवित्र चारित्र्याला बाजूस ठेवून मी म्हणतो, जर कोणी त्या माझ्या कृत्यास नावे ठेवण्यास धजला, तर त्याला शिलेदारीचा ओनामाही कळत नाही असे मी म्हणेन. एखाद्या रांडलेकाप्रमाणे किंवा हलक्या कुळातील दुष्ट माणसाप्रमाणे तो खोटे बोलत आहे असे मी म्हणेन, आणि ते त्याला परिणामकारकपणे पटवून देण्यासाठी मी माझ्या अमोघ समशेरीचा उपयोग करीन!"

असे बोलून डॉन क्विक्झोट यांनी, उग्र मुद्रेने, आपल्या रिकीबीत पाय ठेवला. आपल्या खोगीराजवळ लटकत असलेले व मॅम्ब्रिनोचे शिरस्त्राण मानलेले ते पातेले भुवयापर्यंत पुढे ओढून डोक्यावर ठेवले. जहाजावर नेल्या जाणाऱ्या गुलामांनी त्या पातेल्याचे जे नुकसान केले होते, ते त्यांना भरून काढावयाचे होते. त्यांच्या स्वभावाची कल्पना डोरोथीला आतापर्यंत चांगलीच आली होती. सँको पँझाशिवाय इतर सारेजण त्यांची चेष्टा करीत आहेत, आणि ते स्वतः इतके प्रक्षुब्ध झालेले आहेत, हे पाहून तिने आपल्या

अंगच्या उपजत चातुर्याने आणि खेळकरपणाने, ते विनोदी बोलणे पुढे चालविण्याचे ठरविले. ती म्हणाली, " महाराज, आपण मला दिलेले वचन आठवावे अशी माझी आपल्याला विनंती आहे. आपण जे कार्य करण्यास निघालो आहोत ते पार पाडी-पर्यंत आपण नवे कोणतेही साहस करावयाचे नाही. म्हणून कृपा करून आपण आपला राग आवरा. आपल्या अजिंक्य बाहुबलाने आपण त्या गुलामांना बंधमुक्त केले हे पाद्री-बुवांना माहीत असते, तर आपली नाराजी ओढवून घेणारा एक शब्दही उच्चारण्यापूर्वी त्यांनी आपले ओठ शिवून घेतले असते किंवा आपली जीभ चावली असती, असे मला खात्रीने वाटते." तेव्हा पाद्री म्हणाला, " छेः ! त्यापेक्षा मी माझी एक मिशी उतरून दिली असती हे खचित." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " बाईसाहेब, आपल्या बोलण्याने माझे समाधान झाले. माझ्या सात्त्विक क्रोधाची ज्वाला आपल्या बोलण्याने शांत झाली आहे. राणीसाहेबांना दिलेले वचन पूर्ण करीपर्यंत दुसऱ्या कोणत्याही कलहात गुंतण्याचा मोह मला होणार नाही. माझ्या सद्भावाची परतफेड करण्यासाठी म्हणूनच आपण आपल्या दुर्दैवाचा सारा वृत्तांत आम्हास सांगावा अशी माझी प्रार्थना आहे — अर्थात त्यामुळे आपल्याला फार त्रास होणार नसेल तर ! त्याचप्रमाणे आपल्या वतीने मी किती आणि कोणत्या लोकावर पूर्ण सूड उगवावा, हेही आपण सांगावे." डोरोथी उत्तरली, " ते सारे सांगण्यास मी अत्यंत राजी आहे. पण माझ्यासारखीच्या कहाणी-मध्ये केवळ दुःख आणि संकटेच भरलेली असतात. म्हणून ती ऐकत बसणे तुम्हांला कंटाळवाणे होईल अशी भीती मला वाटते." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " बाई-साहेब, ती भीती मुळीच बाळगू नका." डोरोथी म्हणाली, " तर मग सांगते मी सारे. आपण कृपा करून माझ्याकडे लक्ष द्या." हे ऐकून, ती इतक्या झटपट कोणत्या प्रकारची कहाणी बनवून सांगत आहे, हे ऐकण्यासाठी कार्डेनियो आणि न्हावी तिच्याजवळ जाऊन बसले. सँकोनेही तिच्या खोगीराजवळ आपले कान लावले, कारण तिच्या सोंगाने तो आपल्या धन्याइतकाच फसला होता. आपल्या खेचरावर ठाकठीक मांड घालून आणि एक-दोनदा खोकून व इतर पूर्वतयारी करून, तिने आपली कहाणी अत्यंत डौलाने सांगण्यास सुरुवात केली. ती म्हणाली,

" सद्गृहस्थहो, प्रथम तुम्हाला माझे नाव माहीत असले पाहिजे. ते नाव म्हणजे— " येथे ती थोडा वेळ थांबली. आपल्याला पाद्र्याने कोणते नाव दिले आहे हे तिला आठवेना. ती गोंधळलेली आहे असे पाहून तिला मदत करण्यास पाद्री घाई-घाईने पुढे आला आणि म्हणाला, " बाईसाहेब, यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही. आपल्यावरील संकटांमुळे आपले चित्त इतके अस्वस्थ झाले आहे की, आपण त्यांचा जो वृत्तांत आम्हास सांगणार आहात, त्याच्या सुरुवातीसच आपली जीभ अडखळत आहे. दुःखाचा कडेलोट झाला म्हणजे मनाची अशी अवस्था होते आणि आपली स्मृती आपल्याला सोडून जाते; ती इतकी की, आपले नावसुद्धा आपल्याला काही काळ आठवत नाही. निकोमिकॉनाच्या विशाल राज्याची कायदेशीर वारस असलेली

राजकन्या मिकोमिकोना आपल्यावरील अनंत आपत्तीमुळे आणि आपले राज्यपद पुन्हा प्राप्त करून घेण्याच्या विविध विचारामुळे इतकी अस्वस्थ झाली आहे – गोंधळलेली आहे की, त्यामुळे तिची स्मृती आणि कल्पनाशक्ती दडपली गेली आहे. पण आता आपल्याला सारे आठवेल आणि आपण आपली कथा पुढे सांगू शकाल अशी मला आशा आहे.” तेव्हा डोरोथी म्हणाली, “मलाही तशीच आशा वाटते. आता अधिक कांकू न करता माझी कहाणी शेवटपर्यंत सांगण्याचा प्रयत्न मी करते— ‘सद्‌गृहस्थहो, माझा बाप राजा होता. त्याचे नाव संत टिनॅक्रिओ. जादूच्या विद्येत तो मोठा प्रवीण होता. त्या विद्येचा त्याचा व्यासंग गाढ असल्यामुळे त्याला असे कळून चुकले की, माझी आई राणी झारामिला आपल्या आधी मृत्यू पावेल आणि आपणही तिच्यानंतर फार काळ जिवंत राहणार नाही. त्यामुळे मी पोरकी बनेन. पण त्याचे त्याला मोठे दुःख वाटत नव्हते. माझ्या बापाला खरे दुःख होते ते म्हणजे माझ्या राज्याच्या सीमेजवळ असलेल्या एका मोठ्या बेटाचा अधिपती कोणी एक राक्षस होता. तो माझ्यावर मोठमोठी संकटे आणील असे भय त्याला होते. त्या राक्षसाचे नाव पॅंडाफिलॅंडो. आणि आडनाव ‘खिन्न-स्वरूप’ असे होते. कारण त्याच्या डोळ्याची बुब्बुळे योग्य जागी बसवलेली असली, तरी तो तिरळे पहाण्याचे सोंग करीत असे. हेतु हा की, आपण ज्याच्याकडे रोखून पाहू, त्याने घाबरून जावे. माझ्या बापाच्या मृत्यूची वार्ता या राक्षसाच्या कानी पडल्यावर तो बलाढ्य सैन्य घेऊन एखादे दिवशी माझ्या राज्यावर स्वारी करील आणि मला माझ्या मुलुखातून हाकलून लावील आणि आश्रयासाठी मला एक खेडेसुद्धा ठेवणार नाही, असे माझ्या बापाला वाटत होते. त्या राक्षसाशी लग्न करण्यास मी संमति दिली तर दुःखाची ही परमावधी मला टाळता येईल, असे माझ्या बापाला वाटत होते. पण असा जोडीदार पसंत करण्यास मी कधीही तयार होणार नाही, असेही त्याला आपल्या मंत्रविद्येच्या बळावर कळले होते. आणि खरे म्हणजे, त्या राक्षसाशीच काय, पण जगातील दुसऱ्या कोणत्याही राक्षसाशी लग्न करण्याचा विचार माझ्या मनात कधीच आला नाही– मग त्या राक्षसाचे सामर्थ्य कितीही मोठे नि अमाप असेना का! म्हणून माझ्या बापाने मला बजावले, “येतील ती संकटे शांतपणाने सहन कर आणि काही काळ आपले राज्य पॅंडाफिलॅंडो याला देऊन टाक. शस्त्रबळाने त्याला दूर ठेवण्याचा प्रयत्न करू नकोस. असे केल्याने माझा स्वतःचा मृत्यु आणि माझ्या प्रजाजनांचा सत्यानाश ही टळतील. त्या राक्षसाच्या सैतानी फौजांना प्रतिकार करणे अशक्य आहे. म्हणून तू स्पेन-कडे आपला मोर्चा वळव. तेथे तुला एका शिलेदाराच्या स्वरूपात तुझा बलाढ्य रक्षणकर्ता भेटेल, हे खचित. त्यावेळी त्याची कीर्ती सर्व राज्यभर पसरलेली असेल.” त्याचे नाव डॉन अझोट किंवा डॉन गिगोट असे आहे असे माझ्या बापाने सांगितल्याचे मला आठवते.”

सँको म्हणाला, “छेः! ते नाव डॉन क्विक्झोट उर्फ ‘दुःखी चेहऱ्याचा शिलेदार’ असे आहे, हे आपण कृपया लक्षात घ्यावे.” डोरोथीने उत्तर दिले, “तुझे म्हणणे

बरोबर आहे. माझ्या बापाने त्या शिलेदाराचे वर्णनही केले होते. तो शिलेदार उंच नि सडपातळ असेल आणि त्याच्या उजव्या बाजूस, डाव्या खांद्याखाली किंवा त्याच्या जवळपास एक पिंगट तीळ असेल, आणि त्यावर केसांचा पुंजका उगवलेला असेल, तो घोड्याच्या आयाळीसारखा असेल, असे माझ्या बापाने मला सांगितले होते." हे ऐकताच डॉन क्विक्झोटनी आपल्या नोकराला जवळ बोलावले आणि म्हटले, "सँको, काढ, काढ माझ्या अंगावरचे कपडे काढ! पिशाच्च-विद्या जाणणाऱ्या राजाने ज्याचे भाकित केले तो शिलेदार मीच आहे काय, हे पहाण्याचे मी ठरविले आहे." तेव्हा डोरोथीने विचारले, "महाराज, आपण कपडे काढण्याची काय गरज?" शिलेदाराने उत्तर दिले, "आपल्या वडिलांनी सांगितला तसा तीळ माझ्या अंगावर आहे की नाही हे पहाण्यासाठी!" तेव्हा सँको म्हणाला, "ते पहाण्यासाठी महाराजांनी कपडे उतरण्याची गरज नाही. कारण माझ्या माहितीप्रमाणे, आपल्या पाठीवर अशीच एक खूण आहे-आणि ती बलाढ्यतेची खूण आहे असें माझी बायको म्हणते." डोरोथी म्हणाली, "तेवढे पुरेसे आहे. अशी कसून तपासणी न करताही मित्रमंडळी एकमेकावर विश्वास ठेवू शकतात. तो तीळ खांद्यावर आहे की पाठीच्या कण्यावर आहे, हा मुद्दा फारसा महत्त्वाचा नाही. सारांश, माझ्या पिताजींची सारी भाकिते बरोबर आहेत आणि मीही डॉन क्विक्झोट यांच्या हाती मला सुपूर्द करण्यात योग्य तीच गोष्ट केली आहे. माझ्या पिताजींनी केलेल्या वर्णनाशी यांची आकृती नि स्वरूप तंतोतंत जुळत आहे. आणि त्यांची कीर्ती स्पेनमध्येच काय, पण उभ्या ला-मांच्यामध्येही दूरवर पसरली आहे. त्यामुळे मी ओसूना येथे पाऊल ठेवताच त्यांच्या पराक्रमाचा लौकिक माझ्या कानी पडला आणि ज्याच्या शोधार्थ मी इकडे आले तोच हा माणूस आहे हे पाहून मला मोठा संतोष वाटला."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "बाईसाहेब, आपण ओसूना येथे कसे उतरला? ते काही बंदर नाही." डोरोथीने स्वतः उत्तर देण्यापूर्वी पाद्री म्हणाला, "खरे आहे महाराज! राजकन्येने असे म्हणावयास हवे होते की, मॅलागा येथे आपण उतरलो. आणि त्यानंतर आपल्या शस्त्रबळाची कीर्ती प्रथम जेथे तिच्या कानी पडली, ते स्थान म्हणजे ओसूना." डोरोथी उत्तरली, "मला तेच म्हणावयाचे होते." पाद्री म्हणाला, "ते सहज समजण्यासारखे आहे. आता राणीसाहेबांनी आपली गोष्ट पुढे सांगण्यास सुरवात करावी अशी माझी प्रार्थना आहे." तेव्हा डोरोथी उत्तरली, "मला अधिक काही सांगायचे नाही. डॉन क्विक्झोट यासारख्या थोर वीरपुरुषाची भेट होण्याचे सद्भाग्य मला लाभले आहे. त्यांच्या पराक्रमामुळे मला असा विश्वास वाटू लागला आहे की, मी माझ्या पूर्वजांच्या सिंहासनावर पुन्हा आरूढ होईन. मी जिकडे नेईन तिकडे माझ्याबरोबर येण्याचे शिलेदारसाहेबांनी मान्य केले आहे. मी मागितलेला वर त्यांनी मला औदार्याने दिला आहे. आता मी एवढेच करावयाचे उरले आहे की, 'खिन्न-स्वरूप' पॅंडाफिलँडोची गाठ त्यांना घालून द्यावयाची, म्हणजे ते त्याला ठार मारतील

आणि त्याने अन्यायाने माझे जे जे काही हिरावून घेतले आहे, ते सारे मला परत मिळवून देतील. ही गोष्ट अत्यंत सहजतेने घडेल हे खचित. माझ्या सज्जन पित्याने-राजा असलेल्या संत टिर्नक्रिओने–एक भविष्य लिहून ठेवले आहे. ते खालडिअन किंवा ग्रीक लिपीमध्ये आहे. ( मला दोन्ही लिप्या वाचता येत नाहीत ). ते भविष्य असे की, पूर्वी वर्णन केलेल्या शिलेदाराने त्या राक्षसाचे मुंडके उडविले आणि माझे राज्य मला पुन्हा मिळवून दिले, म्हणजे तो मला लग्नाची मागणी घालील. तेव्हा मी त्याला नकार मुळीच देता कामा नये. माझे शरीर आणि माझे राज्य दोन्हीही त्याच्या पदरात तत्काळ टाकावे. " हे ऐकून आणि आपल्या सेवकाकडे वळून डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा सँको, आता तुला काय वाटते ? गोष्टी कसकशा घडत आहेत हे तू ऐकतोस ना ? मी पूर्वीच तुला हे सारे सांगितले नव्हते का ? बघ, बघ ! आपल्या अखत्यारीत एक राज्य आहे की नाही आणि जिचे पाणिग्रहण आम्ही करावे अशी एक राजकन्या आहे की नाही ? "

सँकोने उत्तर दिले, " अलबत् ! आपण लग्न कराच ! पँडाफिलँडोचा गळा दाबून टाकल्यावर आपण लग्न करू नये आणि राजकन्येची शय्या सुशोभित करू नये असे कोणता हरामखोर म्हणेल ? पहा तर खरे किती नामी दिसते ती. जर माझ्या शय्येवर याहून वाईट नसलेली पिसू आली तर किती बरे होईल ! " एवढे बोलून त्याने आपला आनंद प्रगट करण्यासाठी हवेत दोन–चार उड्या मारल्या. डोरोथीकडे वळून त्याने तिच्या खेचराचा लगाम पकडला आणि गुडघे टेकून तो तिला म्हणाला, "आमची सम्राज्ञी म्हणून मी आपल्याला मान देतो. त्याची खूण म्हणून आपण मला आपल्या हाताचे चुंबन घेण्याची परवानगी औदार्याने द्यावी. " त्याचा भोळेपणा व त्याच्या धन्याचा मूर्खपणा पाहून तेथे उभे असलेल्या प्रत्येक माणसाला हसू लोटल्याशिवाय राहिले नाही. सारांश, त्याच्या विनंतीला मान देणे डोरोथीला भाग पडले आणि तिने त्याला असे वचन दिले की, "दैवाने माझ्यावर खैर केली आणि माझे गमावलेले राज्य मला परत मिळवून दिले, म्हणजे मी तुला उमराव करीन. " ते ऐकताच सँकोने तिचे आभार अशा काही विलक्षण रीतीने मानले की, त्यामुळे त्या मंडळीमध्ये हास्याची नवी लाट उठली.

नंतर कथा पुढे चालू ठेवीत ती म्हणाली, "सद्गृहस्थहो, अशी आहे माझी कहाणी ! माझ्यावर जी जी संकटे कोसळली त्यामध्ये एक संकट मात्र यावयाचे राहिले. माझ्या राज्यातून बाहेर पडताना माझ्याबरोबर जे अनेक सेवक होते, त्यांच्यापैकी एकही जण माझ्या भाग्याचे वाटोळे झालेले पाहण्यास जिवंत राहिला नाही. फक्त लांब दाढीचा हा मला सेवक राहिला. बाकीचे सारेजण मोठ्या तुफानात नष्ट झाले. बंदर नजरेच्या टप्प्यात असतानाच एक तुफान समुद्रावर उठले आणि त्याने आमच्या जहाजाचे तुकडे तुकडे केले. मी आणि हा सेवक यांच्या नशिबीही तेच भवितव्य होते. पण आम्ही दोघांनी दोन फळ्या धरल्या आणि त्यांच्या मदतीने आम्ही जमिनीवर येऊन पोहोचलो. हा एक चमत्कारच होता. माझ्या जीवनातील एकूण एक घडामोडी म्हणजे एक अखंड

चमत्कारच आहे आणि त्याला धरूनच हे घडले. मी माझी कथा सांगताना केव्हा केव्हा कंटाळवाणा भाग आला असेल किंवा मी जितके अचूकपणे सांगावयास हवे होते तितके नसेल; तर त्याचे कारण अखंड यातनांमुळे इंद्रिये बधिर होतात आणि स्मृती क्षीण होते. हे माझ्या निवेदनाच्या प्रारंभीच पाद्रीमहाशयांनी आपल्याला सांगितले आहेच. ”

डॉन क्विक्झोट म्हणाले, “ (हे अत्यंत गुणवती नि उच्चकुलीन सुंदरी, ) आपण सोसलेल्या यातना आणि वेदना कितीही तीव्र आणि बिकट असल्या, तरी त्यामुळे आपल्या सेवेसाठी साहस करण्यास आणि तसे करताना दुःख सहन करण्यास मी कदापि कचरणार नाही. म्हणून मी आपल्याला पूर्वी दिलेली अभिवचने पुनः पक्की करतो आणि पुनः शपथ वाहतो की, आपल्या दुराराध्य शत्रूला शोधून काढीपर्यंत जगाच्या टोकापर्यंत मी आपल्या संगतीत राहीन. त्या वैऱ्याचे उर्मट मस्तक, प्रभूच्या कृपेने आणि माझ्या स्वतःच्या अजिंक्य बाहुबळाने, कापून टाकण्याचा निश्चय मी केला आहे. माझ्या या ( ‘ चांगल्या ’ असे मी म्हणत नाही. ) समशेरीच्या टोकाने मी ते कृत्य करीन. माझी स्वतःची समशेर पळवून नेणाऱ्या पॅसामॉंटेच्या जिनेसचा धिक्कार असो ! ” हे ते स्वतःशी पुटपुटले. आणि नंतर पुढीलप्रमाणे त्यांनी आपले संभाषण पुढे चालविले, “ त्याच्या धडापासून त्याचे शिर मी वेगळे केल्यानंतर आपल्याला निर्धास्तपणे आपले सिंहासन प्राप्त करून घेता येईल. त्यानंतर आपला देह कोणाच्या हाती सोपविणे सोयीचे आहे, हे आपणच ठरवावयाचे आहे. कारण जिच्या नावाचा उच्चार मी आताच करीत नाही अशा माझ्या हृदयदेवतेची मूर्ती जोपर्यंत माझ्या स्मृती-मध्ये भरून राहिलेली आहे आणि माझी इच्छाशक्ती नि विवेकशक्ती सर्वस्वी तिच्या अंकित आहेत, तोपर्यंत मी तिच्यावरील प्रेमापासून रतिमात्र चळणे अथवा एखाद्या अलौकिक सुंदरीशी विवाहबद्ध होण्याचा विचार करणे अशक्य आहे. ”

डॉन क्विक्झोट यांच्या भाषणाच्या शेवटी विवाह न करण्याचा जो उल्लेख आलेला आहे, तो ऐकून सँकोच्या मर्मस्थानीच घाव बसला. त्यामुळे आलेला संताप व्यक्त केल्याशिवाय त्याला राहावेना. तो म्हणाला, “ महाराज, हे काय ? तुमचे डोके खरोखर फिरले आहे. नाही तर या महान् राजकन्येशी विवाह न करण्याचे आपण मनात आणणे कसे शक्य आहे ? लावण्याची अशी पुतळी आपल्या वाटेत कोपऱ्या-कोपऱ्यावर दैव आणून उभी करील, असे आपल्याला वाटते काय ? यांच्यापेक्षा लेडी डल्सीनिया अधिक सुंदर आहे, असे आपल्याला वाटते काय ? यांच्या निम्मे सौंदर्यही तिच्या अंगी नाही असे मी म्हणतो, एवढेच नव्हे तर, या राजकन्येच्या पायतणाचे बंद बांधण्याचीही तिची योग्यता नाही, असे म्हणावेसे मला वाटते. समुद्राच्या तळाशी कुत्र्याच्या छत्र्या शोधण्यात आपण जर आपला वेळ वाया घालविला नाही, तर मला सरदारकी मिळण्याचा संभव आहे. तिची आशा मी माझ्या मनात आकंठ जोपासली आहे. उठा, महाराज उठा, आणि लग्नास तयार व्हा. नाही तर सैतान तुम्हाला पकडो ! तुमच्या ओंजळीत जे

राज्य उडी मारून येण्यास तयार आहे ते ताब्यात घ्या. महाराज, आपण राजे झालात की मला सरदार किंवा उमराव करा. नंतर मग काहीही गोंधळ होवो—ते सारे या सँकोला सारखेच ! "

आपली हृदयस्वामिनी डल्सीनिया हिच्याविरुद्ध सँकोने हे जे निंदाप्रचुर उद्‌गार काढले, त्यामुळे डॉन क्विक्झोट यांचा सारा शांतपणा खलास झाला. त्यापुढे त्याचे काहीही ऐकून घेण्यास ते तयार नव्हते. म्हणून आपली नापसंती व्यक्त करण्यासाठी, एक शब्दही न उच्चारता, त्यांनी त्या बिचाऱ्या सँकोला आपल्या भाल्याने असे दोन तडाखे दिले की, त्यामुळे तो जमिनीवर लंबायमान झाला. डोरोथीने आर्जवे केल्यामुळे शिलेदारानी त्याला मारण्याचे थांबविले म्हणून बरे ! नाही तर तेथेच त्याची शंभरी भरली असती. बराच वेळ थांबून ते त्याला म्हणाले, " अरे बदनाम शेतकऱ्या ! तुझे सारे अपराध पोटात घालण्याइतकी सवड आणि इच्छा मला नेहमीच असेल असे तुला वाटते काय ? आपण नवेनवे अपराध करावेत, हा तुझा धंदा, आणि मी तुला नव्या-नव्याने क्षमा करावी, हा माझा धंदा, असे तुला वाटते काय ? ( अप्रतिम सौन्दर्यवती डल्सीनियाच्या नावाला काळोखी फासल्याबद्दल तुला धर्म-बहिष्काराचीच किमान शिक्षा खचित दिली पाहिजे, ) अरे धर्म-बहिष्कृत स्वामीद्रोह्या ! एखादे चिलट मारण्याचीही ताकद माझ्या अंगी नसताना तिने माझ्या नसानसातून शक्ती खेळविली आहे आणि माझ्या शिराशिरातून आवेश उसळविला आहे, हे तुला माहीत नाही काय ? त्याची तुला खात्री वाटत नाही काय ? अरे दुष्ट गुलामा, सापाची जीभ असलेल्या निर्लज्ज उडाणटप्पू माणसा, बोल, बोल. अरे, राजकन्येला तिचे राज्य परत कोणी मिळवून दिले ? तिला छळणाऱ्या राक्षसाचे डोके कोणी उडविले ? आणि तुला सरदार कोणी केले ? ( या साऱ्या गोष्टी झाल्या आहेत असे मी समजतो ) अरे, डल्सीनियाच्या सामर्थ्यानेच हे सारे घडले आहे. ती आपल्या कार्याचे साधन म्हणून माझ्या बाहूंचा उपयोग करते. माझ्या शरीरात संचार करून ती लढते आणि शत्रूला पादाक्रांत करते. मी तिच्या शरीरात वास करतो—माझे सारे जीवन मला तिच्यापासून प्राप्त झाले आहे आणि तिच्यामुळेच ते टिकून आहे. अरे, हलकट दुष्टा, पृथ्वीच्या अगदी तळाच्या गाळातला किडा तू ! त्या तुला सरदारकीच्या उच्चपदावर सन्मानाने नेऊन बसविणारी ती डल्सीनिया ! त्या उपकारकर्त्रीच्या उपकाराची परतफेड तू तिच्यावर असे शिंतोडे उडवून करतोस ? "

सँकोला फार मोठीशी दुखापत झाली नव्हती, त्यामुळे आपल्या धन्याने उच्चारलेले शब्द त्याला नीट ऐकू गेले. तेव्हा तो घाईघाईने उठून उभा राहिला आणि आश्रया-साठी त्याने डोरोथीच्या तट्टामागे धाव घेतली. तेथे जाताच तो आपल्या धन्याला ओरडून म्हणाला, " ऐका महाराज, या स्त्रीशी लग्न करण्याचा तुमचा विचार नसेल, तर तुम्हाला राज्य मिळणार नाही हे उघड आहे, आणि जर तसे घडले, तर तुम्ही माझे भले काय करणार ? मग मला तक्रार करण्यास काही कारण आहे की नाही, हे

कोणीही सांगावे. म्हणून महाराज, आपण आता एकदाचे तिच्याशी लग्न करून टाका. कारण आपण तिला जणु काही स्वर्गातून खाली ओढून आणले आहे. लग्नानंतर आपण आपली हृदयस्वामिनी–डल्सीनिया–हिच्याशी संगत ठेवावी. कारण सांदीकोपऱ्यास एक-दोन कुमारिका ज्याने ठेवल्या आहेत, असे दुनियेत तुम्हीच काही एकटे राजे असणार नाही. आता सौन्दर्याबद्दल म्हणाल तर, मी त्या बाबतीत काहीच बरेवाईट म्हणूं शकत नाही. ( आणि खरे सांगायचे तर ) मला या दोन्ही सभ्य स्त्रिया खरोखर मनापासून चांगल्या आवडतात. पण विचार करता माझ्या असे लक्षात येते की, लेडी डल्सीनियाला मी कधी पाहिलेच नाही." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे नीचा, दुष्टा ! तू तिला कसे पाहिले नाहीस ? तू तर आताच तिच्याकडून मला एक पत्र आणून दिलेस ना ?" सँको उत्तरला, "माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, तिच्या प्रत्येक अंगोपांगाचे दर्शन घेण्याइतक्या सवडीने मी तिला पाहिले नाही, पण तरीही तिचे सलज्ज अवस्थेत मला जे अकस्मात दर्शन झाले, त्यामुळे तिच्यात काही दोष आहे, असे मला वाटले नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "बरे तर ! आता मी तुला क्षमा करतो, आणि मी तुला जी दुखापत केली त्याबद्दल तूही मला क्षमा कर. कारण भावनेचा पहिला उद्रेक आपल्या हातात नसतो.' सँको म्हणाला, "ते मला माहीत आहे. माझ्या भावनांची पहिली उसळी माझ्या जिभेवाटे नेहमी बाहेर पडते, याचे कारण हेच आहे. माझ्या गळ्यापर्यंत जे जे येते, ते ते बोलल्याशिवाय मला राहवत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा सँको, तरीसुद्धा बोलण्यापूर्वी तू विचार करणे चांगले. घडा इतक्या वेळा विहिरीपाशी जातो की,—पुढचे काही मी बोलण्याची गरज नाही." सँको उत्तरला, "व्हायचे ते होणारच ! आपणा सर्वांना पाहणारा वर कोणी तरी आहे, आणि चुकीने बोलल्याबद्दल मला किंवा चुकीचे वर्तन केल्याबद्दल तुम्हाला,—यापैकी कोणाला जाब द्यावा लागेल; हे तोच एके दिवशी ठरवील."

डोरोथी म्हणाली, "बस्स् झाले हे सँको ! तू आपल्या धन्याकडे धावत जाऊन त्यांच्या हाताचे चुंबन घे आणि त्यांची क्षमा माग. यापुढे कोणाही माणसाची निंदा–स्तुति करण्याची घाई करण्यापूर्वी तू जरा विचार कर आणि काळजी घे. विशेषतः टोबोसोच्या देवतेविषयी काही वाईट न बोलण्याची दक्षता घे. ती कोण आहे हे मला माहीत नाही, पण तिची कोणतीही सेवा करण्यास मी तत्पर आहे. तुझ्या स्वतःसंबंधी म्हणशील तर तू देवावर विश्वास ठेव. तुला सरदारकी मिळेल यांत शंका नाही——आणि मग तू राजा-सारखा राहू शकशील." सँकोने खांदे उडविले. भीतभीत तो आपल्या धन्याकडे गेला आणि हात पुढे करण्यास त्याने त्यांना सांगितले. धन्याने गंभीर चेहरा करून आपला हात पुढे केला. त्याच्या तळव्याचे चुंबन सेवकाने घेतले, तेव्हा शिलेदारजींनी त्याला आशीर्वाद दिला आणि म्हटले, "मला तुझ्याशी दोन–चार शब्द बोलावयाचे आहेत, म्हणून माझ्याजवळ ये. म्हणजे मला तुझ्याशी विनासायास बोलता येईल." आपल्या धन्याच्या आज्ञेप्रमाणे सँकोने केले. आपल्या मंडळीपासून जरा दूर जाऊन तो

आपल्या धन्याजवळ उभा राहिला. तेव्हा डॉन क्विक्झोट त्याच्याकडे वळून म्हणाले, "तू ज्या मोहिमेवर गेला होतास त्याचा तपशील विचारण्यास मला आतापर्यंत सवड किंवा संधी मिळाली नाही. तू उत्तर काय आणलेस, हेही मी विचारू शकलो नाही. आता सुदैवाने आपण मित्र झालो आहोत आणि आपल्याला सवडही आहे, म्हणून आपल्या मोहिमेची वार्ता मला सांग म्हणजे मला समाधान मिळेल." सँको म्हणाला, "आपल्या इच्छेप्रमाणे काहीही विचारा. त्याचे उत्तर आपल्याला मिळणार नाही असे नाही. पण महाराज, माझी अशी विनंती आहे की, काही काळ आपण फार घाई करू नये." डॉन क्विक्झोटनी विचारले, "सँको, अशी विनंति करण्यास तुला कारण काय आहे?" सँको म्हणाला, "चांगलेच कारण आहे. आताच आपण मला जे तडाखे दिले, त्याचे कारण आपली हृदयस्वामिनी डल्सीनिया हिच्याविरुद्ध मी जे काही बोलली, ते आपल्याला आवडले नाही, हे नव्हे, तर परवा रात्री कलिपुरुषाने तुमच्या-माझ्यामध्ये जो कलह निर्माण केला त्यामुळे मला ते तडाखे बसले." डॉन क्विक्झोट म्हणाले "अरे बाबा! अशी पाखंडी भाषा पुन्हा न उच्चारण्याची काळजी घे. कारण ती ऐकली की माझ्या तळव्याची आग मस्तकास जाते. ती अनादराची भाषा फार क्षोभ उत्पन्न करते. मी तुला तेव्हा क्षमा केली याचे कारण, तू नकळत गुन्हा केला होतास. पण तू समंजस आहेस, म्हणून नव्या गुन्ह्याला नवी शिक्षा पाहिजे."

त्या दोघांचा असा संवाद चालला असताना, गाढवावर बसून एक माणूस आपल्याकडे येत आहे. असे त्यांना दुरून दिसले. तो जवळ आला तेव्हा तो कोण आहे हे ते ओळखू शकले. त्याच्या चालचलणुकीवरून भटकणाऱ्या जमातीपैकी तो असावा असे दिसत होते. पण सँकोला कोणतेही गाढव दिसले की, तो त्याचे निरीक्षण अगदी मनापासून करी. स्वतःच्याच गाढवाकडे पहात असल्याप्रमाणे तो त्यावर आपली नजर लावी. त्याने त्या माणसाकडे ओझरते पाहिले नसेल–असेल, तोंच त्याने ओळखले की, हा पॅसामाँटोचा जिनेस आहे, आणि त्याच्या गाढवाचा चेहरा आपल्या गाढवासारखाच आहे— खरोखर जिनेसच्या मांडीखाली असणारे गाढव त्याचेच होते. ते गाढव बाजारात चांगल्या किमतीला विकता यावे आणि आपल्याला लोकांनी ओळखू नये, म्हणून त्याने लमाणासारखा पोषाख केला होता. लमाणांची बोली आणि तिच्यात इतर देशातील भाषांचे मिश्रण हे सारे त्याला परिचित होते. सँकोने त्याला पाहिले आणि ओळखले, आणि त्याला पाहताच नि ओळखताच, आपल्या जिभेत जितका जोर असेल तितका सारा एकवटून तो मोठ्याने ओरडला, "अरे चोरा जेनेसिलो, माझे सामानसुमान नि भांडीकुंडी खाली टाक, माझा जीव की प्राण असलेल्या गाढवावरून खाली उतर. माझ्या गरीब–बिचाऱ्या जनावराशी तुला काय करावयाचे आहे? त्याच्याशिवाय मला क्षणभरही चैन पडत नाही. माझ्या डॅपलपासून दूर हो. माझ्या सुखापासून दूर हो. अरे नीचा, पाठीला पाय लावून पळ काढ. अरे हलकटा, जे तुझे नाही ते येथे टाकून जा." इतके शब्द बोलण्याची त्याला गरजच पडली नाही. कारण त्याचे शब्द कानी

पडताच जिनेस गाढवावरून खाली उतरला आणि पाठीला पाय लावून त्यांच्यापासून पळून गेला. क्षणार्धात त्यांच्या नजरेपलीकडे गेला. सँको आपल्या गाढवाकडे चटकन् धावत गेला आणि त्याने त्याला कवटाळले व म्हटले, " काय केलेस हे तू ? माझ्या प्रिय डॅपल, अरे तू माझ्या गळ्यातील ताईत आहेस– माझ्या ऐश्वर्याचा ठेवा आहेस– माझ्या नेत्रांचा आनंद आहेस. खरोखर तू माझा अत्यंत प्रिय साथी आहेस ! " नंतर त्याने त्याला थोपटले आणि त्याचे मुख्यावर मुके घेतले–जणु काही तो पशू म्हणजे एक विचारवंत प्राणीच आहे. गाढव शक्य तितके शांत होते. त्याने सँकोला हवे तितके मुके घेऊ दिले. त्याने विचारलेल्या नाना प्रश्नांना एका शब्दानेही त्याने उत्तर दिले नाही. हे सारे पाहून बाकीची मंडळी त्याच्याकडे गेली आणि त्याचे गाढव परत मिळाल्याबद्दल त्यांनी त्याचे अभिनंदन केले. डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, " तुला तुझे गाढव सापडले असले, तरी तुला तीन गाढवे देण्याबद्दलचा माझा हुकूम मी रद्द करणार नाही." त्याबद्दल सँकोने त्याना असंख्य धन्यवाद दिले.

अशा प्रकारे ते दोघे गप्पा गोष्टी करीत एकत्र चालले असताना, पाद्री डोरोथीला म्हणाला, " आपण जे कार्य हाती घेतले, ते उत्तम प्रकारे पार पडले, तसेच आपल्या कहाणीचे निवेदनही थोडक्यात चांगल्या प्रकारे केले. शिलेदारीच्या ग्रंथात वर्णन केलेल्या विशिष्ट भाषाशैलीशी आपली शैली जुळणारी होती. " तेव्हा तिने उत्तर दिले, " अशा प्रणय–रम्य ग्रंथांचे वाचन मी वारंवार केलेले आहे. पण येथल्या प्रदेशाची आणि बंदराची परिस्थिती मला माहीत नसल्याने, ' मी ओसूना येथे उतरले ' असे म्हणण्याची चूक केली. " पाद्री उत्तरला, " ते माझ्या लक्षात आले. म्हणून मी मधेच बोललो, ते तुम्ही ऐकलेच आहे. त्यामुळे सारी घडी नीट बसली. पण शिलेदारीच्या ग्रंथातील विलक्षण कथांचे स्वरूप असल्यामुळेच आपल्या कल्पित कथांवर या दुर्दैवी सद्‌गृहस्थाने विश्वास ठेवला, ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? " तेव्हा कार्डेनियो म्हणाला, " त्याचा हा विलक्षण वेडेपणा आहे. एखादा माणूस कितीही बुद्धिमान असला आणि त्याला कल्पना करण्याचे कितीही स्वातंत्र्य असले, तरी अशी अजब वल्ली तो निर्माण करू शकेल, यावर माझा विश्वास बसत नाही. " पाद्र्याने उत्तर दिले, " या गृहस्थाचे अंगी काही गुण आहेत. वेडया माणसाच्या अंगी ते आहेत याचे विशेषच नवल वाटते. त्याचा आवेश तर असामान्य आहे. त्याच्या साहसी कृत्यापासून तुम्ही त्याला दूर ओढून घ्या आणि दुसऱ्या कोणत्यातरी विषयावर त्याच्याशी बोला, म्हणजे तो मोठ्या विवेकाने तो विषय हाताळीत आहे, असे तुम्हाला आढळून येईल. त्याच्या संवादावरून तुम्हाला कळून येईल की, त्याच्या कल्पना अगदी स्पष्ट आणि मजेदार आहेत. त्याच्या संवादाचा शिलेदारीशी काही संबंध नसेल तर, त्याच्या बुद्धीच्या तजेलदारपणाबद्दल आणि विवेकशक्तीबद्दल कोणीही त्याला आदरच दाखवील. "

त्यांचा असा संवाद चालू असताना, डॉन क्विक्झोट यांनी आपल्या सेवकाशी चाललेले संभाषण पुढे चालविले आणि म्हटले, " सँको, आता आपण सर्व प्रकारचे

वैमनस्य बाजूस ठेवू या. आपल्या दुखापती आपण विसरू या आणि माफ करू या. पूर्वीच्या असंतोषाचा लवलेशही मनात न बाळगता, शक्य तितक्या त्वरेने तू मला उत्तर दे. माझी देवता डल्सीनिया तुला केव्हा, कोठे, कशी आढळली ते झटकन् सांग. तू तिला प्रथम अभिवादन जेव्हा केलेस, तेव्हा ती काय करीत होती? तू आपले विचार तिच्यापुढे कसे व्यक्त केलेस? तुला कोणते उत्तर देण्याची कृपा तिने केली? माझे पत्र वाचल्यानंतर तिची मुद्रा कशी झाली? ते पत्र तुला चांगल्या अक्षरात कोणी लिहून दिले? या बाबतीतील सारे सारे काही तू मला सांग. त्यात पदरची भर घालू नकोस किंवा खोटेनाटे सांगू नकोस की खुशामत करू नकोस. उलट, एकंदर वृत्तांताचा संक्षेप करण्यासाठी एक शब्दही गाळू नको. कारण तो वृत्तांत ऐकून मला मोठा आनंद होणार आहे. त्याचा काहीही अंश तू हिरावून घेता कामा नये." सँकोने उत्तर दिले, "महाराज, सत्य – संपूर्ण सत्य – मी जर सांगावयाचे म्हटले तर, माझ्यासाठी त्या पत्राची सुवाच्य नक्कल कोणीही केली नाही. कारण मी मुळी पत्र नेलेच नव्हते." डॉन क्विक्झोट म्हणाले, "बरोबर आहे, तू येथून गेल्यावर दोन दिवसांनी ती वही सापडली आणि तीत ते पत्र लिहिलेले तसेच होते. ते पाहून मला पराकोटीचे दुःख झाले. आपल्याजवळ पत्र नाही हे कळल्यानंतर तू काय करशील याची मला काहीच कल्पना येईना. ते पत्र नेण्यासाठी तू परत आला असशील असेच मी मानू लागलो." सँको म्हणाला, "महाराज, मी तसे खासच केले असते. पण माझे हे डोके आहे ना? त्यात आपण वाचलेले पत्र साठविलेले होते. धर्मगुरूला ते वाचून दाखविण्यासाठी आपण ते माझ्याकडून पुन्हा म्हणवून घेतले होते. धर्मगुरूने ते पत्र मी सांगितले तसे शब्द न् शब्द लिहिले, आणि मला म्हटले, 'मी माझ्या आयुष्यात बहिष्काराची आज्ञापत्रे पुष्कळ लिहिली आहेत, पण या पत्राइतके चांगले लिहिलेले पत्र मी माझ्या उभ्या आयुष्यात कधी पाहिले नाही की वाचले नाही." डॉन क्विक्झोट आश्चर्याने उद्गारले, "अरे माझ्या प्रिय सँको, ते पत्र अजून तुझ्या आठवणीत आहे का?" सँको म्हणाला, 'छेः छेः ते पत्र मी तिला देताच आपले काम संपले आणि म्हणून मी ते खुशाल विसरलो. पण पत्रावरील मायना तेवढा मला आठवतो. "उच्च कुलीन आणि स्वर्गीय" तसेच पत्राचे लेवटी "आमरण तुझाच – दुःखी चेहऱ्याचा शिलेदार" या दोन शब्दपंक्तींच्यामध्ये मी तीनशे प्राण, जीव नि प्रिय नेत्र कोंबून दिले."

◘ ◘

## प्रकरण ४

# डॉन क्विक्झोट आणि त्याचा सेवक यांच्यामधील सुखसंवाद आणि इतर साहसी कृत्यांचा वृत्तांत

डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे सारे ठीक झाले. आता पुढे सांग. तू तेथे गेलास तेव्हा ती सौंदर्यसम्राज्ञी काय करीत होती ? मला विचारशील तर, ती इराणी मोत्यांची माळ गुंफत असलेली तुला आढळली असावी अथवा तिचा दास असलेल्या या शिलेदारासाठी – माझ्यासाठी – विलक्षण आकृतीचे जरतारीचे भरतकाम ती करीत असेल. होय ना, सँको ?" सेवकाने उत्तर दिले, "नाही, तसे नाही. परसामध्ये गहू पाखडण्याचे काम मन लावून करीत असलेली ती मला दिसली." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, मग तू खात्री बाळग की, त्या गव्हाचा प्रत्येक दाणा हा मोत्याचाच दाणा असला पाहिजे. आपल्या दिव्य हाताने तिने मोत्याला स्पर्श करताच, त्याचे रूपांतर गव्हात झाले असेल. त्या गव्हाची जात तू पाहिलीस का ? अत्यंत श्रेष्ठ दर्जाची नव्हती का ?" सँको म्हणाला, "छेः अगदी खराब गहू होते ते !" तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "पण तिच्या शुभ्र हातांनी त्यापासून बनविलेला पाव मात्र अत्यंत शुभ्र, अत्यंत चांगला होईल हे तू मान्य केले पाहिजेस." पण ते जाऊ दे. तुझी हकिकत पुढे सांग. माझे पत्र तू तिला दिलेस, तेव्हा तिने त्याचे चुंबन घेतले काय ? आपल्या छातीशी प्रेमाने धरले काय ? अशा पत्राला योग्य त्या थाटामाटाने तिने वागविले काय ? त्यावेळी ती स्वतः कशी वागली ?" सँकोने उत्तर दिले, "खरे सांगतो महाराज ! मी जेव्हा तिला ते पत्र दिले, तेव्हा ती धान्य चाळण्यात फार गर्क झाली होती. ती म्हणाली, "इमानी मित्रा, त्या पोत्यावर ते पत्र ठेव. माझ्या हातातील धान्य मी वाफाणीपर्यंत मी ते पत्र वाचू शकणार नाही." ते ऐकून डॉन क्विक्झोट उद्गारले, "किती अप्रतिम विवेक ! पत्र वाचण्याला फुरसद असावी लागते हे तिला माहीत होते, म्हणून आपल्या आरामाच्या खासगी वेळेसाठी तिने ते राखून ठेवले. पण अरे माझ्या सेवका, तिचे ते काम चालू असताना, तुम्हा दोघांचा संवाद काय झाला ? आपल्या शिलेदारासंबंधी तिने तुला काय पुसले ? आणि तू तिला काय उत्तर दिलेस ? बोल, बोल ! अत्यंत प्रिय सँको, सारे काही बोल ! तुझ्या वाणीतून अत्यंत सूक्ष्म गोष्टही निसटून जाता कामा नये. विचार जे काही निर्माण करू शकतो किंवा लेखणी ज्याचे वर्णन करू शकते, असे सारे काही मला सांग."

सँको म्हणाला, " महाराज, तिच्या प्रश्नांची उत्तरे चट्दिशी दिली गेली. कारण तिने मला एकही प्रश्न विचारला नाही. तिच्यासाठी आपण जी दुर्दशा पत्करली—कमरेपर्यंत उघडे राहिला—जंगली जनावराप्रमाणे खात-झोपत राहिला, आपल्या दाढीप्रमाणेच आपला गळाही वस्तऱ्याने कापावा, असे आपल्याला वाटत आहे, आणि आपण आरडत-ओरडत आहात, आपल्या दुर्दैवाला शिव्याशाप देत आहा—हे सारे सारे मी तिला सांगितले." डॉन क्विक्झोट उत्तरले, " ती तुझी चूक झाली. अरे, मी माझ्या दैवाला धन्यवाद देतो आणि मी जोवर श्वासोच्छ्वास करीत आहे तोपर्यंत मी तसेच करीत राहीन. कारण टोबोसोच्या डल्सीनियासारख्या उच्च स्त्रीचा आदरभाव मिळविण्याची पात्रता माझ्या अंगी आहे असे मला वाटते." सँको म्हणाला, " अगदी बरोबर नेम मारलात, महाराज. ती खरोखर उच्च स्त्री आहे—माझ्यापेक्षा दीड फूट उंच ती आहे." शिलेदारजींनी विचारले, " तूच तिचे मोजमाप घेतलेस काय ?" सँको म्हणाला, " होय महाराज ! गाढवावर गव्हाचे पोते चढविण्यासाठी तिने मला हात देण्यास सांगितले, तेव्हा आम्ही दोघांनी ते पोते उचलले, तेव्हा मी तिच्या अगदी जवळ गेलो असताना, ती माझ्यापेक्षा निदान पाऊण फूट तरी उंच असावी असे मला आढळले." डॉन क्विक्झोट म्हणाले, " बरोबर ! तिची अलौकिक देहयष्टी असंख्य सुंदर हावभावांनी आणि मनाच्या सद्गुणांनी अलंकृत झालेली आहे हे तुझ्या लक्षात आले ना ? पण सँको, जेव्हा तू त्या मोहिनीजवळ गेलास तेव्हा तुला सुगंध जाणवला की नाही ? तो गंध इतका सुवासिक, आल्हाददायक आणि मधुर—किती मधुर—हे सांगण्यास माझ्याजवळ शब्द नाहीत. सुगंधी मालाच्या दुकानदारासभोवती जसा घमघमाट पसरलेला असतो, तसा सुगंध तिच्याभोवती दरवळत असेल. निदान हे तरी तू मान्य केले पाहिजेस." तेव्हा सँको म्हणाला, " होय, काहीसा कडवट गंध मला आला—जरासा उग्र दर्पही आला. कारण, तिने फार कष्टाचे काम केले होते आणि म्हणून तिच्या अंगावरून खूप घाम गळत होता." सरदारजी उत्तरले, " झूट आहे हे ! तुझ्या स्वतःच्या अंगच्या दुर्गंधीमुळे किंवा तुझ्या नाकातील काही रोगामुळे तुझे घ्राणेंद्रिय बिघडले आहे. अरे, तुला जर उमलल्या गुलाबांचा, सुगंधी लिलींचा आणि निवडक चंदनाचा सुवास कळत असेल, तरच तुला तिच्या अंगच्या गंधाची कल्पना करता येईल." सँको म्हणाला, " दया करा महाराज. आपण म्हणता तसेच खरोखर असेल. मॅडम डल्सीनिया वारंवार वास घेत होत्या आणि तसाच मीही घेत होतो. त्यावेळी त्यांना माझ्यासारखाच वास येत असेल, यात काही नवल नाही. हेरिंग माशाचा वास आम्हा दोघांनाही येत होता." शिलेदारजी म्हणाले, " ते जाऊ दे. आता मला हे सांग की, ते धान्य पाखडल्यानंतर आणि गिरणीकडे पाठविल्यानंतर तिने माझे पत्र वाचले असेल, मग तिने काय केले ?" सँकोने उत्तर दिले, " महाराज, आपले पत्र—अं, त्यांनी मुळीच वाचले नाही. कारण, आपल्याला लिहिता-वाचता येत नाही असे त्या म्हणाल्या आणि दुसऱ्यावर विश्वास टाकण्यास त्या तयार नव्हत्या. कोणी काहीही खोट्या गोष्टी सांगेल असे वाटून त्यांनी आपले पत्र फाडून टाकण्याचे चातुर्य

दाखविले. त्या म्हणाल्या, ' शिलेदारांच्या प्रेमाविषयी आणि तपश्चर्येविषयी तू स्वतःच्या तोंडाने मला जे सांगितलेस ते पुरेसे आहे. ' थोडक्यात म्हणजे—त्या आपल्या सेवेस सिद्ध आहेत. त्या म्हणाल्या, ' आपला निरोप ऐकण्यापेक्षा आपली प्रत्यक्ष भेट घेणे मला आवडेल. आपले जर माझ्यावर प्रेम असेल तर आपण त्या झाडाझुडुपात वेडेचार करण्याचे ताबडतोब सोडून द्या, आणि ( आपल्याला सवड असेल तर ) थेट टोबोसोला या. " त्यांना आपल्याशी काही बोलावयाचे आहे आणि आपल्याला भेटण्याचा त्यांचा उदंड मानस आहे. मी आपला उल्लेख ' दुःखी चेहऱ्याचा शिलेदार ' असा केला. तेव्हा हसून हसून त्यांचे पोट दुखायची वेळ आली. त्यांनी मला सांगितले, ' ज्याला तुम्ही बडविले तो बिस्केनर येथे आहे—आणि तो अत्यंत प्रामाणिक माणूस आहे, पण जहाजाकडे जाणाऱ्या गुलामांची मला काहीच माहिती नाही. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " आतापर्यंत तर सारे ठीक झाले. पण मला मेहेरबानी करून हे सांग की, तू निघताना तिने तुला कोणते रत्न बक्षीस दिले ? तू जी बातमी दिलीस, त्याचे बक्षिस तिने तुला काय दिले ? कारण; प्राचीन शिलेदारामध्ये आणि महिलांमध्ये अशी वहिवाट होती की, आपल्या देवतेची किंवा दासाची शुभवार्ता जो कोणी आणील, त्या सेवकाला, शागीर्दाला किंवा युवतीला त्या शुभवार्तेचे कृतज्ञतेचे पारितोषिक म्हणून एखादे बहुमोल रत्न अर्पण करावयाचे. " सँको म्हणाला, " वा, महाराज, किती सुंदर होती ती वहिवाट जुन्या काळी ! मला ती फारच चांगली वाटते, पण मी जेव्हा निरोप घेऊ लागलो तेव्हा भिंतीवरून त्यांनी मला जी रत्ने अर्पण केली, ती म्हणजे पाव नि थोडेसे चीज. ते चीज शेळीच्या दुधाचे होते. ( ही काही दुर्दैवाची गोष्ट नव्हे असे मी समजतो ). " डॉन क्विक्झोट म्हणाले, " हे विलक्षण आहे. कारण ती उदार आहे, उधळी म्हणण्याइतकी उदार आहे. तिने तुला रत्न दिले नसेल, याचे कारण त्यावेळी तिच्याजवळ ते खचित नसेल. पण जे लांबणीवर पडते, ते नाहीसे होत नाही. चांगली गोष्ट केव्हाही करता येते. मी तिला भेटेन आणि साऱ्या गोष्टी ठीक करीन. मला नवल कशाचे वाटते, हे सँको, तुला माहीत आहे काय ? तू झटदिशी परत आलास याचे मला नवल वाटते. तुझा दीर्घ प्रवास आणि अल्पकाळ गैरहजेरी यात काही प्रमाण नाही. टोबोसो निदान शंभर मैल दूर असेल. तेव्हा तू पंख लावून, वाऱ्यावर उडून आला असला पाहिजेस. किंवा त्या शहाण्या जादूगाराने तुला नकळत तुझा प्रवास चालू ठेवला असेल. तो जादूगार माझा पालक आहे–मित्र आहे ( असा कोणी तरी आहे आणि असला पाहिजे, हे निःसंशय. नाही तर मी खरा शिलेदार झालोच नसतो ). अपार सामर्थ्याचे असे काही विद्वान लोक आहेत की, ते एखाद्या शिलेदाराला त्याच्या शय्येतून झोपेतून उठवितात आणि तो जेथे झोपी गेला होता, त्या जागेपासून शेकडो मैल दूर अंतरावर त्याला जागे करतात. या सामर्थ्यामुळे शिलेदार एकमेकांना त्यांच्या महान संकट–प्रसंगी, आपल्या इच्छेस येईल तेव्हा नि तेथे, मदत करीत असतात. उदाहरणार्थ, आर्मेनियाच्या डोंगरात कोणा सैतानी राक्षसाशी किंवा कोणा भयंकर पिशाच्चाशी

अथवा धिप्पाड शिलेदाराशी मी लढत आहे, अशी कल्पना कर. आणि तेथे माझा धुव्वा उडण्याची वेळ आली आहे. (असेही कधी कधी घडते.) अशा आणीबाणीच्या वेळी, मला मुळीच अपेक्षा नसता, तरंगत्या ढगाच्या माथ्यावर बसलेला किंवा तेजस्वी रथावर आरूढ झालेला दुसरा शिलेदार मला दिसतो, तो माझा मित्र असतो. एका मिनिटापूर्वी तो कदाचित इंग्लंडमध्ये असेल, तो अकस्मात येतो, मला आधार देतो, मृत्यूच्या जबड्यातून मला सोडवितो आणि त्याच रात्री तो आपल्या निवासस्थानी परत जातो, तेथे गेल्यावर या प्रवासामुळे त्याला कडकडीत भूक लागते, म्हणून तो चमचमीत जेवतो, आणि मला हजारो मैल मागे टाकतो. हा सारा चमत्कार ते ज्ञानी मांत्रिक आपल्या ज्ञानाने आणि उद्योगाने करीत असतात. त्यांचे एकच कार्य असते, त्यांच्यावर एकच जबाबदारी असते. आणि ती म्हणजे शिलेदारीची परंपरा उज्जवल राखणे. असा काही, तुला अज्ञात असलेल्या पण गतिमान अशा शक्तीने, तुझ्या परवाच्या प्रवासात इतका विलक्षण वेग आणला असेल."

सँको म्हणाला, "होय, मला तसेच वाटते. या बाबतीत काहीतरी जादूटोणा असावा. कारण एकदाही टाच न मारता रोझिनांट सारा प्रवास करीत राहिला. कानात पारा शिरलेल्या लमाणांच्या गाढवांप्रमाणे तो नुसता दौडत राहिला." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे मूर्खा, पारा कसा शिरेल? सैतान ज्यांना पिटाळून लावतो, त्यांना त्वरेने दूर नेण्यासाठी उत्तम घोडेस्वार असतात. पण जाऊ दे हे सारे. माझ्या देवतेने आपल्या भेटीसाठी जी आज्ञा केली आहे, त्याबाबत तुझा सल्ला काय आहे? तिच्या सत्तेचे माझ्या इच्छेवर नियंत्रण असावे, अशी माझी इच्छा आहे. पण सँको, माझ्या अब्रूसाठी, माझ्या गंभीर वचनासाठी, आपल्या सांगाती येणाऱ्या राजकन्येच्या सेवेमध्ये मी गुंतलो आहे आणि आमच्या क्षात्र–धर्मामुळे मी वचनबद्ध आहे. प्रीति मला एकी-कडे ओढीत आहे, तर कीर्ती दुसरीकडे. एकीकडे डल्सीनियाची सक्त आज्ञा, तर दुसरीकडे माझे विश्वासार्ह वचन. पण आता मी असा ठाम निर्धार केला आहे की, मी रात्रं-दिवस प्रवास करून त्या राक्षसाचे मुंडके उडवीन आणि या राजकन्येला आपल्या राज्यात स्थिर करीन. नंतर माझे विचार तेजस्वी करणारा दिवस पहाण्यासाठी मी तत्काळ परत येईन. 'मी तुझ्या कीर्तीसाठी आणि वैभवासाठी दूर राहिलो होतो,' अशी डल्सीनियाची खात्री मी पटविली, म्हणजे ती माझ्या गैरहजेरीबद्दल सहजच क्षमा करील. माझ्या यशस्वी शस्त्रांचे भूतकाळातील, वर्तमानकाळातील आणि भविष्यकाळातील यश, केवळ तिच्या कृपाप्रसादावर अवलंबून आहे. तिचा शिलेदार होण्याचा मान मला मिळाला, यावरच माझे सारे यशोवैभव पूर्णपणे उभारलेले आहे." सँको म्हणाला, "अरेरे! किती दुःखाची ही गोष्ट! महाराजांचे डोके झिजून झिजून खलास झालेले दिसते. एवढा मोठा प्रवास व्यर्थ करणारे तुम्ही वेडे तर नाही? आता तर तुम्हाला मोठी बढती मिळणार आहे – पन्नास–साठ हजार मैलांच्या मुलखाचे सुंदर राज्य तुम्हाला मिळणार आहे – पोर्तुगाल आणि कॅस्टाईल या दोहोपेक्षा मोठे असे राज्य मिळणार

आहे, असे असताना महाराज, प्रवासाची ही यातायात कशाला ? गप्प बसा. असा प्रवास सुरू करण्याची आपल्याला लाज वाटत नाही हे नवल आहे– एकदा तरी माझ्यासारख्या मूर्खाचा सल्ला ऐका– प्रथम भेटेल त्या भटजीकडून तिच्याशी लग्न लावून घ्या– आणि आपले पाद्रीबुवा येथेच आहेत. ते ते काम चोख बजावतील. उत्तम सल्लागार होण्यासाठी लागणारी लांबलचक दाढी माझ्याजवळ आहे आणि माझा सल्ला तुम्हाला अगदी योग्य असा आहे – जसा तुमच्या पायाला तुमचा बूट ! आज रोख, उद्या उधार, हा नियम ध्यानी घ्या आणि कामास लागा.

मिळेल तेव्हा नच घेई जो कुणी
हवे त्याला न मिळेच तत्क्षणी

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "तुझा सल्ला असा आहे तर ! तो ऐकून मी दिलेल्या वचनाप्रमाणे तुला मी बढती देऊ शकेन, पण ती मी या स्त्रीशी लग्न न करताही देऊ शकेन. युद्ध सुरू करण्यापूर्वी मी अशी अट घालीन की, माझा विजय झाल्यानंतर, मी या राजकन्येशी लग्न केले नाही, तरी तिने आपल्या राज्याचा काही भाग माझ्या हवाली करावा. तो मी माझ्या इच्छेप्रमाणे कोणासही देईन–आणि असे दान मागण्याचा हक्क तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणास असणार ?" सँको उत्तरला, "ते उघड आहे. पण महाराज, समुद्र–काठावरील काही जागा माझ्यासाठी राखून ठेवण्याची आपण काळजी घ्यावी, अशी माझी प्रार्थना आहे. म्हणजे होईल काय ? तर तेथील हवा मला मानवली नाही, तर मी माझे काळे गुलाम परदेशी पाठवीन, त्यातून नफा मिळवीन आणि दुसरीकडे कोठे तरी रहाण्यास जाईन. आताच आपण या गोष्टीचा निर्णय करावा. तूर्त लेडी डल्सीनियाचा नाद सोडा आणि याच राक्षसाचा निःपात करा. प्रथम हे सारे प्रकरण समाप्त करा. यापासून आपल्याला चांगला फायदा होईल असे मी शपथ घेऊन सांगतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझे मत ठाम आहे. पण आपल्या संवादाचा थोडाही सुगावा कोणाही माणसाला लागू देऊ नकोस, हे मी तुला बजावून सांगतो. अरे, डल्सीनिया किती सावधपणे नि गुप्तपणे वागते ! तेव्हा मी आणि माझ्या लोकांनी तिचा कित्ता गिरविणे योग्य." सँको म्हणाला, "तर मग महाराज, आपण ज्यांना ज्यांना जिंकता त्या सर्वांना मॅडम डल्सीनियाकडे गाठोडे बांधून का पाठवून देता ? आणि तिच्या पायाशी लोटांगण घालून, आपल्याकडून आल्याचे सांगून, अभिवादन करण्यास का बजावता ? त्यामुळे साऱ्या जगाला हे कळून चुकते की, ते लोक तुमच्या मुठीत आहेत. हे जितके खरे, तितकेच ती तुमची हृदयदेवता आहे, हेही खरे." तेव्हा शिलेदार म्हणाले, "किती रे मठ्ठ आहेस तू ! तुला काहीच कसे कळत नाही ? या सर्वांमुळे तिच्या वैभवात भर पडते हे कळण्याची अक्कल तुला नाही का ? शिलेदारीच्या इतिहासात हृदयस्वामिनीचा मान तिच्या सेवकांच्या संख्येवरून मोजला जातो हे लक्षात ठेव. त्या सेवकांच्या सेवेचे बक्षिस, तिने आपला स्वीकार करावा, एवढेच असते. तिच्यासाठी सेवा

करण्याचा शुद्ध आनंद मिळावा आणि आपल्याला लोकांनी तिचे सेवक म्हणावे हीच त्यांची इच्छा असते. " सँको उत्तरला, " प्रीतीसाठी प्रीति करा, हा सिद्धांत आपल्या पाद्रीबुवांनी सांगितलेला मी ऐकला आहे. आपण आपल्या जनकावर–प्रभूवर–त्याच्यासाठीच प्रेम करावे, सुखाची आशा किंवा दुःखाचे भय बाळगून करू नये, असेही मी ऐकले आहे. पण माझ्यापुरते म्हणाल तर, माझा जेवढा फायदा होईल, तेवढ्यासाठीच मी प्रभूवर प्रेम करीन आणि त्याची सेवा करीन. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " तू म्हणजे एक अजब कोडेच आहेस ! काही वेळा तू इतके समंजसपणाने बोलतोस की कोणाला वाटावे, हा विद्वान आहे. " सँकोने उत्तर दिले, " विद्वान ? छे बुवा ! ते मला काही माहीत नाही. मी एक सच्चा माणूस आहे. "

ते दोघे गप्पा मारण्यात इतके बुडालेले आहेत, हे पाहून मास्टर निकोलसने त्यांना थांबण्यास सांगितले आणि रस्त्याजवळील लहानशा झऱ्याचे पाणी पिण्यास बोलाविले. डॉन क्विक्झोट थांबले. सँकोला बोलण्यातील या अडथळ्याचा आनंद वाटला. त्याचा थापांचा साठा बहुतेक संपत आला होता. आपण आपल्या शब्दात पकडले जाऊ, हे भयही त्याला वाटत होते. कारण त्याने डल्सीनियाची भेट कधीच घेतली नव्हती. ती टोबोसो येथे रहाते एवढेच त्याला माहीत होते. डोंगरात भेटले असताना डोरोथीने जे कपडे घातले होते, ते आता कार्डेनियोने धारण केले आणि आपले कपडे तिला दिले. या नव्या वेषात कार्डेनियोची आकृती सामान्य दिसत होती हे खरे, पण त्याने जे कपडे काढले त्यापेक्षा आताच्या कपड्यात तो पुष्कळच चांगला दिसत होता. ते सर्वजण झऱ्यापाशी थांबले आणि पाद्र्याच्या खाद्य–पदार्थावर तुटून पडले. पण त्या सर्वांच्या मानाने ते पदार्थ फार थोडे होते आणि त्या सर्वांना कडकडीत भूक लागली होती. ते सारेजण ताजेतवाने होऊन तेथे बसले होते. तेव्हा एक तरुण मुलगा त्या रस्त्याने येत होता. त्याने त्या सर्वांना बारकाईने पाहिले आणि एकदम डॉन क्विक्झोट यांच्या पायाशी लोळण घेतली आणि अत्यंत करुण स्वराने तो त्यांना म्हणाला, " महाराज, आपण मला ओळखत नाही काय ? झाडापासून तुम्ही ज्याला बंधमुक्त केले, त्या या बिचाऱ्या अँड्र्यूचे तुम्हाला स्मरण नाही काय ? " हे ऐकून शिलेदाराने त्याला ओळखले. त्याला वर उचलून आणि आपल्या मंडळीकडे वळून ते म्हणाले, " शिलेदारीचा व्यवसाय दुःख दूर करण्याचे कामी, दुष्कृत्यांना शिक्षा करण्याचे कामी आणि मानवजातीच्या समग्र कल्याणाचे कामी किती महत्त्वाचा आहे, हे तुम्हाला कळावे म्हणून तुम्ही या माणसाचा वृत्तांत ध्यानी घेतला पाहिजे. कांही दिवसांपूर्वी एका ओसाड प्रदेशातून मी घोड्यावरून जात असताना माझ्या कानी करुण किंकाळ्या आणि आरोळ्या पडल्या. दुःखी माणसाच्या वेदनातून त्या निघालेल्या होत्या. त्यांच्या आवाजाच्या दिशेने, मी माझ्या व्यवसायाच्या उत्साहाचे भरात, पुढे निघालो. तेव्हा मला हा मुलगा मोठ्या ओक वृक्षाला बांधलेला आढळला. आता त्याला तुम्ही सर्वजण पहातच आहा. तो येथे आहे, याचा मला आनंद वाटतो. माझे निवेदन सत्य असल्याची ग्वाही तो देऊ शकेल. मी सांगितल्याप्रमाणे,

तो ओक वृक्षाला बांधलेला मला आढळला. कमरेपासून त्याचा वरचा भाग उघडा होता आणि एक पिसाट शेतकरी आपल्या हातातील लगामाने त्याची पाठ निर्दयपणे बडवीत होता. या भीषण शिक्षेचे कारण काय, असे मी त्याला लगेच विचारले. तेव्हा त्या आडमुठ्याने उत्तर दिले, “ माझ्या नोकराला शिक्षा करण्याचे स्वातंत्र्य मला आहे. त्याच्या अपराधाबद्दल मी त्याला ही शिक्षा करीत आहे.” त्याच्या या बोलण्याने मला तो माणूस दुष्ट वाटला, मूर्ख नव्हे. हा मुलगा म्हणाला, “ महाशय, मी माझा पगार मागितला. याशिवाय दुसरा कोणताही आरोप ते माझ्यावर करू शकत नाहीत. ” त्याच्या धन्याने काहीबाही उत्तर दिले, पण ती काही मला योग्य सबब वाटली नाही, म्हणून मी त्याला तत्काळ फर्मावले, ‘ या तरुणाला बंधमुक्त कर, त्याला आपल्या घरी घेऊन जा आणि चांगल्या कायदेशीर नाण्यात त्याचा सारा पगार खात्रीने चुकता कर. ’ अँड्रयू, हे सारे खरे आहे ना ? शिवाय मी किती अधिकारी मुद्रेने त्यास फर्मावले हे तू पाहिलेस ना ? आणि तसेच मी जे जे फर्मावले, इच्छिले आणि लादले, ते सर्व पार पाडण्याचे वचन त्याने किती नम्रतेने दिले, हेही तू पाहिलेस ना ? मुला, याचे उत्तर दे आणि या थोर माणसांना तेव्हा काय काय घडले, हे सारे धिटाईने सांग, म्हणजे त्यांना कळून येईल की, हमरस्त्यावरसुद्धा शिलेदारीचा व्यवसाय करणे अगत्याचे आहे. ”

अँड्रयूने उत्तर दिले, “ आपण सांगितले ते सारे खरे आहे, पण ते प्रकरण जसे मिटेल, अशी आपल्याला आणि मला आशा वाटत होती, तसे ते मिटले नाही. ” शिलेदाराने विचारले, “ काय ? शेतकऱ्याने तुला पैसे दिले नाहीत ? ” मुलगा म्हणाला, “ छेः त्याने माझा सूडच उगवला. आपली पाठ वळताच त्याने मला त्याच झाडाला पुनः बांधून घातले, आणि इतक्या क्रूरपणाने झोडपले की, मी जिवंत सेंट बार्थोलोम्यूसारखा ★ दिसू लागलो. मला प्रत्येक फटका मारताना, तो तुमची काही तरी चेष्टा करून हसत होता. जर त्याने मला असे बदडले नसते, तर मलाही हसू आल्याशिवाय राहिले नसते, असे मला वाटते. शेवटी त्याने मला सोडले, पण ते इतक्या दयनीय अवस्थेत की, मला दवाखान्याकडे रांगत जावे लागले. तेथे बरे होण्यासाठी तेव्हापासून आतापर्यंत मला पडून राहावे लागले— त्या सैतानाने मला तशाच निष्ठुरतेने झोडपले होते. आता मी आपले आभार मानले पाहिजेत. आपल्याला कोणी पाचारिलेले नाही असे पाहून आपण जर तसेच आपल्या मोहिमेवर पुढे गेला असता, आणि हे आपले काम नव्हे, असे म्हणून काही लुडबुड केली नसती, तर कदाचित् माझा धनी मला दहा-वीस फटके मारून संतुष्ट झाला असता आणि नंतर त्याने मला देणे असलेले पैसे देऊन टाकले असते. पण आपण संतप्त झाला होता, आणि म्हणून त्याला शिव्या दिल्या. त्यामुळे त्याचे डोके फिरले आणि म्हणून आपली पाठ वळताच त्याने माझ्या या अभागी पाठीवर आपला सारा क्रोध ओतला. तो इतका की, मी पुनः पहिल्यासारखा कधीच होणार नाही, अशी

★ ‘ नव्या करारात ’ सांगितलेल्या १२ येशू–शिष्यांपैकी एक.

भीती मला वाटते." शिलेदाराने उत्तर दिले, "माझ्या हुकुमाची तामिली झालेली पहाण्यापूर्वीच मी निघून गेलो यामुळे हा सारा घोटाळा झाला. अनुभवाने मला हे कळावयास हवे होते की, शेतकरी आपला, शब्द फायदा असेल तर, पाळतो– अब्रूसाठी नव्हे. पण अँड्र्यू, तुला हे आठवते का की, त्याने जर माझी आज्ञा पाळली नाही तर मी परत येईन आणि तो देवमाश्याच्या पोटात लपून बसला तरी मी साऱ्या जगातून त्याला शोधून काढीन, असे शपथपूर्वक सांगितले होते!" अँड्र्यू उत्तरला, "होय महाराज, पण त्याने हे माझे दुखणारे खांदे बरे होणार नाहीत." हे ऐकून, 'तू खात्रीने बरा होशील' असे उत्तर देऊन शिलेदार उग्र मुद्रेने तेथून निघाले.

रोझिनांटला ताबडतोब लगाम घालण्यास त्यांनी सँकोला फर्मावले. ते घोडे इतर माणसांप्रमाणेच इकडे तिकडे हिंडत होते. डोरोथीने डॉन क्विक्झोट यांना विचारले, "आपण काय करायचे योजले आहे?" त्यांनी उत्तर दिले, "त्या दुष्टाचा शोध लावून त्याच्या अपराधाबद्दल त्याला कडक शिक्षा करावी आणि अँड्र्यूला त्याच्या वेतनातील पै न् पै देण्यास त्या शेतकऱ्याला भाग पाडावे, असा माझा हेतू आहे, या कामी विश्वातील सारे शेतकरी आड आले तरी त्याची मला पर्वा नाही." तेव्हा डोरोथी म्हणाली, "आपण मला दिलेले वचन लक्षात घ्या. ते पूर्ण होईपर्यंत दुसरे नवे कृत्य आपल्याला हाती घेता येणार नाही. म्हणून माझ्या राज्यातून आपण परत येईपर्यंत आपण हा संताप आवरला पाहिजे." शिलेदार म्हणाले, "हे अगदी योग्य आणि न्यायाचे आहे. मी परत येईपर्यंत अँड्र्यूने धीर धरून वाट पहावी, पण मी जेव्हा परत येईन, तेव्हा मी माझी पूर्वीची शपथ आणि माझे पूर्वीचे वचन पूर्ण करीन असे मी आताच जाहीर करतो. त्याला पुरा पगार मिळेपर्यंत आणि त्याचे पूर्ण समाधान होई-पर्यंत मी विश्रांती घेणार नाही." अँड्र्यू म्हणाला, "त्यावर माझा विश्वास नाही. पण सेव्हिलला जाण्यासाठी जे भाडे आहे, तेवढे पैसे आपण मला दिले तर आपण म्हणता तो सूड घेण्यापेक्षा त्याचे आभार मी जास्त मानीन. मला खायला काही द्या आणि माझ्या खिशात एखादा तुकडा टाका म्हणजे ईश्वर आपल्यावर आणि इतर सर्व शिलेदारांवर कृपा करील. माझ्या बाबतीत शिलेदार जसे वेडे ठरले, तसेच ते आपल्या स्वतःच्या कार्यात ठरोत म्हणजे झाले."

सँकोने पावाचा एक तुकडा आणि चीजचा लहानसा गोळा घेतला आणि तो अँड्यूला देऊन तो म्हणाला, "दोस्ता, तुझ्यासाठी हे काही तरी आहे बघ. तुझ्या दुर्दैवात आम्ही सारेजण सहभागी आहोत यावर विश्वास ठेव." अँड्यूने विचारले, "सहभागी कशात? हा पाव आणि चीज देऊन टाकल्याबद्दल तुला दुःख होते काय? ते मिळाले तरच मी जगेन हे मी खात्रीने सांगतो. अरे माझ्या दोस्ता, तू हे लक्षात घे की, शिलेदारांचे आम्ही सेवक, जेवण नसले तरी दात कोरीत बसतो. पण अशा किती तरी गोष्टी आहेत. त्या काय सांगायच्या? त्या अनुभवणेच चांगले." अँड्यूने खाद्य पदार्थ हस्तगत केले आणि दुसरे काही खाद्य मिळण्याचा संभव नाही असे पाहून

त्याने आपले पाय उचलले आणि तेथून कूच केले. पण जाताना वळून डॉन क्विक्झोट-कडे त्याने पाहिले आणि म्हटले, " शिलेदारमहाराज ऐका. आपण आपल्या मोहिमेवर असताना पुनः मला भेटला—तसे होणार नाही अशी मला आशा आहे—तर आपल्या उपद्रवी मदतीने मला छळू नका—मग माझे तुकडे तुकडे झाले तरी चालेल. आपण आपले काम करा म्हणजे झाले. रामराम! आपणाला आणि आतापर्यंत जन्मलेल्या साऱ्या शिलेदारांना माझे शिव्या-शाप असोत!" त्याला चमकवावे असे शिलेदारांना वाटले, पण तेथल्या कोणत्याही माणसापेक्षा तो मुलगा फार चपळ होता. त्याच्या पायांनी त्याला फार दूर नेले. डॉन क्विक्झोट त्याच्या कहाणीने अत्यंत प्रक्षुब्ध झाले. तेथल्या मंडळींनी आपले हसू आवरून धरले, नाही तर शिलेदारजींचा संताप भयंकर भडकायचा!



## प्रकरण ५

# खाणावळीत डॉन क्विक्झोट आणि त्यांची मंडळी यांचेवर कोणते संकट ओढवले ?

पोटभर खाल्ल्यानंतर ते त्या ठिकाणाहून निघाले. त्या दिवशी आणि दुसरे दिवशीही सर्व वेळ ते वाटचाल करीत होते. लक्ष देण्यासारखे कोणी त्यांना वाटेत भेटले नाही. शेवटी ते एका खाणावळीपाशी आले. बिचाऱ्या सँकोला ती खाणावळ पाहताच इतकी भीती वाटली की, आत पाऊल टाकण्यास त्याचे मन घेईना. पण आत जाणे त्याला टाळता येण्यासारखे मुळीच नव्हते. खाणावळवाला, घरधनीण, तिची मुलगी आणि मेरीटोर्नेस या सर्वांनी डॉन क्विक्झोट आणि त्याचा सेवक यांचे अत्यंत हार्दिक स्वागत केले. शिलेदारांनी त्या स्वागताचा स्वीकार गंभीर मुद्रेने आणि प्रतिष्ठितपणाच्या आविर्भावाने केला आणि त्यांना सांगितले, "गेल्या खेपेस आपण मला दिला, त्यापेक्षा चांगला बिछाना आता द्या." तेव्हा घरधनीण म्हणाली, "महाराज, पूर्वी आपण दिले त्यापेक्षा जास्त पैसे द्या म्हणजे राजाला शोभेल असा बिछाना आपल्याला मिळेल." तसे करण्याचे शिलेदारांनी वचन दिले, तेव्हा तिनेही आरामशीर बिछाना देण्याचे कबूल केले. पूर्वी जेथे ते राहिले होते, त्या विशाल दालनात त्यांची सोय करण्यात आली. तेथे जाताच त्यांनी कपडे काढले, आणि शरीराने व मनाने अत्यंत त्रस्त झालेले असल्यामुळे ते तत्काळ झोपी गेले. ते त्या दालनात जातात न जातात तोंच, घरधनीण न्हाव्याकडे घाईघाईने पळत गेली आणि त्याची दाढी पकडून म्हणाली, "यापुढे तू आपल्या दाढीसाठी माझ्या शेपटीचा उपयोग करू नकोस हे लक्षात ठेव. माझी शेपटी मला परत दे. माझ्या नवऱ्याला पाहिजे आहे. त्याला तिच्यात काही वस्तू-म्हणजे कंगवा–ठेवावयाची आहे. महाशय, माझी शेपटी मला मिळाली पाहिजे." पण न्हावी काही ऐकेना. तेव्हा पाद्र्याने त्याला ती कृत्रिम दाढी परत करण्यास सांगितले आणि म्हटले, "आता तू आपले सोंग टाकून दे आणि डॉन क्विक्झोट यांना सांग 'जहाजाकडे जाणाऱ्या गुलामांनी मला लुटल्यानंतर मी या खानावळीत पळून आलो. त्यांनी राजकन्येच्या सेवकाबद्दल चौकशी केली तर तू अशी थाप मार की, राजकन्येच्या आगमनाची वार्ता तिच्या प्रजाजनांना देण्यासाठी आणि त्या सर्वांना गुलामगिरीतून मुक्त करण्याचे सामर्थ्य आपल्या अंगी असल्याचे त्यांना सांगण्यासाठी, त्या सेवकाला तिच्याआधी तिच्या राजाकडे पाठविण्यात आले." न्हाव्याला अशी शिकवण

मिळाल्यामुळे त्याने घरधनिणीला तिची शेपटी परत दिली. डॉन क्विक्झोट यांना त्या जंगलातून फसवून बाहेर काढण्यासाठी त्याने जे लहान लहान दागिने उसने घेतले होते, तेही त्याने परत केले.

डोरोथीचे सौंदर्य आणि कार्डेनियोची देखणी देहयष्टी हे पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. पाद्र्याने संध्याकाळचे जेवण मागविले. त्याचे पैसे मिळण्याची बरीचशी खात्री असल्यामुळे यजमानाने त्यांना बऱ्यापैकी जेवण दिले. त्यासाठी त्यांनी शिलेदारांना उठविले नाही. त्यांना अत्यंत गाढ झोप लागली होती. त्रासामुळे त्यांना अन्नापेक्षा विश्रांतीची अधिक आवश्यकता होती. पण इतरांनी त्यांचा हमालाशी झालेल्या चकमकीचा वृत्तांत आणि सँकोला घोंगड्यात वरखाली फेकल्याची हकिगत घरधनिणीकडून ऐकून आपली करमणूक करून घेतली. त्या सर्वांच्या गूढ बोलण्याचा मुख्य विषय म्हणजे डॉन क्विक्झोट यांचा मूर्खपणा हा होता. तो मूर्खपणा त्यांनी अद्भुत कथा वाचल्यामुळे निर्माण झाला आहे, अशी मीमांसा पाद्री आग्रहाने करू लागला. तेव्हा खाणावळवाला म्हणाला, " महाराज, आपण माझे मत आपल्यासारखे करू शकणार नाही. कारण त्या कथांचे वाचन अत्यंत आनंददायक असते, असे माझे मत आहे. आताच माझ्या घरात अशा प्रकारची दोन–तीन पुस्तके आणि इतर काही कात्रणे आहेत. त्यांनीच खरोखर मला आणि इतर पुष्कळ लोकांना जिवंत ठेविले आहे. सुगीच्या काळांत पुष्कळ शेतकरी उन्हाच्या तापात येथे दारू पिण्यास येतात. त्यांच्यापैकी ज्याला चांगले वाचता येते, तो त्यातील एखादे पुस्तक घेतो, आणि आम्ही तीस–चाळीस माणसे त्याच्याभोवती बसून मोठ्या मजेने ते ऐकत राहतो. त्यावेळी आम्हाला काहीही दुःख किंवा काळजी वाटत नाही. आणि माझ्यासंबंधी म्हणाल तर, त्या शिलेदारांचे ते जबरदस्त तडाखे आणि भयंकर लढाया या जेव्हा माझ्या कानी पडतात तेव्हा मला थोडेफार असे वाटू लागते की, आपण त्यांच्यापैकीच एक असावे. त्यावेळी उत्साही जीवनाची अशी काही उंची माझे मन गाठते की, मी वार्धक्याला भिववून पळवून लावतो. सकाळपासून रात्रीपर्यंत मी तेथे बसून त्या कथा ऐकू शकतो. " तेव्हा घरधनीण म्हणाली, " आपण तसेच करावे अशी माझी इच्छा आहे. तसे झाले म्हणजे आम्हाला थोडीफार विश्रांती मिळेल. नाही तर एरवी तुम्ही इतके त्रासलेले–वैतागलेले असता की, तुमच्याबरोबर रहाणे हे आम्हाला नरकात रहाण्यासारखे वाटते. " मेरिटोर्नेस म्हणाला, " खरे आहे ते ! मला असे वाटते, त्या पुस्तकामध्ये पुष्कळ छान–छान गोष्टी असतात. त्यातही संत्र्याच्या झाडाखाली शिलेदार आपल्या प्रियकरिणीला प्रेमाने घट्ट मिठी मारतो आणि कोणी येते आहे की काय हे पाहण्यासाठी ती तरुणी इकडे–तिकडे पहात असते आणि तिच्या तोंडाला पाणी सुटत असते, अशा हजारो हजार गोष्टी त्या पुस्तकात असतात. त्या ऐकण्यासाठी मी संध्याकाळच्या अन् रात्रीच्या जेवणावर पाणी सोडेन. "

पाद्र्याने खानावळवाल्याच्या मुलीस विचारले, " तरुण कुमारिके, या बाबतीत

तुला काय वाटते ? '' ती म्हणाली, '' काय सांगू ? त्या गोष्टी मला काही कळत नाहीत आणि तरीही त्या ऐकणे मला आवडते. पण माझ्या बाबांना अत्यंत आवडणारी, भयंकर नि भेसूर लढाई मला मुळीच आवडत नाही. खरे सांगायचे तर, जेव्हा त्या बिचाऱ्या शिलेदारांना आपल्या हृदयस्वामिनी मिळत नाहीत, तेव्हा ते जे विलाप करतात, ते ऐकून मला कधी–कधी रडावेसे वाटते. '' डोरोथी म्हणाली, '' हे तरुण सभ्य स्त्रिये ! तू कोमल अंतःकरणाची आहेस असे मला वाटते. आपल्यासाठी आपल्या प्रियकराला तू कधी मरू देणार नाहीस. '' मुलगी म्हणाली, '' त्या बाबतीत काय घडेल हे मला माहीत नाही. पण मला हे माहीत आहे की, 'वाघीण', 'सिंहीण' असे कोणी मला संबोधण्यास मी कोणाला कारण मिळवून देणार नाही. अशीच आणखी किती अभद्र नावे त्या स्त्रियांना मिळतात हे मला माहीत नाही. त्यापेक्षाही अधिक अभद्र नावांना त्या पात्र असतात असे मला वाटते. आपले दर्शन घेण्यासाठी कोण्या उमद्या माणसाने वेडे व्हावे किंवा मरून जावे, असे ज्या स्त्रियांना वाटते, त्यांना आत्मा किवा विवेक मुळीच नसला पाहिजे. त्यांच्या साऱ्या प्रेमाच्या चाळ्याचा आणि नम्रतेचा अर्थ काय ? त्या जर खरोखर सभ्य स्त्रिया असतील तर त्या शिलेदाराशी लग्न का करीत नाहीत ? त्यांची इच्छा तेवढीच असते. '' घरधनीण म्हणाली, '' बंद कर तुझी बडबड ! हे सारे तुला कोठून कळले ? अशा गोष्टीविषयी तुझ्यासारखीने काही बोलू नये. '' तेव्हा ती म्हणाली,'' या गृहस्थांनी मला एक प्रश्न विचारला, त्याचे उत्तर न देणे असभ्यपणाचे ठरले असते. '' पाद्री म्हणाला, '' ठीक आहे. अहो मालक, ती पुस्तके येथे आणण्याची कृपा करा म्हणजे मी त्यांच्यावर नजर टाकीन. ''

खानावळवाला म्हणाला, '' वाः ! अगदी आनंदाने मी ती पुस्तके आणतो. '' असे म्हणून त्याने आपल्या खोलीकडे आपले पाय वळविले आणि तेथे जाऊन साखळीने बांधलेली छोटीशी कातडी पेटी उघडली. तिच्यातून त्याने तीन मोठे ग्रंथ बाहेर काढले आणि त्याबरोबरच चांगल्या सुवाच्य अक्षरात लिहिलेल्या हस्तलिखितांचा एक गठ्ठाही काढला. त्या तीन ग्रंथांपैकी एकाचे नाव होते– 'थ्रेसचा डॉन सिरोनजिलियो', दुसऱ्याचे– 'हिर्केनियाचा फेलिक्स मार्ट' आणि तिसऱ्याचे 'कार्डोव्हाचा श्रेष्ठ कॅप्टन गोंकॅलो हर्नेनडेझचा इतिहास' आणि 'पेरेडेसच्या डीएगो गार्सियाचे जीवन' हे शेवटचे दोन खंड एकत्र बांधलेले होते. त्या सर्वांची नावे वाचल्यानंतर पाद्री न्हाव्याकडे वळून म्हणाला, '' डॉन क्विक्झोट यांची घर-धनीण आणि त्यांची पुतणी आता येथे असण्याची गरज आहे. '' न्हावी म्हणाला, '' या ग्रंथांची मी छानदार विल्हेवाट लावीन. मागच्या बाजूस किंवा धुराड्याकडे जाण्याचा रस्ता मला सापडेल. तेथे मोठा अग्नी पेटलेला आहे. तो आपले काम करील. '' खाणावळवाला उद्गारला, '' काय ? तू माझे ग्रंथ जाळणार ? छेः, तू तसे करणार नाहीस अशी मला आशा आहे. '' पाद्री उत्तरला, '' फक्त दोनच ग्रंथ जाळले पाहिजेत– ते म्हणजे 'डॉन सिरोंजिलो' आणि त्याचा दोस्त '' फेलिक्स मार्ट ''. यजमान म्हणाला, '' ते काही पाखंडी किंवा फुटीरपक्षी नाहीत. ''

न्हावी म्हणाला, "फुटीरपक्षी, म्हणायचे आहे तुला." खाणावळवाला म्हणाला, "होय, माझ्या म्हणण्याचा अर्थ तोच. तुम्हाला जर ग्रंथ जाळायचेच असतील, तर 'गोंकॅलो हर्नानडेझ' आणि 'डीएगो गार्सिया' हे जाळा. दुसरे ग्रंथ जाळण्यापेक्षा माझा मुलगा तुम्ही जाळणे चांगले." पाद्री म्हणाला, "इमानी मित्रा, ज्या ग्रंथांविषयी तुला इतकी आस्था वाटत आहे, ते असत्य आणि मूर्खपणा यांनी भरलेली निरर्थक महाकाव्ये आहेत. आणि ज्याचा तू इतका तिटकारा करतोस, तो खराखुरा इतिहास आहे आणि त्यामध्ये दोघा विख्यात वीरांचा सत्य वृत्तांत दिलेला आहे. त्यातील पहिल्याने आपल्या शौर्याने आणि धैर्याने अमर कीर्ती संपादिली आहे, आणि अखिल मानवजातीने त्याला 'महान् सेनानी' असे नाव एकमुखाने दिले आहे. दुसरा म्हणजे पेरेडेसचा डीएगो गार्सिया हा उच्च कुळातील होता. त्याचा जन्म एस्ट्रेमॅडुरामधील ट्रूक्सिल्लो येथे झाला. त्याचे धैर्य अलौकिक होते आणि त्याचे सामर्थ्य प्रचंड होते. एखाद्या चक्कीचे चक्र अत्यंत वेगाने फिरत असताना तो आपल्या एका हाताने ते थांबवू शके. प्रबळ शत्रू चालून आला असताना त्याने एकट्याने पुलाच्या रस्त्याचे रक्षण केले. त्याच्या आयुष्यातील आठवणी म्हणून, दुसरी किती तरी महत्कृत्ये सांगितली जातात. ती अत्यंत संयमाने आणि निःपक्ष सत्याने सांगितलेली असली तरी त्यामुळे त्याचे चरित्र सहजच कळून येते. त्या आठवणी दुसऱ्या एखाद्याने स्वैरपणे आणि निःपक्षपाताने लिहिल्या असत्या तर ते तुमचे हेक्टर्स, ॲकिलिसेस आणि ओर्लँडोज् या सर्वांची शौर्याची कृत्ये झाकून गेली असती."

खाणावळवाला म्हणाला, "वा, ही छान थट्टा आहे. महाराज, माझ्या बापाने तुम्हाला दुसरीच गोष्ट सांगितली असती. चक्कीचे चक्र थांबविण्याची गोष्ट काय सांगता? तो काय एवढा पराक्रम आहे? त्या फेलिक्स मार्टेच्या ग्रंथातील कोणतेही पान उघडा म्हणजे तुम्हाला असे आढळेल की, त्याने पाठीत एक दंडुका लगावला की, पाच बलाढ्य राक्षस जमिनदोस्त होत. लहान मुले छोट्या छोट्या पिपाण्या करण्यासाठी घेवड्याच्या शेंगांची पाने तोडून घेतात ना? तसे ते राक्षस तोडले जात. दुसरे पान उघडले की तुम्हाला असे आढळेल की, नखशिखांत सशस्त्र असलेल्या सोळा लाख लढाऊ सैनिकांच्या बलाढ्य नि सामर्थ्यशाली सैन्यावर तो एकटा तुटून पडला आणि त्याने त्या सर्वांना शेळ्या-मेंढ्याप्रमाणे पिटाळून लावले. आणि थ्रेसचा थोर सिरोन जिलियोबद्दल तुम्हाला काय म्हणावयाचे आहे? त्याच्यासंबंधी तुम्हाला त्या पुस्तकात असे वाचावयास मिळेल की, एके दिवशी तो नदीतून जात असताना, मध्यावर आला तेव्हा, एका भीषण सर्पाने त्याच्यावर हल्ला केला. तेव्हा त्या सर्पाच्या मस्तकावर त्याने तत्काळ चपळाईने उडी घेतली आणि त्या सर्पाच्या गळ्याला लोंबकळून आपल्या दोन्ही हातांनी त्याची मान घट्ट पकडली. त्यामुळे तो सर्प गुदमरला आणि आपला बचाव करण्यासाठी त्या शिलेदारासह त्याला पाण्यात बुडी घेणे भाग पडले, तेथेही त्याने त्या सापावरील आपला ताबा सोडला नाही. नदीच्या अगदी तळाशी गेल्यावर त्याला तेथे

एक ऐश्वर्यशाली राजवाडा आणि आल्हाददायक उद्याने दिसली. तो एक चमत्कारच होता. तेथे जाताच त्या सर्पाचे रूपांतर एका जख्ख म्हाताऱ्यात झाले. आणि त्याने त्याला अशा काही गोष्टी सांगितल्या की, ज्या पूर्वी कोणीच कधीही सांगितल्या नसतील किंवा ऐकल्या नसतील. आता तुमचा महान् सेनानी आणि तुमचा डीएगो गार्सिया यांच्या-संबंधी. ''

हे त्यांचे भाषण ऐकून डोरोथी कार्डेनियोला सौम्य स्वराने म्हणाली, '' डॉन क्विक्झोट यांना आपले यजमान उत्तरार्ध सांगू शकतील. '' कार्डेनियो म्हणाला '' मलाही तसेच वाटते. या ग्रंथात सांगितलेल्या प्रत्येक बारीकसारीक गोष्टीवर त्यांच विश्वास बसतो, हे उघड आहे. जगातील साऱ्या कार्थुझियन भिक्षूंनी काहीही सांगितले तरी त्यांचे मत बदलणार नाही. '' पाद्री म्हणाला, '' मित्रा, मी तुला सांगतो की, शिलेदारीच्या या तुझ्या ग्रंथात ज्यांचा उल्लेख आहे अशी माणसे पृथ्वीच्या पाठीवर कधीही होऊन गेलेली नाहीत. तुमचा तो हिर्कानियाचा फेलिक्स मार्टे आणि ग्रेसचा सिरेनजिलियो–हे सारे कल्पनेचे खेळ आहेत. आळशी आणि विलासी माणसांच्या डोक्यातून निघालेल्या या कल्पित कथा आहेत. त्या तुम्ही ज्या कारणासाठी वाचता, त्याचसाठी त्यांनी त्या लिहिलेल्या असतात. त्यांना दुसरा काही उद्योगच नसतो. '' खाणावळवाला म्हणाला, '' महाराज, तुम्ही आपल्या विचाराचे जाळे दुसरीकडे टाका. या विषयात तुम्हाला काही गवसणार नाही. कोणती वस्तू कशी आहे आणि दुसरी कशी आहे, हे मी जाणतो. माझा जोडा कोठे चावतो हे मी सांगू शकतो. जुन्या–पुराण्या माणसांच्या डोळ्यात आपण धूळफेक करू असे तुम्ही समजू नका. हे सारे महान् ग्रंथ म्हणजे असत्य अशा कपोल–कल्पित कथा आहेत, अशी माझी समजूत करून देण्याचा तुम्ही प्रयत्न करणे ही केवळ एक गंमतीची थट्टा होईल. अहो, त्या कथा छापलेल्या नाहीत का ? आणि प्रसिद्ध झालेल्या नाहीत काय ?—वरिष्ठ न्यायालया-सारख्या अधिकारी संस्थेने त्यांना मंजुरी दिली नाही का ? अशा खोट्यानाट्या गोष्टी छापण्यास ते परवानगी देतील असे तुम्हाला वाटते काय ? अशा असंख्य लढाया आणि चमत्कार प्रसिद्ध करून आम्हा सर्वांना वेड लावण्यास ते मुभा कशी देतील ? ''

पाद्र्याने उत्तर दिले, '' मित्रा, मी तुला पूर्वीच हे सांगितले आहे की, ज्यावेळी माणसांना काही उद्योग नसतो. तेव्हा विरंगुळा म्हणून टेनिस, बिलियर्ड, बुद्धिबळ वगैरे करमणुकीचे प्रकार आपण चालू देतो. त्याचप्रमाणे रिकाम्या वेळची करमणूक करण्यासाठी या ग्रंथांना परवानगी दिली जाते. या अशा ग्रंथांपासून वेड लागण्याचा जो धोका तुम्ही आग्रहाने सांगता, तो सरकारच्या लक्षात आधी आलेला नसतो. कारण त्यातील मूर्खपणाच्या गोष्टीवर कोणी विचारी माणूस विश्वास ठेवील असे सरकारला वाटण्यास काही कारण नाही. आता जर भरपूर वेळ असता, तर अशा साहित्याच्या बाजूने मी पुष्कळ बोललो असतो. काही निर्बंध घालून असे साहित्य बोधप्रद नि आनंदप्रद कसे करता येईल हेही

मी सांगितले असते. पण या बाबतीतले माझे विचार अधिकारी माणसांना सांगण्याची पहिली संधी घेण्याचा माझा विचार आहे. म्हणजे ते अधिकारी त्या साहित्यातील दोष दूर करतील. तोपर्यंत प्रामाणिक मालकसाहेब, आपण हे ग्रंथ बाजूस ठेवावेत आणि आपली इच्छा असेल तर त्यातील वर्णने खरी आहेत, असे खुशाल मानावे. त्यामुळे तुमचे पुष्कळ कल्याण होईल. आपले पाहुणे डॉन क्विक्झोट यांच्याप्रमाणे आपण वागू नये म्हणजे झाले." खानावळवाला म्हणाला," तशी भीती मुळीच नाही. शिलेदार होण्याचा माझा मुळीच विचार नाही. कारण शिलेदारीच्या उदात्त परंपरेला आधारभूत असणाऱ्या चालीरीती आता पार लुप्त झाल्या आहेत."

त्यांच्या या संभाषणाच्या मध्यावर सँको तेथे आला. तो फार बेचैन झालेला होता. 'शिलेदारी कालबाह्य झाली आहे आणि शिलेदारीच्या ग्रंथात कल्पित व वेड्या अशाच गोष्टी भरलेल्या असतात,' हे ऐकून त्याचे चित्त अस्वस्थ झाले होते. (त्यांनी शिलेदारीचा कितीही धिक्कार केला तरी) आपण आपल्या धन्याला चिकटून राहण्याचा त्याने निर्धार केला. त्याच्या संकल्पित मोहिमेला यश आले नाही, तर आपण आपल्या घरी जाऊन हातात नांगर धरण्याचा त्याने निश्चय केला. खानावळवाला ते ग्रंथ घेऊन जात असताना पाद्री म्हणाला, "इतक्या सुंदर अक्षरात लिहिलेल्या त्या हस्तलिखितावर नजर टाकण्याची परवानगी आपण मला द्यावी, अशी माझी इच्छा आहे." असे म्हणून तो त्याचेजवळ गेला आणि आठ पानांची चवड तो पाहू लागला. त्यांपैकी एकावर मोठ्या अक्षरात लिहिले होते. 'एका चमत्कारिक अशिष्टाची कादंबरी.' पाद्री म्हणाला, "या नावावरून या ग्रंथात काही वाचनीय असेल असे वाटते." खानावळवाल्याने उत्तर दिले,

"पूज्य धर्मगुरो, यांच्या वाचनाहून अधिक उपयुक्त उद्योग सापडणार नाही. कारण, ज्या ज्या लोकांनी ही कादंबरी वाचली आहे, अशा कैक बुद्धिमान पाहुण्यांनी तिची प्रशंसा केली आहे आणि तिची मागणी मजकडे केली आहे. पण काही झाले तरी मी ती देणार नाही. या कातडी पेटीच्या मालकालाच ती मी देईन. ते ग्रंथ आणि हे कागद असलेली ही कातडी पेटी त्याने येथे ठेवली आहे. तो कदाचित् मला पुनः भेटेल, तेव्हा मी हे सारे त्याला प्रामाणिकपणे परत करीन. मी खानावळवाला असलो तरी माझ्या शेजाऱ्याइतकाच मी खिश्चन आहे." पाद्री म्हणाला, "पण त्याची नक्कल करून घेण्यास आपण मला नकार देणार नाही अशी आशा आहे." यजमान उत्तरला, "नव्हे, त्या बाबतीत आपला मतभेद होणार नाही." या वेळेपर्यंत कार्डेनियोने ती पाने थोडी चोळली आणि पाद्र्याला ती वाचण्यास सांगितले. साऱ्या मंडळीच्या करमणुकीसाठी ती पाद्र्याने मोठ्याने वाचावीत अशीही विनंती त्याने केली. तेव्हा पाद्री म्हणाला," रात्रीची वेळ गैरसोयीची आहे आणि या वेळी सर्वांना-विशेषतः या बाईसाहेबांना-झोप मिळणे अवश्य आहे. म्हणून मी मोठ्याने वाचन न केले तर मला क्षमा करा." पण डोरोथी म्हणाली," एखाद्या गमतीच्या गोष्टीने

मला काही काळ उत्तम विश्रांती मिळेल. मला विश्रांतीची गरज असली तरी माझे मन थाऱ्यावर नसल्यामुळे मला आताच विश्रांती मिळणार नाही. म्हणून आपण वाचन करावे." या तिच्या विनंतीला मि. निकोलस आणि सँको यांनी दुजोरा दिला. तेव्हा पाद्री म्हणाला, "तर मग तुम्हाला आनंद देण्यासाठी आणि माझी जिज्ञासा तृप्त करण्यासाठी मी वाचण्यास सुरुवात करतो. मात्र तुम्ही अवधान द्यावे."



## प्रकरण ६

# चमत्कारिक अशिष्टाची कादंबरी

इटलीमधील टस्केनी प्रदेशाची राजधानी फ्लॉरेन्स. त्या राजधानीत ॲन्सेल्मो व लोथॅरियो हे दोन भले सज्जन राहात असत. त्यांची मैत्री इतकी प्रख्यात होती की, 'मित्र-द्वय' या नावानेच ते दोघे संबोधिले जात. ते दोघेही तरुण होते आणि अविवाहित होते. दोघांचेही वय आणि स्वभाव सारखेच होते. स्वभावाच्या मीलनामुळे त्यांची परस्परांची मैत्री अखंड चालू होती. त्या दोघांपैकी ॲन्सेल्मोचा कल प्रणयाकडे विशेष होता, तर लोथॅरियोला शिकारीचा नाद फार होता. पण इतर कोणत्याही गोष्टीचा विचार न करता, ते एकमेकांवर प्रेम करीत असत आणि दुसऱ्याच्या सुखासाठी आपल्या सुखावर पाणी सोडीत असत. सुयंत्रित घड्याळातील चक्रांच्या भिन्न-भिन्न गती असल्या, तरी ते घड्याळ एकच वेळ दाखवीत असते, त्याप्रमाणे या दोघा मित्रांच्या आवडी-निवडी कितीही भिन्न असल्या तरी त्या सर्व त्यांच्या ऐक्यभावाला नेहमी पोषकच असत — त्या दोघांची मैत्री नेहमी अभंग असे. शेवटी ॲन्सेल्मो त्याच शहरातील एका लावण्य-लतिकेच्या गाढ प्रेमात पडला. ती तरुणी आपल्या कुलशीलाबद्दल आणि धनदौलतीबद्दल सुविख्यात होती. तेव्हा तिला लग्नासाठी मागणी घालण्याचा त्याने निश्चय केला आणि त्यासाठी त्याने आपल्या मित्राची संमती घेतली. ( त्याच्या सल्ल्याशिवाय तो काहीही करीत नसे. ) हे लग्न जुळवून आणण्याचे काम लोथॅरियोकडे साहजिकच आले. ते त्याने इतक्या कौशल्याने पार पाडले की, थोड्याच दिवसात त्याचा मित्र कॅमिल्लाच्या मुठीत गेला – त्या तरुणीचे हे नाव होते. या लग्नामुळे त्या पति-पत्नींना इतका काही आनंद झाला की, त्यांनी लोथॅरियोला शतशः धन्यवाद दिले. कारण, त्याच्या प्रयत्नामुळेच त्या दोघांना समान सौख्य लाभले होते. जोपर्यंत विवाह-समारंभ चालू होता, तोपर्यंत लोथॅरियो दररोज ॲन्सेल्मोच्या घरी असे आणि त्या प्रसंगाला उचित अशा क्रीडा-महोत्सवात आणि इतर मौजेच्या प्रकारात भर घालीत असे. परंतु या नवविवाहित दांपत्याने आपल्या मित्रांचे आशीर्वाद घेतल्यानंतर आणि विवाहाचा सोहळा संपल्यानंतर लोथॅरियो, त्यांच्या अन्य मित्रांप्रमाणे, त्यांच्या घरातून निघून गेला. तो त्यांच्या भेटी टाळू लागला. लग्नानंतर पूर्वीप्रमाणे आपल्या मित्राच्या घरी आपण वारंवार जाणे मुळीच योग्य नाही हे त्याने शहाणपणाने जाणले. अर्थात् खरी मैत्री सारे संशय आणि मत्सर यांना हद्दपार करते, हे खरे; पण विवाहित माणसाची प्रतिष्ठा इतकी सूक्ष्म व नाजूक असते

की, जिवलग नातलगांच्या संभाषणानेसुद्धा ती केव्हा केव्हा ढासळते – विशेषतः मित्राच्या संभाषणाने ती प्रतिष्ठा ढासळण्याचा संभव अधिक असतो.

लोर्थरियोची ही उपेक्षा ॲन्सेल्मोच्या ध्यानी आली. तो आपल्या पत्नीवर लुब्ध असला, तरी त्याने लोर्थरियोकडे मृदु शब्दांनी कुरकुर केली, आणि त्याच्या दूर राहण्याचा परिणाम आपल्या मनावर किती झाला आहे, हे त्याने त्याला सांगितले आणि म्हटले, " असे होणार असे जर मला आधी वाटले असते, तर मी लग्न करून आपल्या प्रिय मैत्रीवर पाणी सोडले नसते. अरे, माझे तुझ्यावर इतके प्रेम आहे की, माझी विषयवासना तृप्त करण्यासाठी मी इतकी जबर किंमत कधीच दिली नसती. आणि आपण मोठे दक्ष पती आहो, अशा वायफळ लौकिकासाठी, ' मित्र–द्वय ' हे अत्यंत कोमल नि सुखद नाव कधीच सोडले नसते. लग्नापूर्वी ही पदवी आपल्याला मिळाल्यामुळे किती आनंद वाटत होता ! आपणा उभयतामध्ये जे शब्द वापरण्याची काही गरज नाही, ते वापरून मी तुला विनंती करतो की, आपला पूर्वीचा परिचय आणि मुक्तकंठ संवाद पुनः खळखळून वाहू दे. माझ्या बायकोची आवड आणि आनंद पूर्णपणे माझ्यावरच अवलंबून आहे. तिला आपल्या जुन्या-पुराण्या आणि दाट मैत्रीची कल्पना आहे. म्हणून त्या मैत्रीत झालेला हा अकल्पित बदल पाहून तिलाही माझ्याइतकेच आश्चर्य वाटते." आपल्या मित्राच्या या प्रेमळ आर्जवाला लोर्थरियोने मोठ्या समंजसपणाने व विवेकाने उत्तर दिले आणि सांगितले, " मी जे काही केले, त्यात माझा हेतू अगदी शुद्ध होता." हे ॲन्सेल्मोला पटले. तेव्हा त्या दोघांनी असे ठरविले की, सणावाराशिवाय आठवड्यातून दोन वेळा लोर्थरियोने ॲन्सेल्मोच्या घरी जेवण करावे. लोर्थरियोने हा करार मान्य केला, तो केवळ आपल्या मित्राला वाईट वाटू नये म्हणून. ॲन्सेल्मोच्या प्रतिष्ठेला धरून जेवढे करता येईल, तेवढेच करावे असे त्याने ठरविले.

स्वतःच्या लौकिकाइतकाच ॲन्सेल्मोचा लौकिक त्याला प्रिय होता. म्हणून तो त्याला म्हणाला, " सुंदर स्त्रीच्या पतीने आपल्या घरी जे मित्र बोलवावयाचे त्यांच्यासंबंधी फार सावध असले पाहिजे. इतर परिचित स्त्रियांप्रमाणे आणि पाहुण्यांप्रमाणेच त्यांना त्याने वागविले पाहिजे. प्रार्थनामंदिर, बाजारपेठ, सार्वजनिक करमणुकीची स्थाने आणि विश्रांतीची स्थाने येथे जाण्यास कोणताही पुरुष आपल्या पत्नीला पूर्ण प्रतिबंध करू शकत नाही. पण तरीही तेथे जी कारस्थाने करता येत नाहीत ती, कोणालाही संशय न येता, मित्राच्या किंवा नातलगाच्या घरी करणे पुष्कळ वेळा सहज शक्य असते. आपल्या वर्तनातील दोषांची आठवण करून देण्यासाठी प्रत्येक विवाहित माणसाला कोणी तरी मित्र असला पाहिजे. आपल्या लौकिकाला लाभदायक काय आणि हानिकारक काय हे पाहून, तसे करण्यास किंवा न करण्यास, पती आपल्या पत्नीला सांगू शकत नाही. त्यामुळे तिची मर्जी खप्पा होईल अशी भीती त्याला वाटते. पुष्कळ वेळा तर त्याला आपल्या पत्नीवरील प्रेमामुळे या गोष्टी कळतच नाहीत. अशा वेळी मित्राने दिलेला इषारा आणि उपदेश हा योग्य ठरतो. पण मित्रा, तू जितक्या ज्ञानी आणि सत्यनिष्ठ

मित्राची अपेक्षा करतोस, तसा मित्र आपल्याला कोठे मिळणार ? " आपल्या मित्राच्या लौकिकाला लोथॅरियो इतका जपत होता की, त्यामुळे तो, पूर्वी वचन दिलेल्या दिवशीही, ॲन्सेल्मोच्या घरी जात नसे. कॅमिल्लासारख्या लावण्य–लतिकेच्या घरी त्याच्यासारख्या शहाण्या, भाग्यवान आणि देखण्या तरुणाने वारंवार जाणे त्याला योग्य वाटत नव्हते नाही तर कुटाळ लोक भलत्या कंड्या पिकवावयाचे. अशा कंड्या न पसरण्याइतका त्याच्या शीलाचा लौकिक होता हे खरे. पण आपल्या स्वतःच्या किंवा आपल्या मित्राच्या अब्रूबद्दल कोणी शंका घ्यावी, हाही धोका पत्करण्यास तो तयार नव्हता. म्हणून जे दिवस आपल्या मित्राच्या सुख–संवादात घालविण्याचे त्याने कबूल केले होते, त्यातील बराचसा काळ तो इतर ठिकाणी, अन्य उद्योगात, घालवू लागला–आणि त्यासाठी सहज पटणाऱ्या सबबी सांगू लागला. ॲन्सेल्मोलाही त्या सबबी सयुक्तिक नाहीत असे म्हणवेना. अशा प्रकारे एका बाजूने प्रेम व मैत्री आटल्याचे आरोप करुण–स्वराने करण्यात येऊ लागले आणि दुसऱ्या बाजूने त्यासाठी विश्वासार्ह कारणे पुढे करण्यात येऊ लागली.

एके दिवशी आपल्या मित्राबरोबर शेतातून हिंडताना ॲन्सेल्मो म्हणाला, " माझा जन्म, माझे भाग्य आणि माझा स्वभाव याबाबतीत परमेश्वराने माझ्यावर जो कृपा–प्रसाद केला आहे, त्याबद्दल मी त्याचा अत्यंत ऋणी आहे. पण त्या सर्व ऋणांत महान ऋण म्हणजे, अशी पत्नी आणि असा मित्र मला लाभला हे होय. त्याची मला पुरी जाणीव आहे. तुम्ही दोघेही इतके गुणवान आहात की, तुमच्या योग्यतेइतका आदर आणि प्रेम बाळगणे मला शक्य नाही. पण तुम्हा दोघाविषयी मला जो आदरभाव नि प्रेमभाव वाटतो त्याहून अधिक कोणाला वाटणे शक्य नाही. सामान्यतः माणसाला सुखी करण्यासाठी जे जे काही लागते, ते सर्व मला मिळालेले आहे, तरीसुद्धा माझे आयुष्य साऱ्या जगात अत्यंत असंतुष्ट असेच आहे. माझे दुःख केव्हा सुरू झाले हे मी तुला सांगू शकत नाही, पण ते दुःख इतके विचित्र, विलक्षण आणि अतिरेकाचे आहे की, त्याचे चिंतन मी कधीच करीत नाही. माझे मलाच नवल वाटते, माझ्या मूर्खपणाचा धिक्कार माझा मीच करतो आणि त्याला आळा घालण्याचा प्रयत्न करितो. माझ्या इच्छा मी माझ्यापासूनही लपवू इच्छितो. मी जर माझ्या दुःखाचा हा कडेलोट साऱ्या जगापुढे प्रसिद्ध करून मांडिला असता, तर आताच्या वैयक्तिक गोंधळापेक्षा माझा अधिक काही तोटा झाला नसता. प्रिय लोथॅरियो, हे माझे दुःख केव्हां तरी बाहेर पडणार हे उघड आहे. म्हणून माझी इच्छा ही आहे की, तुझ्यासारख्या निष्ठावंत माणसाच्या पलीकडे माझ्या दुःखाची कहाणी जाऊ नये. ती तू गुप्त ठेवशील असे मला वाटते. त्यामुळे मी जो उद्योग आरंभणार आहे, ( आणि माझा मित्र म्हणून तू त्या कामी मला मदत करावीस ) त्यामुळे मी सध्याच्या वेदनातून सत्वर मुक्त होईन आणि माझ्या मूर्खपणामुळे मी जी चित्तशांती गमावून बसलो आहे, ती मला पुन्हा परत मिळेल."

एवढ्या विचित्र आणि लांबलचक प्रस्तावनेचा शेवट काय होणार याचा अंदाज लोथॅरियोला करता येईना आणि म्हणून तो मोठ्या संदेहात सापडला. आपल्या

मित्राच्या व्यथेची कारणे काय असावीत, हे शोधण्यासाठी त्याने आपले डोके खाजविले पण व्यर्थ! सत्य काय असेल हे त्याच्या कल्पनेतही येईना. पण अधिक काळ संदिग्ध अवस्थेत न राहवून तो ॲन्सेल्मोला म्हणाला, " तू मला आपले विचार सांगितलेस, पण मुख्य मुद्याला तू हात घातला नाहीस, त्यामुळे आपल्या मैत्रीची काहीशी हानि होत आहे. माझ्या सल्ल्यामुळे तुझ्या हट्टाला नि इच्छाना पाठींबा मिळेल किंवा कदाचित त्या नष्ट होतील. "

ॲन्सेल्मोने उत्तर दिले, " अगदी खरे आहे हे! हे तुझे आश्वासन मिळाल्यानंतर मी तुला माझी इच्छा सांगितली पाहिजे. ती म्हणजे, मी कॅमिल्लाला जितकी शीलसंपन्न समजतो, तितकी ती खरोखर आहे काय, हे जाणण्याची मला इच्छा आहे आणि या इच्छेमुळेच माझ्या मनाला इतक्या वेदना होत आहेत. ही जिज्ञासा तृप्त करण्यासाठी असे एखादे दिव्य केले पाहिजे की, त्यामुळे तिच्या लायकीचा प्रकार नि प्रमाण सिद्ध व्हावे. अग्नीत टाकलेल्या सोन्याची परीक्षा होते ना? तशी तिच्या शीलाची परीक्षा व्हावयास हवी. माझे मत तर असे आहे की, तिच्यासारखे शील दुसऱ्या कोणत्याच स्त्रीचे नसेल. " जिच्या शीलाची परीक्षाच झाली नाही, ती अप्सराही शुद्धच मानली पाहिजे. " अशी म्हणच आहे. एखाद्या प्रेमिकाने गाळलेली आसवे, घेतलेल्या शपथा, दिलेली वचने, अर्पिलेल्या देणग्या आणि नाना तऱ्हेच्या विनवण्या– या सर्वांना सहजा-सहजी कोणतीही स्त्री नकार देऊ शकत नाही. पण जी देत असेल, तीच काय ती शील-संपन्न म्हटली पाहिजे. जिला भ्रष्ट करण्यासाठी कोणी कधीही प्रयत्न केला नाही, तिच्या शीलाची प्रशंसा करण्यात काय अर्थ? ज्या स्त्रीचा नवरा मत्सरी आहे,— थोडाही संशय आला तरी जो तो खरा धरून चालतो आणि त्यासाठी मृत्यूची शिक्षा तिला देतो, ती स्त्री संयमी राहिली तर त्यात नवल काय? स्वैराचारी होण्याचा मोह किंवा संधी तिला मिळालेलीच नसते. बेइमान होण्याची संधिच जिला मिळाली नाही किंवा भीतिमुळे जिने आपले शील शाबूत राखिले आहे, तिच्याबद्दल मला फारसा आदर वाटत नाही. उलट, एखाद्या चतुर नि पराक्रमी प्रेमिकाच्या सर्व हल्ल्यावर जी स्त्री यशस्वीपणे मात करते आणि आपले शील पूर्णपणे अभंग राखते, तिच्याबद्दल मला आदर वाटतो. या आणि अशा पुष्कळ कारणामुळे माझे मत दृढ झाले आहे, आणि ते हे की, कोणी किती जोराने विनवण्या नि प्रार्थना केल्या तरी त्यांच्या अग्नि-दिव्यातून माझ्या कॅमिल्लाचे शील तावून-सुलाखून बाहेर पडेल. तिचे अनुकूल मत मिळविण्याची पात्रता ज्याचे अंगी आहे, अशा एखाद्या नरवीराच्या प्रेम–याचनेलाही ती धुडकावून लावील, असे मला वाटते. अशा प्रभावी मोहाला प्रतिकार करण्यास ती समर्थ आहे, असा मला विश्वास वाटतो. तसे झाले तर मी स्वतःला जगातील एक अत्यंत सुखी माणूस मानीन आणि माझ्या सर्व इच्छांची परिपूर्ति होईल. नंतर मी म्हणेन, शहाणा माणूस जिचे वर्णन ' अलभ्य ' या शब्दाने करतो, ती शीलवती माझ्या पदरी पडली आहे. उलट, ती जर मोहाला वश झाली, तर स्त्रियांविषयीचे माझे मत योग्य ठरल्याचे समाधान मला लाभेल. स्त्रियांविषयी वेडगळ

विश्वास धारण केल्याने पुष्कळ पुरुषांची हानि झाली आहे. तसा विश्वास मी पुढे बाळगणार नाही आणि त्यामुळे या महागड्या प्रयोगापासून मला जे दुःख होईल, ते मी सहन करू शकेन. तू काही जरी म्हटलेस तरी मी माझ्या निश्चयापासून ढळणार नाही.

"अरे माझ्या प्रिय मित्रा, माझी योजना कार्यवाहीत तूच आणावीस अशी माझी इच्छा आहे. तू तिच्यावर मोहिनी घालण्यासाठी मी तुला भरपूर संधी देईन. विनयशील, शीलसंपन्न, संयमी आणि विवेकी अशा स्वभावाच्या गुणी स्त्रीच्या मनावर ज्याचा ज्याचा पगडा बसेल असे तुला वाटेल, ते ते तू सारे करावेस– काहीही वगळू नयेस, अशी माझी इच्छा आहे. या योजनेच्या कामी मी तुझी निवड करतो, याचे सर्वात बलवत्तर कारण हे की, तुझ्या आर्जवानी नि विनवण्यानी जिंकली जाण्याइतकी ती दुर्बल ठरली तर तुझ्या विजयाचे मला फारसे दुःख वाटणार नाही. दुसऱ्या कोणी तरी निःशंक-पणे जो लाभ उठवावयाचा, तो तू उठवलास तर मला भीति नाही. कारण त्यामुळे माझी प्रतिष्ठा अबाधित राहील आणि माझी होणारी हानि गुप्त राहील. कारण तू मौना पाळशील–मृत्यु किंवा थडगे यांचे भय न बाळगता तू गप्प राहशील. माझ्या मित्राला मी चांगले ओळखतो. म्हणून तू जर मला खरोखर जीवन अर्पण करणार असशील आणि संशयाच्या अत्यंत तीव्र वेदनातून मला मुक्त करणार असशील, तर अत्यंत प्रेमाने, परि-श्रमाने आणि धैर्याने हे प्रेमाचें आक्रमण करण्याचे कार्य तत्काळ सुरू कर. तुझ्या मैत्रीवर माझा जो विश्वास आहे, त्यामुळे तू हे करशील अशी माझी अपेक्षा आहे."

ॲन्सेल्मोच्या युक्तिवादाकडे लोथॅरियोने इतके लक्ष दिले होते की, त्याने त्याच्या निवेदनात केव्हाही खंड पाडला नाही. जो काही थोडासा खंड आला असेल, तो आम्ही सांगितलाच आहे. पण आता त्याचे निवेदन समाप्त झाले आहे हे पाहून, लोथॅरियोला त्याच्या अतिरेकी सूचनेचे आश्चर्य वाटले आणि त्याने त्याला उत्तर दिले, "माझ्या प्रिय ॲन्सेल्मो, आतापर्यंत तू जे काही बोललास ती पोकळ बडबड होती असे मला वाटले असते, तर मी इतका वेळ स्तब्ध बसलो नसतो. फार काय, तुझ्या भाषणाच्या प्रारंभीच मी तुला थोपविले असते. हे सारे तुला पक्के माहीत आहे. मी पूर्वीपेक्षा आता बदललो आहे, असे तुला वाटत असले पाहिजे, नाही तर अशा कामी तू माझी योजना कधीच केली नसतीस. कारण एका कवीने म्हटले आहे की, 'ईश्वराला अमान्य असेल असे काहीही करण्यास खरा मित्र आपल्या मित्राला सांगणार नाही.' पण आपल्या मित्राच्या विनंतीला मान देऊन, धर्माच्या सक्त आज्ञेपासून किंचित्‌हि चळण्यास कोणी तयार झाला, तर त्याच्या क्षुद्र हेतूमुळे त्याचे अधर्माचरण कधीही क्षम्य ठरणार नाही. आपल्या मित्राचे जीवित किंवा अब्रू यासाठीच तो अल्पशी धर्मच्युती पत्करील. तेव्हा ॲन्सेल्मो, तुझ्या इच्छेनुसार इतके तिरस्करणीय कार्य मी हाती घेण्यासाठी तुझे जीवित किंवा अब्रू यापैकी काय संकटात आहे? काहीही नाही, असे म्हणण्याचे धाडस मी करतो. उलट, तू सांगितलेल्या कामगिरीमुळे तुझ्या आणि माझ्या दोघांच्याही जीवितावर नि अब्रूवर मी आघात केल्यासारखे होईल. कारण, तुझी कीर्ती हिरावून घेणे म्हणजे तुझे

प्राण हिरावून घेण्यासारखेच आहे. कीर्तिहीन जीवित मृत्यूपेक्षाही वाईट. असे असताना तू मला त्या अपराधाचे साधन बनवीत आहेस आणि माझी कीर्ती ठार मारून मला मेलेल्या माणसापेक्षाही वाईट अवस्थेस पोचवीत आहेस. म्हणून तुझ्या बेछूट इच्छेविरुद्ध मला जे काही अट्टाहासाने सांगावेसे वाटते, ते तू शांतपणे ऐकून घ्यावेस अशी माझी इच्छा आहे. त्यानंतर तू जे उत्तर देशील, ते मी, अडथळा न आणता, ऐकेन."

ॲन्सेल्मोने त्याचे भाषण लक्षपूर्वक एकण्याचे वचन दिल्यानंतर, लोथॅरियोने पुढीलप्रमाणे बोलण्यास सुरुवात केली," मूर लोकांपेक्षा तू काही वेगळा नाहीस असे माझे मत आहे. मूर लोकांच्या धर्मात, धर्मग्रंथांत, युक्तिवादात किंवा त्याच्या श्रद्धास्थानातून निघालेल्या विचारात कोणी काही चूक दाखविली, तर ते ती कधीच पटवून घेत नाहीत. गणित-शास्त्राप्रमाणे ज्या गोष्टी सिद्ध करून दाखविता येतील, तेवढ्याच ते मान्य करतात. दोन सारख्या भागातून आपण दोन सारखे भाग काढून घेतले, तर उरलेले भागही समान असतात, हे कोणाला नाकारता येईल? पण हा सिद्धांत त्यांना क्वचित्‌च कळतो. तो त्यांना न कळल्यामुळे आपल्याला तो अधिक स्पष्ट करून त्यांच्या बुद्धीला पटवून देणे भाग पडते आणि इतका सारा खटाटोप केल्यानंतरही, आपल्या धर्माच्या सत्य स्वरूपाची खात्री त्यांना अखेरीस पटत नाहीच. आता तुझ्याशी त्याच पद्धतीने मी बोलले पाहिजे. कारण तुझी इच्छा विवेकाला सर्वस्वी पारखी आहे. तुझ्या त्या इच्छेला मूर्खपणाशिवाय मी दुसरे नाव देऊ शकत नाही. तो तुझा मूर्खपणा तुला पटविण्याचा प्रयत्न मी करणे म्हणजे, मी माझा वेळ आणि श्रम वाया घालविणे होय, अशी मला फार भीति वाटते. माझे तुझ्यावर जितके प्रेम आहे तितके ते जर नसते, तर तुझ्या नाशाला खात्रीने कारणीभूत होणाऱ्या तुझ्या विक्षिप्त लहरीवर मी तुला सोडले असते. पण ॲन्सेल्मो, तू मला एका स्त्रीच्या अब्रूवर उठण्यास सांगून आपला मूर्खपणा अधिकच उघड केला आहेस. आणि ती स्त्री कशी? तर आपल्या लौकिकाला जपणारी आणि कोणावरही प्रेम करण्यास फारशी उत्सुक नसलेली. हे सारे सद्‌गुण तिच्या अंगी आहेत, हे तूच सांगतोस. अरे, शहाणपणा, विवेकीपणा, प्रतिष्ठितपणा आणि संयम–या सर्व गुणांनी तुझी पत्नी मंडित आहे, तर मग तिची अधिक चौकशी तू काय करणार? माझ्या साऱ्या प्रेमपूर्ण आक्रमणाला ती अजिंक्य ठरेल, असे मला वाटते आणि तुझाही विश्वास तसाच आहे. मग तिला आणखी मोठ्या आणि चांगल्या अशा कोणत्या संज्ञांनी तू संबोधणार? तू तिला खरोखर जसे जाणतोस, त्यापेक्षा ती अधिक चांगली आहे. असे समजण्याचे ढोंग तू करीत असशील किंवा आपण कशाची इच्छा धरतो, हे तुझे तुलाच कळत नसेल. तू मानतोस तितकी ती शीलसंपन्न नाही असे जर तुला वाटत असेल, तर तू तिच्या शीलाची परीक्षा का घेतोस? तिची जी योग्यता आहे असे तुला वाटते, तिला अनुसरून तू आपले वर्तन का ठेवीत नाहीस? ती फार चांगली आहे, असे आपण मानतो, असे तू दाखवितोस. तितकी ती जर खरोखर चांगली असेल, तर तिच्या सत्यनिष्ठेला आणि सौजन्याला मोहात टाकण्याचा

प्रयत्न तू का करतोस ? त्यापासून तुला काहीही लाभ होण्याचा संभव नाही. तिची सत्त्वपरीक्षा पूर्ण झाली म्हणजे ती पूर्वीसारखीच शीलवती स्त्री राहील. म्हणून ज्या कृत्याचा परिणाम कर्त्याला घातुक आणि धोक्याचा होण्याचा संभव आहे, ते कृत्य करणे आणि त्याची काहीच जरुरी नसताना करणे–त्याचा मूर्खपणा आपल्याला आधीच सहज कळून येण्यासारखा असताना करणे हा केवळ भित्रेपणाचा आणि विवेकशून्यतेचा परिपाक होय.

"धर्म किंवा स्वहित–अथवा दोन्हीही–यासाठी आपण काही बिकट कृत्य करण्यास प्रवृत्त होतो. धर्मासाठी साधुसंत या दुर्बल देहाकडून खडतर तपश्चर्या करून घेतात. दुसरा हेतू स्वहिताचा. त्यामुळे, द्रव्याच्या शोधार्थ, आपण दूरदूरच्या प्रवासाची आणि समुद्रावरील लांबलांबच्या सफरींची संकटे सोसण्यास तयार होतो. तिसरा हेतू म्हणजे या दोन्ही हेतूंचे मिश्रण. त्यामुळे आपण ईश्वराच्या मानासाठी आणि तसेच आपल्या कीर्तिसाठी नि कल्याणासाठी काही कृत्य करू लागतो. उदाहरणार्थ, एखादा शूर सैनिक धाडसी कृत्य करतो. ईश्वर, आपला राजा आणि आपला देश, यांच्याविषयीच्या आपल्या कर्तव्याने प्रेरित होऊन, तो युद्धात एखाद्या भयंकर खिंडारामध्ये त्वेषाने उडी घेतो, त्यावेळी त्याच्यापुढे जे संकट उभे असते, त्याचा तो काहीच विचार करीत नाही, आणि त्याचे त्याला कसलेही भय वाटत नाही. अशी कृत्ये रोज रोज घडत असतात आणि त्यामुळे ती कृत्ये करणाऱ्या माणसांना मान-सन्मान, कीर्ती आणि द्रव्य–लाभ होत असतो. पण तू जी योजना आखीत आहेस आणि जिचा प्रयोग करण्यास मला सांगत आहेस, त्यापासून तुला स्वर्गीय कीर्ती किंवा द्रव्यलाभ अथवा लौकिक हे काहीही मिळणार नाही. तुझा प्रयोग तुझ्या अपेक्षेप्रमाणे यशस्वी झाला तरी त्यामुळे तुझ्या संतोषात, सन्मानात किंवा संपत्तीत काहीही भर पडणार नाही. पण त्या प्रयोगात तुझ्या वाऱ्याला निराशा आली तर तू एक अत्यंत दुःखी माणूस होशील. तुझी बदनामी दुसऱ्या कोणाला कळणार नाही, ही कल्पना तू मनातून काढून टाक. त्या बदनामीची जाणीव तुला झाली म्हणजे जगातील साऱ्या दुःखदायक विचारांचा ससेमिरा तुझ्या पाठीमागे कायमचा लागेल. याचा पुरावा म्हणजे, विख्यात कवी लुडोव्हिको टॅन्सिलो याने आपल्या," संत पीटरचे अश्रु " या काव्याच्या पूर्वार्धाचे शेवटी केलेल्या कविता. तो म्हणतो—

> जेव्हा सर्वांत अदृश्य असता त्याला स्वतःचे सर्वाधिक दर्शन घडते
> आणि आत्म्याचे सर्वतोपरी अवलोकन करून तो रास्तपणे भयभीत होतो,
> तेव्हा गुलाबी सकाळ त्याचा प्रमाद उघडकीस आणताच
> लाज, दुःख, पश्चात्ताप पीटरच्या हृदयात वाढत जातात.
> कारण थोर सत्त्वाला दोषाची जाणीव झाल्यावर
> जिवाला क्षत पाडण्यास निन्दक नेत्रांची जरूर नसते;
> तर स्वतःला दोषी ठरवून आणि शिक्षाही करून तो पडून राहतो
> आणि निंदक विचारासारख्या साक्षीदाराला भीत नाही.

या साऱ्या गोष्टी गुप्त राखण्याची बढाई तू मारतोस, पण त्यामुळे तुझे दुःख

शमणार नाही—वाढेलच ! ते दुःख अश्रूंच्या रूपाने तुझ्या डोळ्यांनी व्यक्त केले नाही, तरी ते तुझ्या थेट अंतःकरणातून निघणाऱ्या रक्तातून वाहू लागेल. त्या कवीने म्हटले आहे, त्या साध्या—भोळ्या डॉक्टराने आपल्या कोमल प्रेयसीवर जो प्रयोग केला, त्यामुळे तो ढसाढसा रडू लागला. रीनाल्डो हा अधिक शहाणा. त्याने तो प्रयोग स्वतः करण्याचे टाळले. अर्थात् ही केवळ कविकल्पना आहे. पण तिचे तात्पर्य लक्षणीय आणि अनुकरणीय आहे. त्यानंतर तुला मी जे काही सांगेन ते तू ऐकलेस म्हणजे तुझी चूक तुला कळून येईल. ती विचित्र चूक करण्यासाठी तू घाई करीत आहेस.

" ॲन्सेल्मो, तुझ्याजवळ एक हिरा आहे अशी कल्पना कर. चांगल्या जाणत्या रत्न-पारख्यांच्या दृष्टीने, कोणताही हिरा जितका मोलाचा असू शकेल तितका तो हिरा मौल्यवान आहे, असेही समज. मग तो हिरा ऐरणीवर न ठेवता व त्याची निराळी पारख न करता, तू त्या रत्नपारख्याच्या मतावर संतोष मानशील की नाही ? तू त्यावर कितीही घाव घातलेस तरी तो अभंग राहिला, तर तू हे कबूल केले पाहिजेस की वेडे-पणाने त्याची परीक्षा करण्यापूर्वी जे मोल खरोखर होते त्यात रतिमात्र भर पडणार नाही. पण कोणी सांगावे, कदाचित् तो हिरा भंग पावेलही. आणि मग त्याची किंमत कवडीइतकीही राहणार नाही, एवढेच नव्हे तर त्याच्या धन्याची अक्कल आणि कीर्ती हीही कवडीमोल ठरेल. मित्रा, अरे, हे बहुमोल रत्न म्हणजे तुझी कॅमिला ! तसे तुझे मत आहे—आणि साऱ्या माणसांचेही आहे. मग तू तिला वेडेपणाने पतनाच्या खाईत का लोटतोस ? तिच्या सत्त्व—परीक्षेने तिच्या असलेल्या मोलात काहीही भर पडणार नाही. पण समज, ती त्या परीक्षेत दुर्बल ठरली, तर तुझी दुर्दशा काय होईल, याचा विचार कर. तिच्या आणि आपल्या स्वतःच्या नाशाचे कारण आपण आहोत, ही रुखरुख तुला लागेल—आणि तसे होणे योग्यच आहे. अरे, या जगात अत्यंत मौल्यवान रत्न म्हणजे नम्र नि एकनिष्ठ स्त्री. इतर लोकांच्या मतावर आणि प्रशंसेवर सर्व स्त्रियांचे गुण आणि मान अवलंबून असतो. तुझ्या आणि इतर सर्व लोकांच्या मताने, तुझी पत्नी आदर्श आहे. मग तिच्या गुणाविषयी तू उगाच शंका का घेतोस ? मित्रा, काहीही झाले तरी स्त्री—जातीचा स्वभाव दुबळा नि अपूर्ण असतो, हे तू लक्षात ठेव. म्हणून आपण तिच्या मार्गात विघ्ने आणू नयेत. शक्य तितकी काळजी घेऊन, आपण तिच्या पूर्णतेच्या प्रवासात कोणताही अडथळा आणू नये हाच खरा सद्गुण.

" प्राणि-शास्त्रज्ञांवर तुझा विश्वास असेल तर, अर्मिन नावाची मेंढी अगदी लहान असते आणि तिची लोकर हिवाळ्यात अत्यंत पांढरी असते व उन्हाळ्यात काळी असते. तिच्या रहाण्याचे ठिकाण शिकाऱ्यांना गवसले, म्हणजे ते धुळीने आणि चिखलाने भरून टाकतात. आपल्या अंगचा मूळचा पांढरा रंग धुळीने खराब होण्याऐवजी ती मेंढी आपल्या घरातून बाहेर पडते आणि स्वतःला पकडून घेते. आपले स्वातंत्र्य आणि आपले प्राण यांच्यापेक्षा आपल्या वर्णाला ती अधिक महत्त्व देते. शीलवती स्त्री अशीच असते. तिचे चारित्र्य हिम—धवल असते. तिचा श्वेत-वर्ण अबाधित राखण्यासाठी तू निराळाच

उपाय योजला पाहिजेस. एखाद्या उद्धट प्रेमिकाने केलेली आर्जवे आणि सेवा चिखला-सारखी असते. त्या चिखलात आपण कोणाही स्त्रीला कधीही लोटू नये. त्यात तिचा पाय घसरण्याची शक्यता फार. त्यातून बाहेर पडणे हे जवळ जवळ अशक्य. म्हणून तसा चिखल तिच्या वाटेत कोणीही टाकू नये. तिच्यापुढे फक्त प्रांजलपणा आणि शीलाचे सौंदर्य ठेवावे—कीर्ती आणि लौकिक याचेच काय ते आकर्षण तिला असावे. चांगली स्त्री ही स्फटिकाच्या आरशासारखी असते. आरशावर आपण फार श्वास टाकला म्हणजे तो खचित मलिन व फिकट होतो. साधुसंतांच्या अवशेषाप्रमाणे तिची पूजा करावी—पण तिला स्पर्श करू नये. कोवळ्याकोवळ्या फुलांच्या बागेचे दुरून दर्शन होताच आपले डोळे निवतात, पण प्रत्येक प्रेक्षकाने त्या फुलांना हाताने स्पर्श करण्यास किंवा पाया-खाली तुडविण्यास त्या बागेचा मालक कधीही परवानगी देणार नाही. आपल्या या सध्याच्या विषयाला अत्यंत अनुरूप असणाऱ्या काही कविता मी तुला ऐकवितो. एका नव्या नाटकातील त्या आहेत. त्यात एक शहाणा म्हातारा माणूस आपल्या शेजाऱ्याला सल्ला देतो की, तू आपल्या मुलीला कोंडून ठेवीत जा. त्यासाठी तो पुष्कळ कारणे सांगतो. त्यापैकी काही अशी आहेत—

ज्याअर्थी स्त्री आणि काच याहून नाजुक काही नाही
त्याअर्थी त्यांच्यावर पतनाचा प्रसंग आणील तो गर्दभच.
आणि तो अविचारी मर्त्य प्राणी आणखीच मूर्ख होय—
—जो इतक्या संवेदनाक्षम देहांवर प्रयोग करून पाहतो.
दोन्ही गोष्टी अगदी सहज भंग पावतात; मग त्या जपून ठेवा—
—ज्या कोणत्याही कलेने मूळ स्वरूपाला आणता येत नाहीत
किंवा डाग लावून दुरुस्त होत नाहीत. अनुरागी मनुष्या,
माझा सल्ला ऐक, जे इतके नाजुक आहे ते दक्षतेने सांभाळ,
कारण दानाईस असते तेथे सुवर्णवर्षावाचेच प्राबल्य राहणार.
( जेथे प्रेम फसते, तेथें सोने फत्ते पावते )

आत्तापर्यंत मी जे काही तुला सांगितले, ते सारे तुझ्यासंबंधी होते. आता माझ्या-संबंधी विचार करण्यास तू मला मोकळीक दिली पाहिजेस. मी जे सांगितले, ते सारे कंटाळवाणे असले, तरी तू मला क्षमा करशील अशी आशा आहे. तू ज्या चक्रव्यूहामध्ये उडी घेतली आहेस, त्यातून तुला बाहेर काढण्यासाठी मला इतके लांबलचक बोलावे लागले. तू मला आपला मित्र म्हणतोस, आणि तरीही माझी प्रतिष्ठा हिरावून घेऊ इच्छितोस. हे मैत्रीशी पूर्णपणे विसंगत आहे. एवढे करूनच तू थांबत नाहीस, तर तू आपल्या स्वतःच्या प्रतिष्ठेचा विध्वंस करण्यास मला भाग पाडीत आहेत. माझा लौकिक तू नष्ट करीत आहेस हे उघड आहे. मी जेव्हां कॅमिलापुढे माझ्या प्रेमाची घोषणा करीन, तेव्हा तिला काय वाटेल ? मी एक निमकहराम, दुष्ट माणूस आहे, आणि मैत्रीच्या अत्यंत पवित्र नियमाचे उल्लंघन बिनदिक्कतपणे करीत आहे आणि आपल्या प्रियकराच्या

लौकिकाचा आणि सन्मानाचा बळी आपल्या पापी वासनेला देत आहे, असे तिला वाटणार नाही काय ? दुसरी गोष्ट म्हणजे मी तुझ्या लौकिकाचा विध्वंस करीत आहे– आणि हे अगदी स्पष्ट आहे. मी जेव्हां तिच्याशी स्वैरपणाने वागू लागेन, तेव्हा तिला वाटेल, आपल्या अंगचे काही दोष याच्या नजरेस आले असले पाहिजेत, आणि म्हणून हा माणूस अशा पापकर्माला उद्युक्त झाला असला पाहिजे. या कल्पनेमुळे तिला आपल्या कीर्तीला कलंक लागल्यासारखे वाटेल. तिचा जो जो अपमान होईल, त्याचे दुःख तुला जरूर होईल. कारण तू तिच्या जीवनाचे प्रधान अंग आहेस. एखादा नवरा कितीही जागरूक, सावध आणि सत्पात्र असला आणि त्याची बायको स्वैराचारी असली तरी तो सारी निंदानालस्ती सहन करतो. खरोखर त्याचा धिक्कार करण्यापेक्षा त्याच्यावर दया केली पाहिजे. कारण त्याच्या कपाळी जे दुर्भाग्य आलेले असते, ते त्याच्या दोषामुळे नव्हे तर, त्याच्या पत्नीच्या पापामुळे आणि मूर्खपणामुळे ओढवलेले असते. पत्नीच्या मर्यादातिक्रमाबद्दल पतीला दुःख भोगावे लागते, या गोष्टीचा अनुभव तुला येईल.

"मी तुला या बाबतीत उत्तम सल्ला देईन. माझे भाषण कंटाळवाणे समजू नकोस. कारण ते तुझ्या हिताचे आहे. जेव्हा स्त्री पुरुषाला अर्पण करण्यात आली आणि स्वर्गात त्या दोघांची लग्नगाठ प्रथम बांधण्यात आली, तेव्हाच त्या स्त्री–पुरुषामध्ये अद्वैत निर्माण झाले. पत्नीच्या जीवनाचा पति हा एक अंश होय. जे तिचे दुःख, तेच त्याचे– मग त्याचे कारण तो नसेना का – आपल्या शरीराच्या एखाद्या भागाला दुखापत झाली, तर साऱ्या शरीराला वेदना होतात, पायाला टोचलेल्या काट्याची कळ थेट मस्तकापर्यंत जाऊन भिडते – आणि तिचे कारण ते मस्तक नसते, त्याचप्रमाणे स्त्री ही पुरुषाचा अंश असल्या कारणाने तिच्या दुर्लौकिकाचा परिणाम तिच्या पतीवर होतो. जगातील सारे मान नि अपमान आपल्या रक्तामासातूनच निघालेले असतात. एखाद्या बेइमान स्त्रीची निंदा–नालस्ती झाली, तर तिच्यात तिच्या पतीचा वाटा असतो– मग तिच्या दोषात त्याचा काही वाटा नसेना का– किंबहुना त्या दोषाचे ज्ञान त्याला काहीही नसेना का ! प्रिय ॲन्सेल्मो, तुझी पत्नी सध्या जी चित्त–शांति आणि विश्वास उपभोगीत आहे, तिला खो देण्याचा प्रयत्न केल्याने तू केवढ्या मोठ्या संकटात सापडशील याची जाणीव माझ्या भाषणाने तुला आली असेल. तुझी जिज्ञासा व्यर्थ आहे – तुझी लहर वेडेपणाची आहे. तू पापी वासना जागृत करशील. आतापर्यंत तिच्या चारित्र्यावर कोणी आघात केला नसल्यामुळे, तिच्या ज्या पापी वासना झोपी गेलेल्या असतील, त्या तुझ्या प्रयोगामुळे जागृत होतील. अरे, जरा विचार कर, एवढे धोक्याचे साहस करून तुला किती अल्प लाभ होईल ? आणि त्यासाठी तू केवढ्या मोलाच्या वस्तू संकटात टाकीत आहेत ? तू जो अमोल ठेवा गमावशील, तो तुला इतका प्रिय आहे की, त्याचे वर्णन करण्यास सारी शब्द–संपत्ती अपुरी ठरेल, आणि तरीही तुला त्या ठेव्याचे मोल कळणार नाही. पण मी जे जे काही बोललो, ते सारे तुझा वेडा निश्चय ढासळून टाकण्यास असमर्थ ठरले, तर तू आपल्या दुष्कीर्तीचे नि विनाशाचे दुसरे एखादे साधन पहा. कारण तुझ्या कीर्तीला

कलंक लावणाऱ्या या कार्यास मी कधीही हात लावणार नाही – मग त्यामुळे तुझ्या मैत्री-वर मला पाणी सोडावे लागले तरी बेहेत्तर ! अर्थात् जगातील सर्वांत मोठी हानी ती होईल असे मी मानतो. ”

याहून अधिक काही लोथॅरियो बोलला नाही. त्याच्या मुद्रेवरील एक प्रकारची खिन्नता पाहून ॲन्सेल्मो बराच काळ गप्प बसला—तो गोंधळून गेला होता. शेवटी तो म्हणाला, “ प्रिय मित्रा, मी तुझे सर्व भाषण अवधान देऊन ऐकले, ते तू पाहिले असशीलच. तुझ्या भाषणातील प्रत्येक अंशाने तुझ्या चातुर्याचा नि मैत्रीचा मोठेपणाच मला प्रतीत झाला. तुझ्या चातुर्यावर माझ्या वासनांनी जर मात केली, तर मी भल्याचा कंटाळा करीत आहे आणि वाईटाचा पिच्छा पुरवीत आहे, हे मी कबूल केले पाहिजे. पण मित्रा, उलट बाजूने तू असाही विचार करावास की, दृष्टीला नकोशा वाटणाऱ्या कोळसा, चुना इत्यादि पदार्थांची काही स्त्रियांना काही वेळा लालसा वाटू लागते. तशा स्त्रियांसारखाच माझा स्वभाव काहीसा आहे. म्हणून माझ्यावर उपचार करण्यासाठी थोडीशी कला उपयोगात आणली पाहिजे–ती सहज वापरता येईल. कॅमिल्लाच्या प्रेमाची याचना करण्यास तू राजी हो म्हणजे झाले. ती प्रेमयाचना कितीही दुर्बळ नि उपेक्षणीय असली तरी चालेल. तुझ्या पहिल्याच हल्ल्याला शरण येण्याइतकी ती निःशक्त नाही अशी मला खात्री आहे. पण तू एकदा जरी प्रेमयाचना केलीस तरी, माझ्या इच्छेची तृप्ती होईल. तुझ्या आर्जवी आणि सबळ युक्तिवादाने आपल्या मैत्रीचे कर्तव्य तू बजावल्यासारखे होईल आणि माझी प्रतिष्ठाच काय, पण माझे जीवितही मला परत मिळेल. दुसऱ्या कोणा तरी परक्या माणसाला मी माझे दोष आणि मूर्खपणा प्रगट करण्यापेक्षा तू जर हे काम केलेस, तर ते आपल्या मैत्रीला अनुरूप होईल. माझ्या ज्या लौकिकाला जपण्यासाठी तू इतक्या यातना सहन करीत आहेस, तो धोक्यात पडेल. कारण तू जर मला नकार दिलास तर मी हा प्रयोग करण्याची विनंती दुसऱ्या कोणाला तरी करीन. तूच प्रयोग केलास तर कॅमिल्लाच्या दृष्टीने तुझ्या लौकिकाला डाग लागेल हे खरे, पण त्या प्रयोगात तिची एकदा का फत्ते झाली म्हणजे तुझी जखम भरून येईल आणि तुझ्या योजनेचे खरे कारण कळल्यावर तुझ्याविषयी तिचे मत पुन्हा चांगले होईल. म्हणून तुझ्या मार्गात कितीही अडथळे येणार असले तरी तू माझ्या आग्रहाला मान दे, अशी माझी तुला कळकळीची विनंती आहे. खरोखर माझी इच्छा अत्यंत अल्प आहे, पण तिच्या पूर्तीपासून मला मिळणारा आनंद फार मोठा आहे. मी तुला वचन दिलेच आहे की, तुझ्या पहिल्या प्रयत्नानेच माझे समाधान होईल–तू समग्र प्रयोग केल्याइतके समाधान होईल. ”

लोथॅरियोला असे स्वच्छ दिसून आले की, ॲन्सेल्मोचा निश्चय अगदी ठाम आहे. तो बदलण्यासाठी आपण काहीही बोललो तरी त्याचा उपयोग नाही, आपण जर सतत नकार देत राहिलो तर तो आपला वेडेपणा परक्या माणसाला सांगेल, अशी भीती आहे. म्हणून अधिक अडचणी टाळण्यासाठी, त्याच्या इच्छेला मान देण्याचे आपण

ठरविले आहे असे त्याने दाखविले. कॅमिल्लाला काही उपद्रव न देता ॲन्सेल्मोची लहर आपण पूर्ण कशी करावी याची योजना त्याने मनातल्या मनात आखली. तो म्हणाला, "मित्रा, मी हे काम करतो, तुझ्या इच्छेप्रमाणे लौकरात लौकर ते सुरू करतो. पण तू ही गोष्ट दुसऱ्या कोणाला सांगू नकोस." ॲन्सेल्मोने त्याला कल्पनातीत प्रेमाने आणि हळुवारपणे आलिंगन दिले आणि मुक्तकंठाने धन्यवादही दिले. त्याने दिलेले अभिवचन म्हणजे आपल्यावर होणारा महान उपकार होय, असेच जणू त्याला वाटले. त्या सत्त्व-परीक्षेसाठी दुसराच दिवस त्या दोघांनी तत्काळ मुक्रर केला. त्या दिवशी ॲन्सेल्मो त्याला तिची भेट एकांतात घेऊ देणार होता. तिला नजर करावयाचे सोन्यामोत्यांचे दागिने त्याने लोथॅरियोला द्यावे असे ठरले. त्याने त्याला सांगितले, "तिच्या स्तुतिपर गीतामध्ये, प्रेमगीतामध्ये आणि काव्यामध्ये पराक्रमाचा कोणताही प्रसंग गाळू नकोस. तुला जर त्रास वाटत नसेल तर ती गीते आणि काव्ये मी स्वतः रचून देईन." पण ते सर्व काही स्वतः करण्याचे लोथॅरियोने त्याला अभिवचन दिले. मात्र त्याचा हेतु ॲन्सेल्मो-पेक्षा अगदी भिन्न होता.

साऱ्या गोष्टींची अशी जुळवाजुळव झाल्यानंतर, ते दोघे ॲन्सेल्मोच्या घरी परत गेले. आपला पति नेहमीच्या वेळेपेक्षा अधिक काळ दूर राहिला, या चिंतेने सुंदर कॅमिल्ला व्याकुळ झालेली त्या दोघांना दिसली. ॲन्सेल्मोला तेथे सोडून लोथॅरियो आपल्या घरी आला. त्याने आपले कार्य हाती घेतले, हे पाहून ॲन्सेल्मोला आनंद व संतोष वाटत होता. पण या हास्यास्पद प्रकरणातून आपण नीटपणे कसे पार पडू, या विचाराने लोथॅरियो चिंतातुर झाला होता. त्या रात्री त्याने एक योजना आखली. कॅमिल्लाला न दुखविता ॲन्सेल्मोला संतुष्ट करणारी ती योजना होती.

दुसरे दिवशी तो ॲन्सेल्मोच्या घरी गेला. आपल्या पतीशी त्याची अलौकिक मैत्री आहे हे तिला माहीत होते. त्या मैत्रीस अनुरूप अशा सौजन्याने आणि आदराने तिने त्याचे स्वागत केले. जेवणखाण आटोपल्यानंतर ॲन्सेल्मो म्हणाला, "एका अकल्पित कामासाठी मला येथून दूर जावे लागत आहे. सुमारे दीड तास मला बाहेर रहावे लागेल. मी परत येईपर्यंत तू आमच्या बाईसाहेबांच्या संगतीत रहा." त्याने बाहेर जाऊ नये अशी इच्छा कॅमिल्लाने प्रदर्शित केली व त्याच्याबरोबर जाण्याची इच्छा लोथॅरियोने बोलून दाखविली. पण आपले काम विशिष्ट प्रकारचे आहे, म्हणून लोथॅरायोने घरी रहावे अशी विनंती त्याने केली, आणि "मी परत येईपर्यंत याला तू एकटा सोडू नकोस." अशी आज्ञा आपल्या पत्नीला दिली. सारांश, आपण तेथे गैरहजर राहणे अगत्याचे का आहे, याचे कारण काय सांगावे हे त्याला चांगले माहीत होते. ते कारण बनावट आहे हे कोणाला कळणार नाही अशी त्याची मूर्खपणाची समजूत होती. अशा प्रकारे त्या दोघांना तेथे सोडून तो निघून गेला. ते दोघे काय करतात हे पाहण्यास तेथे कोणीच नव्हते. सारे नोकरचाकर जेवणासाठी निघून गेले होते.

आपण आता रणभूमीवर दाखल झालो आहो, हे लोथॅरियोच्या ध्यानी आले.

त्याच्यासमोर उभा ठाकलेला त्यांचा शत्रू सौंदर्याच्या सहस्र शस्त्रांनी सुसज्ज होता. कोणाशीही सामना असता तरी कॅमिल्ला साऱ्या पुरुषांना जिंकण्यास समर्थ होती, हे पाहून आपल्या नशिबात काय आहे असा विचार त्याला पडला आणि त्यामुळे तो घाबरला. या पहिल्या हल्ल्यात त्याने पहिली गोष्ट केली ती ही की, आपल्या तळहातावर आपले डोके कसेबसे ठेवले, आणि आपला मित्र परत येईपर्यंत खुर्चीवर डुलकी घेण्याची परवानगी त्याने तिला मागितली. तेव्हा कॅमिल्ला म्हणाली, "शेजारच्या खोलीत कोच आहे, त्यावर तुम्ही सुखाने विश्रांती घेऊ शकाल असे मला वाटते." पण लोथॅरियोने उत्तर दिले, "जेथे मी आहे तेथेच मला बरे वाटते." असे म्हणून आपला मित्र परत येईपर्यंत तो तेथेच निजला. ॲन्सेल्मो परत आला तेव्हा त्याला आढळले की, आपली पत्नी स्वतःच्या खोलीत आहे आणि लोथॅरियोला झोप लागली आहे. त्यावरून त्याने असा निष्कर्ष काढला की, आपण या दोघांना संवादासाठी आणि विश्रांतीसाठी पुरेसा वेळ दिला आहे. आपला मित्र जागा होण्याची वाट तो अत्यंत उत्सुकतेने पाहू लागला. तो जागा झाल्यावर ते दोघे दुसरीकडे जाणार होते आणि लोथॅरियो आपल्या विजयाची वार्ता त्याला सांगणार होता. शेवटी लोथॅरियो जागा झाला, तेव्हा ते दोघे बाहेर गेले. ॲन्सेल्मोने विचारताच त्याने उत्तर दिले, "तिच्या बुद्धिमत्तेची आणि सौंदर्याची सर्व-सामान्य प्रशंसा करण्यापलीकडे इतक्यात दुसरें काही करणे सोयीचे होणार नाही असे मला वाटते. यापुढे मला जे काही करावे लागेल, त्याची पूर्व-तयारी या प्रशंसेने होईल आणि मी तिला उद्देशून जे जे बोलेन, ते सर्व मोठ्या खुशीने आणि सहजतेने ऐकण्यास तिची प्रवृत्ती होईल. सैतान आपल्यापुढे प्रथम सुखाचे नि वरवर चांगल्या दिसणाऱ्या गोष्टींचे ताट वाढून ठेवतो आणि आपल्या बुद्धिमध्ये स्वतः प्रवेश करतो. त्याचे सोंग प्रारंभीच आपल्यावर छाप पाडू शकले तर, त्याचा दुष्ट हेतू आपण ओळखण्यापूर्वीच, तो आपला हेतू सामान्यपणे साध्य करून घेतो." लोथॅरियोच्या या बोलण्याने ॲन्सेल्मो अत्यंत संतुष्ट झाला आणि म्हणाला, ', प्रत्येक दिवशी मी तुला चांगली संधी देत जाईन. अर्थात दररोज मी काही बाहेर जाऊ शकणार नाही. पण मी असा वागेन की, कॅमिल्लाला काडी-मात्र संशय येणार नाही."

ॲन्सेल्मो जे बोलला, तसेच वागला. पण त्याने पुनः पुनः ज्या संधी दिल्या, त्या लोथॅरियोने जाणूनबुजून गमावल्या. तरी त्याने आपल्या मित्राचे सांत्वन करण्यासाठी त्याला असे आश्वासन दिले की, "तुझी पत्नी अभेद्य आहे. तिच्या शीलावर कोणीही आक्रमण करू शकणार नाही. मी जर पुनः आक्रमण करण्याचा प्रयत्न केला, तर आपण हा सारा वृत्तांत आपल्या पतीला सांगू अशी धमकी तिने मला दिली आहे. मला माझ्या कार्यात अणुमात्र उत्तेजन किंवा आशा तिने मुळीच दिली नाही," तेव्हा ॲन्सेल्मो म्हणाला, "आतापर्यंत सारे काही ठीक झाले. पण कॅमिल्लाने आतापर्यंत केवळ शब्दांनाच प्रतिकार केला, पण शब्दापेक्षा भरीव अशा मोहसाधनाना ती कसा विरोध करील, हे अजून आपल्याला पाहावयाचे आहे. तिला नजर करण्यासाठी मी तुला उद्या दोन हजार

सोन्याच्या मोहरा देतो, आणि आणखी जाळे पसरण्यासाठी रत्ने आणण्याकरिता मी तुला तितक्याच मोहरा आणखी देतो. कारण स्त्रिया – त्यातही सुंदर स्त्रिया – शुद्ध आणि शीलवंत असल्या तरी, उंची पोषाख करण्याची आणि मजेत हिंडण्याची त्यांना निसर्गतःच आवड असते. या कपडेलत्त्याचा आणि दागदागिन्यांचा मोह दूर सारण्याचे सामर्थ्य तिने दाखविले, तर मी तुला अधिक काही त्रास देणार नाही. " तेव्हा लोथॅरियोने उत्तर दिले, "हे साहस मी आता आरंभिलेच आहे, तेव्हा मी ते शेवटास नेतो. तिच्या प्रतिकाराने माझी शक्ती खचून जाईल आणि तिचे चारित्र्य कोणत्याही मोहावर मात करील नि माझ्या साऱ्या प्रयत्नावर पाणी पाडील, अशी मला खात्री आहे. "

दुसरे दिवशी, ॲन्सेल्मोने त्याला चार हजार सोन्याची नाणी दिली–आणि तितक्याच विचित्र कल्पनाही त्याला सांगितल्या. त्याला नवी कोणती थाप मारून त्याची गंमत करावी, हे लोथॅरियोला कळेना. पण शेवटी त्याने असे ठरविले की, आपण हे सारे पैसे परत करावेत आणि त्याला ठामपणे सांगावे की, " प्रशंसेप्रमाणेच नजराण्यांनीही कॅमिल्लाचे मन मुळीच वश होणार नाही. तिच्यापुढे प्रेमाच्या कितीही आणाभाका घेतल्या आणि दुःखाचे सुस्कारे सोडले तरी तिचे चित्त जसे चळत नाही, तसेच तिला काहीही अभिवचने दिली व नजराणे नजर केले तरी ते ढळत नाही. म्हणून यापुढील सारे प्रयत्न हे निरर्थक श्रम ठरतील. " अशी त्याची योजना होती. पण या प्रकरणात ज्या दैवाने खूपच लुडबूड केलेली आहे, त्याने त्याची ही योजना ढासळून टाकली. कारण नेहमीप्रमाणे ॲन्सेल्मो त्याला एकट्याला आपल्या पत्नीजवळ ठेवून एके दिवशी बाहेर पडला, पण शेजारच्याच एका खोलीत गुप्तपणे जाऊन बसला आणि ते काय करतात, हे दाराच्या फटीतून पाहू लागला. तेव्हा त्याला आढळले की, तब्बल अर्धा तास लोथॅरियो कॅमिल्लाशी एक शब्दही बोलला नाही. त्यावरून त्याने असा निष्कर्ष काढला की, त्याने आपल्याला ज्या ज्या प्रेम–याचना आणि आर्जवे केल्याचे आणि त्याना नकार मिळाल्याचे सांगितले, ( आणि त्यामुळे आपल्याला गंमत वाटली ) त्या सर्व केवळ कल्पित कथा होत. पण आपला निष्कर्ष खरा आहे अशी पूर्ण खात्री करून घेण्यासाठी तो आपल्या खोलीतून बाहेर आला आणि आपल्या मित्राला एका बाजूस घेऊन त्याला विचारू लागला, " आज कॅमिल्ला तुला काय म्हणाली ? तिचा कल काय आहे असे तुला वाटते ?" लोथॅरियाने उत्तर दिले, "यापुढे मी तिची परीक्षा करणार नाही. कारण तिचा प्रतिसाद अत्यंत तीव्र आणि भयानक आहे. तिला जिचा अत्यंत तिटकारा आहे, अशी चर्चा यापुढे करण्यास मी धजत नाही."

ॲन्सेल्मो किंचाळला, " अरे लोथॅरियो, काय हे तू आपले वचन असेच पाळतोस का ? तुझ्यासारख्या मित्राकडून मी हीच अपेक्षा धरावी का ? त्या दरवाजातून मी तुला निरखून पाहिले, तेव्हा मला आढळले की, तू कॅमिल्लाशी चकार शब्द बोलला नाहीस. त्यावरून माझी बालंबाल खात्री झाली आहे की, तू मला जी जी उत्तरेप्रत्युत्तरे निवेदन केलीस, ती सारी खोटी असून माझ्यावर तू ती लादलीस. माझी इच्छा तृप्त करण्याचे

तुझ्या मनात नव्हते तर, दुसऱ्या कोणालाही कामगिरी सांगण्जास तू माझ्या आड का आलास ? " याहून अधिक ॲन्सेल्मी बोलला नाही. पण तेवढ्याने लोथॅरियोच्या मनाचा गोंधळ उडाला. खोटेपणा करीत असताना आपण पकडले गेलो, याची त्याला लाज वाटू लागली. म्हणून आपल्या मित्राला प्रसन्न करण्यासाठी त्याने त्याला शपथेवर सांगितले की, " यापुढे मी हे काम उत्साहाने करीन, आणि इतक्या प्रभावीपणे पार पाडीन की, पुनः तू निरीक्षण करण्याची तसदी घेतलीस तर माझ्या प्रामाणिकपणाचा भरपूर पुरावा तुला मिळेल. " ॲन्सेल्मोने त्याच्यावर विश्वास ठेवला. त्याला चांगली संधि मिळावी म्हणून त्याने आपल्या दुसऱ्या एका मित्राला सांगितले, ' तू मला आपल्या घरी येण्याचे आग्रहाचे निमंत्रण दे म्हणजे या शहराजवळील खेड्यात असलेल्या तुझ्या घरी मी आठ दिवस घालवीन. ' त्याचा हेतु असा की, आपला मित्र लोथॅरियो आणि आपली पत्नी कॅमिला यांच्या मनातून भीतिची सारी भावना काढून टाकावी.

स्वतःचा विनाश आणि अप्रतिष्ठा घडवून आणणारे हे कारस्थान मोठ्या खटपटीने रचणाऱ्या ॲन्सेल्मोइतका अभागी माणूस दुसरा कोणी झाला असेल काय ? त्याची बायको फार चांगली होती. दुसऱ्या कोणाही माणसाची छाया त्याच्या सुखावर पडलेली नव्हती. शांतपणे तो तिच्यावर स्वामित्व चालवीत होता. तिचे विचार स्वतःचे घर आणि स्वतःचा पती एवढ्यापुरतेच मर्यादित होते. तेच आपले या जगातील सार-सर्वस्व आहे असे तिला वाटत होते, आणि केवळ तेच काय ते आपल्या आनंदाचे आणि आकांक्षाचे निधान आहे असे ती मानीत होती. त्याची इच्छा हा तिचा धर्म होता—आपल्या वर्तनाचा मानदंड होता. प्रेम, मान, सौंदर्य आणि शहाणपणा या सर्वांचा लाभ त्याला विनासायास झालेला असताना, निसर्गतःच जे आढळत नाही ते शोधण्यासाठी आणि त्यापायी इतका धोका पत्करण्यासाठी त्याला इच्छा का व्हावी ? अशक्य गोष्टीची आकांक्षा जो धरतो, त्याला शक्यतेच्या कोटीतील लाभ गमवावे लागतात—आणि ते योग्यच आहे. एक कवी म्हणतो—

मृत्यूत मी जीवन शोधतो
रोगात आरोग्य
संघर्षात शांतता
दारिद्र्यात संपत्ती
आणि चंचल पत्नीमध्ये अचल निष्ठा
पण माझ्या वेड्या वांच्छा तृप्त करण्यास
दैव खचित तिरस्कारपूर्वक नकार देते
किंवा इतरांना जे सहज मिळते
तेही मला कधी लाभणार नाही
कारण कोणाही माणसाला कधीही जे मिळणार नाही
ते मी मागत आहे.

दुसरे दिवशी ॲन्सेल्मो शहराच्या बाहेर पडला. जाण्यापूर्वी त्याने कॅमिल्लाला सांगितले, " मी येथे नसताना माझे सर्व कामकाज माझा मित्र लोथॅरियो पाहील आणि तो तुला सोबत करील. माझ्याशी तू जशी वागतेस तसेंच त्याच्याशी तू वागावेस अशी माझी इच्छा आहे. " कोणाही समंजस स्त्रीप्रमाणे कॅमिल्लाने त्याला आर्जव करून सांगितले, " तुमच्या गैरहजेरीत तुमच्या जागी कोणी राहाणे, ही किती अयोग्य गोष्ट आहे याचा तुम्ही विचार करा. आपल्या घरचा कारभार सांभाळण्यास मी पात्र आहे की नाही असा संशय तुम्हाला असेल तर, फक्त यावेळी आपण माझी कसोटी पाहावी. माझ्या पात्रतेबद्दल मला शंका नाही. याहून मोठमोठी कामे पार पाडण्याची आणि आपल्याला संतोष देण्याची शक्ति माझ्या अंगी आहे असे आपल्याला आढळून येईल. " ॲन्सेल्मोने उत्तर दिले, " माझी आज्ञा पालन करणे हे तुझे कर्तव्य आहे, वाद करणे नव्हे. " तेव्हा तिने उत्तर दिले, " आपली ही आज्ञा माझ्या इच्छेविरूद्ध असली तरी मी ती पाळीन. " सारांश, तिचा पती शहरातून बाहेर गेला. दुसरे दिवशी लोथॅरियो तिच्या घरी गेला, तेव्हां आपल्या पतीच्या प्रिय मित्राचे करावे तसे सादर स्वागत तिने त्याचे केले. पण ते इतक्या सावधपणे की, ती त्याच्याबरोबर एकटी कधीच राहिली नाही. आपली एखादी तरी दासी ती नेहमी आपल्या खोलीत ठेवून घेई. विशेषतः तिच्या बालपणापासून तिच्या माहेरी वाढलेली आणि जिच्यावर तिचे विशेष प्रेम होते, अशी लिओनेला दासी सदैव तिच्याजवळ असे.

पहिले तीन दिवस लोथॅरियो तिच्याशी काहीच बोलला नाही. जेव्हां नोकर-चाकर जेवावयास जात तेव्हां त्याला संधी मिळाली असती, पण त्याने ती टाळली. चतुर कॅमिल्लाने लिओनेलाला आपल्या आधी जेवण उरकून घेण्यास सांगितले होते, म्हणजे तिला खोलीबाहेर जाण्याचे कारण पडले नसते. पण त्या दासीचे विचार दुसरेच काही होते. तिच्या काही खास आवडी-निवडी होत्या. ( त्या भागविण्यासाठी तिला तीच वेळ सोयीची असे. ) म्हणून ती आपल्या धनीणीच्या आज्ञेचे पालन सक्तपणे करीत नव्हती. त्यामुळे लोथॅरियो व कॅमिल्ला यांना एकत्र ठेवून ती बाहेर जात असे. पण मी सांगितल्याप्रमाणे लोथॅरियोने अशा संधीचा काही फायदा घेतला नाही. कॅमिल्लाचे चारित्र्य आणि विनय यांचा दराराच तसा होता. परंतु तिने लोथॅरियोवर हे जे काही मौन लादले होते, त्याचा शेवटी अत्यंत विपरीत परिणाम झाला. कारण, तो काही बोलला नाही तरी त्याच्या विचारांना गती मिळाली होती आणि त्या सुंदर आकृतीचे लावण्य पहाण्यात आणि निरखण्यात त्याचे डोळे गुंतले होते. अत्यंत निर्विकार आणि निग्रही अशा पुरुषाचे मनही पेटून उठावे अशी तिची आकृती होती. काही न बोलता तो तेथे थांबला असताना त्याच्या मनात विचार आले की, हिच्यावर प्रेम करणे किती चांगले ! अशा विचारानी त्याच्या मित्रनिष्ठेवर हळुहळू हल्ले चढविले, आणि ती निष्ठा पोखरून टाकली. हजार वेळा त्याने निश्चय केला की, आपण हे शहर सोडावे आणि जेथे ॲन्सेल्मो आपल्याला कधी पहाणार नाही व कॅमिल्लाची धोकादायक मुद्रा आपल्या

दृष्टीस जेथे कधी पडणार नाही, अशा ठिकाणी निघून जावे. पण तिच्या दर्शनाने त्याला इतका काही विलक्षण आनंद होई की, त्यापुढे त्याचा तो दुबळा निश्चय तत्काळ नाहीसा होई. जेव्हा तो एकटा असे तेव्हा त्याला वाटे, आपण मित्रभावापासून आणि धर्मापासून च्युत होत आहोत. आपण आणि ॲन्सेल्मो यांच्यामध्ये तो वारंवार तुलना करी आणि असा निष्कर्ष काढी की, माझ्या मित्रद्रोहापेक्षा ॲन्सेल्मोचा मूर्खपणा आणि वेडेपणा मोठा आहे. त्याला वाटे, " मी जो गुन्हा करणार आहे, त्यासाठी मला काही शिक्षा होईल असे भय मुळीच नाही. माझा हेतू लक्षात घेऊन मानवाप्रमाणेच ईश्वरही मला सहज क्षमा करील. " शेवटी कॅमिलाच्या सौंदर्यामुळे–आणि खुद्द तिच्या नवऱ्याने त्याला आणून दिलेल्या संधीमुळे–त्याची निष्ठा आणि मैत्री यांचा पुरा पाडाव झाला.

ॲन्सेल्मोच्या गैरहजेरीतील पहिले तीन दिवस त्याने प्रीती आणि शील यांच्या संघर्षात घालविले. नंतर तिचा उपभोग घेण्याची त्याला तीव्र इच्छा झाली. फक्त त्याचा मार्ग कोणता याचाच तो विचार करीत राहिला. कॅमिलावर शक्य त्या सर्व उपायांनी आपली छाप पाडण्याचा त्याने प्रयत्न केला. त्यावेळी त्याची वाणी आणि कृती कामवासनेने ओतप्रोत भरलेली होती. त्याच्या या अनपेक्षित आक्रमणाने कॅमिला आश्चर्यचकित झाली. त्याच्या खोलीतून वेगाने बाहेर येऊन ती आपल्या खोलीत घाईघाईने शिरली. प्रीतिबरोबरच आशा जन्मास येते. तिच्या या विरोधामुळे लोथॅरियोचे धैर्य मुळीच खचले नाही, उलट याप्रसंगी तिचे सौन्दर्य त्याला अधिकच आकर्षक वाटले— आपण पाठलाग करण्यास अधिकच योग्य वाटले. आणि म्हणून कॅमिलाला वश करण्यासाठी अधिक प्रयत्न करण्यास तो उद्युक्त झाला, उलट, लोथॅरियो जे कृत्य करील असे तिच्या स्वप्नातही कधी आले नव्हते, ते तो करण्यास प्रवृत्त झाला आहे हे पाहून, आपण काय करावे हे तिला कळेना. विचारांती तिने असे ठरविले की, आपल्याशी बोलण्याची त्याला मुळीच संधी देता कामा नये, नाही तर आपल्या कीर्तीला आणि अब्रूला धोका आहे. तेव्हा आपण आपल्या पतीला घरी परत येण्याची विनंती करण्यासाठी एक पत्र पाठवावे. त्याच रात्री तिने एका दूताबरोबर जे पत्र पाठविले, त्याचा आशय पुढीलप्रमाणे--



## प्रकरण ७

# चमत्कारिक अशिष्टाचा वृत्तांत (पुढे चालू)

“सेनापतीशिवाय सैन्य किंवा किल्लेदाराशिवाय किल्ला सोडून जाणे, हे जसे अत्यंत अयोग्य आहे, तसेच पतीशिवाय तरुण विवाहित स्त्रीला सोडून जाणे, अप्रशस्त होय. त्यातही त्या पतीला दूर जाण्यास विशेष महत्त्वाची काही कारणे नसतील, तर तसे करणे अत्यंत अनुचित होय. आपल्या विरहामुळे माझे मन फार दुःखीकष्टी झाले आहे आणि अधीर बनले आहे. यापुढे तो विरह सहन करणे मला शक्य नाही. म्हणून आपण घरी लवकर आला नाही, तर मला माझ्या माहेरी जाणे भाग पडेल आणि मग आपल्या घराकडे पाहण्यास कोणी असणार नाही. कारण, ज्या व्यक्तीकडे आपण आपल्या कुटुंबाचा भार सोपविला आहे, ती तुमच्या कल्याणापेक्षा स्वतःच्या सुखाकडे अधिक लक्ष देणारी आहे, असे मला खात्रीने वाटते. तुम्ही शहाणे आहा- समंजस आहा, म्हणून मी अधिक काही लिहीत नाही- आणि अधिक लिहिणे सोयीचेही नाही.”

हे पत्र पाहून अॅन्सेल्मोला फार आनंद वाटला. त्यावरून त्याला कळले की, लोथॅरियोने आपला प्रयत्न सुरू केला आहे, पण (आपण आशा करीत होतो, त्याप्रमाणे) कॅमिल्लाने तो प्रयत्न परतवून लावला आहे. म्हणून त्याने तिला निरोप पाठविला की, “मी लवकरच परत येत आहे, तेव्हा तू आपले घर सोडून जाऊ नकोस.” हा जबाब कळल्यावर कॅमिल्लाला मोठे आश्चर्य वाटले आणि तिच्या मनाचा गोंधळ पहिल्यापेक्षा अधिक झाला. आपल्या बापाच्या घरी जाणे किंवा आपल्या स्वतःच्या घरी राहणे- या दोन्ही गोष्टी तिला सारख्याच भयप्रद वाटल्या. बापाकडे जावे तर पतीची आज्ञा मोडल्यासारखे होते आणि घरी राहावे तर आपली अब्रू धोक्यात येते. या दोहोंपैकी धोक्याचा पर्याय प्रभावी ठरला. आपण आपल्याच घरी राहावे आणि लोथॅरियोचा सहवास टाळू नये, कारण तसे केल्याने आपल्या सेवकांना संशय येईल, असे तिला वाटले. आपण अॅन्सेल्मोला पत्र पाठविले, याचा तिला आता पश्चात्ताप झाला. कारण त्यामुळे आपल्यातील काही दोष लोथॅरियोच्या नजरेस पडला असेल, अशी शंका अॅन्सेल्मोला आली असेल आणि त्यामुळे त्याचा आपल्याविषयीचा आदरभाव नष्ट झाला असेल, आणि म्हणून आपले शील भ्रष्ट करण्याची सूचना आपल्या पतीने लोथॅरियोला दिली असेल, असा तर्क तिने केला. पण ईश्वरावर आणि आपल्या स्वतःच्या निष्पाप अंतःकरणावर हवाला ठेवून ती आपल्याच घरी राहिली. लोथॅरियोच्या साऱ्या प्रयत्नांना

आपला परमेश्वरावरील आणि स्वतःवरील विश्वास नामोहरम करील, अशी तिला खात्री वाटली. तो काहीही बोलला तरी त्याला आपण मुळीच उत्तर द्यावयाचे नाही, असा तिने निश्चय केला. तसेच आपल्या पतीकडे कागाळ्या करून त्याला त्रास न देण्याचा निर्धारही तिने केला. आपण कागाळ्या केल्या, तर आपल्या पतीचे त्याच्या मित्राशी वाद माजतील आणि भांडणे होतील, अशी भीती तिला वाटली. मग आपण हे पत्र का लिहिले असे ॲन्सेल्मोने विचारले, तर आपण चांगली सबब कोणती सांगावी, याचा विचार ती करू लागली.

इतका धोक्याचा व निष्पाप निश्चय करून ती दुसरे दिवशी लोथॅरियोचे सारे बोलणे कान देऊन ऐकू लागली. त्याने प्रेमाचा हल्ला इतक्या आवेशाने आणि त्वेषाने केला की, त्याचा धक्का सुशील कॅमिल्लाला स्थिरपणे सहन करता येईना. त्याच्या कोमल प्रेमभावनेकडे डोळेझाक करणे एवढेच तिला शक्य होते. त्याच्या प्रेमाच्या आणाभाका आणि आर्जवे, सुस्कारे आणि आसवे यांचा परिणाम तिच्या हृदयावर झाल्याशिवाय राहिला नाही. ते पाहून लोथॅरियोला परम संतोष वाटला आणि त्याच्या प्रेमाची ज्वाला अधिकच भडकली. एवढा मोलाचा गड सर करण्याची ही संधी—ॲन्सेल्मोची गैरहजेरी—आपण आपल्या सर्व सामर्थ्याने आणि आर्जवाने साधली पाहिजे, असे त्याने ठरविले. तिच्या सौंदर्याच्या प्रशंसेचा जबरदस्त तोफखाना त्याने सुरू केला. स्त्रीजातीचे हे नाजूक मर्म-स्थान असते. त्यावर-म्हणजे तिच्या सौंदर्याच्या अभिमानावर—त्याने सरळ हल्ला चढविला. कोणाही प्रणयी वीराला या हल्ल्याने अत्यंत सहजतेने किल्ल्यात खिंडार पाडता येते. लोथॅरियो हल्ला करण्यात कुशल व अचूक होता. त्याने तोफखान्याची आग इतक्या जवळून ओतली की, कॅमिल्लाची निष्ठा भरभक्कम खडकावर उभारलेली नसती तर ती केव्हाच कोसळून पडली असती. तो रडू लागला, प्रार्थना करू लागला, खुशामत करू लागला, वचने देऊ लागला, शपथा घेऊ लागला, प्रतिज्ञा करू लागला.

त्याच्या शब्दात इतका खरेपणा नी तळमळ व्यक्त झाली की, त्यामुळे शेवटी तिच्या प्रतिष्ठेची पर्वा झुगारून देऊन त्याने विजय संपादन केला. तो संपादन करण्याची त्याला तीव्र इच्छा होती पण तशी आशा मुळीच नव्हती. शेवटी ती शरण गेली—कॅमिल्लाही शरण गेली! याचे आपण आश्चर्य मानता कामा नये. लोथॅरियोही प्रेमाला बळी पडला होता. प्रेमाचा हल्ला परतविण्यास त्याची मैत्री आणि गुणवत्ता हीही असमर्थ ठरली होती. त्यावरून हे स्पष्टपणेच सिद्ध होते की, प्रेम ही एक जबरदस्त शक्ती आहे. ती जिंकण्याचा एकच मार्ग म्हणजे त्यापासून दूर पळून जाणे. प्रेमाच्या आक्रमणाला आपण तोंड देऊ शकू असा गर्व कोणाही मर्त्य प्राण्याने वाहू नये. त्यासाठी मानवी शक्तीपेक्षा मोठी शक्ती—खरोखर दैवी शक्ती—अवश्य असते. तीच मानवी वासनेशी सामना देऊन तिला पराभूत करू शकते. या प्रणय-प्रसंगाचा एकमेव साक्षीदार म्हणजे लिओनेला ही दासी. या नव्या प्रेमिकांना आणि दगलबाज मित्रांना तिच्यापासून काहीही लपविता आले नाही. लोथॅरियोने कॅमिल्लाला असे उघड करून सांगितले नाही

की, " तुझी सत्त्व-परीक्षा पाहण्यासाठी तुझ्या पतीने मला ही संधी जाणूनबुजून दिली होती. या संधीमुळे मला परमसौख्य प्राप्त झाले आहे. " तसे आपण सांगितले तर, आपण स्वतःच्या प्रेमभावनेने तिच्या विनवण्या करीत आहो असें तिला वाटले नसते किंवा आपण याला सहजासहजी वश झालो असे तिला वाटले असते, असे भय त्याला वाटत होते.

थोड्याच दिवसांनी ॲन्सेल्मो घरी आला. त्याने जे गमावले, ते त्याच्या ध्यानी आले नाही. गमावले ते त्याच्या दृष्टीने अत्यंत मोलाचे आणि आदराचे होते. आपल्या वरून तो लोथॅरियोकडे गेला आणि त्याला आलिंगन देऊन म्हणाला, " माझ्या नशिबात काय आहे, हे मला सांग. " लोथॅरियोने उत्तर दिले, " मी तुला इतकेच सांगू शकतो की, जगातील सर्वोत्तम पत्नी आपल्याला लाभली आहे, अशी प्रौढी तुला मिरविता येईल. ती स्त्रीजातीचा अलंकार आहे. सर्व शील-संपन्न स्त्रियांनी जिचा कित्ता गिरवावा, अशी आदर्श ललना ती आहे. शब्द, याचना, नजराणे–या सर्वांचा तिच्यावर काहीही परिणाम झाला नाही. मी अश्रू गाळण्याचे ढोंग केले, पण त्यामुळे ती फक्त हसली. परमसौंदर्याची खाण अशी कॅमिल्ला आहे, एवढेच नव्हे तर नम्र, विवेकी आणि सुमधुर असा स्वभाव, एवढेच काय पण कोणाही प्रतिष्ठित स्त्रीला ललामभूत होणारे इतर सर्व गुण आणि आदर्श वर्तन–हे सर्व तिच्या ठायी आहे. म्हणून, मित्रा, तुझे पैसे परत घे. ते तिच्यापुढे मांडण्याची मला गरज वाटली नाही. देणग्या आणि वचने अशा हीन नि भाडोत्री गोष्टींनी कॅमिल्लाची सचोटी कधीही ढासळविता येणार नाही. आणि ॲन्सेल्मो, तू तिची जी परीक्षा घेतलीस तेवढ्यावर संतुष्ट राहा. शंका आणि संशय यांच्या धोकेबाज वाळवंटातून तू नशिबाने बाहेर आला आहेस. संसार–सागरात संशयाचे वाळवंट पसरलेले असतेच. पण आता तू पुनः असे धाडस करू नकोस. ज्या नौकेची शक्ती तुझ्या कसोटीस पुरेपूर उतरली आहे, ती दुसऱ्या कर्ण-धाराच्या हाती देऊन नवा प्रयोग करू नकोस. खरोखर तुझी नौका सुरक्षित बंदरात नांगरून पडलेली आहे हे पक्के समज आणि आमरण सुखात नि स्वास्थ्यात आयुष्य घालव. मरणापुढे कशाचीही मात्रा चालत नाही. पदवी, प्रतिष्ठा किंवा अधिकार आपल्याला मृत्यूपासून सोडवू शकत नाहीत. मृत्यू अटळ आहे आणि तो तुझ्या नौकेचे दोर कापीपर्यंत बंदरात स्वस्थ राहा. "

लोथॅरियोचे हे भाषण ऐकून ॲन्सेल्मोला परम संतोष वाटला. एखादी देवताच बोलत आहे, असे समजून त्याने त्याच्या बोलण्यावर पुरा विश्वास ठेवला. पण तरीही तो त्याला म्हणाला, " आपला वेळ मजेत घालविण्यासाठी तू आपला प्रयोग पुढे चालू ठेव. पूर्वीप्रमाणेच कॅमिल्लाची आर्जवे करण्याची गरज नाही. फक्त तिच्या स्तुतिपर अशा काही कविता ' क्लोरिस ' या नावाने कर आणि कॅमिल्लाला सांग, या नावाच्या एका तरुणीची मी पूजा बांधीत आहे. तिच्या नावाचा स्फोट मी केला तर तिची निंदा होण्याचा संभव आहे, म्हणून तिची कीर्ती नि प्रतिष्ठा राखण्यासाठी मी तिच्या या

नावाने कविता केलेल्या आहेत. त्या कविता स्वतः रचण्याची तसदी जर तू घेणार नसलास—आणि त्यासाठी तुला सवड नसली—तर ते काव्य-रचनेचे कार्य मी स्वतः मोठ्या आनंदाने करीन."

लोथॅरियो म्हणाला, "तसे करण्याची काही गरज नाही. कारण मलाही कधी कधी काव्याची लहर येते. तू फक्त कॅमिल्लाला माझ्या या बनावट प्रेमाची माहिती दे, मग मी मला शक्य तितक्या उत्तम कविता करीन—अर्थात् विषयाच्या सौंदर्याला साजेल, इतके उत्तम काव्य मला रचता येणार नाही."

संशयी आणि उतावळा असा ॲन्सेल्मो आणि त्याचा दगाबाज मित्र लोथॅरियो यांच्यामध्ये असा करार झाल्यानंतर ॲन्सेल्मो घरी गेला आणि त्याने कॅमिल्लाला विचारले, "तू मला ते पत्र पाठविण्याचे कारण काय?" असा प्रश्न यापूर्वीच आपल्याला त्याने का विचारला नाही, याचे तिला आश्चर्य वाटले. तिने उत्तर दिले, "मी आपल्याला ज्या तऱ्हेने पत्र लिहिले, त्याचे कारण म्हणजे, आपण येथे नसताना लोथॅरियो हा माझ्याकडे अपराधी आणि बुभुक्षू नेत्रांनी पाहात राहिला. त्यामुळे मला त्याचा तिटकारा वाटू लागला. आपण घरी असताना तो अशा दृष्टीने मजकडे कधीच पाहात नसे. म्हणून मी त्याच्याबरोबर एकांतात राहण्याचे सर्व प्रसंग टाळले. त्यामुळे त्याला माझ्या मनात प्रीतीऐवजी तिटकारा असल्याचे आढळून आले असावे, असा मला क्षीणसा संशय आला." तेव्हा ॲन्सेल्मोने तिला सांगितले, "या बाबतीत तुला लोथॅरियोची भीती बाळगण्याचे काहीच कारण नाही. कारण या शहरातील एका अत्यंत थोर युवतीवर त्याचे प्रेम जडले आहे आणि क्लोरिस या टोपण नावाने त्याने तिच्या स्तुतिपर काव्यही लिहिले आहे, हे मला माहीत आहे. तो असा अन्यत्र प्रेमबद्ध झालेला नसता, तरी लोथॅरियोचे चारित्र्य आणि मैत्री या-विषयी संशय घेण्यास काडीमात्र जागा नाही."

हे ऐकून कॅमिल्लाला लोथॅरियोचा अत्यंत तिटकारा वाटला असता हे निःसंशय. पण "दुसरीवर आपले प्रेम असल्याचे सोंग मी करीन आणि तुझ्या पतीची निंदा करीन म्हणजे मला मोकळेपणाने आणि निर्धास्तपणाने तुझी प्रशंसा करता येईल आणि माझी प्रेम-भावना व्यक्त करता येईल," असा आपला बेत असल्याचे त्याने तिला आधीच सांगून ठेवले होते. दुसरे दिवशी, भोजनाचे वेळी ॲन्सेल्मोने लोथॅरियोला आपली इच्छा सांगताना म्हटले, "तू आपली प्रेयसी क्लोरिस हिच्यावर ज्या कविता केल्या आहेस, त्या आता वाचून दाखव. कॅमिल्लासमोर मी तिच्यासंबंधी काय वाटेल ते म्हणेन. कारण, क्लोरिस ही स्त्री कोण आहे, हे तिला माहीत नाही." तेव्हा लोथॅरियोने उत्तर दिले, "कॅमिल्लाला तिची माहिती असती तर मी त्या स्तुतिस्तोत्रातील कोणताही भाग गाळला नसता. कारण जेव्हा प्रियकर आपल्या सर्वांगसुंदर प्रेयसीचे गुण-गान करीत असतो, तेव्हा तो तिच्या कठोर हृदयाबद्दलही कुरकुर करीत असतो तरी तिच्या लौकिकाची काही हानी होत नाही. हे लक्षात घेऊन कोणतीही भीती न

बाळगता मी एक सुनीत गाऊन दाखवितो. क्लोरिसच्या कृतघ्नतेवर ते मी कालच रचले आहे.

## चतुर्दशक

ऐन मध्यरात्री प्रत्येक चिन्ताग्रस्त हृदय जेव्हा
काळजीच्या वेदनेतून निद्रेच्या औषधीने मुक्त होते,
जेव्हा दासदेखील सुखद स्वप्नात धन्य असतात,
तेव्हां मी स्वर्गाविरुद्ध नि क्लोरिससाठी विलाप करतो.
अरुणप्रभा निशेच्या छाया दूर करते
सूर्य, सुखें नी दिवस परत येतात
प्रकाशाच्या पुनरागमनाने सारा निसर्ग प्रफुल्लित होतो
मी–केवळ मीच–शोक करायचा कधी थांबत नाही.
दुपारी मी दुःखाला पुरे म्हणून सांगतो, पण व्यर्थ !
उष्मा वाढतो नी माझ्या वेदना वाढतात,
आणि सौम्य सायंकाळींदेखील माझा जीव दुःख करतो;
पुन्हा रात्र येते नि माझा आक्रोश पुन्हा चालू होतो.
एक क्षणही मी मुक्त नसतो–व्यर्थ आळवणी करतो.
स्वर्ग कधी निष्ठुरपणा सोडीत नाही,
क्लोरिस कधींच शांत होत नाहीं.

या सुनीताने कॅमिल्लाला अत्यंत आनंद वाटला तर ॲन्सेल्मोचा हर्ष गगनात मावेनासा झाला. त्याने लोथॅरियोवर स्तुतीचा वर्षाव केला आणि म्हटले, "इतक्या सच्चा प्रेमाला आणि इतक्या तीव्र भावनेला प्रतिसाद न देणारी ती युवती रानटी माणसाप्रमाणे क्रूर असली पाहिजे." कॅमिल्लाने विचारले, "प्रेमात पडलेला कवी आपल्याला जे जे सांगतो, ते सारे खरे आहे असे आपण मानले पाहिजे काय ?" लोथॅरियोने उत्तर दिले, "बाईसाहेब, कवी अतिरेक करीत असेल पण त्याच्या कल्पनेला आळा घालण्याचे काम प्रियकर करतो आणि त्याला खरे बोलावयास लावतो." कॅमिल्लापाशी लोथॅरियोची पत वाढावी म्हणून ॲन्सेल्मोने त्याच्या या विधानाला पुष्टी दिली. पण त्याकडे तिने लक्ष दिले नाही. कारण लोथॅरियोवरील प्रेमामुळे तिचा त्याच्या प्रत्येक शब्दावर पूर्ण विश्वास होता. म्हणून ते काव्य ऐकून तिला आनंद वाटला. खरी क्लोरिस आपण आहो आणि आपल्याला उद्देशूनच हे सारे काव्य रचलेले आहे, हे माहीत असल्यामुळे तिचा आनंद द्विगुणित झाला आणि ती लोथॅरियोला म्हणाली, "या विषयावरील आणखी काही कविता आपल्याला आठवत असतील तर, म्हणा," लोथॅरियो उत्तरला, "काही मला आठवतात. पण बाईसाहेब, या कवितेइतक्या त्या

ऐकण्यासारख्या नाहीत असे माझे मत आहे. पण त्या ऐकून आपणच काय तो निर्णय द्या. ''

## चतुर्दशक

१

हे निर्घृण सुंदरी, तुझा बळी होऊन मीं मरतो
आणि तोही क्षमा न मिळतां—
—जर तुला वाटत असेल कीं तुझा हा दास
तुझे क्रौर्य साहूनही जिवंत राहील.

२

ज्याअर्थी माझ्या सुखाच्या साऱ्या आशा व्यर्थ आहेत,
त्याअर्थी आता मीं मरणाला शरण जातों.
आणि मी नाटक करीत आहे असें तुला वाटूं नये म्हणून
तुझ्या पायांशींच मला मेलें पाहिजे.

३

तरी जेव्हां माझें रक्ताळ हृदय तूं पाहशील
तेव्हां तेजस्वी अप्सरे, दुःख निग्रहानें आवर.
कारण दुसरीसाठीं जगण्यापेक्षां
तुझ्यासाठीं मरणेंच मला अधिक बरें.

४

मरणात आणि कृष्ण विस्मृतीच्या समाधीत
अहा ! मला हताशपणें पडूं दे.
कारण जर तुझे मन द्रवलें नी तूं दुःख केलेंस
तर माझें बिचारें पिशाच्च विषण्ण होईल नि भ्रांत प्रलाप करील.

अॅन्सेल्मोने पूर्वीच्या सुनीताची जशी तोंडभर तारीफ केली, तशीच याही सुनीताची. त्यामुळे त्याचा लौकिक जाळून खाक करणाऱ्या होळीमध्ये जळण अधिकच पडले. आपल्या दगाबाज मित्राने जे काव्य केले, त्यामुळे त्याने आपली मोठीच सेवा केली असे त्याला वाटले. कॅमिल्लाने त्याच्या धिक्कारासाठीव तिरस्कारासाठी जे जे उद्‌गार काढले, त्यामुळे त्याला वाटले, ती सद्‌गुणाची पुतळीच आहे; ती तशी असावी अशीच त्याची इच्छा होती.

थोड्या वेळाने कॅमिल्ला आपल्या दासीबरोबर एकटीच होती. तेव्हा तिला ती म्हणाली, '' प्रिय लिओनेला, मी लोथॅरियोला मला सहजा-सहजी जिंकू दिले, त्याची

मला लाज वाटते. त्याला मी पूर्णपणे शरण जाण्यापूर्वी त्याने अधिक कष्ट सोसले पाहिजे होते. तशी माझी योग्यताच आहे. पण ती माझ्या लक्षात आली नाही. मी घाईघाईने त्याला जो रुकार दिला तो माझ्या स्वभावातील ढिलेपणाचा परिणाम आहे, असे त्याला वाटेल, अशी मला भीती वाटते. त्याने ज्या आवेशाने आणि जोराने माझी याचना केली, तिला प्रतिकार करण्याचे त्राण माझ्या अंगी मुळीच उरले नाही." तेव्हा लिओनेलाने उत्तर दिले, "छे, बाईसाहेब, त्यामुळे आपण बेचैन होऊ नका. खऱ्या मोलाची जी वस्तु आपण दुसऱ्याला शेवटी देऊ इच्छितो, ती सत्वर दिल्याने तिचे मोल कमी होत नाही. आपली जुनी म्हणच आहे, 'त्वरित दान म्हणजे दुप्पट दान." कॅमिला म्हणाली, "तुझ्या म्हणीला दुसऱ्या म्हणीने उत्तर द्यावयाचे तर, 'फुकट मिळते ते तुच्छ मानले जाते." लिओनेला उत्तरली, "त्या म्हणीचा आपल्याशी काहीही संबंध नाही. जे प्रेम कधी इकडे धावते तर कधी तिकडे पळते, एकावर बसते तर दुसऱ्यावरून उडून जाते, कधी बर्फावरून खेळते तर कधी आग पेटविते, कोणाला घायाळ करते तर कोणाला ठार करते, एका क्षणात विजेप्रमाणे चमकते तर दुसऱ्या क्षणात नष्ट होते, सकाळी ज्या किल्ल्याला ते वेढा घालते, त्याला रात्री शरण आणते, अशा प्रेमाला तुमची म्हण लागू आहे. प्रेमाला विरोध करणारी कोणतीही शक्ती नाही, हे स्पष्ट आहे, तर तुम्हाला आपल्या दुर्बलतेचे नवल वाटण्याचे काय कारण ? त्याच अजिंक्य शक्तीची जाणीव लोथॅरियोला झाली आणि म्हणून तो तिला चटकन शरण गेला. तेव्हा त्याच्यापासून तुम्हाला भय कसले ? माझ्या धन्याच्या गैरहजेरीमुळे जी छोटी संधी त्याला मिळाली, ती त्याच्या प्रेमाने साधली म्हणून त्याची फत्ते झाली. कारण माझा धनी किती काळ गैरहजर राहणार हे अनिश्चित होते. हे असे घडावे असे प्रेमाने पूर्वीच ठरविले होते. त्याने आपल्या प्रियकराला शक्ती आणि आवेश दिला. त्यामुळे त्याने कोणतीही गोष्ट काळावर आणि योगायोगावर सोडली नाही. जर ती सोडली असती तर ॲन्सेल्मो परत आले असते आणि मग इतके मधुर कार्य सिद्धीस नेण्याची संधी धुळीला मिळाली असती. प्रेम-देवतेच्या लवाजम्यातील अत्यंत हुशार आणि प्रभावी चाकर म्हणजे अशी संधी किंवा निमित्त. तिचा फायदा घेऊन प्रेम आपली प्रगती करीत असते, त्यातही प्रारंभीच मोठे यश मिळवीत असते. प्रणयाचा प्रथम उद्रेक हाच त्याचा खरा विजयकाल असतो. लोक काय बोलतात याच्यावर माझा विश्वास नाही, पण अनुभवानेच खरे व मोलाचे ज्ञान मिळते हे खचित. तो अनुभव मी आपल्याला एखादे दिवशी सांगेन. बाईसाहेब, मी आपल्यासारखीच दुबळ्या हाडामांसाची आहे—आणि यौवनाने नि यौवनातील वासनांनी माझेही हृदय पेटलेले होते. पण बाईसाहेब, लोथॅरियोने आपल्या प्रेमाचा पुरेसा पुरावा देईपर्यंत आपण त्याला काही शरण गेला नाही. त्याचे कटाक्ष, त्याच्या शपथा, त्याची वचने, आणि त्याचे नजराणे–हे सारे पुरावे पुरेसे नव्हते काय ? त्याच्या शरीराचे शौर्य आणि मनाचें सौंदर्य–हे सर्व पाहून, तो आपल्या प्रीतीस पात्र आहे, अशी आपली खात्री पटली ना ? म्हणून बाईसाहेब, आता या शंकाकुशंका आणि भीती-आशंका मुळीच

बाळगू नका, उलट आपल्या दैवाचे आभारच माना. त्याच्या प्रेमाला तुम्ही बळी पडणार अशी नियतीच होती. मग त्याच्या शौर्याच्या आणि गुणांच्या शक्तीला तुम्ही वश झाला हे योग्यच आहे. त्याचे शौर्य आणि गुण याविषयी संशय कोण घेईल? कोणत्याही चांगल्या प्रेमिकाच्या अंगी जे चार 'द'कार असावे लागतात, ते धारण करणाऱ्या लोथॅरियोलाच आपण शरण गेला. ते चार 'दकार' म्हणजे तो दक्ष, दर्शनीय, दाक्षिण्ययुक्त आणि दैवी असा आहे. एवढेच नव्हे तर, त्याच्या गुणांची गणती करण्यास सारी बाराखडी अपुरी ठरेल. तो मनोहर, उदार, स्थिर, कर्तव्यदक्ष, सुख-विलासी, निष्ठावंत, शौर्यशाली, सन्मान्य, कल्पक, कृपाळू, एकनिष्ठ, सौम्य, उदात्त, कामसू, समंजस, शांत, श्रीमंत, संयमी, सच्चा, धाडसी आणि ज्ञानसंपन्न असून आपल्या सेवेला आणि सन्मानाला लायक होण्याइतका तरुण आणि उत्साही आहे. ऽ

आपल्या दासीची ती बाराखडी ऐकून कॅमिल्ला हसू लागली आणि तिला वाटले, प्रीतीच्या प्रत्यक्ष व्यवहारात ती अत्यंत चतुर असावी ( आणि खरोखर तशी ती होती ). नंतर तिने शहरातील एका तरुणाचे आणि आपले जे प्रेम-प्रकरण होते, ते आपल्या धनिणीला निवेदन केले. ते ऐकून कॅमिल्ला फार अस्वस्थ झाली. आपल्या दासीच्या असमंजसपणामुळे आपल्या लौकिकाला डाग लागेल असे भय तिला वाटले. आणि म्हणून तिने तिला विचारले, "तुझे प्रेमप्रकरण शब्दांच्या पुढे गेले होते काय?" तेव्हा कोणतीही भीती किंवा लज्जा न बाळगता, लिओनेलाने आपले सारे पापी वर्तन अत्यंत मोकळेपणाने तिला सांगितले. मालकिणीच्या अपराधामुळे मोलकरिणी निर्लज्ज बनतात आणि आपल्या मालकिणींच्या दोषांचे अनुकरण सामान्यतः करतात, कारण त्यांना लोक-निंदेचे भय नसते.

आता तिची चूक दुरुस्त करण्यापलीकडे गेली आहे, हे जाणून कॅमिल्लाने तिला विनविले, "आता तू आपल्या प्रियकराला ह्यातले काहीही सांगू नकोस. आपला प्रेमाचा कारभार विचाराने आणि गुप्तपणाने चालू ठेव. नाही तर लोथॅरियो किंवा ॲन्सेल्मो यांच्या कानी तुझे प्रेमप्रकरण जाईल." तसे करण्याचे वचन लिओनेलाने तिला दिले. पण ते अशा रीतीने की, तिच्या मूर्खपणामुळे आपल्याला आपला लौकिक गमवावा लागेल, असे भय तिला सतत वाटत राहावे. आपल्या धनिणीच्या अधःपाताची तिला पुरेपूर खात्री वाटत होती. त्यामुळे तिने आपल्या शूर प्रियकराला त्या घरात आणले. त्याबद्दल आपली मालकीण काय म्हणेल, याची पर्वा तिने केली नाही. कारण ती आपल्या पतीला हे सांगण्यास धजणार नाही अशी तिला खात्री वाटत होती. ज्या स्त्रीचे शील भ्रष्ट झालेले असेल आणि जिचा पापी व्यवहार सुरू झाला असेल, ती आपल्या दासीची दासी बनते आणि तिच्या असभ्य वर्तनाला हातभार लावते. दासीच्या

ऽ हे सारे गुण इंग्रजीतील ए. बी. सी. अशा अक्षरांनी सुरू होणाऱ्या शब्दांनी वर्णिलेले आहेत.

असभ्य वर्तनावर पांघरूण घालणे तिला भाग पडते. तशीच गत कॅमिल्लाची झाली. लिओनेलाने आपल्या प्रियकराशी ज्या प्रेमचेष्टा सुरू केल्या, त्यांच्याकडे कानाडोळा करणे कॅमिल्लाला भाग पडले. त्या घरातील जी खोली आपल्या कार्याला योग्य आहे असे लिओनेलाला वाटले, तेथे ती आपल्या प्रियकराबरोबर गेली. तो आपल्या पतीच्या नजरेस पडू नये म्हणून त्याला लपवून ठेवण्याची संधीही तिने लिओनेलाला दिली.

पण एके दिवशी सकाळी लोथॅरियो घरातून बाहेर पडत असताना, तो त्याच्या नजरेस पडला आणि कॅमिल्लाची सारी सावधगिरी धुळीस मिळाली. आपल्याला कोणी ओळखू नये, म्हणून त्याने आपल्या तोंडावर फडके बांधले होते आणि तो जलदीने निघून गेला. म्हणून त्याला प्रथम ते भूत आहे असे वाटले आणि त्यामुळे नवल वाटले. पण नंतर त्याला आपली चूक कळून आली. त्याच्या मनात मत्सराची जी आग पेटली, त्यामुळे सर्वांचा विध्वंस झाला असता. कॅमिल्लाच्या हुशारीमुळे तो टळला. लोथॅरियोने आपल्या मनाशी असा निष्कर्ष बांधला की, जिने आपल्याला फारसा कडा विरोध केला नाही, ती दुसऱ्या कोणाला तरी सहज वश झाली असावी. तिच्या घरातून जो माणूस बाहेर पडलेला त्याला दिसला, तो तिचा नवा मर्जीतला प्रियकर असावा, असा तर्क त्याने केला. तो करताना त्याच्या लक्षात आले नाही की, लिओनेला नावाची कोणी व्यक्ती या घरात आहे आणि तो माणूस त्या व्यक्तीचा प्रियकर असू शकेल. जेव्हा एखादी स्त्री आपली अब्रू सोडते, तेव्हा ज्याच्या आणाभाकांनी नि आसवांनी तिचे मन वश होते, त्या पुरुषालाही तिच्याबद्दल आदर वाटेनासा होतो. थोड्याशा प्रयत्नाने ती दुसऱ्या कोणालाही वश होईल असे तो समजतो आणि थोडासा संशय आला तरी ते सत्य आहे असे मानून चालतो. अत्यंत क्षुद्र पुराव्यावरून तो महत्त्वाची गोष्ट सिद्ध करू पाहतो.

जगातील अत्यंत तीव्र अशा मत्सराने लोथॅरियोचे चित्त विचलित झाले. विचार करण्यालाही त्याने सवड ठेवली नाही. वास्तविक कॅमिल्लाने त्याची काहीच हानी केली नव्हती. तरी तिचा सूड घेण्याची इच्छा आणि तिच्यावरील संताप याचा उद्रेक त्याच्या मनात झाला. तो तत्काळ ॲन्सेल्मोकडे गेला. त्यावेळी तो बिछान्यावर निजलेला त्याला आढळला. तो त्याला म्हणाला, "मित्रा, कैक दिवस माझ्या मनात अत्यंत तीव्र संघर्ष चाललेला आहे. तुझ्यापासून एक प्रकरण लपवून ठेवण्यासाठी मी माझ्या अंगी असलेली सर्व शक्ति आणि हिंमत उपयोगात आणली, पण यापुढे मला तसे करणे शक्य नाही. कारण तसे केल्याने माझ्या मैत्रीवर आणि न्यायबुद्धीवर मी अन्याय केला असे उघड होईल. मी जे जे इच्छीन ते ते सर्व करण्यास कॅमिल्ला आता तयार आहे, हे लक्षात ठेव. ही गोष्ट तुझ्यापुढे उघड करण्यास मला विलंब लागला याचे अत्यंत महत्त्वाचे कारण हे की, ती खरोखरच तशा वर्तनाची आहे का माझी परीक्षा पाहण्यासाठी ती माझ्या विनंतीला रुकार देण्याचे केवळ ढोंग करीत आहे, असा मला प्रश्न पडला होता. तू आणि मी तिला जितकी शीलसंपन्न समजतो, तितकी ती असती तर, तुझ्या इच्छेनुसार

मी तिची जी प्रेमयाचना केली, ती सारी तिने तुला या वेळपर्यंत सांगितली असती. पण ती गप्प बसली. तिने तुला त्या प्रसंगाची दाद लागू दिली नाही. त्यावरून मला असे ठाम वाटते की, तिने मला जी पापी वचने दिली, ती अत्यंत खरी असली पाहिजेत. तिच्या कपड्याच्या दालनात ती मला भेटली. या शहरातून तू पुन्हा जेव्हा बाहेर जाशील तेव्हा तिला योग्य ती संधी मिळेल. ( हे खरे आहे. कारण कपडे ठेवण्याचे दालन हे त्या दोघांचे संकेत-स्थान होते. ) पण तू अविचाराने आणि त्वेषाने तिचा सूड घेऊ नयेस अशी माझी इच्छा आहे, कारण संकेताचा समय येईपर्यंत तिच्या शीलाची घडी नीट बसेल आणि तिला आपल्या अविचाराबद्दल पश्चात्ताप होईल. आतापर्यंत तू माझ्या सल्ल्याप्रमाणे चालला आहेस, तसाच आताही चाल. आपला निश्चय कृतीत उतरविण्यापूर्वी पुरी खात्री करून घे. दोन–तीन दिवस बाहेर जाण्याचे सोंग तू कर आणि मग कपड्याच्या दालनातील पडद्यामागे गुपचूप जाऊन उभा रहा–ते तू सहज करू शकशील. मग तुला माझ्यासह कॅमिल्लाचे वर्तन स्वतःच्या डोळ्यानी अनायासे पाहाता येईल. त्यावेळी आपल्याला भीती वाटते त्याप्रमाणे तिचे वर्तन खरोखर अपराधी असले तर, त्या अपराधाला अनुरूप अशी शिक्षा तू तिला त्वरेने कर. ”

लोथॅरियोच्या सर्व प्रणयी आक्रमणावर कॅमिल्लाने सरशी केली, या कल्पनेने ॲन्सेल्मो संतुष्ट होता, पण आताच्या अनपेक्षित दुर्दैवी घटनेमुळे त्याचा भ्रम दूर झाला आणि तो अत्यंत आश्चर्यचकित झाला. बराच वेळ तो गप्प होता–संदेहावस्थेत होता. त्याच्या डोळ्यांत पाणी नव्हते–चैतन्य नव्हते. तो उद्विग्न झाला होता. शेवटी आपल्या मित्राकडे वळून तो म्हणाला, “ लोथॅरियो, श्रेष्ठ मित्राकडून माझी जी अपेक्षा होती, ती तू पूर्ण केली आहेस. तुझ्या सल्ल्याप्रमाणेच मी सर्वस्वी वागेन. तुला योग्य वाटेल ते तू कर. मात्र अशा प्रकारची कामे ज्या गुप्ततेने करावी लागतात, ती गुप्तता पूर्णपणे पाळ म्हणजे झाले. ” तसे करण्याचे अभिवचन देऊन लोथॅरियो तेथून निघाला. आपण आपल्या मित्राला जी थाप मारली, तिच्याबद्दल त्याला पश्चात्ताप होऊ लागला. अविचाराने आपण असे वागलो असे त्याला वाटू लागले. याहून कमी कठोर आणि अपमानकारक मार्गाने कॅमिल्लाचा पुरेसा सूड उगवू शकलो असतो असेही त्याच्या मनात आले. आपली बुद्धी कमी आणि आपला निश्चय दुबळा, असे म्हणून तो स्वतःला बोल लावू लागला. शेवटी त्याने असे ठरविले की, आपण जे केले, ते सारे कॅमिल्लाला कळवावयाचे–आणि त्याप्रमाणे त्याच दिवशी त्याने तसे केले. कारण त्याला त्या घरात संचारस्वातंत्र्य होते.

त्यावेळी कॅमिल्ला एकटीच होती. लोथॅरियोचे सारे निवेदन ऐकून ती त्याला म्हणाली, “ लोथॅरियो, माझ्यावर कोसळलेल्या या दुर्दैवाने मी पार दडपून गेले आहे. त्यामुळे माझ्या चित्ताची शांतता आणि सौख्य कायमचे नष्ट होईल हे निश्चित. त्याच्यावर काही तरी तोडगा लवकरच काढला पाहिजे. लिओनेलाला माझ्या सर्व भानगडींची माहिती असल्यामुळे ती इतकी मगरूर बनली आहे की, ती आपल्या प्रियकराला आपल्या खोलीत रात्रभर ठेवून घेते. तो तिचा प्रियकर माझ्या घरातून भलत्यावेळी बाहेर

पडताना ज्याला ज्याला दिसतो, ते सारेजण माझ्या चारित्र्याची निंदा करीत सुटतात. माझ्या या दुःखातील सर्वात मोठा भाग असा आहे की, त्यावर काही तोडगा नाही. तिच्या मूर्खपणाबद्दल किंवा उद्धटपणाबद्दल मी तिची कानउघाडणी करू शकत नाही किंवा तिला ताळ्यावर आणू शकत नाही. आपले संबंध तिला माहीत असल्यामुळे ती मला तिच्या दोषांवर पांघरूण घालण्यास भाग पाडते. त्यामुळे शेवटी माझ्या सौख्याला मोठा सुरुंग लागेल, अशी मला फार फार भीती वाटते." प्रथम लोथॅरियोला संशय आला की, लिओनेलाचे नाव घेऊन कॅमिला कपटाने आपल्यावर साऱ्या भानगडींचा दोष लादीत आहे. पण तिच्या मुद्रेवरील चिंता आणि नेत्रातील अश्रू पाहून, त्याचा तिच्या बोलण्यावर विश्वास बसला आणि आपण जे काही केले, त्यामुळे त्याला अपार दुःख झाले. तो विलक्षण गोंधळून गेला. तरीही कॅमिलाचे सांत्वन करण्यासाठी तो म्हणाला, "भविष्यकाळासंबंधी मी योग्य ती काळजी घेईन. त्यामुळे लिओनेलाच्या उद्धट-पणामुळे तुझ्या कीर्तीला कालिमा लागणार नाही. म्हणून यापुढे तू या बाबतीत मनाला त्रास करून घेऊ नकोस अशी माझी विनंती आहे." नंतर त्याने आपल्या मत्सरपूर्ण क्रोधाचे जे दुःखद परिणाम झाले, ते सारे तिला सांगितले व म्हटले, "तुझ्या पापाचे प्रत्यक्ष अवलोकन करण्यासाठी तुझ्या पतीने पडद्याआड उभे राहण्याचे कबूल केले आहे. माझ्या मूर्खपणाबद्दल मी तुझी क्षमा मागतो. त्याचा दुष्परिणाम कसा टाळावा याबद्दल तू मला सल्ला दे. माझ्या वेडेपणामुळे आपण सर्वजण मोठ्या अडचणीत सापडलो आहोत. त्यातून तूच सर्वांना बाहेर काढावेस, अशी माझी विनंती आहे."

कॅमिलाने आपला संताप आणि आपली भीती व्यक्त केली आणि त्याची बेइमानी, हलकटपणा आणि अविचार याबद्दल त्याला दोष दिला. तिचा संताप आणि भीती शांत झाल्यानंतर तिने त्या शोचनीय आणि अगतिक अशा संकटातून सर्वांची सुटका करण्याचा एक मार्ग तत्काळ शोधून काढला. अडचणीच्या वेळी स्त्रीची बुद्धी पुरुषापेक्षा नेहमीच कल्पक असते. तिने त्याला आज्ञा केली, "अॅन्सेल्मोला उद्याच येथे घेऊन या. म्हणजे आपण आतापर्यंत वागलो नाही इतक्या मोकळेपणाने आपल्याला वागता येईल. मी तुम्हाला माझी सारी योजना आताच सांगत नाही. माझा पती पडद्याआड दडून उभा राहिला की, लिओनेला तुम्हाला हाक मारील. तेव्हा तुम्ही तत्काळ येथे या आणि मी जे जे प्रश्न विचारीन त्यांना स्पष्ट उत्तरे द्या—ती ऐकण्यास अॅन्सेल्मो तेथे नाही असे समजून बोला." तिची सारी योजना समजून घेण्याचा लोथॅरियोने पुष्कळ प्रयत्न केला. 'ती योजना पूर्णपणे समजल्यावर मला माझे सोंग अधिक आत्मविश्वासाने वठविता येईल अणि आपल्या मित्राच्या मनावर योग्य तो ठसा उमटविता येईल,' असेही त्याने सांगून पाहिले. पण कॅमिलाने एवढेच उत्तर दिले की, "मी जे जे विचारीन, त्याला सरळ उत्तर द्यावयाचे एवढेच तुमचे काम." याहून अधिक काही ती सांगेना. कारण तिला अशी भीती वाटत होती की, आपले मत त्याला मान्य होणार नाही (आपल्या मतावर ती पूर्णपणे संतुष्ट होती.) आणि तो नसत्या अडचणी उत्पन्न करील. त्याचा

परिणाम असा होईल की, आपल्या योजनेला इष्ट ते फल येण्यास अडथळा निर्माण होईल आणि मग आपल्या योजनेला पूर्ण यश लाभणार नाही. लोर्थेरियोने तिचे म्हणणे मान्य केले.

ॲन्सेल्मोने खेड्यातील आपल्या मित्राकडे जाण्यासाठी शहर सोडल्याचा देखावा केला. पण गुप्तपणाने तो परत आला आणि कपड्यांच्या दालनात सहजासहजी जाऊन लपून बसला. तसे करण्यास कॅमिल्ला आणि लिओनेला यांनी त्याला मुद्दाम संधी दिली होती. ॲन्सेल्मो किती दुःखाने तेथे लपला असेल, याची आपल्याला सहज कल्पना करता येईल. कारण त्याला आपल्या स्वतःच्या बेअब्रूचा प्रेक्षक बनावयाचे होते आणि आपल्या सुंदर नि प्रिय कॅमिल्लाच्या आलिंगनातून मिळणारे सारे सौख्य नाश पावलेले पाहावयाचे होते. उलट, ॲन्सेल्मो लपून बसला आहे, हे कॅमिल्लाला पक्के माहीत होते. म्हणून ती त्या कपड्यांच्या दालनात लिओनेलासह शिरली आणि शोकाचा मोठा थोरला सुस्कारा टाकून तिला म्हणाली, “ हाय! हाय! प्रिय लिओनेला! मी एक योजना आखली आहे. त्या बाबतीत तू मला निराश करू नयेस, म्हणून मी ती तुझ्यापासून दडवून ठेवली आहे. पण मला वाटते, मी ती योजना कार्यवाहीत आणण्यापेक्षा तू ॲन्सेल्मोची कट्यार माझ्या भ्रष्ट काळजात भोसकणे अधिक चांगले. पण थांब, दुसऱ्याच्या अपराधाबद्दल मी शिक्षा भोगावी हा न्याय कोठला ? माझ्या प्रतिष्ठेला आणि स्वतःच्या मित्राला अपायकारक असे कृत्य करण्याची प्रेरणा माझ्या कोणत्या कृतीमुळे तुम्हाला मिळाली, हे मी लोथरियोकडून प्रथम समजून घेईन. म्हणून लिओनेला, खिडकीपाशी जा आणि त्या दुष्टाला माझ्याकडे बोलव. तो रस्त्यावर वाट पहात असेल, हे निःसंशय! त्याला आपले दुष्ट कृत्य पार पाडण्यासाठी येथे यावयाचे असेल! पण मी माझा निर्धार प्रथम तडीस नेणार. तो कठोर असला तरी माझ्या अब्रूसाठी मी तो पार पाडलाच पाहिजे.” तेव्हां धूर्त लिओनेला किंचाळली, “ बाईसाहेब, आपण त्या कट्यारीने काय करण्याचे योजले आहे ? स्वतःचा किंवा लोर्थेरियोचा प्राण घेण्याचे तर मनात नाही ना ? हाय, हाय! कोणाचाही प्राण घेतला तरी त्यामुळे आपल्या कीर्तीला आणि लौकिकाला बट्टाच लागेल. या घरात आपण एकट्याच आहोत, तोपर्यंत त्या दुष्टाला येथे येऊ देऊ नये आणि कोणतीच संधी देऊ नये, हे चांगले. बाईसाहेब, जरा विचार करा. येथे आपण फक्त दोघीजणी आहो—दुबळ्या, निराधार स्त्रिया आहोत. आणि तो माणूस धिप्पाड नि निश्चयी आहे. त्याची शक्ती प्रेमाच्या लालसेने द्विगुणित झालेली आहे. म्हणून तुम्ही आपला बेत तडीस नेण्यापूर्वीच तो असे काही दुष्कृत्य करील की, त्यामुळे तुमची प्राणनाशापेक्षा अधिक हानि होईल. आपले घर बिघडविण्यासाठी अशा बेइमान आणि मगरूर माणसाला पुनः पुनः संधी देणाऱ्या आपल्या मालकांना—अन्सेल्मोला—आपण शिव्याशाप दिले, तर ते सयुक्तिक ठरेल. पण बाईसाहेब, समजा, आपण आपल्या योजनेप्रमाणे त्याला ठार मारले, तर त्याचे प्रेत घेऊन आपण काय करणार ? ” कॅमिल्लाने उत्तर दिले, “ का ? असे का म्हणतेस ? ॲन्सेल्मोने दफन

करावे म्हणून आपण ते प्रेत येथे टाकून जाऊ. त्यांनी आपल्या हाताने आपली दुष्कीर्ती आणि बेअब्रू जमिनीत गाडून टाकावी हेच त्यांना खरे प्रायश्चित्त. त्याबद्दल त्यांनी माझ्याशी कृतज्ञ राहिले पाहिजे. म्हणून आटप, लोथॅरियोला चटकन् बोलव. कारण मला वाटते, माझे सूड घेण्याचे कार्य जितके लांबणीवर पडेल, त्यातील प्रत्येक क्षणी माझ्या पति-निष्ठेला अधिकाधिक तडा जाईल.''

कॅमिल्ला जे जे काही म्हणाली, ते सारे अ‍ॅन्सेल्मोने अत्यंत लक्षपूर्वक ऐकले. तिच्या प्रत्येक शब्दाने त्याच्या भावनांमध्ये विलक्षण बदल होत गेला. आपल्या मित्राची हत्त्या करण्याचा तिचा बेफाम निर्धार ऐकून, ती हत्त्या थांबविण्यासाठी स्वतः प्रगट होण्याचे त्याने ठरविले. पण एवढ्या निर्वाणीच्या निर्धाराचा शेवट काय होतो, हे पाहण्याच्या इच्छेने त्याने स्वतःला आवरले. ते दुष्कृत्य थांबविण्यासाठी आपण प्रगट होण्याची नितांत गरज आहे, असे दिसेपर्यंत त्याने लपून राहण्याचेच ठरविले. आता कॅमिल्लाने मूर्च्छा आल्यासारखे केले-भीती आणि अशक्तपणा आपल्या अंगी आल्याचे सोंग तिने केले. खोलीतील एका बिछान्यावर ती जाऊन पडली. तेव्हा लिओनेलाने अत्यंत शोकपूर्ण स्वराने विलाप करण्यास सुरुवात केली. ती म्हणाली, "अरेरे! किती अभागी मी! माझी मालकीण आपल्या सौंदर्याप्रमाणेच आपल्या शीलाने आणि चारित्र्याने सुविख्यात आहे. पण आज ती माझ्या बाहूत मृत्यू पावत आहे.'' असेच आणखीही काही ती बोलत राहिली. त्यात लबाडीमुळे आलेला इतका जोर होता की, तिला जर त्यावेळी कोणी पाहिले असते, तर त्याने अशीच खूणगाठ बांधली असती की, जगातील अत्यंत निष्पाप कुमारिका जर कोणी असेल, तर ती हीच आहे आणि तिची धनीण ही पीडित पेनेलोपी ¶ आहे.

थोड्याच वेळात कॅमिल्ला शुद्धीवर आली आणि लिओनेलाला ओरडून म्हणाली, "त्या अत्यंत दगाबाज आणि बेइमान मित्राला तू का बोलावले नाहीस? जा, जा, धावत-पळत जा. तू उशीर करून माझा संताप आणि सूडबुद्धी केवळ शब्दांमध्ये आणि पोकळ धमक्यांमध्ये आणि शिव्याशापांमध्ये वाया घालवू नकोस.'' लिओनेलाने उत्तर दिले, "बाईसाहेब, मी जाते, पण प्रथम आपण मला ती कट्यार दिली पाहिजे. नाही तर मी येथे नसताना तुम्ही स्वतःवर काही अत्याचार कराल आणि त्यामुळे आपल्याविषयी प्रेम आणि आदर बाळगणाऱ्या आपल्या सर्व मित्रांना सतत दुःख करावे लागेल.'' कॅमिल्ला म्हणाली, "अशा भीतीमुळे तू थांबू नकोस. तू परत येईपर्यंत मी काहीही करणार नाही, अशी खात्री बाळग. कारण, मी स्वतःला परमावधीची शिक्षा करून घेण्यास घाबरणार नसले, तरी ल्युक्रेशियाप्रमाणे, † मी माझ्या बेअब्रूचे मुख्य कारण

¶ तिचा पती दूर गेला असताना तिने एक वस्त्र विणण्याचे निमित्त सांगून पुष्कळ प्रियकरांना दूर ठेवले होते, असे 'ओडिसी' काव्यात वर्णिले आहे.

† शीलभंग होताच आत्महत्या करणारी रोमन स्त्री.

असलेल्या त्या दुष्टाला ठार केल्यावाचून स्वतःला शिक्षा करणार नाही. मला जर मरावयाचेच असेल, तर मी ते नाकारणार नाही. पण ज्याने मला या पाप–कर्मात मोहाने ओढून नेले, त्याच्यावर मी प्रथम सूड उगवीन. त्यायोगे मला काही ठपका न येता, त्याला आपल्या अपराधाबद्दल शोक करावा लागेल. ”

आपल्याला एकटे सोडण्याविषयी कॅमिल्लाने जी इच्छा व्यक्त केली, तिचा प्रभाव लिओनेलावर फारसा पडत नव्हता. पण शेवटी तिने आपल्या धनिणीची आज्ञा पालन केली आणि ती तेथून निघून गेली. मग कॅमिल्लाने स्वतःचे आणि आपल्या पतीचे रंजन करणारे पुढील स्वगत भाषण केले. “ देवा ! मी जर लोथॅरियोला जोराचा प्रतिकार केला असता आणि दिखाऊ संमती दिली नसती तर, त्याने माझ्याविषयी आपल्या मनात निंद्य भावना बाळगली नसती आणि मग माझ्या कृतीमुळे त्याला आपली चूक कळून आली असती. असे झाले असते तर, पुष्कळ दृष्टींनी ते खरोखर चांगले झाले असते. पण मग मला ही सूडाची संधी मिळाली नसती. तसेच त्याने माझ्या शीलावर उद्धटपणे शिंतोडे उडविले असतानाही तो तसाच, काही शिक्षा न होता, निघून गेला असता आणि मग माझ्या पतीच्या कीर्तीला कलंक लावणाऱ्याचा बदला मला घेता आला नसता. छेः ! छेः ! त्या मित्रद्रोह्याने जे लबाडीचे आणि बेइमानीचे प्रयत्न करण्याचा गुन्हा केला, त्याचे प्रायश्चित्त म्हणून त्याचे प्राण घेतले गेलेच पाहिजेत. त्याच्या अंतः-करणात प्रेमाची जी पापी ज्वाला पेटली होती, ती अंतःकरणातच न रहाता बाहेर उफाळली, म्हणून त्याच्या रक्ताने ती शांत झाली पाहिजे. जगाला माझा इतिहास कधीकाळी कळला तर त्याला हे समजले पाहिजे की, कॅमिल्लाला स्वतःचे शील आणि आपल्या पतीवरील निष्ठा पूर्णपणे अभंग राखणे एवढेच पुरेसे वाटत नव्हते, तर त्या शीलाचा उपमर्द जो कोणी तुच्छतेने करील आणि ते मातीस मिळविण्याचा प्रयत्न करील, त्याचा सूडही तिने घेतला. पण माझा सूड कृतीत उतरण्यापूर्वी अँन्सेल्मोला हे सारे कळणे बरे. पहिल्या प्रयत्नाचे वेळीच मी त्याला यासंबंधी खेड्यात एक पत्र पाठ-विले होते. या बदनामीच्या अपकृत्याचा त्याला संताप आला नाही, याचे कारण केवळ त्याचा उदार स्वभाव आणि आपल्या मित्रावरील विश्वास हेच होय. आपला इतका कसलेला मित्र आपल्या अब्रूवर आणि लौकिकावर उठेल, असे त्याला मुळी वाटलेच नाही. आणि असे होणे काही चमत्कारिक नाही. कारण माझ्या डोळ्यांनी आणि कानांनी जे सत्य मला दाखविले, त्यावर मी तरी आतापर्यंत कोठे विश्वास ठेवला होता ? लोथॅरियोच्या अतिप्रसंग मर्यादित राहिला असता आणि आपल्या प्रेमभावनेचा निःसंदिग्ध पुरावा म्हणून त्याने जर अश्रूंचा पूर वाहिला नसता नि मोठमोठ्या देणग्या आणि तोंडभर आश्वासने दिली नसती, तर माझ्या भोळेपणामुळे पडणारी गफलत मला कधीच कळून आली नसती. पण या साऱ्या गोष्टींचा विचार करून काय उपयोग ? मी ठाम निश्चय करण्यासाठी विचाराची खरोखर काही गरज आहे का ? लबाड विचार ! आता माझे काम एकच–आणि ते म्हणजे सूड घेणे. तो दगाबाज माणूस येथे

येऊ दे, जवळ येऊ दे, ठार होऊ दे, नाश पावू दे, सत्यानाश होऊ दे त्याचा– मग त्याचा परिणाम कितीही घातुक होऊ दे, माझ्या प्रिय ॲन्सेल्मोने शुद्ध आणि निष्कलंक असणाऱ्या मला स्वीकारून आपल्या छातीशी धरले, आता तशाच अवस्थेत त्याच्या बाहूपासून निघून मला थडग्यात जाऊ दे. ही घटना वाटेल तितकी घातक होवो ! त्या अत्यंत लबाड आणि दगाबाज मित्राच्या भ्रष्ट आणि अशुद्ध रक्तामध्ये माझे स्वतःचे शुद्ध रक्त मिसळो." असे म्हणून आणि हातांत नंगी कट्यार घेऊन ती त्या खोली-मध्ये इतक्या आवेगाने संचार करू लागली आणि तिच्या मुद्रेवर व हालचालीमध्ये इतका क्षोभ प्रकट होऊ लागला की, ती भ्रमिष्टासारखी दिसू लागली – कोमल आणि नाजुक ललनेपेक्षा खुनी माणसासारखी ती दिसू लागली.

ॲन्सेल्मोने पडद्याआडून हे सर्व स्पष्टपणे पाहिले व ऐकले–आणि त्यामुळे त्याला बराच संतोष झाला. जगात मिळणार नाही अशा भरभक्कम पुराव्याने आणि सबळ कारणाने त्याच्या मनातील पूर्वीच्या साऱ्या शंकाकुशंका व द्वेष-मत्सर पार नाहीसे झाले. त्याला फार चिंता वाटू लागली आणि लोथॅरियोने येथे येऊ नये अशी इच्छा तो करू लागला. त्याच्यावर जे संकट कोसळण्याचे भय उत्पन्न होते, त्यापासून त्याचा बचाव व्हावा म्हणून त्याने स्वतः प्रकट होण्याचे ठरविले. पण त्याचक्षणी लिओनेला ही लोथॅरियोला खोलीत घेऊन येताना त्याला दिसली. तो येताना दिसताच, कॅमिल्लाने जमिनीवर कट्यारीने एक रेघ ओढली आणि त्याला बजावले, " ज्याक्षणी तू ही रेषा ओलांडशील, त्याचक्षणी मी तुझ्या छातीत हा खंजिर खुपशीन. मी काय म्हणते ते नीट ऐक. मध्ये अडथळा न आणता ऐक. माझे भाषण संपले म्हणजे तुला जे उत्तर द्यावेसे वाटेल, ते देण्याचे स्वातंत्र्य तुला आहे. अरे लोथॅरियो, मला प्रथम हे सांग की, तू माझ्या पतीला ओळखतोस काय ? मला ओळखतोस काय ? प्रश्न काही मोठा अवघड नाही, पण त्याचे उत्तर तू तत्काळ दिले पाहिजेस. विचार करण्याची काही गरज नाही. म्हणून विलंब न करता बोल." पडद्यामागे आपल्या पतीला लपवून असे प्रश्न विचारण्यात तिचा हेतु काय असावा, हे न कळण्याइतका लोथॅरियो मठ्ठ नव्हता. म्हणून त्याने तिच्या प्रश्नांना सुरेख उत्तरे दिली. त्यामुळे त्या कल्पित कथेला सत्यकथेचे स्वरूप आले. लोथॅरियो म्हणाला, " हे सुंदर कॅमिल्ला, मी येताच तू माझ्यावर अशा प्रश्नांची सरबत्ती करशील अशी मला कधीच कल्पना नव्हती. मला ज्या सौख्याची आशा तू लावलीस ते लांबणीवर टाकण्याची तुझी इच्छा असली, तर त्या निराशेसाठी तू माझ्या मनाची तयारी करावयास हवी होतीस. आपल्या सुखाचा पेला आपल्या ओठाजवळ येत आहे, अशी ज्याला आशा असते, त्याला ती आशा नष्ट झाल्यावर फार दुःख होते. पण आता मी तुझ्या प्रश्नांची उत्तरे देतो. बाईसाहेब, मी हे कबूल केले पाहिजे की, मी आपल्या पतीला ओळखतो आणि तो मला ओळखतो–आणि ही आमची परस्परांची ओळख आमच्या बालपणापासून वाढलेली आहे. त्या माझ्या मित्रावर मी, प्रेमाच्या प्रभावामुळे, जो अन्याय केला, त्याची जाणीव मला आहे. हे दिव्य कॅमिल्ला, आम्हा उभयतांच्या

मैत्रीचे कोमल स्वरूप तुलाही चांगले माहीत आहे हे मी कबूल करतो. माझे प्रमाद आत्ता आहेत त्यापेक्षा अधिक भयंकर असते, तरी प्रेमभावना ही त्या सर्वांना पुरेसे कारण आहे. आणि बाईसाहेब, मी आपल्या पतीला ओळखतो आणि त्याच्याइतकेच तुमच्यावर प्रेम करतो हे उघड आहे. माझ्या प्रतिष्ठेसाठी आणि मैत्रीच्या पवित्र धर्मासाठी मी कसे वागले पाहिजे, याची जाणीव मला आहे. पण केवळ आपल्या सौंदर्याच्या जादूमुळे ते सारे मी विसरलो आणि प्रेमाच्या अजिंक्य शक्तीमुळे मी माझ्या कर्तव्याचा भंग केला. अरेरे! आपली ओळख मला कमी झाली असती, तर मी अधिक निष्पाप राहिलो असतो. "

तेव्हा कॅमिला म्हणाली, "हे सारे जर तुला कबूल आहे आणि आम्हा दोघांना तू जर ओळखतोस, तर इतक्या पवित्र मैत्रीचे उल्लंघन करण्यास, इतक्या सच्च्या मित्राची हानी करण्यास आणि तरीही माझ्यापुढे इतक्या विश्वासाने येऊन उभे राहण्यास, तू कसा धजतोस? तुझा मित्र मला आपल्या प्रेमाचा आदर्श समजतो, हे तुला माहीत आहे. त्या आदर्शात तो आपल्या प्रेमाचे प्रतिबिंब आनंदाने आणि संतोषाने वारंवार पाहात असतो. त्या आरशात तुला स्वतःलाही आतापर्यंत असे दिसले असेल की, आपल्या मित्रावर अन्याय करण्यास भाग पाडणारा मोह किती क्षुद्र आहे. पण हाय! तुझ्या मर्यादातिक्रमाचे कारण यामुळेच माझ्या लक्षात येत आहे. मी जेव्हा एकटी आहे असे समजून काहीशी बेसावध होते, तेव्हा माझ्या संशयास्पद वर्तनाने तुला मोह पडला असावा. ते कारण कोणते याची तू आपल्या मनाशी खात्री करून घे. पण एक गोष्ट खरी की, स्वैराचार किंवा तत्त्वच्युती यामुळे मी तसे वर्तन केले नाही. जेव्हा आपल्याला कोणी पाहात नाही असे वाटते, त्यावेळेला कधी कधी स्त्री निष्पाप मनाने स्वैरपणे वागते. हे जर कारण नसेल तर, हे बेइमान माणसा, मी तुझ्या प्रेमयाचनेकडे कधी लक्ष पुरविले आणि तुझ्या अश्रूंना आणि शपथांना कधी महत्त्व दिले ते तरी सांग. आपली पापी वासना पूर्ण करण्याची अणुमात्र आशा तुला बाळगता यावी असे मी काय केले? तुझ्या पापी वासनेचा अव्हेर मी अत्यंत तिटकाऱ्याने आणि तुच्छतेने नेहमी केला नाही काय? तुझ्या बेफाट वचनांवर विश्वास असल्याचे मी कधी तरी प्रकट केले काय? तुझ्या प्रचंड देणग्यांचा स्वीकार मी कधी केला काय? पण आशेशिवाय प्रेम कधी टिकू शकत नाही. हे खरे असेल तर मी सारा दोष माझ्या अहेतुक अशा दुःखदायक वर्तनाला देते. म्हणून तुझ्या गुन्ह्याबद्दल तुला जी शिक्षा देणे योग्य आहे, तीच शिक्षा मी स्वतःला करून घेत आहे. मी तुझ्याशी जशी कठोरपणाने वागणार, तशीच माझीही गय करणार नाही, हे तुला दाखविण्यासाठी मी तुला येथे बोलावले आहे. माझ्या प्रिय पतीच्या अब्रूवर तू मत्सरामुळे बदनामीची जी काळोखी फासली आहेस, तिला मी माझा स्वतःचा बळी देणे न्यायाचे आहे. त्या माझ्या बलिदानाचा तू साक्षीदार व्हावेस. तुझे पापी हेतू पोसण्यास मी जर खरोखर तुला संधी दिली असेल आणि ती संधी तुझ्यापासून दुरावून घेण्याचे कामी अविचाराने हयगय केली असेल, तर मीही माझ्या पतीच्या कीर्तीला कलंक लावला असे

होईल. मी तुला पुनः एकदा सांगते की, मी पुरेशी सावधानता बाळगली नाही आणि माझ्या कृत्यावर जरूर तितका कडक पहारा ठेवला नाही, यामुळेच तुला असे बेफाम आणि बेछूट विचार मनात खेळविता आले असावेत, या संशयामुळेच मला अत्यंत तीव्र दुःख होते. या कृत्याला मी अत्यंत निष्ठुरतेने माझ्या स्वतःच्या हाताने शिक्षा करण्याचा निश्चय केला आहे. ती शिक्षा करण्याचे कार्य मी दुसऱ्या कोणावर सोपविले, तर माझा अपराध आणखीच वाढेल. होय, मी आता मरणार आहे. पण प्रथम मी मला या निराशेच्या परिस्थितीत लोटणाऱ्या भयानक कारणाचा विध्वंस निर्दयतेने आणि स्थिर चित्ताने करणार आहे. त्यामुळेच माझी सूडबुद्धी शांत होईल आणि निःपक्षपाती न्याय दिल्यासारखे होईल. "

असे बोलून ती इतक्या त्वेषाने लोथॅरियोवर धावून गेली आणि आपल्या नंग्या कट्यारीने त्याच्यावर हल्ला करण्याचा आविर्भाव तिने इतका उत्तम केला की, त्याला ते सारे नाटक असेल असे वाटेना. आणि म्हणून त्याने तिचा हात पकडला व तिच्या आघातापासून स्वतःला बचावले. नंतर आपल्या त्या नाटकाला अधिक जिवंत करण्यासाठी आणि निराशेने नि क्रोधाने लोथॅरियोवर सूड उगविण्यासाठी ती ओरडून म्हणाली, "माझ्या योग्य त्या इच्छा पूर्णपणे तृप्त होण्याचे भाग्य मला माझे दुष्ट नशिब मिळू देत नाही, पण माझा निर्धार पूर्णपणे धुळीस मिळविणे हे त्या दैवाच्या हाती नाही. " असे म्हणून लोथॅरियोने धरलेला आपला हात मागे घेऊन तिने आपल्या शरीरावर कट्यारीचा प्रहार केला, तो अशा जागी की, त्यामुळे आपल्याला कमीत-कमी इजा व्हावी. त्या जखमेने आपल्याला मूर्च्छा आलेली आहे असे दाखविण्यासाठी ती जमिनीवर पडली. या अकल्पित घटनेने चकित झालेले लोथॅरियो आणि लिओनेला यांना, आपण काय करावे, हे कळेना. जमिनीवर ती रक्तबंबाळ स्थितीत पडलेली होती. लोथॅरियो थरथरा कापू लागला. त्याचा चेहरा फिकट दिसू लागला. तिच्या हातातील कट्यार काढून घेण्यासाठी तो तिच्याकडे धावला. पण तिच्या अंगातून फारच थोडे रक्त वाहात आहे, असे पाहून त्याची भीती ओसरली. सुंदर कॅमिल्लाच्या बुद्धिमत्तेचे आणि हुशारीचे तो पूर्वीपेक्षाही अधिक कौतुक करू लागला. पण आपली भूमिका चोख वठविण्यासाठी आणि आपण तिचे मित्र आहोत असे दाखविण्यासाठी, तो कॅमिल्लाच्या देहावर पडून अत्यंत करुण स्वराने शोक करू लागला. जणू काही ती खरोखरच मेलेली आहे. तो स्वतःला शिव्या देऊ लागला आणि तो घातुक प्रयोग करण्यास आपल्याला सांगणाऱ्या आपल्या मित्रा-लाही शिव्या देऊ लागला. आपले भाषण ॲन्सेल्मो ऐकत आहे हे माहीत असल्यामुळे, कॅमिल्लापेक्षाही स्वतःविषयी मोठी करुणा निर्माण करणाऱ्या गोष्टी तो बोलू लागला.

त्या दुर्दैवी साहसामध्ये तिचा प्राण गेला असे भासत होते. लिओनेलाने तिचा देह बिछान्यावर नेऊन ठेवला आणि लोथॅरियोला विनंती केली की, "माझ्या माल-किणीची जखम गुप्तपणाने बरी करण्यासाठी एखाद्या शस्त्रक्रिया-विशारद वैद्याला घेऊन या. ती पूर्णपणे बरी व्हायच्या आत तिचा पति परत आला तर त्याला या साऱ्या भानगडीचे

कारण काय सांगावे ? " त्याने उत्तर दिले, "आपल्या मनास येईल ते सांगावे. या बाबतीत सल्ला देण्यासारखी माझ्या मनाची स्थिती नाही. पण आधी तू आपल्या मालकिणीचे रक्त थांबविण्याचा प्रयत्न कर. आता मी अशा ठिकाणी जाणार आहे की, जेथून तुम्हाला माझ्याविषयी काहीच कानावर पडणार नाही."

असे म्हणून तो तेथून निघाला. त्या घटनेमुळे आपल्याला फार दुःख झाले आहे आणि चिंता वाटत आहे, असा आभास त्याने उत्पन्न केला. बाहेर जाताच त्याला विचार करण्यास सवड सापडली. या घटनेमध्ये कॅमिल्लाने आणि तिच्या दासीने केलेले वर्तन पाहून त्याला अत्यंत आश्चर्य वाटले. या घटनेमुळे ॲन्सेल्मोला आपल्या पत्नीच्या शीलाची खात्री किती पटली असेल, याचेही त्याला कल्पनातीत नवल वाटले. (शेक्सपियरने रंगविलेल्या) पोर्शियाची ही दुसरी आवृत्तीच आहे असे त्याला वाटले. तिला भेटण्यास तो उत्सुक होता. सत्याला असे बेमालूम स्वरूप दिल्याबद्दल, तिच्यासह आपण आनंद लुटावा असे त्यास वाटले. लिओनेलाने रक्त थांबविले. या फसवणुकीला जरूर तितकेच रक्त सांडले गेले होते. दारूने तिची जखम धुऊन ती बांधण्याचा प्रयत्न करीत असताना ती इतके हृदयद्रावक बोलत होती आणि दुःखाचे नाटक इतके उत्तम वठवीत होती की, तेवढ्यावरूनच आपली पत्नी जगातील सर्वश्रेष्ठ शीलवती स्त्री आहे अशी ॲन्सेल्मोला खात्री पटली असती. कॅमिल्ला गप्प नव्हती. ती थोडथोडे शब्द उच्चारून आपल्या भूमिकेला पुष्टी देत होती, तिच्या प्रत्येक शब्दात स्वतःचा भित्रेपणा आणि नीचपणा यांचा धिक्कार भरलेला होता. "माझ्या आयुष्याचा मला फार फार तिटकारा वाटतो. ते झटकन नष्ट करण्यास मला सामर्थ्य आणि वेळ मिळाला नाही, याचे मला दुःख वाटते. आता मी माझ्या पतीला हा सारा वृत्तांत सांगू की नको ?" असे ती बोलत राहिली. "हा सारा वृत्तांत लपवून ठेवावा, नाही तर आपले पतिराज लोथॅरियोवर सूड उगवल्याशिवाय राहणार नाहीत आणि त्यामुळे त्यांचाही दोष उघडकीस येईल. अशा गोष्टीत नेहमी फार मोठा धोका असतो. कोणत्याही सु-गृहिणीने आपल्या पतीला भांडणात न गुंतविण्याचा आटोकाट प्रयत्न करावा, म्हणून आपण या घटनेची गंधवार्ताही त्याला लागू देऊ नये." असा सल्ला लिओनेलाने दिला. तिचा युक्तिवाद कॅमिल्लाला पटला. पण ती म्हणाली, "माझा पती परत आल्यानंतर त्याला माझी ही जखम दिसेल हे खचित. तिचे काही तरी कल्पित कारण आपण शोधून काढले पाहिजे." लिओनेलाने उत्तर दिले, "हे फार कठीण काम आहे. कारण थट्टेतसुद्धा सत्य लपविणे आपल्याला जमत नाही." कॅमिल्लाने उत्तर दिले, "असत्याचा ओंगळ आश्रय केल्याशिवाय जीव बचावत नाही, अशीच माझी परिस्थिती आता नाही का ?" लिओनेलाने उत्तर दिले, "बाईसाहेब, जाऊ द्या ते. याचा आणखी शीण आपल्या डोक्यास देऊ नका. मी उद्या सकाळपर्यंत काही तरी युक्ती शोधून काढीन. जेथे आपल्याला जखम झाली आहे, तो शरीराचा भाग त्यांच्या निरीक्षणातून लपून राहील असाच आहे, आणि त्यामुळे आपले सारे भय नाहीसे होईल अशी मला आशा वाटते."

आपल्या नष्ट झालेल्या लौकिकाची ही वरपांगी कहाणी ॲन्सेल्मोने अत्यंत लक्ष-पूर्वक ऐकली व पाहिली. या शोकांतिकेतील सर्व पात्रांनी आपापली कामे इतक्या जिवंतपणे केली की, त्यांनी घडविलेले प्रत्येक दर्शन कोणासही सत्यच वाटावे. अत्यंत अधीरपणाने त्याने अशी इच्छा मनात धरली की, आपण या आडोशाच्या जागेतून निघून आपल्या मित्राच्या घरी जावे आणि आपल्या पत्नीचे शील तावून-सुलाखून बाहेर पडले याचा आनंद लुटावा. त्याला तेथून जाण्यास कॅमिल्ला आणि तिची दासी यांनी एक संधी मिळवून दिली. ती आपण गमावू नये, म्हणून त्याने तत्काळ तिचा फायदा घेतला. लोथॅरियोच्या घरी गेल्यावर त्याने त्याला किती आलिंगने दिली, कॅमिल्लाची किती भरमसाट स्तुती केली आणि आपल्या सुदैवाबद्दल आत्यंतिक संतोष व आनंद कसा प्रकट केला–हे सारे सांगणे अशक्य आहे. आपल्या मित्राच्या या आनंदात काहीही भाग न घेता लोथॅरियो ते सारे ऐकून घेत होता. आपल्या मित्राची इतकी घोर फसवणूक झाली आहे आणि त्याच्या प्रतिष्ठेला धक्का देणारा द्रोह आपल्या हातून घडला आहे, याचा त्याला मोठाच धसका बसला होता. आपण जे काही सांगत आहोत, त्यामुळे लोथॅरियोच्या मनाला काडीमात्र आनंद होत नाही, हे ॲन्सेल्मोच्या ध्यानी सहज आले, पण त्याला वाटले, त्याच्या हातून कॅमिल्लाला जी जखम झाली, त्यामुळेच तो आपल्या आनंदात सहभागी होत नसावा. म्हणून त्याने त्याला सांगितले, “ त्याचा त्रास तू आपल्याला फारसा करून घेण्याचे कारण नाही. तिची जखम भयंकर नाही. ती माझ्यापासून लपवून ठेवण्याचे तिने आणि तिच्या दासीने ठरविले आहे. ” त्याच्या भीतीचे हे कारण दूर झाल्यामुळे आता त्याची मुद्रा आनंदी व्हावी, अशी इच्छा ॲन्सेल्मोला झाली आणि तो म्हणाला, “ यापुढे मला पूर्ण सौख्य आणि संतोष यांचा लाभ होईल. कॅमिल्लाच्या शीलाचे पवाडे पुढील पिढ्यांना सांगण्यासाठी मी तिच्या स्तुतिपर कविता रचण्यात माझे उरलेले आयुष्य घालविणार आहे. ” त्याचा हा निश्चय लोथॅरियोने मान्य केला आणि आपणही तसेच करण्याचे वचन दिले. अशा प्रकारे ॲन्सेल्मो हा अत्यंत वंचित पण आनंदित असा माणूस बनला. म्हणून त्याने आनंदाच्या भरात, आपल्या कीर्तीचे साधन म्हणून, लोथॅरियोला आपल्या घरी तावडतोब नेले. पण खरोखर त्याची दुष्कीर्ती आणि बेअब्रू यांचे एकमेव कारण म्हणजे लोथॅरियो हाच होता. कॅमिल्लाने आपल्या पतीचे स्वागत केले. त्यावेळी तिच्या मनातील समाधान तिच्या मुद्रेवर मुळीच उमटलेले नव्हते. तिने आपल्या मुद्रेवर क्रोधाच्या छटा मुद्दाम धारण केल्या होत्या, पण अंतर्यामी पतीला पाहून तिला आनंदाच्या उकळ्याच फुटत होत्या.

ही लबाडी काही काळ लपून राहिली. पण भाग्यचक्र फिरले आणि त्यांनी आतापर्यंत दीर्घकाळ कपटाने जो दुष्टपणा झाकून ठेवला होता, तो जगापुढे उघड झाला. ॲन्सेल्मोच्या बेसुमार संशयखोरपणामुळे त्याला त्याचे प्राण गमवावे लागले.

▣ ▣

## प्रकरण ८

# चमत्कारिक अशिष्टाच्या कादंबरीचा समारोप आणि डॉन क्विक्झोट व काही दारूचे बुधले यांच्यातील भयंकर चकमक

कादंबरीचा शेवट येत चालला, तेव्हा सँको पँझा हा डॉन क्विक्झोट यांच्या खोलीतून अत्यंत भयभीत अवस्थेत धावत-धावत बाहेर आला. आणि ओरडला, "धावा! धावा! सज्जनहो! माझ्या धन्याला मदत करा. मिकोमिकोना या राजकन्येच्या शत्रूवर – त्याच राक्षसावर – माझा धनी दात-ओठ खाऊन तुटून पडला आहे. माझ्या साऱ्या आयुष्यात मी याहून भीषण युद्ध कधीच पाहिले नाही. त्याने त्या राक्षसाला असा काही जबरदस्त तडाखा दिला आहे की, (टर्निप) झाडाची फांदी तोडावी त्याप्रमाणे त्या राक्षसाचे मुंडके उडविले गेले आहे." पाद्रीबुवांच्या वाचनात खंड पडला, तेव्हा ते म्हणाले, "सँको, तू मूर्ख आहेस. अरे, तुझा धनी काय सैतान आहे की तो तीन हजार मैलांवरून राक्षसाशी लढेल?" यानंतर त्या सर्वांच्या कानी खोलीतील गोंगाट नि गडबड ऐकू आली. डॉन क्विक्झोट ओरडत होते, "दुष्टा, दरोडेखोरा, थांब. तू येथे माझ्या तावडीत सापडला आहेस, आता तुझी वाकडी तलवार तुझ्या काहीच उपयोगी पडणार नाही." असे म्हणून शिलेदारजी अत्यंत त्वेषाने भिंतीवर आपल्या तलवारीचे वार करू लागले. सँको म्हणाला, "भल्या माणसांनो, माझा धनी तुमचे काही ऐकणार नाही. तेव्हा तुम्हीच त्याच्याकडे धावत जाऊन त्याला मदत का करीत नाही? मला खात्री आहे की, हे सारे मांसाचे भोजन तयार होत आहे आणि तो राक्षस या वेळपर्यंत त्या भांड्यात जाऊन पडला असेल आणि आपल्या दुष्ट जीवनाचा झाडा देत असेल. कारण त्याचे रक्त साऱ्या घरभर वाहात असलेले मी पाहिले. आणि त्या रक्ताच्या थारोळ्यात त्याचे डोके वाहात चालले होते. अरे बापरे! केवढे त्याचे डोके!– उभ्या स्पेनमधील दारूच्या कोणत्याही पिशवीपेक्षा ते मोठे होते." खानावळवाला म्हणाला, "आग लागो तुझ्या बडबडीला! डॉन क्विक्झोट यांच्या बिछान्याच्या उशाशी दारूचे जे बुधले भरून ठेवले होते, त्यांचे तुकडे ते करीत आहेत यात मला शंका वाटत नाही. हे माझे म्हणणे खोटे असेल तर काकडीप्रमाणे माझे तुकडे करा. आणि हा महामूर्ख त्या वाहणाऱ्या दारूला रक्त समजतो आहे!" नंतर ती सारी मंडळी त्या खोलीत धावत गेली, तेव्हा त्यांना तो बापडा शिलेदार इतक्या हास्यास्पद अवस्थेत आढळला, की त्याची कल्पनाच करता येणार नाही.

डॉन क्विक्झोट सदरा घालून उभे होते. त्या सदऱ्याचा पुढील भाग त्यांच्या पोटाच्या कडेपर्यंत पोचत नव्हता आणि मागचा भाग त्याहून लहान होता. त्यांचे पाय एखाद्या पशूप्रमाणे घाणेरडे आणि केसाळलेले होते. ते लांब आणि कृश असल्यामुळे त्यांचे स्वरूप काही वेगळेच भासत होते. त्यांचे सारे स्वरूप एकजिनसी दिसत होते. त्यांनी आपल्या डोक्यावर खानावळवाल्याची छोटी, तांबडी, मळकट आणि जुनाट अशी रात्रीची टोपी घातली होती. ढाल म्हणून त्यांनी एक उत्तम घोंगडी आपल्या डाव्या हाताला गुंडाळली होती. आपल्याजवळ पडलेली समशेर त्यांनी उजव्या हातात धारण केली होती. जणू काही कोणा धिप्पाड शत्रूशी आपला खरोखर सामना चालू आहे अशा आविर्भावाने ते मधूनमधून काही रण-घोषणा करीत होते. खरी गंमत ही आहे की, इतका वेळ ते गाढ झोपलेले होते. आपण हाती घेतलेल्या धाडसी प्रसंगाच्या विचारांचा पगडा त्यांच्या कल्पनाशक्तीवर इतका जबरदस्त बसला होता की, त्यांच्या क्षीण कल्पनेने त्यांना निद्रावस्थेत मिकोमिकोनाचे राज्य आणि तो राक्षस यांचे दर्शन घडविले होते. आपण राक्षसाशी युद्ध करीत आहो असे स्वप्न त्यांना पडत होते. त्यांनी दारूच्या पिशव्यांवर इतक्या त्वेषाने हल्ला केला की, सारी खोली त्या चांगल्या दारूवर तरंगत राहिली. हा अनर्थ पाहून खानावळवाला खवळला आणि मुठी वळून डॉन क्विक्झोटवर धावून गेला. त्याला कार्डेनियो व पाद्री यांनी बाजूस घेतले नसते, तर शिलेदारापुढे तो खरोखर राक्षसच ठरला असता. पण या सर्व प्रकारामुळेही बिचारा डॉन काही जागा झाला नाही. म्हणून न्हाव्याने त्याच्या अंगावर थंड पाण्याची बादली ओतली. तेव्हा शिलेदारजी झोपेतून जागे झाले, मात्र स्वप्नातून नव्हे.

आपल्या कैवाऱ्याचा सदरा आखूड आहे, हे पाहून डोरोथीला त्या लढाईची शिसारी आली. त्या राक्षसाचे मुंडके शोधण्यासाठी सँको त्या खोलीत इकडे तिकडे धावत सुटला, पण त्याची धावाधाव फुकट गेली. तेव्हा तो म्हणाला, " बरोबर आहे. हे घर भुताटकीने पछाडले आहे, असे मला स्पष्टपणे दिसते. मी जेव्हा येथे पूर्वी आलो होतो, तेव्हा याच खोलीत एखाद्या माऱ्याप्रमाणे मला बडविण्यात आले होते, पण मला कोणी बडविले याचा थांगपत्ता लागला नाही – चंद्रावरील माणसाइतकेच त्याचे मला ज्ञान आहे. आता मी माझ्या डोळ्यांनी राक्षसाचे जे डोके उडविल्याचे पाहिले; ते गुप्त झाले आहे. एखाद्या नळातून धो धो करीत पाणी बाहेर पडावे, तसे त्या राक्षसाच्या शरीरातून रक्त वेगाने बाहेर येत असलेले मी पाहिले हे खचित. " तेव्हा खानावळवाला म्हणाला, " रक्त काय नि नळ काय ? त्यांच्यासंबंधी हा रांड–लेक हवे ते बडबडत आहे. अरे बदमाषा ! तुकडे झाले आहेत ते माझ्या दारूच्या बुधल्याचे, आणि या साऱ्या खोलीभर जे वहात आहे ती माझी दारू आहे. ज्याने हा अनर्थ ओढवून आणला, त्याचा आत्मा रौरव नरकात खितपत पडावा, अशी माझी इच्छा आहे. " तेव्हा सँको म्हणाला, " थांब, थांब ! उगाच मला त्रास देऊ नकोस. मी तुला इतकेच सांगतो की, मला राक्षसाचे मुंडके सापडत नाही. ते गेले आणि त्याबरोबर माझे राज्यही गेले. पाण्यात

मीठ विरघळावे त्याप्रमाणे मी साफ बुडालो." खरोखर, सँकोच्या धन्याला झोपेत पडलेले स्वप्न जितके आनंदाचे होते, तितकेच सँकोचे जागेपणीचे स्वप्न! तो वेडपट सेवक आपल्या मूर्ख धन्यापुढे तेच तुणतुणे वाजवीत बसला आहे, हे पाहून खानावळ-वाल्याला वेड लागायची पाळी आली. त्याने त्यांना निक्षून सांगितले, "पूर्वीप्रमाणे तुम्ही येथे पुनः येऊ नका. माझी जी दारू गेली तिची भरपाई तुमच्या शिलेदारीने होणार नाही. ती भरपाई करण्यासाठी आणि दारूच्या फाटलेल्या पिशव्यांना चामड्याचे तुकडे जोडण्यासाठी तुम्ही मला पैसे दिले पाहिजेत."

तोपर्यंत डॉन क्विक्झोट यांना वाटू लागले की, आपण आपले धाडशी कृत्य तडीस नेले आहे. त्यांचा हात धरून उभा असलेल्या पाद्र्याला ते राजकन्या मिकोमिकोना समजले, आणि तिच्यापुढे लोटांगण घालून व राजघराण्याविषयीचा आदरभाव प्रकट करून ते म्हणाले, "सुविख्यात नि महान् अशा राजकन्ये, आता आपण आपल्या शत्रूचे कोणतेही भय न बाळगता यापुढे निर्धास्तपणे राहावे. त्याचा पराजय मी केव्हाच केला आहे. माझे संकल्पित कार्य मी सिद्धीस नेले आहे. ईश्वराच्या कृपेने आणि जिच्यासाठी मी जगतो नि जिंकतो, त्या हृदयस्वामिनीच्या प्रसादाच्या प्रभावाने, आपले धाडस सुखाने यशस्वी झाले आहे." सँको म्हणाला, "लोकहो, मी तुम्हाला हे सांगितले नव्हते का? आता दारूडा कोण? आणि मूर्ख कोण? माझ्या धन्याने त्या राक्षसाला खोड्यात टाकले की नाही पाहा! तुताऱ्या वाजत आहेत आणि मी सरदार बनलो आहे." तो धनी व त्याचा सेवक यांच्या त्या बेफाम बोलण्याने सारी मंडळी बरगड्या दुखेपर्यंत हसू लागली. (अर्थात् याला अपवाद म्हणजे खाणावळवाला!– तो क्रोधाच्या आधीनं झालेला होता.) शेवटी न्हावी, कार्डेनियो आणि पाद्री यांनी मोठी गडबड करून डॉन क्विक्झोट यांना अंथरुणावर निजविले. ते अत्यंत थकलेले असल्यामुळे तत्काळ झोपी गेले. नंतर ती सारी माणसे तेथून निघाली आणि राक्षसाचे मुंडके गमावल्याबद्दल शोक करणाऱ्या सँको पँझाचे सांत्वन करू लागली. पण खाणावळ-वाल्याला शांत करणे सोपे नव्हते. त्याच्या दारूच्या पिशव्यांचा अकस्मात् आणि अकल्पित विध्वंस झाल्यामुळे त्याचे डोके ठिकाणावर नव्हते.

इकडे हे चालू असताना, घरधनीण घरात इकडे-तिकडे धावत होती आणि किंचाळत होती, "हा दुर्दैवी शिलेदार कोणत्या अशुभ क्षणी माझ्या घरी आला? मी त्याला कधी पाहिले नसते तर फार बरे झाले असते! कारण, त्याला केलेला पाहुणचार मला महाग पडला. तो अन् त्याचा चाकर, त्याचा घोडा आणि त्याचे गाढव— हे सर्वजण आपल्या भोजनासाठी आणि बिछान्यासाठी त्या जनावरांच्या चाऱ्यासाठी नि गवताच्या अंथरुणासाठी मला एक पैही न देता गेल्या खेपेस निघून गेले होते. आणि ते का? तर ते शिलेदार पराक्रम करण्यास निघाले होते म्हणून! त्यांच्या शिलेदारीचे पुतळे उभारले, तरी मला काय करायचे? त्यामुळे ते जर पैसे देणार नसतील, तर त्यांनी काही खावयास नको होते. याच निमित्ताने दुसऱ्या माणसाने माझी चांगली

शेपटी पळवली आणि ती नासून टाकली. तिचे सारे केस तोडले गेले. आता माझ्या नवऱ्याला तिचा पुनः उपयोग होणार नाही, हे स्पष्ट आहे. आता माझ्यासंबंधी पुनः म्हणावयाचे तर, त्याने माझ्या दारूच्या पिशव्या फाडून टाकल्या आणि माझी दारू खराब केली. तसेच त्याच्या हृदयातील रक्त माझ्यासाठी कोणी तरी सांडावे, अशी माझी इच्छा आहे. पण मी माझी पै न् पै वसूल करीन–खचित वसूल करीन, नाही तर मी माझे नाव सांगणार नाही आणि मला जन्म देणाऱ्या आईचे नाव टाकून देईन."

तिची इमानी दासी मेरिटोर्नेस हिने तिच्या क्रोधाला पुष्टी दिली. पण पाद्र्याने त्यांचे तोंड बंद करण्यासाठी असे अभिवचन दिले की, "तुमची दारू आणि तुमच्या पिशव्या–त्यातही तुम्ही ज्याचा एवढा गवगवा करता, ती शेपटी– यांची किंमत देऊन मी तुमची भरपाई करीन." डोरोथीने सँकोचे सांत्वन करण्यासाठी असे आश्वासन दिले की, "तुझ्या धन्याने त्या राक्षसाचा निःपात केला आहे आणि माझे राज्य मला मिळाले आहे असे जेव्हा दिसून येईल, तेव्हा माझ्या अधिकारातील सर्वांत मोठी सरदारकी तुला मिळेल ही खात्री बाळग." हे ऐकून सँकोला तरतरी आली आणि तो शपथेवर सांगू लागला, "मी त्या राक्षसाचे मुंडके पाहिले होते. त्याच्या कमरेपर्यंत त्याची दाढी खाली लोंबत होती. ते मुंडके आता सापडत नसेल तर ते कोणा तरी चेटकीने दडवून ठेवले असावे. या घरात साऱ्या गोष्टी जादूटोण्याने घडत असतात. पूर्वी याची मला अद्दल घडली आहे." डोरोथीने उत्तर दिले, "माझा तुझ्यावर विश्वास आहे. तू धैर्य धर. साऱ्या गोष्टी ठीक होतील." अशा प्रकारे सारी माणसे शांत झाल्यानंतर, शेवटास येऊन पोचलेली कादंबरी पूर्ण करण्याची विनंती कार्डेनियो, डोरोथी वगैरेंनी पाद्रीबुवांना केली. त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून पाद्र्याने ते पुस्तक उचलून घेतले आणि पुढील मजकूर वाचण्यास सुरुवात केली—

कॅमिल्लाच्या शीलाची ॲन्सेलमोला इतकी खात्री पटली की, जगात कोणाला मिळणार नाही अशा निर्धास्तपणाने आणि शांततेने, तो आपले आयुष्य कंठू लागला. लोथॅरियोविषयी आपल्याला वाटणारा तिरस्कार कॅमिल्ला आपल्या मुद्रेवर सदैव प्रगट करू लागली. त्यामुळे ॲन्सेलमोने आपल्याला त्याच्या घरी येण्यास बंदी करावी, अशी लोथॅरियोला इच्छा झाली. ॲन्सेलमोची अर्धांगी आपल्याशी किती प्रतिकूलपणे वागत आहे आणि आपल्या संगतीविषयी तिला किती तिटकारा वाटत आहे, हे त्याच्या लक्षात आले. पण त्याची विनंती ॲन्सेल्मो मान्य करीना. त्याला समाधान वाटावे म्हणून लोथॅरियो तेथे सतत येत राहिला आणि आपला अपमान करून घेत गेला. तो त्यामुळे संतुष्ट होता. तो एकटाच नव्हे, तर लिओनेलाही आनंदी होती. आपल्या मालकिणीला न कळत, ती आपल्या शूर प्रियकराबरोबर असभ्य आनंद लुटण्यात दंग झाली होती. एके दिवशी रात्री तिच्या खोलीत कोणी बोलत आहे, असे तिच्या धन्याला ऐकू आले. तो कोण आहे, हे पाहण्यासाठी तो दारापाशी आला, तेव्हा दार घट्ट लावलेले आहे, असे त्याला आढळले. पण त्याने ते दार जोराने उघडले. तेव्हा त्याला

खोलीत शिरताच कोणी तरी खिडकीतून बाहेर उडी घेत असल्याचे दिसले. तो त्याचा पाठलाग करणार होता, पण लिओनेलाने त्याला मिठी मारली आणि आपला संताप नि चिता आवरण्याची विनंती केली. "जो माणूस येथून पळून गेला, तो माझा नवरा होता." असे ती म्हणाली. तिच्या बोलण्यावर ॲन्सेल्मोचा विश्वास बसेना. म्हणून त्याने आपल्या कमरेची कट्यार काढून तिला ठार मारण्याची धमकी दिली. 'हे सारे प्रकरण मला ताबडतोब उघड करून सांगितले नाहीस, तर तू प्राणास मुकशील.' अशी धमकी त्याने दिली. भीतीने गांगरून जाऊन तिने आपले प्राण वाचविण्याची विनंती त्याला केली आणि सांगितले, "आपल्या कल्पनेपेक्षाही आपल्याला अधिक जवळच्या गोष्टी मी उघड करून सांगेन." ॲन्सेल्मोने उत्तर दिले, "सांग तर मग झटकन, नाही तर तू मेलीस असे समज." तेव्हा तिने उत्तर दिले, "अशा गोंधळात आणि बावरलेल्या अवस्थेत, आपल्याला समजेल असे काही मला सांगता येणार नाही. उद्या सकाळ-पर्यंतच मला मुदत द्या, म्हणजे मी आपल्यापुढे अशा काही गोष्टी मांडीन की, आपण चकित नि विस्मित व्हाल. पण महाराज, आपण यावर विश्वास ठेवा की, खिडकीतून उडी मारून गेलेला माणूस हा या शहरातील एक तरुण आहे आणि त्याचा माझ्याशी प्रेमसंबंध आहे."

यामुळे ॲन्सेल्मोचे थोडेफार समाधान झाले आणि तिला आपला कबुलीजबाब देण्यास दुसऱ्या दिवशीच्या सकाळपर्यंत त्याने मुदत दिली. मागील अनुभवावरून त्याला कॅमिल्लाच्या चारित्र्याविषयी पुरेपूर खात्री होती. लिओनेला आपल्याला जे काही सांगणार आहे, त्यांत तिच्यासंबंधी काही असेल, असा त्याला मुळीच संशय वाटला नाही. नंतर त्याने तिला तिच्या खोलीत बांधून घातले आणि बजावले, "तू वचन दिल्याप्रमाणे सर्व काही सांगेपर्यंत तुला येथून बाहेर पडता येणार नाही." नंतर तो आपल्या खोलीत कॅमिल्लाकडे गेला आणि जे जे घडले ते सारे त्याने तिला सांगितले. दुसरे दिवशी सकाळी काही विलक्षण गोष्ट सांगण्याचे वचन तिने आपल्याला दिले आहे, हेही त्याने वगळले नाही. हे ऐकून कॅमिल्लाला किती चिंता वाटली असेल, याची कल्पना तुम्ही सहज करू शकाल. लिओनेला आपल्या वचनाप्रमाणे जी गोष्ट उघड करणार आहे ती आपल्या पातिव्रत्य-भंगाची असेल, याविषयी तिला काडीमात्र संशय नव्हता. तेच ती सांगणार आहे की नाही हे समजून घेईपर्यंत न थांबता, ॲन्सेल्मोला झोप लागताच, त्याच रात्री तिने आपली सारी रत्न-माणके आणि काही पैसे घेऊन त्या घरातून गुपचुप पोबारा केला, ती लोथॅरियोकडे गेली आणि झालेला सारा वृत्तांत तिने त्याला निवेदन केला आणि अशी इच्छा प्रदर्शित केली की, "मला एखाद्या ठिकाणी सुरक्षित ठेव, नाही तर माझ्याबरोबर अशा ठिकाणी चल की, जेथे ॲन्सेल्मोच्या भीतीपासून मुक्त होऊन आपण आनंद लुटू." हे आश्चर्यकारक निवेदन ऐकून लोथॅरियो इतका गडबडून गेला की, आपण काय करावे किंवा कोणता निर्णय करावा, हे त्याला काही काळ कळेना. पण शेवटी, कॅमिल्लाच्या संमतीने त्याने तिला भिक्षुणींच्या एका मठात ठेवले. त्याची

बहीण त्या मठाची महंत होती. मग कोणालाही आपल्या प्रवासाचा सुगावा लागू न देता तो त्या शहरातून बाहेर पडला.

दुसरा दिवस उजाडताच ॲन्सेल्मो उठला आणि आपल्या बायकोला काही न कळविता लिओनेलाच्या खोलीकडे त्वरेने गेला. ती आपल्याला जे काही सांगेल ते ऐकण्यास तो फार उत्सुक होता. पण त्या खोलीत त्याला कोणीच आढळले नाही. फक्त खिडकीला एकत्र घट्ट बांधलेल्या चादरी होत्या. त्यावरून ती कोणत्या दिशेने निसटली असावी हे त्याला कळून आले. या साहसाचे वृत्त कॅमिल्लाला सांगण्यासाठी तो अत्यंत दुःखी अंतःकरणाने परत आला. पण साऱ्या घरात ती त्याला आढळली नाही आणि त्याच्या नोकराकडून तिच्याविषयी काहीही वार्ता त्याला कळली नाही. त्यामुळे त्याला पराकोटीचे आश्चर्य वाटले. पण शोधाशोध करीत असताना त्याला तिच्या ट्रंका उघड्या असलेल्या आणि त्यातील बहुतेक सारी रत्ने गेलेली आढळली. तेव्हा आपली पुरेपूर नाचक्की झाली, याविषयी त्याला काडीमात्र शंका राहिली नाही. तशाच चिंतातुर अवस्थेत आणि अर्धवट कपड्यानिशी तो आपल्या दुर्दैवाची कहाणी सांगण्यासाठी लोथॅरियोच्या निवासस्थानी गेला. पण त्याच्या नोकरांनी तो त्याच रात्री पैसा-अडका आणि रत्ने घेऊन निघून गेला असल्याचे सांगितले. तेव्हा तर त्याच्या मनीच्या वेदना द्विगुणित झाल्या, आणि त्याचे दुःख कळसास पोचून त्याला वेड लागण्याची वेळ आली. सारांश, तो घरी परत आला. तेव्हा त्याला सारे घर रिकामे आढळले. कारण त्याचे सारे नोकर भीतीमुळे पळून गेले होते. आता कोणता विचार करावा, काय म्हणावे किंवा काय करावे, हे त्याला कळेना. त्याला त्याच्या मित्राने, त्याच्या सहचारिणीने आणि त्याच्या नोकरांनीही सोडले होते. तेव्हा प्रभूनेच आपल्याला सोडले आहे असे त्याला वाटले. पण त्याला सर्वांत मोठे दुःख झाले ते, आपली अब्रू आणि आपली कीर्ती हिरावली गेली याचे. सर्व परस्पर–पोषक घटनांवरून कॅमिल्लाचा गुन्हा अगदी स्पष्ट होत होता. हजारो प्रक्षुब्ध विचार मनात आल्यानंतर त्याने खेड्याकडे परत जाण्याचा निश्चय केला. आपला सत्यानाश करण्याची संधी लोथॅरियोला देण्यासाठी याच खेड्यास तो पूर्वी गेलेला होता. त्याने आपल्या घराची दारे पक्की लावली, आपला घोडा घेतला, आणि तो निराशेने, दुःखाने, आणि दुर्बल मनाने बाहेर पडला.

त्या सर्वांचा आघात त्याच्या मनावर इतका जबरदस्त झाला होता की, तो अर्धा-मुर्धा रस्ता घोड्यावरून गेला नसेल तोच त्याला घोड्यावरून खाली उतरणे भाग पडले. एका झाडाखाली त्याने आपले शरीर झोकून दिले. बहुतेक सर्व दिवसभर त्या शोकाकुल अवस्थेत राहून तो हजारोहजार त्रस्त विचार करीत राहिला. रात्र पडण्याचे थोडे आधी त्याला त्याच वाटेने येणारा एक प्रवासी दिसला. त्याला त्याने विचारले, "फ्लोरेन्सची बातमी काय आहे ?" प्रवाश्याने उत्तर दिले, "अलीकडे एक अत्यंत आश्चर्यकारक बातमी कानावर आली आहे आणि साऱ्या शहरातील चर्चेचा विषय तोच आहे. ती बातमी अशी की, श्रीमंत ॲन्सेल्मोच्या पत्नीला–कॅमिल्लाला–लोथॅरियोने काल रात्रीच

पळवून नेले. हे सारे कॅमिल्लाच्या दासीने कबूल केले आहे. ती दासी दोन चादरींच्या आधाराने ॲन्सेलमोच्या घराच्या खिडकीतून काल रात्रीच निसटली. या बाबतीत सत्य किती आहे हे मी सांगू शकत नाही. पण या चमत्कारिक घटनेचे आश्चर्य प्रत्येकाला वाटत आहे. कारण असा अपराध ॲन्सेलमोच्या जीवश्चकंठश्च मित्राकडून—लोथॅरियोकडून—कधीकाळी घडेल असा संशय कोणालाही आलेला नव्हता. ॲन्सेलमो आणि लोथॅरियो यांना 'मित्रद्वय' असेच लोक म्हणत." तेव्हां ॲन्सेलमोने विचारले, "लोथॅरियो आणि कॅमिल्ला कोणत्या दिशेने गेले हे कोणाला माहीत आहे काय?" प्रवासी उत्तरला, "नाही महाराज, त्यांचा शक्य तितका तपास गव्हर्नरने कसोशीने केला, पण व्यर्थ." ॲन्सेलमोने अधिक प्रश्न विचारले नाहीत. त्या दोघांनी एकमेकांचा निरोप घेतला आणि तो प्रवासी त्याला सोडून आपल्या वाटेने निघून गेला.

या दुःखदायक बातमीचा परिणाम दुर्दैवी ॲन्सेलमोवर इतका भयंकर झाला की, त्याच क्षणी आपल्यावर मृत्यूची कुऱ्हाड कोसळली असे त्याला वाटले. म्हणून आपल्या घोड्यावर कसेबसे बसून तो आपल्या मित्राच्या घरी गेला. त्या मित्राला त्याच्या अपमानाची काहीच कल्पना नव्हती, पण त्याची फिकट आणि दुःखी मुद्रा पाहून त्याने तर्क केला की, याच्यावर काही तरी अरिष्ट कोसळले असावे. ॲन्सेलमोने त्याला सांगितले, "तू मला आपल्या खोलीत तत्काळ ने आणि कागद–शाई–लेखणी दे नि दाराला कुलूप लावून आत मला एकटे राहू दे." आपला अंतकाळ जवळ आला आहे असे पाहून त्याने ठरविले, आपल्या अकल्पित आणि आकस्मिक मृत्यूचे कारण आपण लिहून ठेवावे. म्हणून लेखणी घेऊन तो लिहू लागला. पण त्याच्या मनात होते ते पूर्णपणे तो लिहू शकला नाही. त्यामुळे उतावळ्या संशयाचा बळी तो झाला. बराच वेळ झाला तरी त्याच्याकडून काहीच बोलावणे येत नाही, असे पाहून त्याच्या मित्राने त्या खोलीत जाण्याचे आणि आपल्या मित्राचे भलेबुरे काय झाले आहे, हे पाहण्याचे ठरविले. त्याला तो बिछान्यावरून अर्धवट खाली पडलेला आढळला. त्याचे तोंड जमिनीवर पालथे पडले होते आणि त्याच्या हातात लेखणी होती. त्याच्यापुढे कागद पडलेला होता. त्याची ही अवस्था पाहून तो मित्र त्याच्याजवळ गेला, त्याला त्याने हाका मारिल्या आणि त्याला हलवून पाहीले. पण तो मेला असल्याचे त्याला चटकन कळले. ही दुःखद घटना पाहण्यासाठी त्याने आपल्या नोकरांना बोलावले. नंतर त्याने तो कागद उचलला, त्यावर ॲन्सेलमोने आपल्या स्वतःच्या हाताने पुढील मजकूर लिहिलेला होता——

"मूर्ख आणि अशिष्ट जिज्ञासेने माझ्या आयुष्याचा नाश झाला. माझ्या मृत्यूची वार्ता कॅमिल्लाला कळली तर तिने असे समजावे की, मी तिला क्षमा केली आहे. काही चमत्कार करावा अशी तिच्यावर कोणी सक्ती केली नव्हती आणि तिच्याकडून अशी अपेक्षा करण्याचे मला काहीच कारण नव्हते. माझ्या अप्रतिष्ठेला मीच कारण असल्यामुळे——"

ॲन्सेलमोने एवढेच लिहिले होते. त्याच्या मनात असलेली कारणे लिहीपर्यंत

त्याचे आयुष्य टिकले नाही. दुसरे दिवशी त्या घराच्या मालकाने अँन्सेल्मोच्या मृत्यूचे वृत्त त्याच्या नातलगांना कळविले. त्यांना त्याच्या दुर्दैवाची माहिती पूर्वीच होती आणि कॅमिल्ला जोगिणींच्या ज्या मठात गेली होती, त्याचीही माहिती त्यांना होती. ती स्वतः मृत्यूच्या उंबरठ्यावर उभी होती. आपल्या पतीच्या नव्हे, तर लोथॅरियोच्या विरहामुळे मृत्यूच्या दाराशी जाऊन पोचली होती–लोथॅरियोविषयी तिने नुकतीच उडतउडत बातमी ऐकली होती. आता ती विधवा झाली होती, तरी ती बुरखा घेत नव्हती की मठाचा त्याग करीत नव्हती. थोड्याच दिवसांत तो एका लढाईत ठार झाल्याची बातमी तिला कळली. नेपल्सच्या राज्यात मॉशियर–डी–लॉट्रेक आणि खंदा सेनापति गोंझॅलो फर्नांडेस डी–कॉर्डोव्हा यांच्यामध्ये ही लढाई झाली. अपराधी आणि उशीरा पश्चात्ताप झालेल्या मित्राचा अंत असा झाला. ती बातमी एकून कॅमिल्लाने आत्महत्या करण्याचा आपला निश्चय तत्काळ जाहीर केला. दुःखाच्या आणि शोकाच्या भाराखाली दडपून गेलेल्या कॅमिल्लाने आपल्या मर्यादातिक्रमाची किंमत प्राणत्यागाने ताबडतोब देण्याचे ठरविले. अशा प्रकारे, ज्या कथेचा प्रारंभ अशिष्टपणातून झालेला होता, तिच्या शेवटीं त्या सर्वांचा अंत दुःखात झाला.

पाद्री म्हणाला, “ ही कादंबरी मला फार आवडली. पण तिच्यामध्ये काही सत्यांश आहे असे मला मुळीच वाटत नाही. हा जर केवळ कल्पनाविलास असेल, तर तो करण्यात ग्रंथकाराने चूक केली आहे. कारण, इतका धोक्याचा प्रयोग करावयास धजण्याइतका मूर्ख कोणी नवरा असेल, अशी कल्पना करता येत नाही. ग्रंथकाराने जर त्या पति-पत्नींना वीरपुरुष आणि त्याची स्वामिनी बनविले असते, तर ही कथा अधिक संभवनीय वाटली असती. पण आहे या स्थितीत ती जवळजवळ अशक्य कोटीतील वाटते. पण त्या कथेच्या निवेदन–पद्धतीवर आक्षेप घेण्यासारखे काही नाही हे मी कबूल केले पाहिजे. ”



# प्रकरण ९

## खानावळीमध्ये घडलेल्या अनेक आश्चर्यकारक घटनांचा वृत्तांत

त्याच वेळी दारात उभा असलेल्या खानावळवाल्याला काही मंडळी येत असताना दिसली. तेव्हा तो आनंदाने ओरडला, "आणखी पाहुणे येत आहेत. आनंदी वीरांची ती पलटणच आहे, हे खचित. त्यांनी जर येथे मुक्काम केला, तर 'आनंदी व्हा – आनंदी व्हा' हे गीत आपण गाऊ." कार्डेनियोने विचारले, "कोण आहेत ते?" यजमानाने उत्तर दिले, "चार माणसे. ती घोड्यावर बसलेली आहेत आणि त्यांच्या तोंडावर काळे रेशमी फडके बांधलेले आहे. त्यांच्या हातात भाले नि निशाणे आहेत. नखशिखांत शुभ्र वेष धारण करणारी एक महिला पण आहे. ती बुरखाधारी असून घोड्यावर एकटीच बसलेली आहे. त्यांच्यामागे दोन माणसे पायी पळत आहेत." पाद्र्याने विचारले, "ती माणसे जवळ आली काय?" खानावळवाल्याने उत्तर दिले, "अगदी दाराशी." हे ऐकून डोरोथीने बुरखा घेतला आणि कार्डेनियोने शेजारच्या खोलीत चपळाईने प्रवेश केला. त्या खोलीत डॉन क्विक्झोट निजले होते. ते पाहुणे अंगणात आले. ते चार घोडेस्वार अत्यंत सभ्य दिसत होते. ते घोड्यावरून उतरले, आणि त्या महिलेला घोड्यावरून खाली उतरण्यास मदत करण्यासाठी तिच्याकडे गेले. त्यांच्यापैकी एकाने तिला आपल्या बाहूत घेतले आणि घरात नेले. कार्डेनियो जेथे लपला होता, त्या खोलीच्या दाराशी एका खुर्चीवर त्याने तिला बसविले. हे सर्व करीत असताना त्यांची तोंडे दिसत नव्हती की त्यांच्या तोंडातून एक शब्द बाहेर पडत नव्हता. फक्त त्या महिलेने, खुर्चीवर बसताच, एक दीर्घ सुस्कारा टाकला आणि अशक्त अवस्थेत असल्यामुळे आपले हात खाली सोडले. त्या पाहुण्यांचे हे विचित्र वर्तन पाहून, ते कोण आहेत, हे जाणण्याची इच्छा पाद्र्याच्या मनात उद्‌भवली. म्हणून तो गोठ्यात असलेल्या त्यांच्या नोकरांकडे गेला, आणि त्याने त्याला विचारले, "तुमचे मालक कोण आहेत?" तेव्हा त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, "खरोखर, महाराज, आम्हाला ते सांगता येणार नाही. पण ते हलक्या कुळातील नसावेत असे दिसते. त्यातही त्या बाईला घरी नेणारा माणूस वरच्या वर्गातील असावा असे वाटते. कारण, बाकीचे लोक त्याचेविषयी मोठा आदर दाखवितात, आणि त्याचा शब्द कायद्याप्रमाणे पाळतात."

पाद्र्याने विचारले, "ती बाई कोण?" त्या नोकराने उत्तर दिले, "इतर गोष्टींप्रमाणेच तेही आम्हाला माहीत नाही. कारण, आतापर्यंत आम्ही तिचे तोंड पाहू शकलो नाही. त्याशिवाय तिला किंवा त्यांना आम्ही ओळखणे अशक्य. त्यानी आम्हाला– माझ्या

दोस्ताला आणि मला – रस्त्यावर गाठले आणि अँडालुसिया येथे जाईपर्यंत आपली नोकरी करण्याची गळ घातली. आमच्या कष्टाचे भरपूर पैसे देण्याचे त्यांनी वचन दिले. त्यांच्या संगतीत आम्ही दोन दिवस असूनही आम्हाला ते अगदी परके आहेत." पाद्र्याने विचारले, "एवढ्या काळात त्यांनी एकमेकांना कोणत्या नावाने हाक मारली?" तो चाकर उत्तरला, "मुळीच नाही, महाराज. सारा रस्ता संपेपर्यंत त्यांच्या तोंडून चकार शब्द निघालेला आम्ही ऐकला नाही. ती बिचारी बाई मात्र एकसारखी सुस्कारे टाकीत होती आणि करुण स्वराने दुःख करीत होती. त्यामुळे आमचा असा समज झाला की, तिला या प्रवासाची इच्छा नसावी. त्याचे कारण काय हे आम्हाला माहीत नाही. तिच्या वेषावरून ती जोगीण असावी, असे वाटते, पण तिच्या दुःखावरून आणि शोकावरून असा अंदाज करता येतो की, ते तिला जोगीण बनविण्यासाठी नेत असावेत. पण त्या बापड्या मुलीचे शरीर जोगिणीसारखे मुळीच नाही." पाद्री म्हणाला, "तसे असेलही." असे म्हणून तो तेथून निघाला आणि त्याने डोरोथीला जेथे सोडले होते, तेथे तो परत गेला.

ती बुरखेवाली महिला वारंवार सुस्कारे सोडीत आहे, हे पाहून डोरोथीला स्त्री-सुलभ करुणा सहजच वाटली आणि तिच्या दुःखाचे कारण काय आहे, याची चौकशी केल्याशिवाय तिला राहवले नाही. ती त्या महिलेला म्हणाली, "बाईसाहेब, मला क्षमा करा आणि आपले दुःख काय आहे, हे मला सांगा. केवळ जिज्ञासेने मी हे विचारीत नाही, तर आपल्याला मदत करावी, सेवा करावी, या कळकळीच्या बुद्धीने मी विचारीत आहे. स्त्रीजातीवर नेहमी ओढवणारे एखादे दुर्दैव आपल्यावर कोसळले असेल आणि ते दूर करणे एखाद्या स्त्रीच्या आवाक्यात असेल, तर त्या कामी मी साहाय्य करीन." तिच्या या विनंतीला त्या शोकग्रस्त महिलेने काहीच उत्तर दिले नाही. नवी नवी कारणे सांगून डोरोथीने तिला पुष्कळ आग्रह केला, पण व्यर्थ!

त्या मंडळींचा म्होरक्या म्हणून ज्याचा उल्लेख नोकराने केला होता, तो गृहस्थ मध्येच म्हणाला, "बाईसाहेब, या कृतघ्न स्त्रीवर आपल्या औदार्याचा वर्षाव करण्याचे श्रम आपण घेऊ नका. ती उपकाराची फेड कधीच करीत नाही. आपल्या विनंतीला तिच्याकडून उत्तर मिळेल अशी अपेक्षाही धरू नका. कारण तिच्या जिभेला सत्याचे वावडे आहे." तेव्हा ती उदास महिला म्हणाली, "महाराज, माझे सत्य आणि माझी प्रतिष्ठा यामुळेच मी अशा दुर्दशेत पडले आहे. तुम्ही अत्यंत लबाड आणि नीच माणूस आहा, हे सिद्ध करण्यास माझ्या हालअपेष्टा पुरेशा आहेत." डॉन क्विक्झोटच्या खोलीच्या दारामुळे कार्डेनियो या मंडळींपासून दूर पडला होता. पण तेथून त्याने हे शेवटचे शब्द अत्यंत स्पष्टपणे ऐकले आणि तत्काळ तो ओरडला, "देवा, देवा! काय ऐकतो आहे हे मी? माझ्या कानावर कोणाचा आवाज आताच आदळला?" त्याच्या या उद्गाराने दचकून जाऊन ती महिला त्या खुर्चीवरून ताडकन् उठून, तो आवाज जेथून येत होता, त्या खोलीकडे निघाली. पण ते पाहून त्या गृहस्थाने तिच्या खांद्यावर

हात ठेवून तिला अडविले.त्यामुळे त्या महिलेचे चित्त इतके विचलित झाले की, तिचा बुरखा खाली गळून पडला. यामुळे तिची अप्रतिम मुद्रा—अप्सरेसारखी सुंदर मुद्रा—दिसू लागली. ती अत्यंत फिक्ट आणि कावरीबावरी दिसत होती आणि तिचे डोळे चोहों-बाजूस उत्सुकतेने गरगरा फिरत होते. त्यावरून ती बेचैन आहे, असे दिसत होते. तिचे डोळे गरगरा फिरून काय शोधीत होते याची कल्पना डोरोथीला आणि इतरांना येईना. ते तिच्याकडे खेदाने व आश्चर्याने पाहात राहिले. ती इतक्या जोराने धडपडत होती आणि तिची ती धडपड पाहून तो गृहस्थ इतका अस्वस्थ झाला होता की, त्याचाही बुरखा खाली गळून पडला. तेव्हा डोरोथीला आपल्या पतीचा—डॉन फर्डिनांडचा—चेहरा दिसला. त्याची ओळख पटताच, "ओः !" असा दीर्घ दुःखोद्गार काढून ती मूर्च्छित पडली. सुदैवाने तिच्या पाठीमागे न्हावी नसता आणि त्याने तिला आधार दिला नसता, तर तिच्या शरीराचा सारा भार भूमीवर पडला असता. तिला मदत करण्यासाठी पाद्री तत्काळ धावत गेला. तिच्या तोंडावर पाणी मारण्यासाठी त्याने तिचा बुरखा दूर सारला, तेव्हा डॉन फर्डिनांड याला तिची ओळख तत्काळ पटली आणि तिच्याप्रमाणेच तोही मृतवत् झाला, तरीसुद्धा त्याने लुसिंडाला सोडले नाही. त्याच्या हातातून सुटण्यासाठी मोठी धडपड करणारी ती महिला म्हणजे लुसिंडाच होती!

डोरोथीचा दुःखोद्गार ऐकून आणि तो आवाज लुसिंडाचा आहे, असे मानून, कार्डेनियोने मोठ्या अस्वस्थ मनाने त्या खोलीकडे धाव घेतली. तेथे त्याला प्रथम जें दृश्य दिसले ते म्हणजे डॉन फर्डिनांड याने लुसिंडाला धरले आहे. तिला त्याची ओळख चटकन् पटली. विस्मयाने सर्वांची वाचा खुंटली. डोरोथी डॉन फर्डिनांडकडे आणि डॉन फर्डिनांड कार्डेनियोकडे आणि कार्डेनियो व लुसिंडा परस्परांकडे टक लावून पाहू लागले. शेवटी त्या स्तब्धतेचा भंग लुसिंडाने केला. डॉन फर्डिनांडला उद्देशून ती म्हणाली, "महाराज, आता आपला माझ्यावरील कबजा सोडा आणि मला जाऊ द्या. तेवढी उदारता आपल्या अंगी असावी किंवा आपल्या अंगी खचित असलेल्या अमानुषपणा-मुळे तरी मला सोडा. आपण मला सोडले म्हणजे मी एखाद्या वेलीप्रमाणे माझ्या पूर्वीच्या आधारभूत पुरुषाला बिलगेन. तुमच्या धमक्या किंवा विनवण्या, तुमच्या देणग्या किंवा आणाभाका—यापैकी कशानेही माझे त्यांच्यावरील प्रेम दूर होणार नाही. आता ईश्वराशी हुज्जत घालीत बसू नका. त्याच्या सामर्थ्यामुळेच अशा विलक्षण आणि अनपेक्षित मार्गांनी मी माझ्या प्रिय पतीच्या दृष्टीस आज पडत आहे. मृत्यूशिवाय दुसरा कोणीही मला त्याचा विसर पाडू शकणार नाही, अशी आपली खात्री पटविणारे हजारो पुरावे आपल्याजवळ आहेत. निदानपक्षी, आपल्या प्रेमाचे रूपांतर क्रोधात होवो, म्हणजे त्यामुळे, माझ्या प्रिय पतीच्या समक्ष, तुम्ही माझ्या जीविताचा—अन् त्याबरोबरच माझ्या दुःखांचा—अंत कराल. माझ्या पतीसमोर प्राण सोडण्यास मला अभिमान वाटेल. कारण, माझ्या आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत माझे प्रेम आणि शील अढळ राहिल्याची खात्री माझ्या मृत्यूने त्याला पटेल."

यावेळेपर्यंत डोरोथी शुद्धीवर आली होती. लुसिंडाच्या भाषणामुळे ती कोण आहे, हे तिला कळले होते. डॉन फर्डिनांड तिला आपल्या हातातून सोडणार नाही, हेही तिच्या लक्षात आले होते. तेव्हा आपत्तीला संधी समजून ती त्याच्या पायाशी पडली. तिचे सर्वांग अश्रूंनी भिजून गेले होते. ती म्हणाली, "महाराज, आपण आपल्या हातात जी लावण्यवती स्त्री पकडून ठेवली आहे, तिच्या लावण्याने आपले डोळे आतापर्यंत दिपले नसले तर, एकेकाळी सुखात पण आता दुःखात असलेल्या आणि आपल्या पायाशी लोळण घेणाऱ्या या डोरोथीकडे पाहा. मीच ती गरीब बिचारी नि नम्र ग्रामीणकन्या आहे. तिच्यावर आपण आपल्या प्रेमाचा नसला तरी औदार्याचा वर्षाव केला होता आणि तिला 'आपली' समजण्याचा बहुमान मोठ्या कृपेने दिला होता. एके काळी मी शांततापूर्ण आणि निष्पाप जीवन कंठीत होते आणि त्यावर मी संतुष्ट होते. पण आपण आला आणि आपल्या आर्जवांनी, मोठेपणाच्या देखाव्याने आणि फसव्या शब्दांनी आपण माझ्यावर मोहिनी घातली. तेव्हा मी माझ्या निवांत जागेपासून बाहेर पडले आणि माझे स्वातंत्र्य गमावून तुमच्या सत्तेला शरण गेले. त्याच्या मोबदल्यात मला काय मिळाले, हे माझ्या दुःखावरून आणि मी या विचित्र स्थानी आले आहे यावरून कोणालाही हेरता येईल. मी येथे कोणत्याही अप्रशस्त उद्देशाने आलेली नाही, तर तुम्ही माझा त्याग केल्यामुळे उद्भवलेल्या केवळ निराशेने आणि दुःखानेच मी येथे आले आहे. केवळ तुमच्या इच्छेमुळेच मी तुमच्याशी अत्यंत दृढपणे बद्ध झालेली आहे. आता तुम्ही काहीही केले तरी, तुम्ही माझे नाही असे होणार नाही. ज्या स्त्रीसाठी तुम्ही माझा त्याग करण्यास निघाला तिच्या सौंदर्याची आणि उच्च कुळाची बरोबरी माझ्या अद्वितीय प्रेमाला करता येईल काय, याचा विचार, प्राणप्रिय स्वामी, आपणच करावा. आपले प्रेम माझ्या एकटीच्या मालकीचे आहे. त्याच्यात ती भागीदार होऊ शकणार नाही. तिच्यावरील कार्डेनियोचे प्रेमही दुसरा कोणी भागीदार सहन करणार नाही. महाराज, आपल्या स्वैर वासना ध्यानात आणा. आपला द्वेष करणाऱ्या स्त्रीला आपल्यावर प्रेम करावयास लावण्यापेक्षा आपल्याला पूज्य मानणाऱ्या स्त्रीवर त्या वासना केंद्रित करणे फार सोपे आहे. मी सामान्य घराण्यातील असतानाही आपण माझी किती आर्जवे करीत होता, हे आठवा. माझ्या हलक्या कुळाची जाणीव असतानाही आपण माझ्या निष्पाप जीवनाविषयी आदर दाखविला, आणि मी जर आपल्या इच्छेला मान दिला, तर आपण कोणतेही अपकृत्य किंवा अपमान करणार नाही असे जाहीर केले होते. या साऱ्या सत्य गोष्टी आहेत; त्या कोणालाही नाकारता येणार नाहीत. त्यांचा विचार करा आणि त्याबरोबरच आपल्या स्वतःच्या प्रतिष्ठेचाही विचार करा. आपण ख्रिश्चन आहो, याचेही स्मरण ठेवा! आपण जिच्या जीवनाचा प्रारंभ कृपेने मोठ्या सुखात केला, तिच्या जीवनाचा अंत इतक्या दुःखात आपण का करावा? आपली पत्नी म्हणून मला स्थान नि मान मिळण्याची आशा धरता येत नसेल, तर मला आपली एक दासी म्हणून सेवा करू द्या. माझ्यावर आपली सत्ता आहे – मग

मी कितीही हलक्या श्रेणीतील असो. त्याबद्दल मी कुरकुर करणार नाही. माझ्या स्वामीने कठोरपणे माझा त्याग केला, तर निंदक जगाच्या नालस्तीला मी पात्र ठरेन. माझ्या गरीब आईबापांच्या उतरत्या आयुष्यात आपण त्यांना दुःख देऊ नका. त्यांनी आपली आणि आपल्या घराण्याची सेवा प्रामाणिकपणे केली आहे. तिचा मोबदला याहून चांगला मिळावयास हवा. आपल्या अंगातील शुद्ध रक्तात माझे रक्त मिसळले तर आपले रक्त अशुद्ध होईल अशी जर आपली कल्पना असेल, तर किती तरी थोर थोर घराण्यांचे रक्त अशाच मार्गाने वाहिले आहे, हे ध्यानात आणा. शिवाय उदात्त कुळात जन्म होणे स्त्रीजातीला अवश्य असते असे नाही. शील हेच परम भूषण आहे, हा विचार आपण मुख्यतः करावा. आपण जर नीचपणाने माझ्यावर अन्याय केला, तर आपल्या घराण्याला आपण मोठा कलंक लावला असे होईल. माझ्याशी लग्न केल्याने तेवढा कलंक लागणार नाही. महाराज, शेवटी मला हे सांगावयाचे आहे की, आपली पत्नी म्हणून आपण मला नाकारू शकत नाही – नाकारता कामा नये. मी आपली पत्नी आहे, या सत्याचा पुरावा म्हणजे आपले स्वतःचेच शब्द. आपण आपल्या अब्रूला मान देत असाल, तर आपण आपले शब्द खरे केले पाहिजेत. जे उच्च-कुलीनत्व माझ्या अंगी नाही म्हणून आपण मला तुच्छ लेखता, त्याला जर आपण काही किंमत देत असाल, तर आपण आपले शब्द खरे केले पाहिजेत. आपल्या शपथा आणि प्रतिज्ञा आठवा, त्यांना पुष्टी देण्यासाठी आपण ज्या ईश्वराची वारंवार प्रार्थना केली त्याला आठवा आणि त्या सर्वांचा काही उपयोग होत नसेल तर मी आपल्या सदसद्विवेकबुद्धीला अखेरचे आवाहन करीत आहे. त्या विवेकाच्या टोचणीमुळे तुम्हाला माझ्यावरील अन्यायांचे स्मरण सदैव होत राहील, आणि आपण कितीही सुखाच्या राशींवर लोळत असला, तरी तुमच्या आनंदावर विरजण पडेल."

असे पुष्कळ युक्तिवाद शोकाकुल डोरोथीने आग्रहाने केले. शोकामध्येही ती इतकी सुंदर दिसत होती की, डॉन फर्डिनान्डचे मित्र आणि इतर मंडळीही तिच्याविषयी सहानुभूती दाखवू लागली. विशेषतः लुसिंडाला तिच्या चातुर्याचे आणि सौंदर्याचे फार कौतुक वाटले, आणि तिच्या अश्रूंनी, हृदयभेदक सुस्कान्यांनी आणि विनवण्या केल्या-नंतर निघालेल्या हुंदक्यांनी तर तिचे हृदय हलले. तिचे सांत्वन करण्यासाठी ती तिच्या-जवळ जाणार होती, पण तिला अजून धरून ठेवणाऱ्या फर्डिनांडच्या हातानी तिला जाऊ दिले नाही. तो अगदी गोंधळून गेला होता. बराच वेळ त्याने आपले डोळे डोरोथीवर रोखले होते. शेवटी आपले हात बाजूस सारून त्याने लुसिंडाला मुक्त केले आणि तो म्हणाला, "हे जादूगारिणी डोरोथी, तू मला जिंकलेस; तू मला जिंकलेस! तुझ्या अंगच्या सत्याच्या आणि सौंदर्याच्या एकत्रित लक्षणाना विरोध करणे अशक्य आहे." लुसिंडा अद्याप अस्वस्थ आणि अशक्त होती. त्यामुळे फर्डिनांडने तिला सोडताच ती खाली पडली असती, पण कार्डेनियोने आपल्या सुरक्षितपणाचा विचार न करता, तिच्याकडे उडी मारली आणि आपल्या हातांनी तिला पकडले. उत्सुकतेने आणि

आनंदाने तिला मिठी मारून तो मोठ्याने ओरडला, " धन्य, धन्य, उदार परमेश्वर ! धन्य ! माझ्या प्रिय आणि निष्ठावंत लाडके, तुझी दुःखे आता संपली. माझ्या बाहूंशिवाय अन्यत्र कोठे तुला सुरक्षितपणे विसावा घेता येईल ? माझ्या शिकंदर नशिबाने जेव्हा प्रथम तुला माझ्या हवाली केले, तेव्हा ज्या बाहूंचा तुला आधार होता, त्यांचाच आधार आता तुला मिळेल. " लुसिंडाने डोळे उघडले आणि आपण आपल्या कार्डेनियोच्या बाहूंच्या मिठीत आहो असे पाहून, सभ्यासभ्यतेचा विचार न करता, तिने त्याच्या गळ्याभोवती आपले हात टाकले आणि त्याच्या मुखावर आपले मुख ठेवून ती म्हणाली, " होय रे होय, तू तोच आहेस. खरोखर तू माझा स्वामी आहेस. या संत्रस्त नि दुर्दैवी दासीचा कायदेशीर धनी तूच आहेस. आता दैवाने तुझे काहीही वाकडे केले, तरी मी कोणाच्या भयाने किंवा धमकीने, या माझ्या एकमेव आधारापासून आणि जीवनानंदा-पासून कदापि दूर होणार नाही. " हे दृश्य पाहून डॉन फर्डिनांड आणि इतर प्रेक्षक यांना मोठा अचंबा वाटला.

डॉन फर्डिनांडची मुद्रा पालटत आहे आणि तो आपल्या तलवारीवर हात ठेवून कार्डेनियोवर हल्ला करण्याच्या तयारीत आहे, हे पाहून डोरोथी एकदम गुडघे टेकून बसली, आणि डॉन फर्डिनांडच्या पायाला तिने इतकी घट्ट मिठी मारली की, त्याला हालता येईना. अश्रुपात करीत ती म्हणाली, " याचा अर्थ काय ? माझ्या आशेचा एकमेव आधार आपण आहा ना ? आपली स्वतःची ही प्रियतम पत्नी आपल्या पायाशी बसलेली आहे ते पाहा. तिला खऱ्या पतीच्या—आपल्या—बाहूमध्ये घेऊन तिचा उपभोग घ्या. ईश्वराने जी लग्नगाठ पक्की बांधली आहे ती सोडविण्याचा आपला प्रयत्न किती गैर आहे याचा विचार करा. साऱ्या संकटांचा धिक्कार करून स्वतःची प्रतिष्ठा आणि अब्रू स्थिर राखण्याचा प्रयत्न करणारी ही स्त्री आनंदाश्रूंनी न्हालेली आहे आणि आपल्या खऱ्या प्रियकराच्या वक्षःस्थळावर विसावत आहे हे पाहा. असे असताना परस्त्रीला वश करण्याचा तुमचा हेतू सिद्धीस जाईल अशी आशा कशी धरता येईल ? देवाशपथ, मी आपल्याला कळकळीची विनंती करते की, तुम्ही आपला राग आवरा आणि त्या इमानी जोडप्याला आपला आनंद लुटण्यास आणि आपले उरलेले आयुष्य शांतपणे घालविण्यास मुभा द्या. असे केल्याने आपण उदार आणि खरोखर थोर कुळातील आहा, असे सर्वांना दिसेल. मग तुम्ही आपली बुद्धी आपल्या ताब्यात ठेवली आहे आणि आपली वासना जिंकलेली आहे याचा भक्कम पुरावा जगाला मिळेल. " हे सर्व भाषण होईपर्यंत कार्डेनियोने डॉन फर्डिनांडवर दक्षतेने नजर ठेवली होती. अजून लुसिंडा कार्डेनियोच्या हातातच होती. स्वतःचा प्राण देऊनही त्याला व इतर सर्व मंडळींना पश्चात्ताप करावयास लावण्याचा निश्चय त्याने केला.

पण डॉन फर्डिनांडचे दोस्त, पाद्री, न्हावी आणि ( इमानी सँको पँझाला न वगळता ) इतर सारे लोक डॉन फर्डिनांडजवळ गोळा झाले आणि त्याला विनंती करू लागले, " या सुंदरीच्या—डोरोथीच्या—अश्रूंवर दया करा, ती काय म्हणाली याचा

विचार करा. तिच्या बोलण्यातील सत्य स्पष्ट आहे. तिच्या न्याय्य आशा-आकांक्षा धुळीस मिळविणे हा घोर अन्याय होईल. तुमची आणि तिची ही जी विचित्र आणि विस्मयकारक भेट झाली आहे, ती केवळ योगायोगाने नव्हे, तर ईश्वराच्या विशिष्ट योजनेनुसार ती घडली आहे. ( पाद्रयाने अट्टाहासाने सांगितले त्याप्रमाणे ) लुसिंडा-पासून कार्डेनियोची ताटातूट मृत्यूशिवाय दुसरे कोणीही करू शकणार नाही तुमच्या तलवारीच्या टोकाने ते दोघे एकमेकापासून वेगळे होतील आणि त्यांना ठार मारून तुम्ही त्यांना कदाचित अधिक सुखी कराल. तसे सुख तुम्हाला स्वतः जिवंत राहून मिळणार नाही. काही घटना अशा आकस्मिक आणि अटळ असतात की, त्यावेळी आपल्याला आपल्या इच्छांचा त्याग करून दैवाला शरण जावे लागते. खरा शहाणपणा हाच असतो आणि महान धैर्य आणि औदार्यही हेच असते. उदार परमेश्वराने त्या सुखी प्रेमिकावर आपल्या दयेचा वर्षाव केला आहे, म्हणून तुम्ही त्यांचा हेवा करू नका. आता तुम्ही डोरोथीच्या दुःखाकडे लक्ष द्या. तिचे अतुल लावण्य पाहा. त्याला खऱ्या आणि अकृत्रिम प्रेमाची जोड मिळालेली आहे. त्यामुळे तिच्या कुळाच्या हलकेपणाची भरपाई झाली आहे. पण मुख्यतः, आपण जर आपल्या उच्च कुळाचा आणि ख्रिस्ती धर्माचा अभिमान गौरवाने धरीत असाल, तर आपण आपल्या वचनाचा भंग करू नका. मानवजातीचा विवेक दुसऱ्या कशानेही सिद्ध होणार नाही आणि आपल्याविषयीचा आदरभावही टिकून राहणार नाही. सौंदर्याचा हा विशेष अधिकार आहे की, ते जर शीलसंपन्न आणि विनय-संपन्न असेल, तर ते कोणत्याही उच्च पदावर हक्क सांगू शकते. अशा शीलसंपन्ना आणि विनयसंपन्न सुंदरीचा उद्धार जो कोणी करतो, त्याला कोणताही कमीपणा येत नाही आणि त्याची निंदा कोणीही करीत नाही. आपला आनंद अनैतिक नसेल, तर त्याचा उपभोग घेणे निंदास्पद नाही. " सारांश, अशा भिन्नभिन्न कारणांना त्यांनी अनेक प्रभावी युक्तिवादही जोडले. डॉन फर्डिनांड हा खरोखर सभ्य गृहस्थ होता. तेव्हा त्याला यापुढे त्यांच्या युक्तिवादाला तोंड देता येईना. तो खाली वाकला आणि डोरोथीला आलिंगन देऊन म्हणाला, " हे सुंदरी, ऊठ. माझ्या आत्म्यावर अधिराज्य चालविणाऱ्या तुझ्यासारख्या व्यक्तीने माझ्या पायाशी लोटांगण घालणे योग्य नव्हे. मी तुला जितका आदर दाखवा-वयास हवा होता, तितका आतापर्यंत दाखविला नसेल तर त्याचे कारण प्रभूची इच्छा ! या घटनांमुळे तुझ्या निष्ठेविषयी आणि सौजन्याविषयी माझी अधिकच खात्री पटली आहे. यापुढे मी तुझ्या गुणांचे मोल अधिकच मानीन. यापुढे मी तुला जो आदरभाव दाखवीन आणि तुझी जी सेवा करीन, त्यामुळे माझ्या मागील प्रमादाबद्दल तू मला क्षमा करावीस. माझ्या प्रेमाच्या भावना तीव्र आहेत. त्यामुळेच प्रथम तू माझी झालीस आणि तुझा त्याग मी करण्याचे कारणही तेच. आता आनंदात असलेल्या लुसिंडाचे डोळे पहा. त्यात माझ्या पूर्वीच्या वर्तनाची हजारो कारणे लिहिलेली तुला आढळतील. यापुढे तिच्या शांत जीवनाला मी कधीही धक्का लावणार नाही असे वचन मी देतो. माझ्या प्रियतम डोरो-थीच्या संगतीत मी जसे दीर्घ आणि सुखासमाधानाचे आयुष्य घालविण्याची आशा करीत

आहे, तसेच आयुष्य तिने आपल्या प्रिय कार्डेनियोबरोबर घालवावे " आपल्या भाषणाचा असा समारोप करून, त्याने तिला अत्यंत प्रेमाने पुनः आलिंगन दिले. आपल्या पश्चात्तापाचा पुरावा त्याने आपल्या अश्रूंच्या रूपाने दिला. तो लपविण्याचा त्याने प्रयत्न केला, पण त्याला आपले अश्रू आवरणे कठीण गेले. आपल्या दुर्बलतेची त्याला लाज वाटली.

कार्डेनियो, लुसिंडा आणि बहुतेक सारी मंडळी यांना आपल्या भावना आवरता येईनात. ते सारे आनंदाने रडू लागले. सँको पँझासुद्धा आसवे ढाळू लागला. पण त्याचे कारण केवळ दुःख हे नव्हते असे त्याने पुढे कबूल केले. त्याच्या कल्पनेप्रमाणे डोरोथी मिकोमिकोनाची राणी ठरली नाही म्हणून त्याच्या डोळ्यात अश्रू आले. ती राणी ठरली असती तर तिच्यापासून पुष्कळ देणग्या आणि कृपाप्रसाद आपल्याला मिळतील अशी आशा त्याला वाटत होती. कार्डेनियो आणि लुसिंडा हे डॉन फर्डिनांडच्या पाया पडले, आणि त्यांनी कृतज्ञ भावनेला शक्य असणाऱ्या अत्यंत उदात्त शब्दांनी त्याचे आभार मानले. त्याने त्यांना वर उचलले आणि त्यांचे आभार मोठ्या नम्रतेने स्वीकारले. डोरोथी त्या जागी कशी आली, याची माहिती तिने आपल्याला द्यावी अशी विनंती त्याने केली. तिने कार्डेनियोला जे जे सांगितले होते, ते सारे त्याला निवेदन केले, ते अशा कौशल्याने की, तिला जी दुःखे भोगावी लागली ती ऐकत असताना त्या लोकांना ती दुःखे अनिर्वाच्य आनंद देऊन गेली. तिचे बोलणे संपल्यावर डॉन फर्डिनांडने शहरात आपल्यावर कोणकोणती संकटे कोसळली हे सारे सांगितले. लुसिंडाच्या वक्षःस्थळावर आपल्याला एक पत्र कसे सापडले, त्यावरून कार्डेनियो हा तिचा पति आहे हे आपल्याला कसे कळले, लुसिंडाच्या आई-बापांनी अडथळा केला नसता तर आपण तिचा प्राण कसा घेणार होतो, लज्जेने आणि संतापाने वेडे होऊन आपण शहर कसे सोडले, सूड उगविण्याची भरपूर संधी मिळविण्यासाठी आपण कसे थांबलो, लुसिंडा जोगिणींच्या एका मठात पळून गेल्याचे आपल्याला थोड्याच वेळात कसे कळले, ती कार्डेनियोबरोबर आपले आयुष्य घालविण्यास तयार नसेल, तर तिच्या आयुष्याचा अंत करण्याचे आपण कसे ठरविले, त्या तीन सद्गृहस्थांना बरोबर घेऊन आपण मठात कसे गेलो, मठाचा दरवाजा उघडल्यानंतर त्यांच्या पहाऱ्यासाठी दोन गृहस्थांना मागे ठेवून आपण एका माणसाबरोबर मठात कसे शिरलो, त्या मठाच्या वाटेवर लुसिंडा एका भिक्षुणीशी बोलत असलेली आपल्याला कशी आढळली, तेथून आपण तिला खेड्यात सक्तीने कसे आणले, तेथून सुखाने पळ काढता यावा म्हणून आपण वेषांतर कसे केले आणि ते आपल्याला किती सहज साधले, (कारण शहरापासून खूप दूर असलेल्या शेतामध्ये तो मठ वसलेला होता.) आपल्या कबजात आल्यानंतर लुसिंडा कशी मूर्छित पडली आणि शुद्धीवर आल्यावर एकसारखी कशी रडत बसली-सुस्कारे सोडीत राहिली-तिने एकही शब्द कसा उच्चारला नाही आणि फक्त मौन आणि अश्रू यांच्या संगतीत राहून आम्ही सर्वांनी या खानावळीपर्यंत प्रवास कसा केला हे सारे त्याने सांगितले.



## प्रकरण १०

# मिक्रोमिक्रोनाच्या सुविख्यात राजकन्येचा इतिहास पुढे चालू— तसेच इतर सुखद प्रसंग

या सर्व गोंधळाचा शेवट सुखाने झाला म्हणून त्या साऱ्या मंडळींना जो काही आनंद झाला, तो वर्णन करण्यापलीकडचा होता. डोरोथी, कार्डेनियो आणि लुसिंडा यांना आपल्या जीवनातील आकस्मिक घडामोडी इतक्या आश्चर्यकारक वाटत होत्या की, त्या खरोखर घडल्याच नाहीत, असे त्यांना वाटले. तोपर्यंत आपल्या वाट्यास आलेल्या दुर्दैवामुळे त्यांचा आताच्या सुखावर विश्वास बसणे कठीण गेले. आपली प्रतिष्ठा आणि आपले शील गमावण्याचा प्रसंग आला असताना परमेश्वराने आपल्याला त्या चक्रव्यूहातून बाहेर काढले, याबद्दल डॉन फर्डिनांड याने ईश्वराचे सहस्रशः आभार मानले. त्या सर्वांचा समेट घडवून आणण्यात पाद्र्याचा वाटा मोठा, म्हणून त्या सर्वांच्या आनंदोत्सवातही त्याचा भाग थोडथोडका नव्हता. त्या सर्वांच्या संतोषाला कोणाच्याही असंतोषाने दृष्ट लागू नये म्हणून डॉन क्विक्झोट यांनी त्या खाणावळीची केलेली मोडतोड दुरुस्त करून तिच्या धनिणीला संतुष्ट करण्याच्या कामास कार्डेनियो आणि पाद्री हे लागले. बिचारा सँको मात्र एकटा खाली मान घालून दुःख करीत राहिला. त्याची सरदारकी आणि त्याच्या साऱ्या आशा धुळीस मिळाल्या. राजकन्या मिक्रो-मिक्रोनाचे रूपांतर डोरोथीमध्ये झाले आणि राक्षसाचे डॉन फर्डिनांडमध्ये झाले. म्हणून अत्यंत आंबलेल्या चेहऱ्याने आणि दुःखी मनाने तो आपल्या धन्याच्या खोलीत हलकेच गेला. तेथे त्याचा धनी झोपलेला होता पण आता नुकताच जागा झालेला होता. जे काय घडले, त्याची त्याला मुळीच कल्पना नव्हती.

सँको म्हणाला, " 'दुःखी चेहऱ्याचे शिलेदार' साहेब, आपण लवकर उठल्याने आपली काही हानी होणार नाही. पण आता आपण इच्छा असल्यास प्रलयकालापर्यंत झोपून राहा. कोणा राक्षसाला ठार मारावयाचे किंवा कोणा राजकन्येला संकटातून सोडवावयाचे अशा विचाराने आपण यापुढे आपल्या डोक्यास शीण देण्याची गरज नाही. कारण, हे सर्व तुमच्याजवळच होऊन गेलेले आहे." शिलेदारजींनी उत्तर दिले, "हे शक्य आहे. कारण, मी पूर्वी कधी केली नसेल किंवा माझ्या उभ्या आयुष्यात कधी करावी लागणार नाही, अशी घनघोर आणि रक्तपाताची विलक्षण लढाई त्या राक्षसाशी मी खेळलो आहे. एका तडाख्यासरशी मी त्याचे डोके जमिनीवर लोळविले. तेव्हा

पाण्याच्या प्रचंड धबधब्याप्रमाणे त्याच्या अंगातून रक्ताचे पाट वाहू लागले." सँको म्हणाला, "रक्ताचे नव्हे; दारूचे, असे आपल्याला म्हणायचे आहे. (आपल्याला माहीत नसेल तर) मी आपल्याला सांगतो की, मेहेरबानांनी ज्या राक्षसाला ठार केले, तो म्हणजे दारूचा बुधला. त्याच्या पोटात असलेली सुमारे तीस गॅलन दारू वाहू लागली असेल. तुम्ही त्याचे मुंडके कौशल्याने उडविल्याचे सांगता, तो सारा कल्पनेचा खेळ आहे. तो राक्षस आणि त्याचे ते मुंडके – दोन्हीही चुलीत जावोत!" डॉन म्हणाले, "मूर्खा, काय बोलतोस? खरोखर, तू माथेफिरू आहेस." तेव्हा सँको म्हणाला, "उठा, उठा महाराज, आपण किती सुंदर कामगिरी करून ठेवली आहे, ती पाहा. त्यासाठी आता साऱ्या लोकांना नुकसानभरपाई द्यावी लागेल. आपली महाराज्ञी आता डोरोथी नावाची साधीसुधी वगुती बाई बनली आहे. आणखीही दुसऱ्या अशाच काही चमत्कारिक गोष्टी घडल्या आहेत की, त्या पाहून तुम्ही तोंडात बोटच घालाल." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, मला कशाचेच आश्चर्य वाटत नाही. येथे साऱ्या गोष्टी जादूटोण्याने घडत आहेत, हे मी तुला पूर्वीच सांगितले आहे." तेव्हा सँको म्हणाला, "त्याच्यावर माझा विश्वास आहे. घोंगडीत माझी उडवणी त्यामुळेच झाली. तशी माझ्या आयुष्यात पूर्वी कधी झाल्याचे मला आठवत नाही, मला पक्के आठवते की, त्या फेकाफेकीत या खाणावळवाल्याचाही हात होता. त्याने ते काम, कोणीही हेवा करावा इतक्या कौशल्याने आणि मनोभावाने केले, हे त्याच्यासंबंधी मला सांगितलेच पाहिजे. तेव्हा मला असा दाट संशय येऊ लागला की, या साऱ्या जादूटोण्यामुळे हाडे खिळखिळी होतील आणि अंगाला जखमा होतील – दुसरे काही होणार नाही." शिलेदारजी म्हणाले, "ईश्वर सर्वांची भरपाई करील. आता मी पोषाख करतो आणि जी विस्मयकारक रूपांतरे झाली आहेत, ती पाहण्यास जातो."

सँकोने त्यांची तयारी केली. डॉन क्विक्झोट यांच्या मूर्खपणाचा वृत्तांत पाद्र्याने डॉन फर्डिनांड वगैरे लोकांना सांगितला. आपल्याला आपल्या हृदय-स्वामिनीने तिरस्काराने 'रंक-खडका'वर हद्दपार करून पाठविले आहे, अशी कल्पना डॉन क्विक्झोट यांची कशी झाली, आणि त्या खडकातून ते कोणत्या युक्तीने बाहेर आले, हे सारे पाद्र्याने सांगितले. त्या हकीगतीचा एक भाग म्हणून सँकोचे पराक्रमही त्याने निवेदन केले. ते त्या परक्या लोकांना अत्यंत मनोरंजक वाटले. शेवटी पाद्र्याने सर्वांना अशी सूचना केली की, डोरोथीच्या दैवाने उलटी खाल्ल्यामुळे आपल्या योजना ढासळून पडल्या, म्हणून आता डॉन क्विक्झोट यांना फसवून घरी नेण्यासाठी दुसरी काही तरी युक्ती योजली पाहिजे. कार्डेनियोने या कामी मदत करण्याचे आश्वासन दिले, आणि लुसिंडाने डोरोथीचे रूप धारण करावे असे सुचविले. तेव्हा डॉन फर्डिनांड म्हणाले, "छेः छेः अजूनही डोरोथीच ही चेष्टा पुढे चालवू शकेल. मात्र या प्रामाणिक माणसाचे राहण्याचे ठिकाण फार दूर असू नये." पाद्री म्हणाला, "फक्त दोन दिवसांचा प्रवास केला की आलेच ते ठिकाण." डॉन फर्डिनांड म्हणाला, "इतके चांगले आणि परोपकारी कृत्य

करण्याच्या सुखासाठी मी दुप्पट प्रवास करीन." तोपर्यंत डॉन क्विक्झोट नखशिखांत सशस्त्र होऊन खोलीबाहेर पडले होते. त्यावेळी त्यांच्या डोक्यावर मँब्रिनोचे शिरस्त्राण होते. ( त्याला एक मोठे भोक पडले होते. ) त्यांच्या डाव्या हातात ढाल होती, आणि उजव्या बाजूस ते आपल्या भाल्यावर टेकले होते, त्यांचा हाडकुळा, पिवळा चेहरा वाऱ्याने कोळपलेला होता आणि त्याची लांबी सुमारे पाऊण मैल होती. ( स्पॅनिश अतिशयोक्ती ! ) त्यांच्या शस्त्रास्त्रांची विचित्र सरमिसळ झालेली होती, त्यांची चालण्याची ढब पोक्त नि गंभीर होती. ती पाहून डॉन फर्डिनांड आणि त्याचे सोबती आश्चर्याने स्तब्ध झाले. तेव्हा या वीर पुरुषाने, मोठ्या गांभीर्याने आणि ठामपणाने डोरोथीकडे नजर टाकली आणि तेथील स्तब्धतेचा भंग करणारे पुढील शब्द उच्चारले :—

"हे सुंदरी, माझ्या या सेवकाने मला अशी माहिती दिली आहे की, तुझा मोठेपणा नाहीसा झालेला आहे आणि तुझा राजेशाही डौल धुळीस मिळाला आहे. एक राणी म्हणून, एक प्रबळ राजकन्या म्हणून, तू पूर्वी मिरवीत होतीस, पण आता तू एक साधी तरुणी झाली आहेस. एखाद्या पिशाच्च-विद्या-पारंगत मांत्रिकाच्या राजाच्या स्पष्ट आदेशानुसार तुझ्या पित्याने हे परिवर्तन घडवून आणले असेल (तुला मी तुझ्या पदावर माझ्या बाहुबलाने प्रस्थापित करीन की नाही असा माझ्या कर्तृत्वाचा संशय तुझ्या पित्याला आला असेल ) तर मी त्याला हे सांगितले पाहिजे की, या बाबतीत मांत्रिकाची मात्रा चालणार नाही आणि त्याला या राजकारणाचा ओ का ठो कळणार नाही. मांत्रिकाच्या राजाचे अंगी शिलेदारीतील क्रांतीचे चातुर्य असत नाही. मी शिलेदारीच्या अभ्यासात पारंगत आहे. तसा तो असता तर त्याला हे कळून चुकले असते की, प्रत्येक युगात ला मांचा येथील डॉन क्विक्झोटपेक्षा कमी कीर्तीच्या वीरांनी याहून मोठे दारुण पराक्रम केले आहेत. एखादा बलाढ्य शत्रू कितीही उन्मत्त झाला असला, तरी त्या चुंगुरड्याला ठार मारणे हा काही मोठा पराक्रम नव्हे. अहो, थोड्याच क्षणांपूर्वी मी असाच एक पराक्रम केला नाही का ? त्यात मला किती यश आले हे मी सांगणार नाही. कारण काही लोकांची वृत्ती कशावरही विश्वास न ठेवण्याची असते—ते सत्य गोष्टीवरही विश्वास ठेवीत नाहीत. पण काळ हा सर्व गोष्टी उघडकीस आणतो. तसेच माझे यशही तो उघडकीस आणील—आणि तेही कोणाच्या ध्यानीमनी नसताना."

खानावळवाला म्हणाला, "थांबा, थांबा. आपण ज्याच्याशी युद्ध केले तो राक्षस नव्हता—फक्त दारूचे दोन बुधले होते." खानावळवाल्याला डॉन फर्डिनांड याने गप्प केले आणि डॉन क्विक्झोट यांच्या भाषणात मध्ये मध्ये न बोलण्यास बजावले. डॉन क्विक्झोट पुढे सांगू लागले, "हे पदच्युत पण सुप्रतिष्ठित स्त्रिये, शेवटी मला हे सांगावयाचे आहे की, पूर्वी मी सांगितलेल्या कारणामुळे तुझ्या पित्याने तुझ्या शरीरामध्ये हे जर परिवर्तन घडवून आणले असेल, तर तू त्याच्यावर विश्वास ठेवू नकोस. कारण या भूतलावर असे एकही संकट नाही कीं, ज्याच्या आरपार माझी तलवार जाणार नाही. तू खात्री बाळग की, थोड्याच दिवसांत तुझ्या शत्रूचे डोके

उडविले जाईल आणि कायदेशीर वारसा-हक्काने तुला मिळावयास हवा तो राजमुकुट तुझ्या शिरावर चढेल." राजकन्येच्या उत्तराची वाट पाहण्यासाठी डॉन क्विक्झोट येथे थांबले. ही मस्करी डॉन क्विक्झोट घरी जाईपर्यंत चालू ठेवण्यास डॉन फर्डिनांड याने संमती दिल्यामुळे तिने गंभीर मुद्रा धारण करून उत्तर दिले, "हे दुःखी चेहऱ्याच्या शौर्यशाली शिलेदारा, माझ्या स्थितीत काही बदल झाला आहे असे आपल्याला ज्या कोणी सांगितले असेल त्याने आपल्याला फसविले आहे. मी काल होते तशीच आज आहे. आता हे खरे आहे की, काही अनपेक्षित पण भाग्यवान योगायोगामुळे माझ्या दैवाची परिस्थिती काहीशी बदलली आहे. तो बदल मला फायदेशीर आहे आणि माझ्या आशेपलीकडचा आहे. पण माझ्या शरीरात काहीच बदल झाला नाही. माझ्यासाठी आपण आपल्या शूर आणि अजिंक्य सामर्थ्याचा उपयोग करावा, या माझ्या निर्धारातही काही बदल झालेला नाही. म्हणून मी आपल्या नित्याच्या औदार्याला आवाहन करून अशी विनंती करते की, माझ्या पिताजींना अपमानास्पद असे जे शब्द आपण उच्चारले ते परत घ्यावेत. माझ्यावरील अन्याय दूर करण्यास जे सोपे आणि अचूक उपाय उपलब्ध आहेत, ते माझ्या पिताजींच्या ज्ञानामुळे आणि धोरणामुळेच प्राप्त झालेले आहेत. सध्या मी ज्या सद्भाग्याचा उपभोग घेत आहे ते आपल्या विस्मयकारक कृत्यांचे फल होय. सध्याच्या या उत्तम परिस्थितीवरून ते सिद्ध होत आहे. आपल्या अतुल्य धैर्याच्या सामर्थ्यावर आणि परमेश्वराच्या इच्छेवर विश्वास ठेवून आणि या सर्व प्रकरणाचा शेवट सुखात आणि यशात होईल अशी आशा धरून, उद्या सकाळी आपण येथून पुढे जाण्यास काय हरकत आहे ?"

हुशार डोरोथीने आपले भाषण संपविताच डॉन क्विक्झोट सँकोकडे वळून कल्पनातीत त्वेषाने उद्गारले, "अरे भिकार कुतरड्या, साऱ्या स्पेन देशात तू अत्यंत नीच, बदमाश आहेस हे मी तुला सांगितले पाहिजे. अरे लबाड दुष्टा, राजकन्येचे रूपांतर डोरोथी नावाच्या सामान्य नि क्षुद्र स्त्रीमध्ये झाल्याचे तू मला आताच सांगितले नाहीस काय ? आणि हे रांडलेका, मी राक्षसाचे मुंडके त्याच्या खांद्यावरून उडविले असता हजारो आचरट गोष्टी तूच मला सांगितल्या नाहीस काय ?" नंतर आकाशाकडे पाहून आणि दातओठ आवळून ते मोठ्याने म्हणाले, "आता सर्वशक्तिमान ईश्वराच्या कृपेने मी असे ठरविले आहे की, यापुढे शिलेदाराला थाप मारण्याचे धाडस जे करतील, अशा सर्व भावी सेवकांना इशारा मिळावा अशी अद्दल मी तुला घडवीन आणि तुझी दुर्दशा करून टाकीन." हे ऐकून सँको ओरडला, "महाराज, शांत व्हा. मी आपली प्रार्थना करतो. राजकन्या मिकोमिकोनाच्या बाबतीत माझी काही चूक झाली असेल वा नसेल. पण दारूच्या त्या पिशव्यातून राक्षसाचे डोके गडगडत बाहेर आले आणि कोणाच्याही जिभेला रुचकर वाटणाऱ्या दारूसारखे रक्त त्यातून ओघळले, हे मी शपथेवर सांगतो. आपल्या बिछान्याच्या उशाशी चामडी बुधले नव्हते काय आणि त्यात दारू भरली नव्हती काय ? आताच आपण भोजन करू, तेव्हा त्याच्या वासावरून आपल्याला

कल्पना करता येईल. जिन्नस कसा आहे ते खाऊनच कळते. येथील घरमालक आपल्याला खरी परिस्थिती सांगत नसेल, तर त्याचे कारण तो एक अत्यंत प्रामाणिक आणि सभ्य माणूस आहे हे होय." डॉन म्हणाले, "सँको, तू चक्रम आहेस असे मी जाहीर करतो. आणि तुला क्षमा करतो. बस्स ! " तेव्हा डॉन फर्डिनांड म्हणाला," पुरे झाले हे. आता आपण राजकन्येच्या आज्ञेप्रमाणे आज रात्री विश्रांती घेऊ आणि उद्या लॉर्ड डॉन क्विक्झोट यांच्या सेवेस दाखल होऊ. त्यांनी महत्त्वाचे आणि धाडसी कृत्य हाती घेतले आहे, त्यात त्यांचे जे सुप्रसिद्ध आणि अप्रतिम धैर्य दिसून येईल, ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहण्यास आम्ही उत्सुक आहो." डॉन क्विझोट यांनी उत्तर दिले," महाराज, आपली सेवा करण्याचा मान मला मिळाला, तर मी स्वतःस धन्य समजेन. अशा सन्मान्य मंडळींच्या कृपेमुळे आणि सद्भावामुळे मी स्वतःला अत्यंत ऋणी समजेन. माझ्या रक्ताचा शेवटचा थेंब पडला, तरी मी माझ्याविषयीचे आपले मत दृढ करण्याचा आणि सुधारण्याचा प्रयत्न करीन. "

डॉन क्विक्झोट आणि डॉन फर्डिनांड यांच्यामध्ये धन्यवादांची अशी देवाणघेवाण चालू असतानाच एक परका माणूस तेथे आला आणि त्यांच्या भाषणात खंड पडला.

बार्बेराहून नुकत्याच आलेल्या खिश्चन माणसाप्रमाणे त्याचा वेष होता. त्याचा कोट निळ्या रंगाचा होता. तो आखूड असून त्याच्या बाह्याही आखूड होत्या. त्याला कॉलर नव्हती. त्याची पाटलोण निळ्या रंगाच्या लोकरीची होती. त्याच रंगाची टोपी त्याच्या डोक्यावर होती. त्याचे पायमोजे खजुराच्या रंगाचे होते. एक तुर्की तलवार गळपट्ट्याने खांद्याभोवती बांधलेली होती. त्याच्याबरोबर एक स्त्री घोड्यावर बसून येत होती. तिचा वेष मूर लोकांसारखा होता. तिच्या तोंडावर बुरखा होता आणि तिच्या डोक्यावर एक छोटीशी जरतारी टोपी होती. तिच्या खांद्यापासून पायापर्यंत तुर्की पद्धतीचा झगा होता. त्या पुरुषाचा आकार सुडौल होता आणि त्याचा देह सुदृढ होता. त्याचे वय सुमारे चाळीस वर्षांचे होते. त्याचा चेहरा काहीसा कोळपलेला होता. त्याच्या मिशा चांगल्या लांबलचक होत्या आणि त्याची दाढी सुंदर होती. थोडक्यात म्हणजे त्याची सभ्य चालचलणूक आणि आकृती अत्यंत रुबाबदार होती. त्यामुळे त्याच्या मनाचा हलकेपणा झाकून जात असे. त्याने येताच एका खोलीची मागणी केली. पण साऱ्या खोल्या भरल्या आहेत, असे उत्तर त्याला मिळाले, तेव्हा तो जरासा त्रस्त झाला तरीही आपल्याबरोबर आलेल्या स्त्रीकडे तो गेला आणि तिला तिच्या गाढवावरून त्याने खाली उतरविले. तिचा मूर पद्धतीचा विचित्र वेष पाहून, इतर साऱ्या स्त्रियांना मोठे नवल वाटले आणि तिची माहिती मिळविण्यासाठी तिच्याभोवती त्या गोळा झाल्या. ती स्त्री आणि तिचा साथी हे दोघे दमले–भागलेले आहेत, असा चतुर तर्क करून व त्यांना खोली मिळत नाही, हे पाहून डोरोथीला वाईट वाटले. ती त्या स्त्रीला म्हणाली," तुम्ही आपली गैरसोय शांतपणे सहन कराल अशी मला आशा वाटते. बाईसाहेब, खोली न मिळणे ही गैरसोय सर्व सार्वजनिक खानावळींमध्ये नित्याची होऊन बसली आहे. पण आपल्या

मर्जीस येईल तर आपण आमच्याबरोबर राहावे. या जागी आपला जो पाहुणचार होईल त्यापेक्षा रस्त्यावर अधिक चांगला होणार नाही असे मला वाटते. " त्या नवख्या स्त्रीने तिला काहीच उत्तर दिले नाही, पण उठून उभी राहून तिने आपले हात आपल्या छातीवर ठेवले, आपले शिर खाली लवविले आणि डोरोथीच्या साहाय्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी तिने आपली देह-लता वाकविली. तिच्या मौनामुळे इतर लोकांनी तर्क केला की, तिला स्पॅनिश भाषा बोलता येत नसावी, आणि ती खचित मूर असावी. तिचा साथी गोठ्यातून परत आला होता. तो त्यांना म्हणाला, " बायानो, या महिलेने आपल्या एकाही प्रश्नाचे उत्तर दिले नाही म्हणून आपण तिला क्षमा करावी. कारण आपली भाषा तिला अत्यंत परकी आहे. " तेव्हा लुसिंडाने उत्तर दिले, " महाराज, साऱ्या परक्या माणसांना–विशेषतः स्त्रियांना–जी विनंती करणे सभ्यतेस धरून होईल, तीच आम्ही तिला करीत आहो. ती विनंती इतकीच की, त्यांनी सर्व रात्र आमच्या सहवासात काढावी आणि आमच्यासारखेच वागावे म्हणजे आम्हाला आनंद वाटेल. महाराज, त्यांच्यासाठी आम्हाला जास्तीत जास्त जे काही करता येईल, ते आम्ही करू. या घरातील ज्या वस्तू त्यांना पाहिजे असतील, त्या साऱ्या त्यांना मिळतील. "

तो पाहुणा उत्तरला, 'प्रिय बाईसाहेब, मी माझ्या आणि या महिलेच्या वतीने आपले नम्रतापूर्वक आभार मानतो. आपण जे साहाय्य देऊ केले आहे, ते आमच्या सध्याच्या अडचणीत मी फार मोलाचे मानतो आणि ते देणाऱ्या आपणा सर्वांची योग्यता ध्यानी घेता, त्याचे महत्त्व मला द्विगुणित वाटते. " डोरोथीने विचारले, " महाराज, या बाईसाहेब ख्रिश्चन आहेत की मूर आहेत ? त्या ख्रिश्चन असतील, अशी आशा आम्हाला आमच्या उदारपणामुळे वाटते. पण त्यांच्या वेषावरून आणि मौनावरून त्या मूर असाव्यात, असे भय आम्हास वाटते, " त्या पुरुषाने उत्तर दिले, " बाईसाहेब, बाह्यतः त्या मूर दिसतात आणि त्या तशा आहेतही, पण अंतःकरणाने त्या निष्ठावंत ख्रिश्चन आहेत. बाप्तिस्मा करून प्रगटपणे ख्रिस्चन होण्याची त्यांना तीव्र इच्छा आहे. अल्जीअर्स ही त्यांची मातृभूमि आणि तेथेच त्यांचे वास्तव्य. तेथून निघाल्यापासून त्यांना ख्रिस्तीधर्माची दीक्षा देण्यास मला संधि मिळाली नाही. तशी दीक्षा देण्यासाठी त्यांना एखाद्या तीर्थावर ताबडतोब न्यावे अशी तातडीही मला वाटली नाही. कारण मृत्यू त्यांच्या दाराशी उभा नाही. यानंतर आपल्या धर्माची तत्त्वे त्यांना चांगल्या तऱ्हेने शिकविता येतील. पण मला अशी आशा वाटते की, देव–दयेने लौकरच त्यांचा बाप्तिस्मा, त्यांच्या योग्यतेला साजेलशा गौरवाने, साजरा केला जाईल. त्यांच्या किंवा माझ्या वेषावरून तुम्हाला वाटेल, त्यापेक्षा त्यांची योग्यता फार मोठी आहे. "

हे शब्द ऐकून त्या सर्वांच्या मनात, ही मूर स्त्री कोण आणि तिचा हा साथी कोण, ही त्यांची जिज्ञासा बळावली. पण त्यांना प्रवासानंतर विश्रांती आणि आहार यांची गरज आहे हे जाणून, त्यांना अधिक प्रश्न विचारणे आणि त्यांच्या नशिबाची

कहाणी समजावून घेणे अप्रशस्त होईल असे त्यांना वाटले. डोरोथीने त्या स्त्रीला आपल्याजवळ बसविले आणि तोंडावरील बुरखा काढण्यास विनविले. तिने आपल्या साथीकडे पाहिले. डोरोथी काय म्हणत आहे, हे त्याने आपल्याला सांगावे असा भाव तिच्या डोळ्यात होता. तेव्हा त्याने अरबी भाषेमध्ये तिला डोरोथीचे म्हणणे सांगितले आणि त्याला आपल्या विनंतीचीही पुष्टी दिली. तेव्हा तिने आपल्या तोंडावरील बुरखा काढला. तिचा चेहरा इतका आकर्षक होता की, डोरोथीला वाटले, ही लुसिंडापेक्षाही अधिक सौंदर्यसंपन्न आहे; उलट लुसिंडाला वाटले, डोरोथीपेक्षा ती अधिक देखणी आहे, आणि बाकीच्या साऱ्या लोकांना वाटले, या दोघींपेक्षा ती अधिक लावण्यवती आहे. पुरुषांचे मन वेधून घेण्याची शक्ती किंवा जादू सौंदर्यामध्ये नेहमीच असते. म्हणून त्या मूर सुंदरीची सेवा करण्याची इच्छा त्या सर्व मंडळींनी व्यक्त केली. डॉन फर्डिनांडने तिचे नाव विचारले. त्या पुरुषाने उत्तर दिले, "लेला झोरेडा." त्याचे हे शब्द ऐकून आणि त्यांचा प्रश्न काय आहे, याचा अंदाज बांधून त्या स्त्रीने मोठ्या उत्कंठेने पण डौलाने एकदम उद्गार काढले, "छेः, माझे नाव झोरेडा नव्हे – मेरिया – मेरिया हे माझे नाव." आपले नाव झोरेडा नसून मेरिया आहे असे तिने सर्वांना सांगितले. हे शब्द तिने इतक्या उत्कंठेने उच्चारले होते की, त्यामुळे प्रत्येकाचे – विशेषतः स्त्रियांचे – मन साशंक झाले. स्त्रियांच्या स्वाभाविक कोमल स्वभावामुळे त्यांच्या डोळ्यातून अश्रू गळू लागले. लुसिंडाने तर तिला अत्यंत प्रेमाने मिठी मारली आणि म्हटले, "वाः! वाः! मेरिया! मेरिया!" उत्तरादाखल त्या मूर स्त्रीने तेच शब्द पुन: उच्चारले आणि म्हटले, "झोरेडा मॅकँजे." त्याचा अर्थ आपले नाव झोरेडा नसून मेरिया हे आहे.

रात्र पडू लागली. डॉन फर्डिनांडच्या मित्रांच्या मागणीप्रमाणे, खानावळवाल्याने त्या सर्वांना शक्य तितके उत्तम जेवण देण्याची त्वरा केली. एका लांब टेबलावर चादर पसरण्यात आली. त्या घरात वाटोळे किंवा चौकोनी टेबल नव्हते. डॉन क्विक्झोट यांनी पुष्कळ आढेवेढे घेतले, पण सर्वांच्या आग्रहामुळे ते त्या टेबलाच्या अग्रभागी बसले. लेडी मिकोमिकोना यांनी आपल्याजवळ बसावे अशी इच्छा त्यांनी प्रदर्शित केली. बाकीच्या मंडळींनी आपापल्या योग्यतेप्रमाणे आणि सोयीप्रमाणे जागा पटकावल्या आणि मग सर्वांनी मोठ्या जिव्हाळ्याने पोटभर जेवण केले. डॉन क्विक्झोट यांचे लक्ष जेवणाकडे नव्हते. ज्या उत्साहाने त्यांनी धनगरांना उपदेश केला होता, त्याच उत्साहाने त्यांनी भाषण करण्यास सुरवात केली आणि आपल्या सोबत्यांचे मन वेधून घेतले. ते म्हणाले,

"सद्गृहस्थहो, आपण जर योग्य विचार केला तर आपल्याला असे कळून येईल की, शिलेदारीचा व्यवसाय जे लोक पत्करतात, त्यांना अत्यंत आश्चर्यकारक आणि अवाढव्य अशा संकटांना पुष्कळ वेळा तोंड द्यावे लागते. यावेळी या किल्ल्यात जर एखादा मर्त्य मानव आला, आणि आपण एकत्र बसलेले त्याने पाहिले, तर आपण खरोखर जसे आहो तसे त्याला कळून येईल काय? माझ्या शेजारी बसलेली ही महाराणी आहे

हे आपणा सर्वांना माहीत आहे, पण बाहेरच्या माणसाला हे खरे कसे वाटेल ? तसेच 'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार' म्हणून ज्याची सर्व जगभर कीर्ती पसरलेली आहे, तो मीच आहे असे त्याला कसे वाटेल ? शिलेदारीचा हा व्यवसाय आणि त्यातील कर्तबगारी ही मानवाने आत्तापर्यंत शोधून काढलेल्या इतर सर्व व्यवसायावर ताण करणारा आहे. या व्यवसायात धोके फार असल्यामुळे तर तो विशेषच सन्माननीय आहे, याविषयी काडीमात्र शंका घेण्याचे कारण नाही. मला असे कोणी सांगण्याचा आव आणू नये, 'समशेरीपेक्षा लेखणी अधिक चांगली.' तसे म्हणणारे कोणी का असेनात, मी त्यांना सांगेन, तुम्ही काय बोलता हे तुम्हाला कळत नाही. त्यांच्या म्हणण्याचे कारण एकच असते आणि त्यावरच ते मुख्यतः विसंबून असतात. ते कारण म्हणजे त्यांना वाटते, 'मानसिक श्रम हे शारीरिक श्रमांपेक्षा अधिक महत्त्वाचे असतात आणि शस्त्रबलाचा वापर करणे हे केवळ शारीरिक कार्य आहे' – जणु काही त्याला शरीरबलाशिवाय दुसऱ्या कशाचीच गरज नसते आणि म्हणून हमालांनी करावयाजोगे ते काम आहे. आम्ही ज्याला शिलेदारी म्हणतो, त्या व्यवसायात जणू काही बुद्धीवर अवलंबून असलेल्या धैर्यशाली कृत्यांना वावच नाही. किंवा त्यांना असे वाटते, सैन्यावर सत्ता चालविणारा किंवा शत्रूचा वेढा पडलेल्या शहराचे संरक्षण करणारा योद्धा आपल्या शरीराइतकेच आपल्या मनाचेही श्रम खर्ची घालीत नाही, पण शत्रूच्या योजना शोधून काढणे अथवा त्यांचा अंदाज बांधणे, हे शरीरबलाने शक्य आहे काय ? हे आपण अनुभवावरूनच शिकले पाहिजे. योजना आखणे, व्यूह रचणे, संकटावर मात करणे आणि धोक्याचे प्रसंग टाळणे – ही सारी कामे बुद्धीची आहेत–त्यात शरीरबलाला मुळीच स्थान नाही. शस्त्रे वापरण्यासाठी मनाची आणि शिक्षणाची गरज असते हे उघड आहे.

" आता आपल्याला एवढेच पहावयाचे आहे की, पंडित आणि सैनिक यापैकी कोणाच्या मनाला अधिक श्रम पडतात ? त्या दोघांपैकी प्रत्येकाचा उद्देश व साध्य काय आहे, याचा विचार केला तर या प्रश्नाचे उत्तर मिळेल. अत्यंत उदात्त ध्येय साध्य करणे हा ज्या हेतूचा उद्देश असतो, तोच अत्यंत मोलाचा समजला पाहिजे ( धार्मिक शिक्षणा बद्दल मी येथे काही बोलत नाही. त्या शिक्षणाचा उद्देश जीवाला स्वर्गाची वाट दाखविणे हा असतो. त्या उद्देशाला अंत नाही, आणि त्याची बरोबरी दुसऱ्या कोणास करता येणार नाही. ) मानवी शिक्षणाची व्याप्ती आणि साध्य हे आहे की, सर्वांना समान ज्ञान मिळवून देणे, त्यासाठी प्रत्येकाला त्याच्या हक्काची वस्तू प्राप्त करून देणे आणि चांगले कायदे तयार करून त्यांचे पालन करावयास लावणे. हा उद्देश खरोखर महान, उदार आणि अत्यंत प्रशंसनीय आहे. पण शिलेदारीच्या उद्देशाची सर त्याला येणार नाही. शिलेदारीचा उद्देश आणि अंतिम साध्य शांतता हे आहे. मानवाने या जीवनात ज्याची अभिलाषा धरावी, असे सर्वोत्तम ध्येय शांतता हेच असते. म्हणून या जगाला पहिली शुभवार्ता जी कळली, ती म्हणजे आपल्या दिवसाच्या प्रारंभी पण देवदूतांच्या रात्रीच्या

समयी, त्यांनी पुढील गीत आकाशात गाइले- " स्वर्गातील प्रभूचा गौरव असो, पृथ्वीतलावर शांतता नांदो आणि मानवजातीला सद्भाव लाभो. " स्वर्गीचा किंवा या पृथ्वीचा सर्वश्रेष्ठ गुरू, आपल्या मित्रांना व प्रियजनांना अभिवादन करण्याचा एकच मार्ग उपदेशितो – आणि तो म्हणजे कोणाच्याही घरात प्रवेश करताच तुम्ही म्हणावे, ' या घरात शांतता नांदो. ' दुसऱ्या एके वेळी तो गुरू त्यांना म्हणाला, ' मी माझी शांती तुम्हाला देतो – तुमच्याजवळ ठेवतो – तुमच्यामध्ये शांती नांदो. ' त्या गुरूच्या दातृत्वाला शोभेसाच हा वारसा आपल्याला लाभला आहे. त्याने दिलेले हे रत्न इतके मौल्यवान आहे की, त्याच्याशिवाय जगात किंवा स्वर्गात कोणालाच सुख मिळू शकणार नाही. शांतता हेच युद्धाचे खरे साध्य असते, आणि युद्ध व शस्त्रे ही एकच असतात. हे तत्त्व एकदा मान्य केले – युद्धाचे साध्य शांतता हेच असते, हे कळले – म्हणजे विद्वत्तेच्या उद्देशापेक्षा हे साध्य श्रेष्ठ आहे हे कोणाच्याही लक्षात येईल. विद्वान् माणसाला जे शारीरिक श्रम करावे लागतात, त्यांची तुलना वीरांच्या श्रमाशी आणि यातनाशी केली, तर श्रेष्ठ कोण हे आपल्याला सहज कळून येईल. "

हें भाषण करताना डॉन क्विक्झोट यांनी जी पद्धती स्वीकारली आणि भाषा योजली ती अशी होती कीं, श्रोत्यांपैकीं कोणीही त्यांना त्यावेळी वेडपट समजेना. उलट, त्यांतील बहुतेक लोक शस्त्र-बळाचा वापर करणारे असल्याने, ते त्यांचे भाषण आनंदाने लक्षपूर्वक ऐकू लागले. नंतर त्यांनी आपले भाषण पुढीलप्रमाणे चालविले—"विद्वानाला जे कष्ट नि हालअपेष्टा भोगाव्या लागतात, त्या अशा :-प्रथम गरिबी. (त्याचा अर्थ सारे गरीब असतात, असा नव्हे. पण विद्वानाची सर्वांत मोठी आपत्ती मी जोराने मांडीत आहे.) गरिबी त्याच्या पांचवीला पूजली आहे, हे सांगितल्यानंतर त्याचे दैन्य निराळे वर्णन करून सांगण्याची गरज नाही, असे मला वाटते. कारण जो गरीब आहे, त्याला कोणतेच सुख मिळत नाही. कधी भुकेचे तर कधी थंडीवाऱ्याचे, कधी वस्त्र नसल्याचे तर कधी या सर्वांचे हाल तो भोगतो आणि दारिद्र्याचे दशावतार पहातो. तरी त्याचे दारिद्र्य फार मोठे नसते. कारण तो जेवतो–नेहमीच्या वेळेपेक्षा उशीरा का होईना पण तो अन्न खातो–मग ते श्रीमंताच्या घरचे शिळेपाके का असेना. एकाद्या मठाच्या दाराशी धर्मादाय अन्नदान घेणे हे विद्वानाचे सर्वांत मोठे दुर्दैव. थंडी वाजत असताना कोणाच्या तरी शेगडीपाशी तो बसतो. त्यामुळे त्याला पुरेशी ऊब न मिळाली तरी थोडीबहुत मिळते आणि मग आपल्या घराच्या छपराखाली झोपून तो ती रात्र घालविंतो. लोकरी कपडा नसणे, बूट कमी असणे, पातळ नि फाटके कपडे असणे,–इत्यादी बारीक-सारीक भौतिक अडचणीचा उल्लेख मी करीत नाही. दैवाने कृपा केली तर त्यांच्या वाटेवर कपड्याच्या राशीवर राशी पडतील. अशा खडबडीत नि बिकट वाटेवरून त्या विद्वानांना चालावे लागते–ठेचाळत–पडत. पण पुनः उठून जोराने चालत ते आपण योजलेला मुक्काम गाठतात. दैवाच्या झंझावाताने साऱ्या वाळवंटांतून जे पुढे पुढे ढकलले जातात, असे काही विद्वान खुर्चीवर बसून जगाचे राज्य करतात. मग त्यांच्या

भुकेच्या जागीं अजीर्ण येते, थंडीवारा जाऊन आरामशीर ऊब त्यांना लाभते, नागवे-पणाची जागा भपकेबाज कपडे घेतात आणि ज्या चटईवर ते निजत असत, तिचे रूपांतर अत्यंत मौल्यवान् रेशमाच्या आणि मऊ लुसलुशीत लोकरीच्या बादशाही बिछान्यात होते. त्यांच्या गुणाचे खरे चीज होते. सैनिकाला जी दुःखे भोगावी लागतात, त्यांच्या-मानाने विद्वानांच्या हालअपेष्टा क्षुद्र भासतात. सैनिकांची दुःखे मी पुढे सांगेन. ''



## प्रकरण ११

# शस्त्र-बल व विद्या-बल यासंबंधींचे डॉन क्विक्झोट यांचे विलक्षण भाषण ( पुढे चालू )

डॉन क्विक्झोट पुढे म्हणाले, " विद्वानासंबंधी बोलण्यास सुरवात करताना मी त्याचे दारिद्र्य आणि त्याचे दशावतार यासंबंधी बोललो. आता सैनिक हा त्याच्यापेक्षा अधिक श्रीमंत असतो काय, हे आपण पाहू या. आपल्याला असे आढळेल की, साक्षात् दारिद्र्य सैनिकाच्या गरिबीपेक्षा अधिक दरिद्री नसते. सैनिकाला आपल्या मिकारडच वेतनावर अवलंबून राहावे लागते. तेही त्याला कधी मिळते—न मिळते—बहुधा मिळत नाहीच. मग तो आपल्या अंतःकरणाची टोचणी सोशीत आणि आपला जीव धोक्यात घालीत लुटालूट करू लागतो. कपड्याची टंचाई तर इतकी असते की, बदामी रंगाच्या चामड्याचा फाटका कोट आणि एक शर्ट हाच त्याचा सणावाराचा कपडा ! ऐन हिवाळ्यात त्याला उघड्या मैदानावर राहावे लागते. तेव्हा थंडीच्या कडाक्याला तोंड देण्यास त्याच्याजवळ काय असते ? फक्त आपल्या तोंडातील वाफ ! पण तीही रिकाम्या पोटातून आल्यामुळे थंडगार असते. निसर्गाच्या नियमाला धरून नसली तरी ही सत्य स्थिती आहे, असे मला वाटते. या सर्व कष्टांची नि हालांची भरपाई रात्रीच्या वेळी होईल अशा अपेक्षेने तो अंथरुणावर पडतो. ती त्याची शय्या केव्हाही थिटी नसते. त्यानेच काही चूक केली तर गोष्ट निराळी. त्याला आपल्या मर्जीप्रमाणे आपल्या बिछान्यासाठी यथेच्छ भूमी घेता येते. तिच्यावर त्याने पोट भरून लोळावे, तरी बिछान्या-वरील चादर चुरगळली जाणार नाही. पण सर्वांत विशेष म्हणजे जेव्हा दिवस उजाडतो, तेव्हा त्याला आपल्या व्यवसायाची तालीम करावी लागते आणि काही नवीन प्रतिष्ठा मिळविण्यासाठी धडपडावे लागते. युद्धाचा दिवस उगवतो तेव्हा आपल्या वैभवाचे चिन्ह म्हणून तो आपले मस्तक एका कापडाच्या टोपीने मंडित करतो, आणि बंदुकीच्या गोळीने टोपीला पडलेले भोक झाकून टाकतो. केव्हा केव्हा त्याचा हात किंवा पाय तुटला जातो आणि मग त्याला जखमी स्थितीत न्यावे लागते. पण जर देव-दयेने असे काही घडले नाही आणि त्याचे प्राण नि त्याच्या शरीराचे अवयव शाबूत राहिले तर, पूर्वीप्रमाणेच तो दरिद्री राहतो. एखादे लहानसान बक्षिस किंवा बढती मिळविण्यासाठी त्याला पुनः सामने नि लढाया खेळाव्या लागतात आणि त्यात विजय मिळवावा लागतो. पण असे चमत्कार क्वचितच घडतात. सद्गृहस्थहो, मला कृपा करून हे सांगा की,

युद्धात जितके सैनिक नाश पावतात, त्यांच्या तुलनेने योग्य ती बक्षिसे मिळविणारे सैनिक किती थोडे असतात, हे आपण कधी पाहिले आहे काय ? त्या दोघांच्या संख्येत साम्य कधीच नसते. मृत सैनिकांची मोजदाद करताच येत नाही, उलट जे जिवंत राहतात आणि ज्यांना बक्षिसे मिळतात अशा सैनिकांची संख्या शेकड्यांनी सांगता येईल, असे उत्तर आपण खचित द्याल. विद्वानांची स्थिती याच्या अगदी उलट असते. कायद्याचा अभ्यास करणारेच नव्हेत, तर इतर विद्वानही भल्याबुऱ्या मार्गांनी पोटापुरते मिळवितात. याचा अर्थ असा की, सैनिकांची दुःखे फार मोठी असली तरी त्यांची बक्षिसे फार लहान असतात. यावर कोणी असे उत्तर देईल की, तीस हजार सैनिकांपेक्षा दोन हजार पंडितांना बक्षिसे देणे सोपे आहे. कारण, जनतेच्या पैशातून पंडितांची सोय लावली जाते–त्यांना नोकऱ्या दिल्या जातात–त्यांच्या व्यवसायाला धरून त्या अर्थातच असतात, पण सैनिकाला दुसरी काही नोकरी देता येत नाही. दिली तर त्याचा मालक बुडावयाचा. याच अडचणींमुळे माझा मुद्दा सिद्ध होतो. पण या प्रश्नाचा निकाल करणे कठीण आहे, आणि म्हणून तो आपण बाजूस सारू या. आणि विद्वत्तेपेक्षा पराक्रमाला वरचे स्थान द्यावे काय, या प्रश्नाकडे आपण पुनः वळू या. हा विषय अद्याप वादग्रस्त आहे. प्रत्येक पक्ष आपली बाजू सिद्ध करण्यासाठी जोरदार कारणे पुढे करीत आहे.

"विद्येच्या बाजूने असे एक कारण सांगितले जाते की, तिच्याशिवाय युद्धकलाही जिवंत राहू शकणार नाही. कारण, इतर शास्त्राप्रमाणे युद्धशास्त्राचेही नियम आहेत आणि त्या नियमाप्रमाणे युद्धे खेळली जातात. नियम करणे हा विद्येचा आणि विद्वानांचा प्रांत होय. या आक्षेपाला सैनिकांचे उत्तर असे की, आमच्याशिवाय नियम टिकविता येणार नाहीत. कारण, केवळ शस्त्रबलानेच राष्ट्रसमूहांचे संरक्षण केले जाते, राज्यांना आधार दिला जातो, शहरे सुरक्षित ठेवली जातात, राजमार्ग बिनधोक राखले जातात आणि समुद्राचे रक्षण चाच्ये लोकांपासून केले जाते. सारांश, सैनिकांनी आपले काम केले नाही तर, राष्ट्रसमूह, राज्ये, राजघराणी, शहरे, जमिनीवरील रस्ते, आणि समुद्राचे पाणी–या सर्वांची नासधूस होऊन सारा गोंधळ माजेल. जोपर्यंत लढाई चालू असते तोपर्यंत हे सारे प्रकार होतातच आणि आपल्या अमर्याद शक्तीचा आणि अधिकाराचा उपयोग करण्याचे स्वातंत्र्य सैनिकांना मिळते. शिवाय ही गोष्ट निर्विवाद आहे की, ज्यासाठी आपल्याला अत्यंत प्रिय वस्तूचा त्याग करावा लागतो, ती फार मौल्यवान समजली जाते आणि समजली गेली पाहिजे.

"आता असे पहा, एखाद्या माणसाला विद्वत्तेची उच्च पदवी संपादन करण्यासाठी आपला वेळ, भूक, जागरूकता, वस्त्रहीनता, डोके गरगरणे, जठराग्नि मंद असणे आणि (मी ज्याचा अंशतः उल्लेख केला आहे, अशा परिस्थितीतून निर्माण होणाऱ्या) इतर किती तरी गैरसोयी सोसाव्या लागतात. पण एखाद्या माणसाला क्रमाक्रमाने उत्तम सैनिक व्हावयाचे असेल, तर विद्यार्जनासाठी द्यावी लागणारी सारी किंमत त्याला द्यावी लागते आणि तीही इतक्या मोठ्या प्रमाणात की, त्या दोघांची तुलनाच करता येत नाही.

सैनिकाला प्रत्येक क्षणी आपले प्राण गमावण्याची भीति असते. सैनिकाइतके संकट किंवा धोका विद्वानाला कधी तरी सोसावा लागतो काय ? एखाद्या भक्कम किल्ल्याला वेढा पडलेला असतो, तेव्हा सैनिकाला एखाद्या बुरुजावर किंवा मोक्याच्या ठिकाणी आतल्या जागी उभे राहून पहारा करावा लागतो आणि आपल्या नजरेखाली शत्रू सुरुंगाची दारू नेत असलेला पहावा लागतो. पण काही झाले तरी त्याला तेथून हालता येत नाही. त्याला एवढेच करता येते की, आपल्या सेनापतीला वर्दी द्यावयाची, म्हणजे तो शत्रूच्या सैन्याला उलट सुरुंग लावील. पण तरीही त्याने तेथेच स्थिरपणे उभे राहिले पाहिजे. पंख नसताना आपण कधी ढगापर्यंत अकस्मात उचलले जाऊ आणि आपली इच्छा नसताना जमिनीवर सरळ फेकले जाऊ, अशी धाकधूक त्याच्या मनात वावरत असते. हे संकट तुम्हाला फार महत्त्वाचे वाटत नसेल तर, त्याहून मोठे संकट असे की, दोन जहाजे विशाल सागरात आपल्या शक्तिसर्वस्वाने एकमेकांवर आदळतात. त्यावेळी ती जहाजे एकमेकांना चिकटलेली असली तरी सैनिकाला दोन फूट रुंदीच्या निमुळत्या जागेवरच खडे रहावे लागते. त्यावेळी त्याला कृतांताची नाना भयानक रूपे आपल्यापुढे नाचत असलेली दिसतात. दुसऱ्या बाजूने त्याच्यावर तोफा रोखलेल्या असतात आणि त्या त्याच्या शरीरापासून अगदी जवळ असतात. आपला पाय थोडासा घसरला की आपण रसातळाला जाऊन ( नेपच्यूनच्या ) राज्याच्या तळाशी प्रवेश करू, याची जाणीव त्याला असते. असे सारे असले तरी, कीर्तीच्या प्रेरणेने, निर्भय अंतःकरणाने तो त्या तोफांच्या आगीचे लक्ष्य म्हणून उभा राहतो आणि त्या अरुंद वाटेने शत्रूच्या जहाजावर तुटून पडण्यासाठी मार्ग शोधीत असतो. पण सर्वात कौतुकाची गोष्ट अशी की, एकदा सैनिक पडला की, जगाच्या अंतापर्यंत पुनः कधीही उठत नाही. पण तो पडताच त्याचे जागी दुसरा सैनिक येतो. एखाद्या शत्रूप्रमाणे त्याचा घास घेण्यास टपून बसलेल्या समुद्रात तोही कोसळतो. नंतर दुसरा- नंतर तिसरा- असे एकामागून एक सैनिक ती जागा भरून काढतात – आणि तसे करताना मध्ये थोडाही काळ जाऊ देत नाहीत, म्हणून त्यांचे मृत्यू एकाच वेळी घडून येतात. दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या युद्धामध्ये इतकी धडाडी आणि एवढा निश्चय क्वचितच दिसून येत असेल.

"हे तोफखाने म्हणजे सैतानाचे जबडे होत. त्यांच्या भयानक नि अघोर हल्ल्याची धास्ती ज्या काळी नव्हती, तो काळ धन्य होय. तोफखान्याचा शोध ज्याने लावला असेल, त्याला त्या दुष्ट शोधाचे बक्षीस म्हणून आता नरकात टाकले असेल. अशी मला खात्री वाटते. पुष्कळ वेळा एखादा भित्रा नि नीच माणूस अत्यंत शूर माणसाचा बळी घेतो, याचे कारण तोफखान्याचा शोध हेच होय. वीरपुरुषांची वृत्ती ज्यामुळे जिवंत होते, प्रदीप्त होते, त्या चैतन्याच्या आणि धडाडीच्या रण-संग्रामात एखादी गोळी चुकून येते – ती कोठून, कशी आली हे कोणालाच माहीत नसते – ( ती गोळी झाडणारा माणूस पळून गेलेला असतो. कारण, ते उत्पाती यंत्र जेव्हा आपले काम करू लागते, तेव्हा त्याच्या केवळ ज्वाळेचे दर्शन होताच तो गर्भगळित झालेला असतो)

आणि ती गोळी एका क्षणात एखाद्या वीरपुरुषाच्या धाडसी योजनांचा आणि त्याच्या जीवाचा विध्वंस करून जाते. वास्तविक तो वीरपुरुष आणखी पुष्कळ वर्षे जगावयास हवा असतो. हा सारा विचार केला तर, मी जवळजवळ असे म्हणेन की, सध्याच्या अत्यंत निंद्य युगात मी हा शिलेदारीचा व्यवसाय स्वतःच्या शिरावर घेतला याबद्दल मला माझ्या अंतर्यामी खंत वाटते. अर्थात् कोणत्याही संकटाने मी घाबरून जात नाही, पण त्यामुळे माझ्या मनात असा विचार येतो की, दारू नि शिसे यांच्या संयोगातून निर्माण झालेल्या शस्त्रांनी मी कीर्ती मिळविण्याची संधी गमावून बसलो की काय? माझ्या बाहु-बलाने आणि खड्ग–बलाने सर्व जगात माझी कीर्ती पसरली असती. पण तो जगन्नियंता आपल्या इच्छेप्रमाणे विश्वाचे कार्य करतो, ते करो. जर माझ्या योजना सिद्धीस गेल्या, तर प्राचीन काळच्या शिलेदारांनी सोसलेल्या संकटांपेक्षा मी अधिक संकटांना तोंड दिलेले असल्यामुळे माझा अधिकच सन्मान होईल."

डॉन क्विक्झोटचे हे लांबलचक व प्रास्ताविक भाषण चालू असताना बाकीची मंडळी खुशाल तोंड भरून जेवत होती. सँको पँझाने त्यांना कैक वेळा आपल्या जेवणाकडे लक्ष देण्यास सांगितले आणि म्हटले, "आपल्याला जे योग्य वाटेल ते बोलण्यास पुढे पुष्कळ वेळ मिळेल." डॉन क्विक्झोटचे भाषण ज्यांनी ऐकले त्यांना त्यांचेविषयी पुनः एकदा दया वाटू लागली. इतर सर्व बाबतीत इतका स्थिर विवेक करणारा आणि इतकी स्वच्छ समज असणारा हा माणूस, आपल्या शापित शिलेदारीचा उल्लेख होताच, इतका भडकतो कसा आणि पुरा वेडा होतो कसा, याचे त्यांना नवल वाटले. पाद्रीबुवांनी त्यांना सांगितले, "शस्त्रांचा महिमा आपण जो सांगितला, तो बरोबर आहे. मी एक विद्वान पदवीधर असलो तरी माझे मत आपल्यासारखेच आहे." जेवणे उरकली आणि टेबलावरील चादर काढून घेण्यात आली. नंतर खानावळवाला, त्याची बायको, त्याची मुलगी आणि मेरिटोर्नेस या सर्वांनी डॉन क्विक्झोट यांच्या खोलीचा पोटमाळा स्त्रियांसाठी सज्ज केला. त्या रात्री त्यांनी तेथे निजावे अशी सोय करण्यात आली. डॉन फर्डिनांड याने नवीन स्त्रीच्या दासाला स्वतःचा जीवन–वृत्तांत सांगण्याची विनंती केली. तो वृत्तांत अत्यंत आनंददायक आणि विस्मयकारक होईल अशी त्याला खात्री वाटत होती. झोरेडाबरोबर तो आला असल्याने त्याचा वृत्तांत चटकदार होईल, असा अंदाज सर्वांनी बांधला. तेव्हा त्या चाकराने उत्तर दिले, "आपली सर्वांची इच्छा मी अत्यंत आनंदाने पूर्ण करीन. मात्र माझ्या इच्छेप्रमाणे मी आपणा सर्वांना समाधान देऊ शकणार नाही, एवढेच भय मला वाटते. पण आपली आज्ञा मोडण्यापेक्षा मला सांगता येईल तसा तो वृत्तांत मी सांगेन." पाद्री आणि इतर सर्व मंडळी यांनी याचे आभार मानले आणि तशीच विनंती पुनः केली. इतक्या लोकांनी आपली विनवणी केल्याचे पाहून तो म्हणाला, "तुम्ही मला जे करण्यास आज्ञा करावयाची, त्यासाठी विनंती करण्याची काय गरज? आपण फक्त माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या म्हणजे आपल्याला अशी एक खरीखुरी गोष्ट ऐकायला मिळेल की, मोठ्या अभ्यासाने आणि कलेने रचलेल्या कोणत्याही

कल्पित कथेला तिची बरोबरी करता येणार नाही. " हे ऐकल्यावर सारी मंडळी नीटपणे बसली आणि अत्यंत गंभीर मौन त्यांनी पाळले. मग त्या चाकराने, शांत नि सुश्राव्य स्वराने, आपला वृत्तांत निवेदन करण्यास सुरवात केली.



## प्रकरण १२

# बन्दीवानाने सांगितलेला आपल्या जीवनाचा आणि साहसांचा वृत्तांत

" माझे घराणे मूळचे लीओन पर्वतामधले. दैवापेक्षा निसर्गच आमच्या घराण्यावर अधिक प्रसन्न होता. त्या भागात रहाणाऱ्या लोकांची स्थिती गरीबीची असल्यामुळे माझे वडील श्रीमंत समजले जात. खरे सांगायचे तर, त्यांनी आपली संपत्ती उधळण्याचा जितका हव्यास धरला, तितका ती जतन करण्याचा उद्योग केला असता, तर ते खरोखरच श्रीमंत झाले असते. ते एक सैनिक होते आणि त्यानी आपल्या तारुण्याची वर्षे सैनिकी व्यवसायात घालविली होती. त्यामुळे औदार्याच्या नावाने उधळपट्टी करण्याकडे त्यांचा कल वार्धक्यात झालेला होता. युद्ध ही अशी एक शाळा आहे की, जेथे लोभी माणूस उदार होतो आणि उदार माणूस उधळ्या बनतो. एखादा सैनिक कंजूष असलेला पाहावयास मिळणे कठीण आहे. कंजूष सैनिक विरळा ! माझे वडील कंजूष मुळीच नव्हते— उदारतेच्या सीमा ओलांडून उधळेपणाच्या अतिरेकाला ते पोहोचत असत. संसारी माणसाला हा स्वभाव कसा परवडणार ? कारण घरातील मुलांना जसा घराण्याचा नावलौकिक हवा असतो, तशीच त्याची मालमत्ताही मिळावयास हवी असते. आम्ही सारी मिळून तीन मुले होतो. आपल्या उधळेगिरीच्या प्रवृत्तीला आळा घालण्याचा एकच मार्ग माझ्या वडिलांना दिसत होता, तो म्हणजे आपल्याला आधार देणारी आपली सारी मालमत्ता फुंकून टाकणे. ( खुद्द अलेक्झँडरलाही संपत्तीशिवाय काही पराक्रम करता आला नसता. ) एके दिवशी आमच्या वडिलांनी आम्हा तिघा भावांना आपल्या खोलीत बोलावले आणि पुढील भाषण केले—

" माझ्या मुलांनो, माझे तुमच्यावर प्रेम आहे. हे तुम्हाला पटविण्यासाठी मी तुम्हाला इतके सांगितले म्हणजे पुरे की, मी तुमचा पिता आहे आणि तुम्ही माझी मुले आहा. उलट, जी संपत्ती एक दिवस तुमच्या मालकीची होणार, ती जतन करण्याची काळजी मी वाहिली नाही, म्हणून तुम्ही मला निर्दय मानणे योग्य होईल. पण माझ्या अंगी बापाचे आतडे आहे अशी तुमची खात्री पटविण्यासाठी मी एक निश्चय केला आहे. त्याचा विचार मी पुष्कळ दिवस करीत होतो आणि त्याचे लाभालाभ मी चांगले जोखले आहेत. आपण आपल्या आयुष्याचा कोणता मार्ग निवडावा हे ठरविण्याचे आता तुम्हा सर्वांचे वय झाले आहे. निदान मान आणि लाभ दोन्हीही पुढेमागे मिळवून देणारा

उद्योग सुरू करण्याच्या अवस्थेत तुम्ही आहात. म्हणून मी माझ्याजवळ असलेल्या साऱ्या मालमत्तेचे चार भाग करण्याचे योजिले आहे. त्यापैकी तीन भाग मी तुम्हाला वाटून देईन आणि चौथा माझ्यासाठी ठेवीन. माझे आयुष्य जितका काळ टिकविण्याचे परमेश्वराच्या मनात असेल, तितका काळ माझ्या वार्धक्यावस्थेत या चौथ्या भागाचा मला आधार होईल. तुमच्यापैकी प्रत्येकाला आपापला हिस्सा मिळाला म्हणजे तुम्ही आपल्या आवडी-प्रमाणे एकेक व्यवसाय सुरू करावा. ते व्यवसाय कोणते, हे मी तुम्हाला सांगतो. आपल्या भाषेत एक म्हण आहे व तिच्यात पुष्कळ तथ्य आहे–बहुतेक साऱ्या म्हणीमध्ये तसे सत्य साठविलेले असते. कारण सूक्ष्म निरीक्षण व प्रदीर्घ अनुभव यावर आधारलेली छोटी वाक्ये म्हणजे त्या म्हणी. 'धर्मगुरू, खलाशी किंवा वकील हो.' अशी ती म्हण आहे. याचा सरळ अर्थ असा की, ज्याला आपली भरभराट करून घेण्य.ची इच्छा असेल, त्याने या तिहींपैकी एक व्यवसाय करावा. धर्मगुरू किंवा व्यापारी अथवा खलाशी होऊन समुद्रावर संचार करून आपले नशीब जोखावे अगर दरबारात राजाची सेवा करावी. दुसरी म्हण आहे की, 'सामान्य माणसांनी दिलेल्या धान्यापेक्षा राजाने दिलेला कोंडा चांगला.' हे मी सांगतो याचे कारण असे की, तुमच्यापैकी एकाने विद्याभ्यास करावा, दुसऱ्याने व्यापारी व्हावे आणि तिसऱ्याने राजाची सेवा युद्धात करावी अशी माझी इच्छा आहे. कारण दरबारात प्रवेश मिळविणे ही काहीशी कठीण गोष्ट आहे. युद्धात भाग घेतल्याने तत्काळ संपत्ती मिळत नसली, तरी त्यामुळे मानसन्मान मिळण्यास कधी अडचण पडत नाही. आठ दिवसांच्या आत मी तुमच्यापैकी प्रत्येकाला त्याचा हिस्सा देईन. ती देताना मी तुमची एका पैचीही हानि करणार नाही. ते तुम्हाला अनुभवाने कळेलच. तेव्हा जगात आपले आसन स्थिर करण्यासंबंधी मी जो हा उपदेश केला आहे, तो अनुसरण्याचे तुम्ही ठरविणार ना? हे मला सांगा."

मी मोठा मुलगा असल्यामुळे माझ्या वडिलांनी माझ्याकडे वळून मला प्रथम उत्तर देण्याची आज्ञा केली. मी सांगितले, "आमच्यामुळे तुम्ही आपल्या मालमत्तेची किंवा राहणीची विभागणी करू नये किंवा ती कमी करू नये. आम्ही तरुण आहोत आणि जगात कोठेही संचार करू शकतो. माझ्यापुरते सांगावयाचे तर, मी सैनिक होईन आणि सैनिकाच्या सन्मान्य व्यवसायात राहून देवाची आणि राजाची सेवा करीन." माझ्या दुसऱ्या भावानेही तशीच आदरयुक्त योजना मांडली आणि येथे आपल्याला संपत्तीचा जो वाटा मिळेल त्यावर इंडिजमध्ये जाऊन व्यापार करण्याचा निर्धार त्याने प्रगट केला. सर्वांत लहान भाऊ हा आम्हा सर्वांत शहाणा ठरला. तो म्हणाला, "मी धर्मगुरू होईन आणि त्यासाठी सालामँका येथे जाऊन माझा अभ्यास पुरा करीन."

यानंतर माझ्या पित्याने आम्हा तिन्ही भावंडांना आलिंगन दिले आणि थोड्याच दिवसांत, आपण दिलेल्या वचनाप्रमाणे आपल्या जिंदगीची वाटणी केली. प्रत्येकाच्या वाट्याला तीन हजार ड्यूकॅट (सोन्याची नाणी) आले. आमच्या एका चुलत्याने आमची सारी मालमत्ता विकत घेतली आणि रोख पैसे दिले. आपली वडिलोपार्जित जिंदगी

आपल्या घराण्याबाहेर जाऊ नये अशी त्याची इच्छा. थोड्याच दिवसांनी आम्ही सर्वांनी आमच्या वडिलांचा निरोप घेतला. आपल्या पित्याला वृद्धावस्थेत अशा बिकट परिस्थितीत सोडून जाणे हा एक प्रकारचा अमानुषपणा आहे असे मला वाटल्याशिवाय राहिले नाही. म्हणून मी माझ्या वाट्याच्या तीन हजार ड्यूकॅटपैकी दोन हजार घेण्यास त्यांना आग्रहाने भाग पाडले. उरलेले एक हजार ड्यूकॅट सैनिकाचा जामानिमा करण्यास पुरेसे होते. माझ्या या कृत्याचा परिणाम माझ्या भावांवर झाल्यावाचून राहिला नाही. त्या दोघांपैकी प्रत्येकाने वडिलांना एक एक हजार ड्यूकॅट अर्पण केले. यामुळे माझ्या वडिलांजवळ रोख चार हजार ड्यूकॅट शिल्लक राहिले आणि शिवाय त्यांच्या वाट्यास आलेल्या जमिनीची किंमत तीन हजार होतीच. ती न विकता आपल्यापाशी ठेवण्याचे त्यांनी ठरविले होते. शेवटी, आम्ही आमच्या पित्याचा आणि वर उल्लेखिलेल्या चुलत्याचा अखेरचा निरोप घेतला. त्यावेळी सर्वांना फार दुःख झाले आणि सर्वांच्या डोळ्यांतून अश्रू गळाले. त्या दोघांनी आम्हाला आपले बरे-वाईट भवितव्य वारंवार कळविण्यास सांगितले आणि तसे करण्याचे अभिवचन आम्ही त्यांना दिले. आमच्या वृद्ध पित्याचा आशीर्वाद घेऊन आमच्यापैकी एकजण सालामँका येथे गेला, दुसरा सेव्हिलला आणि मी ॲलिकांटला. तेथे जिनोआला नेण्यासाठी लाकडाने भरलेले एक जहाज आलेले असल्याचे मला कळले.

"माझ्या वडिलांचे घर प्रथम सोडून या वर्षी बावीस वर्षे होतात. या काळात मी पुष्कळ पत्रे लिहिली पण त्यांची किंवा माझ्या भावांची मला थोडीही माहिती मिळाली नाही. या सर्व काळात मी जी जी धाडसी कृत्ये केली ती मी आपल्याला आता थोडक्यात सांगतो. ॲलिकांट येथे मी जहाजावर चढलो आणि चांगला प्रवास होऊन जिनोआ येथे सुखरूप पोचलो. तेथून मी मिलान येथे गेलो. पीडमाँटच्या सैन्यात दाखल होण्याचा निश्चय करून मी कपडेलत्ते विकत घेतले. अलेक्झांड्रिया डी ला पेले येथपर्यंत मी जाऊन पोहोचलो. तेव्हा तेथे मला कळले की, आल्व्हाचा थोर ड्यूक सैन्य घेऊन फ्लँडर्समध्ये जात आहे. हे ऐकताच मी माझा पहिला निश्चय बदलला. मी त्यांच्या मागोमाग गेलो आणि त्यांच्या सर्व लढायात हजर राहिलो. एग्मंट व हॉर्न या सरदारांच्या मृत्युसमयीही मी हजर होतो. ग्वाडालाजारा येथील प्रख्यात कॅप्टन डीएगो डी अर्बिना याच्या हाताखाली मर्दुमकी गाजवून मी दोन पदके कमावली. फ्लँडर्स येथे गेल्यावर थोड्याच वेळाने अशी बातमी मला मिळाली की, चिरस्मरणीय पाचवा पोप पायस याने स्पेनच्या सहकार्याने, दोघांचा शत्रू असलेल्या तुर्कस्तानाविरुद्ध करार केला आहे. त्यावेळी तुर्कांनी व्हेनेशियन्सकडून सायप्रस बेट जिंकून घेतले होते. ख्रिश्चन लोकांच्या दृष्टीने ही दुर्दैवी आणि शोचनीय हानी होती. त्या पवित्र करारात पुढाकार घेणारा सेनापति म्हणजे ऑस्ट्रियाचा धीरोदात्त डॉन ज्यूआन हा होता. तो डॉन फिलिप या आमच्या थोर राजाचा भाऊ होता. या युद्धासाठी जी प्रचंड तयारी केली जात होती, तिचा मोठा लौकिक माझ्या कानी आला आणि त्यामुळे त्या संघर्षाचे वेळी आपण हजर

असावे अशी जोरदार इच्छा मला झाली. एवढ्या तयारीनंतर भीषण युद्ध होणार अशी अपेक्षा होती. सैन्यात जागा होताच मला कप्तान केले जाईल असे नक्की आश्वासन मला मिळालेले होते. तरी त्या सर्व अपेक्षांवर आणि आश्वासनांवर पाणी सोडून मी इटालीला परत जाण्याचे ठरविले– आणि तसे केलेही. माझे सुदैव असे की, मी तेथे पोचलो त्याच वेळी ऑस्ट्रियाचे डॉन ज्यूआन जिनोआ येथे येऊन थडकले होते. व्हेनेशिअन आरमाराला जाऊन मिळण्यासाठी ते नेपल्सला निघाले होते. मेसिना येथे त्यांनी पूर्वी तसेच केले होते. थोडक्यात सांगावयाचे तर, माझ्या सुदैवाने माझ्या पात्रतेपेक्षा वरचे स्थान मिळून मी पायदळाचा कप्तान झालो आणि लेपॅण्टो येथील महान संग्रामाचे प्रसंगी हजर राहिलो. खरोखर तो दिवस अखिल ख्रिस्ती जनतेला अत्यंत सुखाचा होता. (तुर्क लोक समुद्रावर अजिंक्य आहेत अशी जी भ्रामक कल्पना ख्रिश्चनांची झालेली होती, ती त्या दिवशी जगातून नाहीशी झाली.) त्या दिवशी ओटोमन्सच्या गर्वाचा विध्वंस पहिल्यानेच झाला. त्यामुळे सर्व ख्रिस्ती लोकांना – युद्धात मरण पावलेल्यानाही – तो दिवस अत्यंत सौख्यदायक ठरला. जे जिवंत राहिले आणि विजेते ठरले, त्यांच्यापेक्षा धारातीर्थी कामास आलेले ख्रिश्चन सैनिक अधिक भाग्यवान. अभागी काय तो मी एकटाच ! रोमन लोकांच्या काळी माझ्या मस्तकावर आरमारी मुकुट चढण्याची आशा होती, पण त्याच रात्री मी गुलाम बनलो. आणि माझ्या हातापायात बेड्या पडल्या, तो प्रकार असा—

ॲल्जिर्सचा शूर आणि धडाडीचा चाचा राजा वेहाली याने माल्टोचे कॅपिटाना हे जहाज जिंकून घेतले. त्या जहाजावर फक्त तीन शिलेदार जिवंत राहिलेले होते आणि काही सैनिक भयंकर जखमी झालेले होते. त्यांच्या मदतीसाठी जॉन ॲंड्रि डोरिया याचे जहाज आले होते. त्या जहाजावर मी माझ्या तुकडीसह नेमलेला होतो आणि त्याप्रसंगी मी माझे कर्तव्य बजावीत होतो. मी शत्रूच्या जहाजात उडी घेतली. ते जहाज आमच्या जहाजापासून वेगळे झाले. आमच्या जहाजावर अल्जेरिन सैनिकांना उतरवून घेण्याचा आमचा बेत होता. पण शत्रूचे जहाज एकदम निसटल्यामुळे माझ्या सैनिकांना माझ्या पाठोपाठ येण्यास अडथळा झाला आणि गनिमांच्या प्रचंड वेढ्यात मी एकटा सापडलो. त्यांच्याशी मुकाबला करण्यास मी असमर्थ होतो. मला काही जखमा झाल्या. नंतर मला कैद करण्यात आले. तुम्ही ऐकलेच आहे की, वेहाली आपल्या पलटणीनिशी तेथून निसटला आणि मी कैदी झालो. त्या सर्व आनंदी लोकांमध्ये मीच एकटा दुःखी होतो. त्या सर्व स्वतंत्र माणसांमध्ये मीच एकटा बंदीवान होतो. त्या दिवशी तुर्की जहाजातून गेलेल्या १५००० हून अधिक गुलाम ख्रिश्चनांना चिरवांछित स्वातंत्र्य प्राप्त झाले होते. मला कॉन्स्टॅंटिनोपल येथे नेण्यात आले. तेथे ग्रॅंड सिनॉर सेलिम याने माझा धनी वेहाली याला आरमाराचा प्रमुख केले. कारण त्या युद्धात त्याने चांगला पराक्रम केला होता आणि त्याचे निदर्शक म्हणून माल्टाचे मोठे निशाण आपल्याबरोबर आणले होते.

"कैदेच्या माझ्या दुसऱ्या वर्षी मी नेव्हॅरिनो येथे कॅपिटाना जहाजावर गुलाम

म्हणून होतो. त्या बंदरात तुर्कांचे सारे आरमार काबीज करण्याची संधी ख्रिश्चनांनी गमावली. ही त्यांची चूक माझ्या लक्षात आली. आपल्यावर हल्ला होईल अशी अटकळ जॅनिझारी आणि अल्जेरिन या सर्व चाच्यांनी बांधलेली होती. आणि लढाई न करता किनाऱ्यावर निसटून जाण्याची जय्यत तयारी त्यांनी केलेली होती. आमच्या आरमाराचा दरारा त्यांना इतका मोठा वाटत होता. पण ईश्वराच्या मनात दुसरेच काही करावयाचे होते. त्यात ख्रिश्चन सेनापतीचा काही दोष नव्हता. अखिल ख्रिस्ती जगताच्या पापाचे ते फल होते. आम्हाला शिक्षा करण्यास कोणी तरी शत्रु नेहमी असले पाहिजेत अशीच ईश्वरेच्छा असावी. वेहाली मोडॉन येथे गेला. हे बेट नॅव्हारिनोच्या जवळ आहे. त्यावर त्याने आपली माणसे उतरविली आणि बंदराचे प्रवेशद्वार बळकट केले व तेथे तो निर्धास्तपणे राहिला. डॉन ज्यूआनला आपल्या आरमारासह घरी परत येणे भाग पडेपर्यंत तो तेथेच राहिला. या मोहिमेमध्ये ‘ ला प्रेसा ’ नावाचे जहाज पकडण्यात आले. त्या जहाजाचा कप्तान बार्बारोसाचा प्रत्यक्ष मुलगाच होता. ‘ लांडगा ’ म्हणून प्रख्यात असलेल्या नेपल्सच्या आरमारी जहाजाने ‘ ला प्रेसा ’ बळकावले. या ‘ लांडगा ’ जहाजाचा कर्णधार युद्धातील वज्रपुरूष होता. तो म्हणजे सांताक्रूझचा सरदार डॉन ॲल्व्हारो डी बकान. तो सैनिकांचा पिता होता आणि अजिंक्य असा भाग्यशाली कप्तान होता. हे जहाज कसे पकडले हे सांगण्याचे मी टाळू शकत नाही. बार्बारोसाचा मुलगा अत्यंत क्रूर होता आणि आपल्या गुलामाशी अत्यंत अमानुषपणे तो वागत असे. या शर्यतीत ‘ लांडगा ’ जहाजाने आपल्यावर मात केली आहे, हे पाहून सर्व गुलामांनी जहाजाची वल्ही एकदम टाकून दिली. त्यावेळी तो कमांडर डेकवर त्यांच्यामधून हिंडत होता आणि जहाज जोराने वल्हविण्याचा आदेश देत होता. अशा वेळी गुलामांनी त्याला पकडले आणि याच्या हातातून त्याच्या हातात, जहाजाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत त्याला फरफटत नेले—आणि नेत असताना त्याला इतके ठोसे लगावले की, तो मुख्य शिडाजवळ परत येण्यापूर्वीच त्याच्या कुडीतील प्राण उडून नरकात जाऊन पोचला होता. त्याच्या क्रौर्याचा आणि गुलामांच्या द्वेषाचा हा परिणाम होय.

“ यानंतर आम्ही कॉन्स्टँटिनोपलला परत आलो. पुढील वर्षी म्हणजे १५७३ साली अशी बातमी आली की, ऑस्ट्रियाचा डॉन ज्यूएन याने ट्यूनिस आणि आपले राज्य तुर्कांपासून हिरावून घेतले आणि त्याचा ताबा मूले हमीद याचेकडे दिला. हा माणूस अत्यंत क्रूर होता, पण तरीही जगातील साऱ्या मूर लोकांमध्ये अत्यंत शूर होता. ही हानी कळल्यामुळे ग्रँड सिनॉरला दुःख झाले. त्याने ख्रिश्चन लोकांशी आपल्या नेहमीच्या युक्त्या करून व्हेनेशियन लोकाशी तह केला. ते लोक तहाला त्याच्यापेक्षाही अधिक उत्सुक होते.

“ यानंतरच्या वर्षी—म्हणजे १५७४ साली—त्याने गोलेटा किल्ल्यावर हल्ला केला आणि डॉन ज्यूआन याने निम्मा शिम्मा बांधलेल्या किल्ल्यावरही ट्यूनिसपूर्वी हल्ला केला. हे सर्व होत असताना मी जहाजावर गुलाम होतो. स्वतंत्र होण्याची मला मुळीच आशा

नव्हती. खंडणी देऊन मी स्वतंत्र होईन अशीसुद्धा आशा नव्हती. कारण आपल्या दुःखाची कहाणी आपल्या वडिलांना कळवावयाची नाही असा निश्चय मी केला होता. ला गोलेटा आणि तो किल्ला याने प्रतिकाराचा थोडा प्रयत्न केल्यानंतर ते दोन्ही किल्ले जिंकले गेले होते. तुर्की सैन्यात ७५००० तुर्क पगारी होते आणि सर्व आफ्रिकेमधून समुद्रकाठच्या प्रदेशातून ४००००० हून अधिक मूर व अरब आलेले होते. त्यानी युद्धाची सर्व प्रकारची तयारी इतकी जय्यत केलेली होती आणि त्यांच्याजवळ इतके सेनापती होते की, त्यांच्या सैनिकांनी मुठी भरून माती फेकली असती तरी गोलेटा व तो किल्ला धुळीने भरून गेला असता. नेहमी अभेद्य म्हणून समजला जाणारा गोलेटा किल्ला प्रथम घेतला गेला. त्यात त्याचे संरक्षण करणाऱ्या सैनिकांचा काही दोष नव्हता. त्यांच्याकडून जेवढ्या पराक्रमाची अपेक्षा करता आली असती, तो सर्व त्यांनी केला. पण अनुभवाने असे आढळून आले की, त्या वाळवंटाखाली खंदक खणणे शक्य आहे. त्या वाळवंटात दोन फुटांखाली पाणी आहे असा समज होता, पण तुर्कांनी सहा फूट खणले तरी पाणी लागले नाही. म्हणून त्यानी वाळूनी भरलेली पोती एकावर एक रचली, ती इतकी उंच की, त्यामुळे तुर्की सैनिक त्या किल्ल्याच्या वर आले आणि त्या किल्ल्यावर नजर फेकू लागले. मग त्या किल्ल्यात सुरक्षित कोण राहणार आणि त्याच्या तटबंदीवर कोण उभे राहणार ? आम्ही गोलेटामध्ये स्वतःला कोंडून घेतले ही चूक झाली असे पुष्कळ लोकांचे मत आहे. तुर्कांना खाली पाय ठेवण्यास प्रतिबंध करण्यासाठी आम्हाला किल्ल्याबाहेर काढावयास हवे होते असेही कोणी कोणी म्हणतात. पण जे कोणी असे म्हणतात त्यांना अनुभव नसतो आणि म्हणून ते हवे तसे बोलत सुटतात. कारण गोलेटामध्ये आणि त्या किल्ल्यामध्ये मिळून ७००० हून अधिक माणसे नव्हती. मग एवढ्या लहान संख्येच्या सैनिकांनी ( ते कितीही शूर असले तरी ) शत्रूच्या प्रचंड सामर्थ्याशी उघड उघड टक्कर कशी द्यावी ? एवढ्या प्रचंड संख्येने तुर्की सैनिकांनी आपल्या देशास वेढा घातला असताना आणि बाहेर जाण्याचा काही मार्ग नसताना त्या स्थानाचा पराभव टाळणे कसे शक्य आहे ? पण पुष्कळ लोकांचे मत असे आहे—आणि मलाही तसेच वाटते.—सर्वशक्तिमान ईश्वराची स्पेनवर विशेष कृपा आहे. त्यामुळे अन्याय व दैन्य यानी भरलेली आणि द्रव्याचे सतत शोषण करणारी ती दरी त्याने नष्ट केली. तेथे अपार संपत्ती व्यर्थ खर्चिली गेली आहे. एका सम्राटाच्या (पाचवा चार्लस्) विजयाचे स्मारक जतन करणे एवढाच तिचा हेतू. जणू काही त्या स्मारकाचे दगड कायम राहिल्यानेच त्याच्या कीर्तीला शाश्वत स्वरूप येणार होते. ( ती कीर्ती शाश्वत आहेच. ) किल्ला पडला पण तुर्कांनी तो तसूतसूनी घेतला. कारण त्याचे संरक्षण करणारे सैनिक वीस वीस हल्ले सहन करीत होते आणि त्यानी त्या रानटी लोकांपैकी २५००० हून अधिक शत्रू ठार केले. जेव्हा तुर्कांनी तो किल्ला घेतला, तेव्हा त्यात ३०० माणसे जिवंत होती, पण त्यामध्ये जखम न झालेला एकही नव्हता. त्यावरून त्या सैनिकांचे शौर्य आणि किल्ल्याचा बचाव करण्यातील कौशल्य सिद्ध होते. त्याचप्रमाणे तेथील तळ्यातील एक लहानसा

किल्लाही त्यानी घेतला. तो डॉन जॉन झनोगेरा या व्हॅलेंशियाच्या प्रख्यात सेनापतीच्या ताब्यात होता. गोलेटाचा किल्लेदार डॉन पेड्रो प्युरटो करेरो हाही कैद झाला. त्याला शत्रूचे सैनिक कॉन्स्टॅंटिनोपलला घेऊन जात असताना वाटेतच तो मरण पावला. आपला किल्ला पडला याच्या दुःखानेच तो मृत्यू पावला. त्या किल्ल्याचा किल्लेदार गेब्रिल सर्बेलॉन हाही कैद झाला. हा मिलनचा रहिवासी असून मोठा इंजिनीअर व शूर योद्धा होता. त्या दोन किल्ल्यात काही गुणी माणसे ठार झाली. त्यांमध्ये पेगन डोरिआ हा एक होता. सुप्रसिद्ध जॉन अँड्रिया डोरिया याचा हा भाऊ. जॉन हा उदार आणि थोर अंतःकरणाचा होता आणि आपल्या भावासारखाच उदार होता. पेगन डोरिया याचा मृत्यू अधिकच करुणास्पद होण्याचे कारण हे की, किल्ला पडल्यानंतर त्याने आपला बचाव व्हावा म्हणून ज्या अरबांचा आश्रय घेतला होता, त्यांनीच त्याला ठार मारले. मूरच्या वेशात आम्ही तुला टॅबार्का ह्या लहानशा किल्ल्यावर सुखरूप घेऊन जाऊ, असे त्यानी त्याला वचन दिले होते. समुद्रातून प्रवाळ काढण्यासाठी हा छोटा किल्ला जेनोइने आपल्या ताब्यात ठेवला होता. पण त्या अरबांनी त्याचे मुंडके उडविले आणि तुर्की सेनापतीपुढे ठेवले. आपल्या स्पॅनिश म्हणीप्रमाणे, ' राजद्रोह चांगला पण राजद्रोही वाईट ' असा अनुभव त्या तुर्की सेनापतीने त्यांना दिला. शत्रूला जिवंत पकडून आणले नाही म्हणून त्याने अरब सैनिकांना तत्काळ फाशी देण्याचा हुकूम केला.

" किल्ल्यात जे ख्रिस्ती लोक पकडले गेले त्यामध्ये डॉन पेड्रो डी ऑग्यूलर हा एक होता. तो अंडाल्यूसियाचा रहिवासी. तो त्या ठाण्यातील एक कनिष्ठ अम्मलदार. तो अत्यंत शूर होता, अतिशय कल्पक होता आणि त्याच्या अंगी काव्याची अलौकिक प्रतिभा होती. मी त्याचे नाव घेत आहे याचे कारण, माझ्याबरोबर त्याच जहाजावर गुलाम होण्याचे आणि त्याच बाकाला साखळीने बांधले जाण्याचे त्याच्या नशिबी आले होते. त्या बंदराचा निरोप घेण्यापूर्वी त्याने दोन चतुर्दशके रचली होती. गोलेटाची गढी आणि तो किल्ला यांचा जणू तो मृत्युलेखच होता. ती गीते मी तोंडपाठ केली आहेत आणि ती येथे म्हणण्याची मी आपल्यापाशी परवानगी मागतो. ती ऐकल्याने आपणा सर्वांची थोडीफार करमणूक होईल – कंटाळा तर येणारच नाही. "

जेव्हा त्या कैद्याने डॉन पेड्रो डी ऑग्यूलर याचे नाव घेतले, तेव्हा डॉन फर्डिनांडने आपल्या सोबत्याकडे पाहिले आणि ते सर्वजण हसू लागले. कैद्याने जेव्हा चतुर्दशकांचा उल्लेख केला, तेव्हा त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, " महाराज, आपण ती गीते म्हणण्यापूर्वी आपण उल्लेखिलेल्या डॉन पेड्रो डी ऑग्यूलरचे काय झाले हे कृपा करून सांगा. " गुलाम उत्तरला, " त्याच्याविषयी मला इतकीच माहिती आहे की, कॉन्स्टॅंटिनोपलमध्ये दोन वर्षे काढल्यानंतर अर्नाटसारख्या परदेशी सैनिकाचा वेश करून आणि एका ग्रीक हेराच्या संगतीत राहून त्याने आपली सुटका करून घेतली. पण तो स्वतंत्र झाला की नाही, हे मी सांगू शकत नाही. मला वाटते, त्याला स्वातंत्र्य मिळाले असावे. कारण सुमारे एका वर्षानंतर त्याच ग्रीक माणसाला मी कॉन्स्टॅंटिनोपल

येथे पाहिले. त्याचा प्रवास यशस्वी झाला की नाही हे विचारण्याची संधी मला मिळाली नाही." तेव्हा त्या सद्गृहस्थाने उत्तर दिले, "मग मी तुला सांगतो की, तू ज्याचे-विषयी बोललास तो डॉन पेड्रो माझा भाऊ आहे आणि सध्या तो घरी आहे. श्रीमंत मुलीशी त्याचे लग्न झाले आहे आणि त्याला तीन मुले आहेत." ते ऐकून दास म्हणाला, "प्रभूला धन्यवाद! त्याच्यावर प्रभूने फार कृपा केली. कारण आपले गमा-विलेले स्वातंत्र्य पुन्हा परत मिळण्यासारखा दुसरा आनंद नाही असे माझे मत आहे." तो सद्गृहस्थ पुन्हा म्हणाला, "माझ्या भावाने केलेली आणि तू उल्लेखिलेली चतुर्दशके मी म्हणू शकतो." गुलाम उत्तरला, "मग ती कृपा करून म्हणा. कारण माझ्यापेक्षा तुम्ही ती चांगली म्हणू शकाल यात शंका नाही." तेव्हा तो सद्गृहस्थ म्हणाला, "अगदी आनंदाने. गोलेटा किल्ल्यावरचे गीत ते असेः—



## प्रकरण १३

# बंदीवानाची कथा पुढे चालू

### चतुर्दशक

ज्यांचे सुकृत स्वर्गाचे परवानेच ठरले, अशा
जीवनाच्या जुलुमी ओझ्याखालून मुक्त झालेल्या धन्य जीवांनो,
जेव्हा तुम्ही स्वधर्मासाठी शौर्याने धारातीर्थी पडलात – पुन्हा उठण्यासाठी
तेव्हाच स्वर्गात अधिक शुभ दैव मिळवलेत.
या कृतघ्न किनारी तुमचे रक्त पेटवणारा
सात्त्विक संताप जेव्हा तुमच्या नसानसांतून भिनला
तेव्हा तुमच्या वाहलेल्या रक्ताच्या प्रत्येक थेंबाला
शत्रूच्या अगणित प्राणांचे मोल द्यावे लागले.
त्यांच्या जिवांच्या जांभळ्या प्रवाहाने जवळचा पूर फोफावला.
जरी विनाशाने आणि विघ्नांनी तुम्ही चिरडले गेला असलात
तरी त्या परिपूर्ण यशश्रीवर, त्या अमर कीर्तीवर तुमचा हक्क आहे
जिचे अनुगमन खऱ्या वीरांसारखे तुम्ही केलेत.
प्राणास वंचित झाला असतादेखील तुम्ही हीच ध्येये धरून ठेवलीत
कारण तुमच्यामध्ये तुमच्या धैर्याची कीर्ति उरलीच
आणि खचित असे दमन होणे हा विजयच आहे.

बंदी म्हणाला, “ तुम्ही म्हणता तसेच ते गीत आहे, हे मला माहीत आहे. ” गृहस्थ म्हणाला, “ छान, छान. आता मी तुम्हाला किल्ल्यावरील गीत, मला आठवले तर, म्हणून दाखवितो. ”

### चतुर्दशक

या नापीक शेतातून आणि उद्ध्वस्त बुरुजांमधून
रणी पडणाऱ्या शूरांच्या या सन्मानशय्येवर
ख्रिस्ती संतांच्या तीन हजार समर्थक वीरांना
एक नवें जीवन आणि विजय मृत्यूत प्राप्त झाला.

त्यांच्या गर्विष्ठ शत्रूंनी दीर्घकालपर्यंत त्यांच्या शस्त्रांचे हल्ले परतवले,
तरी मारल्या गेलेल्यांचे ढीग रणक्षेत्रात व्यर्थ विखरून टाकले
श्रमाकुल होऊन ते धर्मनिष्ठ योद्धे पडले
किंवा जगले ते केवळ अधिक उदात्तपणे मारले जाण्यासाठी.
ही दारुण भूमी, प्राचीन अनर्थांमुळे इतकी विख्यात
प्रत्येक युगात साहसिकांना घातक होती,
भीषणतेचे पीठ आणि योद्ध्याची समाधी होती !
तरी या वीरांनी दाखवलेल्यापेक्षा अधिक योग्यता
येथून स्वर्गाला कधीच समर्पण झाली नाही,
किंवा यांच्याहून अधिक उमदे देह पृथ्वीने एकवटून
आपल्या गर्भात पुन्हा घेतले नाहीत. ”

या गीतांची सर्वांनी वाहवा केली. आपल्या मित्राची आणि सोबत्याची शुभवार्ता एकून बंदीवानाला आनंद झाला. नंतर त्याने आपले निवेदन पुढील शब्दांनी चालू केले:—

“ गोलेटाची तटबंदी उद्ध्वस्त करण्याचा हुकूम तुर्कांनी दिला. या वेढ्यामुळे किल्ला त्यांच्या हातात पडला होता. पण त्यांनी जे सुरुंग लावले होते, ते जुने तट उडवून लावू शकले नाहीत. वास्तविक त्या किल्ल्याचा अत्यंत कच्चा भाग म्हणून ते तट मानले जात. फ्रॅटिन नावाच्या इंजिनियरने बांधलेले नवे तट मात्र तावडतोब कोसळले. सारांश, तुर्की आरमार विजय संपादून कॉन्स्टँटिनोपलला परत गेले. तेथे माझा धनी वेहाली लौकरच मृत्यू पावला. त्याला तुर्क लोक ‘ वेहाली फॅरटॅक्स ’ म्हणून संबोधीत. त्याचा तुर्की भाषेत अर्थ ‘ खराब फितूर ’ असा होतो—आणि तसाच तो खरोखर होता. तुर्की लोकांत माणसांना त्यांच्या काही गुणांवरून किंवा दोषांवरून नावे देण्याची सवय आहे. आणि याचे कारण हे की, ओटोमन घराण्यात जन्मलेली फक्त चारच कुटुंबे आहेत. बाकीच्या साऱ्या कुटुंबांना काही शरीरदोषावरून किंवा काही चांगल्या मनोधर्मावरून नावे मिळालेली आहेत. हा खराब फितूर गुलाम ग्रॅंड सिनॉरच्या जहाजावर चौदा वर्षे वल्हे मारीत होता. चौतीस वर्षांचा झाल्यानंतर त्याने तेथून पळ काढला. त्याला एका तुर्काचा सूड उगवावयाचा होता. कारण जेव्हा त्याला वल्ह्याशी बांधलेले होते, तेव्हा त्या तुर्काने त्याच्या कानशिलात ठोसा दिला होता. सूड उगविण्यासाठी त्याने आपला धर्म सोडला. नंतर त्याने असा काही पराक्रम केला की, त्यामुळे तो अल्जियर्सच्या राजापाशी आणि तुर्की आरमाराच्या सेनापतीपाशी जाऊन पोचला. हे आरमार साऱ्या साम्राज्यात तिसऱ्या क्रमांकाचे होते आणि हा सेनापती जन्माने कॅलॅब्रियन होता. आपल्या गुलामांशी तो सौम्यपणे वागे आणि जगातील इतर माणसांशी चांगल्या नीतीने वागे. त्याचे स्वतःचे ३००० हून अधिक गुलाम होते. त्या सर्वांची वाटणी त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या मृत्युपत्राप्रमाणे, ग्रॅंड सिनॉर, त्याचे मुलगे आणि त्याचे बाटगे लोक यामध्ये करण्यात आली. एका व्हेनेशियन राष्ट्रद्रोह्याच्या वाट्यास मी

आलो. वेहालीने पकडलेल्या एका व्हेनेशियन जहाजावर हा माणूस केबिन-बॉय म्हणून प्रथम काम करीत होता. त्याच्यावर वेहालीचे फार प्रेम असे. तो त्याचा लाडका होता. शेवटी तो एक अत्यंत क्रूर राष्ट्रद्रोही माणूस निघाला. त्याचे नाव अँझान्गा होते. त्याने खूप संपत्ती कमावली आणि तिच्या बळावर तो अल्जिअर्सचा राजा झाला. त्याच्याबरोबर मी कॉन्स्टॅंटिनोपल सोडले. त्यावेळी मी स्पेनच्या जवळ गेलो, या कल्पनेने मला समाधान वाटले. त्याचे कारण मी माझ्या दुर्दैवाची बातमी कोणा मित्राला देईन हे नव्हे, तर कॉन्स्टँटिनोपलपेक्षा अल्जिअर्समध्ये पळून जाण्याचा यशस्वी प्रयत्न करता येईल, या आशेने. कॉन्स्टँटिनोपलमधून पळून जाण्याचे मी हजार प्रयत्न केले, पण त्यातील एकही सिद्धीस गेला नाही. अल्जिअर्समध्ये तसे सुटकेचे प्रयत्न मला यशस्वीपणे करता येतील अशी आशा होती. माझे स्वातंत्र्य मिळविण्याच्या ज्या ज्या योजना मी केल्या त्यांत माझ्या पदरी निराशाच पडली, पण तरीही मी आशा कधीच सोडली नाही. अशा प्रकारे तुरुंगात किंवा घरात-त्याला तुर्क लोक बॅग्निओ म्हणतात—मी जिवंत राहिलो. तेथे ख्रिश्चन गुलामांना ठेवतात तसेच राजाच्या किंवा खाजगी व्यक्तींच्या गुलामांनाही ठेवतात. त्याचप्रमाणे शहराची कामे करण्यासाठी जनतेच्या मालकीचे असणारे आल्मेझेन गुलामही तेथेच ठेवतात. हे आल्मेझेन लोक आपले स्वातंत्र्य अत्यंत कष्टाने मिळवितात. त्यांचा कोणी खास धनी नसतो. त्यांच्यावर मालकी जनतेची असते. ते खंडणी देऊ शकले, तरी ती घेऊन त्यांना स्वातंत्र्य देण्यास कोणी नसते. राजाच्या गुलामांची मुक्तता खंडणीने होते. इतरांप्रमाणे त्यांना बाहेर जाऊन काम करावे लागत नाही. त्यांची खंडणी लौकर आली नाही तर ती तत्काळ यावी म्हणून त्यांना काम करावयास लावतात—इतरांबरोबर लाकडे आणावयास लावतात- आणि ते काही कमी श्रमाचे काम नव्हे.

"ज्यांच्यासाठी खंडणी द्यावयाची त्यांच्यापैकीच मी एक होतो. कारण मी कप्तान होतो, हे त्यांना माहीत होते. मी त्यांना सांगितले होते, माझ्या गरिबीमुळे खंडणी देऊन मी मुक्त होणे अशक्य आहे. तरीसुद्धा त्यांनी मला खंडणीने मुक्त होणाऱ्या लोकांमध्ये ठेवले. त्याच हेतूने त्यांनी माझ्या अंगावर एक लहानशी साखळी ठेवली-केवळ खूण म्हणून, मला बांधण्यासाठी नव्हे. अशा प्रकारे त्या तुरुंगात खंडणीच्या आशेवर जगणाऱ्या इतर पुष्कळ लोकांबरोबर मी माझे आयुष्य कंठीत होतो. अन्न आणि वस्त्र यांच्या अभावामुळे आम्हाला पुष्कळ वेळा त्रास भोगावा लागला हे खरे; पण इतर ख्रिस्ती गुलामांना आमचा धनी ज्या बेफाम क्रौर्याने वागवीत असे, ते पाहून व ऐकून आम्हाला फार दुःख होई. तो एकदा कोणाला फासावर चढवी, कोणाला सुळावर चढवी तर कोणाचे कान कापी- आणि त्याला अगदी क्षुद्रही कारण पुरत असे. म्हणून तुर्क म्हणत की, तो असे क्रौर्य केवळ मजेखातर करतो. कारण तो मानवजातीचा उपजत वैरी आहे. त्याच्याशी कसे वागावे हे फक्त एका स्पॅनिश सैनिकाला कळले होते. त्याचे नाव सॅव्हेड्रा. तुर्की लोक सहजासहजी विसरणार नाहीत अशी पुष्कळ कृत्ये त्याने आपले स्वातंत्र्य मिळविण्यासाठी केली होती. तरीसुद्धा त्याच्या धन्याने त्याला कधी ठोसा लगावला

नाही की शब्दाने वा कृतीने त्याला वाईट रीतीने वागवले नाही. तथापि आम्हाला असे भय वाटे की, त्याच्या एखाद्या लहानशा खोडीमुळे तो सुळावर चढविला जाईल. खुद्द त्यालाही तसे भय वाटत असे. तुमचा फार वेळ मी जर घेत नसेन तर मी त्याच्या अशा काही गोष्टी तुम्हाला सांगेन की, माझी धाडसी कृत्ये ऐकण्यापेक्षा त्यामुळेच तुम्हा मंडळींचे अधिक मनोरंजन होईल आणि तुम्हाला अधिक आश्चर्य वाटेल. पण मी माझी कहाणी पुढे सांगतो.

"एका अत्यंत श्रीमंत मूर माणसाचे घर आमच्या तुरुंगाच्या जवळ होते आणि त्या घराच्या खिडक्यांतून आमच्या तुरुंगाचे अंगण दिसत होते. त्या देशातील पद्धतीप्रमाणे त्या खिडक्या म्हणजे केवळ झरोके होते आणि तरीही आतल्या बाजूस जाळ्या बसविलेल्या होत्या. एके दिवशी असे घडले की, आमच्या तुरुंगाच्या गच्चीवर मी फक्त तीन सोबत्यांसह बसलो होतो आणि आम्ही आपली शक्य ती करमणूक करून घेत होतो. बार्कोचे सारे ख्रिस्ती गुलाम कामावर गेलेले होते. तेव्हा वेड्या असताना आपल्यापैकी कोण लांब उडी मारू शकतो हे आम्ही पाहात होतो. माझे लक्ष त्या खिडक्यांकडे सहज गेले. एका खिडकीतून एक लांब वेत बाहेर आलेला दिसत होता आणि त्याला लोकरीच्या कापडाचा तुकडा बांधलेला होता. तो वेत खाली-वर हलविला जात होता. तो आमच्यापैकी कोणी पकडावा, अशी कोणाची अपेक्षा असावी. आम्ही सर्वांनी ते पाहिले. आमच्यापैकी एकजण तेथे जाऊन नेमका त्या वेता खाली उभा राहिला व तो वेत खाली येतो का हे पाहू लागला. पण तो तेथे जाताच तो वेत मागे घेण्यात आला आणि माणसे नकार देताना आपले डोके जसे इकडे-तिकडे हलवतात तसा तो वेत हालू लागला. ते पाहून तो माणूस परत आला. वेत पूर्वीप्रमाणे हालू लागला तेव्हा माझा दुसरा एक सोबती पुढे गेला. पण त्याची गत पहिल्यासारखीच झाली. तशीच तिसऱ्याचीही. ते पाहून मी आपले नशीब अजमावण्याचा निश्चय केला. मी त्या वेताखाली जाऊन उभा राहतो न राहतो तोच तो वेत माझ्या पायापाशी पडला. चटकन मी त्याला बांधलेला लोकरीचा तुकडा सोडविला, त्याच्या आत एक पुरचुंडी होती. ती उघडल्यावर आम्हाला दहा झियानिन आढळले, मूर लोकांचे ते संमिश्र सोन्याचे नाणे होते. त्या प्रत्येक नाण्याची किंमत आपल्या दोन क्राउनइतकी होती.

"त्या नाण्यांचा शोध लागल्यामुळे आम्हाला आनंद झाला की विस्मय अधिक वाटला हे विचारू नका. आम्ही—त्यातही मी—आश्चर्य करीत राहिलो. हे भाग्य आपल्याला-विशेषतः मला—कसे लाभले याचा तर्क काही आम्हाला करता येईना. माझ्या कोणाही सोबत्यापेक्षा माझ्या वाट्यास ते भाग्य आले हे उघड आहे. ती वेताची काठी इतरांकडे न जाता माझ्याकडेच आली होती. मी माझे पैसे घेतले आणि तो वेत मोडून टाकला. मी गच्चीवर गेलो. तेव्हा मला आढळले की, एक पांढराशुभ्र हात घाईघाईने ती खिडकी उघडीत व लावीत आहे. त्यावरून आम्ही असा तर्क केला की, त्या घरात राहणाऱ्या कोणा स्त्रीने आपल्यावर ही कृपा केली असावी. तिचे आभार मानण्यासाठी आम्ही, मूर

लोकांच्या पद्धतीप्रमाणे, आपल्या छातीवर हात घेऊन, तिला अभिवादन केले. थोड्या वेळाने त्याच खिडकीतून वेताचा एक छोटा क्रॉस बाहेर आला पण लगेच तो आत ओढला गेला. त्यावरून आमची खात्री झाली की, त्या घरात कोणी खिरस्ती स्त्री गुलाम म्हणून राहात असेल आणि तिने आमच्यावर दया केली असेल. पण तिचा हात पांढरा-शुभ्र होता आणि तिच्या हातातील ज्या बांगड्या आम्हाला ओझरत्या दिसल्या होत्या, त्या मोठ्या मोलाच्या होत्या. त्यामुळे आमचा तो तर्क उद्ध्वस्त झाला. मग आम्ही असे अनुमान केले की, कोणा खिरस्ती स्त्रीला बाटवून मुसलमान करण्यात आले असेल. अशा स्त्रियांशी त्यांचे धनी कैक वेळा लग्न करतात आणि स्वतःला मोठे सुखी समजतात. कारण, ते स्वदेशातील स्त्रियांपेक्षा आपल्या स्त्रियांना अधिक मोलाच्या मानतात. तथापि या आमच्या साऱ्या तर्क–वितर्कांमध्ये आम्ही सत्यापासून फार दूर होतो. ती खिडकी म्हणजे आमचा उत्तरध्रुव तारा बनली होती आणि तिच्याकडे आम्ही अत्यंत दक्षतेने लक्ष देत होतो. पंधरा दिवस लोटले तरी आम्हाला तो हात किंवा तो वेत किंवा दुसरी काही खूण मुळीच दिसली नाही. त्या काळात आम्ही, त्या घरात कोण राहते ?–पळून आलेली एखादी खिरस्ती स्त्री राहते काय ? हे शोधण्याचा प्रयत्न करीत होतो. पण आमच्या साऱ्या प्रयत्नांतून निष्पन्न एवढेच झाले की, ते घर एका प्रमुख आणि अत्यंत श्रीमंत मूर माणसाचे आहे आणि त्याचे नाव ॲगिमोरॅटो असे आहे. तो पॅटाचा अल्केड होता. त्या अधिकाराला त्या लोकांमध्ये मोठा मान असे. तसा सुवर्ण–वर्षाव पुनः होईल अशी आम्हाला मुळीच आशा नव्हती; पण एके दिवशी एकाएकी त्या खिडकीतून तो वेत आणि त्याला बांधलेला लोकरीचा तुकडा आम्हाला पुनः दिसला. त्या लोकरीच्या आत पूर्वीपेक्षा मोठी पुरचुंडी होती. यावेळी त्या घरात दुसरे कोणीही गुलाम नव्हते. पूर्वी-प्रमाणेच आम्ही आमचे नशीब अजमावून पाहिले–आणि पूर्वीप्रमाणेच सारे घडले. तो वेत माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाकडे गेला नाही. मी ती पुरचुंडी सोडली, तेव्हा मला तिच्यात सोन्याचे चाळीस स्पॅनिश क्राऊन आढळले आणि अरबी भाषेत लिहिलेला एक कागदही आढळला. त्या कागदाच्या माथ्यावर एक मोठा क्रॉस काढलेला होता. मी त्या क्रॉसचे चुंबन घेतले आणि ती सोन्याची नाणी घेऊन गच्चीकडे परत आलो. आम्ही सर्वांनी मूर पद्धतीने अभिवादन केले. पुनः तो हात दिसू लागला. मी तो कागद वाचीन अशा अर्थाच्या खुणा मी केल्या, तेव्हा ती खिडकी बंद झाली.

"आम्हा सर्वांना परम हर्ष झाला. त्या घटनेमुळे आम्ही चकित झालो. त्या कागदावर काय लिहिले आहे, हे जाणण्यास आम्ही अत्यंत अधीर झालो. पण आमच्या-पैकी कोणालाच अरबी भाषा येत नव्हती. योग्य दुभाष्या मिळविणे फार कठीण होते. शेवटी मी ठरविले की, मर्सीयाहून पळून आलेल्या देशद्रोही फितुर माणसाची मदत घ्यावयाची. तो दयाळू असल्याची पुष्कळ उदाहरणे मी पाहिली होती. आम्ही परस्परांना आश्वासने दिली. मी जे त्याला उघड करून सांगेन ते त्याने गुप्त ठेवले पाहिजे असे ठरले. ज्या गुलामांना स्वदेशी परत जाण्याची इच्छा असेल, त्यांना बार्बेरी येथील वरच्या

दर्जाच्या गुलामांकडून प्रमाणपत्र मिळवावे लागे. ते असे प्रतिज्ञापूर्वक लिहून देत की, 'हा फितुर गुलाम प्रामाणिक आहे आणि खिरस्ती लोकांशी नेहमी प्रेमाने वागणारा आहे, आणि पहिल्याच क्षणी येथून सुटका करून घेण्याचा त्याचा विचार आहे.' अशी प्रमाणपत्रे प्रामाणिक उद्देशाने मिळविणारे काही लोक असतात आणि ते जिवंत असतात तोपर्यंत खिस्ती लोकांत राहतात. पण दुसरे काही लोक असे असतात की, ते जेव्हा खिरस्ती राष्ट्रांच्या समुद्रावर चाचेगिरी करतात, तेव्हा उपयोग व्हावा म्हणून अशी प्रमाणपत्रे ते मिळवितात. त्यांचे जहाज फुटले किंवा ते कैद झाले तर ते अशी प्रमाणपत्रे दाखवून म्हणतात," आम्ही तुर्कांच्या वस्तीत कोणत्या उद्देशाने आलो ते या प्रमाणपत्रावरून पाहा. आम्हाला खिश्चन धर्मात परत येण्याची संधी पाहिजे आहे." या युक्तीने ते खिस्ती लोकांच्या क्रोधाचा पहिला हल्ला टाळू शकतात आणि कोणताही अपाय न होता खिरस्ती धर्मात सामावल्यासारखे दिसतात. त्यानंतर योग्य वेळ येताच ते बार्बेरीला परत जातात आणि पूर्वीप्रमाणे वागू लागतात.

"अशा पळपुट्या लोकांपैकी एकजण माझा मित्र होता. आम्हा सर्वांकडून त्याने प्रमाणपत्रे मिळविली होती. त्यात आम्ही त्याची खूप प्रशंसा केलेली होती; पण जर मूर लोकांनी त्याला त्या कागदासह पकडले असते, तर त्यानी त्याला जिवंत जाळले असते. त्याला अरबी भाषा समजत होती, एवढेच नव्हे तर तो ती बोलू-लिहू शकत होता, हे मला माहीत होते. पण त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवण्यापूर्वी मी मला योगायोगाने मिळालेला तो कागद मला वाचून दाखविण्यास त्याला सांगितले. त्याने तो कागद उलगडला आणि बराच वेळ त्याकडे तो पाहात राहिला आणि आपल्या मनाशी त्याच अर्थ लावीत राहिला. मी त्याला विचारले, 'कागदावरील मजकूर तुला कळतो काय?' तो म्हणाला, "होय, अगदी छान समजतो. तुम्ही मला जर कागद, लेखणी व शाई दिली, तर त्याचे शब्दशः भाषांतर करून देईन." त्याने मागितलेल्या वस्तू आम्ही त्याला दिल्या आणि तो आपले काम करू लागला. भाषांतराचे काम पूर्ण झाल्यावर तो म्हणाला, "येथे मी जर काही केले असेल तर ते इतकेच की, शब्दाला शब्द ठेवून अरबी भाषेतील मजकूर स्पॅनिश भाषेत आणला. फक्त एक लक्षात ठेवा की, जेथे या कागदावर लेला मेरियन असे असेल तेथे त्याचा अर्थ 'कुमारी मेरी' असा आहे." कागदावरील मजकूर असा होता—

"मी जेव्हा लहान होते, तेव्हा माझ्या बापाजवळ एक स्त्री गुलाम होती. ती माझ्या भाषेत मला खिरस्ती धर्माची पूजा शिकवीत असे. तिने मला लेला मेरियनसंबंधी पुष्कळ गोष्टी सांगितल्या होत्या. ती खिस्ती स्त्री–गुलाम मेली, पण ती नरकाच्या अग्नीत गेली नसेल अशी मला खात्री वाटते– अल्लाजवळच असेल. कारण नंतर दोनदा मी तिला पाहिले आहे. तेव्हा तिने मला सांगितले होते, 'लेला मेरियनला तुझ्याविषयी फार प्रेम वाटते. तिला पाहण्यासाठी तू खिरस्ती लोकांच्या प्रदेशात जा.' हे काय आहे हे मला माहीत नाही. या खिडकीतून मी पुष्कळ खिश्चनांना पाहिले आहे, पण तुझ्या-

इतका सभ्य माणूस दुसरा कोणी मला दिसला नाही. मी अत्यंत देखणी आहे – तरुण आहे– आणि मी पुष्कळ पैसा–अडका आणि संपत्ती घेऊन बाहेर जाऊ शकेन. आपण दोघांनी मिळून येथून पळ काढण्याची योजना तू सिद्धीस नेऊ शकशील काय ? याचा विचार कर. तसे झाले तर – आणि तुझी इच्छा असेल तर – तुझ्याच देशात तू माझा नवरा होशील. पण तुझी इच्छा नसली तरी हरकत नाही. लेला मेरियन मला नवरा पाहून देईल. हे पत्र मी स्वतः लिहिले आहे. ते वाचण्यासाठी कोणाला द्यावयाचे याचा काळजीपूर्वक विचार कर. कोणाही मूर माणसाचा विश्वास धरू नकोस, कारण ते सारे दगाबाज असतात. या बाबतीत माझा फार गोंधळ उडाला आहे. कोणावरच विश्वास टाकण्याची पाळी येऊ नये अशी माझी इच्छा आहे. माझ्या बापाला हा सारा प्रकार कळला तर तो मला खचित विहिरीत लोटील आणि दगडा-धोंड्यांनी मला झाकून टाकील. मी वेताला एक दोरा बांधीन. त्याने तू आपले उत्तर वेताला बांधून टाक. अरबी भाषेत तुझे उत्तर लिहिण्यास तुला कोणी सापडला नाही, तर तुझ्या मनातील आशय तू मला खुणांनी समजावून सांग. त्या खुणांचा अर्थ लावण्यास लेला मेरियन मला मदत करील. ती आणि अल्ला आणि तसाच हा क्रॉस तुझे संरक्षण करो. त्या ख्रिश्चन गुलाम-स्त्रीने सांगितल्याप्रमाणे मी या क्रॉसचे चुंबन वारंवार घेत असते.'

"सद्गृहस्थहो, त्या पत्रातील मजकूर वाचून आम्हाला किती आश्चर्य वाटले असेल आणि किती हर्ष झाला असेल याची कल्पना तुम्ही करू शकाल. आम्ही आमचे आश्चर्य आणि हर्ष उघडपणे व्यक्त केले. ते पत्र सहजगत्या सापडले नसेल पण आमच्या-पैकीच कोणी तरी ते खरोखर लिहिलेले असेल, असे त्या फितुर माणसाने ओळखले आणि त्याने आपला संशय आम्हास बोलून दाखविला. तो म्हणाला, "तुम्ही माझ्यावर पुरा विश्वास ठेवा. तुम्हाला आपले स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठी मी माझे प्राण धोक्यात घालीन." असे म्हणून त्याने आपल्या छातीपासून एक पितळेचा क्रूस बाहेर काढला. ईश्वराचे प्रतीक असलेल्या त्या क्रॉसची शपथ घेऊन अश्रू ढाळीत ढाळीत तो म्हणाला 'मी एक दुष्ट पापी आहे, तरीही ईश्वरावर माझी दृढ श्रद्धा आहे. तुम्ही मला जे जे काही सांगितले, ते ते गुप्त राखण्याची मी शपथ घेतो. तुमच्याशी मी खरेपणाने आणि इमानाने वागेन.' त्याने असा अंदाज केला होता की, ते पत्र लिहिणाऱ्या स्त्रीच्या मदतीने आम्ही सर्वजण आपले गमाविलेले स्वातंत्र्य परत मिळवू. विशेषतः आपण पुष्कळ दिवस इच्छा केल्याप्रमाणे, आपल्या धर्ममातेच्या वक्ष:स्थळावर पुन्हा लोळू लागू, अशी त्याला आशा वाटत होती. त्याच्या पापामुळे त्या धर्ममातेपासून, एखाद्या सडक्या अवयवाप्रमाणे, तो तोडला गेला होता. हे सारे त्याने डोळ्यांत अश्रू आणून मोठ-मोठ्याने सांगितले आणि पश्चात्ताप वाटत असल्याचे आविर्भाव केले. म्हणून आम्ही सर्वांनी त्याच्यावर विश्वास ठेवण्याचे आणि सर्व सत्य घटना त्याला सांगण्याचे ठरविले. ज्या छोट्या खिडकीतून तो वेत बाहेर येत होता, ती त्याला आम्ही दाखविली. तेथून त्याने त्या घराकडे बारीक नजरेने पाहिले आणि त्यात कोण राहात आहे याची माहिती

मिळविण्यास सुरुवात केली. नंतर त्या मूर स्त्रीच्या पत्राला उत्तर देणे अवश्य आहे, असे आम्हा सर्वांचे मत पडले. म्हणून मी लगेच उत्तर सांगितले आणि त्या बाटग्या माणसाने ते लिहून घेतले— मी जसे सांगितले तसेच त्याने लिहून घेतले. या धाडसी प्रसंगातील बारीकसारीक गोष्टही मी विसरलेलो नाही– आणि मी जिवंत आहे तोपर्यंत विसरू शकणार नाही. उत्तरातील मजकूर असा होता :—

"प्रिय बाईसाहेब, सच्चा अल्ला तुझे आणि त्या भाग्यवान कुमारीचे रक्षण करो. ती कुमारी ही ईश्वराची खरी माता होय. तिनेच तुला ख्रिस्ती लोकांच्या प्रदेशात जाण्याची प्रेरणा दिली आहे. तिने तुला जी आज्ञा केली आहे, ती तू अमलात कशी आणावीस, याचे ज्ञान तिने आपल्याला कृपया द्यावे अशी तू तिची प्रार्थना कर. माझ्या वतीने-आणि माझ्याबरोबर असलेल्या ख्रिश्चनांच्या वतीने-मी सांगतो की, तुझ्यासाठी आम्ही शक्य ते सर्व काही करू–आमचे प्राणही धोक्यात घालू. मला उत्तर लिहिण्यास चुकू नकोस. तुझा जो निश्चय ठरेल तो मला कळव. मी तुला नेहमी उत्तर देईन. त्या महान अल्लाने आम्हाला एक ख्रिश्चन गुलाम दिला आहे. तो तुझी भाषा वाचू–लिहू शकतो. या पत्रावरून ते तुला कळेलच. म्हणून तू कोणतीही भीती न बाळगता तुझ्या योजनांची कल्पना आम्हाला दे. ख्रिस्त–भूमीत येताक्षणीच तू माझी पत्नी होण्याची इच्छा करतेस असे तू लिहिले आहेस. त्याबद्दल एका सज्जन ख्रिश्चनाचे वचन म्हणून मी तुला सांगतो की, मी तुझा पत्नी म्हणून स्वीकार करीन. मूर लोकांपेक्षा ख्रिश्चन लोक आपल्या वचनांची पूर्तता चांगली करतात, असे आश्वासन मी तुला देतो. हे माझ्या प्रिय स्त्रिये, अल्ला आणि त्याची माता मेरी हे तुझे रक्षण करोत.'

"हे पत्र लिहून बंद केल्यानंतर मी दोन दिवस थांबलो. पुढे तो तुरुंग मोकळा झाल्यावर मी, तो वेत दिसतो काय हे पाहण्यासाठी, आमच्या संकेत–भूमीवर–म्हणजे गच्चीवर– गेलो. आणि काय सांगावे ! थोड्याच वेळात माझे हृदय थरारले. तो वेत मला दिसू लागला. लगेच मी माझे पत्र दाखविले. हेतु हा की, वेताला दोरा बांधला जावा. पण मला आढळले की, ते तसे आधीच केलेले आहे. नंतर तो वेत खाली आला आणि मी माझे पत्र त्याला बांधून टाकले. नंतर पुरचुंडी खाली पडताच मी ती उचलून घेतली, तेव्हा मला तिच्यात सोन्या–चांदीची नाणी–पन्नास क्राऊनांपेक्षा अधिक–दिसली. त्यामुळे आम्हा सर्वांना अपार संतोष झाला आणि अखेरीस आम्ही आमचे स्वातंत्र्य मिळविणार अशी आमची आशा दृढ झाली. त्या दिवशी संध्याकाळी, तो फितुर आमच्याकडे आला आणि आम्हाला सांगू लागला, "या घराचा मालक ॲगीमोरॅटो हाच आहे आणि तो अत्यंत श्रीमंत असून त्याच्या सर्व जिंदगीला वारस असणारी एकुलती एक मुलगी त्याला आहे, असे मला कळले आहे. साऱ्या बार्बेरीमध्ये ती अत्यंत लावण्यसंपन्न कुमारिका आहे आणि कैक बादशहांनी आणि राजपुरुषांनी तिला लग्नासाठी मागणी घातली आहे. पण तिने सर्वांना नकार दिला आहे, असे साऱ्या शहरात बोलले जाते. तिच्याजवळ एक ख्रिश्चन गुलाम स्त्री होती. पण ती आता मेलेली आहे, असेही मला कळले आहे." हे

त्याचे सारे बोलणे तिच्या पत्रातील मजकुराशी जुळत होते. आम्ही सर्वांनी त्या फितुराशी तत्काळ वाटाघाट केली. त्या मूर महिलेला येथून कसे पळवून न्यावे आणि सर्वांनी खिस्त–भूमीकडे कसे जावे, याची चर्चा आम्ही केली. शेवटी झोरेडाचे (त्या स्त्रीचे हे नाव, आता मेरी म्हणून आपण ओळखले जावे, अशी तिची इच्छा आहे.) उत्तर येईपर्यंत वाट पाहण्याचे आम्ही ठरविले. आमच्या मार्गात ज्या अडचणी आहेत, त्या सर्वांवर मात कशी करावी, हे तीच चांगल्या प्रकारे सांगू शकेल असे आम्हाला वाटले. हा निश्चय झाल्यानंतर त्या फितुराने आम्हाला पुनः आश्वासन दिले की, मी तुम्हाला या बंधनातून मुक्त करीन, नाही तर मी माझे प्राण देईन.

तो तुरुंग चार दिवस माणसांनी गजबजून गेला. त्या चार दिवसांत तो वेत अदृश्य होता. पण तो तुरुंग पूर्वीप्रमाणे निर्जन होताक्षणीच तो वेत पुनः दिसू लागला आणि नेहमीपेक्षा मोठी पुरचुंडी त्याच्याबरोबर खाली आली. ती सोडल्यावर मला तिच्यात एक पत्र आणि सोन्याचे शंभर क्राऊन आढळले. त्या दिवशी तो फितुर आमच्याजवळ होता. आम्ही त्याला ते पत्र वाचण्यास दिले. त्यात पुढील शब्द होते असे तो म्हणाला:—

“ महाराज, आपण सर्वांनी मिळून स्पेनला कसे जावे हे मला सांगता येत नाही. लेला मेरियन हिनेही मला ते सांगितले नाही. मी तिला ते मोठ्या तळमळीने विचारले होते. आता मी एवढेच करू शकते की, या खिडकीतून मी तुम्हाला पुष्कळ संपत्ती देईन. तिच्यातून तुम्ही आपल्यासाठी आणि आपल्या मित्रासाठी खंडणी द्यावी. तुमच्या-पैकी एकाने स्पेनला जावे आणि तेथे एक लहानशी होडी विकत घ्यावी. त्या होडीतून त्याने सर्वांना स्पेनला घेऊन जावे. माझ्यासंबंधी म्हणाल तर, या शहराबाहेर माझ्या पित्याच्या उद्यानात मी तुम्हाला सापडेन. हे उद्यान समुद्रकाठावर असून बॅबसोच्या वेशीजवळच आहे. त्या उद्यानात हा सारा उन्हाळा मला माझ्या पित्यासह आणि माझ्या दासीसह घालवायचा आहे. तेथून तुम्ही मला रात्रीच्या वेळी निःशंकपणे घेऊन जाऊ शकाल आणि तुमच्या होडीपाशी मला पोचवाल. पण ध्यानात धरा, तुम्ही माझे पती होणार आहा. तसे करण्यास तुम्ही चुकला तर लेला मेरियनने तुम्हाला शासन करावे अशी इच्छा मी धरीन. तुमच्या मित्रांपैकी कोणी होडी विकत आणील यावर तुमचा विश्वास नसेल, तर तुम्ही स्वतःची खंडणी द्या आणि स्वतःच स्पेनला जा. तुम्ही सद्गृहस्थ आहां––ख्रिश्चन आहा, म्हणून तुम्ही दुसऱ्या कोणाहीपेक्षा लवकर परत याल असा मला विश्वास वाटतो. माझ्या पित्याचे उद्यान कोठे आहे, हे तुम्ही शोधून काढा. हा तुरुंग मोकळा केव्हा होतो हे पाहण्याची काळजी मी घेईन आणि तुम्हाला आणखी पैसे देईन. अल्ला माझ्या प्रिय स्वामीचे रक्षण करो! ”

“ आम्हाला मिळालेल्या दुसऱ्या पत्राचा आशय हा होता. ते वाचल्यानंतर आमच्यापैकी प्रत्येकजण म्हणाला, ‘ मी जातो आणि होडी विकत आणतो आणि अगदी वेळेवर परत येतो. ’ पण त्या फितुराने या सूचनेला विरोध केला आणि तो म्हणाला, ‘ इतरांच्या आधी एकाने आपले स्वातंत्र्य मिळवावे, हे मला

मुळीच मान्य नाही. कारण अनुभवाने मी असे शिकलो आहे की, माणसे एकदा स्वतंत्र झाली म्हणजे कैदेत दिलेली वचने ती कधीच पाळीत नाहीत. काही गुणी गुलामांनी हा प्रयोग करून पाहिला होता. व्हॅलेन्शिया किंवा मॅजोर्का येथे एकाला होडी आणण्यासाठी पैसे देऊन पाठवायचे आणि त्याने इतरांच्या मुक्ततेसाठी परत यावयाचे असे ठरले होते. पण गेलेला माणूस परत कधीच आला नाही. आपले स्वातंत्र्य मिळाल्याच्या आनंदामुळे आणि ते पुनः गमावण्याच्या भयामुळे त्यांना आपल्या वचनांचा विसर पडला आणि आपल्यावरील साऱ्या जबाबदाऱ्यांची जाणीव नष्ट झाली.' आपल्या या विधानाला पुष्टी देण्यासाठी त्याने आम्हाला प्रत्यक्ष घडलेली एक विलक्षण गोष्ट सांगितली. गुलामांमध्ये अशा गोष्टी नेहमी घडतात. नंतर तो म्हणाला,' आता एवढेच करता येईल की, पैसे देऊन तुमच्यापैकी एकाची मुक्तता करावयाची, त्याने अल्जिर्समध्ये एक होडी खरेदी करावयाची आणि आपण व्यापारी असल्याचे सोंग घेऊन अल्जिर्स व टेटुआन यामध्ये व्यापार करावयाचा. तो आपल्या होडीचा मालक असल्यामुळे तुम्हा सर्वांना या तुरुंगातून काढून आपल्या होडीवर कसे न्यावे, याचा मार्ग त्याला सहज सापडेल. या मूर महिलेने आपल्या वचनाप्रमाणे भरपूर पैसा दिला आणि त्यातून आपण आपली खंडणी भरली तर आपण आज दुपारीच येथून कूच करू शकू. पण यात मोठी अडचण ही आहे की, फितुर लोकांना होड्या बाळगण्यास मूर लोक परवानगी देत नाहीत--ख्रिश्चन लोकांवर हल्ला करण्यासाठी मोठी जहाजे मात्र ठेवू देतात. कारण मूर लोकांना वाटते, फितुर लोक–विशेषतः स्पॅनिश लोक–स्वदेशी परत जाण्यासाठीच होडी विकत घेतात – दुसऱ्या कशासाठीही नाही. पण ही अडचण नाहीशी कशी करावी हे मला माहीत आहे. होडी आणि व्यापार या दोहोत एखादा टॅगारिन मूर भागीदार म्हणून घ्यावा म्हणजे तो त्या होडीचा मालक होईल आणि मग बाकीच्या साऱ्या गोष्टी सुरळीतपणे पार पडतील."

"या मताला विरोध करण्याचे धैर्य आम्हाला झाले नाही. त्या महिलेने उपदेशिल्याप्रमाणे होडीसाठी स्पेनला जाण्याचे आमच्यापैकी प्रत्येकाच्या मनात होते. पण आम्हाला असे भय वाटत होते की, आम्ही त्या फितुराला विरोध केला तर तो आमचा विश्वासघात करील आणि आमचे प्राण धोक्यात आणील. आम्ही त्याच्या कृपेवर जगत होतो. झोरेडाच्या स्वातंत्र्यासाठी आणि प्राणासाठी आम्ही सर्वांनी आमचे जीव दिले असते. पण तिचे सारे प्रकरण या फितुराने उघडकीस आणले तर काय घ्या ? त्याच वेळी आम्ही झोरेडाला उत्तर पाठविले की, 'तुझ्या उपदेशाप्रमाणे आम्ही वागू. तुझा सल्ला फार चांगला आहे – जणू काही लेला मेरियननेच तुझ्या कानात तो सांगितला आहे. आता ही योजना सिद्धीस जाण्याचे साधन पुरविणे हे केवळ तुझ्यावरच अवलंबून आहे. मी तुझा पति होण्याचे वचन पुनः देतो ' यानंतर दोन दिवसानी तो तुरुंग मोकळा झाला. तेव्हा तिने वेताच्या साहाय्याने सोन्याचे दोन हजार क्राऊन आम्हाला दिले. त्याबरोबरच दिलेल्या पत्रात तिने लिहिले होते, 'येत्या शुक्रवारी – जुम्माच्या

दिवशी — मी आपल्या बापाच्या बागेत जाणार आहे. जाण्यापूर्वी मी तुम्हाला आणखी पैसे देईन. ते तुम्हाला पुरेसे वाटले नाहीत तर तुम्ही मला तसे कळवा, म्हणजे तुम्हाला पुरेसे वाटतील इतके पैसे मी देईन. माझे वडील इतके श्रीमंत आहेत की, इतके पैसे गेल्याचे त्यांच्या लक्षात येणार नाही. शिवाय त्यांनी आपल्या भांडाराच्या सान्या किल्ल्या माझ्याजवळ ठेवलेल्या आहेत."

"आम्ही त्या फितुराला होडी विकत घेण्यासाठी पाचशे क्राऊन तत्काळ दिले. त्याचप्रमाणे माझ्या मुक्ततेसाठी खंडणी म्हणून आठशे क्राऊन मी व्हॅलेन्शियाच्या व्यापाऱ्याचे हाती दिले. तो त्यावेळी अल्जिर्समध्ये होता. त्याने राजाशी सौदा पटविला आणि मला पॅरोलवर सोडवून आपल्या घरी नेले. व्हॅलेन्शियाहून येणाऱ्या पहिल्या होडीतून जे पैसे येतील, त्यातून मी खंडणी भरीन, असे त्याने राजाला सांगितले. त्याने जर पैसे तत्काळ दिले असते तर राजाला संशय आला असता की, रक्कम तयार होती आणि अल्जिर्समध्ये काही काळ पडून होती व या व्यापाऱ्याने आपल्या फायद्यासाठी ती दडवून ठेवली होती. सारांश, रोख रक्कम देण्याइतका विश्वास मी माझ्या धन्यावर ठेवू शकलो नाही. कारण त्याचा स्वभाव अविश्वासू आणि मत्सरी होता. झोरेडा ज्या शुक्रवारी उद्यानात जाणार होती, त्याच्या आधीच्या गुरुवारी तिने आम्हाला आणखी एक हजार क्राऊन दिले. मी माझी खंडणी भरली तर तिच्या पित्याच्या उद्यानात जाऊन तिची भेट घेण्याची काही योजना करावी अशीही तिची इच्छा होती. मी मोजक्या शब्दांनी उत्तर दिले, 'तुझ्या इच्छेप्रमाणे मी करीन. तू फक्त ख्रिस्ती गुलाम स्त्रीने शिकविल्याप्रमाणे लेला मेरियनची प्रार्थना कर आणि आमच्यावर कृपा करण्याची तिला विनवणी कर.' हे झाल्यावर माझ्या तीन मित्रांचीही खंडणी भरण्याचे आम्ही ठरविले. नाही तर मी बंधमुक्त झालो आणि ते झाले नाहीत — पैसे असूनही झाले नाहीत — तर त्यांचे मन क्षुब्ध होईल आणि सैतानी मोहाला शरण जाईल व झोरेडाच्या द्वेषाला कारणीभूत होणारे काही कृत्य ते करील. ते गुणवान असल्यामुळे आपल्या प्रतिष्ठेला जपतील, असे मला वाटत होते तरी या प्रकरणी अणुमात्र धोका पत्करणे मला योग्य वाटले नाही. म्हणून मी ज्या पद्धतीने त्या व्यापाऱ्याकडून मुक्त झालो, त्याच रीतीने तेही मुक्त झाले. आम्ही त्या व्यापाऱ्याला आधी पैसे दिले, पण आमच्या कारस्थानाचा बाकीचा भाग आम्ही त्याला मुळीच सांगितला नाही. तो सांगण्यात जो धोका होता, तो पत्करण्यास आम्ही तयार नव्हतो."



## प्रकरण १४

# बंदीवानाची साहस-कथा ( पुढे चालू )

" एका पंधरावड्याचे आत त्या फितुर माणसाने एक उत्तम होडी खरेदी करून आणली. तिच्यातून तिसाहून अधिक माणसे जाण्यासारखी होती. आपला दुसरा काही उद्देश असल्याचा संशय येऊ नये म्हणून त्याने सार्गेलकडे सफर करण्याचे ठरविले. अल्जीर्सच्या पूर्वेकडील सुमारे शंभर मैलांवर, ओरान्च्या बाजूस, हे बंदर आहे. तेथे सुक्या अंजीराचा मोठा व्यापार चालतो. आपला भागीदार टॅगॅरिन मूर यांच्याबरोबर त्याने ही सफर दोन-तीनदा केली. अरॅगॉनहून हाकून दिलेल्या मूर लोकांना बार्बेरीमध्ये 'टॅगॅरिन' म्हणतात. ग्रॅनाडाच्या लोकांना जसे मुडाजेरस म्हणतात, तसेच हे आहे. टॅगॅरिन लोकांना फेझच्या राज्यात एल्वेस म्हणतात. राजाजवळील ते उत्तम सैनिक होत.

" जेव्हा जेव्हा तो आपल्या होडीतून किनाऱ्याने जात असे, तेव्हा तो एका लहानशा खाडीत नांगर टाकत असे. झोरेडाने आम्हाला ज्या उद्यानात भेटण्यास सांगितले होते, त्यापासून हाकेच्या अंतरावर ही खाडी होती. तेथे तो वल्ही मारणाऱ्या मूर लोकांबरोबर खेळ खेळत असे; त्यांच्यामध्ये सणावाराचे दिवशी सॅला नावाचा जो खेळ खेळतात, तो किंवा तसाच दुसरा एखादा खेळ तो खेळत असे. त्याला खरोखर जे कार्य करावयाचे होते, त्याची जणू ही रंगीत तालीमच होती. म्हणून तो काही काही वेळा झोरेडाच्या बागेत जाऊन काही फळे मागे-आणि तिचा बाप त्याला ती देई. मात्र त्याला हा कोण आहे हे माहीत नव्हते. त्याच्या मनात होते की, आपल्याला झोरेडाशी बोलण्याची संधी मिळावी म्हणजे आपण तिला सांगू ' या बंदीवानाच्या आदेशाप्रमाणे मी तुला ख्रिस्तभूमीस नेणार आहे. यावर विश्वास ठेव. ' हे त्यानेच मला पुढे सांगितले. पण त्याला तशी संधी मिळाली नाही. कारण मूर किंवा तुर्की स्त्रिया आपल्या पतीशिवाय स्वदेशातील दुसऱ्या कोणाच्याही नजरेस पडत नाहीत, आपल्या पतीने किंवा पित्याने वा सासऱ्याने सांगितले तरच त्या दुसऱ्याच्या दृष्टीस पडतात. पण ख्रिश्चन गुलाम आपल्या स्त्रिया इतरांच्या नजरेस पडू देतात-आपल्या इच्छेपेक्षाही अधिक सलगीने त्या दर्शन देतात. त्या फितुराने झोरेडाला पाहिले असते किंवा तिच्याशी त्याने बातचीत केली असती, तर मला फार दुःख वाटले असते. आपले प्रकरण एका फितुराकडे सोपविले आहे हे पाहून तिला अपार दुःख झाले असते. पण सर्वशक्तिमान परमेश्वर हा आपल्या कर्माचा नियंता असतो. त्याने असे घडवून आणले की, त्यामुळे त्या फितुराची निराशा

झाली. मध्यंतरी कोणाला संशय न येता पूर्ण निर्धास्तपणे तो किनाऱ्यावरून ये–जा करीत होता आणि वाटेत इच्छेस येईल तेथे व तेव्हा थांबत होता. त्याचा भागीदार टॅगॅरिन मूर याचे आणि त्याचे सर्व बाबतीत एकमत होते; मला पूर्ण स्वातंत्र्य होते. होडी वल्ह-विण्यासाठी आम्हाला काही ख्रिश्चनांची तेवढी गरज होती. खंडणी देऊन ज्यांची सुटका झाली होती, त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणास न्यावे हे ठरविण्यास त्याने मला सांगितले, पहिल्या शुक्रवारपर्यंत मी त्यांची नावे पक्की करावीत असेही त्याने मला सांगितले. कारण त्याने आपल्या प्रयाणाचा तो दिवस मुक्रर केलेला होता.

" त्याच्या या निश्चयाची सूचना मिळताच मी उत्तम वल्हविणाऱ्या बारा धडधाकट स्पॅनिश नावाड्यांशी बोललो. आम्हाला ते शहराबाहेर सहज नेऊ शकले असते. त्या प्रसंगी आम्हाला इतके नावाडी मिळाले, हे आमचे मोठे भाग्यच होय. कारण त्याच वेळी विसाहून अधिक चांच्याची गलबते बाहेर गेलेली होती आणि वल्हवू शकणारे बहुतेक सगळे गुलाम त्यांनी आपल्या बरोबर नेले होते. आम्ही हे बारा नावाडी स्वतः मिळविले नाहीत. पण असे घडून आले की, त्या उन्हाळ्यात त्यांचा धनी एका जहाजाचे बांधकाम पुरे करण्यासाठी घरी राहिला होता आणि जहाजाला लागणारा लाकूडफाटा पाहात होता. मी त्या बारा नावाड्यांना इतकेच म्हटले की, पुढील शुक्रवारी संध्याकाळी तुम्ही शहरातून गुपचूप बाहेर या आणि ॲगिमोरॅटोच्या बागेकडे जाणाऱ्या रस्त्यावर माझी वाट पाहा. मी त्यांच्यापैकी प्रत्येकाशी बोललो आणि प्रत्येकाला ताकीद दिली की, माझ्यासाठी आपण वाट पाहात आहो, यापलीकडे तुम्हाला भेटणाऱ्या कोणाही ख्रिश्च-नाशी काही बोलू नका. हे केल्यावर मला दुसरी अत्यंत महत्त्वाची गोष्ट करावयाची होती—आणि ती म्हणजे आमची योजना झोरेडाला समजावून देणे आणि आम्ही ती योजना कितपत पार पाडली आहे हे सांगणे. तसे झाले म्हणजे थोड्याशा सूचनेने ती तयार राहील आणि ख्रिश्चनांची होडी आपल्या घराजवळ येऊ शकेल, असे तिला वाटण्यापूर्वीच आम्ही तिच्या घरापाशी अकस्मात आलो तरी तिला आश्चर्य वाटणार नाही. या योजनेप्रमाणे मी त्या उद्यानात जाण्याचा आणि तिच्याशी बोलता येणे शक्य आहे का हे पाहण्याचा निश्चय केला. आणि एके दिवशी काही वनस्पती गोळा करण्याच्या मिषाने मी त्या उद्यानात शिरलो. तेथे मला प्रथम भेटणारा माणूस म्हणजे तिचा पिता. तो माझ्याशी ज्या भाषेत बोलला, ती भाषा साऱ्या तुर्की प्रदेशात बोलली जाते. साऱ्या ख्रिश्चन आणि मूर भाषांचे ते मिश्रण आहे. त्या भाषेमुळे कॉन्स्टँटिनोपलपासून आल्जिर्स-पर्यंत सर्वजण एकमेकांशी बोलू शकतात. त्याने मला विचारले, " माझ्या बागेत तुम्ही काय पहाता आहा ? तुमचा मालक कोण ? " मी त्याला सांगितले, " अर्नाट ममीचा ( हा त्याचा जिवलग मित्र आहे हे मला माहीत होते. ) मी गुलाम आहे. कोशिंबीर करण्यासाठी मला काही भाजीपाला पाहिजे आहे. " तेव्हा त्याने मला विचारले, " तू खंडणी देऊन मुक्त होणार आहेस काय ? आणि त्यासाठी तुझा धनी किती खंडणी मागतो ? "

"या प्रश्नोत्तराचे वेळी, जवळच असलेल्या उद्यान-गृहातून सुंदर झोरेडा बाहेर आली. तिने मला पूर्वीच पाहिले होते. मूर महिला ख्रिश्चन गुलामांच्या दृष्टीस पडण्यास अनमान करीत नाहीत. म्हणून ती, कांहीही संकोच न बाळगता, आपला पिता व मी जेथे बोलत होतो तेथे आली. ती तेथे आल्याबद्दल तिच्या पित्याने मुळीच नापसंती दाखविली नाही. उलट, अधिक जवळ येण्यास त्याने तिला सांगितले. माझ्या प्रिय झोरेडाचे आकर्षक लावण्य आणि तिचा तो श्रीमंती वेष पाहून मला जे आश्चर्य आणि विस्मय वाटला, तो व्यक्त करणे कठीण आहे. ती मोत्यांनी नखशिखान्त नटलेली होती. तिच्या मस्तकावर, कंठामध्ये आणि हातामध्ये मोत्यांचे अलंकार भरगच्च भरलेले होते.त्या देशातील रूढीप्रमाणे तिची पावले आणि पाय उघडे होते. तिच्या घोट्यावर सोन्याचा वाळा घातलेला होता आणि त्यावर उंची किंमतीचे हिरे बसविलेले होते. तशा हिऱ्यांच्या एका जुडीला १०००० पिस्टोल किंमत पडते असे तिचे वडील सांगत होते, हे मला तिच्याकडून पुढे कळले. तिच्या मनगटावरील हिरेही तसेच मौल्यवान होते. तिचे मोती उत्तम जातीचे होते. मूर स्त्रियांना त्यांचा फार छंद असतो. दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रातील स्त्रियांपेक्षा त्यांच्या अंगावर नाना जातींचे मोती असतात. आल्जीर्समधील सर्वात नामी मोती तिच्या पित्याजवळ आहेत आणि त्यांची किंमत दोन लाख स्पॅनिश क्रॉऊनपेक्षा अधिक आहे, असा लौकिक होता. त्या सर्वांची स्वामिनी, तुम्हाला येथे दिसत असलेली स्त्री होती. पण आता ती केवळ माझी एकट्याचीच स्वामिनी आहे. अनंत यातना भोगूनही आता तिच्या अंगी जे काही सौंदर्य उरले आहे, त्यावरून ऐन ऐश्वर्याच्या काळात तिचे स्वरूप किती विस्मयकारक असेल याची कल्पना तुम्ही करू शकाल. काही स्त्रियांचे सौंदर्य काही दिवसापुरते-काही काळापुरते—असते आणि त्याची कांती विशेष प्रसंगामुळे किंवा विकारामुळे सहजच कमीजास्त होते. केव्हा केव्हा तर ती अजिबात लुप्त होते. मी एवढेच सांगू शकतो की, मी पूर्वी पाहिलेल्या सर्व स्त्रियांमध्ये अत्यंत सुंदर वेषातील ती अत्यंत सौंदर्यवती युवती होती. तिने माझ्यावर जे उपकार केले होते, त्यामुळे तर ती मला स्वर्गीय देवताच वाटत होती. माझ्या दुःखहरणासाठी आणि सौख्यासाठी ती स्वर्गातून पृथ्वीतलावर अवतरली आहे असे तेव्हा मला वाटत होते. ती जवळ आल्यानंतर तिच्या पित्याने तिला आपल्या गांवढळ भाषेत सांगितले, "माझा दोस्त अर्नाट ममी याचा हा गुलाम आहे. आपल्या बागेतील पालाभाजी घेण्यासाठी तो येथे आला आहे."

तिने सूचना ध्यानी घेतली आणि मला राष्ट्रभाषेत विचारले, "तुम्ही सभ्य माणूस आहा ना ? मग खंडणी भरून गुलामगिरीतून मुक्त का होत नाही ?" मी तिला सांगितले, "मी पूर्वीच खंडणी भरली आहे. तिची रक्कम ऐकली म्हणजे माझ्या धन्याने माझी किंमत काय केली होती, याचा तर्क तुम्हाला करता येईल. त्याने मला दीड हजार नाणी देऊन विकत घेतले होते." तेव्हा तिने उत्तर दिले, "तुम्ही जर माझ्या बापाचे गुलाम असता, तर दुप्पट पैसे घेऊनही मी तुम्हाला सोडले नसते. तुम्ही ख्रिश्चन

लोक जे बोलता ते कधीच सत्य नसते. मूर लोकांना फसविण्यासाठी तुम्ही स्वतःला गरीब भासविता. " मी म्हणालो, " बाईसाहेब, तसे असेल, पण मी माझ्या धन्याशी प्रामाणिकपणे आणि सन्मानाने वागलो आहे आणि ज्यांचा ज्यांचा माझा यापुढे संबंध येईल त्या सर्वांशी तसेच वागण्याची माझी इच्छा आहे. " तिने विचारले, " तुम्ही आपल्या घरी केव्हा जाणार ? " मी म्हणालो, " उद्याच, बाईसाहेब. कारण उद्या एक फ्रेंच होडी येथून जाणार आहे आणि ही संधी न गमावण्याचा माझा इरादा आहे. " तेव्हा झोरेडाने उत्तर दिले, " फ्रेंच लोक तुमचे दोस्त नाहीत, असे मी ऐकते. तेव्हां त्यांच्या होडीतून न जाता स्पेनच्या होडीतून जाणे आणि ती येईपर्यंत येथे थांबणे चांगले नाही काय ? " मी म्हणालो, " अर्थात. स्पेनची होडी येणार असल्याची बातमी खरी असेल तर मी तिच्यासाठी काही काळ थांबेन, पण फ्रेंच होडीतून जाण्याची संधी साधण्याचा प्रयत्न मी अधिक करीन. कारण आपल्या घरी जावे आणि आपल्या प्रेमाच्या माणसांना भेटावे या इच्छेमुळे दुसऱ्या वाहनाची वाट पाहण्याची माझी इच्छा नाही. " झोरेडा म्हणाली, " अलबत, तुमचे लग्न स्पेनमध्ये झालेले असेल आणि तुम्ही आपल्या बायकोकडे जाण्यास अधीर असाल. " मी म्हणालो, " माझे लग्न झालेले नाही. पण मी एका स्त्रीला लग्नाचे वचन दिलेले आहे, मी स्वदेशी जाताच लग्न करणार आहे. " झोरेडाने विचारले, " जिला तुम्ही वचन दिले आहे ती स्त्री देखणी आहे काय ? " मी उत्तर दिले, " वाः ! ती इतकी देखणी आहे की तिच्या सौंदर्याचे यथार्थ वर्णन करण्यासाठी मी इतकेच म्हणेन की, ती आपल्यासारखी आहे. " हे ऐकून तिचा बाप मनापासून हसला आणि म्हणाला, " ख्रिश्चन माणसा, ती जर माझ्या मुलीसारखी असेल, तर ती अत्यंत मोहक असली पाहिजे. कारण साऱ्या राज्यात माझी मुलगी अत्यंत सौंदर्यसंपन्न आहे. पहा तर खरे तिच्याकडे. म्हणजे मी खरे बोलत आहे, असे तू म्हणशील. "

" आमच्या भाषणामध्ये बहुतेक सारा वेळ झोरेडाचे वडील दुभाष्याचे काम करीत होते. तिला राष्ट्रभाषा कळत होती हे खरे, पण ती बोलण्याचा सराव तिला नव्हता. म्हणून ती शब्दांपेक्षा खुणांनी आपले विचार व्यक्त करी. आमचे असे संभाषण चालले असताना एक मूर धावत धावत आला आणि मोठ्याने ओरडून म्हणाला, " चार तुर्क आपल्या बागेच्या कुंपणावरून उडी टाकून आत आले आहेत आणि न पिकलेली फळेही गोळा करीत आहेत. " हे ऐकून तो वृद्ध गृहस्थ दचकला—तशीच झोरेडाही. कारण तुर्कांचे—विशेषतः तुर्की सैनिकांचे—भय मूर लोकांना फार वाटते. कारण तुर्क अत्यंत उर्मट असतात आणि मूर लोक जणू आपले गुलाम आहेत अशा भावनेने त्यांच्याशी वागत असतात. म्हणून वडिलांनी आपल्या कन्येला आत जाऊन कोंडून घेण्यास सांगितले आणि म्हटले, " मी जातो आणि त्या कुत्र्यांशी बोलतो. अरे ख्रिश्चन माणसा, तुला पाहिजे त्या वनस्पती तू गोळा कर आणि आपल्या वाटेने शांततेने जा. परमेश्वर तुला आपल्या देशात सुखरूप पोचवो. " मी त्यांना अभिवादन केले. ते तुर्कांच्या

शोधार्थ निघाले. माझ्याजवळ फक्त झोरेडा होती. तिनेही आपल्या पित्याच्या आज्ञेप्रमाणे तेथून जाण्याचा आव आणला. पण बागेतील झाडामुळे ती आपल्या पित्याच्या दृष्टीआड होताक्षणीच माझ्याकडे वळली आणि अश्रुपूर्ण नेत्रांनी माझ्याकडे पाहून आपल्या भाषेत ती म्हणाली, "निघालास तू? ख्रिश्चन माणसा, निघालास तू?" मी उत्तर दिले, "होय, बाईसाहेब. मी निघालो, पण आपल्याला घेतल्याशिवाय नाही. पुढील शुक्रवारी तुम्ही माझी वाट पाहा. पण जेव्हा तुम्ही आम्हाला पहाल तेव्हा आश्चर्यचकित होऊ नका. आम्ही ख्रिस्तभूमीकडे जाणार हे नक्की." हे मी इतक्या आवेगाने म्हटले की, तिला माझे बोलणे समजले. माझ्या गळ्यावर आपला एक हात टाकून ती मंदमंद आणि कंपित पावलांनी आपल्या घराकडे चालू लागली. पण दैवाच्या मनात काही निराळेच होते.

अशा पवित्र्यात आम्ही चालत असताना, (त्यामुळे आमच्यावर दुर्दैव ओढवणे साहजिकच होते) आम्हाला ॲगीमोरॅटो भेटला. तो तुर्कांकडून येत होता. आम्ही अशा तऱ्हेने एकत्र चालत आहो, हे त्याने पाहिले हे आमच्या ध्यानी आले. पण झोरेडा फार चतुर. तिने माझ्या गळ्यावरील आपला हात बाजूस तर घेतला नाहीच, उलट ती माझ्या आणखी जवळ आली आणि आपले मस्तक माझ्या छातीवर ठेवून तिने आपले पाय लटलटा कापावयास लावले. एखादा माणूस मूर्च्छित पडतो, तशी तिची अवस्था झाली. त्याचवेळी मी असे सोंग आणले की, माझ्या इच्छेविरुद्ध तिला सावरून धरण्यासाठी मला फार यातायात करावी लागत आहे. तिचा पिता घाईघाईने आमच्याकडे आला आणि आपल्या कन्येची ती अवस्था पाहून विचारू लागला, 'हा काय प्रकार आहे?' तिने काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा तो चटकन म्हणाला, "या तुर्कांनी तिला घाबरविले आहे आणि म्हणून तिला मूर्च्छा आली आहे हे खचित." असे म्हणून त्याने तिला आपल्या बाहूत घेतले. तिने शुद्धीवर आल्याचा आविर्भाव केला आणि एक दीर्घ सुस्कारा सोडला. डोळ्यातील आसवे सुकली नसतानाच ती म्हणाली, "अरे ख्रिश्चन माणसा, जा, जा." तेव्हा तिचा बाप म्हणाला, "बाळे, तो जातो की नाही हा प्रश्न नाही. त्याने तुला काही इजा केली नाही आणि तुर्क लोक माझ्या विनंतीवरून निघून गेले आहेत." तेव्हा मी म्हणालो, "तिला भय दाखविले त्यांनीच. पण मी येथून जावे अशी तिची इच्छा आहे, म्हणून मी जातो आणि वनस्पतीसाठी आपल्या परवानगीने पुनः केव्हा तरी मी येईन. कारण आपल्या बागेतील वनस्पती उत्तम आहेत असे माझा धनी म्हणतो." वडील म्हणाले, "तुझ्या इच्छेस येईल, ते आणि तेव्हां तू घेऊन जा. कारण माझ्या कन्येला ख्रिश्चन लोक तापदायक वाटत नाहीत. फक्त तुर्कांनी जावे अशी तिची इच्छा होती. तू जावेस असे ती चुकीने म्हणाली. आता तू त्वरा कर आणि वनस्पती गोळा कर." हे एकून मी त्या दोघांचा निरोप तत्काळ घेतला. झोरेडाच्या दृष्टीत मोठी व्यथा दिसत होती. ती आपल्या पित्याबरोबर निघून गेली. तोपर्यंत मी वनस्पती गोळा करण्याच्या मिषाने सर्व बागेत हिंडलो.

आणि बागेत येण्याची आणि जाण्याची ठिकाणे नक्की कोणती आहेत अन् माझ्या कामाला उपयोगी असा कोपरा कोणता आहे, याचा शोध मी घेतला. घरात किती माणसे आहेत आणि आमच्या उद्योगाला अनुकूल असे काय काय आहे, हेही मी जाणून घेतले.

"हे झाल्यावर मी माझ्या वाटेने गेलो आणि तो फितुर माणूस व माझे इतर दोस्त यांना जे घडले ते सर्व अचूक सांगितले. कोणताही अडथळा न येता मी माझ्या प्रिय झोरेडाच्या सहवासात केव्हा जाईन याची मोठ्या आतुरतेने मी वाट पहात बसलो. शेवटी तो भाग्याचा क्षण आला. आम्ही जी योजना उत्तम प्रकारे आखली होती, तिला पूर्ण यश येण्याचा तो क्षण होता.

"झोरेडाशी माझा संवाद झाल्यानंतरच्या शुक्रवारी सायंकाळी आम्ही आमच्या होडीने नांगर टाकलेल्या जागी गेलो. माझी सुंदर प्रिया जेथे राहात होती, त्या स्थानावरूनच आम्ही गेलो. संकेत-स्थानी ख्रिश्चन माणसे आलेली होती. ती होडी वल्हविणार होती.ती जवळपास लपून बसली होती–माझ्या येण्याची वाट पाहत होती.आपल्या डोळ्यांना दिसणारी होडी पकडण्याची त्यांना फार इच्छा होती. फितुराशी झालेला आमचा करार त्यांना माहीत नव्हता. म्हणून त्यांना वाटत होते, होडीवरील मूर लोकांना ठार मारून आपण आपल्या मनगटाच्या बळावर होडी आणि आपली मुक्तता मिळविली पाहिजे. मी आणि माझे मित्र दिसताच ते सारेजण आपल्या लपण्याच्या जागेतून निघून आमच्याकडे आले. यावेळेपर्यंत शहराच्या वेशी बंद झाल्या होत्या आणि आमच्याजवळ साऱ्या देशातील एकही माणूस दिसत नव्हता. आम्ही एकत्र आल्यावर आमच्यापुढे प्रश्न पडला की, आपण प्रथम झोरेडाला घेऊन यावे की होडीतील त्या थोड्या मूर लोकांवर ताबा मिळवावा? आमची अशी वाटाघाट चालली असताना तो फितुर आमचेकडे आला आणि म्हणाला, "तुम्ही असे स्वस्थ उभे का? माझे सारे मूर लोक विश्रांती घेत आहेत आणि त्यातील बहुतेक सारेजण झोपी गेले आहेत." आम्ही त्याला आपली अडचण सांगितली. तो लगेच म्हणाला, "सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे होडी ताब्यात घेणे. ते काम सहज निर्विघ्नपणे होऊन जाईल. मग आपण झोरेडाकडे जाऊ."

"आम्हा सर्वांना त्याचे म्हणणे पटले. म्हणून आणखी काही चर्चा न करता आम्ही त्या होडीकडे निघालो. आमच्या अग्रभागी तो फितुर होता. त्याने होडीत उडी टाकून प्रथम एक कट्यार बाहेर काढली आणि मूर लोकांच्या भाषेत मोठ्याने ओरडून तो म्हणाला, "तुमच्यापैकी कोणीही गडबड करू नये, नाही तर त्याला आपले प्राण गमवावे लागतील." असे तो बोलत असताना इतर सारी ख्रिश्चन माणसे होडीत आली. आपल्या धन्याची ती भाषा ऐकून, मूळचेच भित्रे असलेले मूर लोक घाबरून गेले आणि कोणताही प्रतिकार न करता त्यांनी आपल्या हातात बेड्या घालून घेतल्या. ख्रिश्चन लोकांनी त्यांच्या हातात मोठ्या जलदीने बेड्या घातल्या. त्या वेळी त्यांनी मूर लोकांना बजावले, "तुम्ही थोडाही आवाज केला तर आम्ही तुमचे गळे तत्काळ कापू."

हे झाल्यावर आणि आमचे निम्मे लोक त्यांच्यावर पहारा करण्यासाठी ठेवल्यावर तो फितुर माणूस ॲगी मोरॅटोच्या बागेकडे गेला. आमचे सद्भाग्य असे की, बागेचा दरवाजा बळजोरीने उघडण्याचा आम्ही विचार करीत असताना तो आम्हाला उघडाच आढळला— जणू काही तो बंदच केलेला नव्हता. तेव्हा आम्ही त्या घरात, कोणाच्या नजरेस न पडता, अत्यंत निःस्तब्धतेने कूच केले. सुंदर झोरेडा खिडकीमध्ये होती. आम्ही आल्याची चाहूल लागताच तिने हळूच विचारले, "तुम्ही ख्रिश्चन आहा काय?" मी उत्तर दिले, "होय." आणि तिला खाली येण्यास सुचविले. माझा आवाज कानी पडताच ती तेथे क्षणभरही थांबली नाही. चकार शब्द न काढता ती खाली आली आणि तिने दरवाजा उघडला. ती आम्हा सर्वांना देवतेसारखी दिसली. तिचे सौंदर्य आणि तिच्या वेषाचे ऐश्वर्य अवर्णनीय होते. ती दिसताच मी तिचा हात आपल्या हातात घेतला आणि त्याचे चुंबन घेतले. फितुराने तसेच केले आणि नंतर माझ्या दोस्तांनीही. बाकीच्या सर्व मंडळींनीही तो विधी पार पाडला. आमच्या स्वातंत्र्या-बद्दल आम्ही तिला एक प्रकारचा हा मुजराच केला.

"फितुराने तिला मोरिस्को भाषेत विचारले, "आपले वडील बागेत आहेत काय?" ती म्हणाली, "होय, ते झोपले आहेत." तो म्हणाला, "मग आपण त्यांना जागे केले पाहिजे आणि आपल्याबरोबर नेले पाहिजे. तसेच घरात जे जे मौल्य-वान असेल तेही आपण नेले पाहिजे." तेव्हा झोरेडा म्हणाली, "छेः छेः माझ्या पित्याला कोणी हात लावता कामा नये. मी माझ्याबरोबर जो ऐवज नेईन त्यापेक्षा अधिक मौल्यवान घरात काही नाही. तुम्हा सर्वांना श्रीमंत आणि संतुष्ट करण्याइतका ऐवज मी बरोबर घेईन." असे म्हणून तिने घरात पाऊल टाकले आणि आम्हाला शांत राहण्यास सांगितले व आपण लवकरच परत येऊ असे सुचविले. "तुमचे संभाषण काय झाले?" असे मी फितुरास विचारले, तेव्हा आपण काय बोललो हे त्याने मला सांगितले. मी उत्तर दिले, "झोरेडाला आवडणार नाही, अशी एकही गोष्ट आपण करता कामा नये." झोरेडा एक लहानशी पेटी घेऊन येत होती. ती सोन्याने इतकी भरलेली होती की, मोठ्या कष्टाने ती तिला उचलता येत होती. पण आमचे दुर्दैव असे की, ती येत असताना, तिचा बाप जागा झाला. बागेतील आवाज ऐकून त्याने खिडकी उघडली आणि बाहेर पाहिले. बागेत ख्रिश्चन लोक आहेत हे पाहून तो अरबी भाषेत ओरडू लागला, "चोर! चोर!! ख्रिश्चन! ख्रिश्चन!!" त्याच्या या ओरडण्यामुळे आम्हाला भयंकर भीती वाटू लागली आणि आमचा गोंधळ उडाला. पण आमची ही दुर्दशा पाहून आणि आम्हाला आमचे धाडसी कार्य सिद्धीस कसे नेता येईल, याचा विचार करून तो फितुर माणूस ॲगीमोरॅटोच्या घरी धावत गेला आणि आपल्याबरोबर आमचे काही सोबती घेऊन गेला. मी झोरेडाला सोडण्यास धजलो नाही. कारण ती माझ्या बाहूत मूर्च्छित होऊन पडली होती. जे लोक वर गेले होते, त्यांनी आपले काम चोख बजावले. ॲगीमोरॅटोचे हात पाठीमागे बांधून आणि त्याच्या तोंडावर हातरुमाल

आवळून त्यांनी त्याला खाली आणले. त्याला एक शब्दही उच्चारता येत नव्हता. तरी त्यांनी त्याला दम भरला, " बोलण्याचा थोडाही प्रयत्न तू केलास, तर तुला आपले प्राण गमवावे लागतील. " यावेळेपर्यंत त्याची मुलगी शुद्धीवर आली होती. तिने त्याला पाहिले. ते दृश्य तिला पाहवेना म्हणून तिने आपले डोळे मिटून घेतले. तिच्या पित्याला विशेषच नवल वाटले. कारण, आपल्या कन्येने आपले जीवित आमच्या हाती किती राजीखुषीने अर्पण केले आहे, हे त्याला माहीत नव्हते. आमच्या बाजूने तत्पर असण्याची फार जरूरी होती. म्हणून आम्ही तत्परतेने आमच्या होडीवर आलो.

" आमच्या माणसांना आमच्याबद्दल फार काळजी वाटत होती. आमच्यावर काही संकट ओढवले असावे अशी भीती त्यांना वाटत होती. रात्र पडल्यानंतर सुमारे दोन तासांनी आम्ही होडीवर चढलो, तेथे जाताच आम्ही पहिली गोष्ट केली ती म्हणजे झोरेडाच्या पित्याचे हात व तोंड मोकळे करणे. पण त्याने काही गडबड केली तर जिवास मुकण्याची पूर्वीचीच धमकी फितुराने त्याला दिली. आपली मुलगीच तेथे असल्याचे पाहून तो अत्यंत आवेगाने सुस्कारे सोडू लागला. मी तिला प्रेमाने आलिंगन देत आहे आणि ती, काहीही प्रतिकार किंवा धडपड न करता, सहन करीत आहे हे पाहून तर तो अधिकच सुस्कारे सोडू लागला. तरीसुद्धा सर्ववेळ त्याने मौन पाळले होते. फितुराची धमकी अमलात येईल अशी त्याला भीती वाटत होती. आम्ही होडीवर आलो आहो आणि प्रयाण करण्यासाठी वल्ही मारण्यास तयार झालो आहो हे पाहून झोरेडाने फितुराला सांगितले, " माझे वडील आणि इतर मूर कैदी झालेले आहेत, त्या सर्वांना मोकळे करून किनाऱ्यावर सोडण्यास यांना सांगा. नाही तर मी समुद्रात उडी घेईन. माझ्याशी अत्यंत प्रेमाने वागणाऱ्या माझ्या वडिलांना माझ्या डोळ्यासमोर माझ्यासाठी कैदी म्हणून नेले जात असल्याचे दृश्य मी पाहणार नाही. " ती काय म्हणाली, हे फितुराने मला सांगितले आणि ते मी मान्य केले. पण फितुराचे मत भिन्न होते. तो म्हणाला, " आपण यांना किनाऱ्यावर मोकळे सोडले तर ते सर्व देश उठवितील, शहराला इशारा देतील आणि आपल्या शोधार्थ एखादे जलद चालणारे जहाज पाठवितील. मग आपल्याला निसटून जाणे कठीण जाईल. म्हणून आपण एवढेच करू शकतो की, आपण पोचू त्या पहिल्या ख्रिश्चन देशात यांना बंधमुक्त करणे. " हे त्याचे बोलणे आम्हा सर्वांना अत्यंत सयुक्तिक वाटले, झोरेडाच्या सल्ल्याप्रमाणे आम्ही सध्या का वागू शकत नाही हे तिला आम्ही समजावून सांगितल्यानंतर तिनेही त्या योजनेला संमती दिली. मग लगेच अत्यंत शांतपणाने आणि संतोषाने आम्ही आमची वल्ही मारू लागलो आणि परमेश्वराची मनोभावाने प्रार्थना करू लागलो. जवळचा ख्रिश्चन देश म्हणजे मॅजोर्का. त्याकडे जाण्याचा प्रयत्न आम्ही चालविला. पण उत्तरेचा वारा जोराने वाहू लागला आणि त्याबरोबरच समुद्रही खवळू लागला. म्हणून आम्हाला त्या दिशेने जाता येईना. ओरानच्या बाजूस असलेल्या किनाऱ्याकडे होड्या वल्हविणे आम्हाला भाग पडले. पण ॲल्जीर्सपासून शंभर मैलांवर असलेल्या सार्गेल बंदरातून

आपल्याला कोणी पाहील असे आम्हाला मोठे भय वाटत होते; टेटून येथून व्यापारी माल घेऊन येणारी काही छोटी गलबते आम्हाला भेटतील असेही भय आम्हाला वाटत होते. खरे सांगायचे तर, आम्हाला त्यांचे भय फारसे वाटत नव्हते. त्याच्याजवळ लढाऊ जहाज नसले तर आम्हाला त्याचे जहाज भेटावे म्हणजे ते आम्ही घेऊ आणि त्यातून आम्ही सुखाने प्रवास करू, असेच आम्हास वाटत होते.

" इतका वेळ झोरेडा आपल्या पित्याचे दर्शन न व्हावे म्हणून माझ्या दोन्ही हातांमध्ये आपले मुख झाकून बसली होती, आणि आपल्या साहाय्यार्थ लेला मेरियनने धावून यावे म्हणून तिचा धावा करीत होती, हे मी ऐकत होतो. आम्ही सुमारे तीस मैल गेलो तेव्हा दिवस उजाडला. आम्ही किनाऱ्यापासून एक मैलाच्या आत होतो. तो किनारा म्हणजे ओसाड निर्जन स्थान होते. तरी आम्ही समुद्राकडे जाण्यासाठी जोराने वल्ही मारली नसती तर आम्हाला कोणी तरी पाहिले असते. जेव्हा आम्ही समुद्रापासून पाच-सहा मैलावर आलो, तेव्हा आम्ही असे सुचविले की, सर्वांनी आळीपाळीने वल्हवावे म्हणजे काहीजणांना विश्रांती मिळून ते ताजे-तवाने होतील. पण वल्ह्यावरील माणसे म्हणाली, " विश्रांती घेण्याची वेळ अजून आली नाही, आम्ही खाणे घेऊ आणि वल्हवूही. मात्र न वल्हविणाऱ्या माणसांनी आम्हाला मद्य-मांस देण्याची व्यवस्था करावी. " तसे आम्ही केले. थोड्या वेळाने वारा जोराने वाहू लागला, तेव्हा आम्ही वल्हविणे थांबविले आणि ओरानच्या दिशेने होडी हाकारली. दुसरा कोणताच मार्ग स्वीकारणे आम्हाला शक्य नव्हते. आम्ही ताशी सुमारे आठ मैल जात होतो. आम्हाला भीती फक्त लढाऊ जहाजाचीच होती. दुसऱ्या कशाची नव्हे. आम्ही आमच्या मूर कैद्यांना खाद्य पदार्थ दिले. फितुर माणसाने त्यांचे समाधान करण्यासाठी त्यांना असे सांगितले की, " तुम्ही गुलाम नाही. पहिली संधी येताच तुम्हाला मुक्त करण्यात येईल. " तसेच झोरेडाच्या बापालाही सांगण्यात आले. तेव्हा त्याने उत्तर दिले, " अरे ख्रिश्चनांनो, तुम्ही मला माझे स्वातंत्र्य द्यावे एवढेच मी इच्छितो. पण तुम्ही ते द्याल असे मानण्या-इतका मी भोळा नाही. ते इतक्या सहजासहजी तुम्ही मला परत देणार असता, तर ते हिरावून घेण्याचा धोका तुम्ही कधीच पत्करला नसता. मी कोण आहे आणि माझ्या खंडणीची रक्कम किती मिळेल हे तुम्हाला माहीत आहे. तुम्ही त्या रकमेचा नुसता उच्चार करा की, त्याच क्षणी मी तुम्हाला तुमच्या इच्छेइतकी रक्कम देईन आणि माझ्या या दुर्दैवी मुलीसाठीही खंडणी देईन- किंवा तिच्या एकटीसाठीही खंडणी देईन. कारण ती माझ्या जीवनाचे उत्तमांग आहे. " असे म्हटल्यावर त्याच्या डोळ्यातून घळघळा अश्रू वाहू लागले. झोरेडा त्याच्याकडे पाहू शकली नाही. खरोखर आम्हा सगळ्यांच्या अंतःकरणात – विशेषतः तिच्या अंतकरणात – त्याच्याविषयी करुणा वाटू लागली.

" झोरेडा माझ्या बाहूतून निसटून आपल्या पित्याकडे धावत गेली आणि त्याच्या मस्तकावर आपले मस्तक घासू लागली. त्यावेळचे दृश्य इतके भावनापूर्ण आणि कोमल होते की, आमच्याही डोळ्यातून दुःखाश्रू वाहू लागले. पण तिच्या अंगावरील श्रीमंती

वेश आणि हिरे–माणके पाहून तिचे वडील तिला आपल्या भाषेत म्हणाले, " "मुली, याचा अर्थ काय? काल रात्री हे भयानक संकट आपल्यावर कोसळण्यापूर्वी तू आपल्या नेहमीच्या पोशाखात होतीस आणि आता असे वस्त्रालंकार धारण करण्यास मुळीच वेळ मिळाला नसतानाही तू अशी नटली–थटलेली मला दिसत आहेस! आपण स्वतंत्र असतो आणि आपल्या ऐश्वर्याच्या शिखरावर असतो, तर जे जड–जवाहीर मी तुला दिले असते, ते सारे आता तुझ्या अंगावर खेळत आहे. आपल्या या दुर्दैवामुळे मला जितके दुःख होत आहे, त्यापेक्षा तुझ्या या दर्शनाने मला अधिक सखेदाश्चर्य वाटत आहे. म्हणून याचा खुलासा कर."

"तो मूर जे जे म्हणाला त्या सर्वांचा आशय त्या फितुराने भाषांतर करून सांगितला. झोरेडाने चकार शब्दानेही उत्तर दिले नाही हे आम्ही पाहिले. पण ती ज्या छोट्या पेटीत आपली रत्न–माणके ठेवीत असे, ती अॅल्जीर्समध्ये राहिली आहे असे तिच्या बापाला वाटत होते. ती पेटी त्याला अकस्मात दिसली, त्यामुळे त्याचे आश्चर्य दुणावले. म्हणून त्याने तिला विचारले, "ही पेटी ह्यांच्या हातात कशी आली? आणि तिच्यात काय आहे?" झोरेडा काय उत्तर देते याची वाट न पहाता तो फितुर उत्तरला, "आपल्या मुलीला इतके प्रश्न विचारण्याचे कष्ट तुम्ही घेऊ नका, कारण मी एका शब्दाने त्या साऱ्या प्रश्नांची उत्तरे देईन. लक्षात घ्या की, ती ख्रिश्चन आहे. आमच्या बेड्या काढून टाकून आम्हाला स्वातंत्र्य तिनेच दिले आहे. ती आपखुशीनेच आमच्या-बरोबर आलेली आहे. अंधारातून प्रकाशाकडे आणि मृत्यूतून जीवनाकडे जाणाऱ्या माणसाप्रमाणे ती आनंदात आहे असे मला वाटते." तेव्हां त्या मूर बापाने प्रश्न केला, "मुली, हे खरे आहे काय?" झोरेडाने उत्तर दिले, "होय." तेव्हा तो वृद्ध म्हणाला, "पण तू खरोखर ख्रिश्चन कशी आहेस? आपल्या पित्याला त्याच्या शत्रूच्या ताब्यात देणारी तूच आहेस काय?" तेव्हा झोरेडाने उत्तर दिले, "मी ख्रिश्चन आहे हे खरे, पण तुम्हाला या अवस्थेस आणून पोचविणारी मी नव्हे. माझ्या पित्याला अपाय व्हावा अशी माझी कधीच इच्छा नव्हती. स्वतःचे कल्याण करावे एवढीच माझी इच्छा." मूरने विचारले, "पण तुझे तरी कल्याण तू काय केले आहेस?" झोरेडाने उत्तर दिले, "ते लेला मेरियनला विचारा. कारण तीच तुम्हाला बरोबर सांगू शकेल."

"त्या वृद्धाच्या कानी हे शब्द पडताच त्याने समुद्रात इतक्या आवेशाने उडी घेतली की त्यावर कोणाचा विश्वासच बसणार नाही. समुद्रात तो बुडाला असता हे खचित, पण त्याच्या लांब–रुंद कपड्यांनी त्याला काही काळ पाण्याच्या वर ठेवले. आमच्या मदतीसाठी झोरेडा ओरडली. त्याप्रमाणे आम्ही तत्काळ मदत केली. त्याच्या बंडीला धरून आम्ही त्याला ओढले. त्यावेळी तो निम्माशिम्मा बुडालेला होता आणि शुद्धीवर अजिबात नव्हता. ते पाहून झोरेडाला इतके दुःख झाले की, तिने स्वतःला आपल्या बापाच्या अंगावर झोकून दिले. जणू काही तो खरोखर मेलाच आहे, अशा भावनेने ती शोक करू लागली—आक्रोश करू लागली. आम्ही त्याचे डोके खाली केले.

त्या योगाने त्याच्या पोटातील पुष्कळसे पाणी बाहेर पडले. सुमारे दोन तासांच्या अवधीत तो थोडथोडा शुद्धीवर आला. मध्यंतरी वारा जोराने वाहू लागला आणि त्याने आम्हाला किनाऱ्याकडे आणले. पण आम्हाला जमिनीवर उतरावयाचे नसल्यामुळे आम्ही वल्ही मारू लागलो. आम्ही एका छोट्याशा खाडीत सुदैवाने शिरलो. ही खाडी एका उंच भूशिराने केलेली होती. त्या भूशिराचे नाव कॅबा रुमियाचे केप. आमच्या भाषेत त्याला एका 'दुष्ट ख्रिश्चन स्त्रीचे केप' म्हणतात. कॅबा ही काउंट ज्यूलियनची मुलगी. ती तेथे पुरलेली आहे अशी मूर लोकांची समजूत आहे. स्पेनचा पराजय होण्यास काउंट ज्यूलियन कारणीभूत होता, असे त्यांना वाटते. त्या खाडीत होडी जाणे हे ते अशुभ मानतात. अगदी जरूर पडल्या-शिवाय तेथे ते कधी जात नाहीत. पण त्यावेळी समुद्र किती खवळलेला होता, याचा विचार केला तर आम्हाला ते दुर्दैवी बंदर वाटत नव्हते—सुरक्षित विश्रांतिस्थान वाटत होते. आम्ही आमचे पहारेकरी किनाऱ्यावर ठेवले, पण प्रसंग आला तर उपयोगी पडावे म्हणून आमची वल्ही हातात तयार ठेवली. तोंपर्यंत त्या फितुराने दिलेले खाद्यपदार्थ आम्ही खाल्ले. आम्ही ईश्वराची आणि कुमारी मेरीची मनापासून प्रार्थना केली की, 'आमचे रक्षण करा आणि आमची योजना सिद्धीस नेण्यास साहाय्य करा." झोरेडाच्य इच्छेनुसार आम्ही तिच्या पित्याला आणि इतर सर्व मूर लोकांना किनाऱ्यावर ठेवण्याचे ठरविले. त्या मूरांना आम्ही पक्के बांधलेले होते. आपले वडील आणि आपले देश-बांधव यांची दुर्दशा आपल्या डोळ्यासमोर झालेली पहाण्याचे धैर्य तिच्या अंगी नव्हते. तिचे कोमल अंतःकरण अधिक दुःख सहन करू शकत नव्हते. पण आम्ही तेथून निघण्यास अगदी तयार होईपर्यंत त्यांना किनाऱ्यावर ठेवण्याची आमची इच्छा नव्हती. नाही तर त्यांनी आम्हाला अपाय केला असता. कारण ते स्थान निर्जन होते आणि भोंवताली वस्ती नव्हती.

"आमच्या प्रार्थना फुकट गेल्या नाहीत. वारा पडला आणि समुद्र शांत झाला. आम्ही आमचा संकल्पित प्रवास पुढे चालू करावा, म्हणून तो आम्हाला जणू आवाहनच करीत होता. आम्ही आमच्या कैद्यांना मुक्त केले आणि एकेकाला नेऊन किनाऱ्यावर ठेवले. त्यामुळे ते अत्यंत चकित झाले. त्यावेळेपर्यंत झोरेडाचा बाप शुद्धीवर आला होता. त्याला आम्ही किनाऱ्यावर ठेवणार, तोंच तो म्हणाला, "अरे ख्रिश्चनांनो, मी बंध-मुक्त व्हावे, अशी या दुष्ट स्त्रीची इच्छा आहे, असे तुम्हाला वाटते का ? तिला माझी दया आली आहे असे तुम्हाला वाटते काय ? छेः मुळीच नाही ! तिला मी समोर असणे हेच सहन होत नाही. कारण त्यामुळे आपले दुष्ट हेतू तडीस नेण्यास तिला अडथळा येतो. तुमच्या-आमच्या धर्मातील फरक समजल्यामुळे तिने तुमचा धर्म स्वीकारला आहे, असे मुळीच समजू नका. स्वदेशापेक्षा तुमच्या देशात अधिक स्वैरपणे वागता येते असे ऐकल्यामुळेच तिने हे धर्मांतर केले आहे." त्याने काही अत्याचार करू नयेत म्हणून मी आणि माझा एक सोबती यांनी त्याचे हात घट्ट धरून ठेवले होते.

झोरेडाकडे वळून तो म्हणाला, " हे बदनाम कुलटे, हे अंध तरुण स्त्रिये, या कुत्र्यांच्या —आपल्या जन्मजात वैऱ्यांच्या—तावडीत सापडून तू कोठे जात आहेस ? ज्या क्षणी मी तुला जन्म दिला, त्या क्षणाचा धिक्कार असो. ज्या प्रेमाने आणि ज्या काळजीने मी तुला वाढविले, त्यांना आग लागो ! "

"त्याचे हे उद्गार लवकर थांबण्याचा संभव नाही असे पाहून मी त्याला किनाऱ्यावर ठेवण्याची घाई केली. तेथून तो आम्हाला शिव्याशाप देत राहिला—गुडघे टेकून पैगंबर महंमदाची प्रार्थना करू लागला—" या लोकांचा गोंधळ उडू दे आणि नाश होऊ दे. "

" आम्ही होडीतून निघालो. आम्हाला त्याचे शब्द ऐकू येईनासे झाले. पण तो काय करतो हे आम्हाला दिसत होते. तो आपले केस आणि दाढी उपटीत होता आणि जमिनीवर गडबडा लोळत होता. एकदा तो इतक्या उंच आवाजात ओरडला की, त्याचे शब्द आमच्या कानावर पडले; ते असे— " माझ्या प्रिय कन्ये, परत ये. मी तुला क्षमा करतो. त्या लोकांच्या ताब्यात जे जड-जवाहिर गेले आहे, ते त्यांच्याजवळच राहू दे. आपल्या तडफडणाऱ्या बापाचे सांत्वन करण्यासाठी परत ये. नाही तर, या वाळवंटात त्याचे प्राण निघून जातील. " हे सर्व झोरेडाने ऐकले आणि तिच्या डोळ्यातून अश्रूंचा वर्षाव सुरू झाला. ती त्याला उत्तर देऊ शकत नव्हती. तिला ख्रिश्चन करणाऱ्या लेला मेरियनची तिने प्रार्थना केली की, " माझ्या पित्याला शांत कर. मी जे केले, ते मला टाळता आले नसते, हे परमेश्वर जाणतो. हे ख्रिश्चन लोक माझी सेवा करण्यास बांधलेले नाहीत. मी जर अशी योजना केली नसती, तर मला शांती मिळाली नसती. पण प्रिय तात, माझी योजना तुम्हाला अत्यंत दुष्टपणाची वाटते. " हे सर्व ती बोलली तेव्हा आम्ही इतके दूर गेलो होतो की, त्याचे शब्द आमच्या कानावर पडत नव्हते व आम्ही त्याला पाहू शकत नव्हतो. म्हणून मी झोरेडाचे शक्य तितके सांत्वन केले आणि आमच्या प्रवासाकडे आम्ही सर्वांनी लक्ष दिले. आता वारा आम्हाला इतका अनुकूल होता की, दुसरे दिवशी सकाळी आम्ही स्पेनच्या किनाऱ्यावर असू, याविषयी आम्हाला काडीमात्र शंका नव्हती. पण दुःखाची थोडीशीही छाया नसलेले निर्मळ सौख्य अनुभवास यावे, असे क्वचितच घडते. आमच्या दुर्दैवाने म्हणा किंवा मूर लोकांच्या शिव्याशापामुळे म्हणा ( त्यातही पित्याचे शाप भयंकर असतात— मग तो पिता कोणीही असो. ) मध्यरात्रीच्या सुमारास आमचा प्रवास जोरात चालू असताना आणि आम्ही आमची वल्ही बाजूस ठेवली असताना, सारी शिडे पाडलेले एक मोठे जहाज आमच्याकडे अगदी जवळ येत असलेले आम्हाला चंद्र-प्रकाशात दिसले. ते आमच्या इतके जवळ आले की, त्याच्याशी आमच्या होडीची टक्कर होऊ नये म्हणून आम्हाला आमची शिडे उभारणे भाग पडले. त्या जहाजातील लोक आमच्याजवळ आले आणि विचारू लागले, " तुम्ही कोठून आला आणि कोठे जाणार ? " ते हे फ्रेंच भाषेमध्ये बोलले, म्हणून त्या फितुराने आम्हाला उत्तर देण्यास मनाई केली.

तो स्वतः म्हणाला, "खरोखर हे फ्रेंच चाचे आहेत. त्यांना कोणतीही गोष्ट ववाडच वाटेल." यामुळे आम्ही सर्वजण गप्प बसलो. आमची होडी पुढे चालू लागली.

"ते जहाज वाऱ्याच्या वेगाने जात होते. त्यावरील माणसांनी आमच्यावर दोन बंदुका झाडल्या. त्यातील एका गोळीने आमची डोलकाठी खाली आली आणि दुसरी गोळी आमच्यामधून गेली. पण कोणी मेले नाही. आमची होडी बुडू लागली. म्हणून आम्ही त्यांना म्हणालो, "या, या, इकडे या आणि आम्हाला वाचवा. आम्ही बुडत आहो." तेव्हां त्यांनी आपली शिडे उभारली आणि आपली मोठी बोट पुढे ढकलून, सुमारे बारा फ्रेंच माणसे आमच्या होडीवर आली. ते सशस्त्र होते आणि त्यांच्या मशाली पेटलेल्या होत्या. आमच्याजवळ येताच त्यांना कळले की, आम्ही फार थोडे आहो. म्हणून त्यांनी आम्हाला आपल्या जहाजावर घेतले. ते म्हणाले, "तुम्ही आमच्या प्रश्नांची उत्तरे दिली नाहीत म्हणून असे घडले." झोरेडाच्या दागदागिन्यांनी भरलेली ती छोटी पेटी घेण्यास आणि होडीच्या एका बाजूस ठेवण्यास त्या फितुरास वेळ मिळाला. तसे करताना त्याला कोणी पाहिले नाही. त्या फ्रेंचांच्या जहाजावर आम्ही गेल्यानंतर त्यांनी आमच्याकडून शक्य तितकी सर्व माहिती घेतली. नंतर ते आम्हाला उघडे-नागडे करू लागले– जणू काही आम्ही त्यांचे कट्टे दुष्मन होतो. त्यांनी झोरेडाचे सारे जडजवाहिर आणि तिच्या हातापायांत असलेले वाळे लुटले. पण त्यामुळे मला फारसे दुःख झाले नाही. तिला सर्वांपेक्षा आपल्या शीलाचे मोल अधिक वाटत होते. ते अमोल रत्न हिरावले जाते की काय असे मला भय वाटत होते. पण तशा प्रकारच्या लोकांना धन-संपदेपेक्षा दुसऱ्या कशाची इच्छा नसते आणि ती धन-दौलत तर त्यांच्या डोळ्यापुढे भरपूर होती. ती पाहिल्यामुळे त्यांच्या तोंडाला इतके पाणी सुटले की, आमच्या गुलामांच्या कपड्यांचाही त्यांना मोह पडला.

"आमचे काय करावे, याची वाटाघाट ते करू लागले. काहींचे मत असे की, आम्हाला जहाजावरून, एका शिडात गुंडाळून समुद्रात फेकून द्यावे. कारण स्पेनच्या एखाद्या बंदरात मुक्काम करण्याचे त्यांच्या मनात होते. ब्रिटनीच्या ताब्यातील बंदरात त्यांनी आम्हाला नेले असते तर, त्यांचा दुष्टपणा उघडकीस आला असता आणि त्यांना शिक्षा झाली असती. पण झोरेडाच्या दागिन्यांच्या लुटीमुळे आपण भरपूर श्रीमंत झालो आहो असे कप्तानाला वाटत होते, म्हणून तो म्हणाला, "आपण स्पेनच्या एकाही बंदराला शिवणार नाही. रात्री सामुद्रधुनीतून आपण आपला मार्ग काढू आणि जेथून आपण निघालो, त्या रोचेलला आपण परत जाऊ." असा निश्चय ठरल्यामुळे त्यांनी आपली मोठी बोट आणि आमच्या छोट्या प्रवासासाठी आम्हाला लागणारे खाद्यपदार्थ देण्याचे ठरविले. दिवस उजाडला आणि आम्हाला स्पेनचा किनारा दिसू लागला. (खरोखर, स्वातंत्र्य ही इतकी इष्ट गोष्ट आहे की, त्या किनाऱ्याच्या दर्शनाने आमची सारी दुःखे आमच्या मनातून एका क्षणात नाहीशी झाली.) ते फ्रेंच लोक खाद्यपदार्थ शिजवू लागले. दुपारी त्यांनी आम्हाला जहाजावर बसविले. पाण्याची दोन पिपे आणि

थोडी बिस्किटे दिली. सुंदर झोरेडाबद्दल कप्तानाला थोडासा पश्चात्ताप वाटू लागला. म्हणून त्याने निरोपाचे वेळी तिला अदमासे चाळीस सोनेरी काढून दिले. आता तिच्या अंगावर जे कपडे होते ते कोणी काढून घेऊ नयेत असे त्याने आपल्या लोकांना बजावले. आम्ही जहाजावर गेलो, ते काही कुरकुर न करता; उलट त्याला धन्यवाद देत. सामुद्र-धुनीकडे जाण्यासाठी ते समुद्रात शिरले. आमचा ध्रुवतारा म्हणजे जमीन. आम्ही आमची वल्ही मारू लागलो. अंधार पडण्यापूर्वी, सूर्यास्ताचे सुमारास, आम्ही जमिनीजवळ जाऊन पोचलो. पण चंद्र ढगांनी झाकलेला होता आणि आकाश अधिकाधिक काळे बनत चालले होते, आणि आम्हाला तर किनाऱ्याची काहीच माहिती नव्हती. म्हणून किनाऱ्यावर उतरण्याचे धाडस करणे आम्हाला सुरक्षितपणाचे वाटले नाही. या संकटातून बाहेर पडावे आणि स्वतंत्र व्हावे अशी इच्छा आमच्यापैकी काहीजणांना इतक्या तीव्रतेने झाली की, एखाद्या निर्जन खडकावरही ते उतरले असते. पण आम्ही उतरलो नाही आणि बार्बेरी व टेट्रुआन यांच्या किनाऱ्यावरील चाचे लोकांच्या लहान लहान नावा टाळण्याचा प्रयत्न केला. रात्र पडल्यावर त्या नावा वल्हवून येतात आणि पहाटे स्पेनच्या किनाऱ्याला लागतात. तेथे लूट मिळवून त्याच दिवशी रात्री ते घरी निजावयास जातात. पण दुसऱ्या मताचा प्रभाव पडला. ते मत म्हणजे हळुहळू होडी वल्हवावी आणि समुद्र व किनारा अनुकूल असतील तर आपण शक्य तेथे शांततेने जमिनीवर उतरावे.

"आम्ही तसेच केले. ऐन मध्यरात्री आम्ही एका मोठ्या टेकडीजवळ गेलो. तिच्या पायथ्याशी वाळूचा किनारा होता. आम्हाला उतरण्यास ती जागा चांगली सोईस्कर होती. येथे आम्ही आमची होडी शक्य तितकी आत नेली आणि एकदाचे जमिनीवर पाय टेकले! तेव्हाचा आमचा आनंद काय वर्णावा? आम्ही सर्वांनी त्या भूमीचे चुंबन घेतले आणि आमची मुक्तता केल्याबद्दल परमेश्वराला साश्रू नयनांनी धन्य-वाद दिले. हे झाल्यावर आमच्याजवळ शिल्लक राहिलेले थोडेफार खाद्यपदार्थ आपल्या-बरोबर घेऊन आम्ही त्या डोंगरावर चढलो. तेथे आम्हाला अधिक सुरक्षित वाटले. आम्ही ज्या भूमीवर उतरलो होतो, तो ख्रिश्चन देशाचा किनारा आहे, असे आमच्या मनाला पटेना आणि त्यावर आमचा विश्वास बसेना.

"दिवस फार उशीरा वर येत आहे असे आम्हास वाटले. मग आम्ही जवळपास वस्ती दिसते काय हे पाहण्यासाठी टेकडीच्या माथ्यावर गेलो. पण आम्हाला कोठेही घर किंवा माणूस किंवा रस्ता दिसेना. आम्ही कोठे आहो हे सांगणारा कोणी तरी माणूस आम्हाला शेवटी भेटेल असे मानून आम्ही पुढे जाण्याचे ठरविले. धारदार खडकामधून बिचाऱ्या झोरेडाला पायी जावे लागत आहे याचे दुःख मला सर्वात अधिक झाले. मी तिला माझ्या खांद्यावरून मधूनमधून नेले असते. पण तिला स्वतःचे हाल सोसताना जितके दुःख होत होते, तितकेच माझे हाल पाहून होत होते. म्हणून माझ्या अंगावर रेलून ती मोठ्या धैर्याने आणि संतोषाने चालत होती. आम्ही सुमारे मैलभर गेलो असू, तोच आम्हाला लहान अलगुजाचा आवाज ऐकू आला. त्यावरून मेंढ्यांचा कळप

जवळपास असावा असे आम्हाला खात्रीने वाटले. आम्ही आजूबाजूस चौफेर पाहिले. तेव्हा शेवटी आम्हाला दिसले की, एका कॉर्क वृक्षाच्या बुंध्याशी एक तरुण धनगर आपल्या चाकूने , अत्यंत सावधानतेने आणि गंभीरपणाने, एक काठी कापून घेत होता. आम्ही त्याला बोलाविले. त्याने वर पाहिले आणि शक्य तितक्या जलदीने त्याने धूम ठोकली. आम्हाला नंतर कळले की, त्याच्या दृष्टीस प्रथम तो फितुर माणूस आणि झोरेडा ही दोघे पडली. त्यांचे पोषाख मूर पद्धतीचे असल्यामुळे त्याला वाटले, बार्बेरीतील सारे मूर आपल्यावर धावून आले आहेत. म्हणून तो जंगलात जाऊन शक्य तितक्या मोठ्या स्वराने ओरडला, " मूर ! मूर ! शस्त्रे घ्या ! शस्त्रे घ्या ! मूर येथे उतरले आहेत." हा ओरडा ऐकून, आम्ही काय करावे, हे आम्हाला कळेना. पण आम्ही असा विचार केला की, या धनगराच्या ओरडण्यामुळे सारा गाव उठेल आणि किनाऱ्यावरील घोडेस्वार आमच्यावर तुटून पडतील. म्हणून आम्ही असे ठरविले की, फितुराने आपला तुर्की वेष टाकून गुलामाचा अंगरखा घालावा. म्हणून आमच्यापैकीच एकाने त्याला आपला अंगरखा उसना दिला आणि आपण स्वतः मात्र तो केवळ सदरा घालून राहिला

" नंतर ईश्वराचा धावा करीत आम्ही, तो धनगर ज्या मार्गाने पळत गेला, तिकडे गेलो. जाताना आम्हाला भीती वाटत होती की, घोडेस्वारांचा हल्ला आपल्यावर होईल. आणि ती भीती चुकीची नव्हती. दोन तासांच्या आत आम्ही टेकड्यावरून मैदानात आलो, तेव्हां आमच्याकडे धावत-दौडत येणारे पन्नास घोडे आम्हाला दिसले. ते पहाताच आम्ही स्तब्ध उभे राहिलो आणि त्यांची वाट पहात राहिलो. ते आमच्याजवळ येताच, त्यांना मूर लोकांऐवजी आम्ही गरीब ख्रिश्चन कैदी दिसलो, तेव्हा त्यांना आश्चर्य वाटले. त्यांच्यापैकी एकाने आम्हाला विचारले, " तरुण धनगराने गावाला धोक्याचा इशारा दिला, त्याचे कारण तुम्हीच काय ? " मी म्हणालो, " होय. " आणि मग, आम्ही कोण आहो, कोठून आलो, हे त्याला सांगू लागलो. पण आमच्यापैकी एकाला, आम्हाला प्रश्न विचारणारा घोडेस्वार कोण आहे हे माहीत होते आणि म्हणून मला पुढे बोलू न देता तो म्हणाला, 'सभ्य गृहस्थहो, देशाच्या या चांगल्या विभागात आपल्याला आणून सोडणाऱ्या ईश्वराला धन्यवाद द्या. कारण, मी चुकत नसेन तर, आपण वेलेझ मॅलॅगाजवळ आलो आहो. पुष्कळ वर्षे कैदेत राहिल्यामुळे माझी स्मरणशक्ती मला सोडून गेली नसेल तर, मला असे वाटते की, महाराज, आम्हाला इतके प्रश्न विचारणारे आपण माझे काका आहा—डॉन पेड्रो बुस्टामेंट आहा."

" त्या ख्रिस्ती गुलामाचे हे बोलणे पुरे होते न होते, तोंच तो गृहस्थ आपल्या घोड्यावरून खाली उतरला आणि त्या तरुण गुलामाला मिठी मारण्यासाठी धावत आला व म्हणाला, " अरे माझ्या लाडक्या पुतण्या, किती आनंदाचा दिवस हा ! मी तुला ओळखले. तू गेल्यामुळे मी आणि तुझी आई नि इतर नातलग यांनी किती तरी वेळा शोक केला आहे ! ते सारे अजून जिवंत असल्याचे तुला आढळेल. तुझ्या भेटीचा आनंद मिळावा म्हणून ईश्वराने त्यांना जिवंत ठेवले आहे. तू अल्जीर्समध्ये आहेस असे

आम्ही ऐकले होते. पण तुझा आणि या साऱ्या सोबत्यांचा वेश पाहून, मला असे वाटते की, काही चमत्कार होऊन तुझ्या सर्वांची सुटका झाली असावी." तेव्हा त्या तरुणाने उत्तर दिले, "तसेच घडले. आमचे सर्व साहसाचे प्रसंग सांगण्यास आपल्याला आता पुरेसा वेळ मिळेल." आम्ही गुलामगिरीतून मुक्त झालेले ख्रिश्चन लोक आहोत हे ऐकून बाकीचे घोडेस्वारही आपापल्या घोड्यावरून उतरले. त्यांनी आम्हाला चार मैलांवर असलेल्या वेलेझ मॅलगा या शहराकडे नेण्याचे कबूल केले आम्ही आमची होडी जेथे सोडली होती, तिकडे त्यांच्यापैकी काहीजण गेले आणि त्यांनी ती होडी बंदरात आणली. बाकीच्यांनी आम्हाला आपल्या घोड्यावर पाठीमागे बसविले. आमच्या कैद्याच्या चुलत्याच्या पाठीमागे झोरेडा घोड्यावर बसली.

"आमच्या धाडसासंबंधी ज्यांनी थोडेफार पूर्वीच ऐकले होते, ते सारे लोक आम्हाला भेटण्यास आले. कैदी मुक्त झाल्याचे त्यांना नवल वाटले नाही; तसेच मूर माणसे कैद झाल्याचे पाहूनही त्यांना काही वाटले नाही. कारण त्या किनाऱ्यावर अशा गोष्टी ते नेहमी पहात होते. पण त्यांना नवल वाटले ते झोरेडाच्या सौंदर्याचे त्या क्षणी तिचे सौंदर्य पूर्णत्वास पोहोचले आहे असे दिसत होते. प्रवासाचा शीण तिला झालेला होता हे खरे, पण ख्रिस्ती प्रदेशात सुखरूप आल्याचा आणि तेथून पुन्हा परत नेले जाण्याचे भय नसल्याचा आनंद तिला इतका झाला होता की, त्यामुळे तिच्या मुद्रेवर मनोज्ञ प्रभा फाकली होती. आणि मी फार पक्षपात करीत आहे असे तुम्हाला वाटत नसेल तर मी धाडसाने म्हणतो की, मी पाहिलेल्या दुनियेत तिच्याहून अधिक सुंदर स्त्री नाही.

"ईश्वराने आमच्यावर मोठी कृपा केली, म्हणून त्याचे आभार मानण्यासाठी आम्ही सरळ प्रार्थना–मंदिरात गेलो. आम्ही आत प्रवेश केल्यावर झोरेडा तेथील चित्रे पाहू लागली, आणि म्हणाली, "लेला मेरियनसारखे पुष्कळ चेहरे इथे दिसत आहेत." आम्ही तिला सांगितले, "ही तिचीच सारी चित्रे आहेत." त्या फितुराने तिला त्या चित्रांची कथा, त्याला सांगता आली तितकी, सांगितली. त्यापैकी प्रत्येक चित्र म्हणजे खरीखुरी लेला मेरियन आहे – आणि ती तुझ्याशी बोलत आहे, असे त्याने वर्णन केले. त्यामुळे तिला त्या चित्राविषयी मोठा आदर वाटू लागला. तिला समज चांगली व स्पष्ट होती. त्यामुळे त्या चित्रासंबंधी आणि प्रतिमासंबंधी जे जे सांगितले गेले, ते सर्व तिला चटकन् आकलन झाले. नंतर आम्ही विभागले गेलो आणि शहरातील निरनिराळ्या घरात राहिलो. पण वेलेझच्या त्या तरुण ख्रिस्ती गुलामाने मला, झोरेडाला आणि फितुराला आपल्या बापाच्या घरी नेले. तेथे त्यांच्या शक्तीप्रमाणे त्यांनी आमची सोय चांगली लावली. आपल्या स्वतःच्या मुलाशी ते वागत, तशाच प्रेमाने ते आमच्याशी वागले.

"वेलेझ येथे सहा दिवस राहिल्यानंतर फितुराला आपल्याला काय माहिती पाहिजे आहे याची जाणीव झाली, तो ग्रॅनडा येथे गेला. धर्माच्या न्यायमंदिराने आपल्याला प्रार्थना-मंदिराच्या गाभाऱ्यात पुन्हा प्रवेश द्यावा अशी त्याची इच्छा होती

बाकीचे खिश्चनही आता बंधमुक्त झाले होते. म्हणून त्याच्यापकी प्रत्येकजण आपल्याला योग्य वाटेल त्या ठिकाणी गेला. झोरेडा आणि मी यांना मात्र कोणाची मदत नव्हती. चाच्याने तिला दिलेले फक्त चाळीस क्राउन आमच्या मदतीस होते. त्यातून मी तिच्यासाठी एक गाढव खरेदी केले. त्या भूमीत उतरल्यापासून मी तिचा पिता व मित्र बनलो होतो – पती नव्हे. माझे वडील जिवंत आहेत काय ? आणि माझ्या भावापैकी कोणी माझ्यापेक्षा अधिक भाग्यवान आहे काय ? हे पहाण्यासाठी आम्ही आता निघालो. ईश्वराने दयाळूपणाने मला झोरेडा दिली आणि तिचा सोबती बनविले, यापेक्षा अधिक मोठे भाग्य मला लाभेल असे वाटत नाही. गरिबीतील अडचणी ती ज्या धैर्याने सहन करीत होती आणि खिश्चन होण्याची जी तीव्र इच्छा ती व्यक्त करीत होती, त्यामुळे मला तिच्याविषयी सतत कौतुक वाटत होते. मी माझ्या सर्व आयुष्यभर तिच्यावर प्रेम करीन आणि तिची सेवा करीन. मी तिचा पती होणार या आशेमध्ये किंचित भय मिसळलेले होते. आमचे स्वागत करणारा कोणी माणूस माझ्या देशात मला आढळेल की नाही आणि तिच्याबरोबर आपले आयुष्य घालविण्यास मला भूमीचा एखादा कोपरा सापडेल की नाही हे अनिश्चित होते. कदाचित काळाने आमच्या घराण्याची उलथा-पालथ केली असेल आणि माझे वडील व भाऊ मृत्यू पावले असतील, मग मला कोण ओळखील ?

"सद्गृहस्थहो, माझ्या धाडसी जीवनाचे हे सार आहे. हे जीवन मनोरंजक आहे की नाही हे तुम्हीच ठरवू शकाल. यापेक्षा मी ते संक्षेपाने सांगितले असते तर बरे झाले असते असे मला वाटते. पण तरीही मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतो की, ही कथा कंटाळवाणी होऊ नये म्हणून मी पुष्कळ प्रसंग गाळले आहेत."



## प्रकरण १५

# खानावळीत नंतर काय घडले त्याचा वृत्तांत आणि इतरही पुष्कळ लक्षणीय घटना

येथे त्या पाहुण्याने आपली गोष्ट संपविली. सर्व मंडळींच्या वतीने त्याला धन्यवाद देण्यासाठी डॉन फर्डिनांड म्हणाला, "कप्तानसाहेब, खरोखर तुमच्या नशिबाने जी आश्चर्यकारक आणि विस्मयकारक वळणे घेतली, ती तर चित्तवेधक आहेतच, पण आपली निवेदन-शैलीही आल्हाददायक आणि शोभादायक असून त्या धाडसी प्रसंगा-इतकीच अलौकिक आहे. त्याबद्दल आम्ही सर्वांनी आपले आभार मानणे अवश्य आहे. आपण आपली कथा पुन्हा सांगितली--मग ती उद्यापर्यंत चालली तरी हरकत नाही-तरी आम्हाला मोठा आनंद होईल असे मला वाटते." त्या पाहुण्याला आपल्या भवितव्याची घडी बसविण्याचे कामी आपण जास्तीतजास्त मदत करू असे कार्डेनियोने आणि इतर मंडळींनी त्याला सांगितले आणि ते इतक्या कळकळीने आणि तळमळीने सांगितले की कप्तानाला त्यांचे प्रेम पाहून मोठा संतोष वाटला. विशेषतः डॉन फर्डिनांड याने असे सुचविले की, "माझा भाऊ मार्क्विस :माझ्याबरोबर आला तर झोरेडाचा धर्मपिता म्हणून काम करील. तसेच शहरात कप्तानाच्या प्रतिष्ठेला शोभणारा जामानिमा करण्यासाठी जरूर त्या साऱ्या गोष्टी मी पुरवीन." त्यांच्या या कृपाप्रसादाबद्दल उत्तम प्रकारे धन्यवाद देऊन कप्तानाने सांगितले, "यावेळी मी आपला कोणताच अनुग्रह स्वीकारू शकत नाही याची क्षमा असावी."

"आता संध्याकाळच्या काळ्या छाया पसरू लागल्या होत्या. तेव्हा खानावळी-पुढे एक गाडी येऊन उभी राहिली. तिच्याबरोबर काही घोडेस्वार होते. त्यांनी तेथे मुक्काम करण्याची इच्छा प्रदर्शित केली. पण साऱ्या खोल्या पूर्णपणे भरलेल्या आहेत, असे घरधनिणीने सांगितले. तेव्हा त्या घोडेस्वारांपैकीं एकाने उत्तर दिले, "तुमच्या खानावळीत दसपट लोक भरलेले असले तरी, तुम्ही माझे धनी न्यायमूर्ती यांचेसाठी जागा रिकामी केलीच पाहिजे. ते गाडीत बसलेले आहेत." हे ऐकून घरधनिणीला फार चिंता वाटली आणि ती म्हणाली, "महाराज, प्रश्न अगदी उघड आहे. घरात एकही बिछाना रिकामा नाही, पण न्यायमूर्तीजवळ एखादा बिछाना कदाचित असेल. तो ते जर आणतील, तर आमच्या घराचा उपयोग आम्ही त्यांना मनापासून करून देऊ आणि मी नि माझा नवरा आमच्या खोलीतून बाहेर येऊन त्यांची सेवा करू." तेव्हा तो

म्हणाला, " तसे करा तर. " यावेळी त्या गाडीतून एक सद्गृहस्थ खाली उतरले. त्यांच्या अंगावरील लांब झग्यावरून आणि मोठ्या बाह्यावरून ते एक प्रतिष्ठित अधिकारी असावेत असे कोणालाही सहज ओळखता येण्यासारखे होते. ते एका तरुणीला, हात धरून घेऊन येत होते; तिचे वय सुमारे सोळा वर्षांचे होते. घोड्यावर बसण्याचा पोषाख तिने केला होता. तिचे सौंदर्य आणि तिची मोहक मुद्रा यामुळे सर्वांचे डोळे कौतुकाने तिच्याकडे वळत होते. तेथे इतर स्त्रिया नसत्या, तर कोणालाही असेच वाटले असते की, तिच्या बाह्य सौंदर्याची बरोबरी करणे कठीण आहे.

ते दाराजवळ आलेले पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, " महाशय, आपण खिन्न न होता या किल्ल्यात प्रवेश करावा आणि ताजेतवाने व्हावे. हा किल्ला लहान आहे आणि त्यात नीट व्यवस्था नाही हे खरे, तरी पण त्यात आपल्याला एक खोली मिळेल, आणि शस्त्रविद्या व विद्या यांना जागा मिळेल. विशेषतः आपल्यासारख्यांच्या शस्त्रविद्या व विद्या मार्गदर्शकांना सौंदर्य प्राप्त करून देतात. या रमणीय युवतीच्या आगमन-प्रसंगी केवळ किल्ल्यांनीच आपले दरवाजे उघडावेत असे नव्हे, तर डोंगरांनीही आपले भक्कम देह दुभंगावे आणि पर्वत-राजींनी आपापली मस्तके लववून तिचे स्वागत करावे. म्हणून महाराज, आत या आणि या नंदनवनात प्रवेश करा. आपण स्वर्गीय सौंदर्याची ही जी पुतळी आणली आहे, तिच्या सांगाती शोभणाऱ्या नक्षत्रासारख्या तरुणी येथे आहेत. येथे आपल्याला मोठमोठे शस्त्रधारी आणि आदर्श सौन्दर्य पहावयास मिळेल. " डॉन क्विक्झोट यांचे हे भाषण, त्यावेळची त्यांची मुद्रा आणि त्यांचा वेष हे सारे पाहून न्यायमूर्तींचा विलक्षण गोंधळ उडाला. न्यायमूर्तींचे आगमन आणि त्यांच्या-बरोबरच्या तरुणीचे लावण्य यांची बातमी कळताच तिला पाहण्यासाठी आणि तिची करमणूक करण्यासाठी तीन स्त्रिया अकस्मात तेथे आल्या, याचेही त्या न्यायमूर्तींना आश्चर्य वाटले. पण डॉन फर्डिनांड, कार्डेनिओ आणि पाद्री हे त्यांच्याशी, आमच्या शिलेदाराच्या भाषेपेक्षा निराळ्या भाषेने बोलले. त्यामुळे त्यांची खात्री पटली की, डॉन क्विक्झोट यांची आकृती आणि वर्तन यामुळे त्यांच्या अतिरेकी स्वरूपाचे व स्वभावाचे काहीच अनुमान करता येण्यासारखे नसल्यामुळे आपण गोंधळात पडलो होतो, पण ही माणसे सभ्य आणि प्रतिष्ठित आहेत. दोन्ही बाजूंची शिष्टाचाराची बोलणी झाल्यावर त्यांनी विचार करून असे ठरविले की, सर्व स्त्रियांनी डॉन क्विक्झोट यांच्या खोलीत निजावे आणि त्यांचे संरक्षण करण्यासाठी पुरुषांनी बाहेर राहावे. त्या स्त्रियांबरोबर आपल्या कन्येने जावे याला न्यायमूर्तींनी संमती दिली. त्यांचा स्वतःचा बिछाना आणि खानावळवाल्याची अंथरुणे यावर सर्वांनी ती रात्र काढण्याचे ठरविले.

न्यायमूर्तींचे प्रथमदर्शन होताच कप्तानाला अशी दाट शंका आली की, आपल्या भावापैकी ते एक असावेत. म्हणून त्याने त्यांच्या एका सेवकाला त्यांचे नाव आणि राष्ट्र विचारले. त्या सेवकाने सांगितले, " त्यांचे नाव ज्यूआन पेरेझ डी व्हीडमा असे आहे आणि त्यांचा जन्म लिओनच्या डोंगरभागात झाला आहे असे कळते. "

ह्या माहितीवरून आणि स्वतःच्या निरीक्षणावरून कप्तानाचे मत पक्के झाले की, विद्याभ्यास करण्याचे ज्याने मान्य केले होते तोच आपला हा भाऊ असावा. तेव्हा त्याने डॉन फर्डिनांड, कार्डेनियो आणि पाद्री यांना एका बाजूस बोलाविले आणि आपल्याला पटलेली ओळख मोठ्या आनंदाने त्याला सांगितली. त्या सेवकाने नंतर असेही सांगितले होते की, "माझ्या धन्याला मेक्सिकोच्या न्यायमंदिरातील न्यायाधीश नेमण्यात आले आहे आणि म्हणून तो इंडीजकडे प्रवास करीत आहे. ती तरुणी ही त्याची एकुलती एक मुलगी आहे. तिची आई बाळंतपणात मेली आणि तिने आपल्या हुंड्याची रक्कम आपल्या मुलीला देऊन टाकली. तिचे वडील अद्याप विधुर आहेत आणि ते अत्यंत श्रीमंत आहेत." हा सारा वृत्तांत त्यांना सांगून कप्तानाने त्यांचा सल्ला विचारला, "मी माझ्या भावापुढे तत्काळ प्रगट होणे चांगले की, माझा पत्ता लागताच न्यायमूर्तींच्या नाडीचे ठोके प्रथम कसे पडतात हे काही मार्गांनी पाहून, ते आपले स्वागत कसे करतील याची अटकळ बांधणे योग्य?" पाद्री म्हणाला, "महाराज, अशा माणसाविषयी अशी शंका का घेता?" कप्तान म्हणाला, "कारण मी गरीब आहे. म्हणून त्यांच्या प्रेमाची खोली कोणत्या तरी मार्गाने जाणण्याची मला इच्छा आहे. मला भाऊ भाऊ म्हणून मानण्यास त्यांना लाज वाटत असेल, तर त्यांच्यापुढे प्रगट होण्यास मला अधिकच लाज वाटेल." तेव्हा पाद्री म्हणाला, "तर मग हे सारे प्रकरण माझ्यावर सोपवा, न्यायमूर्तींचे वर्तन सौजन्याचे व शालीनतेचे दिसते. अहंकाराचा वारा त्यांना मुळीच लागलेला दिसत नाही. तुमचे ते स्वागतच करतील याबद्दल काडीमात्र शंका नको. पण तुमची इच्छा आहे म्हणूनच मी त्यांच्या स्वभावाचा कानोसा घेण्याचा मार्ग शोधतो."

टेबलावर रात्रीचे जेवण आले. कप्तानाशिवाय बाकी सारी माणसे तेथे बसली. कप्तानाने शेजारच्या खोलीत बायकांबरोबर जेवण केले. बाहेर मंडळींचे निम्मेशिम्मे जेवण झाल्यावर पाद्री म्हणाला, "न्यायमूर्तीसाहेब, काही वर्षांपूर्वी मी कॉन्स्टँटिनोपलमध्ये कैदी असताना आपल्या नावाच्या एका गृहस्थाचा परिचय मला झाला आणि त्याची मैत्री लाभल्यामुळे मला आनंद वाटला. स्पेनच्या पायदळातील कोणाही माणसाइतकी त्याची पात्रता होती आणि तो एक धैर्यशाली कप्तान होता. तो जितका शूर होता, तितकाच दुर्दैवी होता." न्यायाधीशाने विचारले, "महाराज, त्याचे नाव काय?" पाद्र्याने उत्तर दिले, "रूई पेरेझ डी व्हीडमा. लिओनच्या डोंगरातील एका शहराचा तो रहिवासी होता. त्याने आपले वडील आणि दोन बंधू नि स्वतः यांच्यामध्ये झालेला एक अत्यंत विचित्र संवाद मला सांगितल्याचे आठवते. कमी दर्जाच्या आणि लौकिकाच्या अशा दुसऱ्या कोणी मला ते संभाषण सांगितले असते, तर ती मी केवळ एक कल्पित कथा मानली असती. त्याने मला सांगितले, "माझ्या वडिलांनी आपल्या मालमत्तेचे तीन समान भाग केले आणि ते आपल्या तीन मुलांना वाटून दिले. केटोच्या मुखी शोभावा असा उपदेश त्यांनी आम्हा तीन भावांना

केला. मी सैनिकाचा पेशा पत्करला आणि त्यात इतके यश संपादन केले की, थोड्याच वर्षांत (केवळ माझ्या शौर्याच्या बळावर) मी एका पायदळाचा कप्तान झालो आणि कर्नल होण्याचाही पुष्कळ संभव होता. पण ज्यावेळी दैव माझ्यावर खैर करील अशी मला सबळ आशा होती, त्याच वेळी दैवाने मला सोडले. लेपँटो येथील संस्मरणीय संग्रामामध्ये पुष्कळ ख्रिश्चन लोकांना आपले स्वातंत्र्य परत मिळाले, पण मला मात्र दुर्दैवाने माझे स्वातंत्र्य गमवावे लागले. मला गोलेटा येथे नेण्यात आले आणि माझ्या नशिबाने पुष्कळ वेडीवाकडी वळणे घेतल्यानंतर मला कॉन्स्टँटिनोपलकडे नेण्यात आले. तेथून आम्हाला अल्जीर्सकडे नेण्यात आले. तेथे माझ्यावर अत्यंत विचित्र संकट कोसळले." नंतर पाद्र्याने कप्तान व झोरेडा यांची सारी कथा धावत्या शैलीने सांगितली. (ती ऐकताना सर्व वेळ न्यायमूर्ती पूर्वीपेक्षा न्यायपीठावर बसून जितके लक्षपूर्वक ऐकत त्याहूनही अधिक उत्सुकतेने ऐकत होते.) त्या दोघांना फ्रेंच लोकानी कसे पकडले आणि अंगावरचे कपडे कसे काढून घेतले हेही पाद्र्याने सांगितले आणि म्हटले, "त्यानंतर त्यांच्याविषयी मला काहीच कळले नाही. ते स्पेनमध्ये गेले का कैदी म्हणून फ्रान्समध्ये नेले गेले, हे मला कधीच कळले नाही."

कप्तान एका कोपऱ्यात उभा राहून ते सारे ऐकत होता आणि पाद्री सारी कथा सांगत असताना आपल्या भावाच्या मुद्रेवर होणारे फेरबदल न्याहाळीत होता. पाद्र्याने ती कथा पूर्ण केल्यानंतर न्यायाधीशाने एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि डोळ्यांत अश्रू आणून तो म्हणाला, "महाशय, आपल्या कथेने माझे हृदय किती हलविले आहे, हे आपल्याला माहीत असते तर माझा हा आवेगाचा अश्रुपात आपण सहजच क्षम्य मानला असता. ज्या कप्तानाचा आपण उल्लेख केला, तो माझा सर्वांत मोठा भाऊ. त्याची शरीरयष्टी अधिक भक्कम असल्यामुळे आणि त्याचे मन अधिक उन्नत असल्यामुळे त्याने युद्धातील लौकिक आणि वैभव यांची निवड केली. आपल्या मित्राने आपल्याला सांगितल्याप्रमाणे, माझ्या वडिलांनी ज्या तीन योजना मांडल्या होत्या, त्यांपैकी सैनिकाचा पेशा ही एक होती. मी विद्याभ्यासाला वाहून घेतले आणि माझ्या धाकट्या भावाने पेरूमध्ये अफाट मालमत्ता खरेदी केली. त्यातून त्याने आमच्या वडिलांना, आपल्या उदार राहणीच्या जीवनाला पुरेल इतके, द्रव्य दिले. तसेच मला माझा विद्याभ्यास चालू ठेवण्यासाठी आणि सध्या मी उपभोगित असलेला दर्जा आणि अधिकार संभाळण्यासाठी त्याने मलाही द्रव्य दिले. माझे वडील अद्याप जिवंत आहेत. पण आपल्या सर्वांत मोठ्या मुलाची काहीच माहिती न मिळाल्यामुळे होणाऱ्या दुःखाने ते दररोज मृत्यु भोगीत आहेत आणि प्रभूची सतत प्रार्थना करीत आहेत की, मृत्यूने माझे डोळे मिटण्यापूर्वी मला त्याची पुनः भेट व्हावी ! माझा मोठा भाऊ इतर बाबतीत विवेकाने वागतो, पण आपल्या वडिलांना आपली स्थिती कळविण्यासाठी – आपला उत्कर्षापकर्ष सांगण्यासाठी – एक ओळही तो लिहीत नाही, हे अत्यंत चमत्कारिक आहे. त्याच्या कैदेची अगदी बारीकशी सूचनाही आम्हाला—

किंवा माझ्या भावाला— कळती तर, कैदेतून मुक्त होण्यासाठी मूर स्त्रीने वेत सोडण्याचा चमत्कार करण्याची वाट पहात त्याला बसावे लागले नसते. आता माझे मन अत्यंत अस्वस्थ झाले आहे. कारण, आपली चोरी लपविण्यासाठी त्या फ्रेंच लोकांनी त्याला ठार केले असेल, या केवळ विचाराने समुद्र-पर्यटनाच्या माझ्या साऱ्या उत्साहावर विरजण पडले आहे. वास्तविक हे पर्यटन मजेने करण्याचे मी ठरविले होते. अरे माझ्या प्रिय बंधो, तू मला कोठे रे भेटशील ? त्याची मला नुसती कल्पना आली तर तुझ्या मुक्ततेसाठी मी माझे प्राण आणि वैभव धोक्यात घालीन ! अरे, बार्बेरीच्या अत्यंत खोल आणि अंधाऱ्या गुहेत तुला लपवून ठेवले असले, तरी तू जिवंत आहेस असे आपल्या वृद्ध पित्याला एकदा का कळले, तर त्याची, माझी आणि माझ्या भावाची सारी संपत्ती तुझ्या मुक्ततेसाठी धाव घेईल ! आणि त्या सुंदर नि उदार झोरेडाला आम्ही किती धन्यवाद द्यावे ! तिच्या उपकाराची फेड आम्ही कशी करावी ! तिला बाप्तिस्मा मिळून तिचा जेव्हा आध्यात्मिक जन्म होईल आणि जेव्हा ती माझ्या भावाशी श्रद्धेने व विवाहबंधनाने संलग्न होईल, तो दिवस किती भाग्याचा ! त्या दिवशी आम्हा सर्वांना किती आनंद वाटेल ! " हे आणि असेच अन्य उद्गार त्या न्यायाधीशाने इतक्या भावनेने आणि आवेगाने उच्चारले की, त्यामुळे प्रत्येकाच्या अंतःकरणात कळवळा उत्पन्न झाला.

आपली योजना सफळ झालेली पाहून पाद्र्याने भावाची भेट आणखी लांबणीवर न टाकण्याचे ठरविले. साऱ्या मंडळींची उत्कंठा शमविण्यासाठी तो स्त्रियांच्या खोलीत गेला आणि झोरेडाला प्रथम पुढे करून आणि तिच्या पाठोपाठ इतर स्त्रियांना जावयास सांगून त्याने दुसऱ्या हाताने कप्तानाला धरले आणि न्यायाधीशापुढे उभे केले व तो म्हणाला, " महाराज, आपले दुःख आवरा आणि आपले हृदय हर्षाने काठोकाठ भरा. आपण ज्याची अत्यंत आतुरतेने वाट पहात आहा, तो आपला हा प्रिय बंधू पहा—आणि त्याबरोबरच त्याची मोहक मोक्षदात्रीही पहा. हा गृहस्थ कॅप्टन व्हीडमा आहे—आणि ही ती देखणी अल्जेरियन आहे. फ्रेंचांनी यांना या दुर्दशेत लोटले आहे. त्यामुळे आपल्या विशाल भावना आणि उदारता व्यक्त होण्यास वाव मिळाला आहे. " न्यायाधीशाला आलिंगन देण्यासाठी कप्तान पुढे गेला, पण त्याला नीट निरखून पाहण्यासाठी न्यायाधीशाने आपल्या दोन्ही हातांनी धरून त्याला दूर उभे केले. त्याची ओळख पटताच त्याने त्याच्या बाहूंमध्ये इतक्या प्रेमाने आणि विपुल अश्रुपाताने उडी घेतली की, सारे प्रेक्षक त्याच्या भावनांशी समरस झाले. ते भाऊ–भाऊ गाढ भावनेने बोलत राहिले. त्यांचे परस्परांवरील प्रेम इतके हृदयस्पर्शी होते, आकस्मिक भेटीचे आश्चर्य त्यांना इतके विलक्षण वाटत होते आणि त्या भेटीमुळे त्यांचा आनंद गगनात इतका मावेनासा झाला होता की, त्याची जाणीव होण्यासाठी केवळ कल्पनेवरच आपण विसंबले पाहिजे. आता ते आपापल्या दैवाची विचित्र वळणे आणि चक्रव्यूह एकमेकांना सांगत होते आणि एकमेकांच्या अंगावरून हात फिरवून आपले बंधुप्रेम आणि प्रेमभावना कळसास पोचवीत होते. एकदा न्यायाधीशाने झोरेडाला आलिंगन दिले आणि

आपले सर्व वैभव तिला अर्पण करण्याची तयारी दाखविली, तर एकदा त्याने आपल्या मुलीला झोरेडास आलिंगन देण्यास लावले. नंतर तो देखणा ख्रिश्चन पुरुष आणि ती सुंदर मूर स्त्री यांचा जो निरागस संवाद झाला, त्याने तर सर्वांच्या हृदयाचा ठाव घेतला आणि त्यामुळे सर्वजण आनंदाने रडू लागले. हे होईपर्यंत डॉन क्विक्झोट अत्यंत दृढपणे सर्व काही पहात होते आणि त्या विचित्र घटनांबद्दल आश्चर्य करीत होते. शिलेदारीशी संलग्न असलेल्या असंभवनीय कल्पनाच या सर्व घटनांना जबाबदार आहेत, असे ते मानीत होते. कप्तान आणि झोरेडा यांनी सर्व मंडळींचा विचार घेऊन आपल्या भावाबरोबर सेव्हिलला परत जाण्याचे ठरविले. नंतर तेथून आपल्या वडिलांना आपली मुक्तता व आगमन कळवावे, म्हणजे ते झोरेडाचा बाप्तिस्मा आणि विवाह पाहण्यासाठी शक्य ते करून इतके दूर येऊ शकतील. न्यायाधीशाला विलंब करणे शक्य नसल्यामुळे ते इंडीजकडे जातील, कारण हिंदी आरमार सेव्हिल येथे न्यू स्पेनला एका महिन्यात जाण्यासाठी तयार होते, असे त्यांनी योजले.

आता सर्व गोष्टी निश्चित झाल्या आणि त्यामुळे सर्व मंडळींना मोठे समाधान वाटले. बराच उशीर झाल्यामुळे सर्वांनी झोपी जाण्याचे ठरविले. ते झोपले असताना, कोणी सुलतानाने किंवा राक्षसाने त्यांच्याजवळील सौंदर्याची मोठी खाण लुटण्यासाठी भयंकर प्रयत्न करू नये म्हणून, डॉन क्विक्झोट यांनी किल्ल्यावर पहारा करण्याचे ठरविले. तेव्हा घरातील साऱ्या माणसांनी त्यांचे आभार मानले. त्यांच्या लहरी स्वभावाची माहिती इतरांनी न्यायाधीशांना दिली, तेव्हा त्यांना मोठी मजा वाटली. सँको पँझा याला उत्तम बिछाना दिला असतानाही तो आपल्या खोगीरावर निजला, पण त्याला झोप आली नाही. म्हणून तो अत्यंत बेचैन आणि चिडचिडा बनला. तेथे निजल्याबद्दल त्याला फार मोठी किंमत कशी द्यावी लागली, ते आपल्याला पुढे कळेल. स्त्रिया आपल्या खोलीत गेल्या आणि बाकीचे सर्वजण विश्रांती घेऊ लागले. डॉन क्विक्झोट किल्ल्याच्या वेशीवर पहारा करण्यासाठी खडे राहिले. इतक्यात एक अत्यंत मधुर स्वर सर्वांच्या कानी अकस्मात पडला. त्या गीताने सर्वांचे चित्त वेधून घेतले. त्यातही डोरोथीचे चित्त अधिकच वेधले गेले. तिच्याजवळ न्यायाधीशाची कन्या डोन्ना क्लॅरा डी व्हीडमा निजली होती. काही वाद्य नसताना इतके सुरेख संगीत कोण गात असेल याची कोणालाच कल्पना येईना. ते गाणे एकदा अंगणातून आल्यासारखे वाटे, तर एकदा तबेल्यातून आल्यासारखे वाटे. अशा वेळी कार्डेनियोने त्यांचे दार हळूच ठोठावले आणि म्हटले, " बायांनो, तुम्ही जाग्या आहा का ? इतके मोहक प्रेमगीत आळविले जात असताना तुम्हाला झोप कशी येते ? एक सेवक किती गोड गात आहे, हे तुम्हाला ऐकू येत नाही काय ? " डोरोथी म्हणाली, " होय, महाराज, आम्ही ते स्पष्टपणे ऐकत आहो." नंतर शक्य तितके लक्ष देऊन डोरोथी पुढील गीत ऐकू लागली:-

□ □

## प्रकरण १६

# तरुण खचरवाल्याची मजेशीर गोष्ट, तसेच त्या खाणावळीत घडलेल्या विचित्र घटना

### एक गाणे

१

संशयांनी नी भयांनी टोलविला जात
प्रीतीच्या तुफान दर्यावर मीं संचार करतो.
सौंदर्याची लूट नि दैवाचें खेळणें होऊन
आरामापासून दूर तसाच बंदरापासूनही,
तरी मीं माझ्या ध्रुवताऱ्याकडे वाट काढीत जात असताना.
माझें हृदय निराशा नाकारते.

२

पण त्या तारकेच्या तेजावर फार वेळा
मेघाप्रमाणें अबोलपणाचें आवरण येतें.
अंधाराचा भेद कर, पुनर्दर्शन दे;
जशी दीप्तिमान आहेस तशीच मंगल हो
जसे तुझे तेजोरश्मि तूं झांकतेस किंवा टाकतेस
तसा तुझा भक्त बुडतो वा तरतो. ”

इतके सुस्वर गीत ऐकण्याची संधी डोन्ना क्लॅरा हिला मिळवून देण्यात फारशी चूक होणार नाही, असे डोरोथीला वाटले. म्हणून तिने तिला एकदा एका, तर पुन्हा दुसऱ्या बाजूला हलकेच स्पर्श केला. तेव्हा ती युवती जागी झाली. डोरोथी म्हणाली, “ तुमच्या विश्रांतीत व्यत्यय आणल्याबद्दल मी तुमची क्षमा मागते. तुम्ही आपल्या आयुष्यात बहुधा केव्हाही एकला नसेल, असा मधुरतम स्वर ऐकण्याचा आनंद मिळावा म्हणूनच मी आपल्याला जागे केले हे लक्षात घेऊन तुम्ही मला सहज क्षमा कराल, अशी मला आशा आहे. ” डोन्ना क्लॅरा अर्धवट जागी झाली होती, त्यामुळे डोरोथी काय म्हणाली, हे तिला पुरे कळले नाही. म्हणून ती म्हणाली, “ तू काय म्हटलेस ते पुनः सांग पाहू. ” डोरोथीने ते सांगितले. त्यामुळे डोन्ना क्लॅरा हिलाही ते गीत ऐकावे

लागले. पण त्या गीताची दोन कडवी त्या गायकाच्या मुखातून तिच्या कानावर येताच तिच्या अंगाचा विलक्षण थरकाप उडाला – जणू काही तिला भयंकर हीव थडथडून भरले आहे. डोरोथीला घट्ट मिठी मारून आणि दीर्घ सुस्कारा टाकून ती मोठ्याने म्हणाली, “ प्रिय बाईसाहेब, तुम्ही मला जागे का केले ? छेः माझे कान बंद झाले आणि ते दुःखद गीत माझ्या कानावर न पडले, तरच मला परम सुख होईल ! ” डोरोथीने विचारले, “ हे कसे ? ते गीत गाणारा तरुण मुलगा खेचरवाला आहे हे तुम्ही ऐकले नाही काय ? ” क्लॅराने उत्तर दिले, “ छेः छेः तसे काही नाही. तो एक तरुण सरदार आहे आणि मोठ्या जिंदगीचा वारस आहे – माझ्या हृदयाचा पूर्ण स्वामी आहे. त्याने जर अव्हेर केला नाही, तर माझे हृदय सदैव त्याच्या अंकित राहील. ”

त्या युवतीचे हे भावनापूर्ण उद्गार ऐकून डोरोथीला विलक्षण आश्चर्य वाटले. तिच्या कोवळ्या वयातील माणसांच्या तोंडून असे उद्गार कधीच निघणार नाहीत अशी तिची कल्पना. म्हणून तिने उत्तर दिले, “ बाई, तुम्ही इतक्या गूढ प्रकाराने बोलत आहा की, मला तुमचे म्हणणे नीटसे कळले नाही. या तरुण गायकाच्या स्वराने तुमच्या मनामध्ये इतका मोठा फेरबदल का घडवून आणला आहे आणि तुमचे हृदय आणि सुस्कारे यांचा अर्थ काय आहे, हे तुम्ही मला अधिक स्पष्टपणे सांगण्याची कृपा केल्याशिवाय मला काहीच कळणार नाही. पण थांबा, तूर्त काहीच सांगू नका. त्याचे गीत श्रवण करण्याचा आनंद गमवावयाचा नाही, असे मी ठरविले आहे. थांबा, तो दुसरे गीत गाऊन आपले मनोरंजन करीत आहे, असे मला वाटते. ” क्लॅरा म्हणाली, “ ठीक आहे. मी थांबते. ” असे म्हणून, त्याचे गीत कानी न पडावे या हेतूने तिने आपले कान झाकले. त्यामुळे डोरोथीला तिचे कौतुक केल्याशिवाय राहावले नाही. ती तो स्वर ऐकू लागली. तेव्हा तिच्या कानी पुढील गीत पडले—

## आशा

### १

हे अजित आशे, भयहारिणी, आणि शूराचा त्याग करणाऱ्या अंतिम सखे,
मानवी चिन्तेच्या शामक सुखदायिनी, मृत्यूपारच्या प्रवासिनी,
धीरसत्त्वे, वायुभक्ष्यदायिनी, दूरमंगलाच्या धीट आश्वासिके,
संजीवनपोषके, सदय प्रलोभिनी, जरी दैव कोपलें नि मित्र गेले,
जरी सिल्व्हिआ माझ्यापासून दूर पळत असली तरी
हे अकारण हर्षसूचके, ना तूं, ना प्रीती माझ्या अत्यभिलाषी हृदयाला
कधीं सोडून जाल.

### २

मरणातच पुनर्जन्म घेणारी फीनिक्स पक्षीण आशा
नभाच्या अफाट वाळवंटांमधून उड्डाण करीत

दैवाच्या द्वेषाची तमा न बाळगतां पुन्हा जिवंत होऊन
आपल्या राखेतून उठूं शकेल;
मग भरारी घेईल नि अभिवचन देईल. जरी व्यर्थ असलें तरी —
त्या गोष्टीचें अभिवचन, कीं जी लाभण्याची आशा
विवेकबुद्धीलाही नसते. केवळ तूं, हे आशे,
आमचा विश्वास गृहीत धरून अजून आम्हाला बांस भरवूं शकतेस,
नि त्यांची तोंडाला मिठीही बसत नाहीं.
आणि अन्याय्य असेल तेव्हां सद्गुणही ( दुर्लक्षित करून )
आमच्या वेदना विलंबित करतेस आणि आनंदकाल जवळ आणतेस.

३

आळशी आरामाच्या आधीन झालेला कोणीही दास
कधीं उदात्त शत्रूंवर विजय मिळवूं शकला नाहीं.
जे शौर्यानें विरोध करण्याचें धाडस दाखवतात त्यांच्यावर
दैवराजाची सर्वात अधिक कृपा असते.
लोक म्हणतात, प्रेमदेव आपले कृपाप्रसाद फार कष्टसाध्य ठेवतो
पण सहज मिळणारा हर्ष कोणाला बहुमोल वाटेल ?
तेव्हां माझ्या रूपगर्वितेच्या मागें मीं जाईन
जरी ती लाजाळु सुंदरी अजूनही नकार देत असली तरी
आतां मीं भूमीवर लोळण घेत आहे हे खरें आहे,
पण तिनें उठवलें तर हा नम्र दास उठूंही शकेल. ''

येथे तो स्वर थांबला. तेव्हा डोन्ना क्लेराचे सुस्कारे चालू होते. त्यामुळे डोरोथीच्या मनात कल्पनातीत उत्कंठा जागृत झाली. इतके हृदयद्रावक गीत आणि त्यामुळे होणारे इतके विलक्षण दुःख यांचे कारण समजून घेण्याची तिला इच्छा झाली. म्हणून तिने तिला विनंती केली, 'तुम्ही सांगत होता तो कथाभाग पुढे चालू करा.' लुसिंडा चोरून ऐकेल या भीतीमुळे क्लॅरा डोरोथीच्या शक्य तितक्या जवळ गेली आणि तिच्या कानाशी तिने आपले तोंड लावले. त्यामुळे आपले भाषण कुणी चोरून ऐकेल ही तिची भीती नाहीशी झाली. तेव्हा ती म्हणाली, " हे गीत ज्याने गाइले, तो ॲरागॉन येथील एका सद्गृहस्थाचा मुलगा आहे. त्याचा बाप मोठा सरदार आहे. तो माद्रिद येथील माझ्या वडिलांच्या घरासमोर रहात असे. हिवाळ्यात आमच्या खिडक्यांना जाड कापडी पडदे लावलेले असत आणि उन्हाळ्यात त्यांना जाळ्या लावलेल्या असत. तरीसुद्धा, कसे कोण जाणे, शाळेत जाणाऱ्या या तरुणाने मला पाहिले—प्रार्थनामंदिरात की दुसऱ्या कोणत्या ठिकाणी, हे मी नक्की सांगू शकत नाही. थोडक्यात म्हणजे तो माझ्या प्रेमात पडला आणि माझ्या घराच्या खिडक्यांसमोर असणाऱ्या आपल्या घराच्या खिडक्यांतून

आपल्या प्रेमाचे प्रदर्शन निरनिराळ्या खाणाखुणांनी माझ्यापुढे करू लागला. त्यावेळी त्याच्या नेत्रातून अश्रूंचा इतका वर्षाव होत असे की, माझा विश्वास–आणि त्याबरोबरच माझे प्रेम–त्याच्यावर एकदम बसले. त्याचे कारण काय हे मला कळले नाही. तो ज्या खुणा करीत असे, त्यांपैकी एक म्हणजे आपले दोन्ही हात जोडणे–म्हणजे माझ्याशी लग्न करण्याची इच्छा प्रदर्शित करणे. मलाही मनापासून तसेच वाटत होते पण मी माझे मनोगत कोणाला सांगू शकत नव्हते. कारण मला आई नव्हती. आणि अशा प्रकरणाची व्यवस्था ज्याच्यावर सोपवावी असेही कोणी माणूस माझ्याजवळ नव्हते. म्हणून त्याच्या खुणा गप्प राहून सहन करणे मला भाग होते. मी फक्त एवढेच करीत असे की, जेव्हा माझे वडील आणि त्यांची माणसे दूरदेशी गेलेली असत, तेव्हा मी खिडक्यांची जाळी किंवा तेल दिलेले कापड किंचित वर उचलीत असे आणि त्यामुळे त्याला माझ्याकडे टक लावून पहाण्यास संधी मिळत असे. याहून दुसरा कोणताही अनुग्रह मी त्याच्यावर केला नाही. पण माझ्या तेवढ्या कृतीमुळे त्याचा आनंद इतका उचंबळून येई की, त्याचे डोके फिरले आहे की काय असेच तुम्हाला खचित वाटले असते. शेवटी माझ्या वडिलांना आपल्या उद्योग–धंद्यामुळे दूर जाणे भाग पडले. पण त्यांच्या जाण्याला काही अवकाश होता. तथापि त्यांच्या प्रयाणापूर्वी या तरुणाला त्याची दाद लागली–कोठून ते मला माहीत नाही. मी त्याला ते सांगणे अशक्य होते. आमच्या प्रयाणाच्या बातमीमुळे तो इतका दुःखी झाला की, तो आजारी पडला. म्हणून आमच्या प्रस्थानाचे दिवशी मी त्याला पाहू शकले नाही किंवा त्याचा निरोप घेऊ शकले नाही. पण दोन दिवस प्रवास केल्या-नंतर आम्ही एका खानावळीत गेलो. तेथून एक दिवसाचा प्रवास केला म्हणजे एक खेडे लागते. मी त्याला खाणावळीच्या दरवाजाशी पाहिले. त्यावेळी त्याचा पोशाख थेट खेचर-वाल्यासारखा होता. माझ्या हृदयावर त्याची पूर्ण प्रतिमा कोरलेली नसती, तर मी त्याला ओळखणे पूर्णपणे अशक्य होते. पण बाईसाहेब, मी त्याला ओळखले. त्याला पाहून मला आश्चर्य वाटले आणि अत्यानंद झाला. माझ्या पित्याला नकळत त्याने मला पाहिले. त्यांचे दर्शन टाळण्याची तो काळजी घेई. आम्ही जेव्हा आमच्या प्रवासात एकमेकांना भेटलो किंवा एखाद्या खाणावळीत गेलो, तेव्हा तो माझ्या वडिलांची भेट टाळत असे. तो कोण आहे हे मला माहीत असल्यामुळे आणि येथपर्यंत पायी येण्यात त्याला किती कष्ट व त्रास पडला असेल याची जाणीव मला असल्यामुळे, माझ्यासाठी त्याला इतके दुःख भोगावे लागत आहे, या विचाराने मी मरण पत्करण्यास तयार आहे. तो जेथे पाय ठेवतो, तेथे मी माझे डोळे झाकून घेते. असा पाठलाग करून तो काय मिळवणार आहे, आणि आपल्या बापापासून स्वतःची सुटका कशी करून घेणार आहे, याची मला कल्पना करवत नाही, त्याच्या बापाचे त्याच्यावर कल्पनातीत प्रेम आहे. कारण तो त्याचा एकुलता एक मुलगा आणि वारस आहे; शिवाय, त्याचे गुणच तसे मोठे आहेत. तुम्ही त्याला पाहिले म्हणजे तुम्हीही ते कबूल कराल. त्याने जी गीते म्हटली ती त्याने स्वतःच रचलेली आहेत असे मी खात्रीने सांगू शकते. कारण तो थोर

विद्वान आणि मोठा कवी आहे असे मी ऐकले आहे. जेव्हा जेव्हा मी त्याला पहाते किंवा त्याचे गाणे ऐकते, तेव्हा एखादे भूत पाहिल्याप्रमाणे मी दचकते आणि कापू लागते. कारण माझ्या वडिलांना त्याची ओळख होईल आणि आमचे परस्परांचे प्रेम त्यांना कळेल असे भय मला वाटते. मी माझ्या साऱ्या आयुष्यात त्याच्याशी एक शब्दही बोलले नाही. तरीही माझे त्याच्यावर इतके नितांत प्रेम आहे की, त्याच्याशिवाय जिवंत राहाणे मला अशक्य आहे. ज्याच्या स्वराने तुम्ही इतक्या मोहित झाला त्या गायकाचा वृत्तांत मी एवढाच देऊ शकते. त्यावरून बाईसाहेब, आपली खात्री पटेल की, आपण म्हणाला त्याप्रमाणे तो खेचरवाला नाही, तर मी पूर्वीच आपल्याला सांगितल्याप्रमाणे तो एका मोठ्या श्रीमंत जिंदगीचा–आणि माझ्या गरीब हृदयाचा–स्वामी आहे."

तिचे हजारदा चुंबन घेऊन डोरोथीने उत्तर दिले, "पुरे, पुरे, प्रिय बाईसाहेब, ते सारे ठीक आहे. आता सूर्योदय होईपर्यंत आपण स्वस्थ राहा. नंतर मी तुमच्या साऱ्या गोष्टी ईश्वराच्या कृपेने व्यवस्थितपणे पार पाडीन. त्या गोष्टींचा प्रारंभ जितका सुरळीत झाला, तितकाच त्यांचा शेवट सुखाचा होईल." क्लॅराने उत्तर दिले, "बाई, तसं कुठलं व्हायला ? माझ्या या प्रेम–प्रकरणाचा अंत कोणता व्हावा, हे मी काय सांगू ? त्याचा बाप अत्यंत श्रीमंत आणि उच्चकुलोत्पन्न आहे. तेव्हा आपल्या मुलाची बायकोच नव्हे, तर दासीसुद्धा होण्यास मी योग्य आहे, असे त्याला कसे वाटेल ? आणखी दुसरी गोष्ट. मला कोणी पृथ्वीचे राज्य दिले, तरी मी माझ्या पित्याच्या संमतीशिवाय लग्न करणार नाही. म्हणून मी आता एवढीच इच्छा करते की, या तरुणाने घरी परत जावे आणि माझा पाठलाग करण्याचे सोडून द्यावे. दीर्घकाळाच्या वियोगानें आणि त्याचे स्थान फार दूर असल्याने, सध्या मी तीव्रतेने भोगीत असलेले दुःख थोडेबहुत कमी होईल. पण मला अशी भीती वाटते की, कदाचित् मी सुचविलेल्या या उपायामुळे माझी अस्वस्थता वाढेलच. खरोखर त्याच्यावरील प्रेमाने माझा कब्जा कसा, कोठून घेतला याची मला कल्पनाच करता येत नाही. आम्ही दोघेही ऐन तारुण्यात आहो आणि आम्हा दोघांचेही वय जवळ जवळ सारखेच आहे, असे मला वाटते. मायकेलमास ( २९ सप्टेंबर )पर्यंत माझे सोळावे वर्ष पूर्ण होणार नाही, असे माझे बाबा म्हणतात."

त्या मुलीचे हे साधे–सरळ बोलणे ऐकून डोरोथीला हसू आवरेना. ती म्हणाली, "लाडके, रात्रीच्या उरलेल्या अल्पशा काळात आपण स्वस्थ राहू या आणि दिवस उजाडला की आपण तुझ्या दुःखांचा गोड शेवट करू या. तसे न झाले तर माझ्या बुद्धीने मला दगा दिला असे म्हटले पाहिजे."

नंतर या दोघींनी निद्रेची आराधना केली. साऱ्या खानावळीत गाढ शांतता पसरली होती. फक्त खानावळवाल्याची मुलगी आणि मेरीटोर्नेस जाग्या होत्या. त्यांना डॉन क्विक्झोट यांच्या स्वभावातील गोम चांगली माहीत होती. घोड्यावर सशस्त्र बसून दाराबाहेर ते पहारा करीत आहेत हेही त्यांना माहीत होते. त्यांच्या मनात एक कल्पना

चमकून गेली. त्यांच्याबरोबर गप्पासप्पा मारून थोडीशी करमणूक करावी आणि त्यांची मुलुखावेगळी मजेशीर भाषणे ऐकावीत असे त्यांना वाटले.

तुम्हाला माहीतच आहे की, त्या साऱ्या खानावळीमध्ये एकच खिडकी होती. तिच्यातून शेत दृष्टीस पडे. ती खिडकी म्हणजे फक्त एक झरोका होता. त्यातून ते आपला केरकचरा टाकीत असत. या झरोक्याजवळ त्या दोन मुली गेल्या. त्यातून त्यांना डॉन क्विक्झोट घोड्यावर स्वार झालेले आणि आपल्या भाल्यावर रेललेले दिसले. ते इतके दीर्घ व दुःखी निश्वास टाकीत होते की, प्रत्येक वेळी जणु काही त्यांचा जीवच त्यांच्या कुडीतून ओढून काढला जात आहे, असे वाटत होते. शिवाय ते सौम्य-प्रेमळ स्वरात पुढील शब्द उच्चारीत आहेत असेही त्यांना आढळले, "हे माझ्या स्वर्गीय टोबोसोच्या डल्सीनिये ! सकल आदर्शांचा स्वर्ग तू आहेस ! विवेकाचे सार नि साध्य तू आहेस ! मधुर मुद्रेची आणि वर्तनाची खाण तू आहेस ! सद्गुणांचे शस्त्रागार तू आहेस ! थोडक्यात म्हणजे या विश्वात जे जे म्हणून विनम्र, सुखद नि लाभदायक आहे, त्या सर्वांची तू प्रत्यक्ष मूर्ती आहेस ! या क्षणी, राणीसाहेब, आपण कोणत्या उदात्त व्यवसायात मग्न असाल ? आपल्यासाठी अनंत संकटे स्वेच्छेने आपल्यावर ओढवून घेणाऱ्या या बंद्या गुलामाचे विचारच आपल्या मनात खेळत असतील, अशी आशा मी धरावी काय ? हे त्रिविधाकार प्रकाशिनी देवते, तिचा काही वृत्तांत मला सांगा. कदाचित् आपण तिच्याकडे मत्सराने यावेळी पहात असाल. आपल्या ऐश्वर्यशाली राजवाड्याच्या वैभवशाली सज्जातून ती चालत जात असेल किंवा आपल्या भाग्यशाली गवाक्षावर हात टेकून चिंतन करीत असेल. तिच्यावरील प्रेमामुळे माझे हे दीन हृदय ज्या भयंकर यातना सोशीत आहे, त्या कशा शमवाव्या आणि गोड करून घ्याव्या आणि तसे करताना, आपला मान आणि वैभव यांना धक्का कसा न लागू द्यावा, याचे चिंतन ती बहुधा करीत असावी. माझ्या दुःखावर सुखाचा कळस कसा चढवावा ? माझ्या चिंता दूर करून मला शांतता कशी मिळवून द्यावी ? माझ्या मृत्युऐवजी मला संजीवन कसे अर्पण करावे ? आणि माझ्या सेवेला कोणते पारितोषिक द्यावे, याचेच चिंतन ती करीत असावी. माझ्या आराध्यदेवतेला— डल्सीनियाला— सत्वर भेट देण्यासाठी, हे तेजस्वी देवते, यावेळी तू आपले घोडे जोडीत असशील असे मला वाटते. हे देवते, माझी तुला अशी विनंती आहे की, तू तिला पाहताच माझ्या गाढ आदरभावाने तिला अभिवादन करावे. मात्र एक लक्षात ठेव की, जेव्हा तू तिच्याकडे पाहशील आणि तिच्याशी बोलशील तेव्हा तिच्या मुखाचे चुंबन घेऊ नकोस. कारण तसे तू केलेस तर माझा तुझ्याविषयीचा मत्सर वाढेल. एका तरुणाने तुझ्याशी कृतघ्नपणा केला, तेव्हां तू प्रेमाने आणि मत्सराने बेभान होऊन धावत सुटली होतीस आणि घामाघूम झाली होतीस— थेसलीच्या मैदानात की पेनियसच्या तीरावर, हे मी विसरलो आहे."

हे त्यांचे शब्द ऐकून खानावळवाल्याच्या मुलीने त्यांना हलकेच हाक मारण्यास सुरुवात

केली. ती म्हणाली, " शिलेदारजी, आपल्या मर्जीस येईल तर इकडे जरा जवळ या. " हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी आपले डोके वळविले. तेव्हा त्यावेळी अत्यंत तेजस्वीपणे विलसत असलेल्या चंद्रप्रकाशात त्यांना असे दिसले की, त्या झरोक्यातून आपल्याला कोणी तरी बोलावीत आहे. ती खानावळ म्हणजे एक वैभवशाली किल्ला आहे हे ते चुकीने मानीत होतेच. त्यामुळे त्या किल्ल्याला योग्य अशी एक विशाल खिडकी ती आहे आणि तिला लोखंडी गज बसविलेले आहेत आणि तिला सोन्याचा पत्रा चढविलेला आहे, असेही त्यांना वाटले. आणि त्यांच्या मनात एकदम अशी कल्पना चमकून गेली की, किल्लेदारिणीची मुलगी – ही रूपवती युवती – आपल्या शरीरसौंदर्याने मोहित होऊन पूर्वीप्रमाणे पुनः आपले प्रणयाराधन करण्यास आलेली आहे. या विचाराने आणि आपण असभ्य किंवा कृतघ्न दिसू नये म्हणून, त्यांनी रोझिनांटचे तोंड वळविले आणि त्या झरोक्यापाशी त्याला नेले. तेथे त्या दोन मुलींना पाहून ते म्हणाले, " सुंदरींनो, आपले प्रेम अस्थानी पडले आहे हे पाहून मला आपली दया येते. आपल्या सौंदर्याला आणि सद्‌गुणांना अनुरूप अशीच इच्छा आपण मनी धरली आहे, हे खरे. परंतु त्या इच्छेचे पात्र बनलेल्या व्यक्तीकडून तुम्हाला योग्य तो प्रतिसाद मिळणे अशक्यप्राय आहे. पण त्या अभागी शिलेदाराने तुमच्या प्रेमाचा स्वीकार केला नाही म्हणून तुम्ही त्याचा धिक्कार कोणत्याही प्रकारे करता कामा नये. कारण, ज्या देवतेने प्रथम दर्शनीच त्याच्या हृदयाचा पूर्ण ताबा घेतला आहे, तिच्याशिवाय दुसऱ्या कोणाही तरुणीचा दास होण्यास तो प्रेमभावनेमुळे पूर्णपणे असमर्थ आहे. म्हणून हे अबलोत्तमे ! मला क्षमा करा आणि आपल्या दालनात परत जा. यापुढे प्रेमाची आर्जवे करून तू मला कृतघ्न किंवा असभ्य ठरवू नकोस, अशी माझी तुला विनंती आहे. पण प्रेमाचा विषय बाजूस ठेवला तर मी तुझी कोणती तरी सेवा करू शकेन, असे आत्मीयतेच्या भावनेमुळे तुला वाटत असेल, तर तशी सेवा करण्याची आज्ञा तू मला बेशक कर. ती आज्ञा मानण्यासाठी मी कोणताही स्वार्थत्याग करीन – सर्पमय असलेला मेडुसाचा केशकलाप किंवा काचेच्या कुपीत कोंडून ठेवलेले सूर्यकिरण – हेही मी तत्काळ तुला आणून देईन, असे येथे नसलेल्या पण अत्यंत मोहक अशा माझ्या वैरिणीची शपथ घेऊन मी तुला सांगतो. "

मेरिटोर्नेसने उत्तर दिले, "शिलेदारजी, माझ्या मैत्रिणीला यापैकी काहीही नको." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "मग त्यांची आज्ञा तरी काय आहे ?" मेरिटोर्नेसने उत्तर दिले, " फक्त आपल्या सुंदर हाताचा स्पर्श व्हावा इतकीच. आपली अब्रू धोक्यात घालून ती येथे ज्या उत्कट भावनेने आली आहे, ती थोडीफार तरी तृप्त व्हावी ही इच्छा. माझा धनी – म्हणजे तिचा बाप – याला जर हे कळले तर तो कमीत कमी तिचा एक तरी सुंदर कान कापील." डॉन क्विक्झोट ओरडले, " अरे वा ! असे करण्यास तो धजतो काय ! पण तसे धारिष्ट तो करणार नाही, हे मी जाणतो. कारण आपल्या प्रेमळ कन्येचा कोमल अवयव छाटून टाकण्याचे पाप जो करील, त्या पित्याला अत्यंत दुःखाचे मरण पत्करावे लागेल." ते आपली इच्छा पूर्ण करतील, याविषयी मेरिटोर्नेसला

काडीमात्र शंका राहिली नाही. तिची योजना परिपूर्ण झाली. ती एका क्षणात तबेल्याकडे गेली आणि सँको पँझाच्या गाढवाची दोरी त्या झरोक्यापाशी तिने आणली. तोपर्यंत डॉन क्विक्झोट रोझिनांटच्या खोगीरावर उभे राहिले. हेतू हा की, ती लुब्ध बाला त्या बंदिस्त खिडकीमध्ये बसलेली असेल, तर आपल्याला तेथे सुखाने जाता यावे. नंतर हात वर करून ते तिला म्हणाले, " बाईसाहेब, पकडा माझा हात. पृथ्वीवरील सर्व दुष्टांचा तो कर्दनकाळ आहे असे मी म्हणतो. या माझ्या हाताला आतापर्यंत कोणाही स्त्रीचा स्पर्श झालेला नाही – फार काय, माझ्या सर्व शरीरावर पूर्ण स्वामित्व असलेल्या स्त्रीचाही स्पर्श झालेला नाही. त्याचे तुम्ही चुंबन घ्यावे म्हणून मी तो पुढे केलेला नाही, तर त्या हातातील शिरांचे, स्नायूंच्या बळाचे आणि धमन्यांच्या विस्ताराचे स्वरूप आपल्याला कळावे, हा माझा हेतू आहे. ते कळल्यावर आपल्या लक्षात येईल की, असा भक्कम बाहू ज्याचा आहे, तो हात किती बलशाली असेल. " तेव्हा मेरिटोर्नेसने उत्तर दिले, " ते आता आपण पाहूच. " आणि तिने त्याच्या मनगटावर फास केलेली दोरी फेकली. नंतर झरोक्यातून खाली उतरून तिने त्या दोरीचे दुसरे टोक दाराच्या कुलपाला घट्ट बांधले. तिने आपल्या मनगटावर दोरीचे जे कडे फेकले, ते फार खडबडीत असल्याचे डॉन क्विक्झोट यांना जाणवले आणि ते म्हणाले, " तुम्ही माझ्या हाताचा सन्मान करण्याऐवजी अपमान करीत आहात असे दिसते. पण तुम्ही त्याचा उपयोग इतक्या कठोरपणे करू नये अशी माझी विनंती आहे. तुमच्याविषयी मला काही प्रेम वाटत नाही हे त्याचे कारण नव्हे. तुम्ही आपला सारा तुफानी सूड एवढ्या लहानशा अवयवावर उगवावा, हे न्यायाचे नाही आणि योग्यही नाही. जे खरोखर प्रेम करतात ते आपला सूड उगविताना इतके कठोर होत नाहीत हे लक्षात घ्या. " पण तिने त्यांच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. कारण मेरिटोर्नेसने त्यांना घट्ट बांधून घातल्याबरोबर, ती आणि तिची कटवाली मैत्रीण यांनी तेथून पळ काढला. त्यावेळी हसून हसून त्यांचे पोट दुखत होते. डॉन क्विक्झोट यांना इतके पक्के बांधले होते की, त्यातून सुटका करून घेणे त्यांना अशक्य होते.

मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, डॉन क्विक्झोट रोझिनांटच्या खोगिरावर उभे होते आणि त्यांनी आपला सारा हात झरोक्यात घातलेला होता. त्याला बांधणारा दोर कुलपाला आवळलेला होता. त्यांना भय इतकेच होते की, रोझिनांट जरा इकडे तिकडे झाला तर आपण खाली कोसळू आणि हाताने लोंबकळत राहू. म्हणून त्यांनी काडीमात्र हालचाल केली नाही. रोझिनांटचा स्वभाव इतका शांत–सौम्य होता की, त्याला कोणी जोराने हाकलल्याशिवाय तो स्वेच्छेने युगानुयुगे जागचा कधी हालणार नाही, अशी अटकळ त्यांना सहज करता आली असती. सारांश, आपल्याला पक्के बांधलेले आहे आणि स्त्रियांनी सोडलेले आहे, हे पाहून शिलेदारजींनी तत्काळ असा निष्कर्ष काढला कीं, हे सारे जादूटोण्याने घडून आले आहे. पूर्वीच्या प्रसंगी याच किल्यात त्या जादूगार मूरने ( हमालाने ) आपल्याला यथेच्छ बडविल्याचे त्यांना आठवले. तेव्हा ते आपल्या

अविचाराला आणि मूर्ख वर्तनाला शिव्याशाप देऊ लागले. पूर्वी याच किल्ल्यातून आपण मोठ्या अडचणीतून सुटका करून घेतली असताना पुन्हा दुसऱ्यांदा येथे येण्याचे साहस करावे हा अविचार नव्हे तर काय ? असे ते मनात म्हणू लागले. जाता जाता हे सांगितले पाहिजे की, साऱ्या शिलेदारमंडळींचा असा संकेत असे की, एखाद्या साहसी प्रसंगात त्यांना एकदा अपयश आले तर, तो प्रसंग आपला नव्हेच अशी खूणगाठ मनाशी बांधून त्या प्रसंगाची पूर्तता करण्याचे काम दुसऱ्या कोणावर तरी सोपवावे आणि आपण ते काम पुन्हा हाती घेऊ नये. असे असले तरीसुद्धा त्यांनी आपला हात मागे घेण्याचा आणि स्वतःला बंधमुक्त करण्याचा प्रयत्न केला, पण त्यांना इतके घट्ट बांधले होते की, त्यांचा तो प्रयत्न फसला. रोझिनँट हालचाल करील या भीतीने त्यांनी आपला हात मोठ्या काळजीने हलकेच मागे घेण्याचा प्रयत्न केला आणि नंतर खोगिरावर बसण्याचा बेत केला, पण व्यर्थ. त्यांनी उभे तरी राहिले पाहिजे किंवा आपला हात खंडणी म्हणून त्या झरोक्यात ठेवला पाहिजे. अर्मेडिसची तलवार आपल्याला मिळावी असे शंभरदा त्यांच्या मनात आले. कारण त्या तलवारीवर कोणाच्याही जादूचा प्रभाव पडत नसे. नंतर त्यांनी आपल्या नशिबाला शिव्याशाप दिले.

या जादूच्या प्रभावामुळे आपल्याला दीर्घ काळ तेथे अडकून पडावे लागेल असे त्यांना खरोखर वाटले आणि त्यामुळे जगाची केवढी मोठी हानी होईल, याचा विचार ते करू लागले. नंतर त्यांच्या मनात वंद्य डल्सिनिया पुनः नव्याने अवतरली. मग त्यांनी आपला विश्वासू सेवक सँको पँझा याला हाका मारण्यास सुरवात केली. त्याने आपल्या गाढवाच्या खोगिरावर ताणून दिली होती आणि तो गाढ झोपी गेला होता. आपल्या आईच्या पोटात गर्भवास सोशीत असताना तिला किती वेदना झाल्या असतील याची स्वप्ने तो पहात होता. त्यानंतर पिशाच्च-विद्या जाणणारे लिगँजे व आल्क्विफ् यांच्या सहाय्यासाठी आमच्या दुर्दैवी शिलेदाराने त्याचा धावा केला. शेवटी सकाळ उजाडली, तेव्हां निराशा आणि गोंधळ यांच्या तावडीत सापडून ते बैलाप्रमाणे डरकाळ्या फोडीत होते. कारण सूर्यप्रकाशामुळे आपल्या वेदना कमी होतील किंवा नाहीशा होतील, अशी आशा त्यांना मुळीच वाटत नव्हती. आपल्यावर कोणी तरी जादू केली आहे याची बालंबाल खात्री त्यांना वाटत होती आणि म्हणून आपल्या वेदना अनंत काळ टिकणार असे ते मानीत होते. रोझिनांट हा एखाद्या पर्वताप्रमाणे अचल आहे हे पाहून त्यांचे असे मत बनले की, आपण किंवा आपल्या घोड्याने काहीही खाता-पिता कामा नये व झोपही घेता कामा नये. आपली ग्रहदशा संपेपर्यंत किंवा एखाद्या अधिक प्रभावी मांत्रिकाने या जादूचा नायनाट करीपर्यंत आपल्याला याच स्थितीत रहावे लागेल, असा त्यांचा पक्का ग्रह झाला.

पण त्यांचे हे मत चुकीचे होते. कारण सूर्योदय होतो न् होतो तोच चार घोडेस्वार तेथे आले. त्यांचे पोषाख लष्करी थाटाचे होते आणि त्यांच्या केसांची झुलपे त्यांच्या खोगिराच्या टोकापर्यंत लोंबत होती. खानावळीचा दरवाजा बंद आहे असे पाहून

त्यांनी मोठमोठ्याने हाका मारण्यास आणि दार ठोठावण्यास सुरवात केली. तेव्हा पहाऱ्यावर उभे असलेल्या डॉन क्विक्झोटनी त्यांना पाहून उग्र मुद्रेने व करड्या स्वराने बजावले, “ शिलेदारांनो–किंवा त्यांच्या सेवकांनो !–अथवा जे कोणी तुम्ही असाल ते !–या किल्ल्याच्या वेशीची दारे ठोठावू नका. कारण तुम्हाला हे माहीत असेल की, जे लोक आत आहेत, ते या रात्रीच्या वेळी विश्रांती घेत आहेत. त्यांना या वेळी आपला किल्ला उघडण्याची सवय नाही. पृथ्वीतलावर सूर्यदेवाचा प्रकाश पडेपर्यंत ते किल्ल्याचे दरवाजे उघडणार नाहीत. म्हणून परत जा आणि स्वच्छ सूर्य–प्रकाश पडेपर्यंत वाट पहा. त्यानंतर त्यांनी तुम्हाला दरवाजे उघडून आत येणे हे योग्य होईल की नाही, हे आम्ही ठरवू. ” तेव्हा त्यांच्यापैकी एकजण ओरडला, “ काय सैतान आहे हा ! अरे, हा काय किल्ला आहे, म्हणून आम्ही इतकी बंधने पाळली पाहिजेत ? दोस्ता ! तू जर खानावळवाला असशील तर आमच्यासाठी दार उघडण्यास आतील लोकांना सांग अशी माझी विनंती आहे. आम्ही घाईने चाललो आहोत आणि आमच्या घोडयांना चारा-पाणी देण्यापुरतेच आम्ही थांबणार आहोत–अधिक काळ आम्ही थांबू शकत नाही. ”

डॉन क्विक्झोट यांनी विचारले, “सभ्य गृहस्थहो, मी खानावळवाल्यासारखा दिसतो काय ? ” त्यांच्यापैकी दुसऱ्याने उत्तर दिले, “ तू कोणासारखा दिसतोस हे मी सांगू शकत नाही. पण या खानावळीला किल्ला म्हणून संबोधणारा तू मूर्खासारखे बोलतोस हे मात्र खचित. ”डॉन क्विक्झोट उत्तरले, “ हा किल्लाच आहे–आणि या प्रदेशातील तो एक उत्तम किल्ला आहे. जिने आपल्या हाती राजदंड धारण केला होता आणि जिच्या शिरावर मुकुट होता अशी एक व्यक्ती या किल्ल्यात आहे. ” तेव्हा एका प्रवाशाने उत्तर दिले, “ अगदी याच्या उलट तू बोलला असतास तर ते अधिक योग्य झाले असते. तिच्या शेपटीत राजदंड आणि तिच्या हातात मुकुट, असे म्हणावयास हवे होते.पण कदाचित् फिरती नाटक–मंडळी आत असण्याचा संभव आहे. तू म्हणतोस तसले राजदंड धारण करणारे आणि मस्तकावर मुकुट चढविणारे लोक नाटकमंडळीत असतात. राजदंड किंवा मुकुट धारण करण्याच्या योग्यतेचा कोणताही माणूस असल्या क्षुद्र खानावळीत मुक्काम करण्याची मेहेरबानी करील असे मला वाटत नाही. येथे गडबड, गोंगाट काहीच नाही. “ डॉन क्विक्झोट म्हणाले, “ अरे, तुला जगाचा फारसा अनुभव नाही. शिलेदारीमध्ये वारंवार जे अकल्पित प्रसंग घडून येतात, त्याची तुला काहीच कल्पना नाही, ही दुःखाची गोष्ट आहे. ” डॉन क्विक्झोट यांच्याशी असा कंटाळवाणा संवाद करणाऱ्या माणसाचे सोबती इतका वेळ चाललेल्या त्यांच्या बालिश वटवटीला कंटाळून गेले आणि म्हणून ते मोठ्या आवेशाने दरवाजाकडे गेले आणि मोठ्या त्वेषाने तो दरवाजा ठोठावू लागले. त्यामुळे खानावळवाला आणि त्याचे पाहुणे दोघेही जागे झाले. यजमानाने उठून त्या पाहुण्यांना विचारले, “ दाराशी कोण उभे आहे ? ”

मध्यंतरी, दुःखी व खिन्न असलेल्या रोझिनांटने आपल्या उभ्या असलेल्या धन्याचा भार सहन केला, त्यावेळी त्याचे कान खाली लोंबत होते आणि तो काही

हालचाल करीत नव्हता. ती चार माणसे ज्या घोड्यावर स्वार होऊन आली होती, त्यांपैकी एक घोडा रोझिनांटकडे गेला आणि त्याला हुंगू लागला. रोझिनांट अगदी लाकडी ठोकळ्यासारखा झालेला असला, तरी तो हाडामांसाचा खरा प्राणी होता म्हणून त्यालाही त्या घोड्याला हुंगण्याशिवाय राहवले नाही. तो घोडा त्याला समाधान देत होता. पण रोझिनांट आपल्या जागेवरून तिळभर हालला असेल–नसेल तोच डॉन क्विक्झोट यांचे एकत्र जुळलेले पाय खाली घसरले आणि ते खोगिरावरून खाली कोसळले. त्यांच्या मनगटाला दोर घट्ट बांधलेला नसता तर ते जमिनीवर खात्रीने पडले असते. पण त्या दोरामुळेच त्यांना कल्पनातीत यातना भोगाव्या लागल्या. आपला हात कापला जात आहे की आपला बाहू आपल्या शरिरापासून निखळून टाकला जात आहे, याची त्यांना काही कल्पना करता येईना, परंतु ते जमिनीपाशी इतक्या जवळ लोंबकळत होते की, आपल्या पायाच्या टोकांनी ते जमिनीला स्पर्श करू शकले असते. अशा अवस्थेमुळे त्यांच्या यातनात भरच पडली. कारण आपले पाय जमिनीवर पूर्णपणे टेकण्या-साठी किती थोडे अंतर तोडावे लागत आहे हे पाहून त्यासाठी ते शक्य तितकी धडपड करू लागले. शिक्षेदाखल हातपाय बांधून खाली लोंबकळणारे लोक आपले अवयव ताणून भूमीला स्पर्श करण्याची आशा मनात धरतात आणि तसूभर पुढे गेले की आपण भूमीवर पोहचू शकू अशा भ्रमात असतात, त्यांना अधिकच दुःख भोगावे लागते, तशीच अवस्था डॉन क्विक्झोट यांची झाली.



## प्रकरण १७

# खानावळीतील विलक्षण व अश्रुतपूर्व साहसी प्रसंग (पुढे चालू)

डॉन क्विक्झोट यांच्या केविलवाण्या किंकाळ्या ऐकून खानावळवाला लगेच दारापाशी आला आणि त्याने घाईने दार उघडले. त्यांची भयंकर गर्जना ऐकून त्याची घाबरगुंडीच उडाली आणि ते पाहुणेही फार चकित झाले. मेरिटोर्नेसही त्या किंकाळ्या ऐकून जागी झाली आणि त्याचे कारण तिने बरोबर ताडले. ती थेट माळयावर धावत गेली आणि तिने तो दोर सोडला व डॉनला बंधमुक्त केले. तेव्हा ते जमिनीवर दाणकन् आदळले—त्यांनी तिला जणू लोटांगणच घातले! त्यांच्या या दुर्दशेचे कारण समजून घेण्यासाठी खानावळवाला व पाहुणे त्यांच्याभोवती तावडतोब गोळा झाले. त्यांच्या प्रश्नाकडे लक्ष न देता त्यांनी आपले मनगट मोकळे केले, जमिनीवरून उडी मारली, रोझिनांटवर स्वारी भरली, आपले निशाण घट्ट धरले, आपला भाला हातात घेतला आणि मोठी चक्कर मारून ते तेथे दौडत आले व म्हणाले, "माझ्यावर जादूचा प्रयोग झाला तो योग्यच झाला, असे म्हणण्याचे, जाहीर करण्याचे किंवा सिद्ध करण्याचे जो कोणी धैर्य दाखवील, त्याला मी (राजकन्या मिकोमिकोना हिने मला अनुज्ञा दिली तर) सांगेन की, तू खोटे बोलत आहेस आणि हे माझे विधान सिद्ध करण्यासाठी मी तत्काळ द्वंद्वयुद्ध करीन."

डॉन क्विक्झोट यांचे हे शब्द ऐकून ते प्रवासी आश्चर्यचकित झाले, पण त्यांचे आश्चर्य यजमानाने दूर केले. त्याने त्यांना सांगितले, "अशा प्रकारची वेताल बडबड हे नेहमीच करतात. त्यामुळे त्यांच्याकडे लक्ष देण्याचे काही कारण नाही." तेव्हा त्यांनी त्या खानावळवाल्याला विचारले, "सुमारे पंधरा वर्षांचा आणि खेचरवाल्याचा पोषाख केलेला एखादा तरुण तुमच्या घरात राहिला आहे काय?" असा प्रश्न विचारून त्यांनी डोन्ना क्लॅराच्या प्रेमिकाच्या खाणाखुणा आणि लक्षणेही सांगितली. खानावळवाल्याने त्यांना सांगितले, "येथे येणाऱ्या असंख्य पाहुण्यांमध्ये अशी एखादी व्यक्ती मला नकळत येऊन जाईलही." पण न्यायाधीश ज्या गाडीत बसले होते ती गाडी एका पाहुण्याच्या दृष्टीस योगायोगाने पडली. तेव्हा तो आपल्या सोबत्यांना हाक मारून म्हणाला, "सभ्य गृहस्थहो, ज्या गाडीच्या मागोमाग माझा तरुण धनी जात आहे असे आपल्याला सांगण्यात आले, ती गाडी ही पहा येथे आहे. माझा धनी येथेच असला पाहिजे हे नक्की. आता आपण वेळ वाया घालविता कामा नये. एकाने दरवाजावर पहारा ठेवावा

आणि बाकीच्यांनी घरात जाऊन त्याचा शोध घ्यावा. पण थांबा, थांबा, घराच्या पिछाडीस कोणी तरी जावे, नाही तर तो तेथून निसटून जाईल." दुसरा माणूस म्हणाला. "कबूल!" आणि नंतर ते सर्वजण सांगितल्याप्रमाणे जाऊन उभे राहिले. त्यांनी वर्णन केलेल्या तरुणाचा शोध ते करीत आहेत हे खानावळवाल्याच्या ध्यानात आले. पण ते इतक्या दक्षतेने शोध का करीत आहेत याचे कारण न कळल्याने तो बुचकळ्यात पडला.

हे होईपर्यंत सूर्य-प्रकाशामुळे आणि डॉन क्विक्झोट यांच्या आरोळ्यामुळे सारे घर जागे झाले होते—विशेषतः क्लॅरा व डोरोथी. त्यांना रात्री झोप फारच थोडी लागली होती. आपला प्रियकर इतक्या जवळ आहे या विचाराने एकीला झोप लागली नव्हती. तर त्याला पाहण्याच्या तीव्र इच्छेमुळे दुसरीला झोप आली नव्हती. ते प्रवासी आपल्याकडे किंवा आपल्या आव्हानाकडे मुळीच लक्ष देत नाहीत हे पाहून डॉन क्विक्झोट यांचा संताप व त्वेष उफाळून येत होता. त्यांनी त्यांचेवर हल्ला चढवून त्यांचेकडून जाब घेतला असता, नाही तर त्यांना ठार केले असते. पण शिलेदारीचा नियम असा आहे की, एक कार्य पूर्ण केल्याशिवाय दुसरे कार्य त्याने हाती घेऊ नये. राजकन्या मिकोमिकोनाला सिंहासनावर पुन्हा प्रस्थापित करण्याच्या कार्यात ते गुंतलेले होते, आणि म्हणून दुर्दैवाने त्यांचे हात बांधलेले होते, म्हणून त्यांना हल्ला करण्यापासून माघार घेणे भाग पडले. त्या चार प्रवाशांच्या चलाख तपासाचा शेवट काय होतो याची वाट पहात ते बसले.

त्या प्रवाशांपैकी एकाला तो तरुण मनुष्य सापडला. पायदळातील सैनिकाजवळ तो गाढ झोपलेला होता. आपल्यामागून कोणी येत आहे किंवा आपला तपास कोणी करीत आहे हे त्या तरुणाच्या स्वप्नातही नव्हते. त्याचा हात ओढून तो प्रवासी ओरडून म्हणाला, "वा वा! डॉन लेव्हिस, तुमच्या अंगावर उंची कपडे होते आणि तुमच्यासारख्या थोरामोठ्यांना जे शोभून दिसत होते, तेच हे कपडे खरोखर आहेत. तुमच्या आईने तुमचे संगोपन ज्या काळजीने आणि कोमलतेने केले, त्याला अत्यंत अनुरूप असाच हा बिछाना आहे." त्या तरुणाने आपले पेंगाळलेले डोळे चोळले आणि त्या प्रवाश्यावर ते एकाग्रतेने रोखले, तेव्हा आपल्या पित्याचा हा एक सेवक असल्याचे त्याने तत्काळ ओळखले. त्यामुळे आश्चर्याने तो स्तंभित झाला. तो प्रवासी पुढे म्हणाला, "महाराज, आता एकच मार्ग आहे—आणि तो म्हणजे आपण धैर्य धरून आमच्याबरोबर आपल्या पिताजींकडे परत यावे. आपली भेट झाली नाही तर त्यांचेवर मृत्यू ओढवेल हे निश्चित." डॉन लेव्हिसने विचारले, "मी असे वेषांतर करून या वाटेने आलो हे माझ्या वडिलांना कसे कळले?" सेवकाने उत्तर दिले, "आपण आपला बेत आपल्या एका सहाध्यायाला सांगितला होता. आपण नाहीसे झाला म्हणून आपल्या पिताजींनी जो शोक केला, तो ऐकून त्या सहाध्यायाचे हृदय विरघळले आणि त्याने आपला बेत उघड केला. तेव्हा त्या भल्या वृद्धाने आपल्या शोधार्थ चार माणसे पाठविली. आम्ही सारेजण येथे आपल्या सेवेस सादर आहोत. महाराज, या वेळी आम्ही अत्यंत आनंदात आहोत. आमचे वृद्ध धनी आमचे मनापासून स्वागत करतील. त्यांची

ज्याचेवर अपार प्रीति, त्या आपल्याला आम्ही परत त्यांचेकडे नेले म्हणजे त्यांना किती हर्ष होईल!" डॉन लेव्हिस म्हणाला, "तसे झाले तर मला स्वर्ग-सुख लाभेल." तो प्रवासी म्हणाला, "महाराज, आपल्या वडिलांकडे परत जाण्यापेक्षा अधिक सुखाचे आपल्याला काय आहे? चला, चला, महाराज, अधिक काही बोलू नका. तुम्ही घरी आलेच पाहिजे—नव्हे, तुम्ही घरी येणारच!"

डॉन लेव्हिसजवळ पायदळातील जो सैनिक निजला होता, तो हा वादविवाद ऐकून उठला. तोपर्यंत कपडे घालून आलेल्या डॉन फर्डिनांड, कार्डेनियो वगैरे लोकांना त्याने सारा वृत्तांत सांगितला, आणि त्या तरुणाला डॉन ही पदवी कशी मिळाली आणि आपले संभाषण काय झाले, हेही सारे त्याने निवेदन केले. त्याच्या मधुर स्वराने पूर्वीच मोहित झालेले ते लोक त्याची परिस्थिती सांगोपांग जाणून घेण्यास उत्सुक होते, आणि त्याचेवर कोणी अत्याचार केल्यास त्याला मदत करण्यास सिद्ध होते. तो तरुण अद्यापि आपल्या वडिलांच्या सेवकाशी जेथे हुजत घालत होता, तेथे ते सर्वजण ताबडतोब गेले.

या वेळेपर्यंत डोरोथी आपल्या खोलीतून बाहेर आली होती, तिच्याबरोबर डोन्ना क्लॅरा मोठ्या गोंधळलेल्या अवस्थेत बाहेर आली. डोरोथीने कार्डेनियोला एका बाजूस बोलावले आणि तो गायक व डोन्ना क्लॅरा यांच्यासंबंधीचा वृत्तांत संक्षेपाने सांगितला. आपल्या वडिलांचे नोकर आपल्यासाठी येथे आले आहेत असे त्याने तिला सांगितले, ते त्यांचे संभाषण डोन्ना क्लॅरा हिने चोरून ऐकले. तेव्हा तिला अत्यंत आश्चर्य वाटले. डोरोथीने धावत जाऊन तिला धरले नसते, तर ती जमिनीवर कोसळलीच असती. या प्रकरणाचा शेवट यशस्वी व चांगला लावण्याचे वचन देऊन कार्डेनियोने डोरोथीला त्या अस्वस्थ स्त्रीसह आपल्या खोलीत जाण्यास सांगितले. डॉन लेव्हिस याचा पाठलाग करीत आलेले ते चार घोडेस्वार आता त्याचेजवळ गेले आणि विलंब न करता परत येण्याविषयी व आपल्या पित्याला संतुष्ट करण्याविषयी त्याला आग्रह करू लागले. त्याने उत्तर दिले, "हे अशक्य आहे. मला प्रथम एक कार्य तडीस न्यावयाचे आहे आणि त्यावर माझी प्रतिष्ठा आणि सध्याचे नि पुढचे सारे सौख्य अवलंबून आहे." तेव्हा ते सेवक त्याला निक्षून म्हणाले, "आता आपण सापडला आहा, तेव्हा आपल्याशिवाय आम्ही घरी परत जाणार नाही. आपण आला नाही तर आपल्याला न्यावे लागेल." तेव्हा त्या तरुणाने उत्तर दिले, "मला ठार मारल्याशिवाय तुम्ही मला नेऊ शकणार नाही." यानंतर सारीच माणसे त्या वादविवादात सामील झाली— कार्डेनियो, डॉन फर्डिनांड आणि त्याचे सोबती, न्यायाधीश, पाद्री, न्हावी आणि डॉन क्विक्झोटही— यापुढे किल्ल्यावर पहारा करण्याची गरज नाही असे त्यांना वाटले. कार्डेनियोला त्या तरुणाचा इतिहास माहीत होता. त्याने त्या सेवकांना विचारले, "तुम्ही या तरुणाला त्याचे इच्छेविरुद्ध कोणत्या सबबीवर किंवा कोणाच्या अधिकाराने येथून नेऊ शकाल?" तेव्हा त्यांच्यापैकी एकाने उत्तर दिले, "महाराज, आम्ही जे करणार, त्याला सबळ

कारण आहे. हे परत येण्यावर त्यांच्या पित्याचे प्राण अवलंबून आहेत, हे कारण किती मोठे आहे ! ”

डॉन लेव्हिस म्हणाला, “ सभ्य गृहस्थहो, माझ्या कार्याचे विशिष्ट स्वरूप सांगून तुम्हाला मी त्रास देणे योग्य होणार नाही. मी फक्त इतकेच सांगतो की, मी सज्जन आहे आणि माझ्या इच्छेविरुद्ध मला कोणी काही करावयास लावू शकणार नाही. ” तेव्हा सेवक म्हणाला, “ नाही महाराज, विवेक आपल्याला तसे करावयास लावील अशी मला आशा आहे. विवेकाने आपले हृदय कदाचित् हालणार नाही, पण आमच्यावर विवेकाची सत्ता चालेल. आम्ही आमचे हुकूम पाळले पाहिजेत आणि आपल्याला सक्तीने परत नेले पाहिजे. महाराज, आम्हाला जशी आज्ञा झाली असेल तसेच आम्ही वागतो. ” न्यायाधीश म्हणाला, “ थांबा, आम्हाला सारा इतिहास कळू द्या. ” त्यांना ओळखणारा सेवक म्हणाला, “ महाराज, आपल्या शेजाऱ्याच्या मुलाला आपण ओळखत नाही काय ? पहा, महाराज, तो आपल्या बापाच्या घरातून पळून आला आहे आणि ही फाटकी–तुटकी भिकार लक्तरे अंगावर धारण करीत आहे. त्यामुळे त्याच्या घराण्याची केवढी बदनामी होत आहे, हे आपल्या लक्षात सहज येईल.” मग न्यायाधीशाने त्याच्याकडे बारकाईने न्याहाळून पाहिले आणि त्याला ओळखले. त्याला नमस्कार करून न्यायाधीश म्हणाला, “ अरे डॉन लेव्हिस, ही काय थट्टा मांडली आहेस ? अरे युवका, ही क्रांती घडवून आणणारे कोणते अचाट कारस्थान तू रचीत आहेस ? हे तुझे बदलेले स्वरूप तुझ्या योग्यतेला मुळीच शोभत नाही. ” तो तरुण एका शब्दानेही उत्तर देऊ शकला नाही. त्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. त्याची गोंधळलेली मनःस्थिती पाहून न्यायाधीशाने त्या चार सेवकांना सांगितले, “ आता तुम्ही शीण करून घेऊ नका. या युवकाला माझ्यावर सोपवा. तुमचे समाधान होईल असेच मी करीन. ” डॉन लेव्हीसबरोबर न्यायाधीश घरात गेला आणि त्याने त्याला त्याच्या पलायनाचे कारण सांगण्याची विनंती केली.

त्यांचा संवाद चालू असताना, खानावळीच्या दाराशी मोठा गोंगाट चालल्याचे त्यांचे कानी आले. तेथे रात्रभर मुक्काम केलेल्या दोन प्रवाश्यांनी असे पाहिले की, चार घोडेस्वारांच्या विलक्षण प्रकरणाची चौकशी करण्यात सारे कुटुंब गुंतलेले आहे. म्हणून त्यांनी आपले पैसे न देता पळून जाण्याचा विचार केला. पण खानावळवाल्याचे लक्ष स्वतःच्या कामाशिवाय दुसऱ्या कशाकडेही नसे. त्याने त्यांना ऐन वेळी थांबविले आणि पैशाची मागणी केली व त्यांच्या असभ्य वर्तनाबद्दल त्यांची खरमरीत कान–उवाडणी केली. त्यांनी त्याला लाथाबुक्यांनी इतक्या जोराने प्रतिसाद दिला कीं, तो बिचारा खानावळवाला मदतीसाठी ओरडू लागला. त्याची बायको आणि मुलगी यांना डॉन क्विक्झोट अत्यंत शांत असलेले दिसले. म्हणून मुलगी त्यांना म्हणाली, “ शिलेदारजी, ईश्वराने आपल्यावर जे कार्य सोपविले आहे ते लक्षात घेऊन आपण संकटात सापडलेल्या माझ्या वडिलांना मदत करण्यास धावून जावे, अशी मी आपल्याला कळकळीने

विनंती करते. अहो, ते दोन दुष्ट माझ्या वडिलांना बडवून त्यांचा लोळागोळा करीत आहेत." डॉन क्विक्झोट मोठ्या गांभीर्याने व सावकाश गतीने म्हणाले, "हे सुंदरी, सांप्रतच्या क्षणी तुझ्या विनंतीचा काही उपयोग होणार नाही. कारण मी जे कार्य हातात घेतले आहे, ते प्रथम तडीस नेण्याचे वचन दिलेले आहे. ते पूर्ण करीपर्यंत कोणतेही नवे धाडसाचे कार्य मला हाती घेता येत नाही. या महत्त्वाच्या प्रकरणी माझ्याकडून तू केवळ सल्ल्याचीच अपेक्षा करावीस-दुसरी कोणतीही सेवा मी करू शकणार नाही. तू आपल्या बापाकडे अत्यंत त्वरेने जा आणि त्याला सांग की, पराकाष्ठेच्या निश्चयाने हा लढा पुढे चालवा नि मी मदतीस येईपर्यंत टिकवा. राजकन्या मिकोमिकोना हिची अनुज्ञा मला मिळाली म्हणजे तुझ्या वडिलांना कशाचीही भीती रहाणार नाही हे निःसंशय." त्यांचे बोलणे मेरिटोर्नेसच्या कानी पडले तेव्हा ती म्हणाली, "किती दुर्दैवी आहे मी! आपल्याला तशी अनुज्ञा मिळण्यापूर्वीच माझ्या धन्याला परलोकात पाठविले जाईल." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तर मग बाईसाहेब, मी सांगितलेली अनुज्ञा मला आणून द्या म्हणजे आपले मालक परलोकात गेलेले असले तरी, सैतानाला आणि नरकाला न जुमानता, मी त्यांना या पृथ्वीवर परत आणीन-किंवा निदान त्यांच्या शत्रूवर मी इतका सूड उगवेन की, त्यामुळे त्यांच्यामागे जिवंत राहिलेल्या त्यांच्या मित्रांना भरपूर संतोष वाटेल."

तो वाद मध्येच तोडून ते डोरोथीकडे गेले आणि तिच्यापुढे साष्टांग लोटांगण घालून ललितरम्य भाषेत तिला विनंती करू लागले, "या किल्ल्याचा किल्लेदार एका भीषण संग्रामात मूर्च्छित होण्याची वेळ आली आहे, तेव्हा त्याच्या मदतीस जाण्याची आज्ञा आपण मला द्यावी." राजकन्येने त्यांना अत्यंत खुशीने तशी आज्ञा दिली. तेव्हा लगेच आपले निशाण उंचावून आणि आपली समशेर उगारून ते खानावळीच्या दाराकडे धावत गेले. तेथे ते दोन उतारू त्या घरमालकाला अत्यंत निर्दयपणे बडवीत होते. डॉन क्विक्झोट अकस्मात् थांबले. आपल्या धन्याला मदत करण्याचे वचन त्यांनी दिले असता त्या कामी ते विलंब का लावीत आहेत, याचे कारण मेरिटोर्नेस आणि घरमालकीण यांनी दोन-तीनदा आग्रहाने विचारले, तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "मी येथे थांबलो याचे कारण असे की, शिलेदारीच्या परंपरेत नसलेल्या कोणाही माणसावर मी माझी समशेर चालवू नये, असा आमच्या शस्त्र-विद्येचा नियम आहे. म्हणून माझ्या हुजऱ्याला बोलवा. हे सारे प्रकरण त्याच्या कक्षेतील आहे." तोपर्यंत खानावळीच्या दाराशी बिचाऱ्या मालकाला खरपूस मार एकसारखा मिळत होता आणि त्याच्या शरीरावर जखमा होत होत्या. त्याची बायको, मुलगी आणि मोलकरीण या साऱ्या त्याच्याजवळ उभ्या होत्या. डॉन क्विक्झोट यांची ती माघार पाहून आणि खानावळवाल्याचा तो विषम सामना पाहून त्यांना वेड लागण्याची वेळ आली. जे काम आपल्याला पार पाडता येत नाही, ते हाती घेतल्याबद्दल त्याला भरपूर चोप मिळत होता, हे योग्यच होय-त्याच्या अविचाराचे ते प्रायश्चितच होय. पण त्याला आपण येथेच सोडून डॉन

लेव्हिसकडे जाऊ या. तेथे न्यायाधीश त्याला विचारीत होता, " इतका भिकार पोषाख करून तुम्ही पायी प्रवास करण्याचे कारण काय ? " या प्रश्नाला त्याने काय उत्तर दिले ते आपण ऐकू या. त्यावेळी त्याच्या डोळ्यातून जे अश्रू वहात होते, त्यावरून त्याचे दुःख किती मोठे आहे याची साक्ष पटत होती. त्या युवकाने न्यायाधीशाचे हात अत्यंत भावनेने आपल्या हातात घट्ट धरून उत्तर दिले—

" प्रिय महाशय, कोणतीही प्रस्तावना किंवा अवडंबर न करता मी आपल्याला हे एकदम सांगून टाकतो की, ज्या क्षणी परमेश्वराने आपल्याला शेजारी बनविले आणि ज्या क्षणी आपली कन्या– म्हणजे माझी हृदयस्वामिनी डोन्ना क्लॅरा– हिला पाहिले, त्याच क्षणी मी माझी सर्व प्रेम–भावना तिला अर्पण केली. मी आपल्याला खरोखर ' माझे पिताजी ' म्हणून संबोधले पाहिजे. आपण जर प्रतिबंध केला नाही, तर ती आजच माझी अर्धांगी होईल. तिच्यासाठी मी माझ्या वडिलांचे घर सोडले– तिच्यासाठी मी असे वेषांतर केले– या स्थितीत मी तिच्या पाठोपाठ सर्व जगभर संचार केला असता. माझ्या भ्रमंतीमध्ये मला योग्य वाट दाखविणारा ध्रुवतारा म्हणजे ती आहे– आणि माझ्या इच्छांचे लक्ष्य ती आहे. खरोखर माझी भावना जाणून घेण्यास तिचे कान पूर्णपणे बधिर आहेत, तरीही माझ्या नेत्रातून वाहणारे अश्रू पाहून तिच्या नेत्रांना माझ्या प्रेमाची कल्पना करता येईल. माझे ऐश्वर्य आणि माझे गुण आपण जाणताच. ते मी तिच्या चरणी अर्पण केले आहेत. तेच माझी वकिली करतील. म्हणून महाराज, आपण मला याच क्षणी आपला भाग्यवान पुत्र माना. दुसऱ्या काही विचाराने पछाडल्या-मुळे माझ्या वडिलांनी माझी ही निवड नापसंत केली, तर काळच त्यांच्या विचाराला अनुकूल वळण देईल आणि त्यांची मनोवृत्ती पालटेल. "

त्या प्रेमिक युवकाचे भाषण संपल्यानंतर, त्याने व्यक्त केलेल्या सुंदर प्रेमभावना ध्यानी येताच, न्यायाधीशाला फार आश्चर्य वाटले. पण अशा अकल्पित व आकस्मिक प्रसंगी आपण स्वतः कसे वागावे, यासंबंधी त्यांच्या मनात मोठा गोंधळ उडाला. म्हणून, त्यांनी निश्चित उत्तर काही न देता त्याला सल्ला दिला, " तू आपल्या विचारांची घडी नीट बसव. त्या सेवकाशी बोलणे सुरू करून, काय करणे योग्य होईल याचा विचार करण्यासाठी आजचा दिवस त्यांनी तुला द्यावा, हे त्यांच्या मनावर ठसव. " डॉन लेव्हिस याने न्यायाधीशांच्या हातांचे जोराने चुंबन घेतले आणि आपली कृतज्ञता व्यक्त केली. त्यावेळी त्याच्या अश्रूंनी न्यायाधीशाच्या कर–कमलावर अभिषेक केला. त्यामुळे नर–मांस–भक्षकाचेही हृदय हलले असते, मग न्यायाधीशाचे काय झाले असेल ? (जगाचा अनुभव घेतलेला तो माणूस असल्याने ) त्याला अशी शंका आली की, डॉन लेव्हिसच्या पित्याची संमती मिळेल की नाही ? त्याला आपल्या मुलाची सोयरीक सरदार–घराण्याशी करण्याची इच्छा आहे, हे न्यायाधीशाला माहीत होते. तथापि आपल्या मुलीची निवड लग्नासाठी झालेली आहे हे पाहून त्याला संतोष वाटत होता.

हे चालले असताना खानावळीच्या दारातील भांडण मिटले— डॉन क्विक्झोट

यांच्या धमक्यापेक्षा आर्जवांनी त्या उतारूंनी पैसे देऊन कूच केले. आपल्या तरुण धन्याची न्यायाधिशाशी जी वाटाघाट चालली आहे, तिचे फल काय मिळते याची वाट पहात डॉन लेव्हिसचे सेवक उभे होते. अशा वेळी (सैतानाच्या इच्छेप्रमाणे) त्या खानावळीत कोण येऊन टपकावा ? डॉन क्विक्झोट यांनी मॅम्ब्रिनोचे शिरस्त्राण ज्याचेपासून हिरावून घेतले आणि सँकोजे ज्याचेपासून खोगिर चोरून घेतले, तो न्हावी तेथे टपकला. तो आपले जनावर तबेल्याकडे मोठ्या गांभीर्याने नेत होता, तेव्हा त्याला खोगिराची काही दुरुस्ती करीत असलेला सँको दिसला. त्याने त्याला तत्काळ ओळखले आणि अत्यंत आडदांडपणे म्हटले, " अरे चोरा, अरे बदमाशा, शेवटी मी तुला पकडलेच की नाही ? माझ्या गाढवाचे सारे सामान-सुमान तुझ्या हातात असतांना मी तुला कसे पकडले ? " आपल्यावर इतका अनपेक्षित हल्ला झालेला पाहून आणि न्हाव्याच्या अपमानास्पद भाषेने चिडून जाऊन, सँकोने आपला एक हात खोगिरावर घट्ट ठेवला आणि दुसऱ्या हाताने त्याच्या जबड्यावर असा ठोसा लगावला की, त्यामुळे त्याच्या सर्व दातातून रक्त वाहू लागले. त्यामुळे तो न्हावी इतक्या मोठमोठ्याने ओरडू लागला की, त्याच्या आवाजाने आणि तंट्याने सारे घर हादरून गेले. न्हावी म्हणाला, " सभ्य गृहस्थहो, राजाचे नाव घेऊन तुम्ही माझ्या मदतीस यावे अशी माझी विनंती आहे. कारण राजाच्या मोठ्या मार्गावर या दुष्टाने माझी चोरी केली आहे आणि आता मी माझे सामान ताब्यात घेत आहे म्हणून तो माझा खून करीत आहे ! " सँको ओरडला, " झूट आहे हे ! राजाच्या मोठ्या रस्त्यावरील ही चोरी नव्हती, तर माझा धनी डॉन क्विक्झोट याने शेतात योग्य मार्गाने मिळविलेली ही कायदेशीर लूट होती. "

या प्रसंगी आपल्या सेवकाने जे वर्तन केले त्याबद्दल डॉन यांना मोठा अभिमान वाटला, आणि ते त्याचेजवळ गेले. " हा मोठा वीर वृत्तीचा माणूस आहे आणि पहिली संधी येताच त्याला शिलेदारीचा मान दिला पाहिजे, कारण तो आपल्या धैर्याने शिलेदारीच्या परंपरेला भूषण ठरेल. "—असे त्यांच्या मनात आले. आपला हक्क शाबित करण्यासाठी न्हाव्याने अनेक गोष्टी सांगितल्या, त्यापैकी एक सांगताना तो म्हणाला, " सभ्य गृहस्थहो, हे खोगिर माझेच आहे हे खचित. मी माझ्या बिछान्यात मरणार हे जितके खरे, तितकेच हेही खरे की, माझ्या जन्माबरोबरच ते जन्मास आले आहे, इतके ते मी ओळखतो. फार काय माझे गाढवसुद्धा याची साक्ष देईल. हे खोगिर त्याच्या पाठीवर घाला आणि ते त्याला चपखल बसले नाहीतर मला लबाड म्हणा. लोकहो, याहूनही दुःखाची गोष्ट अशी की, ज्या दिवशी माझे हे खोगिर चोरले गेले त्याच दिवशी यानी माझे नवे पातेलेही चोरले, ते कधी वापरलेले नव्हते. त्याचेसाठी मला एक क्राऊन किंमत द्यावी लागली. " हे ऐकून डॉन क्विक्झोट यांना आपले मन आवरणे अशक्य झाले. त्या दोघांमध्ये ते घुसले आणि त्यांनी त्या दोघांना दूर केले. सर्वांना दिसावे म्हणून ते खोगिर त्यांनी जमिनीवर ठेवावयास लावले. अखेरचा निर्णय होईपर्यंत ते जमिनीवरच होते. डॉन क्विक्झोट म्हणाले, " आपल्यासारख्या सन्माननीय

लोकांनी हे ध्यानी घ्यावे की, हा प्रामाणिक न्हावी हट्ट धरण्यात उघड, उघड चूक करीत आहे. खरोखर जे मँब्रिनोचे शिरस्त्राण होते, आहे आणि पुढे राहील, त्याला पातेले म्हणून तो त्याची किंमत कशी कमी करीत आहे पहा. हे शिरस्त्राण मी उघड्या मैदानांत त्याच्यापासून न्यायाने जिंकून घेतले आहे आणि माझ्या बाहु-बलाने मी त्याचा कायदेशीर मालक बनलो आहे. खोगिरासंबंधी काही बोलणे हे माझ्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारे आहे. या बाबतीत मला आग्रहाने एवढेच सांगावयाचे आहे की, या पराभूत झालेल्या भेकड माणसाच्या घोड्यावरील सामानसुमान काढून घेऊन त्याने स्वतःचे घोडे भूषविण्याची परवानगी माझ्या सेवकाने माझ्यापाशी मागितलेली होती. त्याच्या त्या कृत्याला मी संमती दिली आणि मग त्याने ते सामानसुमान काढून घेतले. घोड्याच्या सामानाचे रूपांतर त्याने गाढवाच्या खोगिरात केले, याला एकच कारण सांगता येईल की, अशी रूपांतरे शिलेदारीच्या व्यवहारात वारंवार घडत असतात. माझ्या या बोलण्याला पुष्टी देण्यासाठी, अरे सँको, जा, धाव, आणि हा न्हावी ज्याला पातेले म्हणतो ते शिरस्त्राण घेऊन ये." तेव्हा सँको म्हणाला, "महाराज, आपल्याला जर आपल्यासंबंधी एवढेच सांगावयाचे असेल, तर मी शपथेवर सांगतो की, या माणसाचे सामान हे माझ्या गाढवाचे खोगिर जसे ठरले, तसेच मँब्रिनोचे शिरस्त्राणही पातेल्याइतके भिकार ठरेल."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझ्या आज्ञेचे पालन कर. या किल्ल्यातील प्रत्येक गोष्ट जादूने घडत आहे, यावर मी विश्वास ठेवू शकत नाही." ते पातेले आणले. ते हातात घेऊन व उंच धरून डॉन क्विक्झोट म्हणाले, "पहा, पहा सभ्य गृहस्थहो पहा, मी म्हणतो तसे हे शिरस्त्राण नसून पातेले आहे असे हा उर्मट न्हावी कोणत्या बळावर सांगू शकतो? ज्या शिलेदारीचे ब्रिद मी वागवितो, तिच्या परंपरेची शपथ तुम्हा सर्वांपुढे घेऊन मी हे जाहीर करतो की, या न्हाव्यापासून मी जे शिरस्त्राण जिंकून घेतले, तेच हे होय—त्यात काहीही कमीजास्त केलेले नाही." सँको म्हणाला, "ते मीही शपथेवर सांगतो. माझ्या धन्याने ते शिरस्त्राण जिंकून घेतल्यापासून, ते धारण करून त्याने एकदाच लढाई केली आणि त्या लढ्यात त्यांनी त्या कृतघ्न जहाज-गुलामांना बंध-मुक्त केले. या इमानी शिरस्त्राणाने माझ्या धन्याच्या कवटीचे रक्षण केले नसते, तर त्या गुलामांनी दगडाधोंड्याचा वर्षाव करून माझ्या धन्याच्या डोक्यातील मेंदू बाहेर काढला असता."



## प्रकरण १८

# मँब्रिनोचे शिरस्त्राण व गाढवाचे खोगिर याच्यासंबंधीच्या वादाचा निर्णय आणि सत्य व चमत्कारिक अशा इतर घटना.

न्हावी म्हणाला, " सज्जनहो, या बाबतीत आम्हाला आपले मत कळावे. हे शिरस्त्राण म्हणजे एक पातेले आहे हे आपण मान्य कराल असे मी समजतो. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " असे जर कोणी मान्य करण्यास धजले, तर तो माणूस, शिलेदार असल्यास, उघड उघड खोटे बोलत आहे आणि, सेवक असल्यास, तो भयंकर खोटे बोलत आहे, असे नक्की समजा. " ( या सर्व प्रकरणाची माहिती असणारा ) आमचा न्हावी चेष्टा करण्यासाठी आणि अधिक गंमत करण्यासाठी दुसऱ्या न्हाव्याला म्हणाला, " नापितमहाराज, मी आपल्याला योग्य पदवीने संबोधिले नसेल तर मला क्षमा करा. मी आपल्याला हे समजावून सांगितले पाहिजे की, आपल्या धंद्यातील एक उमेदवार म्हणून मी काम केलेले आहे—गेली तीस वर्षे मी स्वतंत्रपणे काम केलेले आहे. म्हणून केश—कर्तनासाठी कोणत्या वस्तू लागतात हे शिकण्याची मला गरज नाही. तसेच माझ्या तारुण्यात मी सैनिकही होतो आणि त्यामुळे शस्त्रधारी माणसाच्या साऱ्या वस्तूंची मला ओळख आहे आणि त्यामुळे शिरस्त्राणाच्या निरनिराळ्या प्रकारांची मला चांगली माहिती आहे, हे तुम्ही लक्षात घ्यावे. तरीही सद्बुद्धीला मान देऊन मी असे सांगतो की, आपल्यापुढे येथे वादात पडलेली ही वस्तू पातेले मुळीच नाही—अंधारापासून प्रकाश जितका दूर, तितकीच ही वस्तू पातेल्यापासून भिन्न आहे. उलटपक्षी, हे शिरस्त्राण असले तरी ते संपूर्ण नाही हे मी ठासून सांगतो. " डॉन म्हणाले, " बरोबर आहे. खालचा भाग त्यात नाही. " पाद्री, कार्डेनियो, डॉन फर्डिनांड आणि त्याचे दोस्त हे सर्वजण उद्गारले, " उघड आहे, अगदी उघड आहे. " ( लेव्हिसच्या चिंतेमुळे विचारमग्न झाले नसते तर ) न्यायाधीशांनीही या गोष्टीची गंमत वाढविली असती. थोडाफार अस्वस्थ झालेला बिचारा न्हावी म्हणाला, " प्रभो, आम्हां सर्वांवर कृपा कर. इतकी चांगली सन्मान्य माणसे पातेले व शिरस्त्राण यातील भेद इतकाच ओळखू शकतात, हे शक्य आहे काय ? छेः ! साऱ्या स्पेनमधील सर्वात शहाण्या विद्यापीठाचा मी धिक्कार करतो. असे विद्वान लोक त्या विद्यापीठाने मला दाखवावेत असे माझे आव्हान आहे. ठीक, ठीक, हे जर शिरस्त्राण असेल, तर ते असलेच पाहिजे. बस्स्, त्याच नियमाने माझे खोगीर या गृहस्थाच्या म्हणण्याप्रमाणे असले पाहिजे. " डॉन क्विक्झोट म्हणाले,

"बाह्यतः ते खोगीरासारखे दिसते, हे मी पूर्वीच म्हटले आहे आणि ते मी आता कबूलही करीत आहे. त्यासंबंधीच्या वादाचा निकाल लावण्याचा आव मी आणीत नाही." तेव्हा पाद्री म्हणाला, "छेः, डॉन क्विक्झोट जर निकाल सांगणार नाहीत, तर या प्रकरणाचा निकाल कधीच लागणार नाही. शिलेदारीच्या साऱ्या प्रकरणात आपण त्यांना अग्रस्थान दिले पाहिजे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "सन्मान्य सद्गृहस्थांनो, मी शपथेवर सांगतो की, या किल्ल्यात मी जे जे साहसी प्रसंग अनुभवले, ते इतके विलक्षण आणि अमानुष आहेत की, केवळ जादूटोणा आणि मंत्रविद्या यांचेच ते परिणाम असले पाहिजेत असा माझा ठाम निष्कर्ष आहे. या दारातून मी प्रथम प्रवेश केला, तेव्हां येथे राहणाऱ्या एका मांत्रिक मूराने मला विलक्षण रीतीनें अडचणीत टाकले आणि त्याच्या सेवकांनी तर सँकोची खूपच मौज उडविली. काल रात्री सुमारे दोन तास मी या हातानें लोंबत उभा होतो. मला स्वतःला मदत करण्याची शक्ती मला नव्हती. माझ्या दुर्दैवाचे सयुक्तिक कारणही मला सांगता येण्यासारखे नव्हते. म्हणून अशा गुंतागुंतीच्या आणि गोंधळाच्या प्रकरणी मी काही लुडबुड करणे किंवा माझे मत देणे हे कोणाला बढाईखोरपणाचे वाटेल. या वादातील शिरस्त्राणासंबंधी मी माझा शेवटचा निकाल पूर्वीच दिला आहे. पण खोगीराच्या बाबतीत निश्चित निर्णय घोषित करण्याचे धैर्य माझ्या अंगी नाही. आपणा सर्व मंडळींच्या विवेक–बुद्धीवर मी ते कार्य सोपवितो. कदाचित् शिलेदारीचा शिक्का तुमच्यावर बसलेला नसल्यामुळे मांत्रिकाचा प्रभाव तुमच्यावर पडणार नाही आणि तुमची बुद्धी स्वतंत्र राहील नि तुमची न्यायनिष्ठा या प्रकरणातील सत्याचा शोध घेण्यास अधिक समर्थ बनेल; बहिरंगावरून तुमची बुद्धी काही निष्कर्ष काढणार नाही." डॉन फर्डिनांडने उत्तर दिले, "बरोबर, अशा गोष्टींचा निर्णय आपल्या भाषणांना अनुसरून लागतो, असे डॉन क्विक्झोट यांचे मत आहे. म्हणून आपण आता या प्रकरणाची चांगली चर्चा करू आणि भक्कम नि भरीव आधारावर चर्चा करून आपण त्यावर मते घेऊ. प्रत्येकाने आपले मत माझ्या कानात सांगावे म्हणजे मी सर्वांची मते मंडळाला प्रामाणिकपणे निवेदन करीन."

डॉन क्विक्झोट यांना जे ओळखीत होते, त्यांना हा एक चांगला खेळ वाटला, पण डॉन लेव्हिस व त्याचे चार सेवक यांना त्यांच्या विनोदाचा परिचय नव्हता. म्हणून त्यांना त्याचे बोलणे अत्यंत हास्यास्पद वाटले. त्याचवेळी आणखी तीन उतारू तेथे आले. ते धर्मसंस्थेचे अधिकारी किंवा राजदूत होते. त्यांना वाटले, हे सारे लोक जादूच्या जाळ्यात पक्के सापडलेले आहेत. परंतु तेथे त्यावेळी स्वतःच्या डोळ्यासमोर अलंलेले पातेले मँम्ब्रिनोचे शिरस्त्राण झाले, हे पाहून न्हाव्याची मती गुंग झाली. त्याचप्रमाणे आपले साधेसुधे खोगीर घोड्यावरील उंची सामान बनले आहे, हे पाहूनही त्याची बुद्धी कुंठित झाली. खोगीराच्या महत्त्वाच्या विषयावर प्रत्येकाचे मत घेण्यासाठी डॉन फर्डिनांड मोठ्या गांभीर्याने प्रत्येकाच्या कानाशी कुजबुजत आहे, हे पाहून सर्वजण मनसोक्त हसत होते. त्या मस्करीमध्ये सामील झालेल्या

सर्व लोकांची चाचपणी केल्यावर तो अत्यंत मोठ्या आवाजात म्हणाला, " हे इमानी माणसा, इतके फटकळ प्रश्न विचारून मी थकलो आहे. प्रत्येकाचे उत्तर त्याच्या जिव्हाग्रावर खेळत आहे. ते म्हणजे या वस्तूला खोगीर म्हणणे हा शुद्ध वेडेपणा आहे. खरोखर ते घोडयावर घालण्याचे सामान आहे—मोठ्या किंमतीचे आहे. शिवाय, दोस्ता, तुझे आरोप आणि पुरावे कुचकामी आहेत. म्हणून, तुझे गाढव आणि तू काहीही सांगत असलास तरी, आम्ही फिर्यादीचे बाजूने असा फैसला देतो की, एका घोडयाचे—नव्हे फार मोठया घोडयाचे—हे सामान आहे, आणि तसेच ते राहील." तेव्हा न्हावी म्हणाला, " आता मात्र मी सैतानाच्या ताब्यात पुरा गवसलो. तुम्ही सर्वजण चकले आहात, असे मला वाटते. हे निखळ खोगीर आहे, असे माझी बुद्धी मला स्पष्टपणे सांगत नसेल, तर मला फाशी द्या. पण कायद्याप्रमाणे आता मी ते गमावून बसलो आहे. त्याचे कल्याण होवो. मी वेडा नाही आणि दारुडा पण नाही. आज सकाळपासून मी उपोषण केले आहे आणि शुद्ध आहे. माझ्या अंगी पापाचा लवलेश नाही. "

डॉन क्विक्झोटच्या आरोळ्यापेक्षा न्हाव्याची ही वटवट कमी मनोरंजक नव्हती. डॉन म्हणाले, " निवाडा झाला आहे. प्रत्येकाने आपापले सामान आणि भांडीकुंडी आपल्या ताब्यात घ्यावी. ईश्वर त्यांना सुखात ठेवो. " त्या चार सेवकांपैकी एकजण म्हणाला, " ही थट्टा आहे–केवळ थट्टा आहे. सज्जनहो, तुम्ही गंभीरपणे विचार करीत नाही हे नक्की. अशी भाषा न काढण्याइतके तुम्ही शहाणे आहा. माझ्यासंबंधी म्हणाल तर मी सांगतो—आणि पुढेही सांगत राहीन—हे पातेले आहे आणि ते खोगीर गाढवाचे आहे, हे न्हाव्याचे मत चुकीचे असण्यास काही कारण नाही. " पाद्याने विचारले, " मित्रा, हे गाढविणीचे खोगीर नसेल कशावरून ? " तेव्हा तो स्वार म्हणाला, " दोन्हीचा अर्थ एकच. हे खोगीर गाढवाचे की गाढविणीचे, हा प्रश्न नाही, तर ते खोगीर आहे की नाही, हा वादाचा विषय आहे. " धर्मसंस्थेच्या एका अधिकाऱ्याने हा सारा वाद ऐकला आणि चुकीचे मत मांडले जात असल्याचे ऐकून तो संतापला व म्हणाला, " हे खोगीर म्हणजे माझा बाप आहे असे म्हणण्यासारखेच त्याला घोडयाचे खोगीर मानणे मूर्खपणाचे आहे. याच्या उलट बोलणारा माणूस दारूडा किंवा वेडा असला पाहिजे. " ते ऐकून आमचे शिलेदारजी उसळले आणि म्हणाले, " अरे, एखाद्या असभ्य बदमाषाप्रमाणे तू खोटे का बोलतोस ? " असे म्हणून त्यांनी आपला भाला उचलला. अशा प्रसंगासाठी तो ते नेहमी तयार ठेवीत असत. त्यांनी त्या भाल्याचा घाव त्या धर्माधिकाऱ्याच्या डोक्यावर इतका जबरदस्त घातला की, त्याने बाजूस उडी मारली नसती तर, तो जमिनीवर उताणाच पडला असता. भाल्याचे तुकडे-तुकडे झाले. आपल्या दोस्ताची ही दुर्दशा पाहून बाकीचे अधिकारी मदतीसाठी ओरडत सुटले. " धर्मसंस्थेला वाचवा, " अशी त्यांनी सर्वांना हाक दिली. ( अशा अधिकाऱ्याजवळ एक दंड असे ) त्या धर्मसंस्थेचा घटक असलेला खानावळवाला आपला दंड व तलवार आणण्यासाठी धावत गेला आणि मग आपल्या मंडळीत मिसळला. डॉन

लेव्हिसचे सेवक आपल्या धन्याभोवती गोळा झाले. त्याला काही अपाय होऊ नये म्हणून ते जितके जपत होते तितकेच या भांडणतंट्यात त्याने निसटून जाऊ नये, म्हणूनही ते त्याच्याजवळ उभे होते. सारे घर उलटेपालटे झालेले पाहून न्हाव्याने आपल्या खोगीराचा ताबा पुनः घेतला. पण सँकोही तितकाच तत्पर होता आणि त्याची हालचाल न्याहाळीत होता. त्याने खोगीराचे दुसरे टोक पकडले.

डॉन क्विक्झोट पुढे सरसावले आणि त्यांनी त्या अधिकाऱ्यावर हवे तसे हल्ले चढविले. डॉन क्विक्झोट आणि त्याच्या बाजूची माणसे यांना मदत करण्याचा आदेश डॉन लेव्हिस याने आपल्या सेवकांना दिला. कारण, कार्डेनियो, डॉन फर्डिनांड आणि त्याचे दोस्त– हे सारे डॉन क्विझोट यांच्या बाजूने लढत होते. पाद्री ओरडला, घर-धनीण किंचाळली, तिची मुलगी रडू लागली, मेरीटोर्नेस केकाटू लागली, डोरोथी भीतीने घाबरून गेली, काय करावे हे लुसिंडाला कळेना आणि डोन्ना कॅरा ही तर अत्यंत भयभीत झाली. न्हाव्याने सँकोला ठोसे दिले आणि सँकोने न्हाव्याला बदडले. डॉन लेव्हिस याचा एक सेवक त्याला आवरण्यासाठी गेला, पण त्याने त्याच्या जबड्या-वर असा एक तडाखा दिला की, त्याची दंतपंक्ती स्थानभ्रष्ट होऊ लागली तेव्हा न्यायाधीशाने त्याला आपल्या संरक्षणाखाली घेतले. डॉन फर्डिनांडने एका अधिकाऱ्याला जमिनीवर लोळविले. खानावळवाला अजून ओरडतच होता,—" धर्माधिकाऱ्यांना वाचवा." यामुळे ते सारे घर म्हणजे कण्हण्याचे, आक्रोशाचे, किंकाळ्यांचे, गोंधळाचे, भीतीचे, धास्तीचे, संकटांचे, चकचकींचे, गुद्दागुद्दीचे, ठोश्यांचे, लाथांचे, मारहाणीचे, झोंबाझोंबीचे आणि रक्तपाताचे आगर बनले!

अशी ही धामधूम कळसास पोचली असताना डॉन क्विक्झोट यांच्या डोक्यात असे आले की, ॲग्रमँट राजाच्या छावणीतील गोंधळात आणि गडबडीत आपणही गुंतलेले आहो. म्हणून ते सारे घर हादरून टाकण्याइतक्या मोठ्या आवाजाने ओरडून म्हणाले, " हे शौर्यशाली शिलेदारांनो, थांबा; आपले बलाढ्य हात मागे घ्या, आपल्या तलवारी म्यान करा, कोणीही कोणावर आघात करण्याचा विचार करू नये. केल्यास त्याला मरण पत्करावे लागेल. मी काय बोलतो, ते ऐका." राक्षसासारखा तो प्रचंड आवाज ऐकून प्रत्येकजण चकित झाला आणि त्याची आज्ञा पाळू लागला. डॉन क्विक्झोट पुढे म्हणाले, " सज्जनहो, मी आपल्याला पूर्वीच सांगितले आहे की, हा किल्ला मंतरलेला आहे आणि सैतानांच्या सेना त्यात वास्तव्य करीत आहेत. आता तुम्ही आपल्या डोळ्यांनीच माझ्या शब्दांना पुष्टी द्या. ॲग्रमँट राजाच्या सैन्यातील विलक्षण आणि भयंकर गोंधळ येथे अवतरला आहे आणि आपल्यामध्ये काम करीत आहे हे तुम्हाला दिसत नाही काय? पहा, पहा, ते तलवारीसाठी कसे लढत आहेत — आणि पलीकडे घोड्यासाठी लढत आहेत! कोणी शिरस्त्राणासाठी भांडत आहे, तर कोणी निशाणासाठी लढत आहे, ते पाहा. सारेजण कसे लढत आहेत—का लढत आहेत, हे आपण सांगू शकत नाही. म्हणून माझी विनंती आहे की, न्यायाधीश-

महाराजांनी ॲग्रमँट राजाचे प्रतिनिधित्व पत्करावे आणि पूज्य पाद्रीसाहेबांनी सोब्रिनो राजाचे प्रतिनिधी व्हावे आणि दोघांनी आपल्या शहाणपणाने आणि विचाराने हा तंटा मिटवावा. कारण, इतक्या क्षुल्लक कारणासाठी, येथे जमले आहेत अशा थोर माण-सांनी एकमेकांना ठार मारावे हा शिलेदारीला कलंक आहे आणि स्वर्गीय शक्तीचा अपमान आहे. ''

डॉन क्विक्झोटचे शब्द त्या अधिकाऱ्यांना मुळीच कळले नाहीत. त्यांना कार्डेनियो, फर्डिनांड आणि त्याचे दोस्त यांनी बेफामपणे मारण्यास सुरवात केली होती, तेव्हा ते अधिकारीही स्वस्थ बसणार नव्हते. पण न्हावी संतुष्ट होता. कारण सँकोने या भांडणात त्याची दाढी आणि खोगीर नष्ट केले होते आणि आपल्या धन्याच्या शब्दांचा आवाज कानी पडताच तो आज्ञाधारकपणे मागे फिरला होता. डॉन लेव्हिस याचे सेवक शांत होते. शांत राहणेच योग्य आहे असे त्यांना वाटले. पण खानावळवाला हट्टी होता आणि म्हणत होता, '' या मूर्खाला त्याच्या दुर्वर्तनाबद्दल चांगली अद्दल घडली पाहिजे. क्षणाक्षणाला तो माझ्या घरात काही ना काही बखेडा माजवितो. '' तथापि शेवटी सारे प्रकरण संपुष्टात आले. डॉन क्विक्झोटच्या इच्छेप्रमाणे खोगीर हे घोड्याचे सामान ठरले आणि पातेले हे शिरस्त्राण म्हणून शाबित झाले. अर्थात् खानावळ हा किल्ला झाला—आणि डॉन क्विक्झोट यांचे तसे म्हणणे असेल तर हे सारे प्रलयकाळापर्यंत असेच चालू राहावयाचे.

यानंतर डॉन लेव्हिस याचे प्रकरण निघाले. डॉन फर्डिनांड, कार्डेनियो आणि पाद्री यांच्या संगनमताने न्यायाधिशाने ठरविले की, '' डॉन लेव्हिसच्या वतीने डॉन फर्डिनांड यांनी आपला अधिकार चालवावा आणि त्याला अँडालुसिया येथे न्यावे व तसे त्याच्या सेवकांना कळवावे. तेथे त्याच्या भावाने—मार्क्विसने—त्याच्या योग्यतेप्रमाणे त्याचा पाहुणचार करावा. आपल्या बापाकडे इतक्यात आपल्याला सक्तीने परत नेण्यात येऊ नये, असे डॉन लेव्हिस याचे ठाम मत असल्याने कोणीही त्याला विरोध करू नये. '' डॉन फर्डिनांडचे विचार आणि डॉन लेव्हिसचा निश्चय यांचा प्रभाव पडल्यामुळे इतर मंडळींनी अशी योजना केली की, त्यांच्यापैकी तिघांनी आपल्या वृद्ध धन्याला सारी हकीगत सांगण्यासाठी परत जावे आणि चौथ्याने डॉन लेव्हिस याच्या सेवेत राहावे. अशा प्रकारे ॲग्रमँटच्या सत्तेने आणि राजा सोब्रिनोच्या चातुर्याने त्या साऱ्या गोंधळाचा आणि गडबडीचा विराट डोंगर जमिनदोस्त झाला.

सर्वांना एकत्र आणून त्यांची घडी नीट बसविण्याची आपली योजना ढासळली असे पाहून सैतानाने पुनः निश्चय केला की, पुनः एकदा आपले रण-कौशल्य दाखवावे आणि त्या सर्वांवर दुसरा हल्ला चढवावा. आपल्या प्रतिपक्षाचे पाणी जोखून त्या धर्माधिकाऱ्यांनी भांडण पुढे न चालविण्याचा निश्चय केला असला तरी, त्यांच्या-पैकी एकाला डॉन फर्डिनांड याने निर्दयपणे लाथा मारल्या होत्या. त्यांची आठवण त्याला झाली आणि त्याबरोबरच डॉन क्विक्झोट यांनी जहाजावरील कैद्यांना मुक्त केले हेही

त्याच्या मनात डाचत होते. तेव्हा डॉन क्विक्झोट यांच्या ज्या खाणाखुणा दिलेल्या होत्या, त्या या माणसाशी जुळत्या आहेत की नाही, हे न्याहाळून पाहण्याचे त्याने ठरविले. म्हणून त्याने एक चर्मपत्र बाहेर काढले आणि आपल्याबरोबरचा लखोटा उघडून तो ते वाचू लागला. प्रत्येक शब्द वाचून झाला की तो डॉन क्विक्झोट यांच्या चेहऱ्याकडे पाही. नंतर त्याने ते चर्मपत्र गुंडाळले आणि आज्ञापत्र ( वॉरंट ) आपल्या डाव्या हातात धरले. उजव्या हाताने शिलेदारजींचा गळा घट्ट धरून तो ओरडला, " तू राजाचा कैदी आहेस. सभ्य गृहस्थहो, मी सरकारी अधिकारी आहे आणि हे माझे प्रमाणपत्र आहे. तुम्ही सर्वांनी धर्मसंस्थेच्या कार्यास मदत करावी असा माझा आदेश आहे. " आपल्याला जो केविलवाणा बदमाश वाटत होता, त्यानेच आपली अशी दुर्दशा केलेली पाहून डॉनचा संताप इतका पेटला की, ते क्रोधाने थरथर कापू लागले आणि आपल्या दोन्ही हातांनी त्या माणसाचा गळा पकडून त्यांनी त्याला त्वेषाने पिळून काढले. त्या अधिकाऱ्याच्या सोबत्यांनी त्याला तत्काळ मुक्त केले नसते तर, आमच्या शिलेदाराने त्याला गुदमरवून ठार मारले असते हे नक्की – त्याची डॉन क्विक्झोटच्या पकडीतून सुटका झालीच नसती.

आपल्या धर्मबंधूला मदत करणे हे आपले कर्तव्य आहे असे वाटून खानावळवाला तावडतोब त्याच्या मदतीस गेला. आपला नवरा दुसऱ्यांदा सामना देत आहे, हे पाहून वरधनिणीने पुनः आरडाओरड केली. तिची मुलगी आणि मेरिटोर्नेस यांनी तिच्या संगीताला साथ दिली – कधी प्रार्थना करून, कधी ओरडून, तर कधी शिव्याशाप देऊन. काय चालले आहे हे पाहून सँको म्हणाला, " देवाशपथ, माझ्या धन्याचे म्हणणे रास्त आहे. हे स्थान भुताटकीने झपाटलेले आहे हे खचित. येथे सर्वजण एक तासभरही शांततेने एकत्र राहू शकत नाहीत. " शेवटी डान फर्डिनांड याने डॉन क्विक्झोट आणि अधिकारी या दोघांना दूर सारले. आपला लढा सोडून देण्यास ते दोघेही तयारच होते. तथापि त्या अधिकाऱ्यांनी आपल्या कैद्याची मागणी चालूच ठेवली. त्याला बांधून आपल्या हाती सोपवावे अशी त्यांची मागणी होती. राजमार्गावरील दरोडेखोराला पकडण्याचे कामी सर्व मंडळींनी आपल्याला दुसऱ्यांदा मदत करावी, असे त्यांनी बजावले.

त्या माणसांचा साधेभोळेपणा पाहून डॉन क्विक्झोट गालातल्या गालात हसले आणि शेवटी मोठ्या गांभीर्याने म्हणाले, " या, या उकिरड्यावरील केरकचऱ्याच्या संतानांनो या आणि मला सांगा, बद्धांना मुक्त करणे, बंदीवानांना स्वतंत्र करणे, दुःखितांना साहाय्य करणे, पतितांचा उद्धार करणे आणि भुकेल्यांना अन्न देणे यांना, हरामखोर बदमाशांनो, तुम्ही चोरी म्हणता ? दरोडा म्हणता ? खरोखर तुमचे विचार इतके दीन–हीन आहेत की, त्यामुळे शिलेदारीचे गुण समजण्याला किंवा संपादिण्याला तुम्ही पात्र नाही. तसे नसते तर शिलेदाराची सावलीसुद्धा तुम्हाला पूज्य वाटली असती. तुमचा हा अधिकाऱ्यांचा ताफा म्हणजे खरोखर बदमाशांची आणि राजमार्गावर

अधिकृतपणे दरोडे घालणारांची टोळी आहे. माझ्यासारख्या शिलेदाराला पकडण्याचे वॉरंट काढण्यास कोणता रेम्याडोक्या मॅजिस्ट्रेट धजला असेल ? सर्व न्यायासनांच्या कक्षे-पलीकडे आम्ही आहोत हे त्या टोंग्याला कसे कळले नाही ? आमचे शौर्य हेच आमचे न्यायासन, आमची इच्छा हाच सर्व लोकांचा कायदा आणि आमची समशेर हीच न्यायाची कार्यवाही करणारी सत्ता, हे त्या अज्ञानी मॅजिस्ट्रेटला कळले नाही काय ? आमच्यापेक्षा अधिक हक्क आणि सवलती कोणाही सरदाराला किंवा उमरावाला उपभोगता येत नाहीत हे त्या मठ्ठ मॅजिस्ट्रेटला कसे कळले नाही ? शिलेदाराने कधी कर, खंडणी, जकात, फार काय, वाहतुकीचे भाडे दिले असल्याचा एखादा तरी दाखला त्याचेजवळ आहे काय ? त्याच्या कपड्याच्या शिलाईचे पैसे शिंप्याला कधी मिळाले आहेत काय ? एखाद्या शिपायाच्या किल्ल्यात मुक्काम केल्याबद्दल त्याला कोणी पैसे मागितले आहेत काय ? त्याच्या संगतीचा अभिमान कोणा राजाला वाटला नाही ? आणि त्याच्या प्रेमास पात्र झाल्याचा अभिमान कोणा युवतींना वाटला नाही ? शेवटी-तुमच्यासारख्या चारशे बदमाशांनी जर एखाद्या शिलेदाराला प्रतिकार करण्याचे धाडस केले, तर तो शिलेदार आपल्या एकट्याच्या बळावर त्यांचे तुकडे–तुकडे करतो, हे तुम्ही कधी वाचले नाही काय ? ”



## प्रकरण १९

# धर्माधिकाऱ्यांचा लक्षणीय साहस-प्रसंग आणि डॉन क्विक्झोट यांची रौद्रता व त्यांच्यावर झालेला जादूचा प्रयोग

अशा थाटात डॉन क्विक्झोट यांचे भाषण चालू असताना पाद्र्याने त्यांचे माथे फिरले असल्याबद्दल त्या अधिकाऱ्यांची खात्री पटविण्याचा प्रयत्न केला व म्हटले "त्यांच्या शब्दावरून आणि कृतीवरून ते तुमच्या लक्षात सहज येईल. तुम्ही त्यांना मॅजिस्ट्रेटपुढे नेले, तरी वेडा म्हणून त्यांची तत्काळ सुटका होईल." पण ज्याचेजवळ वॉरंट होते त्याने उत्तर दिले, "तो वेडा आहे की नाही हे पहाण्याचे काम माझे नाही. एका कार्यासाठी नियुक्ती झालेला मी एक अधिकारी आहे आणि म्हणून मी हुकूम पाळले पाहिजेत. त्यामुळे त्याला वरिष्ठ अधिकाऱ्याकडे सोपविण्याचे मी ठरविले आहे. तसे मी केले म्हणजे मग त्यांनी इच्छा असल्यास पाचशे वेळा त्यांना दोषमुक्त ठरवावे." तरीही पाद्री आग्रहाने सांगतच राहिला की, "या वेळी तुम्ही त्याला आपल्याबरोबर नेऊ नका. शिलेदारजी स्वतःच तिकडे जातील. त्यांचा वेडेपणा तुम्हाला स्पष्टपणे कळून आला नसेल, तर तुम्हीच त्यांच्यापेक्षा जास्त वेडे ठराल."

हे ऐकून त्यांनी तसे करण्याचे तहकूब केले, एवढेच नव्हे तर सँको व न्हावी यांच्यातील भांडण मिटविण्यासाठी आपण काही खटपट करू असेही सांगितले. त्यांची मध्यस्थी मान्य झाली. ते न्याय-खात्याचे अधिकारी असल्यामुळे त्या कामी ते चांगलेच यशस्वी झाले. त्यांचा लवाद दोन्ही पक्षांनी कबूल केला. त्यांच्या निवाड्याने दोन्ही पक्षांचे पूर्ण समाधान झाले नसले तरी त्यांनी तो मान्य केला. एकमेकांनी आपापली खोगिरें बदलावी पण लगाम किंवा कमरेचे पट्टे बदलू नयेत, असा तो निवाडा होता. पातेल्याचे प्रकरण पाद्र्याने मिटविले. त्यासाठी त्याने आठ रील गुपचूप न्हाव्याच्या हाती दिले, आणि त्याच्याकडून त्या बाबतीतील सर्व हक्क सोडून दिल्याची कबुली घेतली. अशा प्रकारे हे दोन महत्त्वाचे मतभेद यशस्वीपणे मिटल्यानंतर सार्वत्रिक शांततेला दोनच अडथळे होते—आणि ते म्हणजे डॉन लेव्हिसचे सेवक व खानावळवाला. त्या तीन सेवकांनी घरी जावे आणि डॉन फर्डिनांड हा डॉन लेव्हिसला जेथे ठेवील तेथे चौथ्या सेवकाने जावे, अशी सूचना मांडण्यात आली—आणि ती स्वीकारलीही गेली, या समेटामुळे डोन्ना क्लॅरा हिला अवर्णनीय आनंद झाला. जे काय घडत होते, ते झोरेडाला नीट कळत नव्हते, म्हणून ती दुसऱ्यांच्या — विशेषतः आपल्या स्पॅनिश

प्रियकराच्या–मुद्रेवरील भाव न्याहाळून ( त्याचेवरच तिचे नेत्र अधिक खिळलेले होते ) क्षणात दुःखी होई तर क्षणात आनंदी होई. खानावळवाल्याने भेसूर किंकाळी ठोकली. न्हाव्याला आपल्या पातेल्यासाठी पैसे मिळाले हे त्याला जेव्हा कळले, तेव्हा तो म्हणाला, " इतराप्रमाणे मलाही पैसे का मिळू नयेत ? रोझिनांट आणि सँकोचे गाढव या दोन्ही जनावारांनी आपआपल्या मालकांच्या वेडेचाराची किंमत दिल्याशिवाय माझा तबेला सोडू नये. " पण पाद्र्याने त्याला शांत केले आणि डॉन फर्डिनांड याने त्याचे पैसे चुकते केले. साऱ्या गोष्टी अशा प्रकारे ठाकठीक झाल्यामुळे, त्या खानावळीला ॲग्रमेंटच्या छावणीतील गोंधळाचे जे स्वरूप आले होते ते नाहीसे झाले आणि ऑगस्टसच्या राज्यातील सार्वत्रिक शांततेचे वातावरण तेथे पसरले. डॉन फर्डिनांड आणि पाद्री यांनी यशस्वी मध्यस्थी केल्याबद्दल घरातील सर्व लोकांनी त्यांचे आभार मानले.

आता डॉन क्विक्झोट यांना अलिकडे सतावून सोडणाऱ्या साऱ्या अडचणी आणि विलंब नाहीसे झाले, तेव्हा त्यांना वाटले, आपण जगप्रवास पुढे चालविण्याची वेळ होऊन गेलेली आहे. जी साहसी कृत्ये करण्याचा आपल्याला आदेश मिळालेला आहे आणि ज्यासाठी आपली निवड झालेली आहे, ती आपण आता सिद्धीस नेली पाहिजेत असे त्यांनी ठरविले. म्हणून तेथून जाण्याचा आपला निर्धार त्यानी सर्वांपुढे ठामपणे मांडला आणि डोरोथीपुढे त्यांनी गुडघे टेकले. " अशा अवस्थेत मी तुमचे काही ऐकून घेणार नाही, आधी तुम्ही उठा. " असे ती म्हणाली. तेव्हा ते आपल्या नेहमीच्या पद्धतीने तिला म्हणाले, " हे लावण्य–लतिके, ' तत्परता ही यशाची जननी होय ' ही म्हण सर्वांना माहीत आहे. युद्धातील मोठमोठे विजय, त्वरा व तत्परता यावर अजूनही अवलंबून असतात असे आम्ही पाहिले आहे. तसे केल्यानेच आपण शत्रूच्या योजना ढासळू शकतो आणि शत्रूचा हल्ला होण्यापूर्वीच आपण विजय बळकावतो. हे कुलीन नि सुविख्यात महिले, यावरून मी असा अंदाज बांधतो की, या किल्ल्यातील आमचे वास्तव्य आमच्या पुढील योजनांना पोषक न ठरता घातक ठरण्याचा संभव आहे. आम्ही जी योजना आमच्या मनात आणली असेल, तिचा सुगावा आमच्या राक्षशी शत्रूला हेरामार्फत किंवा अन्य गुप्त मार्गांनी लागेल आणि परिणामी, एखाद्या अजिंक्य किल्ल्यात तो स्वतःला सुरक्षित ठेवील आणि त्यामुळे आमच्या पराकाष्ठेच्या प्रयत्नांची शक्ती आणि माझे अजिंक्य बाहुबल हे कुचकामी ठरेल, असे समजणे सयुक्तिक होईल. म्हणून प्रिय बाईसाहेब, आपण मोठ्या तत्परतेने येथून चटदिशी निघून जाऊ या म्हणजे शत्रूच्या योजना धुळीस मिळतील, आणि मिळेल ती संधी आपण साधल्यामुळे आपले भाग्य उजळेल. "

राजकन्येच्या उत्तराची वाट पाहण्यासाठी ते तेथे थांबले. त्यांच्या भाषावडंबराला साजेशा शैलीने आणि गंभीर मुद्रेने तिने उत्तर दिले, " हे थोर शिलेदारा, दुःखिताना मदत करण्याची आणि दलितांचा उद्धार करण्याची जी तीव्र तळमळ आणि अदम्य लालसा आपण दाखवीत आहात, त्यामुळे अखिल मानवजातीच्या प्रशंसेवर व

धन्यवादावर आपला योग्य हक्क आहे. तथापि आपण माझ्याकडे विशेष लक्ष पुरवून मला साहाय्य करण्यासाठी मोठे परिश्रम केले आहेत, त्यामुळे मी आपले विशेष आभार मानते आणि संतोष प्रदर्शित करते. मी परमेश्वराला अशी खास विनंती करते की, माझ्या बाबतीतील आपले उदार उद्देश सत्वर सफळ व्हावेत. त्यामुळे स्त्री-जातीमध्ये आढळणाऱ्या आदरभावाची आणि कृतज्ञतेची खात्री मी आपल्याला पटवू शकेन. आपल्या प्रयाणा-संबंधी मी आपल्या इच्छेवर अवलंबून आहे. माझ्या शरीराची काळजी घेण्याचे काम मी आपल्यावर सोपविले आहे, एवढेच नव्हे तर, हुकूम करण्याचे सारे अधिकारही मी आपल्याला अर्पण केले आहेत." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "तर मग परमेश्वरी सत्तेच्या साहाय्याने मी राणीसाहेबांना सिंहासनावर पुनः आरूढ करण्याची कोणतीही संधी गमावणार नाही. कारण माझ्या आज्ञेला शरण जाण्याइतकी लीनता दाखविण्याची कृपा आपण केली आहे. आपले प्रयाण तत्काळ झाले पाहिजे. माझी इच्छा तीव्र आहे, आपला प्रवास लांबचा आहे आणि विलंब करण्यात धोका आहे. या सर्वांमुळे येथून जाण्याची मला मोठी प्रेरणा मिळत आहे. मला ज्याचे भय वाटावे असा कोणी प्राणी देवाने निर्माण केलेला नाही आणि सैतानाने पाहिलेला नाही. सँको, पळ, पळ, रोझिनांटवर खोगीर घाल, तुझ्या गाढवावरही घाल आणि बाईसाहेबांचे तट्टू तयार कर. येथील किल्लेदाराचा आणि या सरदार-दरकदाराचा आपण निरोप घेऊ या आणि येथून तत्काळ निघू या."

हे सारे ऐकून बिचाऱ्या सँकोने आपले डोके हलविले आणि म्हटले, "धनीसाहेब, शहरात जितक्या भानगडी असतात ( हे आदराने सांगितले पाहिजे ) असे म्हणतात, त्यापेक्षा खरोखर अधिक भानगडी तेथे असतात." डॉन क्विक्झोट गरजले, "अरे दुष्टा, माझ्या यशाला कलंक लावणाऱ्या कोणत्या भानगडी लहान किंवा मोठ्या शहरात असतील रे?" सँको म्हणाला, "नाही महाराज, आपल्याला राग येत असेल तर मी गप्प बसतो. तेवढेच आपल्याला हवे आहे ना? पण आपण ऐकल्याच पाहिजेत अशा काही गोष्टी आहेत आणि त्या मी सांगेन. विश्वासू शागीर्दाने नि इमानी सेवकाने तसेच करणे योग्य ठरेल." तेव्हा शिलेदारजी म्हणाले, "तुला काय म्हणायचे असेल, ते सांग. मात्र त्याचा परिणाम भेकडपणात न व्हावा. तुला जर भीती वाटत असेल, तर ती तू आपल्याजवळच ठेव. भीतीचा मला तिटकारा वाटतो. म्हणून तिचा उल्लेख करून मला सतावू नकोस." सँको उत्तरला, "छे! भीती गेली खड्ड्यात. तिचा काहीच संबंध नाही. मी आपल्याला जे काही सांगणार आहे ते, महाराज, आपल्या तोंडावर नाक आहे हे जितके खचित, तितकेच स्पष्ट आहे. या येथील बाईसाहेब स्वतःला मिकोमिकोनच्या प्रचंड राज्याच्या राणी समजतात. पण माझी आजी जितकी राणी असेल तितक्याच या आहेत. महाराज, आपण जरा विचार करा. आपल्या कल्पनेप्रमाणे या जर खरोखर सुंदर राणी असत्या तर, त्या कधी तरी प्राण्यांची तोंडे चोखीत बसल्या असत्या काय? आणि या मंडळीत असलेल्या पण ज्याचे नाव मी घेत नाही अशा माणसाचे चुंबन घेत

राहिल्या असत्या काय ? " सँकोचे हे शब्द ऐकून डोरोथी लाजली. कारण, डॉन फर्डिनांडने केव्हा तरी गुप्तपणे तिचे चुंबन घेतले होते. आपल्या प्रेमाचे बक्षीस उपटण्यासाठी त्याने आपल्या ओठांना स्वातंत्र्य दिले होते. ते सँकोने योगायोगाने पाहिले आणि राणीसाहेबांना अत्यंत अपायकारक होईल असा त्याचा अर्थ त्याने लावला. थोडक्यात म्हणजे त्याला ती पण्यांगना वाटली. तथापि त्याच्या निंदेकडे तिने मुळीच लक्ष दिले नाही. तिने त्याला बोलू दिले. तो पुढे बोलू लागला, " महाराज, मी असे म्हणतो याचे कारण, भल्याबुऱ्या साऱ्या हवामानातून, रात्रीनंतर दिवसा आणि दिवसानंतर रात्री, आपण रखडत असताना, खानावळीतील या माणसाने आपल्या पैशाने मौज मारली आणि आपल्या श्रमाचे फळ बळकावले. म्हणून, धनीसाहेब, रोझिनांटवर आणि माझ्या गाढवावर खोगीर चढविण्याची किंवा या बाईचे तट्टू तयार करण्याची काहीच आवश्यकता नाही. आपण जेथे आहो, तेथेच रहाणे चांगले. मग कोणतीही बाजारबसवी कितीही रोट्या भाजो किंवा दारू गाळो आणि कोणताही भुकेलेला माणूस त्यावर ताव मारो ! "

देवा रे देवा ! सँकोच्या या अपमानास्पद शब्दांनी शिलेदारांचा संताप किती शिगेस पोचला ! त्यांचे सर्वांग थरथरू लागले, त्यांची जीभ अडखळू लागली आणि त्यांचे डोळे आग ओकू लागले. ते म्हणाले, " अरे दुष्टा, वेडपटा, माथेफिरू, आडमुठ्या, टवाळखोरा, निंदका ! असे अधम नि अपमानास्पद विचार तू आपल्या मनात आणतोस तरी कसे ? आणि माझ्यासमोर नि या सन्मान्य गृहस्थांसमोर आपले उमेंट नि खोडसाळ संशय तोंडाने उच्चारतोस तरी कसे ? चालता हो – माझ्या दृष्टीसमोरून चालता हो. तू या सृष्टीतील एक राक्षस आहेस, असत्याचे कोठार आहेस, लबाडीचा पेटारा आहेस, फसवेगिरीची वखार आहेस, मूर्खपणाचा अर्क आहेस, साऱ्या अब्रूचा नी इज्जतीचा वैरी आहेस. दूर हो आणि तुझे तोंड मला पुनः कधीहि दाखवू नकोस, दाखविलेस तर माझ्या रागाचा भडका उडेल ! " नंतर त्यांनी आपल्या भुवया रागाने आकुंचित केल्या, आपले गाल फुगविले आणि जमिनीवर पाय आपटले. त्यांच्या त्या दर्शनाने सँकोची इतकी बाबरगुंडी उडाली की, त्यामुळे त्या बिचाऱ्याचा जीव खलासच व्हावयाचा.

अशी भयंकर गाळण उडाली असताना तो बिचारा सेवक काय करणार ? त्याने पाठ वळविली आणि त्या खोलीतून तो गुपचूप बाहेर पडला. पण डोरोथीला शिलेदारांच्या स्वभावाची ओळख झालेली होती. म्हणून त्यांचा क्रोध शांत करण्याचे काम तिने आपल्या अंगावर घेतले आणि म्हटले, " 'दुःखी चेहऱ्याचे शिलेदारजी,' आपण राग आवरा, अशी मी विनंती करते. आपल्या सेवकाच्या स्वैर शब्दांनी आपण क्षुब्ध व्हावे हे आपल्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारे आहे. तो जे काही म्हणाला, त्यामध्ये विवेकाचा थोडाफार भाग आहे असे म्हटल्याशिवाय मला राहावत नाही. त्याचे विचार कळकळीचे असतात आणि त्याची तत्त्वे प्रामाणिक असतात. त्याच्यावर खोट्या निंदेचा वा मत्सराचा आरोप करणे अनुदारपणाचे ठरेल. आपण या प्रकरणाचा अधिक खोल विचार केला पाहिजे. या किल्ल्यातील सारे व्यवहार जादूने घडत आहेत, असे

जसे आपल्याला आढळले, तसाच काही दुष्ट आभास सँकोला दिसला असेल आणि मला कमीपणा आणणारे काही मंतरलेले दृश्य त्याच्या डोळ्यापुढे उभे राहिले असेल— आणि म्हणून तो तसे बोलला असेल.''

शिलेदार म्हणाले, '' दैवी शक्तीने राणीसाहेबांनी हा सारा गुंता उलगडला. त्या बिचाऱ्याच्या दुर्वर्तनाला कारण केवळ जादूटोणा आणि कोणा भूतपिशाच्चाची मत्सरग्रस्त शक्ती हेच असले पाहिजे. कारण या बापुड्या सँकोचा स्वभाव चांगला आहे, साधा-भोळा आहे. त्यामुळे तो आपल्या डोक्यातून काही असत्य कधी बाहेर काढणार नाही किंवा कोणाला अपायकारक होईल अशी नालस्ती करण्याचा अपराधही तो करणार नाही.'' डॉन फर्डिनांड म्हणाला, '' हे अगदी उघड आहे, म्हणून आम्ही सर्वजण इमानी सँकोच्या वतीने मध्यस्थी करतो. या आभासांनी त्याची बुद्धी कलुषित होण्यापूर्वी आपली त्याच्यावर जशी कृपा होती, तशीच ती यापुढेही असावी अशी आमची विनंती आहे.'' डॉन क्विक्झोट यांनी ते मान्य केले. पाद्र्याने बिचाऱ्या सँकोला तेथे आणले, त्यावेळी तो थरथर कापत होता. आपले गुडघे टेकून त्याने आपल्या अपराधाची कबुली नम्रपणे दिली आणि आपल्या धन्याला विनंती केली, '' महाराज, मला क्षमा करा आणि आपल्या हाताचे उदार चुंबन घेण्याची परवानगी मला देऊन त्या क्षमेवर शिक्कामोर्तब करा.'' डॉन क्विक्झोट यांनी त्याला आपला हात आणि आशीर्वाद दिला आणि म्हटले, '' सँको, मी आतापर्यंत तुला वारंवार जे सांगत आलो आहे, त्यावर आता तरी तुझा विश्वास बसेल ना? या किल्ल्यातील प्रत्येक गोष्टीवर जादूचा प्रभाव पडलेला आहे, असे मी म्हणतो.'' सँको म्हणाला, '' होय, महाराज, आपल्याप्रमाणेच मलाही वाटते. फक्त मला घोंगडीत खालीवर फेकले गेले, ते नेहमीच्या मामुली व्यवहाराप्रमाणेच असेल असे मला वाटते.'' डॉन क्विक्झोट उत्तरले, '' सँको, तसे समजू नकोस. तो सारा जादूचा खेळ आहे. तसे नसते तर मी खरपूस सूड उगवला असता. पण माझी सूडबुद्धी किंवा क्रोध ज्याच्यावर काढावा, असे कोणीही मला तेव्हा किंवा आता सापडले नाही.'' कशासंबंधी हा सारा वाद चालला आहे, हे जाणण्याची प्रत्येकाला इच्छा होती. तेव्हा खानावळवाल्याने सँकोच्या उचल-बांगडीची हकिगत त्या सर्वांना सांगितली. तेव्हा ते सारे खो खो करून हसू लागले. त्यामुळे सँको संतापला असता, पण त्याच्या धन्याने त्याला पुनः खात्रीपूर्वक सांगितले की, अरे, हे सारे इंद्रजाल आहे ! त्यावर त्या सेवकाचा विश्वास बसला नाही, तरी त्याने आपले ओठ घट्ट मिटले.

अशा प्रकारे खानावळीत दोन दिवस घालविल्यानंतर त्या सर्वांनी तेथून जाण्याचा विचार चालविला. डॉन क्विक्झोट यांच्या तापटपणाला चेतविण्याचे कष्ट डॉन फर्डिनांड व डोरोथी यांनी यापुढे घेऊ नयेत, म्हणून त्यांना घरी नेण्याची एक युक्ती पाद्री व न्हावी यांनी शोधून काढली. आपले बैल घेऊन जाणाऱ्या एका गाडीवानाशी त्या दोघांनी डॉन क्विक्झोट यांना घरी नेण्याचा करार केला. नंतर त्यांनी एक लाकडी पिंजरा बनवून घेतला. तो इतका मोठा होता की, त्यात शिलेदारजी सुखाने बसू–झोपू

शकतील. नंतर खानावळीतील सर्व लोकांनी आपापले वेष पालटले. कोणी मुखवटे घातले, कोणी आपली तोंडे रंगविली आणि बाकीच्यांनी आपले पोशाख बदलले. यामुळे तेच ते आहेत, असे डॉन क्विक्झोट यांना ओळखता आले नाही. अशी सोंगे घेऊन ते सर्वजण त्यांच्या खोलीत गुपचुप शिरले. नव्या दगदगीने ते गाढ झोपी गेले होते. त्यांच्यावर सर्वांनी एकदम जोराने हल्ला केला आणि त्यांचे हात–पाय इतके घट्ट दाबून धरले की, त्यामुळे त्यांना हालचाल करता येईना. आपल्याभोवती उभ्या असलेल्या विचित्र मूर्तींकडे टक लावून पहाण्याशिवाय त्यांना दुसरे काहीच करता येईना. आता-पर्यंत त्यांच्या वेड्या बुद्धीला जी विलक्षण कल्पना वाटत होती, ती तत्काळ पक्की झाली. आपल्यावर कोणी तरी जादूटोणा केला आहे, अशी त्यांची खात्री पटली. आपल्या भोवतालच्या या भयंकर मूर्ती म्हणजे या मंतरलेल्या किल्ल्यातील भूत–पिशाच्चें होत असे त्यांना वाटू लागले. येथपर्यंत पाद्र्याची युक्ती त्याच्या अपेक्षेप्रमाणे यशस्वी झाली. एकटा सँको काय तो आपल्या स्वरुपामध्ये आणि शुद्धीमध्ये होता. तो हे सारे शांतपणे पाहात होता. त्या सर्वांना तो चांगले ओळखत होता, पण या सर्वांचा शेवट काय होतो, हे पाहण्याचे त्याने ठरविले आणि म्हणून आपल्या मनातील विचार बोलण्यास तो धजला नाही. त्याचा धनीही काही बोलत नव्हता. आपल्या नशिबात काय आहे, याची तो शांतपणे वाट पहात होता–आपल्या दुर्दैवाने आपल्या ताटात काय वाढून ठेवले आहे याचा विचार तो करीत होता. या वेळपर्यंत त्यांनी त्यांना बिछान्यातून उचलले आणि पिंजऱ्यात ठेवून त्याचे दार बंद केले. पिंजऱ्याचे गज इतके घट्ट बसविलेले होते की, सामान्य ताकदीच्या माणसाला ते काढता आले नसते. त्यांना आपल्या खांद्या-वर घेऊन, ते त्यांना खोलीच्या दाराबाहेर काढीत असताना न्हावी आतडे पिळवटून भयानक आवाजाने काही बोलत असल्याचे त्यांचे कानी आले. त्याचे शब्द असे होते—

"अहो, 'दुःखी चेहऱ्याचे शिलेदारजी,' आपण बंदीवान झाला म्हणून घाबरू नका. दैवाचीच तशी योजना आहे. आपण आपल्या अतुल्य पराक्रमाने जी अत्यंत उदात्त साहसे करण्याचे योजले होते, ती सत्वर सिद्धीस जावी म्हणून दैवाने अशी योजना केली आहे. सिद्धी मिळणार हे खचित. कारण मांचाचा लढाऊ सिंह आणि टोबोसोचे शुभ्र कबुतर यांनी आपल्या उंच नि ताठ माना खाली घालून लग्नाची कोमल धुरा अंगावर घेतली व ती दोघे एकत्र झाली की सिद्धी होणार. या दोघांच्या आश्चर्य-कारक संयोगापासून बहाद्दर छावे जन्मास येतील आणि आपल्या पराक्रमी माता-पित्याच्या उगारलेल्या पंजांची नक्कल करतील–आणि हे होईल नक्षत्रांच्या दोन प्रदक्षिणा सूर्य पुऱ्या करील तेव्हा हे विश्वासू नि थोर सेवका, आतापर्यंत या जगात कमरेला तलवार, हनुवटीला दाढी आणि नासिकेमध्ये घ्राणेंद्रिय ठेवून जे शागीर्द काम करीत आले, त्यामध्ये तू अग्रगण्य आहेस. तुझा हा धनी––शिलेदारीचा तुरा––कैद झाला म्हणून तू नाराज होऊ नकोस किंवा आपला धीर खचू देऊ नकोस. अगदी थोड्या वेळात जगन्निर्मात्याच्या शाश्वत इच्छेनुसार तुझी प्रतिष्ठा इतकी वाढेल की,

तिची तुला कल्पनाही असणार नाही. तुझ्या थोर धन्याने तुला जी अभिवचने दिली असतील, त्या बाबतीत तुझ्या तोंडाला पाने पुसली जाणार नाहीत हे मी तुला ( असत्याचार्य ) साधू मेंटिरोनियाला यांची शपथ घेऊन सांगतो. म्हणून तू या धैर्यशील पण मंत्रबद्ध शिलेदारांचा किल्ला बारकाईने गिरव, अशी मी तुला कळकळीची विनंती करतो. तुम्ही दोघे जेथे जाल, तेथेच कायम राहाल असे ठरलेले आहे. याहून मला अधिक काही काम करण्याची आज्ञा दैवाने दिलेली नाही. आता मी आपला निरोप घेतो आणि परत जातो. कोठे जावयाचे हे मला पक्के माहीत आहे."

न्हाव्याने आपल्या या भविष्यवाणीच्या अखेरीस आपल्या आवाजात कृत्रिम पद्धतीने अशी काही लय आणली की, या मस्करीची ज्याना सर्व माहिती होती, त्यांनाही वाटले, हे भाषण दैवी प्रेरणेने झालेले असावे. ही भविष्यवाणी ऐकून डॉन क्विक्झोट यांना पुष्कळच संतोष झाला. त्यातील भावार्थ ध्यानी घेऊन त्यांनी असे अनुमान केले की, आपला विवाह टोबोसोच्या डल्सीनियाशी होणार आणि ला मांचाला शाश्वत कीर्ति मिळवून देणारे आपले पुत्र-सिंहाचे छावे-तिच्या उदरी येणार! या विश्वासाच्या बळावर ते आपला आवाज चढवून आणि दीर्घ सुस्कारा टाकून म्हणाले, "तू कोणीही ऐस, तुझे आनंददायक भविष्य मी मान्य करतो आणि तुला विनंती करतो की, ज्या शहाण्या मांत्रिकाने मला कैद केले आहे, त्याने मी कैदेत असताना माझे रक्षण करावे अशी विनंती तू त्याला कर. मला जी अप्रतिम आणि कृतज्ञभावाची अभिवचने दिलेली आहेत, ती पूर्ण होण्याच्या आत माझा नाश होऊ देऊ नकोस. त्या माझ्या आशा पूर्ण होईपर्यंत मी माझे कारागृह हे राजगृह मानीन, माझ्या शृंखलांना स्वातंत्र्याची चिन्हे समजेन आणि ज्या या खडबडीत जमिनीवर मी निजलो आहे, तिला मऊ मऊ राजेशाही बिछाना मानीन. माझा शागीर्द सँकोपेंझा याला जे आश्वासन दिले आहे, त्याबद्दल मी म्हणतो की, त्याच्या प्रामाणिकपणाविषयी मला बालंबाल खात्री आहे. कैक साहसी प्रसंगात त्याने आपला लौकिक सिद्ध केला आहे. नशिबाची काही उलटापालट झाली तरी तो मला सोडून जाईल असे मला वाटत नाही. मी त्याला आश्वासन दिलेले बेट किंवा तत्सम देणगी देण्यास मी, त्याच्या किंवा माझ्या कमनशिबाने, असमर्थ झालो तरी माझ्या अखेरच्या मृत्युपत्राअन्वये त्याला त्याचे निदान वेतन तरी मिळाले पाहिजे. त्याची सेवा आणि त्याचे मोठे गुण यांना योग्य असे ते वेतन नसले, तरी माझी जिंदगी आणि कुवत यांना अनुसरून ते असेल, हे मी कबूल करतो."

सँको पँझाने त्यांना तीन-चार वेळा अत्यंत आदरभावाने मुजरे केले आणि त्यांच्या दोन्ही हातांचे चुंबन घेतले. ( दोन्ही हात एकत्र बांधलेले असल्यामुळे एकाच हाताचे चुंबन घेणे शक्य नव्हते. ) मग क्षणार्धात त्या राक्षसांनी तो पिंजरा वर उचलला आणि बैलांच्या जोडीला तो उत्तम रीतीनें जोडला.

□ □

## प्रकरण २०

# डॉन क्विक्झोटवर झालेल्या जादूची पुढील हकिगत आणि अन्य संस्मरणीय घटना

आपल्यावर कोणी जादू केली याचे डॉन क्विक्झोट यांना फारसें आश्चर्य वाटले नाही, पण ती ज्या पद्धतीने केली तिचे त्यांना नवल वाटले. ते म्हणाले, "आतापर्यंत शिलेदारीचे जे जे ग्रंथ मी उलथे–पालथे केले, त्यात मी पूर्वी कधीच असे वाचले नाही की, शिलेदारांना गाडीत घालून इतक्या स्वैरपणे सुस्त बैलांनी ओढून नेले. एखाद्या कृष्णमेघाने आच्छादिले असताना अथवा ग्रिफिनसारख्या प्रचंड पक्ष्यांनी चालविलेल्या अग्निमय रथातून अत्यंत वेगानें त्यांना नेल्याची वर्णने आहेत. पण बैलांच्या टोळीने अशा प्रकारे मला वाहून न्यावे, हे पाहून माझी मति अत्यंत गुंग झाली आहे हे मी कबूल करतो. प्राचीन कालापेक्षा सध्याच्या काळातील मांत्रिक निराळ्या मार्गाने आपले काम करीत असतील. किंवा असेही असेल की, त्या चतुर मांत्रिकांनी माझ्या साठी हा एक खास उपाय शोधून काढला असेल. कारण शिलेदारीचा वापर न झाल्याने गंजून गेलेल्या आणि विस्मृतीत दीर्घकाळ गाडलेल्या शस्त्रांचा जीर्णोद्धार करणारा प्रथम शिलेदार मीच आहे. प्रिय सँको, तुझे मत काय आहे?" सँको म्हणाला, "महाराज, काय सांगावे हे मला कळत नाही. कारण, आपल्याप्रमाणे मी या बाबतीत फारसे काही वाचलेले नाहीं. तरीसुद्धा मी खात्रीपूर्वक आणि शपथपूर्वक असे सांगतो की, येथे इकडे-तिकडे धावणारी भूतपिशाच्चे प्राचीन स्वरूपाची नाहीत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तीं प्राचीन कशी असतील? अरे मित्रा, ती पिशाच्चे आहेत ना? आपल्याला या अवस्थेत लोटून आश्चर्यचकित करण्यासाठी त्यांनी हे विलक्षण देह धारण केलेले आहेत. याची खात्री पटवून घेण्यासाठी तू त्यांना स्पर्श करण्याचा प्रयत्न कर म्हणजे तुला असे आढळेल की, त्यांचे देह भौतिक पदार्थांचे बनलेले नाहीत, तर केवळ तरल हवेचे आहेत आणि हा केवळ बाह्य देखावा आहे." सँको म्हणाला, "व्वाः महाराज, मी तर त्यांना पुनः पुनः हात लावून पाहिले आहे. तेव्हां मला असे आढळले की, जवळपास वाद्य वाजवित असणारे पिशाच्चच येथे वावरत आहे आणि ते एखाद्या कोंबड्यासारखे लठ्ठ नि गुबगुबीत आहे. शिवाय पिशाच्चापेक्षा अगदी निराळा असा एक गुण त्याचे अंगी आहे. भुतांच्या अंगी गंधकाचा आणि इतर घाणेरड्या पदार्थांचा वास येतो असे म्हणतात, पण या गुलछनूच्या अंगी अत्तराचा असा काही सुवास आहे की, मैलावरून तुम्हाला

त्याचा वास येईल. ( डॉन फर्डिनांडला उद्देशून हा उल्लेख बहुधा असावा. त्याच्या योग्यतेच्या इतर सभ्य गृहस्थांप्रमाणे त्याच्या कपड्यांवर अत्तर शिंपडलेले होते. )

डॉन क्विक्झोट उत्तरले, " अरेरे, इमानी सँको, तुला हे कसे कळत नाही की, या पिशाच्चांचा धूर्तपणा तुझ्या साध्या-भोळ्या बुद्धीच्या आटोक्यापलीकडचा आहे. कारण पिशाच्चाना कोणताही गंध नसतो हे लक्षात ठेव – आणि असलाच तर तो दुर्गंध असतो. कारण त्यांच्याबरोबर त्यांचा नरक आलेला असतो. त्यांना भोगाव्या लागणाऱ्या यातनांशी गंध किंवा सुवास असंगत आहेत. तेव्हां तुझी ही चूक म्हणजे तुझा बुद्धि-भ्रंशच होय. " धनी व त्याचा नोकर यांच्यातील हा संवाद ऐकून डॉन फर्डिनांड आणि कार्डेनियो यांना असे भय वाटले की, सँको आपले सारे कारस्थान बिघडवून टाकील. म्हणून त्यांनी खानावळवाल्याला गुप्तपणे सूचना दिली की, रोझिनांट आणि सँकोचे गाढव तयार ठेव. पाद्र्याने त्या अधिकाऱ्याबरोबर त्यांना घरी पोचविण्यासाठी एक दिवस राहण्याचे कबूल केले. कार्डेनियोने डॉन क्विक्झोटचे निशाण रोझिनांटच्या खोगिरावर अडकविले आणि दुसऱ्या बाजूस ते पातेले ठेवले. त्याने सँकोला खुणेने सांगितले की, तू आपल्या गाढवावर बैस आणि रोझिनांटचा लगाम घेऊन त्याला पुढे चालव. गाडीच्या प्रत्येक बाजूस दोन अधिकारी उभे राहिले.

त्यांच्या प्रयाणाची सारी सिद्धता झाल्यानंतर यजमानीण, तिची मुलगी आणि मेरिटोर्नेस हे सारे शिलेदाराचा निरोप घेण्यासाठी दाराशी आले. त्यांच्या दुर्दैवाबद्दल आपल्याला असह्य दुःख झाल्याचे त्यांनी सोंग केले. तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " अत्यंत सन्माननीय स्त्रियांनो, आपले अश्रु आवरा. माझ्या व्यवसायात असे दुर्दैवी प्रसंग यावयाचेच. अशा संकटांमुळेच आम्ही आपल्या कीर्तीचा आणि लौकिकाचा मोठेपणा मोजीत असतो. ही संकटे म्हणजे मत्सराची फळे होत. मोठमोठ्या सद्गुणी लोकांनाही अद्याप मत्सराची बाधा होत असते. आमच्या प्रतिष्ठेचा आणि लौकिकाचा मत्सर वाटणाऱ्या राजपुत्रांनी आणि शिलेदारांनी आमच्यावर आणलेली ही संकटे आहेत. पण अशा सर्व जुलमांना न जुमानता, आणि पहिला मांत्रिक झोरोस्ट्रेस याच्या जादूला न जुमानता, सद्गुणांचाच विजय शेवटी होणार. आणि सद्गुण सर्व संकटांवर मात करून सूर्याप्रमाणे सर्व विश्व प्रकाशित करण्यासाठी आपली प्रथा शेवटी पसरविणार. सुंदरींनो, अज्ञानामुळे किंवा आपल्याला योग्य असणारा आदरभाव न दाखविल्यामुळे, मी जर आपल्याला संतोष देण्यासारखे वर्तन केले नसेल तर त्याची मला क्षमा करा. जाणूनबुजून कोणताही अन्याय मी कधीही केलेला नाही असे मला ठाम वाटते. कोणा तरी मत्सरी मांत्रिकाने या तुरुंगात मला कोंडलेले आहे. त्यातून माझी मुक्तता होण्यासाठी तुम्ही प्रार्थना करून मला मदत करावी, अशी माझी इच्छा आहे. मी मुक्त होताच पहिली गोष्ट ही करीन की, तुम्ही आपल्या या किल्ल्यात माझ्यावर ज्या अनंत कृपा-प्रसादांचा वर्षाव केला, त्यांची पोच मी कृतज्ञ भावाने देईन. " डॉन क्विक्झोटच्या या भाषणाने त्या स्त्रियांची अशी करमणूक होत असताना, पाद्री व न्हावी हे सर्व मंडळींचा

निरोप घेण्यात गुंतलेले होते. एकमेकांना धन्यवाद व आलिंगने दिल्यानंतर पुढील काळात आपण काय करणार, याची माहिती ते एकमेकांना देत होते. डॉन फर्डिनांड याने पाद्र्याला विनंती केली की, " डॉन क्विक्झोट यांच्या साहसाचे सुरस वर्णन तू मला सांग. त्यापेक्षा मोठा उपकार दुसरा कोणताही असणार नाही. मी माझ्या स्वतःच्या विवाहाची आणि लुसिंडा आपल्या आई-बापाकडे परत गेल्याची हकिगत तुला सांगण्याचे वचन देतो. तसेच झोरेडाचे धर्मांतर, डॉन लेव्हिसचे सफळ प्रेम यांचीही कथा मी तुला सांगेन. "

डॉन फर्डिनांड याचे समाधान करण्याचे वचन पाद्र्याने शपथेवर दिले. शेवटचे धन्यवाद देण्याचे काम संपले. पाद्री जाण्याच्या बेतात होता. तेवढ्यात खानावळवाल्याने त्याच्या हाती कागदाचा एक गठ्ठा दिला. तो त्याला कपड्यांच्या एका पिशवीत सापडला होता. त्याच पिशवीत त्याला " अशिष्टाची कथा " सापडली होती. खानावळवाल्याने पाद्र्याला सांगितले, " हे सारे कागद तुझ्या उपयोगासाठी आहेत. त्यांचा मालक येथे येण्याचा आणि त्यांची मागणी करण्याचा काही संभव नाही. मला तर वाचताच येत नाही, म्हणून ते तुम्हाला देण्यापेक्षा त्यांचा दुसरा काही चांगला उपयोग होणार नाही." पाद्र्याने त्याला मनापासून धन्यवाद दिले आणि ते कागद उघडले. त्यांच्यावर शीर्षके होती–' रिन्कोनेट याची कथा ' आणि 'कॉर्टडिलो'. या नावावरून ती कादंबरी असावी आणि बहुधा ' चमत्कारिक अशिष्टाची कथा ' याच्या लेखकानेच लिहिलेली असावी. कारण एकाच पिशवीत ती तिन्ही हस्तलिखिते सापडली होती. त्याने ते कागद आपल्या खिशात ठेवले आणि पहिली संधी मिळताच ते वाचावयाचे ठरविले. नंतर आपला दोस्त न्हावी याच्याबरोबर तो गाढवावर स्वार झाला. दोघांनी मुखवटे धारण केले आणि ते त्या मिरवणुकीतून निघाले. ती मिरवणूक अशा क्रमाने चालली होती–गाडीवान गाडी नेत होता. गाडीच्या उजव्या आणि डाव्या बाजूस ते दोन बंदुकधारी अधिकारी होते. त्यांच्यामागोमाग सँको आपल्या गाढवावरून चालला होता आणि रोझिनांटला नेत होता. मिरवणुकीच्या पिछाडीस खंबीर खेचरांवर पाद्री व न्हावी बसलेले होते. सर्वांच्या मुद्रा गंभीर आणि शिष्ट दिसत होत्या. ते अवजड बैल चालतील त्यापेक्षा अधिक वेगाने ही मिरणूक जात नव्हती. डॉन क्विक्झोट पिंजऱ्याच्या पाठीशी टेकून बसले होते. त्यांचे हात बांधलेले होते आणि पाय पसरलेले होते. पण ते इतके स्तब्ध व निश्चल होते की, माणसापेक्षा एखादा पुतळाच तेथे आहे, असे कोणास वाटावे.

अशा मंद आणि सावकाश गतीने ते सुमारे पाच मैल गेले असतील, तोंच त्यांच्या धर्मगुरूने एका लहानशा दरीत मुक्काम करण्याची सूचना केली. पण जरा पुढे गेल्यावर थांबावे असा सल्ला त्याने ऐकला. कारण न्हाव्याने त्याला सांगितले, " आपल्याला दिसणाऱ्या या टेकाडापलीकडे जी एक दरी आहे, तिच्यात पुष्कळ गवत आहे, आणि आपल्या कामाला ती अधिक योग्य आहे." ते फारसे दूर गेले नाहीत तोंच, उत्तम लष्करी पोशाख केलेली सहा–सात माणसे मोठ्या डौलाने दौडत येत असलेली

पाद्याने पाहिली. ते वेगाने दौडत येत असल्यामुळे धर्मगुरू-संस्थेच्या खेचरावर बसून ते आले असावेत असे दिसत होते. सुस्त बैलांच्या टोळीने डॉन जसे फरफटत नेले जात होते, तसे हे नव्हते. दिवसाचा ताप वाढण्यापूर्वी खानावळीत जाऊन पोचण्याचा प्रयत्न ते करीत होते. खानावळ दीड–एक मैलावर होती. सारांश, आमच्या मंदगती प्रवाशांच्या-जवळ ते वेगाने आले. त्यांच्यापैकी एकजण टोलेडोचा धर्माधिकारी होता आणि आपल्याबरोबरच्या लोकांचा धनी होता. त्याने ती मिरवणूक पाहिली – ती गाडी, ते पहारेकरी, तो सँको, तो रोझिनांट, तो पाद्री आणि तो न्हावी – आणि मुख्यतः पिंजऱ्यातील डॉन क्विक्झोट–या सर्वांना पाहून त्याने त्यांना विचारले, " या माणसाला पकडण्याची ही विचित्र रीत कोठली ? " पहारेकऱ्यांना पाहून त्याचा असा समज झाला की, धर्मसंस्थेचा कैदी असलेला हा कोणी कुप्रसिद्ध गुन्हेगार असावा. मिरवणुकीतील एका माणसाने त्याला सांगितले, "हे शिलेदार आहेत. त्यांच्या तुरुंगवासाचे कारण मी सांगू शकत नाही. मी स्वतःची माहिती देऊ शकेन, कारण ती मला चांगली आहे."

त्यांचा हा संवाद कानावर पडल्यामुळे डॉन क्विक्झोट म्हणाले, " सभ्य गृहस्थहो, आपल्याला जर शिलेदारीचे ज्ञान असेल आणि त्यामध्ये आपण जर पारंगत असाल, तर मी माझ्या दुर्दैवाची कहाणी आपल्याला निवेदन करीन. जर आपण तसे नसाल तर मी स्वतःला शीण करून घेण्याचे काहीच कारण नाही. " धर्मगुरू म्हणाला, " मित्रा, खरे आहे तुझे म्हणणे. विल्लापँडोच्या धर्मपंथापेक्षा शिलेदारीच्या ग्रंथांचा परिचय मला अधिक आहे. आपली तेवढीच हरकत असेल, तर ती मला लागू नाही. म्हणून आपण आपल्या इच्छेप्रमाणे निर्धास्तपणे सर्व काही निवेदन करावे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " प्रभूची अनुज्ञा असेल तर तसे होईल. शिलेदार–महाशय, आपण हे समजून घ्या की, कोणा दुष्ट मांत्रिकाने द्वेष – मत्सरामुळे माझ्यावर जादूटोणा केला, म्हणून मला या पिंजऱ्यातून नेले जात आहे. कारण सद्गुणावर सज्जनांचे जितके प्रेम असते, त्यापेक्षा त्यांचा दुर्जनाकडून अधिक उत्साहाने छळ केला जातो. व्यवसायाने मी शिलेदार आहे. ज्यांचे नाव त्यांच्या कृत्यामुळे कीर्तीच्या इतिहासात कधी नमूद केले जात नाही, अशा माणसांपैकी मी खचित नव्हे, हे मी आपल्याला ठासून सांगतो. पण मूर्तिमंत मत्सराला किंवा इराणातील साऱ्या मांत्रिकांना अथवा हिंदुस्थानातील ब्राह्मणांना अगर इथिपिओच्या विद्वानांना न जुमानता, अमरत्वाच्या मंदिरात माझे नाव कायमचे कोरले जाईल आणि भावी युगातील शिलेदारांना माझे चरित्र हा एक आदर्श ठरेल. माझे अनुकरण करणारे भावी शिलेदार शौर्याच्या आणि कीर्तीच्या शिखरावर जाऊन पोचतील. "

त्या माणसांजवळ जाऊन पाद्री म्हणाला, " ला मांचाचे हे थोर डॉन क्विक्झोट खरे सांगत आहेत. त्यांना या गाडीत खरोखर जादूने आणण्यात आले आहे. त्यात त्यांचा काही अपराध नाही की दोष नाही. पण सद्गुण पाहिला की ज्यांच्या कपाळावर आठी चढते आणि पराक्रम दिसला की ज्यांची मने दुःखी होतात, अशा लोकांच्या मत्सरी विश्वासघातामुळे त्यांना या पिंजऱ्यात अडकून पडावे लागले आहे. महाराज,

'दुःखी चेहऱ्याचे शिलेदार' म्हणतात ते हेच. त्यांच्याविषयी आपण खचित ऐकले असेल. त्यांची पराक्रमी कृत्ये शाश्वत ताम्रपटावर आणि अक्षय्य संगमरवरावर कोरली जातील. त्यांची कीर्ती पुसून टाकण्याचा प्रयत्न करून द्वेष थकून जाईल आणि ती कीर्ती लपवून ठेवण्याचा मत्सराचा प्रयत्न फोल ठरेल."

कैदी व त्याचा पहारेकरी एकाच भाषेत बोलत आहेत हे पाहून तो धर्मगुरू बुचकळ्यात पडला. त्याला व बाकीच्या मंडळींना मोठे आश्चर्य वाटले. खुलासा करण्यासाठी सँको तेथे धावत आला आणि म्हणाला, "हे पाहा, महाराज, मी खरे सांगतो—मग ते तुम्हाला आवडो वा न आवडो. माझ्या आईवर जसा जादूचा प्रयोग झालेला नव्हता, तसाच माझ्या या धन्यावरही झालेला नाही. तो चांगला शुद्धीवर आहे, तो खातो–पितो आणि इतर लोकांप्रमाणे आपल्या नैसर्गिक गरजा भागवितो. पूर्वीप्रमाणेच आताही त्याचे सारे काही ठीक चालले आहे. तरीही या साऱ्या गोष्टी करणाऱ्या या माणसावर जादू केलेली आहे, असे हे लोक मला सांगतात. माझा धनी बोलूही शकतो. तुम्ही त्याला एकटे मोकळे सोडा म्हणजे तीस वकिलांपेक्षाही तो अधिक बडबड करील." नंतर पाद्र्याकडे वळून तो म्हणाला, "अहो पाद्रीसाहेब, मी तुम्हाला ओळखले नाही असे वाटते काय? ही सारी नवी जादूगिरी कशासाठी चालली आहे याची कल्पना मला करता येत नाही काय? तुम्ही आपली तोंडे झाकली असली तरी मी तुम्हा सर्वांना पक्के ओळखतो. तुम्ही कितीही लांड्या–लबाड्या केल्या तरी तुमचा बेत मला माहीत आहे. पण जुनी म्हण आहे ना? 'प्रवाहाविरुद्ध पोहण्याचा काही उपयोग नाही.' आणि सर्वांत दुबळा माणूस पराभव पत्करतो. त्यातले दुर्दैव जावो सैतानाच्या वाट्याला. आपण आमच्या या खेळात बिघाड केला नसता, तर माझ्या धन्याचे लग्न यापूर्वीच राजकन्या मॅकोमिकोनाशी झाले असते आणि मी निदान सरदार तरी झालो असतो. अगदी वाईटातील वाईट झाले असते तरी मला बेटाची जहागिरी मिळाली असती हे खचित. पण दुसरी एक जुनी म्हण खरी आहे ना? 'दैवाचा चक्र–नेमि–क्रम असतो. काल जो शिखरावर असतो, तो आज तळाशी जातो.' पाद्रीमहाशय, मला खरोखर नवल वाटते, तुम्ही धर्मगुरू असूनही तुम्हाला फारशी सारासारबुद्धी कशी नाही. जरा विचार करा, मला बायको आहे, कुटुंब आहे आणि त्या सर्वांना आपण मोठे व्हावे अशी इच्छा आहे आणि माझ्या धन्याला तर किती तरी सत्कृत्ये करावयाची आहेत. तरी त्यांचा आपण हा जो खेळखंडोबा चालविला आहे, त्याबद्दल एक दिवस आपल्याला जाब द्यावा लागेल, असे तुम्हाला वाटत नाही काय?"

सँकोचे या प्रकारचे बोलणे ऐकून न्हावी म्हणाला, "आपल्या अकलेचे दिवे पाजळू नकोस. मूर्खा, तुझ्या धन्याप्रमाणेच तुझेही डोके बिघडले आहे काय? असेल तर तू या पिंजऱ्यात त्याच्या सोबतीला जाऊन बैस. तुझ्या कवटीत तरंगणारे मंतरलेले बेट कोणते आहे? अरे, तुला कोणत्या चेटकिणीने भारून टाकले आहे आणि म्हणून अशा आशांचे अपत्य तुझ्या पोटी जन्मास येत आहे?" सँको म्हणाला, "काय

अपत्य ? महाराज, आपल्या म्हणण्याचा अर्थ काय ? मी तुमच्या शब्दांचा धिक्कार करतो. या प्रदेशातील सरदार, फार काय, राजासुद्धा ( देव त्याचे कल्याण करो ) मला अपत्य देऊ शकणार नाही. मी गरीब असलो तरी प्रामाणिक आहे, सनातनी ख्रिश्चन आहे आणि कोणाला एका पैचे देणे मी लागत नाही. बेटे मिळावीत अशी मला इच्छा आहे, हे खरे; पण त्याहून वाईट गोष्टींची इच्छा धरणारे लोक जवळच आहेत. प्रत्येकजण आपल्या कर्माचे अपत्य असतो. मी एक माणूस आहे आणि रोमचा पोप किंवा एखाद्या बेटाचा प्रशासक मी होऊ शकेन. जितक्या लोकांना हवी असतील तितक्यांना बेटे देण्यास माझा मालक समर्थ आहे. म्हणून न्हावीदादा, आपण काय बोलतो याची काळजी घ्या. लोकांच्या दाढ्या तासण्यात सर्वस्व आहे असे मानू नका. सारासार–विचार करा. वस्तरा आणि करवत यात फरक आहे. हे मी म्हणतो याचे कारण, आपण एक-मेकांना चांगले ओळखतो. मला कोणी फसवू शकणार नाही. माझ्या धन्यावर झालेल्या जादूच्या प्रयोगाविषयी ईश्वरालाच सारे काही माहीत आहे. या गोष्टीची ढवळाढवळ केली तर अधिकच घाण येईल."

सँकोचा हा उर्मटपणा बंद करण्यासाठी आपण मौन धारण करणेच योग्य, असे न्हाव्याला वाटले. सँको सारी योजना नासून टाकील अशी शंका आल्यामुळे पाद्र्याने त्या धर्मगुरूला जरा पुढे होण्याची विनंती केली आणि म्हटले की, ' पिंजऱ्यातील या शिलेदाराचे सारे रहस्य मी आपल्याला उलगडून दाखवीन. ते ऐकल्यावर आपल्याला असे वाटेल की, आतापर्यंत आपण ऐकलेल्या साऱ्या गंमतींच्या गोष्टींमध्ये ही फार चांगली आहे. ' त्याच्याबरोबर तो धर्मगुरु पुढे दौडत गेला आणि त्याची माणसे त्याच्यामागोमाग गेली. त्यावेळी डॉन क्विक्झोट यांचे जीवन आणि पात्रता, त्यांचा मूर्खपणा आणि पराक्रम, त्यांच्या वेडेपणाचे मूळ कारण आणि त्यांच्या कार्याची एकंदर प्रगति – हे सर्व पाद्र्याने त्यांना निवेदन केले आणि त्यांना बरे करण्यासाठी आपण त्यांना पिंजऱ्यात कोंडून घरी नेत आहो, हेही सांगितले. तो सारा चमत्कारिक वृत्तांत ऐकून त्या सर्वांना कौतुक वाटले.

पाद्र्याकडे वळून धर्मगुरू म्हणाला, ' पाद्रीमहाशय, माझी आता पूर्ण खात्री पटली की, ज्यांना शिलेदारीचे ग्रंथ म्हणतात, ते जनतेला अत्यंत घातुक आहेत. असे ग्रंथ आतापर्यंत जितके छापले गेले, त्यांपैकी बहुतेकांचे प्रारंभीचे भाग मी वाचले होते आणि त्यावेळी माझे मन खोट्या आणि सुस्त आनंदाने वहावत होते हे खरे, तरीसुद्धा त्यातील कोणत्याही एका घटनेचा पाठपुरावा आपण शेवटपर्यंत करावा असे माझ्या मनात कधी आले नाही. त्या सर्वांमध्ये एकच कथा साठवलेली मला आढळली. एका ग्रंथात जो वृत्तांत, तोच बाकीच्या सर्वांत. त्या सर्वांची रचना आणि भाषा मायलेसियन दंतकथा-सारखी असते. या दंतकथा म्हणजे रिकामटेकड्या गोष्टी असतात. त्यांचा हेतू रंजन हा असतो – ज्ञान हा नव्हे. अपोलोग्ज या नावाने प्रसिद्ध असलेल्या दंतकथांचे तसे नसते, त्या रंजन व ज्ञान एकदमच देतात. या अशा ग्रंथांचा मुख्य हेतू वाचकांचे मनोरंजन करणे हा असला, तरी त्यांच्यामध्ये अतर्क्य अशा आचरट गोष्टींचा इतका भरणा असतो

की, ते कोणाचे रंजन कसे करू शकतात, याची मला कल्पना करता येत नाही. आपल्या जीवाला जाऊन भिडणारा आनंद हा सौंदर्य आणि सुसंगती यातून निर्माण होतो. ज्या वस्तूंच्या दर्शनाने किंवा कल्पनेने माणसाला सौंदर्य किंवा सुसंगती आढळते किंवा कल्पिता येते, त्यांचा अभाव अशा ग्रंथात आढळतो. कुरूप किंवा विसंगत असे काहीही आपल्याला खरे समाधान देऊ शकत नाही. सोळा वर्षांचा कच्चा तरुण तलवारीच्या एका फटकाऱ्याने मनोऱ्याइतक्या उंच राक्षसाला, जणू काही तो पुठ्ठ्याचाच बनविलेला आहे, असा सहजासहजी मधोमध चिरून टाकतो – असे वर्णन ज्या ग्रंथात किंवा दंतकथेमध्ये आहे, त्यात सौंदर्य काय असणार किंवा अंगअंगीभाव–म्हणजे एकूण कथानकाशी इतर घटनांचा अथवा एकूण कथानकाचा इतर घटनांशी प्रमाणबद्ध संबंध–काय असणार? किंवा एकादे वेळी ते ग्रंथकार एकाद्या युद्धाचे वर्णन असे देतात की, कोटिकोटि वीरांचे सामर्थ्य ज्या वैऱ्याचे अंगी होते, त्याच्याशी ग्रंथ–नायकाने लढाई करून केवळ आपल्या बाहुबलाने व शस्त्रबलाने विजय संपादन केला – आपल्या बुद्धीला हे पटले नाही तरी ते आपणाला मानावेच लागते. आणि एकाद्या अज्ञात मुशाफिराच्या–शिलेदाराच्या–बाहूमधे एकादी सर्वसत्ताधीश राणी किंवा महाराणी स्वतःला ज्या लीलेने नि सहजतेने झोकून देते, त्याबद्दल आपण काय म्हणणार? तसेच, शस्त्रधारी शिलेदारांनी भरलेला किल्ल्याचा एकादा बुरुज, वाऱ्याने ढकलले जाणाऱ्या जहाजाप्रमाणे, समुद्रातून आपली वाट कापीत जातो – आणि इटलीचा किनारा संध्याकाळी सोडून दुसरे दिवशी प्रभात-काली प्रेस्टर जॉनच्या देशात उतरतो – अथवा टोलेमीला अज्ञात असलेल्या किंवा मार्को पोलोने न पाहिलेल्या भूमीवर पाय ठेवतो, हे वाचून, पूर्ण रानटी व असंस्कृत नसलेल्या, कोणा मर्त्य मानवाला आनंद वाटेल? आता याला जर कोणी असे उत्तर दिले की, हे ग्रंथ रचणारे लेखक उवडउवड खोट्या कथा लिहीत असतात आणि म्हणून त्यांच्यावर सत्याची किंवा शिष्टाचाराची बंधने पाळण्याची काही जबाबदारी नसते, तर मी त्यांना असे प्रत्युत्तर देईन की, खोटेपणावर सत्याचा जितका जास्त आभास असेल, तितका तो खोटेपणा अधिक प्रशंसनीय; आणि जितक्या संभवनीय त्या कथा वाटतील, तितक्या त्या आनंददायक ठरतील. कल्पित कथा वाचकाच्या बुद्धीला पटणाऱ्या असाव्यात. त्या अशा रचाव्या की, साऱ्या असंभाव्य घटना टाळाव्या, सारे मोठमोठे अपघात शक्य कोटीतील वाटावेत आणि वाचकाचे चित्त एकसारखे संदेहावर आंदोलन घेत असावे. त्या कथांमुळे वाचकांना एकाच वेळी विस्मय, आश्चर्य, आनंद आणि रंजन यांचा लाभ व्हावा. आनंद आणि आश्चर्य हातात हात घालून चालले पाहिजेत. संभाव्यता आणि निसर्गाचे अनुकरण यांचेकडे पाठ फिरवून जो लेखनाकडे धाव घेतो, त्याला हे साध्य होणार नाही. पण संभवनीयता आणि सत्याचा आभास हाच सर्व लेखनाचा आदर्श असतो. सर्वांगांनी परिपूर्ण असणारा शिलेदारीवरील एकही ग्रंथ मी पाहिलेला नाही. ज्याच्या कथानकातील मध्यभागाचा प्रारंभाशी संबंध आहे आणि ज्याच्या शेवटाचा प्रारंभाशी नि मध्याशी संबंध आहे, असे शिलेदारीचे एकही पुस्तक माझ्या

अवलोकनात आलेले नाही. उलट, एखादी प्रमाणबद्ध आकृती दिसण्याऐवजी, कल्पित मूर्ती किंवा राक्षस दिसावा अशा प्रकारे ते आपल्या ग्रंथाचे सारे अवयव जोडीत असतात. याशिवाय, त्यांची शैली ओबडधोबड असते, त्यांचे पराक्रम अविश्वसनीय असतात, त्यांचे प्रेम असभ्य असते, त्यांची नम्रता उद्धटपणाची असते, त्यांच्या लढाया कंटाळ-वाण्या असतात, त्यांची भाषा मूर्खपणाची असते, त्यांचे जलप्रवास अनैसर्गिक असतात, सारांश, या ग्रंथात भरीव चातुर्याचा ठणठणाट असतो – म्हणून ख्रिश्चन साम्राज्यातून निरुपयोगी नि अपायकारक ग्रंथ म्हणून त्यांची हकालपट्टीच होणे योग्य."

पाद्री अत्यंत लक्षपूर्वक ऐकत होता, त्याची विवेक–शक्ति सुदृढ आहे आणि तो म्हणतो ते बहुतेक सारे योग्य आहे असे पाद्र्याला वाटले. म्हणून त्याने त्याला सांगितले "माझेही मत तुमच्यासारखेच आहे. शिलेदारीच्या ग्रंथांचा मी शत्रू आहे. डॉन क्विक्झोटपाशी असे ग्रंथ पुष्कळ होते, ते सारे मी जाळून टाकले. तसे करताना मी त्यांची छाननी केली–कोणते ग्रंथ आगीत टाकायचे आणि कोणते वाचावयाचे, याची निवड मी केली." हे ऐकून धर्मगुरू मनापासून हासला आणि म्हणाला, "तशा ग्रंथाविरुद्ध मी कितीही बोललो असलो, तरी त्यांच्यामध्ये एक चांगली गोष्ट असते. ती म्हणजे, बुद्धिमान माणसाला आपली बुद्धी चालविण्यास एक विषय ते पुरवितात. कोणताही निर्बंध न मानता लेखणी स्वैर सोडण्यास ते वाव देतात. जहाजांची वाताहत, तुफाने, चकमकी, लढाया इत्यादींची वर्णने त्यात येतात. एखाद्या शूर सेनापतीचे अंगी अवश्य असणारे सारे गुण बाळगणारा शिलेदार त्या ग्रंथांत रंगविलेला असतो. तो शत्रूचे बेत हाणून पाडण्यात आपले चातुर्य दाखवितो, आपल्या सैनिकांना प्रवृत्त किंवा निवृत्त करण्यासाठी आपले वक्तृत्व गाजवितो, खलबते करण्यात आपली विवेक–शक्ति प्रगट करतो, काम करण्यात त्वरा करतो आणि शत्रूवर तुटून पडण्यात किंवा त्याचा हल्ला परतविण्यात आपले शौर्य दाखवितो. असे करताना तो कधी आपल्यापुढे दुःखद व शोककारक असा अपघात उभा करतो, कधी अकल्पित व आनंददायक असा धाडसी प्रसंग चित्रित करतो; एके ठिकाणी सुंदर, विनयवती, विवेकी व लाजाळू स्त्री उभी करतो, तर दुसरीकडे ख्रिश्चना-सारखा, शूर व सभ्य गृहस्थ चितारतो. इकडे आडदांड, अमानुष, बढाईखोर, दुष्ट; तर दुसरीकडे प्रेमळ, लढाऊ आणि शहाणा राजपुत्र; प्रजाजनांची निष्ठा व इमान एकीकडे रंगविलेले, तर दुसऱ्या बाजूस राजांचे औदार्य आणि दानशूरता. त्याचबरोबर तो शिलेदार कधीकधी ज्योतिषशास्त्र, विश्वोत्पत्तीशास्त्र, संगीतकला आणि राजनीती यांच्यामधील प्रावीण्यही प्रगट करतो, पिशाच्च–विद्येतही आपण तरबेज आहो, असे दाखविण्याची संधी तो चुकवीत नाही. युलिसिझची सूक्ष्मबुद्धी, ईनिआसची धर्मशीलता, ॲकिलिझचे शौर्य, हेक्टरचे दुर्दैव, सिनॉनचा देशद्रोह, युरिॲलसची मैत्री, ॲलेक्झांडरचे औदार्य, सीझरचा पराक्रम, ट्रेजनची दयाबुद्धी आणि कळकळ, झोपिरसची निष्ठा व केटोचे चातुर्य–तात्पर्य, आदर्श नायक होण्यासाठी लागणारे सर्व गुण, कधी एकाच व्यक्तीचे अंगी, तर कधी अनेक व्यक्तींचे अंगी विभागून वर्णन केलेले असतात. हे वर्णन अशा झोकदार शैलीने

आणि चतुर कल्पकतेने केलेले असते की, त्यामुळे ते सत्याशी बहुतांशी जुळते-मिळते असते. त्यामुळे तो ग्रंथ इतका सुंदर आणि विविध गुणांनी नटलेला होतो की, तो पूर्ण झाल्यानंतर त्यातील उत्तम गुणांमुळे लेखनाचे फल चांगल्या तऱ्हेने प्राप्त होते. मी पूर्वी म्हटल्याप्रमाणे, तो ग्रंथ रंजन व ज्ञान एकदम देऊ शकतो. अशा ग्रंथात लिहिण्याची स्वैर पद्धत अवलंबिलेली असल्याने त्याचा लेखक महाकवी, भावकवी आणि नाट्यकवी होण्याचे स्वातंत्र्य उपभोगतो. काव्याच्या सर्व प्रांतांत तो संचार करू शकतो, कारण महाकाव्ये जशी पद्यात लिहिली जातात, तशीच गद्यातही लिहिली जातात."



## प्रकरण २१

# शिलेदारीच्या ग्रंथावरील धर्मगुरूचे विवेचन ( पुढे चालू ) शिवाय इतर चमत्कारिक प्रकरणे

पाद्र्याने उत्तर दिले, " महाराज, आपले म्हणणे बहुतांशी बरोबर आहे. तशा प्रकारचे ग्रंथ ज्यांनी आजपर्यंत प्रसिद्ध केले, त्यांनाच अधिक दोष दिला पाहिजे. त्यांनी सदभिरुची, कला किंवा इतर संकेत यांना धाब्यावर बसविले. पण जर त्यांनी हे तीन गुण संभाळले असते, तर ग्रीक आणि लॅटिन काव्यात जसे महाकवी होऊन गेले तसे ते गद्यात सुविख्यात झाले असते. " धर्मगुरू म्हणाला, " हे सारे नियम पाळून आपण स्वतःच शिलेदारीवर ग्रंथ लिहावा असा मला एकदा मोह झाला होता, हे मी कबूल केले पाहिजे-आणि खरे सांगावयाचे तर मी शंभरावर पाने लिहिलीही होती. त्यामुळे माझ्या अपेक्षा कितपत पूर्ण झाल्या आहेत, ते पाहण्यासाठी मी त्या विषयांची गोडी असणाऱ्या काही विद्वान आणि विवेकी माणसांना- त्याचप्रमाणे आचरट गोष्टी वाचून ज्यांना आनंद होतो, अशा काही अडाणी माणसानाही-ती पाने मी वाचावयास दिली. त्या सर्वांनी संतोषाने मान्यता दिली, आणि तरीसुद्धा मी त्या लेखनात प्रगति केली नाही. कारण माझ्या व्यवसायाला ते कोणत्याच प्रकारे मानवणारे नाही, असे मला वाटले. विद्वानांपेक्षा निरक्षरांची संख्या अधिक आहे, हे मी जाणतो. अडाणी लोकांच्या जमावाने एखाद्या पुस्तकाची निर्भर्त्सना करण्यापेक्षा मूठभर शहाण्या लोकांनी त्याची वाहवा केली, तर तिचे महत्त्व अधिक आहे हे खरे असले तरी, गांवढळ वाचकांच्या गोंधळलेल्या बुद्धीपुढे मी माझे ग्रंथ ठेवावेत असे मला वाटेना. आणि असे गांवढळ लोकच अशी पुस्तके मुख्यतः वाचतात. पण ग्रंथलेखनाचे काम बाजूस सारण्याचा आणि ती लिहिलेली कादंबरी पूर्ण न करण्याचा विचार मी केला, याचे मुख्य कारण म्हणजे सांप्रत जी नाटके नेहमी रंगभूमीवर केली जातात, त्यांच्यापासून मी एक सिद्धांत बांधलेला आहे. तो सिद्धांत म्हणजे सध्या चालू असलेली नाटके आणि पूर्णपणे कवि-कल्पनेतून निघालेली व इतिहासाच्या पायावर उभी राहिलेली नाटके – यांमध्ये बहुतांश अत्यंत वेडपट व आचरट गोष्टी आणि विसंगती आढळून येतात, त्याना आगापिछा काही नसतो- आदि-अंत काही नसतो, आणि तरीही लोकांचा जमाव मोठया चवीने व गोडीने ती नाटके पहातो आणि पसंत करतो. ती नाटके चांगली मुळीच नसतात. तरी ती लिहिणारे कवी आणि ती रंगभूमीवर आणणारे नट हे सारे म्हणतात की,

नाटके अशीच रचली पाहिजेत– अन्यथा नव्हे, कारण बहुसंख्य प्रेक्षकांना ती आवडतात. उलट, जी नाटके नियमबद्ध व कलात्मक आहेत, ती ज्यांना कळतात अशा दहा–बारा विवेकी लोकांनाच ती पाहून आनंद होतो. बाकीच्या प्रेक्षकांना त्याच्या रचनेचे कौशल्य कळतच नाही– दुसरेही काही गुण कळत नाहीत. म्हणून कवी व नट म्हणतात, बहु-संख्य श्रोत्यांकडून आम्हाला भाकरी मिळाली पाहिजे– मूठभर लोकांची प्रशंसा घेऊन काय करायचे ? माझ्या ग्रंथाचे भवितव्यही असेच झाले असते असा निष्कर्ष मी काढला. लेखनाचे नियम पाळण्यासाठी मी माझे डोके कितीही खाजविले तरी, माझ्या श्रमाचे फळ म्हणून लोकांकडून मला चेष्टाच करून घ्यावी लागली असती – त्याहून दुसरा कोणताच लाभ माझ्या पदरात पडला नसता. काही काही वेळा मी नटांची अशी खात्री पटविण्याचा प्रयत्न केला की, तुमचे मत फसवे आहे. सध्या प्रचलित असलेल्या विपरीत दृश्यापेक्षा शास्त्रशुद्ध नाटकांना जास्त लोकांची गर्दी होईल आणि तुम्हाला अधिक लौकिक प्राप्त होईल. पण त्यांचे मत इतके पक्के होते की, कितीही युक्तिवाद केला किंवा प्रत्यक्ष अनुभव दिला, तरी माझे मत त्यांच्या डोक्यात शिरणे अशक्य होते. त्या आडमुठ्या लोकांपैकी एकाशी एकदा बोलत असताना मी असे म्हणाल्याचे मला आठवते की, ' आपल्या एका प्रसिद्ध कवीने लिहिलेल्या तीन शोकांतिका स्पेनमध्ये गेल्या काही वर्षांत रंगभूमीवर आल्या. त्या इतक्या चांगल्या होत्या की, ज्यांनी ज्यांनी त्या पाहिल्या, ते सर्व चकित व आनंदित झाले आणि त्यांची तारीफ करू लागले – त्यात जसे सर्वसाधारण अडाणी लोक होते, तसेच श्रेष्ठ दर्जाचे विवेकी लोकही होते. त्यानंतर लिहिलेल्या तीस खेळापासून मिळाले नसेल इतके उत्पन्न नटांना त्या तीन शोकांतिकांपासून मिळाले, हे आपल्याला आठवते ना ? " नट म्हणाला, " निःसंशय. महाराज, इसाबेला, फिलिस व अलेक्झांड्रा या तीन शोकांतिकाविषयी तुम्ही बोलत आहा ना ? "

" मी उत्तर दिले, ' होय, होय. त्याच शोकांतिका. नाट्य–शास्त्राचे नियम त्यांनी पाळले होते आणि तरीही त्यांना प्रशंसा कमी मिळाली नाही किंवा सर्व तऱ्हेच्या लोकांना संतुष्ट करण्यास त्या चुकल्या नाहीत, हे तुमच्या ध्यानी आले ना ? याचा अर्थ असा की, श्रोतृ–वृन्दाची बिघडलेली अभिरुची हा दोष नसून त्यांना निराळे काही देण्याचे ज्यांना कळत नाही, अशा लोकांकडे सारा दोष जातो. ' कृतघ्नतेचा सूड ', ' प्रणयी व्यापारी ', ' कृपाळू वैरीण ', ' नुमॅन्सिया '—अशा कैक नाटकांमध्ये खुळचटपणा काही नव्हता. तसेच विचारी कवींनी लिहिलेल्या काही नाटकांनी नटांना आणि लेखकांना लाभ आणि कीर्ती मिळवून दिली. ' असेच आणखी पुष्कळ मी बोललो, त्यामुळे तो काहीसा गोंधळला हे खरे. पण त्याचे समाधान झाले नाही किंवा आपले चुकीचे मत बदलावे अशी त्याची खात्री झाली नाही. " पाद्री म्हणाला, " महाराज, आपण असा एक विषय काढला की, त्यामुळे प्रचलित नाटकांविषयी मला पूर्वीपासून वाटणारा तिटकार चाळवला गेला. हा तिटकारा शिलेदारीवरील ग्रंथाविषयी मला वाटणाऱ्या तिटकाऱ्याहून कमी नाही. सिसरोचे मत असे आहे की, नाटके ही मानवी जीवनाचे आरसे, सदाचाराचे

आदर्श आणि सत्याचे प्रतिनिधी असले पाहिजेत. पण आता रंगभूमीवर होत असलेली नाटके मूर्खपणाचे आरसे, वेडेपणाचे आदर्श आणि पाचकळ विनोदाची प्रतीके असतात. उदाहरणार्थ, एखाद्या नाटकात जो माणूस दुपट्यात लपेटलेले लहान मूल म्हणून पहिल्या अंकाच्या पहिल्या प्रवेशात दाखविला जातो, तोच दुसऱ्या प्रवेशात प्रौढ पुरुष दाखविला जातो,याहून अधिक वेडेपणाचे काय असेल ? म्हातारा माणूस, भित्रा तरुण, बहाद्दर सैनिक, लबाड नोकर, उद्धट राजा आणि असंस्कृत राजकन्या या सर्वांची लढाई आम्हाला दाखविली जाते, यापेक्षा अधिक हास्यापद काय असू शकेल ? तसेच नाटकातील घटना ज्या काळात घडलेल्या किंवा घडू शकणाऱ्या दाखविल्या जातात, त्याच्यासंबंधी मी काय बोलू ? मी असे एक नाटक पाहिले आहे की, ज्याचा पहिला अंक युरोपमध्ये व दुसरा आशियामध्ये सुरू झाला आणि तिसरा अंक आफ्रिकेमध्ये समाप्त झाला. चवथा अंक असता तर तो बहुधा अमेरिकेत गेला असता ! म्हणजे जगाच्या चारी कोपऱ्यात ते नाटक फिरले असते. राजा पेपिन किंवा शार्लमेन यांच्या काळात जी घटना घडली, ती हेरॅक्लिअस बादशहाच्या काळात घडल्याचे आणि त्याने जेरुसलेमला सूळ नेल्याचे एखाद्या नाटकात दाखविले असेल तर, साधा विचार असणारा माणूस ते नाटक पाहून संतुष्ट कसा होईल ? सत्याचा आभास निर्माण करणे हे नाटकाचे प्रधान कार्य असते. बोलोनच्या गॉडफ्रेप्रमाणे पवित्र थडगे नाटकात उकरून काढल्याचे दाखविले आणि या साऱ्या घटनांमध्ये काळाचे मोठे अंतर असले, तर ते पाहून कोणाचे समाधान होणार ? अशा प्रकारे खऱ्या इतिहासाचे तुकडे एकत्र आणून ते आपले नाटक तयार करतात, त्याचा पाया कल्पित असतो आणि निरनिराळ्या काळी निरनिराळ्या लोकांच्या आयुष्यात घडलेल्या घटना त्या कथानकात मिसळलेल्या असतात. कथानक संभाव्य दिसावे म्हणून कोणताही प्रयत्न ते करीत नाहीत. अत्यंत अक्षम्य अशा ढळढळीत चुका त्यात भरलेल्या असतात.

सर्वांत वाईट गोष्ट ही आहे की, अशा प्रकारची वाङ्मय–कृती ही आदर्श आहे असे मानणारे वेडे लोक असतात. त्यांना बाकीची नाटके म्हणजे केवळ पांडित्य–प्रदर्शन वाटते. धार्मिक नाटकांमध्ये खोट्यानाट्या चमत्कारांची गर्दी आपल्याला किती आढळते ! किती प्रमाद नि किती विसंगती ! एका साधूने केलेले चमत्कार किती तरी वेळा दुसऱ्या साधूच्या माथी मारले जातात. फार काय, पाखंडी नाटकातही असे चमत्कार दाखविले जातात. असे अतिमानुष प्रसंग–किंवा यंत्र म्हणा–ते केवळ आपल्या कल्पनेने आणि अहंकाराने रंगवितात आणि त्यामुळे सर्वसामान्य लोक त्या नाटकाकडे खेचले जातात. अशी नाटके म्हणजे साक्षात् सत्यावर उडविलेला शिंतोडा, इतिहासाचे अवमूलन व विपर्यास आणि स्पेनमधील साऱ्या विद्वानांची कुचेष्टाच होय. कारण, बाहेरचे लोक नाट्य-शास्त्राच्या नियमांचे पालन करण्यात अत्यंत दक्ष असतात. त्यांना आपल्या नाटकातील वेडपट नि आचरट गोष्टी दिसल्या म्हणजे ते आपल्याला अडाणी नि रानटी समजतात. अशा नाटकांचे समर्थन असे करता येणार नाही की, सर्वसामान्य लोकांची करमणूक

वैध मार्गाने करणे हे सर्व चांगल्या सरकारांचे मुख्य उद्दिष्ट असते. आणि म्हणून ती सरकारे अशा नाटकांचे सार्वजनिक प्रयोग करण्यास परवानगी देतात व आळशीपणावर पोसणाऱ्या घाणेरड्या विनोदाची जागा भरून काढतात. हे समर्थन मान्य केले आणि भल्याबुऱ्या कोणत्याही प्रकारच्या नाटकांनी लोकांचे मनोरंजन करणे हेच ध्येय ठेवले तर, नाटकांना लागू होणारे कायदे करण्याची गरजच नाही आणि नाट्यशास्त्राच्या नियमांचे तंतोतंत पालन करणारीच नाटके लिहावीत व दाखवावीत असे बंधन कवींवर किंवा नटावर घालण्याचे कारण नाही. याला माझे उत्तर असे की, सरकारचे हे उद्दिष्ट वाईट नाटकांपेक्षा चांगल्या नाटकांनी अनंत पटींनी साध्य होईल. नाट्यशास्त्रानुसार लिहिलेले नियमबद्ध असे नाटक जो प्रेक्षक पहातो, त्याला त्यातील विनोदी भागाने आनंद होतो, गंभीर भागाने ज्ञान मिळते, नानाविध अपघातांमुळे त्याला विस्मय वाटतो, त्याच्या भाषेने त्याच्या मनाची मशागत होते, त्यातील लबाडी पाहून तो सावध होतो, आदर्श पाहून तो धडा घेतो, पापाचा तिटकारा करू लागतो आणि पुण्याचा भक्त बनतो. कारण चांगले नाटक म्हटले की, पाहणाऱ्याच्या अंतकरणातील या साऱ्या भावना उचंबळून येतात—मग तो प्रेक्षक अशिक्षित किंवा असंस्कृत असेना का ! हे गुण ज्याच्या अंगी नाहीत अशा नाटकापेक्षा अशा गुणांनी संपन्न असलेले नाटक प्रेक्षकांना रंजन, समाधान आणि संतोष देणार नाही असे मानणे अत्यंत चूक आहे. सध्या नेहमी जी नाटके केली जातात, त्यांपैकी बहुतेकांमध्ये हे गुण नसतातच. ती लिहिणाऱ्या कवींचा काही दोष नाही. त्यांच्यापैकी बहुतेकांना आपल्या प्रमादांची जाणीव असते आणि आपले कर्तव्य पार पाडण्यास ते पूर्णपणे समर्थ असतात. पण सध्याची नाटके पूर्णपणे बाजारी आणि भाडोत्री बनलेली आहेत. तशा छापाची नाटके असल्याशिवाय नटवर्ग ती विकत घेत नाहीत, हे नाटककारांचे म्हणणे सयुक्तिक आहे. नाटककाराच्या श्रमाचा मोबदला नटवर्ग देतो, म्हणून त्याचा कल पाहून त्याला आवडेल असे नाटक कवी लिहितो. याचा पुरावा म्हणून कोणीही हे ध्यानात आणावे की, स्पेनमधील एखाद्या उत्साही विद्वानाने अनंत नाटके लिहिलेली आहेत आणि त्यांमध्ये आनंद आणि विनोद ओतप्रोत भरलेला आहे. त्यातील काव्य इतके डौलदार असते, भाषा इतकी वेचक असते आणि एकंदर नाटक इतके बोधप्रद असते नि ते इतक्या बादशाही थाटाने रंगविलेले असते की, त्यामुळे नाटककाराची कीर्ती साऱ्या विश्वात पसरते. पण जेव्हा तो नटांच्या कल्पनेशी मिळते घेऊ लागतो, तेव्हा त्याच्या पुष्कळ कृती योग्य ती पूर्णता गाठू शकत नाहीत. अर्थात त्याच्या काही नाट्यकृती पूर्णत्वास पोचलेल्या असतात.

"काही लेखक इतक्या अविचाराने नाटके लिहितात की, ती रंगभूमीवर आल्यावर नटांना पळून जाऊन फरारी होणे भाग पडते. नाही तर राजाचा उपमर्द केल्याबद्दल किंवा काही घराण्यांचा अपमान केल्याबद्दल त्या नटांना शासन होण्याचे भय असते—आणि तसे पुष्कळ वेळा घडलेही आहे. असेच दुसरे काही दुष्परिणाम होतात, ते सांगण्याचे

मी टाळतो. हे सर्व अनर्थ टाळण्यासाठी, नाटके रंगभूमीवर आणण्यापूर्वी त्यांची तपासणी करणारा एखादा बुद्धिमान आणि न्यायी माणूस दरबारात नेमला पाहिजे. तरच हे दोष थांबतील. असे नियंत्रण केवळ दरबारात दाखविल्या जाणाऱ्या नाटकांवरच असावे असे नाही—सर्व स्पेनमध्ये ते असावे. त्या नियंत्रकाच्या परवान्याशिवाय कोणत्याही नाटकाचा सार्वजनिक प्रयोग होण्यास मॅजिस्ट्रेटने बंदी करावी. असे झाले म्हणजे नाटकवाले आपली नाटके दरबाराकडे पाठविताना काळजी घेतील आणि मग त्यांचे प्रयोग निर्धास्तपणे करू शकतील. तसेच लेखकही अधिक सावध राहतील. आपल्या कृतींचा न्याय–निवाडा करणाऱ्या परीक्षकाचे भय त्यांना सतत वाटत राहील. अशा उपायांनी आपल्याला चांगली नाटके मिळतील आणि त्यांचे हेतू साध्य होतील--जनतेचे मनोरंजन होईल, स्पॅनिश विद्वानांचे कौतुक होईल, नट सुरक्षित राहतील आणि त्यांना शासन करण्याचा त्रास सरकारला सोसावा लागणार नाही. त्याच नियंत्रकाकडे–किंवा दुसऱ्या कोणाकडे–शिलेदारीवरील सर्व नवे ग्रंथ तपासण्याची कामगिरी सोपविली तर, महाराज, आपण उल्लेखिलेले सारे गुण असलेले काही ग्रंथ प्रकाशात येतील. त्यामुळे आपल्या भाषेतील वक्तृत्व–गुण वृद्धिंगत होईल, जुन्या ग्रंथांचा समूळ नायनाट होईल आणि त्यांची जागा नवी पुस्तके घेतील व केवळ आळशी लोकांच्या शिळोप्याची करमणूक न करता अत्यंत उद्योगी माणसांचे रंजन ते ग्रंथ करतील. धनुष्याची दोरी नेहमीच ताणलेली ठेवता येत नाही, तसेच काही न्यायसंमत करमणूक असल्याशिवाय अपूर्ण मानवाला समाधान मिळत नाही."

धर्मगुरू व पाद्री यांचा संवाद येथपर्यंत आला असताना, न्हाव्याने त्यांना गाठले आणि पाद्र्याला म्हटले, "दिवसाच्या ऐन उन्हात मी याच ठिकाणी पैज मारली होती." त्या दरीचे सौंदर्य पाहून आणि पाद्र्याच्या संवादापासून मिळणारा संतोष ध्यानी घेऊन, तसेच डॉन क्विक्झोट यांची अधिक माहिती मिळावी म्हणून धर्मगुरू त्यांच्या संगतीत राहिला. त्याने आपल्या माणसांना जवळच्या खानावळीत जाण्याचा हुकूम दिला आणि बजावले, "माझे खेचर आले तर त्याच्यावरून खाण्याचे पदार्थ त्या दरीकडे पाठवा. तेथील शीतल छाया आणि सृष्टिसौंदर्य यामुळे मला तेथेच भोजन करण्याची इच्छा होत आहे. खानावळीत जे काही मिळेल ते तुम्ही भरपूर खा आणि आपल्या खेचरांना खाऊ घाला."

मध्यंतरीच्या काळात सँको हा पाद्री व न्हावी यांच्यापासून दूर झाला होता. आपल्या धन्याशी एकटेच बोलण्याची संधी आलेली पाहून तो त्या पिंजऱ्याजवळ झटकन गेला. त्या पिंजऱ्यात शिलेदार बसलेले होते, त्यांना तो म्हणाला, "महाराज, माझे मन साफ करण्यासाठी मी आपल्याला आपल्यावरील येथील जादूची खरीखुरी माहिती सांगणे अवश्य आहे. आपली तोंडे झाकून घोड्यावरून जाणारी ही दोन माणसे कोण आहेत असे आल्याला आता वाटते? अहो, आपल्या विभागातील तो पाद्री

आहे आणि दुसरा न्हावी आहे–दुसरे कोणी नाही, हे मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतो. त्या सर्वांनी आपल्याविरुद्ध एक कट रचलेला आहे. आपली कृत्ये त्यांच्या कृत्यांपेक्षा अधिक कीर्ती संपादन करतील, याच एका मत्सरभावनेने त्यांनी हा कट रचलेला आहे. हे मान्य केले म्हणजे आपल्यावर जादू केलेली नाही, तर त्यांनी आपल्याला फसवून या दुर्दशेत लोटले आहे हे सिद्ध होते. आपण जर माझ्या एका प्रश्नाचे उत्तर सरळपणे व पूर्णपणे दिले तर आपल्याला कळून येईल की, ही उघड–उघड फसवेगिरी आहे–जादू मुळीच नाही. आपली बुद्धी उलटीसुलटी झालेली आहे."

शिलेदार म्हणाले, "तुला वाटतील ते प्रश्न विचार; मी त्यांची उत्तरे आनंदाने देईन. पण माझ्यावर पहारा करणारे दोघेजण हे पाद्री व न्हावी आहेत, हे तुझे म्हणणे केवळ भ्रमाचे आहे. जादूचे सामर्थ्य असे असते की, त्यामुळे कोणत्याही आकाराची कोणतीही वस्तू झाकून टाकता येते, त्याचप्रमाणे तिने या राक्षसांना या रूपात येथे पाठविले असेल. त्यामुळे तुझी बुद्धी भ्रांत झाली आहे आणि तू गोंधळाच्या भुलभुलावणीत सापडला आहेस. त्यातून तुला थीसिअसचे सूत्रही बाहेर काढू शकणार नाही. यातील हेतू असा असेल की, संशयाच्या डोहात मला खोल बुडवावे आणि माझी बुद्धी धोक्यात आणावी. माझ्यावरील जादूची ही विचित्र यंत्रणा काय आहे, हा शोध मी घेऊ नये म्हणून हा गोंधळ उत्पन्न करण्यात आला असावा. मी आतापर्यंत जे जे वाचले आहे, त्या सर्वांहून ही जादू अगदी भिन्न आहे. म्हणून तू खात्री बाळग की, मी जसा तुर्क नाही, तसेच हे कारस्थान, तू म्हणतोस तसा कट, मुळीच नाही. पण आता तुझे प्रश्न ते मला सांग त्यांची उत्तरे देण्याचा प्रयत्न मी करीन."

सँको म्हणाला "अरे देवा ! एकाकडून एक वरचढ वेडेपणा हा ! पण असू द्या. माझ्या एका प्रश्नाचे उत्तर द्या. येथील या पिंजऱ्यातून आपण लौकर मुक्त होऊ आणि लेडी डल्सीनियाच्या बाहूत बद्ध होऊ, अशी आशा आपण करीत आहा, आणि आपण...... डॉन क्विक्झोट म्हणाले, "अशी हातचलाखी करू नकोस. तुझे प्रश्न मोकळेपणाने विचार. त्यांना तत्काळ उत्तर देण्याचे वचन मी दिले आहे." सँको म्हणाला, "मला तेच पाहिजे आहे. आपल्या शिलेदारीची शपथ घेऊन आपण मला पूर्ण सत्य सांगा–त्यात कमीजास्त काही नको." तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडले, "अरे, अशी प्रस्तावना करीत बसू नकोस. मी तुझ्या प्रश्नाचे खडान्‌खडा उत्तर देतो." सँको म्हणाला, "तर मग मी आदरभावाने विचारतो, आपल्याला या पिंजऱ्यात घातल्यापासून–किंवा आपण म्हणता त्याप्रमाणे आपल्यावर जादूचा प्रभाव पडल्यापासून–आपल्याला काही हालचाल करता आली का ?" शिलेदार म्हणाले, "तू काय म्हणतोस ते मला कळत नाही." सँको उद्गारला, "काय म्हणता ? मी काय म्हणतो, हे आपल्याला कळत नाही ? ख्रिस्ताच्या क्रूसाचा वाद ज्याला कळतो, असे आपल्या देशातील कोणतेही लहान मूल माझ्या म्हणण्याचा अर्थ आपल्याला सांगू शकेल. दुसरा माणूस तुमच्यासाठी जे करू

शकत नाही, ते आपण करावे, असे आपल्याला वाटत नाही काय ? हा माझ्या म्हणण्याचा अर्थ." शिलेदार म्हणाले, "अरे, आता कळले मला, सँको. तुझ्या प्रश्नाचे सरळ उत्तर द्यायचे तर होय, पुष्कळ वेळा तसे मला खचित वाटते. या विचित्र अवस्थेतून तू माझी सुटका कर, अशी माझी तुला प्रार्थना आहे. कारण, तुला मनमोकळेपणाने सांगायचे तर, मला वाटते तितके स्वच्छ नि सुखाचे मला येथे मुळीच वाटत नाही."



## प्रकरण २२

# सँको व त्याचा धनी यांच्यामध्ये झालेल्या ज्ञानी विचारविनिमयाचे निवेदन

सँको म्हणाला, " वाः, महाराज, मी शेवटी आपल्याला पकडले ना ? मला मनापासून जे समजावून घ्यावयाचे होते ते हेच. असे पाहा, जेव्हा एखाद्या माणसाचे डोके फिरते आणि तो खात–पीत नाही, झोपत नाही किंवा नैसर्गिक विधी पार पाडीत नाही, तेव्हा आपण सामान्यपणे म्हणतो की, याच्यावर जादूटोणा झाला आहे. हे आपण नाकारू शकत नाही. ही गोष्ट आपण मान्य केली म्हणजे आपल्या लक्षात हे येईल की, जे लोक आपले जेवण घेतात, मद्य–प्राशन करतात, कुणी बोलले तर त्याच्याशी बोलतात आणि निसर्गाची हाक झाली असताना घराच्या पिछाडीस जातात, त्यांच्यावर जादूटोणा किंवा मंत्रप्रयोग झालेला नसतो. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " तुझा निष्कर्ष जादूच्या एका प्रकारापुरता बरोबर आहे. पण मी तुला पूर्वी सांगितल्याप्रमाणे, जादूमध्ये फार विविध प्रकार असतात – आणि त्यात, काळाच्या आणि रूढीच्या फेरबदलाप्रमाणे, निरनिराळे बदल होत असतात. त्या जादूविद्येला इतक्या शाखा फुटत असतात की, पूर्वी काय होते यावरून आता काय असेल याचे अनुमान काहीच बांधता येत नाही. माझ्यापुरते म्हणशील तर, मला माझ्यावर जादू झाल्याची खात्री वाटते. त्यामुळे माझ्या विचारातील अस्वस्थता दडपली जाते. याच्या उलट माझा समज झाला तर ती अस्वस्थता डोके वर काढील. अरे, ज्या क्षणी हजारो अभागी जीवांना माझ्या साहाय्याची गरज असेल, त्यावेळीं माझ्या महान् कार्यापासून खेचून काढून एखाद्या भेकडाप्रमाणे या पिंजऱ्यातून अशा अपमानाने मला नेले जात आहे, हे पहाणेच मला, माझ्यावर जादू केलेली नसती, तर सहन झाले नसते." सँको म्हणाला, " ते काही असले तरी आपण मोकळे होण्यासाठी आपल्या पायांना गती दिली पाहिजे. महाराज, मी एकटासुद्धा आपल्याला मोकळा करू शकेन, हे मी खात्रीने सांगतो. नंतर आपण आपल्या विश्वासू रोझिनांटच्या पाठीवर बसा आणि या साऱ्या लोकांना लाथ मारून निघून जा. हे बिचारे घोडे धीर खचून आणि मान खाली घालून रखडत चालले आहे–जणु काही त्याच्यावरही जादूचा प्रयोग झाला आहे. महाराज, आता एकदा तरी माझा सल्ला ऐका. आपल्या इच्छेप्रमाणे गोष्टी घडल्या नाहीत, तर या पिंजऱ्यात पुनः सरपटत जाण्यास तुम्हाला भरपूर वेळ आहे. इमानी नोकराचे वचन

देऊन मी आपल्याला सांगतो की, आपल्या इच्छेस येईल तितका काळ मी आपल्याजवळ राहीन आणि होईल तो जःदूचा प्रयोग आनंदाने सहन करीन."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझ्या स्वातंत्र्याचा प्रश्न मी तुझ्या व्यवस्थेवर सोपवितो. मित्रा सँको, संधि पकड म्हणजे साऱ्या तपशिलाचे बाबतीत मी तुझ्या नियंत्रणाप्रमाणे वागत असल्याचे तुला आढळून येईल. मात्र मला अजून अशी भीती वाटते की, तू जो हा शोध लावल्याचा बहाणा करीत आहेस, त्याच्यामुळे तुझी बुद्धि मागे पडली आहे." शिलेदार व शागीर्द यांनी आपले कारस्थान रचले. धर्मगुरु, पाद्री आणि न्हावी यांनी ज्या ठिकाणी मुक्काम करण्याचे ठरविले होते, तेथे ते पोचल्यानंतर पिंजरा खाली काढून घेण्यात आला आणि बैलांना चरण्यासाठी जोखडांतून सोडण्यात आले. पाद्र्याला उद्देशून सँको म्हणाला, "कृपा करून आपण माझ्या धनीसाहेबांना, आपले अंग मोकळे करण्यासाठी पिंजऱ्यातून थोडेसे बाहेर काढा. नाही तर माझ्या धन्या-इतक्या श्रेष्ठ शिलेदाराला अवश्य तितकी स्वच्छता या तुरुंगात राहणार नाही." त्याचे म्हणणे लक्षात घेऊन पाद्र्याने उत्तर दिले, "मी तुझे म्हणणे मान्य करीन, पण मला भीती वाटते की, डॉन क्विक्झोट एकदा का मोकळे झाले म्हणजे आमच्या हातावर तुरी देतील." सँको म्हणाला, "महाराज, मी जामीन आहे. नगाला नग मी देईन." धर्मगुरु म्हणाला, "मीसुद्धा जामीन राहीन. त्यांच्या केवळ शब्दाखातर त्यांना मोकळे करण्यात यावे." शिलेदार म्हणाले, "तसा शब्द मी देतो. शिवाय मंत्रविद्येच्या सामर्थ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही जामिनाची तुम्हाला गरज नाही. कारण, मंत्रबद्ध शरीरांना मांत्रिकाच्या परवानगीशिवाय एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्याची किंवा स्वतःची विल्हेवाट लावण्याची मुळीच शक्ती नसते. जादूच्या शक्तीमुळे सबंध तीन शतके एका माणसाला एकाच जागी खिळवून टाकणे शक्य असते. आणि मंत्रबद्ध माणूस अन्य देशी पळून गेला असेल तर त्याला वायुवेगाने परत आणण्याचीही शक्ती मांत्रिकाच्या अंगी असते." आपल्या सुटकेचे अत्यंत सबळ कारण म्हणून त्यांनी शेवटी सांगितले, "तुम्ही मला मोकळे सोडले नाहीत किंवा येथून दूर गेला नाहीत, तर तुमच्या घ्राणें-द्रियाचा अपमान करणे मला भाग पडेल." त्यांच्या म्हणण्याचा अर्थ त्यांच्या लक्षात चटकन् आला आणि त्यांनी त्याला मोकळे सोडळे. या सुटकेचा उपयोग त्यांनी प्रथम केला तो म्हणजे आपले आखडलेले अवयव तीन–चारदा ताणले आणि नंतर रोझिनांटकडे धाव घेऊन त्याच्या ढुंगणावर दोन तीन चापट्या मारल्या व म्हटले, "अरे, अश्व–वंश–भूषणा, आपल्याला देवदयेने पूर्वीची स्थिती लवकरच प्राप्त होईल असा विश्वास मला वाटतो. मी तुझ्या पाठीवर बसलो आहे आणि तू माझ्या दोन पायामध्ये सापडलेला आहेस – अशा स्थितीत ईश्वराने मला या पृथ्वीतलावर ज्या कार्यासाठी पाठविले आहे, ते मी करीत राहीन." नंतर ते सँकोबरोबर एका बाजूस थोडे चालले व थोडा वेळ सुखाने थांबून परत आले. त्यावेळी त्यांचे शरीर व मन पुष्कळच हलके झाले होते. आपल्या शागीर्दाच्या योजनेची कल्पना त्यांच्या डोक्यात भरून राहिली होती.

शिलेदाराच्या वेडेपणाचा हा अप्रतिम प्रकार कौतुकाने पाहून धर्मगुरू त्यांच्याकडे टक लावून पाहू लागला. साऱ्या संभाषणात आणि प्रश्नोत्तरात शिलेदारजी अत्यंत श्रेष्ठ प्रकारची विवेकबुद्धी प्रगट करीत असतात, पण शिलेदारीचे बोलणे निघाले की ते भर-कटत सुटतात हे आपण पाहिलेच आहे. या स्थितीमुळे धर्मगुरूच्या मनात त्यांचेविषयी अनुकंपा निर्माण झाली. सारेजण गवतावर बसले होते आणि धर्मगुरूच्या खेचराची वाट पहात होते. डॉन क्विक्झोट यांना उद्देशून धर्मगुरू म्हणाला, "शिलेदारीवरील ग्रंथ वाचल्यामुळे आपल्या मनावर त्यांचा इतका पगडा बसला आहे की, त्यामुळे आपली सारी सारासारबुद्धी नष्ट झाली आणि आपल्याला वाटू लागले की, आपल्यावर कोणी तरी जाइटोणा केला आहे. असत्यापासून सत्य जितके दूर असते, तितक्याच सत्यापासून दूर असलेल्या अनेक अचाट गोष्टीवर आपण विश्वास ठेवणे शक्य आहे काय ? या जगात केव्हां तरी सुविख्यात शिलेदारांचे तांडेच्या तांडे होते, ट्रेबिझाँडचे अनेक बादशहा होऊन गेले, कैक अमॅडिस आणि हिरकॅनियाचे फेलिझ्झ – मार्टेझ्झ येथे वावरले, पळणारे तट्टू, भटकणाऱ्या युवती, साप, राक्षस, प्रचंड वीर, कधी ऐकले नाहीत असे धाडसी प्रसंग, जादूचे विविध प्रयोग, कैक लढाया, भयंकर चकमकी, भपकेबाज चालीरीती आणि खेळ-सामने, प्रणयी राजकन्या, सरदार, शागीर्द, बुटके विषदूक, कैक प्रेमपत्रे आणि स्त्री-दाक्षिण्याचे प्रकार, अनेक अमॅझोनियन महिला – थोडक्यात म्हणजे, शिलेदारीच्या ग्रंथात असणाऱ्या अविश्वसनीय प्रकारांची अचाट वर्णने – या सर्वांवर मानवी बुद्धीचा कधी विश्वास बसेल हे शक्य आहे काय ? माझ्यापुरते मी हे कबूल करतो की, मी जेव्हां जेव्हां शिलेदारीचे ग्रंथ वाचतो, तेव्हां ते सारे वेडेपणाचे आहेत असेच मानतो आणि मग मला ते काही समाधान देतात. त्यांची योग्यता काय आहे हे लक्षात येताच मी त्यातले उत्तम ग्रंथही फेकून देतो, माझ्याजवळ शेगडी पेटलेली असेल तर तिच्या ज्वाळात मी ते समर्पणही केले असते, तीच त्यांची योग्यता. लबाड माणसाप्रमाणे हे ग्रंथ निसर्गनियमांच्या विरुद्ध असतात. एखाद्या नव्या धर्मपंथाच्या प्रचारकाप्रमाणे ते विचित्र जीवन रंगवीत असतात आणि त्यामुळे अडाणी व गांवढळ लोकांना त्याचा आचरटपणा खरा वाटू लागतो. एवढेच नव्हे तर, बुद्धिमान आणि कुलीन अशा सद्गृह-स्थांचे मेंदूही ते ग्रंथ नासून टाकतात. आता आपलेच उदाहरण पहा ना. आपल्या बुद्धिवर त्यांनी कसला परिणाम घडवून आणला आहे ? एखाद्या सिंहाला किंवा वाघाला या शहरातून त्या शहरात प्रदर्शनासाठी नेले जाते, तसे तुम्हाला पिंजऱ्यात कोंडून, बैलांनी ओढलेल्या गाडीतून नेले जात आहे, ही आपली किती शोचनीय स्थिती झाली आहे !

भल्या माणसा, तू स्वतःवरच दया कर, आपली गमावलेली बुद्धी परत मिळव आणि परमेश्वराने कृपावंत होऊन तुला दिलेल्या गुणांचा उपयोग कर. आपल्या बुद्धीला आणि प्रतिष्ठेला अनुरूप असा काही अभ्यास करण्यासाठी तू आपली उत्तम प्रज्ञा कामी लावावीस. पण जर आपल्या उपजत प्रवृत्तीच्या प्रेरणेने आपणाला शौर्याची आणि महान पराक्रमाची पुस्तके वाचण्याची इच्छा असेल, तर पवित्र ग्रंथातील न्यायाधीशांचे प्रकरण

वाचा. त्यात तुम्हाला विस्मयकारक सिद्धांत आणि गौरवास्पद कृत्ये आढळतील आणि त्याविषयी मनात काही शंका येणार नाही. लुसिटॅनियाचा व्हिरॅटस, रोमचा सीझर, कार्थेजचा हॅनिबॉल, ग्रीसचा अलेक्झांडर, कॅस्तीलचा काउंट फर्नांडो, गोंझॅलेझ, व्हॅलेन्शियाचा कीड, अंडालुसियाचा गोन्झॅलो फर्नांडेझ, एस्ट्रेमाडुराचा डीएगो गॅर्शिया डी पॅरेडेझ, झेरेझचा ग्रॅसी पेरेझ डी व्हर्गास, टोलेडोचा गॅर्सिलॅसो आणि सेव्हिलचा डॉन मॅन्युएल डी लीओन–या सर्वांची शौर्याची कृत्ये वाचली म्हणजे अत्यंत विवेकी वाचकालाही विस्मय वाटतो आणि रंजनाबरोबर ज्ञानही प्राप्त होते. यांचा आपण अभ्यास करणे आपल्या बुद्धीला योग्य ठरेल. त्यामुळे आपल्याला इतिहासाचे, शीलसंपन्न प्रणयाचें आणि सज्जनपणाचे ज्ञान होईल, आपले वर्तन सुधारेल म्हणजे अविचाराशिवाय पराक्रम आणि भीरूतेशिवाय सावधानता आपल्या अंगी येईल. या सर्वांमुळे ईश्वराची कीर्ती द्विगुणित होईल, आपली स्वतःची प्रगती होईल आणि आपले मूळ जन्मस्थान जे आहे असे मी समजतो, त्या ला मांचा प्रांताच्या लौकिकात भर पडेल."

धर्मगुरूचे भाषण डॉन क्विक्झोट अत्यंत लक्षपूर्वक ऐकत होते. ते भाषण संपले आहे असे पाहून बराच वेळ ते धर्मगुरूकडे डोळे रोखून पहात होते. नंतर ते म्हणाले, "महाशय, आपल्या साऱ्या बोलण्याचा अर्थ मला असा दिसतो की, या जगात शिलेदार कधी होऊन गेलेच नाही, शिलेदारावरील सारे ग्रंथ खोटे, कल्पित, निरुपयोगी आणि जनतेच्या हिताला बाधक असे आहेत, तसेच ते ग्रंथ वाचण्याचे पाप मी केले आहे, त्यांच्यावरविश्वास ठेवण्याचा प्रमाद मी केला आहे, आणि शिलेदारीचा अत्यंत दुःखदायक व्यवसाय अंगीकारून त्यांचे अनुकरण करण्याचा दोष मी पत्करला आहे. त्या ग्रंथात उल्लेखिलेले शिलेदार आणि गॉल किंवा ग्रीस यातील अमॅडिस हे होऊन गेल्याचे तुम्ही नाकारीत आहा असे दिसते." धर्मगुरू म्हणाला, "होय, महाराज, अगदी तसेच." डॉन क्विक्झोट पुढे म्हणाले, "आणि आपण आणखी असेही म्हणाला की, 'या ग्रंथांनी तुमची फार मोठी हानि केली आहे, तुमची विवेकबुद्धी नष्ट केली आहे आणि तुम्हाला पिंजऱ्यातून नेले जाण्याच्या अवस्थेत लोटले आहे. म्हणून तुम्ही योग्य वेळीच अन्य ग्रंथ वाचावे, म्हणजे त्यात तुम्हाला अधिक सत्य, अधिक आनंद आणि अधिक चांगले ज्ञान प्राप्त होईल आणि ते तुम्हाला लाभदायक होईल."

"बरोबर आहे आपले म्हणणे." धर्मगुरू म्हणाला. तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "असे असेल तर, जादूचा प्रयोग झालेले आणि स्वैर बडबड करणारे माणूस तुम्हीच आहा अशी आता माझी खात्री पटली. कारण सर्वमान्य सिद्धांताची तुम्ही बेछूट बदनामी केली आहे. त्या सिद्धांताचे खंडन करण्यास तुमच्यासारखा जो माणूस धजतो, तो शिक्षेस पात्र होतो. जे ग्रंथ वाचल्याने तुम्हाला त्रास होतो, त्या ग्रंथांना तुम्ही जी शिक्षा देऊ इच्छिता, ती तुम्हालाच मिळणे योग्य ! सूर्य प्रकाश देत नाही, दहिवर शीतल असत नाही, पृथ्वी आपल्याला धारण करीत नाही असे जगाला मानावयास लावणे जितके सोपे, तितकेच अमॅडिस किंवा दुसरे कोणी पराक्रमी शिलेदार – ज्यांची

कृत्ये अनेक इतिहासांचे विषय बनले आहेत – झालेच नाहीत असे मानणे सोपे आहे. इन्फन्टा फ्लोरिपेस आणि बर्गंडीचा गाय, तसेच शार्लमेनच्या राज्यातील मँटिबलच्या पुलावरील फीरॅब्रस यांच्याविषयी जे जे लिहिले गेले आहे, त्यात काहीच तथ्य नाही असे मानण्यास कोणता मर्त्य मानव दुसऱ्यास प्रवृत्त करील ? त्यांची वर्णने, आता येथे सूर्यप्रकाश आहे हे जितके सत्य आहे, तितकीच सत्य आहेत असे मी शपथेवर सांगतो. पण हे जर सारे खोटे असेल तर तुम्ही असेही म्हणू शकाल की, हेक्टर झाला नाही, ॲकिलिझ झाला नाही, ट्रोजन–युद्ध झाले नाही, फ्रान्सचे बारा सरदार किंवा ब्रिटनचा राजा ऑर्थर – हे कोणीच झाले नाहीत. ऑर्थरचे रूपांतर आता एका कावळ्यात झाले आहे आणि त्याच्या राज्यातील माणसे त्याची क्षणोक्षणी वाट पहात असतात. दुसरे कोणी असेही म्हणतील की, ग्वॅरिनो मेझक्विनोचा इतिहास आणि सेंट ग्रिअलचा प्रयत्न – हे दोन्ही खोटे आहेत, तसेच सर ट्रिस्ट्रम आणि राणी इसेओ यांच्या प्रेमलीला प्रक्षिप्त आहेत – आणि तशाच गिनेव्हर व सरोवराचे सर लॅन्सेलॉट यांचे प्रणयप्रसंगही प्रक्षिप्त आहेत. पण अजून असे काही लोक जिवंत आहेत की, ज्यांना आठण वृद्ध लेडी क्विंटनोना हिला पाहिल्याचे स्मरते. साऱ्या ब्रिटनमधील स्त्रियांमध्ये ती दारूचा पेला भरण्यात अत्यंत चतुर होती. मला खात्रीने असे माहीत आहे की, माझ्या वडिलांच्या नात्याने असलेली माझी आजी म्हाताऱ्या व बुरखा घेतलेल्या दासीला पाहून मला म्हणे, "मुला, तिकडे पाहा. वृद्ध लेडी क्विंटनोनासारखी एक स्त्री उभी आहे.' त्यावरून मी असा अंदाज बांधतो की, ती तिला ओळखत असावी किंवा निदान तिचे चित्र तिने पाहिले असावे. पिरेस व सुंदर मॅगॅलोना यांची कहाणी खरी आहे हे कोण नाकारील ? त्या शूर पिरेसने ज्या खुंटीने आपल्या लाकडी घोड्याला जिवंत केले नि त्यावरून तो अंतराळातून उडून गेला, ती आजही राजाच्या शस्त्रागारात पाहता येण्यासारखी आहे. ती खुंटी एखाद्या गाडीच्या जूपेक्षा थोडीशी मोठीच आहे. ती बेबीकाच्या खोगीरा-जवळ ठेवलेली आहे. रॉन्सेसव्हॅलेस येथे ओरलँडोचे तुळईएवढे मोठे शिंग ठेवलेले आहे. यावरून हे सिद्ध होते की, पूर्वी बारा सरदार होऊन गेले, पिरेससारखे वीर होऊन गेले आणि सुप्रसिद्ध सिड्सारखे अनेक धाडसी शिलेदारही होऊन गेले. त्या सर्वांची नावे लोकांच्या तोंडी खेळत आहेत. पण तुम्ही ज्या पद्धतीने बोलत आहा, तीस अनुसरून तुम्ही मला असेही सांगाल की, मर्लोचा बहादूर पोर्तुगीज जॉन हा शिलेदार नव्हता, बर्गंडीला गेलेला नव्हता, पण त्या देशातील रास शहरामध्ये तो मोझेस पिएरे ( लॉर्ड ऑफ चर्नी ) या विख्यात वीराशी लढला आणि बेसिल शहरामध्ये रेमेस्टॅनच्या मोझेस हेन्रीशी त्याने सामना दिला. या दोन्ही लढयांत तो विजयी झाला आणि सन्मानाचा भार घेऊन परत आला. बर्गंडीमध्ये सेंट पॉलच्या सरदाराच्या पुत्राचा पराभव करणारे पेड्रो बार्बा आणि गुटीरे क्विक्झाडा ( पुरुषी परंपरेमध्ये मी खरोखर याचा वंशज आहे. ) या शूर स्पॅनिश वीरांचे पराक्रम आणि युद्धे तुम्ही नाकबूल कराल. ग्वेव्हाराचा डॉन फर्डिनांड पराक्रम करण्यासाठी जर्मनीत गेला आणि ऑस्ट्रियाच्या ड्यूकच्या दरबारातील

शिलेदार सर जॉर्ज याच्याशी लढला, हे सारे खोटे आहे असे तुम्ही मला सांगाल. तसेच स्विरो डी क्विनोनेस डेल पॅसो याचे युद्ध आणि कॅस्टिलियन शिलेदार डॉन गोंझॅलो डी गुझमन यांच्याशी फाल्सेसच्या मोझेस लुईसने केलेले सामने या केवळ दंतकथा आहेत असेही तुम्ही सांगाल. स्पॅनिश किंवा अन्य-देशीय ख्रिश्चन शिलेदारांनी जी जी शौर्याची कृत्ये केली, ती अत्यंत अधिकृत व सत्य आहेत व ती जो नाकारतो त्याला अक्कल नाही असे मी पुनः पुनः म्हणतो. ”

डॉन क्विक्झोट यांनी सत्य व कल्पित यांची जी खिचडी केली ती पाहून धर्मगुरूला मोठे आश्चर्य वाटले आणि शिलेदारांच्या पराक्रमासंबंधीच्या साऱ्या गोष्टींचे त्यांचे वाचन किती अफाट आहे, हे पाहूनही त्याला तितकेच आश्चर्य वाटले. तो म्हणाला, “ महाराज, हे मी नाकारू शकत नाही. आपल्या बोलण्यात थोडेसे तथ्य आहे. विशेषतः स्पॅनिश शिलेदारासंबंधी आपण जे बोलला, त्यात पुष्कळ सत्य आहे. फ्रान्समध्ये बारा सरदार होऊन गेले, हे मी मान्य करतो. पण आर्चबिशप टर्पिन याने, त्यांनी जे जे पराक्रम केले असे म्हटले आहे, ते सर्व त्यांनी केले होते हे मी मानीत नाही. ते शूर लोक होते आणि फ्रान्सच्या राजाने त्यांची निवड केली होती व त्या सर्वांचे शौर्य नि गुण सारखे असल्यामुळे त्यांना सरदार म्हणत, अशी माझी कल्पना आहे. तसे ते नसतील तर, निदान तसे ते असायला हवे होते. त्यांची एक लष्करी श्रेणी होती-सेंट जॅगो किंवा कॅलाट्र्व्हा यांची जशी लष्करी श्रेणी आपल्यामध्ये आहे. त्या श्रेणीमध्ये ज्यांना प्रवेश मिळतो ते उच्चकुलीन आणि कीर्तिमान वीर असतात, असे समजले जाते— किंवा तसे समजले जायला पाहिजे. सध्या जसे आपण म्हणतो, ‘ सेंट जॉनचा शिलेदार किंवा अलकॅंटाराचा शिलेदार ’ त्याप्रमाणे त्याकाळी ‘ बारा सरदारांपैकी एक शिलेदार ’ असे लोक म्हणत असतील. त्या लष्करी श्रेणीत फक्त बाराच वीर होते. बर्नर्डो डेल कार्पियो आणि सिड यांच्यासारखे लोक होऊन गेले याविषयी शंका घेता येत नाही, पण त्यांनी जे मोठमोठे पराक्रम केल्याचे सांगण्यात येते, ते त्यांनी कधी केले असतील की नाही, याविषयी शंका बाळगण्यास कारण आहे. आता आपण म्हणाला की, काउंट पिरेसची खुंटी बेबिकॅच्या खोगीराजवळ आहे, तर त्यासंबंधी मला काही माहीत नाही हे मी कबूल करतो. पण तुम्ही वर्णन करता तितकी ती मोठी असेल तर ती विचित्रच म्हणावी लागेल. मी ती कधी पाहिली नाही. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ती गंजून जाऊ नये म्हणून एका कातडी पिशवीमध्ये ठेवली आहे असे म्हणतात आणि ते निःसंशय खरे असले पाहिजे. ” धर्मगुरू म्हणाला, “ तसे असेलही. पण ती कधी मी पाहिल्याचे मला आठवत नाही. ती तेथे असेल असे मी कबूल करतो, परंतु इतक्या अॅमॅडिसचा—किंवा जग म्हणते त्या शिलेदारांच्या तांड्याचा—विश्वास तिच्यावर असेल असे मला वाटत नाही. शिलेदारीच्या सर्व कल्पित आणि वेडपट ग्रंथांमध्ये जी स्वैर व आचरट वर्णने आलेली आहेत त्यामध्ये काही सत्य असावे, असे आपल्यासारख्या थोर, विवेकी आणि अत्यंत गुणवान माणसाने मानावे याला काही कारण नाही. ”



## प्रकरण २३

# धर्मगुरु व डॉन क्विक्झोट यांच्यामधील लक्षणीय वादविवाद आणि इतर गोष्टी

डॉन क्विक्झोट म्हणाले, "छान, छान, राजांनी मंजूर केलेली, परीक्षकांनी पसंत केलेली, लोकांनी आनंदाने वाचलेली, समाजातील खालच्या-वरच्या वर्गाने प्रशंसिलेली, राव-रंक, विद्वान–अविद्वान, सरदार–सामान्यजन या सर्वांनी वाहवा केलेली ती सारी पुस्तके कल्पितच असली पाहिजेत. समाजातील कोणत्याही दर्जाच्या आणि स्थितीच्या सर्व प्रकारच्या लोकांनी डोक्यावर घेतलेल्या पुस्तकांमध्ये सत्य घटना ठासून भरलेल्य असताना आणि त्यामध्ये शिलेदारांच्या आई-बापांचे, देशकालाचे, आप्तेष्टांचे आणि त्यांच्या कृत्यांचे दिवसा-दिवसाचे बारीक-सारीक वर्णन आलेले असताना, ते सारे दंत-कथाच म्हणावयाचे काय? तुम्ही त्यांची अशी निंदा–नालस्ती करू नका. बुद्धिमान माणसाप्रमाणे वागा आणि ती पुस्तके वाचून आपल्याला काय समाधान मिळते हे पाहा, असा माझा तुम्हाला सल्ला आहे. उदाहरणार्थ, आपल्या डोळ्यापुढे एका पराक्रमी कृत्याचे मूर्तिमंत चित्र उभे करणारे जिवंत वर्णन वाचण्यापेक्षा अधिक आनंददायक काय असू शकेल? समजा, एक विस्तीर्ण तळे आहे, त्यात उकळते पाणी आहे आणि त्य पाण्यात साप, नाग, नक्र, मगर इत्यादी भीषण व भयानक प्राणी मागेपुढे पोहत जात आहेत– असे दृश्य एक शिलेदार पहातो. नंतर त्या तळ्यातून येणारा एक अत्यंत शोकाकुल स्वर त्याच्या कानी पडतो. त्यातील शब्द असे—'अरे शिलेदारा, तू कोणीही ऐस, पण तू या भीषण तलावाकडे नजर लावून पहात आहेस. या तलावाच्या उदास पाण्याखाली जे ऐश्वर्य दडलेले आहे, ते प्राप्त करून घेण्याची तुला इच्छा असेल तर या काळ्या काळ्या आणि उकळत्या लाटांमध्ये उडी घेऊन आपले शौर्य दाखव. तसे तू केले नाहीस तर तुला या पाण्याच्या पोटातील प्रचंड चमत्कार दिसू शकणार नाहीत. या खिन्न लाटांखाली सात अप्सरांचे सात किल्ले आहेत आणि त्यांत मोठे ऐश्वर्य दड-लेले आहे.' या आवाजातील शेवटचे शब्द शिलेदाराच्या कानी पडताक्षणीच तो त्या जळत्या तळ्याच्या मध्यभागी सरळ उडी घेतो. तसे करताना तो कोणताही विचार करीत नाही– आपण कोणत्या संकटात उडी घेत आहो, याचा विचार तो करीत नाही. फार काय, आपल्या अंगावरील अवजड चिलखत बाजूला ठेवीत नाही. फक्त परमेश्वराला आणि आपल्या हृदयस्वामिनीला शरण जातो आणि स्वतःचा देह त्या तळ्यात झोकून

देतो. त्याला मुळीच कल्पना नसताना, किंवा आपण कोठे जाऊन पोचू याचा काहीच अंदाज नसताना, तो हिरव्यागार शेतांच्या मध्यभागी अकस्मात् जाऊन दाखल होतो.

" त्या शेतांची सर एलिसियन उद्यानाला कधी येणार नाही. तेथे त्याला आकाश अधिक नितळ दिसते आणि सूर्य द्विगुणित प्रकाशाने तळपत असलेला दिसतो. नंतर त्याला सुंदर व डवरलेल्या वृक्षांची एक अत्यंत आल्हाददायक राई आढळते. तिच्या ताजेपणामुळे आणि विविधतेमुळे त्याची दृष्टी सुखावते. तसेच वृक्षांच्या लवणाऱ्या फांद्या-फांद्यांवर नाचणाऱ्या–बागडणाऱ्या असंख्य रंगीबेरंगी चिमण्या पक्ष्यांच्या रानटी पण तरीही मधुर स्वरांनी त्याचे कान तृप्त होतात. तेथेच त्याला एक लहानशी नदी दिसते व त्याला आनंदित करते. तिच्या दोन्ही काठांवर फुलझाडे तरारलेली असतात आणि तिचा प्रवाह लखलखणाऱ्या वाळूवरून वहात असतो. त्या वाळूच्या मऊ मऊ पृष्ठभागावर पसरलेल्या शुभ्र शिंपल्यावरून नदीचे पाणी खुळखुळ करीत वाहात जाते. नदीचा दुसरा प्रवाह स्फटिकासारखा स्वच्छ असतो आणि तो पाहिल्यावर सोन्या-मोत्याचे द्रवरूप पाहिल्याचे समाधान डोळ्यांना मिळते. नंतर त्याला कृत्रिम कारंजे दिसते. रंगीबेरंगी सूर्यकांत–मणि आणि घासून गुळगुळीत केलेले संगमरवर यांचे ते बनलेले असते. त्याच्याजवळच पांढऱ्या–पिवळ्या दगडांची सुव्यवस्थित रास रचलेली असून तिच्यामध्ये तेजस्वी स्फटिक आणि कृत्रिम पाचू बसविलेले असतात. ते सर्व दृश्य अवर्णनीय असते. त्यामुळे निसर्गाचे अनुकरण करणारी कला येथे त्याच्यावर मात करीत आहे असे वाटते. त्याला दूर अंतरावर अकस्मात् एक भक्कम किल्ला किंवा ऐश्वर्यशाली राजवाडा दिसतो. त्याचे तट सोन्याचे असतात, त्याच्या बुरुजावर हिरे बसवलेले असतात आणि त्याच्या वेशीवर वेटेच्या आकाराची फुलझाडे असतात. थोडक्यात म्हणजे त्याचे बांधकाम इतके आश्चर्यकारक असते की, त्यात हिरे, माणके, मोती, सोने आणि पाचू हीच घटक द्रव्ये वापरलेली असली, तरी त्यांच्यापेक्षा अधिक मोलाची मानवी कारागिरी असते.

" याहून अधिक आकर्षक दृश्य काय असू शकेल ? त्या किल्ल्यातून उंची उंची व भपकेबाज वस्त्रे परिधान केलेल्या असंख्य लावण्यवती युवतींचा ताफा बाहेर येत आहे, या दृश्याचे वर्णन मी कसे करणार ? इतिहासात या गोष्टी जशा आढळतात, तसे त्यांचे वर्णन मी करू लागलो, तर त्याला अंत राहणार नाही. त्या सर्व युवतींमध्ये मुख्य असणारी सुंदरी त्या जळत्या तव्यात उडी झोकणाऱ्या शूर शिलेदाराला आपल्या हाताने पकडते आणि तोंडावाटे ब्र न काढता एका प्रशस्त राजवाड्यात नेते. राजवाड्यात त्याचे सारे कपडे काढून घेतले जातात आणि जन्माचे वेळी तो होता तसा नग्न केला जातो व मग सुगंधी पाण्याचे स्नान त्याला घातले जाते, बहुमोल अत्तरे आणि सुवासिक तेले यांनी त्याचे अंग माखले जाते आणि नंतर मधुर गंध असलेले अत्तर लावलेला सुंदर सदरा तो अंगात घालतो. मग अन्य युवती त्याच्या खांद्यावर एक भव्य अंगरखा टाकते. त्याची किंमत फार नसली तरी निदान एका पूर्ण शहराइतकी तरी खचित असते. नंतर त्याला दुसऱ्या भव्य दिवाणखान्यात नेले जाते. तेथे जेवणाची ताटे इतकी व्यवस्थितपणे मांडलेली

असतात की, ती पाहून तो विस्मित-स्तिमित होतो. तेथे त्यांच्या हातावर सुगंधी फुलांच्या आणि कस्तुरीच्या अर्कापासून बनविलेले पाणी ओतले जाते. नंतर एका हस्तिदंती खुर्चीवर त्याला बसविण्यात येते. त्याच्या सेवेस असणाऱ्या त्या साऱ्या रमणी गाढ शांतता पाळीत असतात. जेवणाचे पदार्थ अत्यंत सुगरणपणाने बनविलेले असतात आणि ते नाना प्रकारचे असतात. ते पाहून त्याची क्षुधा थबकते. त्यातील कोणत्या पदार्थावर आपण तृप्त व्हावे, याचा त्याला संदेह पडतो. त्याचवेळी उत्कृष्ट संगीताच्या मधुर लकेरी त्याचे कान संतृप्त करतात. ते संगीत कोठून येते, कोण गाते हे कळत नाही. भोजन झाल्यावर आणि ताटे काढल्यावर शिलेदार खुर्चीवर रेलतो आणि कदाचित दात कोरतो. त्यावेळी पूर्वीच्या सर्व युवतींपेक्षा अधिक देखणी असलेली एक रमणी त्या खोलीत अकस्मात येते आणि शिलेदाराजवळ बसून, हा किल्ला कोणता आहे आणि त्यात तिच्यावर जादूटोणा कसा करण्यात आला आहे, वगैरे गोष्टी त्याला सांगू लागते. त्या ऐकून शिलेदाराला जितके नवल वाटते, तितकेच त्याचा इतिहास वाचणाऱ्यालाही वाटते. या घटनेचा अधिक विस्तार मी करीत नाही.

"यावरून कोणालाही असे अनुमान करता येईल की, शिलेदारीच्या इतिहासातील कोणताही भाग वाचणे हे वाचकाला अत्यंत आनंददायक आणि आश्चर्यकारक वाटले पाहिजे. म्हणून महाराज, माझ्यावर विश्वास ठेवा आणि मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे शिलेदारीवरील ते ग्रंथ वाचा. त्यामुळे तुमच्या मनाला सतावणारी सारी खिन्नता निघून जाईल आणि तुमचा स्वभाव कठोर बनलेला असला तर तो सौम्यमधुर बनेल. माझ्यापुरते सांगावयाचे तर, शिलेदार झाल्यापासून मी शूर, सभ्य, उदार, सुसंस्कृत, दानशूर, शालीन, धीट, प्रेमळ, शांत आणि कष्ट, तुरुंगवास व जादूटोणा सहन करणारा बनलो आहे. एखाद्या वेड्या माणसाप्रमाणे मला नुकतेच पिंजऱ्यात कोंडण्यात आले होते, तरीसुद्धा मला आशा आहे की, ईश्वराची कृपा असेल आणि दैव माझ्या योजनांच्या आड येणार नसेल, तर अगदी थोड्या दिवसांत माझ्या बाहुबलाने मी कोणत्या तरी राज्याचा राजा होईन आणि मग माझी उपजत कृतज्ञता आणि उदारता यांची साक्ष जगाला पटेल. कारण गरीब माणूस कितीही उदार व्हावयाचे म्हणाला, तरी आपले औदार्य दाखविण्यास तो असमर्थ असतो. आणि जी कृतज्ञता केवळ इच्छेच्या स्वरूपात राहते, ती मृतवत् समजावी-सत्कृत्याशिवाय श्रद्धा मृतवत् असते तशी. म्हणून माझी इच्छा अशी आहे की, दैवाने मला सम्राट होण्याची संधी लवकर आणून द्यावी म्हणजे माझ्या मित्रांना-त्यातही साऱ्या दुनियेत अत्यंत निरुपद्रवी असलेल्या माझ्या शागीर्दाला-बिचाऱ्या सँको पँझाला-मी माझ्या औदार्याचे पुरावे सादर करू शकेन. त्याला सरदारकी देण्याचे वचन मी फार पूर्वी दिलेले आहे. ती संभाळण्याची अक्कल आणि बुद्धी त्याच्याजवळ नाही अशी भीती मला वाटते, तरी पण मी त्याला सरदारकी आनंदाने देईन."

आपल्या धन्याचे शेवटचे शब्द ऐकून सँको म्हणाला, "महाराज, त्या बाबतीत

तुम्ही आपले डोके मुळीच शिणवून घेऊ नका. आपण जे काही करायचे ते इतकेच की, मला सरदारकी मिळवून द्यावयाची मग सरदारी जिंदगीची व्यवस्था मी एकटा पाहीन. माझ्यापूर्वी माझ्यापेक्षा जी थोर माणसे होऊन गेली, त्यांनीं केली तशी व्यवस्था मी ठेवीन. माझ्या खांद्यावरील सारे ओझे हलके करणारे दुय्यम अधिकारी किंवा सेवक मी नेमीन आणि, मोठ्या माणसाप्रमाणे, मी विश्रांती घेत लोळत पडेन, माझे भाडे वसूल करीन, कोणतेही काम करणार नाही, मजेत राहीन, — मग जग सँकोवर कितीही जळफळो." धर्मगुरू म्हणाला, "सारा–वसुलीच्या व्यवस्थेसाठीं एकादा मदतनीस किंवा कारभारी नेमणे ठीक आहे, पण मित्रा, न्यायदानासाठी मात्र स्वतः सरदाराने हालचाल करणे अवश्य असते. त्यासाठी केवळ प्रामाणिक नि कळकळीचा हेतु असून भागत नाही, तर सूक्ष्मपणे विवेक करणारी, न्यायाचा निष्कर्ष काढणारी आणि शहाण-पणाने खऱ्या–खोट्याची पारख करणारी विचारयुक्त बुद्धी हवी असते. तीच जर मुळात नसेल, तर शेवटी साराच कारभार चुकीचा होईल."

सँको म्हणाला, "तुमचे हे तत्त्वज्ञान कांही मला कळत नाही. मी जे काही पूर्वी म्हटले, तेच पुनः सांगतो; आणि ते हे की, मला जिचा कारभार करता येईल अशीच चांगली जहागीर मला मिळावी, अशी माझी इच्छा आहे. कारण, दुसऱ्या कोणाही इतका थोर आत्मा मला आहे आणि बहुतेक माणसांना असतो तसा मोठा देहही आहे. माझ्या राज्यात मी पहिली गोष्ट करीन ती म्हणजे मी पूर्ण स्वतंत्र राहीन. माझ्यावर कोणाचे नियंत्रण असणार नाही–माझ्या इच्छेस येईल तें मी करीन. आपल्या इच्छेस येईल तसे जो वागतो, तो सुख मिळवितो आणि जो सुख मिळवितो, तोच संतोष पावतो; आणि जो संतुष्ट असतो त्याला आणखी कसली इच्छा नसते. बस्स ! सारा खेळ खलास ! ! काहीही होवो, मला समाधान वाटेल. बेट मिळाले तरी वाहवा, न मिळाले तरी वाहवा ! एक आंधळा दुसऱ्या आंधळयाला म्हणाला त्याप्रमाणे, आता आहे त्यापेक्षा अधिक दुःस्थिती काही आपल्याला पहावी लागणार नाही." धर्मगुरु म्हणाला, "ही तुझी विचारसरणी काही चुकीची नाही. पण मित्रा, तू कल्पना करतोस त्यापेक्षा सरदारकीच्या जहागिरीसंबंधी पुष्कळच बोलण्यासारखे आहे. "डॉन क्विक्झोट म्हणाले, "अलबत्. पण मी गॉलच्या अमॅडिसप्रमाणे कृती करतो. त्याने आपला शागीर्द गॅंडलिन याला 'फर्म' बेटाचा सरदार केले. सँकोला तसाच हुद्दा देण्यास हा चांगला दाखला आहे— आणि त्याच्या गुणामुळे त्याचा त्या हुद्यावर निःसंशय हक्क आहे."

डॉन क्विक्झोट यांच्या पद्धतशीर व सुव्यवस्थित मूर्खपणामुळे धर्मगुरूला मोठे नवल वाटले. 'तलावावरील शिलेदाराच्या' पराक्रमाचे वर्णन त्याने किती कौशल्याने केले होते ! त्यांनी वाचलेल्या ग्रंथांसंबंधींच्या भ्रामक कल्पनांनी त्यांच्या मनावर केवढा पगडा बसविला आहे, हे लक्षात आल्याने धर्मगुरू आश्चर्य–चकित झाला. आपल्याला सर-दारकी मिळावी म्हणून सँको अत्यंत उत्कंठेने जो युक्तिवाद करीत आहे, त्यातील

भाबडेपणा पाहून धर्मगुरूला विस्मय वाटला – आणि साऱ्या मंडळींना तो एक मजेदार खेळ वाटला.

या वेळेपर्यंत धर्मगुरूच्या सेवकांनी खाद्यपदार्थ आणले होते. सावलीच्या एका झाडाखाली त्यांनी गवतावर गालिचा पसरला आणि मग सारेजण जेवावयास बसले. तोंच शेजारच्या झाडीतून एका चिमण्या घंटेचा किणकिणाट त्यांचे कानी आला – आणि लगेच त्यांना त्या झाडीतून एक सुंदर शेळी धावत येत असलेली दिसली. तिच्या सर्वांगावर काळे, पांढरे, तपकिरी रंगाचे ठिपके होते. तिच्यामागोमाग एक धनगर धावत येत होता. तो आपल्या भाषेत तिला म्हणत होता, ' थांब, कळपात परत चल. " पण ती बावरलेली शेळी धापा टाकीत या मंडळीकडे पळत आली आणि त्यांचेजवळ थांबली – जणू काही ती त्यांचेकडे संरक्षणाची याचना करीत होती. धनगराने तिला गाठले आणि तिची शिंगे पकडली. आपला संताप तिला जणु काही कळतच आहे अशा समजुतीने तो रागाने म्हणाला, " अगे उनाड बकरे, हे खोडसाळ जीवा, अलीकडे तू अशी का उंडारलीस ? कोणता लांडगा तुला भीती घालत आहे ? चिमण्या वेडे, खरे काय आहे ते सांग. पण कारण उघड आहे. तूं स्त्री आहेस आणि म्हणून कधी शांत रहाणार नाहीस. तुझ्या चंचळ स्वभावाचा धिक्कार असो – आणि तुझ्यासारख्या इतर स्त्रियांचा पण ! फीर मागे, साजणी, फीर मागें. आपल्या कळपात राहून तुला संतोष वाटत नसेल, तर आपल्या मैत्रिणीच्या घोळक्यातच तू सुरक्षित रहाशील. आपल्या कळपाचे नेतृत्व नि मार्गदर्शन तू करावयास हवे. पण तें न करता तुला जर असे भटकण्याचे प्रेम वाटत असेल, तर त्यांनी काय करावे ? त्यांचे काय होईल ? "

धनगराचे आपल्या शेळीशी चाललेले हे भाषण ऐकून त्या मंडळींना – विशेषतः धर्मगुरूला–गंमत वाटली. त्याने त्याला आपल्याकडे बोलावले व म्हटले, "इमानी माणसा, थोडा धीर धर, तुझ्या मेंढीला थोडा वेळ मोकळे राहू दे. तू म्हणतोस त्याप्रमाणे ती स्त्री आहे, म्हणून तिच्या इच्छेवर तू जितके नियंत्रण घालण्याचा प्रयत्न करशील, तितकी ती आपल्या नैसर्गिक प्रवृत्तीप्रमाणे वागू लागेल. म्हणून इकडे ये आणि आमच्याबरोबर मांसाचा एक तुकडा नि दारूचा एक पेला घे म्हणजे तुला बरे वाटेल. " असे म्हणून त्याने त्याला ससाचा थंड मांसाचा एक पाय खाण्यास दिला व दारूचा एक पेला मागविला. तो पिऊन व त्यांना धन्यवाद देऊन शांत झालेला धनगर म्हणाला, " सभ्य गृहस्थहो, या अडाणी जनावराशी मी इतका जीव तोडून बोलत होतो, म्हणून तुम्ही मला वेडा मानू नका. कारण माझ्या शब्दांत काही गूढ अर्थ आहे. आपल्याला दिसते त्याप्रमाणे मी खरोखर गांवढळ आणि अनवड आहे, पण अडाणी नाही. मी माणसाप्रमाणे पशूशीही बोलू शकतो. " पाद्री म्हणाला, " हा काही चमत्कार नव्हे. कारण, अरण्यात विद्वान माणसे असतात आणि मेंढवाड्यात तत्त्वज्ञानी असतात हे मला माहीत आहे. "

धनगर म्हणाला, " निदान, जगाचे थोडेफार ज्ञान असलेले लोक अरण्यांत असतात हा सिद्धांत पटविण्यासाठी मी सांगतो तो एक अपवादाचा प्रसंग तुम्ही सर्वांनी ऐकावा. हे माझे सांगणे तुम्हांला उद्धटपणाचे वाटत नसेल किंवा माझी सोबत त्रासदायक वाटत नसेल, तर मी तो प्रसंग सांगतो. तो ऐकून तुमच्या बोलण्याला बळकटीच येईल." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " अरे, मी तुझे बोलणे लक्षपूर्वक ऐकेन. कारण, तुझे आगमन मला शिलेदाराच्या साहसासारखे काहीसे वाटत आहे. तुझी गोष्ट आनंदाची, आश्चर्याची आणि मौजेची ठरेल, असा माझा कयास आहे. ती ऐकण्यास नकार देण्यासाठी ही सारी मंडळी आपली बुद्धी खर्च करणार नाहींत, अशी खातरजमा मी देतो. म्हणून मित्रा, कर आपल्या गोष्टीला सुरुवात – आम्ही सर्वजण तिच्याकडे लक्ष देऊ." सँको म्हणाला, " मला एका गोष्टीसाठी क्षमा करा. पलीकडच्या लहानशा ओढ्याजवळ या खाद्यपदार्थांशी मला थोडेसे हितगुज करायचे आहे. उद्या नि परवासाठी मला माझे पोट भरून घ्यायचे आहे. माझे धनी डॉन क्विक्झोट नेहमी म्हणतात, 'जेव्हा शिलेदाराच्या शागीर्दाला पोटभर खाद्य पदार्थ मिळतील, तेव्हा त्याने आपल्या बरगड्या फुटेपर्यंत पोट भरून घ्यावे. कारण एकाद्या घनदाट जंगलात त्यांना सतत पाच–सहा दिवस काढावे लागतात. म्हणून, एकाद्या माणसाचे पोट आधी भरगच्च भरलेले नसेल किंवा त्याच्या पिशवीत खाद्यपदार्थ भरपूर नसतील, तर तो स्वतःच कावळ्याचे भक्ष्य बनेल – पुष्कळ वेळा असे घडलेले आहे." शिलेदार म्हणाले, " सँको, तुझे म्हणणे बरोबर आहे. पण माझी शारीरिक भूक भागलेली आहे – आता माझ्या फक्त मनाला मेजवानी हवी आहे. ती या इमानी माणसाच्या कहाणीतून मिळेल, अशी मल आशा आहे."

सर्व मंडळींनी डॉन क्विक्झोटच्या बोलण्यास मान्यता दिली. मग धनगराने आपल्या चुणचुणीत शेळीला एक–दोनदा थोपटले आणि म्हटले, " ठिपकेबाज मूर्ख स्त्रिये, खाली पड—माझ्याजवळ येथे पडून रहा. कारण, आपल्याला घरी परतायला अजून बराच अवकाश आहे." त्याचे बोलणे त्या जनावराला कळले असे दिसले. कारण, शेळीचा मालक खाली बसताच, ती त्याच्याजवळ आपले अंग ताणून शांतपणे पडली व त्याच्या तोंडाकडे पाहू लागली—जणू काही ती त्याला सांगत होती—तू सांगितलेस, ते मी ऐकले. नंतर त्याने पुढील गोष्ट सांगण्यास सुरुवात केली.

▣ ▣

## प्रकरण २४

# धनगराची मनोरंजक गोष्ट

"या दरीपासून सुमारे दहा मैलांवर एक खेडे आहे. ते छोटे असले तरी अत्यंत श्रीमंत आहे. तेथे एक शेतकरी राहात होता. त्याच्याविषयी सर्वांना फार मोठा आदर वाटे. श्रीमंतांबद्दल सर्वसामान्यपणे आदर असतो, पण या माणसाला जो आदर मिळत असे, तो त्याच्याजवळील संपत्तीपेक्षा त्याच्या गुणांमुळे दिला जात असे. पण तो स्वतःला अत्यंत सुखी मानत असे ते आपल्या मुलीमुळे. तिचे सौंदर्य, चातुर्य, विनोद आणि सद्‌गुण अलौकिक होते. जे जे लोक तिला पहात किंवा ज्यांना ज्यांना तिची माहिती होई, त्यांना असे कौतुक वाटे की, देवाने आणि निसर्गाने तिला भूषविण्यासाठी किती आटोकाट प्रयत्न केला आहे. ती जेव्हा चिमुरडी होती, तेव्हा मोठी देखणी दिसे--आणि सोळाव्या वर्षी तर काय? तिचे सौंदर्य पूर्णपणे फुलले. तिच्या सौंदर्याची कीर्ती आजूबाजूच्या खेड्यात पसरू लागली--पण 'आजूबाजूच्या खेडयात' असे मी का म्हणावे? दूरदूरच्या शहरात ती पसरली-राजाच्या राजवाडयातही तिने प्रवेश केला--आणि सर्व प्रकारच्या लोकांच्या कानी ती दरवळली. ठिकठिकाणचे लोक तिला पाहण्यासाठी गोळा होऊ लागले.—जणू काही ती एक दुर्मिळ चीज आहे किंवा दैवी शक्ती आहे. तिचे वडील तिच्याविषयी अत्यंत दक्ष असत. तीही स्वतःविषयी कमी दक्ष नसे. तरुण स्त्रीचे संरक्षण करण्याला खुद्द तिची दक्षता आणि सावधानता यांच्याइतके दुसरे कोणतेही पहारेकरी किंवा कडी-कुलुपे समर्थ नसतात. पित्याची श्रीमंती आणि कन्येचे सौंदर्य-यामुळे त्या देशातील रहिवाशी आणि बाहेरचे पुष्कळ लोकही तिला लग्नासाठी मागणी घालण्यास येऊ लागले. त्यामध्ये लुच्चांचाही भरणा पुष्कळ होता. त्यामुळे आपली ही अमूल्य ठेव कोणाच्या हाती सोपवावी, याचा निर्णय करताना त्या म्हाताऱ्या माणसाचा मोठा गोंधळ उडत असे. तिच्या भक्तांच्या मेळाव्यात मी एक होतो. यशाची आशा धरण्याला माझ्यापाशी सबळ कारण होते. माझ्याविषयी तिच्या वडिलांना चांगली माहिती होती. मी त्या गावचाच रहिवासी ना? चांगल्या घराण्यात माझा जन्म झालेला. मी ऐन तारुण्यात होतो आणि माझ्याजवळ बरीच जिंदगीही होती. माझी बुद्धिमत्ताही तुच्छ मानण्यासारखी नव्हती. याच परिस्थितीचा लाभ मिळालेला दुसरा एक माणूस आमच्या खेडयात होता. त्याने त्याचवेळी तिचे प्रणयाराधन सुरू केले. यामुळे बाप विचारात पडला--आपल्या मुलीने आम्हा दोघांपैकी एकाच्या बाजूने निकाल देईपर्यंत

त्याने त्या माणसाला थोपवून धरले. या प्रकरणाचा चटकन् निकाल लागावा म्हणून त्याने लिॲण्ड्राशी—हे त्या सुंदरीचे नाव--आम्हा दोघांचा परिचय करून देण्याचे ठरविले. आम्ही दोघे सर्व बाबतीत समान होतो. दोघांपैकी जो पसंत असेल, त्याला निवडण्याचे पूर्ण स्वातंत्र्य त्याने तिला दिले. ज्यांना ज्यांना म्हणून आपल्या मुलाविषयी काही वाटते, अशा सर्व पालकांनी गिरविण्याजोगा हा कित्ता आहे. क्षुद्र किंवा खोडसाळ गोष्टी निवडण्याचे स्वातंत्र्य मुलांना द्यावे; असा माझ्या म्हणण्याचा अर्थ नाही. ज्या चांगल्या गोष्टी असतील, त्या त्याच्यापुढे मांडून त्यांना आपल्या प्रवृत्तीप्रमाणे वागण्याचे समाधान मिळवून द्यावे इतकेच माझे म्हणणे. बापाची ही सूचना लीॲड्राला कितपत पसंत पडली हे मला माहीत नाही. मला इतकेच माहीत आहे की, तिच्या बापाने आम्हा दोघांनाही दूर ठेवले आणि त्याचे कारण असे दिले की, माझी मुलगी अजून लहान आहे आणि तिचे दान करण्याला अवकाश आहे. त्याने आम्हा उभयतांना मामुली शब्दांनी निरोप दिला. त्यामुळे आमच्यापैकी कोणीही संतुष्ट झाला नाही की असंतुष्ट झाला नाही. माझ्या प्रतिस्पर्ध्याचे नाव ॲन्सेल्मो असून माझे नाव यूजेनियो असे आहे. या शोकांतिकेशी संबंध असणाऱ्या माणसांची नावे तुम्हाला माहीत असणे अवश्य आहे. हिचा शेवट अद्याप व्हावयाचा आहे, पण दुःखदायक होण्याचा संभव आहे, हे कोणालाही सहज कळून येईल.

“ याचवेळी आमच्या खेड्यात शेजारच्या एका गरीब मजुराचा मुलगा—व्हिन्सेन्ट डी ला रोजा—आला. हा व्हिन्सेन्ट इटालीमध्ये आणि इतरत्र सैनिक होता. तो इटालीतून आमच्या खेड्यात आला. तो जेव्हा फक्त बारा वर्षांचा होता, तेव्हा एक कॅप्टन आपल्या मंडळींसह तेथून चालला होता. त्याने या मुलाला या खेड्यातून बाहेर नेले आणि बारा वर्षांनंतर हा मुलगा परत आला. त्यावेळी तो अगदी आनंदी आणि ऐटबाज सैनिकासारखा दिसत होता. त्याच्या अंगावर हजारो विविध रंग, स्फटिकाची हजारो खेळणी आणि पोलादी साखळ्या शोभत होत्या. आज तो एक थाट करी, तर उद्या दुसरा अलंकार. पण सारे खोटे, बनावट आणि कवडी—किंमतीचे. खेड्यातील लोक मूळचेच मत्सरी—त्यात आळशी असल्यामुळे अधिक मत्सरी. त्यांनी त्याचा हा सारा थाटमाट चटकन् पाहिला आणि त्याच्या अंगावरील सारी सुंदर भूषणे न्याहाळली. तेव्हा त्यांना असे आढळले की, त्याच्याजवळ कपड्यांचे तीन संच आहेत. ते आणि त्याबरोबर असलेले पायमोजे व ते बांधावयाचे पट्टे—सारे भिन्न भिन्न रंगाचे आहेत. पण तो ते कपडे अशा युक्तीने आणि हिकमतीने घालीत असे की, जर कोणी ते नीट पाहिले नाहीत, तर त्याच्याजवळ दहा—बारा कपड्यांचे संच आणि वीस – पंचवीस पिसांचे तुरे आहेत, असे कोणीही शपथेवर सांगेल. त्याच्या कपड्यांविषयी आणि लहानसहान भूषणांविषयी मी इतके तपशीलवार सांगत आहे यात काही वावगे नाही. कारण ही कहाणी त्यावर पुष्कळशी अवलंबून आहे. आमच्या रस्त्यावर वाढलेल्या एका विस्तीर्ण पॉपलर वृक्षाखाली एका बाकावर बसून तो आपले पराक्रम आम्हाला सांगत असे. त्याचे ते चमत्कार ऐकून

आम्ही तोंडात बोटे घालीत असू. तो म्हणे, 'या पृथ्वीच्या पाठीवर असा एकही देश नाही की, जो मी पाहिला नाही आणि असे एकही युद्ध नाही की, ज्यात मी भाग घेतला नाही. मोरोक्को आणि ट्युनिस या दोन्ही शहरात मिळून जितके मूर लोक असतील त्यांच्यापेक्षा अधिक मी एकट्याने ठार केले आहेत. गँटे, लूना, डीएगो, पेरेडेझचा गॅर्शिया – आणि असेच हजारो वीर – यांच्यापेक्षा मी अधिक द्वंद्वयुद्धे खेळलो आहे आणि त्या सर्वांमध्ये मी विजयी झालो आहे. माझ्या अंगावर एकही ओरखडा निघाला नाही किंवा माझ्या अंगातून रक्ताचा एकही थेंब सांडला नाही.' नंतर तो आम्हाला जखमा दाखविण्याचे सोंग करीत असे पण आम्हाला त्या दिसत नसत. परंतु तो आम्हाला सांगे, 'कैक चकमकींमध्ये आणि संग्रामामध्ये बंदुकीच्या गोळ्यांमुळे मला या जखमा झालेल्या आहेत.' थोडक्यात म्हणजे तो आपल्या बरोबरीच्या सर्व माणसांना अत्यंत उद्धटपणाने वागवीत असे. त्याचा जन्म हलक्या कुळात झालेला आहे, हे ज्यांना माहीत होते, त्यांनाही तो तसेच वागवी. तो म्हणे, 'माझा बाहु हाच माझा पिता, माझी कृत्ये हेच माझे घराणे आणि सैनिक असण्यापेक्षा मी राजाचे काही देणे लागत नाही. मी सैनिक असल्यामुळे राजाइतकाच थोर आहे.'

"या पांघरलेल्या गुणाशिवाय तो थोडासा गायकही होता आणि थोडेबहुत गिटार वाजवू शकत होता. पण त्याचा सर्वोत्तम गुण मुख्यतः त्याच्या काव्यात साठविलेला होता. काव्याच्या रूपाने आपली बुद्धिमत्ता प्रगट करण्याचा त्याला इतका छंद होता की, प्रत्येक सामान्य प्रसंगावर तो पाच मैल लांबीची कविता करीत असे. मी ज्याचे वर्णन करीत आहे तो हा सैनिक. हा व्हिन्सेन्ट डी ला रोजा, हा वीर, हा शूर, हा गायक, हा कवी पुष्कळवेळा लीअँड्राच्या नजरेस पडे. तिच्या घराच्या एका खिडकीतून रस्त्यावरचे सारे काही दिसे. त्याचा जरतारी पोषाख पाहून ती प्रभावित होई, त्याच्या काव्याने ती मोहित होई (त्या काव्याच्या पुष्कळ प्रती वाटण्याची काळजी तो घेई). तो आपल्या पराक्रमाचे जे वर्णन करी, ते ऐकून तिचे कान तृप्त होत. सारांश, दुर्दैवाने ती त्याच्या प्रेमात पडली. तिला मागणी घालण्याइतका विश्वास त्याने प्रगट करण्यापूर्वीच हे घडले. साऱ्या प्रेम – प्रकरणामध्ये स्त्रीचे प्रेम आधी गुंतलेले असले म्हणजे पुढील साऱ्या गोष्टी सोप्या होतात तसेच येथे घडले. लीअँड्रा आणि व्हिन्सेन्ट यांना गुजगोष्टी करण्यासाठी वारंवार भेटणे कठीण गेले नाही. तिच्या मनाचा कल काय आहे, याचा थोडासाही सुगावा तिच्या अनेक प्रियकरांना लागण्यापूर्वीच तिने आपले मन संतुष्ट करून घेतले. (तिला आई नव्हती.) तिने आपल्या बापाचे घर सोडून या सैनिकाबरोबर पलायन केले. तो ज्यांची बढाई मारत असे त्या सर्व युद्धापेक्षा या प्रेमयुद्धात फार मोठा विजय त्याने संपादन केला. ज्याने ज्याने म्हणून ही घटना ऐकली, त्या सर्व गावकऱ्यांना आश्चर्य वाटले. मी विस्मित झालो, ॲन्सेल्मो बेचैन झाला, तिचा बाप अश्रू ढाळू लागला, तिचे नातलग खवळले आणि न्यायाची मागणी करू लागले. अधिकाऱ्यांचे एक पथक शोधार्थ बाहेर पाठविले गेले. त्याने रस्त्या–रस्त्याने जाऊन प्रत्येक अरण्याचा तपास केला आणि तीन दिवसांच्या

शेवटी, बिचारी प्रेमळ लीअँड्रा डोंगराच्या एका गुहेत त्यांना सापडली. तिच्या अंगावर तिचा फक्त सदरा होता आणि तिने आपल्या घरून जे पैसे आणि रत्ने आणली होती, त्यापैकी बहुतेक सारे हिरावले गेले होते. त्यांनी तिला आणून तिच्या बापापुढे उभे केले. ' तुझ्या दुर्दशेचे कारण काय ? ' असे त्याने विचारल्यावर तिने भाबडेपणाने कबूल केले की, " व्हिन्सेन्ट डी ला रोजा याने मला फसविले. लग्नाचे वचन देऊन त्याने मला आपल्या बापाचे घर सोडावयास लावले. अलम दुनियेतील अत्यंत संपन्न आणि मजेशीर शहर नेपल्स येथे मला नेण्याचे त्याने अभिवचन दिले. मी त्याच्यावर विश्वास ठेवण्याचा मूर्खपणा केला आणि आपल्या बापाची चोरी करून मी येथून पळाले. ज्या रात्री मी येथून गेले, त्याच रात्री मी स्वतःला त्याच्या हाती सोपविले. त्याने मला एका उंच, भयाण व खडबडीत अशा डोंगरावर नेले आणि त्याच्या गुहेत मला ठेवले. तेथेच मी तुम्हाला आढळले. त्याने मला बंदुकीचा धाक दाखवून माझे सर्वस्व लुटले हे खरे, पण माझी अब्रू लुटण्याचा प्रयत्न त्याने कधी केला नाही. मला तशा अवस्थेत सोडून तो पळून गेला. " त्या सैनिकाच्या संयमाबद्दल अनुकूल मत आमच्यापैकी कोणाचे सहजासहजी झाले नाही. पण तिने ते पुनः पुनः इतके ठासून सांगितले की, त्यामुळे तिच्या दुःखी पित्याला थोडेफार समाधान लाभले. आपल्या मुलीच्या अब्रूपेक्षा अधिक मोलाचे त्याला काही वाटत नसे.

" ज्या दिवशी लीएंड्रा पुनः आमच्या दृष्टीस पडली, त्याच दिवशी ती आमच्या दृष्टीआडही झाली. कारण तिच्या बापाने तिला जवळच्या एका शहरातील मठामध्ये तावडतोब डांबून ठेवले. कालांतराने तिचे लांछन थोडेफार पुसले जाईल अशी त्याला आशा वाटत होती. ज्यांना लीअँड्राविषयी काही आस्था नव्हती, त्यांनी तिचे तारुण्य लक्षात घेऊन तिला क्षमा केली, पण तिची बुद्धिमत्ता आणि चातुर्य ज्यांना माहीत होते, त्यांनी तिच्या पलायनाचा दोष तिच्या अज्ञानाला न देता स्त्री–सुलभ थिल्लरपणाला आणि पोकळ गर्विष्ठपणाला दिला. लीअँड्रा त्या मठात डांबली गेल्यापासून अॅन्सेल्मोच्या दृष्टीला सुख–स्वास्थ्य देणारी एकही वस्तू आढळेना. लीएंड्राच्या गैरहजेरीत मलाही सर्वत्र दुःख आणि औदासीन्य हेच दिसत असे. आमचा धीर जसजसा खचत चालला, तसतसा आमचा खेद वाढत चालला. त्या सैनिकाच्या डामडौलाला आम्ही सहस्रशः शिव्याशाप दिले आणि तिच्या पित्याने सावधगिरी न बाळगल्याबद्दल त्याच्यावर तोंडसुख घेतले. शेवटी, अॅन्सेल्मो आणि मी या दोघांनी ते खेडे सोडून या दरीत येऊन राहण्याचे ठरविले. तो शेळ्यांचा मोठा कळप संभाळतो आणि मी मेंढयांचा तितकाच मोठा कळप संभाळतो. ही सारी जनावरे आमची आहेत. आमच्या भावना प्रगट करून, सौंदर्यसंपन्न लीअँड्राची स्तुतिस्तोत्रे गाऊन किंवा तिची निंदा करून आणि कधी कधी एकटेच उसासे टाकून आम्ही आमचा वेळ झाडाखाली घालवितो आणि आमच्या दुर्दैवाबद्दल ईश्वराकडे तक्रार करतो. आमचा कित्ता गिरवून लीएंड्राचे पुष्कळ प्रियकर या उंच आणि खडबडीत डोंगरावर आलेले आहेत आणि असेच उद्योग करीत राहिले आहेत. त्यांची संख्या

इतकी मोठी आहे की, आपण वाचतो ते जुने–पुराणे आर्केडिया शहरच येथे वसले आहे, असा भास होतो. या टेकडीच्या माथ्यावर इतके मेंढपाळ आणि त्यांच्या झोपड्या आहेत की, लीॲंड्राचे नाव ऐकू येत नाही असा एकही भाग येथे नाही. इकडे एकजण तिच्या स्वैर व विषयी स्वभावाला शिव्याशाप देतो, तर तिकडे दुसरा तिला चंचल व हलक्या मनाची म्हणतो. कोणी तिला निर्दोषी ठरवून क्षमा करतो, तर कोणी तिच्यावर आरोप ठेवून तिचा धिक्कार करतो. कोणी तिच्या सौंदर्याची प्रशंसा करतो, तर कोणी तिच्या दुर्गुणावर ताशेरे झाडतो. सारांश, सर्वजण तिला दोष देतात, पण तिची पूजा करतात. या गोष्टीचा अतिरेक असा झाला आहे की, जे लोक तिच्याशी कधी बोलले नाहीत ते तिच्या तुच्छतापूर्वक वर्तनाबद्दल तक्रार करतात. तिने कोणालाही आपला कृपाप्रसाद दिला नाही म्हणून जळफळणारे लोकही येथे आहेत. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, तिला हे लांछन लागेपर्यंत तिच्या मनाचा कल कोणाला कळलेला नव्हता. आपल्या शोकपूर्ण कहाण्या वाऱ्याला सांगणारे असे प्रेमिक धनगर जेथे नाहीत, अशी खडकातील एकही गुहा किंवा ओढ्याचा एकही काठ अथवा राईतील एकही वृक्ष तुम्हाला आढळणार नाही. लीॲंड्राच्या नावाचा प्रतिध्वनी एकसारखा होत असतो. साऱ्या टेकड्यांमध्ये लीॲंड्राचे नाव घुमत असते – सारे झरे लीॲंड्राचे नाव कुजबुजत असतात. आम्हा सर्वांना मंत्रमुग्ध करणारी ती लीॲंड्रा आहे. तिच्याविषयी काहीही आशा नसताना, आम्ही तिची आशा धरतो आणि भीतीचे काहीही कारण नसताना आम्ही भीती बाळगतो. या सर्व वेडपट लोकांमध्ये सर्वांत अत्यंत शहाणा – पण सर्वांत आपले शहाणपण कमी दाखविणारा – जर कोणी असेल तर तो माझा प्रतिस्पर्धी ॲन्सेल्मो. तक्रारीची सारी इतर कारणे विसरून तो फक्त तिच्या वियोगाबद्दल तक्रार करतो आणि आपल्या वीणेवर तो आपण रचलेल्या कविता गाऊ लागतो. तो वीणा फार सुरेख वाजवितो आणि त्याच्या काव्यात महान् प्रतिभा विलसत असते. मी दुसरा मार्ग चोखाळतो आणि तो अधिक चांगला आणि सोपा आहे, असे मला खात्रीने वाटते. तो म्हणजे स्त्री–जातीच्या थिल्लरपणाची, अस्थिरपणाची, वचनभंगाची, पोकळ व फसव्या प्रतिज्ञांची, भपकेबाजपणाला भुलण्याची आणि गुणाची कदर न करण्याची निंदानालस्ती करणे. सभ्यगृहस्थहो, येथे येताच या शेळीला उद्देशून मी जे शब्द बोललो, त्याचे कारण हे आहे. ही शेळी माझ्या साऱ्या कळपात उत्तम आहे. पण ती स्त्री आहे म्हणून मी तिचा द्वेष करतो. आपल्याला जी गोष्ट सांगण्याचे वचन मी दिले होते, ती ही. ती फार लांबलचक झाली असे जर आपल्याला वाटले असेल, तर आपली नुकसानभरपाई मी शक्य त्या कोणत्याही मार्गाने करीन. शेजारीच माझी झोपडी आहे. तेथे उत्तम, ताजे दूध आणि चीज आहे. शिवाय नाना प्रकारची फळेही आहेत. ती तुमच्या दृष्टीला आणि जिव्हेला सुखदायक वाटतील अशी मला आशा आहे.''

□ □

## प्रकरण २५

# डॉन क्विक्झोट आणि धनगर यांच्यामधील सामना. पश्चात्तप्तांचे अपूर्व साहस व त्यांत आपल्या निढळाचा घाम गाळून शिलेदाराने मिळविलेला दुर्मिळ विजय

धनगराची गोष्ट साऱ्या मंडळींना फार आवडली – विशेषतः धर्मगुरूला. त्याने धनगराच्या निवेदन–शैलीकडे विशेष लक्ष दिले होते. ती शैली अडाणी धनगराची असण्यापेक्षा विद्वानाची आणि सभ्य माणसाची होती. त्यावरून त्याने असा निष्कर्ष काढला की, डोंगरातही पंडित आणि शहाणी माणसे असतात, हे पाद्र्याचे विधान सयुक्तिक आहे. आपण मैत्री व सेवा करण्यास उत्सुक आहो, असे त्या सर्वांनी यूजेनियोला सांगितले. पण त्या सर्वांवर कडी करून डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, "यावेळी मी जर नवे धाडस अंगावर घेण्यास समर्थ असतो, तर मी तुझी सेवा करण्यास या क्षणापासून सुरुवात केली असती हे खचित. लीएंड्राला मठातून मी बाहेर तत्काळ काढले असते. तिच्या इच्छेविरुद्ध तिला तेथे डांबून ठेवलेले आहे हे निःसंशय. त्या मठाच्या महंतिणीचा आणि तिच्या साऱ्या भक्तांचा विरोध मोडून काढून मी तिला तुमच्या हाती परत दिले असते. मग तू एकट्याने तिच्या आयुष्याची विल्हेवाट कशीही लावावीस – अर्थात् शिलेदारीच्या नियमांस धरून ते झाले पाहिजे. कोणाही माणसाने तरुणीवर थोडाही अत्याचार करण्यास शिलेदारीचा स्पष्ट विरोध आहे. मांत्रिक मित्राची शक्ती मत्सरी मांत्रिकांच्या शक्तीवर मात करील, असा मला विश्वास वाटतो. हे जेव्हा घडेल, तेव्हा तुला माझी कृपा आणि मदत मिळेल ही खात्री बाळग. माझ्या व्यवसायामुळे तसे करणे हे माझे कर्तव्य आहे. त्रस्त जीवांना दुःखमुक्त करणे हे शिलेदाराचे कर्तव्य होय."

आतापर्यंत धनगराने डॉन क्विक्झोटकडे मुळीच लक्ष दिले नव्हते. पण आता तो त्यांच्याकडे बारकाईने पाहू लागला. त्यांचा दुःखी चेहरा आणि कंगाल वेश यामुळे ते अशा प्रचंड गोष्टी करतील, अशी अपेक्षा धरण्यास त्याला फारसे उत्तेजन मिळाले नाही. आपल्याजवळ बसलेल्या न्हाव्याला उद्देशून तो कुजबुजला, "महाराज, अशा अचाट गोष्टी बोलणारा हा माणूस कोण आहे? खरोखर माझ्या साऱ्या आयुष्यात मी इतकी विचित्र व्यक्ती कधी पाहिली नाही." न्हाव्याने उत्तर दिले, "अरे, ला मांचाचा सुविख्यात डॉन क्विक्झोट तो हाच. त्याच्याशिवाय हा दुसरा कोण असेल, अशी कल्पना तू करतोस? न्यायाची स्थापना करणारा, अन्यायाचा सूड उगविणारा, रमणीचे रक्षण

करणारा, धिप्पाड माणसांना भयकंपित करणारा आणि युद्धात अजिंक्य जय मिळविणारा शिलेदार तो हाच." धनगराने उत्तर दिले, "तुम्ही या माणसाची जी हकिकत सांगितली, ती शिलेदारीच्या ग्रंथात आणि प्रणयकथात आपण ज्या बहाद्दर डॉनचे वर्णन वाचतो, त्यासारखीच आहे. प्रचंड सामर्थ्य आणि यश यामुळे त्यांना शिलेदार म्हणत असत. मला वाटते, तुम्ही माझी केवळ मस्करी करीत आहा. या गृहस्थाचा मेंदू आपला मुक्काम सोडून गेलेला दिसतो."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे उद्धट नि उर्मट पाजी माणसा, तुझी कागदाची कवटी रिकामी असेल. तुझ्या बाजार-बसव्या आईने आपल्या गर्भात तुझ्यासारखा अज्ञानाचा गोळा जेव्हा धारण केला, तेव्हा तिच्या डोक्यात जितका मेंदू होता, त्यापेक्षा जादा मेंदू माझ्या मस्तकात आहे." एवढे बोलून त्यांनी जवळच पडलेला पावाचा तुकडा त्वेषाने उचलून तो त्या धनगराच्या तोंडावर जोराने फेकला. त्यामुळे त्याचे नाक जवळ-जवळ सपाट झाले. दुसरा धनगर अशा प्रकाराला नवखा होता. त्याला इतक्या हलकटपणाने वागविलेले पाहून, दुसऱ्याने ते टेबल, ते टॉवेल्स किंवा तेथे खात बसलेली माणसे याकडे लक्ष न देता, डॉन क्विक्झोटवर आवेशाने उडी मारली आणि आपल्या दोन्ही हातांनी त्यांचा गळा घट्ट दाबून धरला. सँको पँझा ऐनवेळी धावून आला नसता, तर त्याने डॉन क्विक्झोट यांना गळा दाबून ठारच मारले असते. सँकोने त्यांना मागून घट्ट पकडले आणि टेबलाकडे मागे खेचले. त्यामुळे बरण्या आणि पेले फुटले आणि त्यातील सारे पदार्थ खाली पडले. आपण मोकळे झालो आहो असे पाहून डॉन क्विक्झोट त्या धनगरावर त्वेषाने तुटून पडले. धनगराचे सर्वांग रक्तबंबाळ झाले होते. सँकोच्या पाया-खाली त्याचे शरीर तुडविले जात होते आणि त्याचे तुकडे होत होते. भयंकर सूड उगविण्यासाठी जेवणाचा काटा किंवा सुरी तो इकडे-तिकडे चाचपत शोधत होता. पण त्याचा उद्देश विफल करण्यासाठी धर्मगुरू व पाद्री काळजी घेत होते. न्हाव्याच्या युक्ती-मुळे धनगराने डॉन क्विक्झोट यांना आपल्या अंगाखाली घेतले, आणि त्यांच्यावर ठोश्यांचा असा वर्षाव केला की, त्यामुळे त्याच्या स्वतःच्या तोंडातून रक्ताचे जितके लोट निघाले, तितकेच त्या बिचाऱ्या शिलेदाराच्या तोंडून निघू लागले.

धर्मगुरू व पाद्री यांच्या हास्याचा स्फोट होण्याची वेळ आली आणि अधिकारी तर तो खेळ पाहून नाचू-बागडू लागले. 'शाबास!' असे प्रत्येक जण ओरडू लागला. दोन कुत्री एकमेकावर भुंकू लागली किंवा लढू लागली म्हणजे बघे लोक असेच करतात. एकटा सँको पँझा मात्र तप्त-त्रस्त झालेला होता.--मरणाच्या अवस्थेस पोचला होता. वेड्यासारखा तो बडबडत होता. धर्मगुरूच्या एकाही नोकराची मदत त्याला मिळत नव्हती. कारण त्याच्या धन्याला मदत न करण्यास धर्मगुरूने आपल्या सेवकांना सांगितले होते. सारांश, त्या रक्तबंबाळ सामानेवाल्यांशिवाय बाकी सारेजण मोठ्या मजेत होते. ते दोघेजण मात्र एकमेकांना जोरजोराने बडवीत होते. इतक्यात त्यांच्या कानी तुतारीचा आवाज आला. तो इतका शोकपूर्ण होता की, तो कोठून येतो, हे पाहण्यासाठी सारी

माणसे शोध घेऊ लागली आणि ऐकू लागली. पण या भयसूचक आवाजामुळे सर्वांत अधिक त्रस्त कोणी झाले असेल तर ते डॉन क्विक्झोट. म्हणून धनगराच्या शरीराखाली ते, स्वतःच्या इच्छेविरुद्ध दडपले गेले होते आणि अत्यंत निष्ठुरपणे दिलेले ठोसे सोशीत होते तरी त्याला म्हणाले, "अरे सैतान-मित्रा, माझी शक्ती काबूत आणण्याइतके सामर्थ्य नि शौर्य कोणाच्याही अंगी नाही हे खरे. पण आपण फक्त एका तासासाठी शस्त्र-संधी करू या. कारण तुझ्या कठोर बुक्यांनी माझ्या कानाला जितक्या वेदना होत आहेत, त्यापेक्षा त्या तुतारीच्या शोकपूर्ण आवाजाने माझ्या जीवाला अधिक यातना होत आहेत. तो आवाज मला नवे साहस करण्यास उत्तेजित करीत आहे, असे मला वाटते." मार खाणाऱ्याइतकाच मार देणाराही दमलेला असल्यामुळे धनगराने तत्काळ तह कबूल केला. शिलेदार पुनः आपल्या पायावर उभे राहिले. आणि तो शोकपूर्ण आवाज ज्या ठिकाणाहून येत आहे असे वाटले, तिकडे त्यांनी आपली मंद पावले वळविली. तेथे त्यांना लगेच, पश्चात्तप्त माणसासारख्या शुभ्र वेषातील पुष्कळ माणसे उंचवट्यावरून खाली येत असलेली दिसली. खरी गोष्ट अशी होती की, लोकांना पुऱ्या वर्षभर पावसाचा लाभ झाला नव्हता. म्हणून त्यांनी प्रार्थना, मिरवणुकी वगैरे कार्यक्रम साऱ्या देशात आयोजित केले होते. ईश्वराने आपला खजिना उघडावा आणि त्यातील जल-संपत्तीचा वर्षाव आपल्यावर करावा अशी प्रार्थना ते करीत होते. या उद्देशाने त्या ठिकाणाजवळील एका खेड्यातील रहिवासी तेथील पवित्र झोपडीकडे मिरवणुकीने आले होते. त्या दरीला वेढणाऱ्या टेकड्यांपैकी एका टेकडीवर ती झोपडी बांधलेली होती.

प्रार्थना करणाऱ्या लोकांची ती विचित्र चालरीत डॉन क्विक्झोट यांना दिसताच, हे आपल्याला नव्या साहसाचे निमंत्रण आहे, असे त्यांना वाटले. असे प्रकार आपण पूर्वी पाहिले होते हे ते विसरले. शिलेदारीच्या धर्मास अनुसरून आपण एकट्याने या साहसात भाग घेणे अवश्य आहे असेही त्यांना वाटले. (काळ्या कापडाने पूर्णपणे झाकलेली) एक मूर्ती ते लोक नेत होते. ती एक महान् स्त्री असावी आणि तिला हे दुष्ट आणि असभ्य शिलेदार तिच्या इच्छेविरुद्ध दूर नेत असावेत, असे त्यांना वाटले. ही लहर त्यांच्या डोक्यात शिरताक्षणीच ते शक्य तितक्या त्वरेने रोझिनांटकडे धावले. तो त्या मैदानात खालीवर हिंडून चरत होता. त्याचा लगाम हिसकावून घेऊन आणि जवळच टांगलेली आपली ढाल हाती धरून त्यांनी एका क्षणात त्याच्या तोंडात लगाम घातला आणि आपली समशेर सॅकोपासून घेऊन, क्षणार्धात ते रोझिनांटच्या पाठीवर स्वार झाले. आपली ढाल घट्ट धरून तेथे हजर असलेल्या सर्व लोकांना उद्देशून ते मोठ्याने म्हणाले, "अहो शूर मंडळींनो, शिलेदारीचा व्यवसाय अभिमानाने धारण करणाऱ्या थोर व्यक्ती जगात असणे मानवजातीला किती महत्त्वाचे आहे हे तुम्हाला आता दिसून येईल. ज्या थोर महिलेला कैद करून नीचपणाने आणि रानटीपणाने नेले जात आहे, तिला मी आता बंधमुक्त करीत आहे हे आपण पहाल. आणि त्यामुळे शिलेदारांना अत्यंत उच्च आणि महान् मान दिला पाहिजे हे तुम्हाला पटेल."

असे म्हणून त्यांनी रोझिनांटला नुसतीच टांच दिली व चिमटा घेतला. कारण त्यांचेजवळ टाच–पराणी नव्हती. ( रोझिनांट कधी भर वेगाने धावला आहे, असे या इतिहासाच्या कोणत्याही भागात तुम्ही वाचले नसेल. ) त्याला वेगाने दौडावयास लावून ते त्या पश्चात्तप्त लोकांशी सामना करण्यास उभे ठाकले. धर्मगुरू, पाद्री आणि न्हावी यांनी त्यांना थांबविण्याचा केलेला सारा प्रयत्न फोल ठरला. मग सँको पँझाच्या आरडा-ओरडीने ते कोठले थांबणार ? बिचारा शागीर्द ओरडत होता, “धनीसाहेब, डॉन क्विक्झोट महाराज, आपण कोठे उभे आहा ? आपल्यावर कोणी जादू केली काय ? धर्माविरुद्ध वागण्यासाठी सैतानाने तुम्हाला चिथावले काय ? अरेरे, मी किती अभागी ! महाराज, ही पश्चात्तप्त माणसांची मिरवणूक आहे आणि ते जी मूर्ती नेत आहेत ती आपल्या पवित्र कुमारी मातेची आहे. आपण काय करीत आहो याकडे लक्ष द्या. यावेळी लोक खात्रीने म्हणतील की, यांचे डोके फिरले आहे.” सँकोने आपले शब्द दुसऱ्या प्रसंगासाठी राखून ठेवावयास हवे होते. कारण, त्या श्वेतवस्त्रधारी माणसांशी लढा खेळण्याची आणि त्या शोकाकुल स्त्रीला मुक्त करण्याची डॉन क्विक्झोट यांना इतकी तीव्र इच्छा झाली होती की, सँको जे बोलला, त्यातील एक अक्षरही त्यांना ऐकू आले नाही. प्रत्यक्ष राजाचा स्पष्ट आदेश असता, तरीही ते परत फिरले नसते.

शेवटी, मिरवणुकीच्या जवळ आल्यावर त्यांनी रोझिनांटला थांबविले. त्यालाही थोडी विश्रांती घेण्याची इच्छा होतीच ! दुःखी स्वरात आणि घोगऱ्या आवाजात डॉन क्विक्झोट म्हणाले, “अहो लोकहो, तुम्हाला स्वतःची आणि आपण आता करीत असलेल्या अपराधाची लाज वाटत असल्यामुळे तुम्ही आपली तोंडे बहुधा झाकून घेतली असावीत. पण मी काय म्हणतो याकडे लक्ष द्या–अवधान द्या.” या इशाऱ्याने जे लोक थांबले, ते ती मूर्ती नेत होते. प्रार्थना म्हणणाऱ्या त्या चार धर्मगुरूंपैकी एकाने तत्काळ उत्तर दिले. डॉन क्विक्झोट यांचे ते विचित्र रूप, रोझिनांटचे कृश शरीर आणि कोणालाही हसू येईल अशी शिलेदारांची सारी परिस्थिती लक्षात घेऊन तो धर्मगुरू म्हणाला, “भल्या गृहस्था, तुम्हाला आम्हाला काही सांगावयाचे असेल, तर लवकर बोला. कारण जी बिचारी माणसे तुम्ही पहात आहा, ती अत्यंत थकलेली आहेत. म्हणून दोन शब्दांत जे सांगता येण्यासारखे नसेल, ते आम्ही ऐकू शकत नाही आणि ते ऐकण्याचे दुःख सहन करीत आम्ही येथे उभे राहणे योग्य नाही.” डॉन क्विक्झोट उत्तरले, “मी एका शब्दात सांगतो. त्या सुंदर स्त्रीला तुम्ही तत्काळ मुक्त करा. तिच्या अश्रुपूर्ण आणि शोकपूर्ण मुद्रेवरून हे स्पष्ट दिसते की, तुम्ही तिच्यावर काही अश्रुतपूर्व अन्याय केलेला आहे आणि तिला जुलमाने दूर नेत आहा. तुम्ही माझे ऐकले पाहिजे. नाही तर अशा अत्याचारांना शिक्षा करण्यासाठी मी जन्मलेलो असल्यामुळे, तिच्यासह तुम्हाला मी एक पाऊल पुढे टाकू देणार नाही. तिला ज्या स्वातंत्र्याची तीव्र इच्छा आहे आणि जे स्वातंत्र्य उपभोगण्यास न्यायाने ती पात्र आहे, ते तिला पूर्णपणे प्राप्त झाले पाहिजे.” त्यांचे हे शेवटचे भाषण ऐकून सर्वांची खात्री पटली की, शिलेदारजीचे

डोके नक्की बिघडले आहे. त्यामुळे सर्वजण खो खो हसू लागले. हे आगीत तेलच पडले. डॉन क्विक्झोट इतके भडकले की, अधिक काही न बोलता, त्यांनी आपल्या तलवारीवर आपला हात ठेवला, आणि ती मूर्ती नेणाऱ्या माणसावर तत्काळ हल्ला चढविला. त्याचवेळी त्यांच्यापैकी एकजण आपली जागा सोडून हातात एक लाकडी दांडके घेऊन आपल्या शिलेदाराशी झुंज खेळण्यास पुढे आला. त्या दांडक्यावर ती ताटी काही काळ ठेवलेली असे. त्या दांडक्याने त्याने डॉन क्विक्झोटवर असा जबरदस्त तडाखा दिला की, त्यामुळे त्या दांडक्याचे दोन तुकडे झाले. त्यातील एक तुकडा हातात घेऊन, दुसऱ्या माणसाने शिलेदाराच्या डाव्या खांद्यावर असा फटका मारला की, बिचारे अभागी डॉन क्विक्झोट जमिनीवर धाडकन् कोसळले. खेडवळांच्या अशा शक्तीला तोंड देण्यास त्यांची ढाल समर्थ नव्हती. त्यांना फार ओरखडे निघाले.

सँको पँझाने आपला धनी पडल्याचे पाहून, आपल्या पायांना आणि फुप्फुसांना शक्य होते तितक्या वेगाने, तो धन्याकडे धावत गेला आणि त्याच्या प्रतिस्पर्ध्याला ओरडून म्हणाला, "थांबा, थांबा. मारू नका. तो बिचारा शिलेदार जादूटोण्यामध्ये सापडला आहे. अहो, त्याने आपल्या उभ्या आयुष्यात कधी कोणाला अपाय केला नाही हो." सँकोच्या या युक्तिवादामुळे त्या खेडवळाचे हात थांबले नाहीत. पण ते थांबले याचे कारण एकच – आणि ते म्हणजे आपण याला ठार मारले असे भय त्याला वाटले. त्याचे हात किंवा पाय हालत नाहीत असे त्याला आढळले. म्हणून आपला कोट आपल्या कमरेपर्यंत शक्य त्या त्वरेने गुंडाळून तो एखाद्या शिकारी कुत्र्याप्रमाणे त्या मैदानावर धावू लागला. तोपर्यंत, डॉन क्विक्झोट जेथे पडले होते, तेथे त्यांचे सोबती धावत गेले. त्यांच्याबरोबर क्रॉस धारण करणारे धर्मसंस्थेचे अधिकारी आहेत, असे पाहून मिरवणुकीतील माणसांना असे भय वाटले की, या येणाऱ्या लोकांकडून आपल्यावर काही तरी संकट कोसळणार ! म्हणून ते सर्वजण त्या मूर्तीजवळ एकत्र झाले आणि आपल्या तोंडावरील बुरखे वर उचलून त्यांनी आपले चाबूक घट्ट धरले. ( धर्मगुरू आपल्या मेणबत्त्या धरतात तसे. ) मोठ्या धडाडीने ते हल्ल्याची वाट पहात राहिले आणि शक्य तितका काळ स्वतःचे संरक्षण करून शत्रूला हटविण्याचा त्यांनी निश्चय केला. पण त्यांना आशा वाटत होती, त्यापेक्षा अधिक चांगल्या रीतीने देवाने प्रकरणाचा शेवट केला. सँको आपल्या धन्याच्या शरीरावर पडलेला होता आणि एवढ्या उदात्त आणि उदार धन्याचा अंत इतक्या हास्यास्पद रीतीने व्हावा म्हणून शोक करीत होता. त्याचवेळी शिलेदाराच्या मंडळींपैकी पाद्री तेथे आला. त्याच्याबरोबर मिरवणुकीतील एक माणूस होता. त्याची ओळख त्याला तत्काळ पटली. त्या ओळखीमुळे दोन्ही पक्षांची लढाई होण्याची भीती समाप्त झाली.

डॉन क्विक्झोट यांच्या पाद्र्याने त्या दुसऱ्या माणसाला शिलेदारांच्या परिस्थितीचा परिचय मोजक्या शब्दांनी करून दिला. नंतर तो आणि पश्चात्तप्त लोकांचे ते सारे पथक, तो अभागी शिलेदार जिवंत आहे की मेला, हे पाहण्यासाठी तिकडे गेले. त्यावेळी सँको

पँझा, डोळ्यांत अश्रू आणून, आपल्या धन्यासाठी विलाप करीत होता, “ अरे शिले-दारीच्या भूषणा, एका घातुक धक्क्याने तुझा अवेळी अंत झाला ! तू आपल्या घराण्याचा अलंकार होतास आणि साऱ्या ला मांचाचे वैभव होतास ! छेः, सर्व जगाचे वैभव होतास ! आता जग तुला मुकल्यामुळे दुष्ट आणि वेळूट लोक जगभर धिंगाणा घालतील आणि आपल्या दुष्कृत्याबद्दल शासन होण्याचे भय त्यांना राहणार नाही. तमाम दुनियेतील साऱ्या शिकंदरांपेक्षा अधिक उदार असणाऱ्या जीवा ! मी तुझी आठ महिने कशीबशी सेवा केली, म्हणून तू मला समुद्राच्या खारट पाण्याने धुतले जाणारे सर्वोत्तम बेट बहाल केलेस. अरे, गर्विष्ठ माणसापुढे तू नम्र होतास आणि नम्र माणसापुढे गर्विष्ठ होतास ! तू आपल्या अंगावर संकटे ओढवून घेण्याचे धैर्य दाखवीत होतास आणि दुसऱ्याकडून होणारे उपमर्द शांतपणे सहन करीत होतास. तू प्रेम करीत होतास–पण कोणावर, हे कोणालाच माहीत नाही ! सज्जनांचा तू खरा वाली होतास, दुष्टांचा कर्दनकाळ होतास, आणि दुर्जनांचा कट्टा वैरी होतास–माणूस जे जे काही म्हणू शकेल, ते म्हणावयाचे तर, तू हाडाचा शिलेदार होतास ! ”

आपल्या शागीर्दाच्या आवाजातील दुःखाचे हेल ऐकून शेवटी डॉन क्विक्झोट शुद्धीवर आले आणि त्यांनी दीर्घ सुस्कारा सोडला. त्यांच्या मनात पहिला विचार आला तो, तेथे नसलेल्या डल्सीनियाबद्दल. ते म्हणाले, “ हे मोहक डल्सीनिये, तुझ्या दृष्टीपासून दूर झालेला हा अभागी जीव दूर तळमळत आहे. यापेक्षाही अधिक दुःखे तो सहन करू शकतो. ” नंतर आपल्या इमानी सेवकाकडे पाहून ते म्हणाले, “ भल्या सँको, मला पुनः त्या मंतरलेल्या गाडीत जाण्यास मदत कर. कारण, रोझिनांटच्या पाठीवर बसण्याच्या स्थितीत मी नाही. या माझ्या खांद्याचे तुकडे तुकडे झाले आहेत. ” सँकोने उत्तर दिले, “ धनीसाहेब, ते मी आनंदाने करतो आणि आपल्याला प्रार्थना करतो की, आपले सच्चे मित्र असलेल्या या सज्जनाबरोबर आपण आपल्या खेड्यात परत जावे. घरी गेल्यावर, यापेक्षा अधिक फायदेशीर आणि सन्माननीय असा दुसरा कोणता प्रवास करावा, याचा आपण विचार करू. ” डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, “ सँको, तू विचार करून बोललास. सध्या विश्वावर राज्य करणाऱ्या ग्रहांच्या दुष्ट प्रवृत्ती नष्ट होईपर्यंत आपण काही न करता स्वस्थ बसणे हेच शहाणपणाचे होईल. ”

त्यांच्या या गंभीर निश्चयाची प्रशंसा धर्मगुरू, पाद्री व न्हावी यांनी मुक्तकंठाने केली. सँको पँझाच्या हास्यास्पद विलापांनी त्यांचे भरपूर मनोरंजन झाले होते. डॉन क्विक्झोट यांना गाडीत पुनः बसविण्यात आले. मिरवणुकीतील माणसे पूर्वीच्या पद्धतीने पुनः उभी राहिली आणि आपल्या कामाला निघून गेली. धनगराने साऱ्या मंडळींचा निरोप घेतला. धर्माधिकारी पुढे जाऊ शकत नव्हते, म्हणून ते भेटल्याबद्दल पाद्र्याने समाधान व्यक्त केले. पुढील काळात डॉन क्विक्झोटची स्थिती कशी आहे, त्यांचा वेडेपणा कमी झाला की वाढला–ही सारी हकिगत आपल्याला कळविण्याविषयी धर्मगुरूने पाद्र्याला सांगितले आणि त्याचा निरोप घेऊन त्याने आपला प्रवास पुढे चालविला. अशा प्रकारे

पाद्री, न्हावी, डॉन क्विक्झोट आणि सँको पँझा यांना सर्वांनी एकत्र सोडले. आपल्या धन्याइतक्याच धैर्याने साऱ्या चकमकी सहन करणारा तो भला रोझिनांट तेथेच होता. गाडीवानाने आपले बैल गाडीला जोडले आणि पाद्र्याने दाखविलेल्या मार्गाने, डॉन क्विक्झोट यांना गवताच्या गठ्ठ्यावर बसवून, आपली गाडी नेहमीच्या मंदगतीने चालू केली. सहा दिवसांनी ते शिलेदाराच्या खेड्यात जाऊन पोचले.

त्यांनी गावात प्रवेश केला तेव्हा दुपारची वेळ होती. तो रविवार होता. गावातील सारे लोक बाजारात जमले होते. त्यांच्यामधून डॉन क्विक्झोटला जावयाचे होते. गाडीत काय आहे, हे जाणण्याविषयी प्रत्येकजण उत्सुक होता. आपलाच गावकरी तेथे आहे, हे समजल्यावर आणि त्याला पाहिल्यावर लोकांना विलक्षण आश्चर्य वाटले. ते आश्चर्याने आ वासून उभे राहिले असताना एक लहान मुलगा शिलेदाराच्या घराकडे गेला आणि त्याने घरधनी व पुतणी यांना बातमी दिली की, " आपले मालक आणि चुलते परत आले आहेत. ते अत्यंत कृश, फिकट आणि भुतासारखे भयंकर दिसत आहेत. गवताच्या एका गठ्ठ्यावर ते पाय ताणून एका गाडीत बसले आहेत आणि ती गाडी ओढण्याचे काम बैलांची जोडी करीत आहे. "

त्या दोन दुर्दैवी जीवांचा आक्रोश ऐकणे फार दुःखदायक होते. ते आपल्या तोंडावर मारून घेऊ लागले आणि तितकेच सुस्कारे सोडू लागले व अश्रू ढाळू लागले. शिलेदारीच्या साऱ्या ग्रंथांना ते मोठमोठ्याने शिव्या देऊ लागले. पण त्यांच्या आक्रोशाने कळस गाठला, डॉन क्विक्झोट दारातून आत आले तेव्हा. त्यांच्या आगमनाचा गोंगाट ऐकल्यावर सँको पँझाची बायको आपल्या नवऱ्याची चौकशी करण्याकरता तेथे घाई-घाईने आली. तेव्हा तिला सांगण्यात आले, तुझा नवरा शिलेदाराचा शागीर्द बनलेला आहे. त्याच्यावर तिची दृष्टी पडताच तिने त्याला पहिला प्रश्न केला, " गाढवाची तब्येत ठीक आहे ना ? " सँकोने उत्तर दिले, " माझ्या धन्यापेक्षा चांगली तब्येत राखून ते परत आले आहे. " ती म्हणाली, " छान, या शुभवर्तमानाबद्दल परमेश्वराला धन्यवाद दिले पाहिजेत. पण माझ्या मित्रा ऐक, या तुझ्या नव्या शागीर्दीमुळे तुला काय मिळाले ? तू माझ्यासाठी एखादा झगा किंवा पोलके आणले आहेस काय ? माझ्या मुलासाठी जोडे आणले आहेस काय ? " सँकोने उत्तर दिले, " खरे सांगायचे तर यांपैकी मी काहीही आणले नाही, पण त्याहून चांगल्या वस्तूचा भार मी आणला आहे. " त्याची बायको म्हणाली, " असे का ? ठीक आहे. त्या चांगल्या वस्तूंपैकी काही मला पाहू दे. त्या पाहण्याची मला अवाढव्य इच्छा आहे, हे मी प्रतिज्ञेवर सांगते. त्या पाहिल्याने माझे गरीब बिचारे अंतःकरण सुखी होईल. तू येथून गेल्यापासून माझे अंतःकरण शोकाने आणि दुःखाने फुटून जाण्याची वेळ आली आहे. " सँकोने उत्तर दिले; " आपण घरी गेलो म्हणजे मी त्या वस्तू तुला दाखवीन. तोपर्यंत तू संतुष्ट राहा. कारण ईश्वराच्या मनात असेल तर आम्ही पुनः एकदा दुसऱ्या साहसी प्रसंगांच्या शोधासाठी बाहेर पडू आणि थोड्याच वेळाने परत येऊं. तेव्हां मी सरदार किंवा एखाद्या बेटाचा

राज्यपाल—जगातील सर्वोत्तम बेटाचा अधिपती—झाल्याचे तुला आढळून येईल."

ती भली बाई उत्तरली, "असे घडून यावे अशी माझी मनापासून इच्छा आहे. कारण, खरोखर आपल्याला त्याची फार गरज आहे. पण, 'बेट' या तुझ्या शब्दाचा अर्थ काय? मला तो खरोखर कळत नाही." सँको म्हणाला, "योग्य वेळी सारे कळेल. मध हा काही गाढवाच्या तोंडात घालावयाचा नसतो. बेट म्हणजे काय हे मी तुला पुढे सांगेन. 'बाईसाहेब, बाईसाहेबांची मर्जी असेल तर', असे म्हटल्याशिवाय तुझे सेवक आणि गुलाम एक शब्दही उच्चारीत नाहीत हे पाहून तुला केवढे नवल वाटेल!"

जोन पँझा (हे तिचे नाव. ती आणि तिचा नवरा या दोघांमध्ये काहीही साम्य नसले तरी, ला मांचामध्ये अशी रूढी होती की, बायकांना नवऱ्याचे आडनाव लावावयाचे.) म्हणाली, "सँको, 'बाईसाहेब, बेटे आणि गुलाम' या तुझ्या शब्दांचा अर्थ काय?" सँको म्हणाला, "जोन, या साऱ्या गोष्टी एका क्षणात एका दमात कळाव्या म्हणून, तू आपल्या डोक्याला त्रास देऊ नकोस अशी माझी प्रार्थना आहे. मी तुला खरे तेच सांगत आहे. तेवढे पुरेसे आहे. आता तू आपले ओठ शिवून घे. पण जाता जाता एक गोष्ट मी तुला नक्की सांगतो की, साहसी प्रसंगाच्या शोधार्थ निघालेल्या शिलेदाराचा शागीर्द होण्यापेक्षा, या विशाल विश्वात दुसरी कोणतीही गोष्ट प्रामाणिक माणसाला चांगली नाही. ज्या साहसासाठी माणूस बाहेर जातो, त्यापैकी पुष्कळ त्याच्या इच्छेप्रमाणे त्याच्या अपेक्षा पूर्ण करीत नाहीत हे खरे आहे, शंभर प्रसंगातील नव्व्याण्णव प्रसंग दुर्दैवी ठरत असतात. माझ्या जीवाची किंमत देऊन हे मी जाणले आहे. मला खूप लाथा बसल्या आणि पुष्कळ हिंदकळावे लागले आणि काही प्रसंगी तर भरपूर चोप बसला. तरीसुद्धा विलक्षण प्रसंगांचा शोध घेणे, जंगले तुडवीत जाणे, अरण्यात इकडे तिकडे हिंडून शोध करणे, डोंगरावर उडया मारणे, किल्ल्यांना भेटी देणे, आपल्या इच्छेप्रमाणे खानावळीत मुक्काम ठोकणे आणि हे सर्व होत असताना हाल-अपेष्टा भोगणे हा एक कधी न संपणारा खेळ आहे."

असे संवाद करीत सँको पँझा आणि त्याची बायको जोन हे एकमेकांचे मनोरंजन करीत होते. त्यावेळी घरधनी व पुतणी यांनी डॉन क्विक्झोटचे कपडे उतरविले आणि त्यांना अंथरुणावर निजविले. तेथे ते त्यांचेकडे टक लावून पहात राहिले, पण आपण कोठे आहोत हे त्यांना कळेना. पाद्र्याने पुतणीला बजावले, "आपल्या काकांची काळजी अत्यंत दक्षतेने आणि प्रेमळपणाने घे. त्यांचेवर चांगला पहारा ठेव. नाही तर ते पुनः दुसरी सफर काढतील." त्यांना घरी परत आणण्यासाठी आपण किती त्रास सोसला हे त्याने तिला सांगितले. ते ऐकून बायका पुनः हेल काढून रडू लागल्या. पुनः शिलेदारीच्या ग्रंथांना शिव्याशाप मिळाले आणि 'ते रसातळात जावोत' असे म्हणून त्यांचा धिक्कार केला गेला. त्या ग्रंथातील चटकदार व काल्पनिक वर्णने आणि लबाड घटना नरकात टाकल्या जाव्यात, अशी त्यांनी इच्छा व्यक्त केली. कारण आपला धनी आणि आपला काका बरा होताच त्याला आपण आंचवू, या भीतीने त्यांची मने त्रस्त

झाली होती—आणि पुढे घडलेही त्यांच्या भीतीप्रमाणेच.

डॉन क्विक्झोट यांनी साहसी प्रसंगांच्या शोधार्थ केलेल्या तिसऱ्या मोहिमेतील यशाची चौकशी करण्यासाठी या इतिहास–लेखकाने अत्यंत दक्षता घेतली असली तरी, कोणाही विश्वासार्ह लेखकाकडून त्याला त्या मोहिमेचा पूर्ण वृत्तांत कधीच कळला नाही. लौकिक आणि परंपरा यांनीच त्या मोहिमेचा तपशील ला मांचाच्या आठवणीत आणि जुन्या दप्तरात साठवून ठेवला आहे. शिलेदाराच्या तिसऱ्या सहलीनंतर, सारागोस्सा या शहरातील काही सुप्रसिद्ध खेळांच्या सामन्यांचे वेळी ते उपस्थित होते. तेथे त्यांना आपल्या बुद्धीचे आणि शौर्याचे प्रदर्शन करण्यास संधी मिळाली. पण शिलेदाराला मृत्यू कसा आला हे, या इतिहास–लेखकाला सुदैवाने एक प्राचीन हकीम भेटला नसता तर, त्याला कधीच कळले नसते. त्या हकीमाजवळ एक शिशाची पेटी होती. ती एका जुन्या झोपडीच्या अवशेषात, तिचे पुनः बांधकाम चालू असताना, सापडली असे त्याने सांगितले. या पेटीत काही कागदाच्या सुरळ्या होत्या. त्यावर गॉथिक लिपीतली अक्षरे लिहिलेली होती आणि स्पॅनिश भाषेतील कविताही होत्या. त्या कवितांमध्ये त्याच्या पुष्कळ उदात्त कृत्यांचे गुणवर्णन केलेले होते. टोबोसोच्या डल्सीनियाच्या सौंदर्याचे स्तुति-स्तोत्र गाइलेले होते, रोझिनांटच्या आकृतीचे चित्रण केलेले होते आणि सँको पँझाच्या स्वामीनिष्ठेचे स्तवन केलेले होते. डॉन क्विक्झोट यांच्या दफनभूमीचा आणि कैक मृत्यु-लेखांचा व त्यांच्या जीवनाच्या व संभाषणाच्या गौरवाचा वृत्तांत त्यामध्ये होता. त्यांपैकी ज्या कविता चांगल्या वाचता आल्या आणि रूपांतरित करता आल्या, त्यांचा समावेश या अभिनव व अप्रतिम इतिहासाच्या प्रामाणिक लेखकाने येथे केलेला आहे. हा अप्रतिम इतिहास पूर्ण करण्यासाठी लेखकाने ला मांचा येथील जुने असंख्य कागदपत्र धुंडाळले आहेत. त्यासाठी त्याने जे परिश्रम केले आणि कष्ट भोगले, त्यांच्याबदली वाचकांकडून आपल्याला काही बक्षीस मिळावे अशी त्याची इच्छा नाही. मात्र आताशा शिलेदारीच्या ग्रंथांचे स्वागत जसे चांगल्या प्रकारे होते आणि त्या ग्रंथांना विचारी माणसे जेवढे श्रेय देतात, तेवढे वाचकांनी आपल्याला कृपा करून द्यावे, अशी लेखकाची इच्छा आहे. त्याची परम महत्त्वाकांक्षा ही आहे. ती पूर्ण झाली तर त्याला भरपूर संतोष मिळेल आणि वाचकांना करमणुकीचा दुसरा काही मजकूर देण्यास त्याला उत्तेजन मिळेल. तो या पुस्तकाइतका बहुधा सत्यपूर्ण असणार नाही, पण त्याची रचना इतकीच चांगली आणि चित्तवेधक असेल. त्या शिशाच्या पेटीत सापडलेल्या कागदांवरील पहिले शब्द असे होते...

ॲर्गामॅसिल्लाचा पंडित मोनीकाँगो याने डॉन क्विक्झोट यांच्यावर लिहिलेला

## समाधि–लेख

"येथे पडला आहे एक झुंझार शिलेदार !
जो खरचटलेल्या देहाने नि दुरवस्थेत

रोझिनाण्टच्या पाठीवर स्वार होऊन
अनेक मार्गांवरून हिसके खात गेला.
त्याच्या शेजारी जवळच सँकोला निजवले आहे.
या गोष्टीचे कोणी नवल करू नये.
( कारण ) जरी तो विदूषक होता असे म्हणतात,
तरी सेवक म्हणून फार वाईट तो कधीच नव्हता. ”

अर्गामासिल्लाच्या पंडित पॅनियाग्वाडो याने टोबोसोच्या डल्सीनियावर रचलेला

## समाधि-लेख

येथ डल्सिनिआ पहुडली आहे!
एकदा ती भक्कम, गुबगुबीत नि उत्साही होती.
पण आता ती मृत्यूची लूट झाली आहे—
आणि काहीशी कृश नि जीर्ण.
तिच्याशी क्विक्झोटसारखे गांवढळ गडी
दीर्घकालपर्यंत एकनिष्ठ राहिले.
तिने अभिमान धरणे वाजवीच होते.
( कारण ) तिच्यापेक्षा पुष्कळच कमी गुण असलेल्या
नारी प्रतिष्ठित झाल्या आहेत.

वाचता येतील अशा कविता एवढ्याच होत्या. बाकीच्या कवितांची अक्षरे पुसलेली होती. आणि कसरीने बहुतेक खाल्लेली होती. त्यांचा अर्थ काय असेल याविषयी अनुमान करण्यासाठी त्या कविता विद्यापीठाच्या एका विद्यार्थ्याला देण्यात आल्या होत्या. पुष्कळ खटपटीनंतर आणि त्रासानंतर त्याने आपले काम पुरे केले असल्याचे आम्हाला समजते. डॉन क्विक्झोट यांच्या तिसऱ्या दौऱ्याचे वर्णन मिळण्याची आशा त्याने आम्हास दिली आहे. त्यामुळे जगावर त्याचे मोठे उपकार होतील!

**उत्तरार्ध यापेक्षा उत्तम असेल, असे मी खात्रीने सांगतो.**



# खंड पहिला – समाप्त